


## अध्याय १८ वा
## मोक्षसंन्यास योग (कलशाध्याय)
## लघुसा सारांश

देव–देव अहो! जय जय! आपला अहो देव–देवा! जयजयकार असो! अहो! देवा–! श्रीगुरो आपण कल्पनेचा विषय न होणारे असे आत्मरूप आहांत. देवो आपण (जीवन जन्म फल देणाऱ्या) कल्पवृक्षाप्रमाणें फल देणारे असे अपूर्व सद्‌गुरूरूप आहांत! देवो आपण निजस्वरूप ज्ञान अपरोक्ष ज्ञानरूपी वृक्षाचे बीज–उत्पत्तीस्थान आहांत! देवो सम्यक् ज्ञान प्राप्तीचें स्थान आपण आहांत. प्ररोहण–प्ररोह अंकुर पारंबी–अवनि वाढणें रूजण्याची भूमि–उत्पत्तिस्थान–आहांत. आपणाला नमन असो. आपला जय जय असो, आपला जयजयकार असो! (१) (१०)

असें एक एक वेगवेगळे अनेक (अनेक प्रकारच्या प्रत्ययांनीं–संज्ञ असें हें शास्त्रीय संज्ञेनें स्तुती करून तुमच्या प्राप्तीसाठीं–तुम्हींच कीं उद्देशाचे उद्देशाने न सांगता येणाऱ्या विशेषणानी–शब्दातीत, तरी तुमच्या साठींच की आहे. (२) (११) तरी जसे पिसे मोहाने व प्रेमाने मोहन विधेने पछाडलेले वेडे झालेले मोहित झालेले आदरानें वाखाणतें भाषण करते, तेथें गुरू माऊली आई मातृ–माये ते सहन कर भुली जिंतिले तसे आलाप घालीत आहे–तसें ते माउली वानू हे आपण सहन करून असावें. (३) (२९) गीतारूपी रत्नखचित मंदिराचा गीतेचा मराठी अर्थ तोच चिंतिलेलें देणारें रत्न, चिंतामणी, रत्नाचा कळस–अहो चिंतामणि कामधेनु–कल्पवृक्ष हे स्वर्गीय पदार्थ मनोरथ पूर्ण करणारे होत–सर्व गीता दर्शनाचा–सगळया गीतातत्त्वज्ञानाचा गीतेचें स्वरूप सगळें दाखविणारा हा अठरावा अध्याय–गीतेस येथें दर्शन म्हणजे परमेश्वरी ज्ञान दाखविणारें शास्त्र–(म्हटलें आहे–) पढविणारा पाढाऊ गीतेती पुनरावृत्ति करणारा कळसच कीं. (४) (३०) लोकांतही अशी रूढी आहे कीं, जें स्वरूप अव्यय, दूर अंतरावरून देवळाचा कळस दिसतो. मंदिर शिखरावरची शंकु, आकृति, कलश (घागर पात्र तद्वत) तेथें भेट कवटाळून भेटल्या-सारखें आलिंगन दर्शनच हस्तगत होतें–श्रीपंढरीनाथास आलिंगितात तसें हातवसे–देवळाचा कळस दुरून पाहिला तर ती देवाची साक्षात् भेट होय–अशी समजूत पंढरीच्या विठोबारायाच्या देवळाच्या दर्शनाची प्रसिद्ध. (५) (३१)

श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात :—हा शेवटचा अठरावा अध्याय नव्हे तर ही अठरावा अध्यायरूपी एकाध्यायी गीताच आहे–अहो क्षुद्रार्थी साधितनाम **वासरूच धार काढूं लागलें तर पान्हा येण्यास कितीसा वेळ?** "वासरूं जें अनन्य तेथें प्रेमपान्ह्यास उशीर तो कसचा?" (६) (८४) त्याप्रमाणें समाप्तीचे वेळीं पूर्ण होते समयीं अर्जुनानें पुन्हां गीता सांगण्यास भाग पाडिली म्हणून येथें गुरूच कीं अहो धनी का गुरू तो सेवकाचा कां शिष्याचा संवाद न करी काय? संभाषण–परस्परांचें भाषण करीत आहे. स्वामी सेवकाचा संवाद तो काय करीत नाही गुरुशिष्याचा संवाद तो सर्व कांहीं पूर्ण करतो कीं, संवाद तो शिष्यास गुरुच कीं करित आहे. (७) (८५) अर्जुन म्हणतो अहो देवा! संन्यास व त्याग यांची एकाच अर्थानें योजना केलेली दिसते. समूहास का जमावास कीं संघ कां संघात म्हणणे होतें ना! श्रीभगवान् म्हणतात ९–१२. **जे का निमूटपणें समूळ निःशेष कर्म टाकावें सांडावें, त्यास संन्यास म्हणावें आणि कर्माचें फळ तेवढें टाकावें जें त्यास त्याग (बोलावे) म्हणावे** कर्माची मर्यादा रेषेने विशिष्ट मर्यादा दाखविली जाते ती सीमा नच उल्लंघिता प्रति दिवसाच्या अवश्य कर्मास चित्त द्यावें (१) नित्य (स्नान संध्या, जप इत्यादि.) (२) नैमित्तिक (कुलाचार पर्व विशेष कर्मास श्राद्धादि कर्मास–) कर्मानंतर सर्व फळाविषयीं त्याग करून तर कुणब्याच्या भाषेनें वांतीवानी म्हटलें. (१०) (१२५)

म्हणून जें त्याज्य नाहीं तेथें त्याग करू नये. टाकतां येण्यासारखें जें नाहीं तें टाकण्यांस प्रवृत्त होऊं नये. लोभयुक्त कां लोभिष्ट होऊन टाकणें जें त्याज्य (तें टाकण्यायोग्य न व्हावें.) आहे त्यास लोभिष्टपणें न टाकणें असें करू नये. तें कर्म त्यागावें तें कर्म करू नये (११) (१३३) तसे फलाची इच्छा सोडण्याची शक्ति नसलेलें तें तर कर्मच की, वाईट म्हणून किडाळ म्हणतात. सोडून द्यावें असा सिद्धांत ठरवितात. (१२) (१३७) कोणी म्हणतात यज्ञयाग इत्यादि अवश्यक असल्यामुळें करावेतच असें ह्या यागासारखे–शुद्धि करणारे पाप नाहींसें करणारें दुसरें साधन नाहीं. (१३) (१३८) असें जाणतो जो मी त्या माझ्या बुद्धीस हे त्यागाचे निष्काम कर्माचे तत्व खरोखर त्रिशुद्धि फारच पटतें (माने) तें निश्चय तत्व, निश्चित तत्व अगोदर एथें तर खरें (१४) (१४७) आपल्या अधिकारानुरूप म्हणजे वर्णाश्रमाप्रमाणें हवन कर्म दान तप ही कर्में तर जास्त प्रमाणावर शास्त्राप्रमाणें जपून करावींत काळजीनें आचरावींत. (१५) (१५२) कर्म केलें कीं, त्याच्या मागोमाग का बरोबर, फळ प्राप्तीचा गुण असतो–फलद्रुपता असने, पण मनोरथ–मनाचा हेतु का मनाची इच्छा ती या फळाकडे होऊं देऊं नये. (१६) (१७१)

**जसा कर्माचा दोष कर्म करण्याच्या युक्तीने नाहीसा कसा करावा**, हे तमोगुणी मनुष्य तो अज्ञान भ्रांतीवें उन्मत्त म्हणून (भ्रांति=भ्रम भटकणें.) जाणत नाहीं. (१७) (१८२) देह-भ्रांतिनें माजविला म्हणून, देहास दुःख होईल या भीतीनें, कर्म करीत नाहीं, तो जाणावा **राजस त्याग.** (१८) (१९२) करण्याचें काम तें कर्म, व कर्ता म्हणजे त्या कर्मास करणारा मी, वेगळा, अशा दुजा भावाची गोष्टही त्यास माहीत नसते. अशा त्यागास **सात्त्विक त्याग** म्हणावें. (१९) (२१६) अहा गा! सव्यसाची! मनुष्य देहाचा तागा—, जन्म मिळून जे कर्माचा तिटकारा करतात. (खंती=न्यूनता) ते अशिक्षित असे गावंढळ होत. (२०) (२१८) या कर्मास खरोखर सोडण्याचा प्रकार एकच आहे. तो· ऐकः तो म्हणजे कर्म करूनही, कर्मापासून मिळणाऱ्या फळाच्या आशेच्या स्वाधीन न होणें, हा होय. (फळाशेच्या हारी न जाणें. ही एकच परी कर्माची सांडिती ती. (२१) (२१७) देव (उत्तम योनी) मनुष्य (मध्यम योनि) स्थावर (कृमि, कीट, वृक्ष पाषाणादि कनिष्ट योनि) या सर्वास मिळून जगडंबर लोक विस्तार, सुदर भाषण प्रख्यानी असें म्हणतात, हे तिन्ही विभाग ह्या तीन अवस्था, तर कर्मापासूनच उत्पन्न होणाऱ्या फळाच्या तीन तऱ्हांच्या आहेत. (२२) (२३९) एक अनिष्ट फळ (निषिद्ध कर्म करणाऱ्यास कृमि कीट-कादि जन्म) इष्ट (स्वधर्माप्रमाणें शास्त्राज्ञेप्रमाणें कर्म करून इंद्रादि देह मिळतात तें) इष्ट अनिष्ट, (पुण्य पाप समान होऊन मनुष्य जन्म मिळतो तें) असे तीन प्रकार कर्म फलाचे जाण. (२३) (२४०) म्हणून सम भागे करून सारख्या प्रमाणावरच जेव्हां कां पुण्य आणि पाप या दोहींचें समान आचरण होतें तेव्हां मनुष्य जन्म लाभतो. तें मिश्रफळ (इष्टानिष्ट) जाण. (मिश्र ब्रह्म!) (२४) (२४७) असें ह्या तीन विभागांनीं, कर्माचें फळ जगांत मांडून कायम करून ठेविलें आहे. म्हणून ह्या कर्मफळाचा भोग भोगण्यापासून, फळाच्या आशेंत गुंतले त्यास भोगणें तें केव्हांही सोडीत नाहीं. भोगविण्यास चुकत नाहीं. (२५) (२४८)

कर्मफळ व कर्म यांच्या पुन्हः पुन्हः निमित्तानें कर्मफलाचा उपभोग एक सारखा वाढत जातो व याप्रमाणें त्याग न करणारे–सकाम कर्म करणारे ते संसारात गुंतविले. (२६) (२९३) पांच हेतूंचा मेळ झाला (१) अधिष्टान (२) कर्ता (३) ज्ञानेंद्रिये (४) वायूचे चलनवलन (५) देवता या पांच कारणांनीं कर्मरूप वेलीची लागवड केली जाते. 'आत्मा सिना'–आत्मा तो वेगळाच! आत्मा कर्मात गुंतत नाहीं. (मराठीच्या दृष्टीने सिन्हा सीना ह्या शब्दाच्या व्युत्पत्तीचा अर्थ चिन्ह खूण वेगळी अशी.) (२७) (३१३) बहुत काय पण तिन्हीं अवस्थास, जागृति स्वप्न, सुषुप्तीस शरीरच एक आधार म्हणून या देहास **अधिष्ठान** हेंच नांव आहे. (२८) (३२०)

प्रकृती माया कर्म करिते ती म्यां केली असें भ्रमानें–अज्ञानानें म्हणतो–या प्रकरणांत **कर्ता** ह्या नांवानें जीव म्हटला जातो. (२९) (३२६) बुद्धिचें एकच ज्ञान जाणीव कान डोळे इत्यादी भेदानी, इंद्रिय रूपांनीं बाहेर प्रगट होते जे, (३०) (३३०) तेंच इंद्रिय करण करणें जो कर्माचें वेगळा प्रकार म्हटला. **ज्ञानेंद्रियाचा व कर्मेंद्रियाचा वेगळेपणा निराळेपणा तेंच कर्मोत्पत्तीचें तिसरें कारण होय.** (३१) (३३१) नाभिस्थानाच्या–पिंडापासून–नाभिकमळापासून हृदयापर्यंत ओंकाराची स्पष्टता हृदयांत वास करीत असतां तिला प्राण म्हणतात. (३२) (३३६) ती प्राणशक्ति भिन्न, वागण्याचा मार्ग जो त्या स्थानेकरून वृत्तिपंथाने वेगवेगळी भेदली. यावरून **एकच वायूशक्ति (पंचप्राण, पंच उपप्राण) हे प्रकार हे कर्माचें चौथें कारण** (३३) (३४३) डोळे आदिकरून दहा इंद्रियें (५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये.) इंद्रियामार्गे आपल्या कृपेचें सामर्थ्य देणारें सूर्यादि, सूर्य, चंद्र अग्नि इत्यादि देवाचा समूह (३४) (३५०) **ते देवता समूह हे कर्माचें पांचवे कारण** असें देव अर्जुनास म्हणत आहेत. (३५) (३५१) त्याचप्रमाणें मन वाचा देह यांचे कर्म मन वाचा देह ह्याच्या हेतुनेंच होतें. रत्नांनीं म्हणजे **रत्नांच्या साधनांनीं रत्नाचें** सुंदर आकार **पैलू बनले होतात** जसें. (३६) (३६१) हेतू आणि कारण याच्या जुळणीनें जे कर्म उत्पन्न होते ते आंधळे (शास्त्र न जाणतां केलेले) त्या कर्मास जेव्हां शास्त्राचे विधिनिषेधरूपी साह्य मिळेल तेव्हां ते न्यायाला अनुसरून होते. (३७) (३७०) आत्माच कर्म करणारा हा सिद्धांत पण तसा त्याचा खरोखर निश्चय नसतो, उलट कर्म करणारा मी देहच कीं, असेंच खरें मानतो. (३८) (३८३) आत्मतत्त्व जें आहे तें कर्मातींत आहे, कर्माकर्मा विरहित आहे–आत्मा सर्व कर्मास त्रयस्थपणें पाहाणारा, अशीं भाषासुद्धां कानावर येऊ देत नाहीं, (४०) (४२२) तसें आपणाहून वेगळे जो सर्व कर्म समुहास समजत नाहीं, आपण स्वतः म्हणजेच कर्मसमूह, तेथें त्याच्या बुद्धिस अहंपणाचा दोष कसा काय लागणार ?

जें ज्ञान इंद्रियास व्यवहारात वागवितें, वागतें, जें **(ज्ञान)** ह्या जीवास सुखदुःखाचा **अनुभव** देतें, तें ज्ञान गाढ निद्रेंत जेथें लीन होतें, तेथें ज्ञानच तें म्हटलें–तेथें ज्ञान असतेंच. संवेदना–चेतना तें ज्ञान जेथें ओहटतें ती गाढ निद्रा जाणावी. (४२) (४६५) त्या सुषुप्ति अवस्थेच्या अभिमानी 'प्राज्ञ' जीवास **ज्ञाता** असें नांव आहे; हे आतांच वर सांगितलें तेंच (ज्ञान) येथें हें पाडुसुता ! **ज्ञान** होय. (४३) (४६६) शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हा पांच प्रकारचा (ज्ञेयाचा) भास पंचविषयाचा पंच ज्ञानेंद्रियास कर्ण, नेत्र, रसना, नाक त्वचा यास कळणारा अनुभव तो सर्व एकच पण विषयांनी व इंद्रियांनी मात्र भिन्नपणा भासतो. जो ज्ञेयाचा तेंच **ज्ञेय** ज्ञेय. (४४) (४७२) ज्ञेयाचिया हावा–विषयादिकांच्या इच्छेस आशेसाठी जीव इंद्रिय समूहास राबवितो तेव्हां तेथें जीवास **कर्ता** म्हणतात. (४५) (४९३) **जीव** ज्ञाता आपण याप्रमाणें **कर्ता बनून ज्ञानास साधनता (कारणता) आणतो** मग तेथें स्वभावता. ज्ञेय (विषय) सहजच कार्य होते. (४६) (४९४) याप्रमाणें वर सांगितलेले ज्ञाता ज्ञेय ज्ञान–ही तिन्ही **कर्माची प्रवृत्ति** प्रेरणारे आहेत तसेंच कर्ता करण व (साधन) कार्य हा (कर्म संचय जाणावा) हा **कर्माचा सांठा** आहे. कर्मच कर्ता, करण कार्य रूपांनी उदित होतें (४७) (५१२) पण वर सांगितलेलें जें ज्ञान, कर्म, कर्ता हे तीन तीन ठिकाणीं (सत्व रज तम या गुणानीं) वेगवेगळे होतात. (४८) (५१७) ज्यामुळें सात्विक प्रकार कळेल तो गुणांचा भेद सांगितला पाहिजे जो गुण भेद सांख्य (ज्या गुणात तत्व गणना संख्येनें केलेली आहे त्या) शास्त्रात 'कापिल–सांख्यांत' स्पष्ट केलेला आहे. (४९) (५१९) तेंच हें अर्जुना ! सात्विक ज्ञान (स्पष्ट आणि निर्मळ) जें **सात्विक ज्ञान उत्पन्न होताच ज्ञेय ज्ञात्यासह निःशेष होतें, ब्रह्मी ऐक्य रूप होतें.** (५०) (५२९) पदार्थांचे जे पुष्कळसे भेद दिसतात जे लहान मोठ्या आकृतीनी दिसतें (याचे आंतले कारण) ते राजसज्ञान होय–सर्व भिन्नता ती राजस ज्ञानाचा परिणाम जाणावी. (५१) (५४७)

जें शून्य–, जें कांहींच नाहीं, जें व्यर्थ, जें निरुपयोगी, जें उदस्त, म्हणजें ओसाड नाममात्र ज्ञान– ज्याला ज्ञान असें म्हणताच येत नाहीं. असें जाणणें जें–त्यास तामस ज्ञान म्हणतात (५२) (५७८) त्या तीन प्रकाराच्या ज्ञानासंबंधानें तीन प्रकारचें सत्व, रज, तम कर्म असतें. त्यांत **सात्विक कर्म** तें अगोदर ऐक (५३) (५८५) श्रद्धेनें पूर्णपणें कर्म आचरण कर. फळाकडे आशा ठेवू नको–ती संपूर्ण क्रिया (सर्व कर्म) ब्रह्माच्याठायीं स्थिर कर (ब्रह्मार्पण कर). (५४) (५९०) सूक्ष्म कणाच्या लाभासाठीं (नर वोळंवे –नर वाळवी.) वोळंवी ती जमिनीत खोल जाते, तसें स्वर्ग सुखाच्या लोभामुळें श्रम करणें तें. (५५) (६०९) ते स्वर्ग प्राप्तीसाठीं यज्ञयागादि फळाची कामना–, कामना फळाची इच्छा धरून केलेलें कर्म श्रमाचें दुःखाचें तें **राजस कर्म** जाणावें. (५६) (६१०) करण्यांस योग्य करण्यांस कां अयोग्य हा कांहीच विचार न करतां येईल तें करीत राहाणें, आपले व परके असा विचार आडदांडपणानें करीत नाहीं. तें **तामस कर्म** जाण. (५७) (६२६) ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास, ह्या चार आश्रमामुळें एकच पुरूष चार प्रकारचा भासतो, तसें **कर्माच्या गुणावरून कर्त्यास त्रिविधत्व तीन** प्रकारचा गुण **येतो.** (५८) (६२९) फार जीवें भावें आदराने कर्म करतो पण मी कर्ता (असा अहंभाव) असें वाटत नाही. वर्षाकाळीचे मेघ नुसतेंच गर्जत नाहींत वर्षाव करतात तसें. (५९) (६३४) राजस कर्त्याचे ओळखणें ती खूण–सर्व जगाच्या हावरे-पणाचे स्थान ठिकाण तो. (६०) (६४९) जगांत जो मूर्तिमंत (पापपुंज) पापांचा सांठा शास्त्र निंद्याचरण करणारा तो **तामस कर्ता** (६१) (६८८).

पण बुद्धि आणि धृति हे दोन वेगवेगळे विभाग आहेत त्यांत अगोदर बुद्धि रूपाचा प्रकार तो सांगतो– सांगू या. (६२) (६९६) (कृत्याकृत्य शुद्धि) करण्यास योग्य कोणतें? अयोग्य कोणतें? हा निर्णय उत्तम प्रकारें जी (निरवधि) जाणते ती **सात्विक बुद्धि** जाण (६३) (७१७) योग्यतेचा चोखविषी, विचार न करितां समुदायाशीं सरसकट वर्तन करणें जसें लग्न कार्यात आमंत्रण प्रसंगी तांदूळ अक्षता देण्याची चाल मंडळीवर (मांदी) अक्षत टाकिली हें **राजस बुद्धिचे लक्षण** (६४) (७२३) तसें धर्मजात–शास्त्रशुद्ध जेवढें तेवढें त्या बुद्धिस पाप वाटतें खरें तें खोटें अशीं समजूत ती **तामस बुद्धि** होय. (६५) (७२६) ह्यांना ज्या तीन प्रकारच्या बुद्धिवृत्तींनीं कर्ममात्राचा निश्चय केला जातो. त्या आधारभूत वृत्तीला धृति धैर्य– वृत्ति म्हणतात. तीही तीन प्रकारची आहे. (६६) (७३१) **तीन प्रकारची बुद्धि** जी अगोदर कर्म निश्चय करते ती धृति अशीं येथें सिद्धि–जया प्रत पावतें (६७) (७६३) **त्या धैर्याप्रमाणें तीन प्रकारचे कर्म** जे कर्म फळ निपजतें, जें कर्म फळ होतें, त्यास **सुख** म्हणतात तेही कर्मवशे, कर्म संबंधानें तीन प्रकारचें जाणावें. (६८) (७६७) जें सुख आत्मअनुभवाचें आनंदात विसावतें, ज्या सुखास मूळ विरक्ति, तें सात्विक अशा नांवाला म्हणजे परिणामाला पावतें, बोलिलें होतें (६९) (७९३) विषय आणि इंद्रिय संयोगानें, उद्देशानें, जें जीवास आनंवितें, पोषितें, तें राजस–तें कर्म तर जसें कां राजहंस उंचावरून खडकावर पडून नाश पावतो. तसें (रात्री आकाशांत फिरणाऱ्या हंसाला नक्षत्रांचें प्रतिबिंब पाण्यांत दिसतें त्याप्रमाणें त्या प्रतिबिंबावर रत्न बुद्धिनें) ती रत्नेंच कीं प्राप्त होतील म्हणून एकदम खाली उडी घेतो पण खडकावर आपटून त्याचा घात होतो–तसा राजस सुखाचा वाईट परिणाम असतो.) (७०) (७९८) जे आलस्यानें जास्त वाढतें (आलस्यादि पोखिजे) झोपेंत अनुभवास येतें–, झोपेची आवड आवडू लागते, आत्मलाभाचा मार्ग ज्याच्या आरंभी व शेवटीं चुकतो (भुलिजे आपली वाट) तें **तामस सुख** (७१) (८०७)

असंभाव्य–असभ्य, निंद्य ते सुख म्हणणें संभवत नाहीं. म्हणून ही गोष्ट फार सांगत नाहीं. (७२) (८०९) मायेच्या–प्रकृतीच्या दृष्टीखाली अवलोकनांत ह्या तिन्हीं सत्व, रज, तम गुणांनी बांधिला जात नाहीं, अशी वस्तू स्वर्गी अथवा मृत्युलोकीं आहे? तर नाहींच. (७३) (८१३) (प्रकृतीच्या) गुणानीच

देवांत ब्रह्मा, विष्णू, महेश, असें तीन प्रकार केले, गुणांनीच लोकांत स्वर्ग, उत्तम, मृत्यु–मध्यम, पाताल–कनिष्ट, हे भाग पाडले, ह्या गुणांनीच चार वर्णास वेगवेगळे व्यवसाय–कामे घालून दिली (७४) (८१७) ते चार वर्ण कोणकोणते पुसशील तर असें जाण की ज्या चातुवर्णाची गाडी ओढणारे त्या चार वर्णांत जेथे ब्राह्मण प्रमुख पुढारी होत (७५) (८१८) त्यांना वेदोक्त कर्म करण्यास अधिकार आहे, म्हणून क्षत्रिय आणि वैश्य दोन्हीं ब्राह्मणाच्याच योग्यतेचे समजावेत कारण काय तर–(७६) (८१९) श्रीमंताकडून जसा फुलाच्या संबंधानें माळेतील दोरा जो सुताचा तंतु त्याचा वास घेतला जातो तो तंतु प्रासला जातो तसें ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य–व्रतबंध संस्कारानें दुसरा जन्म ज्यास होतो ते द्विज, यांच्या निकट संबंधानें शुद्रास–वेद–श्रुति–श्रुति वेद–ते पहिल्या तीन वर्णाबरोबरीचे असें समजून स्वीकारते. (७७) (८२२)

सत्वगुणानें आपल्या निमोनिम (म्हणजे अर्ध्या विभागाने ब्राह्मण व क्षत्रिय ते) नियोग–विनियोग असें अधिकारानें प्रधानतेनें युक्त केलें (नियोगी = अधिकारी–प्रधान. नियोग = देवघटना, नेमून दिलेले काम–) नेमून दिलेल्या कामानें, देवघटनेनें. (७८) (८२८) रजोगुण पण सत्व मिश्रितरज तेथें वैश्य; रज तमानें मेसळ तेथें शूद्र (८९) (८२९) याप्रमाणें शमादि नऊ गुण–(शम, दम, तप, शौच्य, शांती, आर्जव, ज्ञान–विज्ञान आस्तिक्य.) दोषरहित असें ज्या कर्मात असतात ते स्वाभाविकपणें ब्राह्मणाचे कर्म. (८०) (८५१) निरनिराळया सात गुणांनी शौर्य, तेज, धृति, दक्षता, युद्धांतून पळून न जाणे पळ न काढणे, दान ईश्वर भाव (प्रजेची निष्टा) जगांत ज्या कर्मास पवित्रपणा आला आहे ते क्षत्रियाचे सहज स्वाभाविक कर्म (८१) (८७४)

शेतीवर निर्वाह करणें, गायी गुरें, सांभाळून असणें स्वस्ताईमध्यें घेतलेली वस्तु महागाईनें विकणें, हे वैश्यकर्म. (८२) (८८१) वैश्य क्षत्रिय, ब्राह्मण, हे त्रैवर्णीय द्विज, याची सेवा करणें हे शूद्राचे कर्म (८९) (८८४) जातीच्या संबंधाने खरा, स्वभावतः जो कर्माचा अधिकार तो आपआपल्या धर्मशास्त्रानें नीट पाहून आचरावा. (८४) (८९१) शास्त्रानें सांगितलेले योग्य कर्म, तेंच केवळ एक जीवन समजावें; असें कर्म करणे हीच सर्वात्मा जो मी त्याची श्रेष्ट प्रतीची सेवा. (८५) (९०६) वर्णाश्रमानुरूप आपआपल्या कर्मरूपी फुलांनीं केलेली ईश्वराची पूजा त्या सर्वात्मक ईश्वरास फार संतोष देते. (८६) (९१७) आपला धर्म आचरणांत जरी अडचणीचा एकदेशी, तरी त्या स्वधर्मानेच शेवटी चांगले फळ मिळते (८७) (९२३) ज्या स्वधर्माचे आचरण करावे–आचरण केले तो संसार क्षीण–जसा मरण–नाहीसे करून योग्य अशा धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांतील श्रेष्ट पुरूषार्थ जो मोक्ष तो देईल. (८८) (९४९)

## मुमुक्षुची साधन संपन्नता व मुक्तावस्थेचे वर्णन—

ब्रह्मस्थितीची पात्रता त्या साधन संपन्न ब्रह्मनिष्ट पुरूषांस येते. ब्रह्मबोधानें जी चित्ताची प्रसन्नता, आनंदमयता, तेथें तो शोभतो (८९) (१०९१) माझ्या परमात्म स्वरूपावांचून दुसरें कांहींही, त्या ज्ञात्यासह नाहीं; हे सर्व आपणासह ब्रह्म आहे, असा अनुभव येतो. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी यापैकीं माझी परमात्म्याची चौथी ज्ञानभक्ति त्यास प्राप्त होते. (९०) (११११) तीच ही 'ज्ञानभक्ति' श्वतवाराह कल्पाचे सुरवातीस कल्पाचे आरंभी, भगवंतानें मिया भागवताच्या द्वारे म्हणजे ज्ञान आणि ज्ञानोत्तर श्रेष्ट प्रतीच्या भक्ति मार्गानें–मूळ भागवत ग्रंथ निमित्तानें ब्रह्मदेवास सांगितली. (९१) (११३२) ज्ञानोत्तर भक्तीनें एकूण सर्व क्रिया मद्रूप झाल्यामुळें अद्वैत दृष्टया काहींच करणे घडत नाहीं व यालाच पूजणें, भजणें असें ओळखावें. (९२) (११७८) याप्रमाणें आत्मतत्वानें मलाच एकाला ह्या अद्वय भक्तीनें निश्चित जाणून त्या जाणीव बोधासह आत्मपर झाले असें समज (९३) (१२००) अशा निर्विकल्प स्थितींत ब्रह्म आत्मा ईश्वर इत्यादि शब्द योजनेंत मोठीशी गोडी वाटत नाहीं. स्वानंदाचा विरस होतो, बोलण्याच्या विरहित न बोलणें, याही स्थितीस अवकाश नसतो–कांहीं नाहीं असेंही म्हणण्यास वाव नसतो.

(९४) (१२१३) इतर जी अध्यात्म विषयक षट्दर्शनादि सर्व शास्त्रें अज्ञानाशिवाय आत्मज्ञान देण्यास कां मोक्ष देण्यांस स्वतंत्रपणें समर्थ होत नाहींत ती अज्ञान तेवढें नाहींसें करण्यांस योग्य अशीं आहेत. (९५) (१२३३) गीताशास्त्राचे का गीता ज्ञानेश्वरी शास्त्राचे चांगुलपणाचे गुण ते मोक्ष प्राप्तीचे उपायच सर्व आहेत. इतर शास्त्रांनी जे मोक्ष उपाय सुचविले ते शास्त्ररीत्या प्रमाणसिद्ध खरें नव्हत. (९६) (१२३४)

सर्व गुह्य गोष्टी कूट स्थळें शस्त्रादि गूढें ती गीताशास्त्रानें उघड प्राप्त करून देता येतील असें गुह्य माझें मलाच माहित असणारें तें उपदेशात्मक बोलणें ऐक (९७) (१३५२) फार काय सांगणें पण तूं आपलें मन माझें घर कर–, तूं आपल्या मनांत मला कायमचा ठेव–, माझी कीर्ती पूर्णपणें श्रवण कर; माझ्या कीर्तीच्या ऐकण्यानें तूं आपले कान भरून घेऊन ऐस. (९८) (१३५५) आत्मज्ञानानें चांगले पवित्र असे जे संत ते परमात्म्याची माझी रूपें (अवतार) होत. संतांचें दर्शन प्रेमानें आवडीनें घ्यावें. स्त्रीवर जसें अत्यंत प्रेम तसें संतावर असूं देत. (९९) (१३५६) मी सर्व प्राण्यांचें, सर्व जगाचें वसति स्थान, माझी जी पवित्र नांवें आहेत तीं शाश्वत सुखानें, जगण्याकरितां, वाचेनें उच्चारीत जा, (१००) (१३५७) **कोणतीही मानसिक चिंता, चित्तांत आणू नको.** मला एकालाच शरण ये. (१०२) (१४१८) सांवळया वर्णाचा श्यामल–सांवळा–हातांत कंकण घातलेला अशा श्रीकृष्णानी भक्त शिरोमणि अर्जुन कवटाळला आलिंगिला (१०२) (१४१८) देव अर्जुनास प्रेमानें भेटत असतां देवांनीं आपल्या हृदयींचें ज्ञान गुज अर्जुन हृदयांत घातलें. देव व भक्त ही द्वैत स्थिति न मोडतां आत्मभावानें आपल्या सारखेंच अर्जुनास केलें तेथें देव व भक्त ऐक्य झालें. (१०३) (१४२१) याप्रमाणें वेदाचें मूलतत्वरूप का सूत्ररूप गीता नांवाचें शास्त्र, सर्वांना, सर्वजातींना पठणाचा अधिकार आहे असें एक परम पावन गीता नांवाचें शास्त्र श्रीकृष्णांनीं अर्जुनास प्रगट केलं, उघड सांगितलें. (१०४) (१४२६) कर्म, उपासना, ज्ञान अशा तीन विभागानें सर्व वेद आहे, वृक्ष जसा बीजात सूक्ष्मपणें असतो, तसा, तोच वेद तीन कांडानीं गीतेमध्येंही आहे. (१०५) (१४३१) वेदाचें सेवन म्हणजें सर्वांनीं अध्ययन करण्याजोगें जें स्वरूप—, जी, श्रीकृष्णांनी अर्जुनास, सांगितली, तीच ही प्रत्यक्ष गीता, होय. (१०६) (१४६६) ह्या गीता शास्त्रांचा सांप्रदाय म्हणजें पूर्वापार आचरण्याची पद्धती स्वीकारून ह्या गीताशास्त्राचें श्रद्धेनें आचरण कर. (१०५) (१४८१)

फार काय सांगू ह्या गीता शास्त्राची निंदा करणारा असेल तर मग तो ब्रह्मदेवाच्याहि योग्यतेचा असला तरी त्यास गीता मौजेनें का कौतुकानेंही देऊ नकोस (१०८) (१५०६) मिया विशेष काय सांगावें पण अशीही गीता ऐकणाऱ्यास–शिकणाऱ्यास परमानंदाचें फळ देईल. (१०९) (१५३८) अर्जुन म्हणतो कीं देवा, तुमच्या कृपेनें, तुमच्या गुण सामर्थ्यानें, आतां, मोह आहे किंवा नाहीं असें कांहीं पुसाल तर, मी कृतकृत्य झालों आहे. जें करावयाचें तें केलें, 'अंतिम प्राप्त झालें. (११०) (१५६२)

कृष्णार्जुनाच्या प्रश्नोत्तरांत संवादरूपी बहुल्यावर संवाद स्थितीत–बैठकीवर–दोघांत आंत–अंतर्यामी लग्न–ऐक्य झालें तें पाहून संजय आनंद भरित झाला. (१११) (१५७८) संजय म्हणत आहे कीं अर्जुन देवासह कृष्णाच्या रूपात आपणांस पाहाता झाला. श्रीकृष्ण अर्जुनासह पार्थाच्या ठिकाणीं आपणांस पाहाता झाला. अर्जुन स्वतःस कृष्णासह कृष्णरूपांत पाहाता झाला–देवानीं आपलें रूप अर्जुनासह अर्जुन मूर्तीत अवलोकिलें. (११२) (१५५१) असें संजय बोलत आहे तोंच त्याच्या ठिकाणीं सात्विक भाव उत्पन्न झाले त्या सात्विक भावांनीं हरण केलेली त्याची संजयपणाची स्मृती कोठे नाहींशीं झाली न कळे. त्यास देहविस्मृती झाली (११३) (१६०२) अनावर आनंदानें का न सांवरिता येणाऱ्या आनंदानें अपूर्व असा, स्फुंदू लागला, श्रीकृष्ण श्रीकृष्ण असें सद्‌गदित अंतःकरणानें वरचेवर म्हणू लागला (११४) (१६२०) धृतराष्ट्र म्हणतो कीं यावेळीं चालू असलेले कां उपस्थित झालेला कलह, भांडण भारती युद्ध तेथें कोणास जय मिळेल शेवटी

तो (११५) (१६२७) विजय नांवानेंच अर्जुन प्रसिद्ध आहे. श्रीकृष्ण हेही विजयरूप आहेत. ऐश्वर्यासह विजय निश्चयपूर्वक अर्जुनाकडेच होणार ! (११६) (१६४१) या म्हणण्यांत अंतर पडेल, बोलल्याप्रमाणें होणार नाहीं, तर श्रीव्यास सद्गुरूंचें शिष्यपणाचें चिन्ह धारण करणार नाहीं. (तर मी व्यासाचा शिष्यच नव्हें.) अशी प्रतिज्ञा केली, अशी गर्जना करून मोठ्यानें बोलून संजयानें हात वर केले. (११७) (१६५८)

श्रीकृष्णार्जुनांनी मोकळेपणानें जी स्वतंत्र गीता विषयक कथा सांगितली स्पष्ट संभाषण रूपानें बोलिली तीच श्री व्यासांनीं तळहातावर घेऊन पाहतां येईल अशीं सोपी केली. (११८) (१६९६) जें तत्वज्ञान शब्दांनीं न सांगता येण्याइतकें कठिण, तें अनुष्टुभ् वृत्तांत श्लोक पद रूपानें जुळवून गुंफून स्त्रिया, शूद्र, अडाणी यांच्या बुद्धीस श्रवण करतां येईल असें सोपें केले. (११९) (१६९९) तो व्यासकृत गीताग्रंथ मी ज्ञानदेव प्रस्तुत, त्यास महर्षिची गीतेतील पदें शब्द अर्थ दृष्टीनें पाहात पाहात सर्वांनीं ऐकण्यास योग्य अशा स्थितीस त्या मी ज्ञानदेवानी मऱ्हाटी भाषेत आणिला. (१२०) (१७०८) त्याचप्रमाणें व्यासांचा माग घेत घेत, व्यास जसें गीतेची रचना करीत गेले, त्या धोरणानें, अर्थ करीत गीता भाष्यकार श्रीमदाद्य शंकराचार्यांच्या भाष्यास, अडचणीच्या वेळीं (अद्वैत मायावाद प्रसंगी) त्याचा विचार पहात पहात मी अपात्र असतांहि लघुत्व घेऊन योग्य स्थानी न पोचता कोठे जाईन ? (१२१) (१७४१) गायनकलेनें शोभा आणितो, गाण्यावांचून ही शोभा आणतो, असा लाभ देणारा ओवी ग्रंथ म्यां केला. (१२२) (१७४१) लहान मुलापासून थोरापर्यंत, सर्वांना सहज समजेल अशा ओवीबद्ध मराठी ग्रंथ रचनेनें जणूं काय ब्रह्मरूपी रसानें सुगंधित झालेली अक्षरें ओवींतून गुंफिली आहेत, ओवीतील अक्षरांत ब्रह्माचा रस अर्थ दिसेल. (१२३) (१७४२) याप्रमाणें ग्रंथ कर्तृत्वास सर्वथैव ज्ञानेश्वराचें गुरू श्रीनिवृत्तिनाथ यांचा थोरपणा महत्व खरोखर आहे: हा ग्रंथ नव्हें तर श्रीगुरुकृपेचे ऐश्वर्य होय. (१२४) (१७५०) श्रीज्ञानेश्वर यावर आणखीही म्हणतात कीं, अहो स्वामी महाराज मला संतांचा संग सहवास तुम्हींच करून दिला, त्यामुळें माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले. (१२५) (१७७४) विश्वात्मा जो परमेश्वर त्यांनीं ह्या माझ्या वाग् यज्ञानें, वाणीच्या भजनानें, ग्रंथरूप सेवेनें, संतुष्ट व्हावें व संतोषित होऊन मला प्रसादाचें दान द्यावे जी की अहो ! (१२६) (१७९०) दुष्ट लोकाच्या मनांतील वांकडेपणा नाहींसा होवो ! त्याची ती सदाचाराकडे आवड ती वाढो. प्राणिमात्रात एकमेकांशी जीवापासून प्रेम नांदो ! (१२७) (१७९४)

पापाचा काळोख नाहीसा होवो ! सर्व विश्व स्वधर्मरूपी सूर्यानें प्रकाशो ! जो प्राणी जे इच्छिल ते त्यास मिळो ! (१२८) (१७९६) त्रिभुवन सर्व सुखानी पूर्ण होवो आदि पुरुष जो परमात्मा त्याचेंठायी विश्व हे भजनाने सतत असा (१२९) (१७९९) या कलियुगात महाराष्ट्र देशांत गोदावरीचे काठीं दक्षिणली म्हणजे दक्षिण बाजूंकडे (१३०) (१८०२) त्रिभुवनामध्यें एक परम पावन प्राचीनतम पांच कोस औरस चौरस पंच-क्रोश ही प्राचीन क्षेत्र क्षेत्र मर्यादा नेवास निवास क्षेत्र गोदेपासून ५ कोस अंतरात प्रवरातीरी ज्या क्षेत्रामध्यें जगाच्या आयुष्याचें तसेंच भरण पोषणाचे मूळ कारण अर्धनारी नटेश्वर जो मोहिनीराज म्हाळसा महालया ही स्त्रीवाचक नांवे त्या देवाची होत (१३१) (१८०३) तेथें चंद्रवंशाला भूषण, सर्वकला कौशल्याचे स्थान, न्यायनीतीनें राज्य करणारा राजा देवगिरीच्या यादवातील रामचंद्र रामदेवराव (१३२) (१८४०) महेश परंपरेतील आदिनाथ सांप्रदायात श्रीआदीनाथ मच्छिन्द्र, गोरक्ष, गहिनी, निवृत्ति आणि ज्ञानदेव, अन्वय–वंश, शिष्य परंपरा–श्रीनिवृत्तिनाथाचे शिष्य श्रीज्ञानदेव त्यांनी भगवद्गीता ग्रंथास देश भाषेचे अलंकार भूषण केले, गीतेचे मराठीत रूपातर केले (१३३) (१८०५) याप्रमाणें महाभारतातील, भीष्मपर्वात श्रीकृष्णार्जुनानी जो सुंदर संवाद केला. (१३४) (१८०७) निवृत्ति शिष्य ज्ञानदेव सांगतात की तो अठरावा अध्यायरूपी शेवटचा कळस पूर्ण झाला. (१३५) (१८०८) पुढील काळांत उत्तरोत्तर या ज्ञानदेवी ज्ञानेश्वरी ग्रंथाच्या पुण्यरूप संपत्तीनें पुण्याईने सर्व प्राण्यानी मनुष्यांनीं सर्व प्रकारच्या सुखानंदात समरस व्हावे.

(१३६) (१८१०) यावर श्रीक्षेत्र काशीचे श्रीविश्वेशराव जे महादेव त्यांनीं प्रसन्न होऊन हा ग्रंथदान प्रसादाचा होईल असा आशीर्वाद दिला.

श्रीभगवद्गीता मूळ भूमिकेवर मराठी ज्ञानदेवी टीका तेथीलचा सारांश म्हणजेच ही लघुज्ञानदेवी म्हटली. "ज्ञानदेवीचे समग्र मथित निवडून रसाळ अमृत श्रीज्ञादेव पदीं निजभावे प्रेमभरित होत्साता समर्पित अठरावा अध्याय सारांश संपूर्ण.

[लघुज्ञानदेवीच्या आधारानें]

# अध्याय अठरावा

## —कलशाध्याय— 'एकाध्यायी गीता'

## 'मोक्ष संन्यास योग'

॥ श्रीगणेशायनमः। ॐनमो भगवते वासुदेवाय ॥

---

जयजयदेव निर्मळ। निजजनाखिल मंगळ।
जन्मजराजलद जाळ—। —प्रभंजन ॥ १ ॥
जयजयदेव प्रबळ। विदलितामंगळकुळ।
निगमागमद्रुमफळ—। —फळप्रद ॥ २ ॥
जयजयदेव सकळ। विगतिविषयवच्छळ।
कळितकाळकौतुहल—। —कलातीत ॥ ३ ॥
जयजयदेव निश्चळ। चळचित्तपान तुंदिल।
जगदुन्मिलनाविरळ—। —केलिप्रिय ॥ ४ ॥
जयजयदेवनिष्कळ। स्फुरदामोदानंदबहळ।
नित्यनिरस्ताखिल मंगळ (मळ)। मूळभूत ॥ ५ ॥
जयजयदेवस्वप्रभ। जगदंबुदगर्भनभ।
भुवनोद्भवारंभस्तंभ। भवध्वंस ॥ ६ ॥
जयजयदेवविशुद्ध। विदूद्योद्यान द्विरद (अविद्योद्यानद्विरद)।
शमदममदनमद—। दयार्णव ॥ ७ ॥
जयजयदेवैकरूप। अतिकृत कंदर्प (सर्प) दर्प।
भक्त भाव भुवनदीप। तापापह ॥ ८ ॥
जयजयदेव अद्वितीय। परिणतो परमैकप्रिय।
निजजनजित भजन प्रिय। माया गम्य ॥ ९ ॥
जयजयदेव श्रीगुरो। अकलपना कल्पतरो।
स्वसंविद्रुम (कल्पतरो) बीजप्ररो। हणावणि ॥ १० ॥

जय=जिंकून मिळविणें, जयजयकार, वीर रस, विजय, निग्रह. निर्मल=स्वच्छ, शुद्ध. निजजनाखिल मंगल=भक्तांना मंगलकारक; जन्मवार्धक्यादिरूपी मेघांचा नाशकर्ता वायु. प्रभंजन=तुफानी वारा. (१) प्रबल=शक्तिमान, पराक्रमी. विदलित–विदल=विभागणारा, चिरणारा, वर्णहीन, विभागलेला, तोडलेला, चपाती, फांदी, भूस. डाळ, डाळिंबाची साल, प्रफुल्लित, वर्णहीन. विदलिता मंगळकुळ=नाशिली पर्णहीन केली, विभागिली आहेत अकल्याणाचीं कुळें ज्यानें. (विदा=ज्ञान, बुद्धि). निगमागमद्रुमफळ= निगम म्हणजे वेद, आगम म्हणजे श्रुतिशास्त्रें तद्रुप वृक्षाचें फल देणारा. (२) सकल=सगळा, संपूर्ण. विगतविषय=वैराग्यसंपन्नाचा. वच्छल–वत्सल=प्रिय सखा. कळित=नष्ट केला आहे, मोजला आहे, जाणला आहे ज्यानें, काळ कौतुहल ज्यानें=काळाचा उत्साह असा मृत्युंजय. कलातीत=अंश मागें

टाकणारा, अखंड, परिपूर्ण, अमर्याद मोक्ष पावलेला, मुक्त, मूर्ति, शक्ति (गीत नृत्य इत्यादि ६४ कला.) (३) जगदोत्मिलना–जगदोन्मिळण. निश्चल = स्थिर, चल (चलित) चित्तपान तुंदिल = अंतःकरणाच्या चांचल्याचें चलचित्ताचें प्राशन पान सेवेंकरून दोंदिल, तुंदिल, स्थूल, पोट सुटलेला. जगदुन्मिलनाविरळ = जग उत्पन्न करण्याची, व्यक्त करण्याची क्रीडा, निरंतर का अखंड प्रिय असलेला. उन्मीलन = विकास, उघडणें, उठाव घेणें, उमलणें, व्यक्त करणें, उद्योग. केलि–(केल) = लीला, खेळ, (पृथ्वी). अविरल = जाडें भरडें, स्थूल, घट्ट, दाट, अखंड, स्थूल. केलक = नट. (४) निष्कळ = निरुपाधिक, निरवयव, ब्रह्म, वृद्ध. स्फुरदामोदानंदबहुळ–स्फुरदमंदानंदबहुळ = ब्रह्मानंदाला, निरूपाधिक आनंदाला, अखंड आनंदाला (स्फुरत) रूप करणारा; बहुल–बहु = पुष्कळ. आमोद = आनंद, सुगंध. स्फुरित = प्रगट, प्रादुर्भूत. स्फुर = स्फुरण, कंप पावणें, लवणें, प्रकाशणें, शोभणें, उमलणें, स्फूर्ति होणें; नित्यनिरस्ताखिल मंगळ (मंगळ = करंज, हळद) (मळ) मूळभूत = सर्व पापांचा नाश निरंतर करणारा (मूळभृत्य = पिढीजाद नोकर) मूलभूत = मंत्र, मूळ कारण, झालेला, योग्य, सत्य. निरस्त = तिरस्कृत, दिलेला, अविद्यमान, नाकारलेला, विध्वंसित, सोडलेला बाण किंवा जलद बोलणें, निराकृत, निवारित, खंडित; मंगल = कल्याण. (मल = पाप, कलंक, नास्तिक, लोभी, कंजुष, देहमल घाम इत्यादि, निस्तरणं अभिष्ट प्राप्ति, सिद्धि उपाय, सोडविणें, बाहेर जाणें. (५) स्वप्रभ = स्वयंदैवीशक्तीचा, प्रभु, धनी, बलिष्ट, समर्थ, (प्रभविष्णु स्वयं) जगदंबुदगर्भनभ = जगत्‌रूपी मेघाला आकाशासारखा गर्भ म्हणजे आधारभूत. भुवनोद्भवारंभस्तंभ = जगाच्या उत्पत्तीचा मूळ आरंभ आधार; भवध्वंस = संसार नाश, ध्वंस. (६) विशुद्ध = पवित्र, निर्दोष. विदुःउदय उद्यान-द्विरद, विदूद्‌योद्यानद्विरद–अविद्योद्यानद्विरद = अविद्यारूप वनाचा विध्वंस करणारा हत्ती. विद = जाणणें, बुध, ज्ञान. (ज्ञाता, आत्मा.) उदय = उत्कर्ष, लाभ, वृद्धि, उत्पत्ति, वर येणें जें द्विरद (द्विरेफ = भ्रमर) = हत्ती. शम–दम–मदन–मदभेद = शम = मनोजय; दम = बाह्येंद्रिय, दमन, यानीं कामाचा मद जिंकणारा : दयार्णव = दया समुद्र, कारुण्य तसेंच कृपा समुद्र सागर. विदुः = हत्तीच्या कुंभद्वयामधला भाग. जलघोटक प्राणी. उद्यान = निघून जाणें, बाग, फळबाग, हेतु. (७) एकरूप = एकजात, तुल्य. अतिकृत = अतिशयतेनें घडविलेलें, उत्कृष्टतेचें, (कर्म, उपकार, उपासना व कर्म परिणाम फल, कार्य, कारण हेतु.) कार्य, फल. अतिकृत कंदर्प दर्प–अतिकृत कंदर्प सर्प दर्प = मदनरूपी सर्पाचा गर्व उतरविणारा : भक्तभाव भुवन (भवन) दीप तापापह = भक्तचित्तरूप गृहाला प्रकाशित करणारा असा तापहर्ता. ताप = ज्वर, उष्णता, संताप, पीडा, किरण, समुदाय. अपह = (हन्) नाहींसें करणारा. (८) अद्वितीय = बिनजोड, एकटा, सर्वश्रेष्ठ, ब्रह्म. परिणत उपरम एकप्रिय = परिपक्व आहे शांति ज्याची, तोच त्याला प्रिय. (एकप्रिय = असामान्य कांत, पति; परिणत = पक्व, नम्र. उपरम = विश्रांति, थांबणें, शांति, विश्रांति, निवृत्तता, थांबविणें.) निजजनजित = भक्तवश. भजनप्रिय–भजनीय. भजन = उपभोग, सेवा, पूजा, मालकी, विभागणें. मायागम्य (गमनीय) = अविद्या, (वे.) ईश्वराची अघटित घटना करण्याची शक्ति कपट, ममता, (जाणण्यास योग्य) सुबोध, योग्य, सुलभ. (९) श्री = मंगलार्थी–श्रीकृष्ण, श्रीराम. गुरु = पूर्वज, संस्कार करणारा बाप, मंत्रोपदेशक उपाध्याय, शक्तिमान, स्वामी, बृहस्पति (गुरुकार = पूजा. गुरुचर्या = गुरुसेवा. गुरुरत्न = (पुष्कराज) मणि. गुरुवर्तिन् = गुरु आज्ञेंत राहाणारा. गुरुवृत्ति = गुरुसेवा. गुरुश्रुति = गायत्रीमंत्र) अकल्पना = कल्पना निवृत्ती मोक्ष. कल्पतरु (कल्पद्रुम, कल्पलता) निरीच्छ पुरुषाचा सर्व इच्छा पुरविणारा सुरतरु विशेष, कल्पवृक्ष. स्व = स्वाभाविक, स्वजातीय, आपण, आत्मा, धन. संवित् = ज्ञान, खुणेचा शब्द, समज, वचन, करार, आनंद, जूट. बीजप्ररो = सत्य, मंत्रांतील भाग, तत्व. [प्ररोहः = फुटणें, अंकुर, पारंबी, संतती, वर येणें. प्ररोहिन् = वड, उत्पन्न होणारें. प्ररोचन = उद्दीपन, स्पष्टीकरण, मन वळवणी, (ना.) सूत्रधारकृत प्रेक्षकांची स्तुति. रु = जाणें, शब्द करणें, ओरडणें, दुमदुमविणें. प्र = समोर, पुढें (धातूशीं प्रयोगानें) प्रमत्त, प्रयाण, प्रभव, प्रवाद, प्रपौत्र, प्रभुक्त, प्रोषित (वियोग), प्राचार्य

(प्र + आचार्य = उत्कर्ष) प्रांजलि = मान. प्रणाम (पुढें येणें)] स्वसंविद्रुमबीजप्ररो हणावणि-(हृणावनि) = आत्मज्ञान वृक्षाचें बीज रुजविण्याची जागा. हानं = त्याग, नाश. अवनी = स्थान, पृथ्वी.

**आत्मज्ञान देणाऱ्या सद्गुरूचे बालभावे (प्रेमस्तवन) स्तोत्र केल्याचे क्षमा याचन १-२६**

शुद्ध-स्वच्छ-अशा देवाचा जयजयकार असो! वीररसाचा विजय असा जो देव त्याचा जयजयकार असो! (वासुदेव आत्मा-आत्मा देव) जय हो जय हो! अहो! देव हा अति शुद्ध! निर्मळ! असा आहे-देव! हा शुद्ध असा, भक्तांनां कल्याणकारक आहे. तो, जन्म वार्धक्यरूपी मेघांचा नाशकर्ता असा तुफानी वाराच आहे. (१)

जय हो! जय हो!! अहो! देव! हा शक्तिमान असून पराक्रमी आहेः नाशिली आहेत अकल्याणाची कुळें ज्यानें असा देव! आहे. वेद व श्रुति शास्त्रे, तद्रूप वृक्षाचें फळ देणारा असून, तो शब्द फलप्रद आहे (२)

जय हो! जय हा! देवाचा जयजयकार असो, अहो! देव! हा अवघा सर्व आहे! अखंड आहे! सगळा आहे! देव हा संपूर्ण आहे वैराग्य संपन्नाना तो प्रियसखा आहे. नष्ट केला आहे, काळाचा उत्साह ज्यानें असा देव! तो मृत्युंजय आहे. तो देव! अखंड आहे! मुक्तच एक असा आहे! तो देव! मूर्तीच एक आहेः तो देव! शक्तीच एक असा आहे. (३)

जय हो! जय हो! देवाचा जयजयकार असो! देव! हा स्थिर आहे! अंतःकरणाच्या चांचल्याचें पान, चलचित्ताचें प्राशन करणारा, देव! असल्यानें, तेणेंकरून देव! दोंदिल, देव! तुंदिल, देव! स्थूल असा आहे. (देव! पोट सुटलेला) तनु दोंदिल असा आहे. जग उत्पन्न करण्याची क्रीडा, लीला, खेळ, देवास वारंवार प्रिय आहे. निरंतर प्रिय आहे. (४)

जय हो! जय हो!! देवांचा जयजयकार असो! देव! हा निरुपाधिक आहे, देव! हा ब्रह्म आहे, तो देव! ब्रह्मानंदाला निरुपाधिक आनंदाला स्फुरत्-रूप करणारा आहे! (५)

जय हो! जय हो!! देव! स्वयं-दैवी शक्तीचा आहे. देव हा स्वयं आहे देव! प्रभविष्णु आहे, देव प्रभू आहे, देव! धनी आहे. जगत्‌रूपी मेघाला आकाशासारखा देव! गर्भ (म्हणजे आधारभूत) आहे, देव! जगाच्या उत्पत्तीला मूळ आरंभ आधार आहे, देव! संसार नाश करणारा आहे. देवाचा जयजयकार असो! (६)

जय हो! जय हो! देवाचा जयजयकार असो. देव! हा विशुद्ध आहे! देव! पवित्र आहे! देव! निर्दोष आहे! देव! अविद्यारूप वनाचा (नाश करणारा, विध्वंस) करणारा (आहे) हत्तीच एक कीं! देव! आहे; हत्तीच्या कुंभद्वयामधील जो भाग तेथीलचे जल घोटक प्राणी जो त्याचा उदय झालेला तेथें माया पैस -वनच एक जे त्या वनाचा विध्वंस करणारा हत्तीच एक तो देव! आहे! (शम म्हणजे) मनोजय व (दम म्हणजे) बाह्येंद्रिय दमन करून कामाचा मद जिंकणारा आहे. देव! दया समुद्र! आहे. देव! कारुण्यरूपी कृपेचा सागर! आहे! (७)

जय हो! जय हो! देवाचा जयजयकार असो! देव हा एकजात आहे! देव हा प्रेमस्वरूप आहे! तो देव तुल्य, देव आहे देव! उपमेंत मुरून गेलेला आहे. देव! उपमा (विभूषित) भूषण आहे. देव! हा मदनरूपी सर्पाचा गर्व उतरविणारा आहे! देव! हा भक्तचित्तरूप गृहाला प्रकाशित करणारा दीप आहे! देव! हा ताप संताप पीडा हर्ता असा आहे. (८)

जय! हो जय हो! देवाचा जयजयकार असो! देव हा अद्वितीय आहे! देव हा बिनजोड आहे! देव! हा सर्वश्रेष्ठ आहे! देव! हा ब्रह्म आहे! देव! हा परिपक्व आहे! देव! नम्र (आहे, नमन करणारा

आहे) उपरम शांति ज्याची तोच देवाला प्रिय–! असामान्य कांत का पतीच तो देवाला प्रिय आहे! देव! भक्त-वश आहे! देव! हा उपभोग, सेवा, पूजा, प्रिय, आहे! देव! हा मायागम्य (म्हणजे अविद्या, सुबोध) ममता योग्य (अविद्या सुलभ) अविद्येमुळें सुलभ असा सहज जाणला जाणारा आहे. (९)

जय हो! जय हो! देवाचा जयजयकार असो! देव! हेच कीं अहो श्रीगुरु! म्हणून अहो! हे देव! श्रीगुरो! हे देव श्रीगुरुराजा! हे देवश्री गुरुमहाराजा! आपण अकल्पना (निवृत्ति, म्हणजे) मोक्ष देणारे कल्पतरु (म्हणजे सर्व इच्छा पुरविणारे सुरतरु) विशेष असे आहांत! हे देव! श्रीगुरो! आपण निरिच्छ पुरुषाचे कल्पवृक्ष आहांत! देव! हे स्वाभाविक स्वजातीय आत्मधनरूपी ज्ञान समज आनंदरूपी वृक्षच आहेत! ते आत्मज्ञान वृक्षाचें बीज सजविण्याची जागा का स्थानच आपण हे देव! आपल्या खुणेचा शब्दरूपी वृक्ष! बीजाची जागा! का स्थान! तेथें अद्याप आलेले नाहीं दुःख जे त्याचा नाश करणारे (होत) आहांत! त्याग स्थानच देव होत. (१०)

हे काई येक ऐसैसे। नाना परिभाषा वसे।
स्तोत्र करूं तुज उद्देशे। निर्विशेषा ॥ ११ ॥
जिही विशेषणी बिशेषिजे। ते दृश्य नव्हे रूप तुझे।
हे जाणे मी म्हणोनि लाजे। वानणा इही ॥ १२ ॥
परि मर्यादेचा सागरू। हा तंवचि डगरू।
जंव न देखे सुधाकरू। उदया आला ॥१३ ॥
सोमकांतु निज निर्झरी। चंद्रा अर्घ्यादिक न करी।
ते तोचि अवधारी। करवी की जी ॥ १४ ॥
नेणो कैसे वसंत संगे। अवचितया झाडाची आंगे।
फुटती ते तयाहि जोगे। धरणे नव्हे ॥ १५ ॥
पद्मिणी रविकिरण। लाहे मग लाजे कवण।
का जळे शिवंतले लवण। आंग भुले ॥ १६ ॥
तैसा तूंते मी जेथ स्मरे। तेथें मीपणा मी विसरे।
मग जाकळिला ढेंकरे। तृप्तु जैसा ॥ १७ ॥
मज तुवां केले जी तैसे। माझे मीपण धाडुनि देशे।
स्तुतिमिसे पांच पिसे। बांधले वाचे ॥ १८ ॥
ना येऱ्हवी तऱ्ही अटवी। राहुनी स्तुति जै करावी।
ते गुणा गुणि या धरावी। सरोभरी कीं ॥ १९ ॥
तरी येक रसाचे जी तूं लिंग। केंवि करूं गुणागुणी भाग।
मोती फोडुनि सांदिता चांग। कीं ऐसेचि भले ॥ २० ॥
आणि तूंचि बापु तुंचि माये। इही बोली ना स्तुती होये।
तरी डिंभोपाधिकु आहे। विटाळु येथ ॥ २१ ॥
जी जालेनि पाइके आले। ते गोसावीपणे केवि बोले।
ऐसे उपाधि उसटले। काइ वानुं ॥ २२ ॥
तरी आत्माचि तु येकसरा। हेही म्हणो जाता दातारा।
आंतुलु तु बाहिरा। घापतासि ॥ २३ ॥

**म्हणौनि सांचा तुजलागी। स्तुती नेदखे जी जगी।**
**मौना वांचुनि लेणे आंगी। सुसीना मां ॥ २४ ॥**
**स्तुती कांहीं न बोलणे। पूजा कांहीं न करणे।**
**सन्निध कांहीं न होणे। तुझां ठाई ॥ २५ ॥**
**तऱ्ही जिंतले जैसे भुली। पिसे आलाप घाली।**
**तैसे वानु ते माउली। उपसाहितु ॥ २६ ॥**

काइ येक–काय एकैक; तुज उद्देशे–तुज दोसे–दोषे=तुझ्या उद्देशाने; निर्विशेषा=भेदरहिता. (११) वाणना–वानणा. (१२) हा तंवचि डगरू–हा तंवचि तया डगरू (प्रसिद्धि) (१३) सोमकांत=[सोम=चंद्र, कुबेर, वायु, अमृत, जल, सोमवल्ली, सोमरस; कांत=देखणा, सुखकारक, पति. निजनिर्झरी=स्वतःच्या अंगातून पाझरलेल्या उदकानें. अवधारी=ऐक. (१४) कैसे–कैसी. अवचितया झाडाची अंगे–अवचितिया वृक्षाची अंगे. फुठती–फुटती. नव्हे–नोहे. (१५) पद्मिणी–पद्मिनी. शिंवतले–शिवतले. (१६) तेथें मी पणा–तेथ मी पण. जाकळिला ढेकरे=(जाकळणे=भरून येणे, व्यापणें) तृप्त झालेला जसा ढेंकरावर ढेंकर देतो (१७) धाडुनि= दवडुनि, देशे–देशोधडीला लावून. स्तुतिमिसे पांच पिसे–स्तुती मिषेच पां पिसे (वेड). (१८) अटवी–आठवी. राहुनि–राहोनि ते–तै. सरोभरी= तुलना, निवडानिवड. (१९) तरी येक–तरी तूं जी येक. एक रस =पूर्ण वाहिलेला, स्थिर, एक निष्ठ, एक मत. [एक अढळ, निश्चळ, मुख्य, तोच, असामान्य, अल्प, खरे. रस=प्रीति, प्रेम, आनंद सुख, श्रृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स, शांत; सार, सत्व, आवड.] लिंग=मूर्ति, आकार. लिंग=जाणे रंगवणे, चितारणे. (व्या.) लिंगाप्रमाणें रूप बदलणें. गुणागुण=जसें लिंग अलिंग तसें गुणागुण [गुण=अ, ए, ओ, हे वर्ण ; मूळधर्म, आवृत्ति, संधि, विग्रह, यान आसन, संश्रय (=आश्रय, संरक्षण, ऐक्य.) व द्वैध (=शंका, विरोध, मतभेद) हे सहा गुण ; माधुर्य, ओज, प्रसाद, हे काव्यगुण ; मनुष्य, पदार्थ इत्यादींचा मूळधर्म विणा इत्यादींची तार, दिव्याची वात, ज्ञानेंद्रिय, रूपादि पंच विषय. अगुण=(१) निर्गुण (ईश्वर) (२) मोक्ष (कैवल्य) (३) परब्रह्म. (४) निरुपयोगी (५) दोष.] भाग–विभाग. सादिता–सांधिता. ऐसेचि–तैसेचि (अखंड असलेले. (२०) डिंभोपाधिक=लेकुरपणाच्या उपाधीचा–लेकुरवाळी. लेकुरवाळेपणाच्या डिंभडिंभक=मुलच एक ; विटाळु= दोष, दोस, उद्देश. (२१) पाइकें=सेवक म्हणविल्यानें गोसावीपणे–गोसावीपण=स्वामीपण उपधि=धाक-दपटशा. उपाधि=लबाडी, नियामक गोष्ट, अट, धर्मचिंतन, कुटुंब पोषणासक्त, बदला, पदवी, छल, (न्या.) साध्यात असून साधनांत नियमानें नसणारे कारण उष्ट्रिका=मातीचे उंच मानेचे भांडे. उच्छिष्ट=शिळे, उष्टे अन्न, मध, तूप, अपवित्र, उष्टे, उपभुक्त, जेवल्यावर हात तोंड न धुतलेला. उसटले–उशिटले=उष्टे झालेले. काई वानु–काय वर्णु. (२२) तरी–जरी, एकसरा=अद्वितीय, एक, एकसर. म्हणो जाता–म्हणता. आतुळु–आंतुल. बाहिरा–बहिरा. घापतासि=तर अंतरात्म्याला तुला बाहेर काढल्यासारखे होते. (२३) सांचा=सत्यचि. नेदखे–न देखो. सुसीना मा=घालीत नाहीस ना. सन्निध कांहीं न होणे=कोणतीही उपाधी किंवा विशेषत्व न घेणे हीच तुझी संगती. (२५) जिंतले–जितले. अलापु–आलाप. भुली जितले पिसे आलाप घाली=भूल भ्रांतीनें ग्रस्त झालेला वेडा बडबडतो. उपसाहितु–उपसाहावे तुवां. (२६)

*असे हें काय एक एक, ऐसे ऐसे, अनेक प्रकारच्या भाषा पद्धतीनें तुझ्या उद्देशानें अपराधच जसा कां बोलक्या स्तुतिस्तोत्राचे, हे भेदरहिता! करूं कीं.* (११)

ज्या भेदानीं विशेष भेदाचें का भावाचें असें विशेषत्वेंकरून करावें–असें हें जें दृश्य तें कांहीं तुझें रूप नव्हे, असें मी जाणतों. पण काय करूं? ह्या वानण्यासाठी–वाखाणणी–स्तुतिरम्य जीवच लांचावला तेथें लोभावलो पण मजला तर लाजच येऊन आहे (मजला लाजच वाटत आहे.) (१२)

चोहोंकडे मर्यादा धरून आहे–मीतभीतच बोलणें करीत आहे. असें अपरंपार बोलणें सागरासारखेंच तें होऊन आहे–असा हा सागरासारखा प्रसिद्धपणा तोंपर्यंतच कीं जोंपर्यंत सुधाकर चंद्र अमृतोद्भव हा उदयास आला नाहीं! (अमृतांशु–सुधांशु–रस–सुधाधार=मध, सुधानिधी चंद्र.) (१३)

सोमकांत हा आपल्या स्वतःच्या अंगातून पाझरलेल्या उदकानें चंद्रास अर्घ्य आदिकरून करीत नाहीं. किंमतीचे–मोल किती–! असे ते तर तोच चंद्र–मनप्रसादन उदय हा करवितों की! असे हे ऐक देहजलानें देखणा पति आपल्या अंगातून पाझरलेल्या उदकानें आदर, गौरव, किंमत महत्त्व–हें कांहीं नेहमीं तेंच एक–देत बसत नाहीं. पण तो अमृतरस जेथें अतिशयतेनें उगवतो–रसास येतो तेथें मन हें उपजलें होतें. तेंच तो चंद्रच करवितो नां! (१४)

अहो! वसंतऋतु प्राप्त झाला म्हणजे अकस्मिततेची अशी सहज जी झाडें त्याची ही आंगें पण फुलतात कोंभेलीं होतात, त्यांना फळ, फूल, पान, पल्लव येतात; ते तर काय त्याच्या मनास बहु आवडले व तेथेंच रसानें राहाणें केलें असें नाहीं–ऋतूच्या सर्व योग्यतेचे तें ठिकाणच तेवढेंच एक असें नाहीं–तेथें सहज सहज असेंच ते फुटणें, पालवीस येणें होय. ऋतूचें मन हे तेथेंच मुळीं तेवढ्याच ठिकाणीं धरलें गेलें असें नाहीं, सहज भेटला, त्यास छंदाची आंगे लाभलीं–अंगाला विशेष फांद्या फुटल्या. (१५)

कमलिनी (कमलांचा समुदाय, कमलांची वेल) पद्मिणी (=स्त्रियांचा एक वर्ग) सूर्यकिरण लाभली–मग तेथें लाजणारे ते कोण बरें! कां पाण्यानें मीठ विरघळलें सर्व पाणीच झालें, आंगच भुलें–भुललें तेथें जसें कां. (१६)

तसा तुम्हांला मी जेथें जेथें म्हणून स्मरतों, तेथें मी आपलें 'मी'पण, माझेंपण विसरतों, मग मी ढेकरावर ढेकर देणारा असा जसा का तृप्तच एक! 'व्यावहारन् माम् अनुस्मरन्' स्मरणानें तर तुझें व्यापकपणच आंत भरून येऊन आहे. तेथें 'मी'पणास विसरलों. 'चातक चंद्रातें चिंतितु तो तयाचे मनोरथ पुरवितु' – चातकाचें जीवन मेघ, तेथें तो एकाधीनतेचा तेथें नलिनी ही भानु उदयानें–प्रियकर व प्रिया शोभली–पण वेळ हा भुलविण्यास आल्यानें काय तेथें बारा महिने अठरा काळ रात्रंदिवस नलिनीचें उमलणें व भानूचे उदयानें असणें हें नव्हेच कदाचित्–अवचित सहज–एकादे वेळीच तो प्रसंग! एरव्ही पाहावें तो वियोगच एक! पण तेथें मी पण विसरलें! परम प्रेम हे गोडीस आलें! तें सर्व गोडीचमुळीं वर्णनास घेतें! पण त्या प्रसंगी तेथें तर अंतःकरण प्रेमभरित! असें उदार (मोठे प्रशस्त) झालें! होण्यानें–मन हें निवलें–ढेकरावर ढेकर आले असा तृप्त, तृप्त म्हणणारा कीं तो. (१७)

तसें तुम्ही मला केलें आहे. अहो जी! माझें मीपण हें तर देशोधडीस गेलें. मीपणाचा संबंधच दोष देश तोचमुळीं दवडला–व आतां एका स्तुतीचे निमित्त करून प्रेम वेडच एक त्या वाणीस प्रेम वेडाची बांधणी करून आहे. पंचतत्वात्मक जो ईश्वरभाव, प्रेमभाव तो स्तुति स्तोत्राचा असा पिसे लाविले जसे कां एक ईश्वरत्वच नेहमीं त्या वाचेवर बांधलें, बोलण्याचें केलें. तेथें एका प्रेमाशिवाय दुसरे बोलणेंच नाहीं. "देवीवरे लावुनिया पिसे आपणिया ऐसे करूनि ठेवियले कीं." (१८)

(१) येऱ्हवी पाहिलें तर कीं अहो आठवण आठवली–सै–आठवी–नामरूप ध्यानाच्या आठवामध्यें राहून जेव्हां कां स्तुति रूपखनि, रूपाची खाण, वाखाणणी, खुशामत करावी तेव्हां तर (२) मनुष्य पदार्थ इत्यादींचा मूळधर्म, श्रेष्ठत्व, सद्गुण, ज्ञानेंद्रिय, रूपादि पंचविषय, अंतःकरण बुद्धि तेथें माधुर्य ओज व प्रसाद हे काव्यगुण हें सर्व कांहीं (म्हणजे मनुष्यधर्म–सगुणत्व) हेंच मुळी निर्गुण ईश्वर, मोक्ष कैवल्य का परब्रह्म, कसल्या उपयोगाचें? कसचें उपयोगी! अहो निरुपयोगी का दोषच एक, (पाप, देश, संबंध, हेतु) अशा त्या विधानांनीं तुलनेप्रत घेतलेले, निवडानिवडीचें केलेंच करावें अशीं सोयच मुळीं धरिली कीं. (१९)

अढळ प्रीतीचे, निश्चळ अशा प्रेमानें, सत्व, आवड तीच आनंदास आली; तेथें नऊही रस पूर्णपणें वाहिलेले, एकमतास आलेले, एकनिष्ठ झालेले, असें तेथें प्रेमच एक का प्रीतीच एक, आकारली, भावानें रंगविली चितारली गेली, मूर्तीची झाली, असें तें एकरसाचे जी अहो तुम्हीं लिंग आहांत! लिंगमात्र म्हणजे बुद्धि अनन्य झाली एकरूपतेस आली [ (तेथें) तत्वरूप, सत्रूप आत्मस्वरूप आवडलें–अद्वैत नष्ट होणें जें सत्व शुद्धि म्हटलेली ती– अ. १६ वा ओवी ८० ॥ तेवी सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धिओ ऐसे अनन्य होणें। ते सत्वशुद्धि म्हणे केशिहंता ॥ ] तेथें आतां एकात्मता, आत्मरूपच सर्व, गुणागुणी मूळधर्म, आवृत्ति का हेतुरहिततेनें, संबंध असणें, नसणें, यामध्यें भाग का पोटविभाग करणें तें कशास बरें! अहो! मोती जें सबंध तें फोडून सांधावेत असे चांग! ह्या भूमीवरीलची जी वाणी देवता ती सरस्वतीच मुळीं चांगुलपणास आली आहे, शोभूं लागली असें करावें कां आपलें जसें आहे तसेंच असूं द्यावें तेंच बरं का ऐसेचि भले, अखंड अखंड असलेलें तेंच बरें! व्यापक ब्रह्म तें तसेंच अखंडच असूं द्यावें! तेथेंच भलेपण एक द्यावें! अखंड असेंच भलें तें ब्रह्म होय, असेंच नुसते आहेपणच, एक त्यानेंच थटावें जसें! (२०)

अहो तुम्हीच बाप! तुम्हीच मायही! असें म्हटलें तर काय तेथें स्तुति केली म्हणावी! महत्तत्व विशाल बुद्धिचें तेथें आळविणेंच जें ह्या जीवदशेस नेहमीं करावें लागणारें तेथें तर लेकुरवाळेपणाच्या उपाधीचा –योग्यतेचा संबंधच एक, लेकुरवाळी अशी जी सगुण निर्गुणतेनें संबंधाची केलेली तेथें तूंचि बाप तूंचि माय असें आळविणें तें ती काय स्तुति म्हणावी? तेथीलचें तें मनवणें तें कांहीं स्तुतीचें केव्हांही नव्हेच–तेथें डिंभ–मूल–लेकरूं, (तेथें अज्ञान, अजाणपण, तें उद्देशाचें, योग्यतेस यावें असेंच आईबापास विनविलें व हाच मुळीं संबंध दोष, देश, लोकरूपणामध्यें रिघून असणारा) व योग्यता ह्याचा हेतू संबंध, दोष, देश, हाच उद्देश, एक बाप का आई ह्यानें तें तसें आई, आई! बाप्पा बाप्पा असें आळवून पोटीच्या प्रेमास पाहा म्हणणारे ते! (२१)

अहो! जालेपणानें–जन्म लाभल्यानें–जन्मल्यामुळें, जन्मास आल्यानें ते पाईकपणास–सेवकपणासच आले–सेवकच एक असे झाले–तेथें पाईक तो तुजवांचून दुसरें कांहींहीं मागत नाहीं. कीं, ते समर्थताच एक मागते–असे जें तें कांहीं स्वामीपणानें धनी का पतिपणानें तें केव्हांहि बोलणारे असें नाहीं–कसें बरें ते समर्थपणें बोलू–बोलेल–! तेथें देह उपाधिनें उष्टें झालेले कीं, येथें मी काय कसें तें वानण्याचें करून सांगू बरें! वर्णूं कसें तें! अहो असे देहबुद्धिचे, लबाड म्हटलेले ते अपवित्र; तेथें अटच मुळीं उपभुक्त; धर्म चिंतन तें शिळेच मुळीं, पदवी ही उच्छिष्टच एक, जेवण झालें पण हात तोंड धुतलें नाहींत तेथें छळ जो असें जें कांहीं एक तें मी कसें वर्णन करून सांगू बरें! पाईकपण ते कांहीं धाकटदपटशावर अपवित्र का उष्टें म्हटलें तें गोसावीपणावर बोलणें तें कां होईल? तें कशानें बरें होईल? काय सांगावी तेथीलची ती वर्णन सीमा. (२२)

अहो! अद्वितीय एकच एक, एकसरसतेनें चित्कलेचा असामान्य असा हारच एक! तोच (परमात्मा) हालणारा आपण आत्माच एक! सर्व आत्मरूपच एक, असे अहो! दातारा! स्वामी! म्हटलें तर (अंतरा-रम्याला–तुम्हाला बाहेर काढल्यासारखें होतें) सरसकट आंतल्यास बाहेर घातलें होतें. (२३)

सर्व जीव चित्कलेचा असामान्य असा हारच एक असें तुम्हीं खरे सत्यतेने पाहिले असतां: आतां येथें ह्या जगी–जनी–लोकी–स्तुति हीच मुळीं तुम्हीं आहांत असें पाहिलें होत नाहीं आणि म्हणूनच कीं तुम्हीं मौनाशिवाय दुसरे कसलेही लेणें का अलंकार हे अंगावर घालीत नाहींत ना! कीं अहो! (चंद्राची स्त्री चंद्रिका, कौमुदी, ज्योत्स्ना ही चंद्रावरच पडते.) (२४)

तुमच्याठायीं तुम्ही असें मानणें करितां कीं, कांहींहीं न बोलणें हीच स्तुति होय! कांहींच कांही न करणें हीच पूजा! कोणतीहो उपाधी किंवा विशिष्टत्व न घेणें हीच मुळीं तुमची संगती होय! (२५)

करितां भुली जिंतिले, भ्रांतीने भुल ग्रस्त झालेला आलापरूपी वेडच एक बडबडतो तसें मी ह्या माऊलीस वर्णू, वानू वाखाणणूं, खुशामतीचे करूं ते आपण उपसाहावें, सहन करून असावें कीं, माऊलीये! (२६)

आतां गीतार्थाची मुक्तमुदी। लावि माझीये वाग्बुद्धि।
जे माने हे सभासंदी। सज्जनांची ॥ २७ ॥
येथे म्हणितले श्रीनिवृत्ति। नको हे पुढत पुढती।
परिसी लोहो घृष्टी किती। वेळवेळा कीजे गा ॥ २८ ॥
तंव विनवितु ज्ञानदेवो। म्हणो हो का जी पसावो।
तरी अवधान देतु देवो। ग्रंथा आतां ॥ २९ ॥
जी गीता रत्न प्रसादाचा। कळसु अर्थ चिंतामणीचा।
सर्व गीता दर्शनाचा। पाढाऊ जो ॥ ३० ॥
लोकी तरी साथि ऐसे। जे दुरोनि कळसु दिसे।
आणि भेटीची हातवसे। देवते तिये ॥ ३१ ॥
तैसेचि येथेहि आहे। जे येकेचि येणे अध्याये।
आघवाचि दृष्ट होये। गीतागमु तो ॥ ३२ ॥
मी कळसु यया कारणे। अठरावा अध्याय म्हणे।
वाइला बादरायणें। गीता प्रासादा (प्रसादा) ॥ ३३ ॥
नव्हे कळसा परते कांहीं। प्रासादी काम नाही।
ते सांगतसे गीता ही। संपलेपणे ॥ ३४ ॥
व्यासु सहजे सूत्री बळी। तेणे निगम रत्नाचळीं।
उपनिषदार्थाची माळी। माजि खांडिली ॥ ३५ ॥
तेथ त्रिवर्गाचा अणु अरू। अडउ निगाला अपारू।
ते महाभारत प्रकारू। भवंता केला ॥ ३६ ॥
माजी आत्मज्ञानाचे येकवट। दळवाडे झांडुनि चोखट।
घडिले पार्थ वैकुंठ। संवाद कुसरी ॥ ३७ ॥
निवृत्ति सूत्र सोडणिया। सर्व शास्त्रार्थु पुरवणिया।
आवोसा धी मांडणिया। मोक्ष रेखेचा ॥ ३८ ॥
ऐसेनि करितां उभारा। अध्याव तया पंधरा।
भूमी निर्वाळलया पुरा। प्रसादु जाला ॥ ३९ ॥
उपरी सोळावा अध्यायो। तो ग्रीवे घंटेचा अवो।
सप्तदशु तोचि ठावो। पडिघाणिये ॥ ४० ॥
तयाहि वरी अष्टादशु। तो अपैसा मांडला कळसु।
उपरी गीतादिकी व्यासु। ध्वज लागला ॥ ४१ ॥

मुक्तमुदि=सर्वत्र चालणारा शिक्का. अकुंठित, प्रशस्त. वाग्बुद्धि=वाणीरूप बुद्धि, वाचारूप मति. जे–जेणे. सभासंदी–सभासदी=सभासद=सभासद, (व्य.) पंच. सभास्तार, सभासद, सभासदविशेष. (सद्=सभा. सद=फळ) संदी=लहान पलंग, खाटले. (२७) येथे–तेथ. पुढत पुढती=वारंवार. लोहो–लोहा. कीजे किती. (२८) विनवितु–विनवी. पसावो–प्रसाद (२९) गीतारत्न प्रासादाचा=गीतेचा मराठी अर्थ तोच चिंतामणी रत्नाचा कळस, स्वर्गीय पदार्थ मनोरथ पूर्ण करणारे–चिंतामणी कामधेनु कल्पतरू, परमेश्वरी-

ज्ञान दाखविणारें शास्त्र, गीतेचें सगळें स्वरूप दाखविणारा अठरावा अध्याय. अर्थ=पुरुषार्थ; धर्मादि पुरुषार्थांचा सत्यपणा, खात्री, वस्तुस्थिति. चिंतामणि=गणपति, इच्छिलेलें देणारा, कल्पित मणि. दर्शन=दृष्टि, डोळा, आरसा, चेहरा, स्वरूप, राजा इत्यादींची भेट, तत्त्वज्ञानाचा ग्रंथ, शास्त्र, अध्यात्मज्ञान, सद्गुण. पाढाऊ=गीतेची पुनरावृत्ति करून पढविलें जाणें, पुन्हः पुन्हः म्हणविलें जाणें. (३०) आथि=संपन्नपण. दुरोनि–दुरूनि. हातवसे–हतवसे [हस्त=हात (कोपरापासून पुढचा). हस्तवत्=चतुर. हत=आशाभंग झालेला, चुकलेला (ग.) गुणलेले. वस्तु=सत्य पदार्थ (वस्तुनि अवस्तु आरोपः) दौलत, स्वभावधर्म, सत्वांश. वस्=देवता स्थापणें, काबीज करणें, वास करणें, वेळ घालविणें.] देवतेतिये–देवतेचिये. (३१) आगम=येणें, (मुद्रायाः आगमः=लाभ) प्राप्ति, प्रवाह, मार्ग, विद्या, तात्त्विक ज्ञान, शास्त्र, वेद, मंत्र, शब्दप्रामाण्य, तंत्रशास्त्र, शब्दांत नवीन येणारा अर्थ, पूजा प्रकार, नदीचें मुख, फल. (३२) यया=याचि वाइला–उवाइला (उवाइला=इच्छावशेंकरून. वाइला=वाजविला, वाहिला, घातला) प्रसादा (प्रसादाचा–प्रासादाचा) बादरायण=शारिरीक सूत्रांचा कर्ता व्यास. (३३) नव्हे–नोहे. (३४) सूत्री बळी=श्रेष्ठ कारागीर. निगम रत्नाचळि उपनिषदार्थाची माळी माजि खांडिली=वेदरूप रत्नपर्वतावर, उपनिषदांच्या पठारावर, खणणी केली. [माळी=माळेचे करून, विशेष खांडाचे–समुदायाचे असे केले माळि=माळ घातलेला, मालिन्, स्वर्गंगा, मन्दाकिनी, चंपानगरी, माळीण. खांडव=साखरेचें पक्वान्न, श्रीखंड, खडीसाखर.] (३५) त्रिवर्ग=धर्म, अर्थ, काम. अणुआरू=बारीक चूर, चाराचुरा, गडगे गोटे. अडउ–आढऊ=असार, वन, वाईट, टाकाऊ गाळ. निघाला–निघाला जो. महाभारत प्रकारू–महाभारत प्राकारू =महाभारताच्या तटावर. भवंता–भोंवता=फिरता केला. (३६) एकवट–येकवट=अखंड. दळवाडे= समुदाय, घनवट, सबंध दगड, मोठाले अखंड चिरे. संवाद कुसरी=श्रीकृष्ण व पार्थ यांच्या संवाद चातुर्यानें. (३७) निवृत्तिसूत्र सोडणिया=निवृत्तीरूप ओळंब्यानें आंखणी केली. पुरवणिया=भर. आवो=आकार. आवोसाधि–आवो साधिला (आ=स्मरण, होकार ववसा वसला–ततः क्रम समाप्तिर्गुणानाम्–धि=सांठा. धी=भक्ति, ज्ञान, बुद्धि, मन, विचार, कल्पना, ज्ञानेंद्रिय) (३८) ग्रीवे घंटेचा आय–अवो=गळ्याच्या मण्याचा आकार. पडिघाणिये–पडघाणिये=मध्य घंटेची जागा. पडघायिणे=रागें भरणें, (रागानें भरभरून) दाबणें. (४०) गीतादिकी व्यासध्वज=गीतानामक ध्वज व्यासांनीं फडकविला. (४१)

**कलशाध्यायाचें फळ व महत्त्व** **२७–८६**

आतां ह्या गीतेचा अर्थ सांगण्याचा एक सर्वत्र चालणारा शिक्काच माझ्या वाणीरूपी बुद्धीवर लावावा, ज्यायोगेंकरून हे संतसज्जनांच्या सभासदी मानलें होईल. तेथीलचा अर्थ बोलणें हें प्रकाशणारें शब्द फळच एक (फलश्रुति) मानवेल–महत्वास येईल. (२७)

आतां यावर श्रीनिवृत्तिनाथांनीं म्हटलें कीं, असें हें वारंवार अर्थ सांगत बसणें नको. अहो परिसानी लोखंडाशी ती घृष्टि परिचयाची ती किती वेळा करीत असावी. (२८)

संतसज्जनांना हें मानवेल, ते तेथें मान डोलवितील–अर्थ हा सर्वत्र चालणारा शिक्काच बोलूं लागला. शब्दरूपी फळ हें सुवर्णाचें झालें जसें. असें हें सुवर्णच चैतन्यच–निखळतेचें असेंच असावें (लोखंडाचें असणें व परिसानें घृष्टिचें होणें तें वरचेवर कशास?) तेव्हा ज्ञानदेवानी विनविलें कीं, अहो, हा तर आपला प्रसादच झाला पुढें बोलण्यास! तरी आतां देवानी ग्रंथाकडे लक्ष पुरवावें, अवधान द्यावें जी. (२९)

गीतेचा मराठी अर्थ तोच चिंतामणि रत्नाचा कलश, गीतेचे सगळें स्वरूप दाखविणारा अठरावा अध्याय गीतेची पुनरावृत्ति करून हे परमेश्वरी ज्ञान दाखविणारे शास्त्र, पुन्हः पुन्हः म्हणविलें जातें–पढविलें होतें. (३०)

ह्या लोकी अशीच रूढी का समजूत आहे कीं (अव्यय स्वरूप) दूर अंतरावरून देवळाचा कळस दिसतो (मंदिर शिखरावरची शंकु आकृति कलश, घागर, पात्र) तद्वत भेट अलिंगन–, दर्शन अव्यय–, अवधारणा हस्तगत होतें, कवटाळून भेटल्यासारखें, श्रीपंढरीनाथास भेटतात! तसें हातवरें करून देवळाचा कळस दुरून पाहिला तरी तीं देवाची साक्षात् भेट होय (अशी समजूत पंढरीच्या कळस दर्शनाची प्रसिद्ध) (३१)

तसेंच येथेंहीपण आहे. जे का ह्या एकाच अठराव्या अध्यायानें गीतेचें सगळें स्वरूप दाखविलें–पाहिलें होतें. (३२)

(म्हणून) मी तर ह्या अठराव्या अध्यायास (गीतारूपी देवळाचा) 'कळस' होय असें म्हणतो. हा (कळस) तर शारिरीक सूत्र भाष्याचे कर्ते जे व्यास त्यांनीं इच्छावशेंकरून ह्या गीतारूपी प्रासादास घातला –वाहिला आहे. (३३)

कळसाशिवाय दुसरें कांहीं एकादें महत्वाचें काम प्रासादाच्या उभारणीमध्यें (नसतें) नाहीं. त्याप्रमाणें गीतारूपी प्रासादाचें कळसाचें काम म्हणजेच हा अठरावा अध्याय होय. व तेंच मुळीं ही गीता संपली व आपल्या आतां संपलेपणानें कळसाचें सांगणें सांगत आहे. (३४)

अहो! व्यास हे तर अगदी स्वाभाविकपणेच पट्टीचे, श्रेष्ठ कारागीर. त्यांनीं अगदी सहज ह्या निगम म्हणजे वेदरूप रत्न पर्वतावर उपनिषदार्थाच्या पठारावर खणती–खणणी केली. तेथें त्या अर्थरूपी स्वर्गंगा प्रवाहामध्यें तर साखरेचें पक्वान्नच अमृतासारख्या गोडीचें–स्वादाचें–करून ठेविलें आहे. (३५)

तेथें धर्म, अर्थ, काम असें जे तीन वर्ग त्यांचा बारीक भाराचुरा जो असार वन का टाकाऊ गाळ अपार असा निघाला तो महाभारताच्या प्राकारावर, तटावर, आवारावर फिरता ठेविला–फिरता केला. (३६)

त्यामध्यें आत्मज्ञानाचे उत्तम असे जे एक सबंध दळवाडे (सबंध दगड, मोठाले चिरे, घनवट समुदाय) होते ते उत्तम प्रकारे झाडझाडून ह्या श्रीकृष्णार्जुनाच्या संवादानें एक पार्थरूपी वैकुंठच घडीव असें घडलें कीं. (३७)

मोक्षरेखेची मांडणी ही निवृत्तिरूपी ओळंब्यानें आखणी करून केली. सर्व शास्त्रांना आपला अर्थभार –अर्थ भरिततेचा असा भर दिला; मोक्ष रेखाच भरास आणिलीः तेथें मोक्ष रेखेचा आवो (स्मरण, होकार ततः क्रमसमाप्तिर्गुणानाम्) मांडणीचा केला. (३८)

अशी एकवार एक अध्ययाची मांडणी करीत असतां पंधराव्या अध्यायानें सिद्ध प्रासादाची शुद्ध, स्वच्छ अशा भूमीवर (ज्ञानकांड समाप्ति) उभारणी पूर्ण झाली. (३९)

त्यावर सोळावा अध्याय म्हणजे गळ्यांतील मण्याच्या आकाराप्रमाणें शोभला व सतरावा अध्याय म्हणजे–मध्यम घंटेची जागा ती कळसाची बैठक होय. (४०)

आतां अठरावा अध्यायरूपी कळस हा गीताप्रासादावर आपैसाच–आपोआपच ठेविला–चढविला गेला, व त्यावर श्रीव्यासांच्या गीतेचा ध्वज अगदीं सहजपणेंच लागला. (४१)

**म्हणौनि मागिल अध्याय। जे चढतीं भूमीचे पाय।**
**तयाचे पुरेपण दावित आहे। आपुला आंगी ॥ ४२ ॥**
**जालया कामा नाही चोरी। ते कळसे होय उजरी।**
**तेवि अष्टादशु बिवरी। साद्यंत गीता ॥ ४३ ॥**
**ऐसे व्यासे विंदाणिये। गीता प्रसादु जो उणिये।**
**आणुनि राखिले प्राणिये। नाना परि ॥ ४४ ॥**

येक प्रदक्षिणा जयाचि या। बाहेरूनि करित यया।
येक श्रवण मिसे छाया। सेविती याची ॥ ४५ ॥
येक अवधानाचा पुरा। विडा पाउड भीतरा।
घेउनि रिगती गाभारा। अर्थ ज्ञानाच्या ॥ ४६ ॥
ते निजबोधे उराउरी। भेद्ती आत्मया श्रीहरी।
परि मोक्ष प्रासादी सरी। सर्वांहि आथि ॥ ४७ ॥
समर्थांचिये पंक्ति भोजने। तळिल्या वरिल्या येकचि पक्वान्न।
तेवि श्रवणे अर्थे पठणे। मोक्षुचि लाभे ॥ ४८ ॥
ऐसा गीता वैष्णव प्रसादु। अठरावा कळसु विषदु।
म्या म्हणितला हा भेदु। जाणौनिया ॥ ४९ ॥
आतां सप्तदशापाठि। अध्यावो कैसेनि उठि।
ते संबंधु सांगो दिठी। दिसे तैसा ॥ ५० ॥
न मोडता दोन्ही आकार। घडले येक शरीर।
हे अर्धनारी नटेश्वर। रूप दिसे ॥ ५१ ॥
का गंगा यमुना उदक। वोघ बगे वेगळिक।
दावी होवोनि येक। पाणीपणे ॥ ५२ ॥
नाना वाढली दिवसें। कळा बिंबी बैसे।
परि सिनाने लेंवे जैसे। चंद्री नाही ॥ ५३ ॥
तैसी सिनानी चाऱ्ही पदे। श्लोक तो श्लोकावच्छदे।
अध्यावो अध्याय भेदे। गमे किर ॥ ५४ ॥
परी प्रमेयाची उजरी। आनान रूप न धरी।
नाना रत्नमणि दोरी। येकचि जैसी ॥ ५५ ॥

अध्याय–जे अध्याये. जे चढती–ते चढते. पाय–पाये–अण्ये (आय=लांबीरुंदीचें प्रमाण) पुरेपण–पुरे. दावित आहे–दाविताहे. (४२) ऐसे–ऐसा. प्रसादु सोडवणिये. (४४) बाहेरूनि–बाहिरौनि. करित–करिती. येक–येकते. याची–ययाची. (४५) येक–येक ते. रिगती–रिघती. (४६) भेदती–भेटती. (४७) समर्थाचे–समार्थाचे. [**समर्थ**=अधिकारी, सार्थ, अनुकूल, हुशार, बलिष्ट, उचित, योग्य. **समार्ष**=एकाच प्रवराचे. **सामर्थ्य**=एकार्थता, सुसंगतपणा, शक्ति, तेज, (व्या.) अपेक्षा, अन्वय. **समा**=वर्ष, संवत्सर. **अर्थस्समा** =वर्षफल, वर्षपरिणाम. **अर्थ**=कारण, निमित्त. **समाम्नाय**=वेद, परंपरा, पठन, समाम्नातः=एकच सांगितलेले. समारत=थांबलेले.] पटणे–पठणे. (४८) कळसु–अध्याय कळसु. विषदु–विशदु. (४९) पाटि–पाठि. अध्यावो–अध्याय. उटि–उठि. ते–तो. (५०) अकार–आकार. घडले येक–घडिले एक. रूप–रूपी. (५१) येक पाणिपणे–पाणीपणे. बग=आकार, संबंध. (५२) बैसे–पैसे. लेवे–लेवे=लेप (५३) अवच्छद=भेद दर्शविणारा विशेष गुण. (५४) प्रमेय=अनुमान, जे सिद्ध करावयाचे ते. अनान–आनान. (५५)

म्हणून किंवा करितां, मागिल जे अध्याय ते योग भूमीचे पाय लांबीरुंदीचे प्रमाण–चढती (कां जेव्हां) तेव्हां ते आपल्या अंगीचमुळी ते पुरतेपण दावितात कीं,

ते अध्याय योग भूमी भूमिका जी–का ह्या देहानें जें कांहीं जन्मणें व प्रारब्धच एक पाठीवर घेऊन असणें तेथें उपायाची ती सूचि का ज्ञानाची महती ती आपल्या उत्तमतेस केव्हांहि आलेली अशीच ती ठेवण

की सहजपणेच तेथीलचा भार उचलणारी. भूमिके भूमिकेवरच ते पाय चढते लांबी रुंदीचे प्रमाण आय होणारें–कां भूमिकांचमुळीं ती एकावर एक–उत्तरोत्तर वाढती होणारी योगबुद्धीनें. (४२)

ज्ञानावधिच ती ! सूर्य उगवण्यासाठीं प्रभात झाली. जें कांही श्रीमुख दर्शन पण दर्शन कांहीं चोरी नव्हे ! मुरलेली वासना तृप्ति ही होईचना–चित्तचमुळीं तें कामानें नेलें. अव्यय अवधारणदर्शन हातवसें करून होणारें तेथें कळसच एक झाला त्याप्रमाणें हा अष्टादश अठरावा विवरण्यास घेतला तर सर्व साद्यंत गीताज्ञानच तें उजवलें त्या त्या रीतीभातीचें, प्रकारचें केलें, सीमेचें झालें असें होय. (४३)

अहो ! श्रीव्यासांनी वासना लाघव, कर्मविंदाण लाघवावर पुन्हः लाघवीपण हा तेथें गीता प्रसाद हा उणिवेचा होणारा तो प्रासादाप्रत आणून कळसाचा केल्यानें, आतां प्राणीगण हे अनेक तऱ्हांनी उणीव न होता–परोपरीनी रक्षण दिले गेले–रक्षणाचे केले. ह्या अष्टादशाच्या कळसानें तर प्राणिये–प्राण–प्राणी हा आपल्याच प्रियपणास येवो–यावा असा परोपरीनी केला. (४४)

एकानें बाहेरल्या अंगानीं स्थूल देहानें तप इत्यादिकरून, प्राण दक्षिणा देऊन, याजला प्रदक्षिणा केली; तेथें सर्व पापांची धुणी झाली. एकानी श्रवणाचें मिस करून छाया साउली रूपी याची कृपाच आपलीशी केली; सेवा करीत राहिले–सेवीत राहिले–उपभोगीत राहिले–भोगण्याची केली; उपभोग भाग भाग्य सेवीत (राहिले) रहाण्याचें केलें. (४५)

एक तर लक्ष अवधानरूपी विडा पाउड म्हणजे पैसा पुढें ठेवून अंतरामध्येंच पुरतें लक्ष हें पुढें पैसा सुपारी पान 'विडा दक्षिणाच' एक देवतेनें आपलेपणास यावें म्हणून (पुढें ठेविला) व ज्ञान हें अर्थास यावें–प्राप्तीस यावें, असें त्यांनी आंतील अर्थ सर्व गाभारा आवरिला, आपलासा केला–पैसच मुळीं लक्ष्यानें आपलीशी केली. (४६)

तें तर चित्त हेंच मुळीं तडकाफडकीं, सहजीसहजच बोधलें गेल्यानें आत्मबोधाचें होऊन त्या श्रीहरीस भेटतात भेटतात मिळतात आत्माच होऊन येतात जरी, तरीपण मोक्षरूपी प्रासादाची बरोबरीच की ती मानिली होते मोक्षच तो कीं अहो ! तेथें संपन्न ते सर्व मोक्ष संपन्न असेंच होत कीं. (४७)

समर्थ अधिकारी (अनुकुल, उचित, हुशार) जे त्यांच्या पंक्तीला भोजन, तेथें तळीच्या (आधार अधिष्ठान) तसेंच वरीलच्या (ऊर्ध्व) सर्वांना, पक्कान्नें (बोलण्याचालण्याची पद्धती, रसाचें रसिकत्व, भाव, आदर, गौरव सन्मान) ती एकजात (कांहीं पंक्तीप्रपंच–भेदभाव का पक्कान्ना पक्कान्नामध्यें फरक–निराळेपणा नाहीं–) जी वरीलच्यांना तीच तळी असलेले जे त्यांनां ! अशी एकरूप तुल्य, उपमा नटली भूषित झाली, प्रेमच तें शोभलें–त्याप्रमाणें श्रवण करण्यानें, अर्थ आपलासा केल्यानें–(झाल्यानें)–वारंवार तेंच पठण केल्यानें अंगिकारल्यानें मोक्ष लाभतो–तेथचा लाभ तो मोक्षच कीं. (४८)

असा हा श्रीविष्णु भक्तांना–, ह्या गीतारूपानें–प्रसाद भेटला–प्रसाद मिळाला. हा अठरावा स्पष्ट असा विशदतेचा कळसच होय. अहो भेद म्हणून जो आहे, त्याचे पंक्तिप्रपंच–गहन–चारित्र्य जाणूनच कीं, मिया हा अध्याय कळसच होय असें म्हणूं केलें. (४९)

आतां सतराव्या अध्यायावर कसा तो अध्याय कसल्या स्वभावाचा तो पाठ–उठावदार होऊन यावा जे कां निष्ठा, श्रद्धा, योग्यता तेथीलचे ते दोष संबंध तेथें हेतु–सहेतुक–अहेतुक–ते दृष्टीस जसे दिसतात तेंच सांगण्याचें करतो. (५०)

दोन जे आकार (आकृती, तोंडाचे भाव पुरुष प्रकृति का चरण युगुल) ते न मोडताचमुळीं एक हें शरीर घडलें असें हें अर्धनारी नटेश्वराचें रूपच दिसत आहे. तेथें एका शरीराचे ठायीं अर्ध पुरुष व अर्ध स्त्री–नारी असें होय. (५१)

काय गंगा, काय यमुना! उदकच तें कीं एक! पण पाणी आपलीच पातळी धुंडतें या न्यायानें, जरी ओघाच्या–, प्रवाहाच्या सहजतेच्या संबंधानें का आकारानें पातळीच उंच, अतिउंच नीच का अतिनीच असें जें कांहीं मेटणें, व तेथेंही वाहाणें तेथें वेगळिकच एक दाखवित असतें जरी, तरी पाणी पणानें एक पाणीच तें देहच ते–उदकपणेंच कीं अहो. (५२)

प्रतिपदेच्या चंद्राची कळा दिवसेंदिवस वाढूं लागली वाढती झाली ती कळाच मुळीं कीं, अहो! मूळ बिंबातच बसणार ना! असते नां! स्थिर होते नां! पण काय तेथें निरनिराळें लेंबे–लेपच जसें कां चंद्रामध्यें दिसत आहेत असे, तर असे नाहीं. (५३)

दिवसेंदिवस वाढत आहे जीवदशा जेथें ती वाढती जीवदशेची कला ही मूळच्याच त्या देह दिवस जीव-दशेमध्येंच कीं, ती काहीं दुसऱ्या तिसऱ्या का निराळया एखाद्याठायीं जात नाहीं तर मुळांतच बसते; त्याप्रमाणें निरनिराळी जरी ह्या ओवीची चार पदें, तरी तीं ओवीच्या मूळासच मुळीं धरून असतात. श्लोक हाही पण श्लोकाच्या चारही पादानीं ( भेद दर्शविणारा विशेष गुण तो अथवा वाक्य समाप्तीचे चिन्ह तें–) श्लोकासचमुळीं आपला अर्थ पुरविता होतो : अध्याय हा–अध्याया अध्यायांनीं–दुसऱ्या तिसऱ्या अध्यायानीं मूळचा जो अर्थ त्यासच पुरता केला होतो असें हें आहे. येथें मूळचा योगपट तोच मुळीं समजविला गेला–असें होय. प्रकृति विकार वैचित्र्याचे ते जरी तरीपण अर्थ हा पुरुष सिद्ध करण्यातच नटला असें आहे. (५४)

जरी तें अनुमान, जें सिद्ध करावयाचें तें प्रमेय तेथें प्रसिद्धी अथवा प्रेमाचें जाणणें–स्फूर्ती–तेथीलची ती योग्यता–तऱ्हा–प्रकार–पद्धत–ही कांहीं दुसरें तिसरें रूप घेत नाहीं, तर मूळच्या–(प्रमीती) निश्चित ज्ञानास–अर्थासच धरून असते–जसें स्वयंप्रकाश रत्न जें, का मणी जो, तो ज्या दोरीमध्यें ओविला होतो, का रत्नें का मणि ओविले होतात, तेथें दोरी ती एकच जशी कां [एकाच तंतूमध्यें ओविले रत्ने तेथें रत्नें जरी स्वप्रकाशाची तरी तो जो धागा का दोरा (आहे), तो तर एकच कीं मुळीं]. (५५)

**मोतिये मेळउनि बहुवे। येकावळिचा पाडु आहे।**
**परी शोभे रूप होये। येकचि तेथे ॥ ५६ ॥**
**फुला फुलसराचे लेख चढे। हती दुजी अंगुळी न पडे।**
**श्लोक अध्याय तेणे पाडे। जाणावे हे ॥ ५७ ॥**
**सातशते श्लोक। अध्याय अठराचे लेख।**
**परि देवो बोलिले येक। दुजे नाहीं ॥ ५८ ॥**
**मियाही न संडुनि ते सोय। ग्रंथा व्यक्ती केली आहे।**
**प्रस्तुत तेणे निर्वाहे। निरोपण अैका ॥ ५९ ॥**
**तरी सतरावा अध्यावो। पावता पुरता ठावो।**
**जे संपता श्लोकी देवो। ऐसे बोलिले ॥ ६० ॥**
**ना ब्रह्मनामा–विषि। बुद्धि सांडुनि आस्तिकी।**
**कर्मे किजती तितुकी। असते होती ॥ ६१ ॥**
**हा ऐकोनि देवाचा बोल। अर्जुना आला डोल।**
**म्हणे कर्मनिष्ट मुळ। ठेला देखो ॥ ६२ ॥**
**तो अज्ञानांधु तंव बापुडा। ईश्वरूचि न देखे येव्हडा।**
**तेथ नावेक फुडा। का सुझे तया ॥ ६३ ॥**

आणि रजतमे दोन्ही। गेलियाविण श्रद्धा सान्ही।
ते का लागे अभिधानी। ब्रह्माचिये ॥ ६४ ॥
मग कोता खेंव देणे। वार्तेवरील धांवणे।
सांदी पडे खेळणे। नागिणीचे ते ॥ ६५ ॥
तैसी कर्मे दुवाडे। तया जन्मांतराची कडे।
दुमेळावे येव्हडे। कर्मामाजी ॥ ६६ ॥
ना विपाये हे उजु होये। तरी ज्ञानाचीच योग्यता लाहे।
येन्हवी पेणेचि जाये। नरकालया ॥ ६७ ॥
कर्मी हा ठावोवरी। आहाती बहुवा अवसरी।
आतां कर्मठा के वारी। मोक्षाचिये ॥ ६८ ॥
तरि फिटो कर्माचा पांगु। कीजो आघवाची लागु।
आदरिजो अव्यंगु। संन्यासु तो ॥ ६९ ॥
कर्म बाधेची कहि। जेथ भयाची गोष्ट नाही।
ते आत्मज्ञान जे ही। स्वाधीन होय ॥ ७० ॥

मेळउनि–मिळोनि. येकावळिचा–एकावळीचा = एकसरी हार. (एक = मुख्य. आवली = पंगत, ओळ, परंपरा.) (५६) फुलसर = फुलांचा हार, फुलांची माळ. लेख = अक्षर रचना. पाड = प्रमाणें. द्रुती–दती (दती = वृक्षयोनी) द्रुती = मकरंद, सुवास, सुगंध, अंगुळी, आंगुळो; ज्यास्त जास्त फुले ओवीत गेल्याने हाराचा (लेख) आकार वाढतो पण सुगंध एकच. (५७) सांत शते–सांते शते. अध्याय–अध्याया. दुजे–जे दुजे. (कीं परमात्म वस्तूवांचून दुसरे कांहीं नाहीं.) (५८) मियाही–आणि म्यांहि. संडूनि–सांडूनि. सोये–सोय = मार्ग. ग्रंथा व्यक्ति–ग्रंथ व्यक्ति = ग्रंथाचें स्पष्टिकरण. निरोपण–निरूपण अैका–आईका. निर्वाह = संपादन, पुरवठा. (५९) ऐसे बोलिले–बोलिले ऐसे. (६०) ना ब्रह्मनामाविधि –अर्जुना ब्रह्मनामाचा विधि. असंत = विस्तारलेली नाहीत अशी अल्पपणाची, उपाधिवंत, नाशिवंत. आस्तिकी = श्रद्धावंतांनी. (६१) डोल = हालणें, हाल, प्रेमा. कर्मनिष्टमुळ–कर्मनिष्टामलु = कर्मठाला दोष. कर्म करणाऱ्यावर देवांनी दोष ठेविला आहे. ठेला–ठेविला. (६२) नावेक फुडा–नावची एक पुढा. सुझे = समजे. (६३) सान्ही–सानी = निकृष्ट, लहान, बारीक, अल्प. अभिधानीं = नामाकडे. (अभिधान = नांव, शब्दकोश.) (६४) कोत = शस्त्र, भाला. वार्ता = शब्द, बातमी, व्यापार, सांदी–सांडी = मागे पडते, व्यर्थ होते, बाजूस रहाते. साडीपडे = मरणास कारण होणें. खेळणें–खेळविणें. (६५) दुवाडे = दुर्घट, कठिण. अंतर = मध्यें, शेवटीं अवकाश, सीमा, आच्छादन, छिद्र, मन. दुमेळावे–दुर्मेळावे = अडचणी. कड = बाजू. (६६) विपाये = विरळेपणाने, थोडेपणाने, कदाचित् एकादे. उजु = सरळ, यथाशास्त्र, यथासांग. पेणेचि–येणेचि = मुक्काम, टप्पा. नरकालया–निरयालया = नरकस्थानांत. (६७) ठावोवरी–ठायवरी = जेथपर्यंत. अहती–आहाती. के–कै. अवसरी = समय, हरकती, अडचणी; कर्म करणाराला पाळी वेळ = कर्मठतेयेवरि मोक्षाचिये–मोक्षाची हे. (६८) पांगु = ओशाळगतता, गरज, काळजी, पराधीनता, दैन्य. लागु–लागु. आदरिजो–आदरी जो. अव्यंगू = पंगू नाही असा, सांगोपांग, संपूर्ण तो–हा. (६९) गोष्टी–गोठी. जे ही–जिही. कर्मबाधेची–कर्मबाधेचिया. (७०)

पुष्कळसे मोती मिळविले, तेथें एका हाराची योग्यता येते, पण शोभेस जें रूप येतें तें तर एकच होय. कांतीचें रूप केलें तें तर एकच असें होतें निखळ सौंदर्यच (एक) असें रूप तें एकच. (५६)

जसजशीं जास्त फुले ओवावित तसतसा हाराचा (लेखालेख) आकार हा वाढतोच; पण तेथें सुगंध, सुवास जो, तो तर एकच! तेथें दर्शित झालेला (एका अंगुलीनेंच) तो सुवास हा केव्हांही दरवळलेला होतोच; तेथें अंगुलीच एक म्हटली, पण तो मकरंद ज्यास पोहोचेना, ज्यास येईना, अंगुलीचें सुवासाचें तें प्रमाण–प्रामाण्य सांपडेना, त्याजकरितां (दुसरी तिसरी एकादी आंगळी–अंगुळी म्हणजे बोट लावून) बोटानें स्पर्श करून दाखविलें जाणें तें सुवासानें असणें, तें कसचें! त्याप्रमाणें हे अध्याय जाणावेत कीं, समजुतीस घ्यावेत अहो! (५७)

अहो सात शत म्हणजे सातशें श्लोक हे अठराहि अध्यायानें लिहीलेली अक्षर, रचना, आकार, महत्व, किंमत तेथें अठरा ह्या संख्येनें ती एकंदर लेखा ही सातशें श्लोकाची झाली–जरी, तरीपण देवांनीं असेंच म्हणूं केलें कीं, येथें ह्या अठराहिमध्यें–सातशतामध्यें 'परमात्मवस्तु वांचून' दुसरें कांहींही नाही. देवे बोलिले एकच एक वस्तु (ब्रह्म) आहे, दुजे कांहींहीं नाहीं. (५८)

मीहीपण ती सोयच (का मार्ग, मागे टाकून, व्यर्थ मानून का बाजूस ठेवून) अंगिकाराची केली व ग्रंथासच एका व्यक्तीस आणिलें–ग्रंथरूप एक व्यक्तिच केली; ग्रंथाचें स्पष्टिकरण केलें आहे. त्याचमुळीं मार्गावर, आरूढ होऊन, प्रस्तुत तोच मार्ग निर्वाहाचा का संपादनाचा का पुरवठ्याचा करून केलेलें हें निरूपण, आतां ऐकावें. (५९)

तरी सतरावा अध्याय हा आपला पुरता ठाव पाहून आहे–तेथीलच्या अर्थाची खोली ही पूर्णपणें जेव्हां का ठावाची झाली : तेथें शेवटच्या श्लोकांनी देव असें म्हणाले कीं,— (६०)

(हे ना) हे अर्जुना! '**ब्रह्मनाम त्रिप्रकार**' जे का उपनिषदामधीलचें अतिसुंदर असे फूल, त्याजबाबत, श्रद्धावंतानीं आपली बुद्धी ही मागें पडू देऊन तसेंच का बाजूस ठेवून, जी कांहीं कर्मे करावीत, केलेली होतात, ती असंते विस्तारलेली नाहींत अशीच (अल्पपणाची, उपाधिवंत का नाशिवंत) होतात (ती निकृष्ट लहानपणच अल्पमेधस् जसे कां.) (६१)

असें हें देवाचें बोलणें ऐकून अर्जुनास तर डोल का प्रेमाचा पान्हा आला तो हालला व म्हणूं लागला कीं, देवांनीं (तर कर्मनिष्टमूळ तेथें) कर्मनिष्टांना दोषच येतो, असेंच बोलणे बोलिले कां कर्मठांना का कर्म करणाऱ्यावर देवांनी दोष मूळ ठेविला आहे. (कर्मठदोष मूळ म्हटलें). (६२)

तो बापुडा! कर्मठ तर अज्ञानच अंध असे, असा तो तर एवढा मोठा परमेश्वर सर्वत्र व्यापक असा असूनही त्यास पाहात नाहीं; तेथें खरें पाहिले असतां त्या कर्मठास कांहींही सुचतच नाहीं–ते पुढा नाम तो समजत असतो काय? (६३)

तसेंच रजोगुण व तमोगुण हे दोन्हीही 'रजोरागात्मकं–, तमसोलोभ एवच'–राग लोभ नाहींसे झाले कीं श्रद्धा ही अल्प मेधस् अल्प अशा बुद्धीची अशी असल्यानें (झाल्यानें) ती श्रद्धा ब्रह्मनामाभिधानाच्या (म्हणजे चैतन्य तत्त्व, ईश्वरी ज्ञान का ईश्वरत्वाच्या कां वेदाच्या) महत्वास पहात नाहीं. (६४)

तें ईश्वरत्व न पाहिल्यानें तर जसें कां शब्रासच आलिंगन देणें का नुसत्या शब्दावरच धांवणें होणारें, तेथें जिव्हा नागिणीचें तें खेळणें का खेळविणें तें व्यर्थ होतें, बाजूस रहातें, मागें पडतें, महत्वाचें नव्हे असें होतें. (६५)

हें जसें, तसें कर्मे हीं दुर्घट का कठिण अशीं जन्म जन्मानें असलेलीं, जीं तींच बाजू का कड, छिद्रच मन सीमा आच्छादन घेऊन असतात ; अशा ह्या एवढ्या अडचणी कर्मामध्यें येतात–असतात. (६६)

हे अर्जुना! कदाचित् हें कर्म उजू झालें म्हणजे, सरळ का यथाशास्त्र झालें तर, त्यास निखळ ज्ञानाची अशीच योग्यता येऊन असते; नाहींतर एरव्हीं नच उजूं पहावें तो नरक स्थानासच तें मुक्कामाचें करतें किंवा त्यानेंचमुळीं निरयालयांत जाणें होतें कीं. (६७)

कर्माच्याठायीं असा हा ठाव का असे ठावावरही (खोली, सीमा) दुसरे ठाव असे बहुत ते अडचणीचे कां हरकतीचे आहेत–असतात–होतात, म्हणून, का असें आहे म्हणून, कर्मठांना का कर्म करणाऱ्यांना मोक्षाची पाळी कां वेळ ही कसची बरें ! (६८)

म्हणून कर्माचा पांग का कर्म करणामधीलची जी ओशाळगतता, गरज, काळजी, पराधीनता, दैन्य हें नाहींसें होवो ! अवघा एक सर्व त्यागच करावा (किंवा लागाबांधा मागच एक करावा) का त्या संबंधानें अव्यंग संपूर्ण असा का सांगोपांग संन्यासच एक आदराचा करावा कीं. (६९)

अशा त्या कर्मफल त्यागामध्यें म्हणजेच संन्यासामध्यें तर, कर्म बाधेची गोष्टच नाहीं. कर्म हें बाधक आहे असें जें एक भयच घेऊन असणें तेथें कर्मफळ त्याग करण्यानें भय तें तर मुळीं नांवासुद्धां उरत नाहीं. ह्याचमुळीं तत्वावर तें आत्मज्ञान असें जें तेंहीपण स्वाधीन होतें–अशा ह्या संन्यासानें जें आत्मज्ञान (ज्ञानाच्याद्वारें आत्मप्राप्ति का ब्रह्मप्राप्ति करून घेणें जें) तें ह्या एकाच उपायानें आपल्या स्वाधीनतेचें आपल्याच स्वतंत्रतेचें असें होतें. (७०)

ज्ञानाचे आवाहन मंत्र । जें ज्ञान पिकते सुक्षेत्र ।
ज्ञान आकर्षिते सूत्र— । —तंतु जे कां ॥ ७१ ॥
ते दोन्ही संन्यास त्याग । अनुष्ठानी सुटो जग ।
तरी हेचि आतां चांग । व्यक्ती पुसो ॥ ७२ ॥
ऐसे म्हणोनि पार्थे । त्याग संन्यास व्यवस्थे ।
रूप होआवया जेथें । प्रश्न केला ॥ ७३ ॥
तेथ प्रत्योत्तरे बोली । श्रीकृष्णे जे चावळिली ।
तया व्यक्ती जाली । अष्टदशा ॥ ७४ ॥
एवं जन्य जनक भावे । अध्यावो अध्यायाते प्रसवे ।
आतां आईका बरवे । पुसिले ते ॥ ७५ ॥
तरी पंडुकुमरे तेणे । देवाचे सरता बोलणे ।
जाणोनि अंतःकरणे । कांणीं घेतले ॥ ७६ ॥
येऱ्हवी तरी तत्व विषी भला । जो निश्चितु आहे स्थिरू झाला ।
परि देवो राहे उगला । हे साहवेना ॥ ७७ ॥
वत्स धालियाहि वरी । धेनु न वचावी दुरी ।
अनन्य प्रीतीची परी । ऐसीचि आहे ॥ ७८ ॥
तेणे काजेहिविण बोलावे । ते देखिले तऱ्ही पाहावे ।
भोगिता चाड दुणावे । पढियंता ठाईं ॥ ७९ ॥
ऐसी हे प्रेमाची जाति । जपार्थु तंव तेचि मूर्ति ।
म्हणौनि करूं लाहे खंति । उणेपणाची ॥ ८० ॥
आणि संवादाचेनि मिसे । जे अव्यय वस्तु हरि असे ।
ते भोगिजे कीं जैसे । आरसा रूप ॥ ८१ ॥
मग संवादु तो पारुषे । तरी भोगणे भोगिता थोके ।
हे कां साहवेल सुखे । लांचावलेया ॥ ८२ ॥
या लागि त्याग संन्यास । पुसावयाचे घेवोनि मिस ।
उपरतविले दुस । गीतेचे ते ॥ ८३ ॥

अठरावा अध्यावो हा नोहे । येकाध्याइ गीताचि आहे ।
जै वांसरूचि गाय दुहे । तै वेळ काइसी ॥ ८४ ॥
तैसी संपताही अवस्व(स) री । गीता आदरविली माघारि ।
स्वामी भृत्याचा न करि । संवादु काई ॥ ८५ ॥
परि हे असो ऐसे । अर्जुने पुसिजत असे ।
म्हणे विनंति विश्वेसे । अवधारिजो ॥ ८६ ॥

आवाहन–अवहान (आवाहन = पाचारणें, यज्ञ करणें. मंत्र = बोलावणें, स्तुतिपर वाक्य. सुक्षेत्र = उत्तम भूमि. आकर्षिते सूत्र तंतु = ओढणारे दोरे, कळ. [आकर्षिते = ओढते, मोहिनी, आकुंचन करणें. सूत्र = शास्त्रांतले नियम, संक्षिप्त वाक्य, सूत, दोरा. तंतु = सूत, संतती.] (७१) अनुष्ठानी सुटो–अनुष्ठुनि सुटे. व्यक्ती–व्यक्त = स्पष्ट. (७२) रूप = स्वभाव शरीर, आकृती, प्रकार, सौंदर्य वर्ण, स्पष्टिकरण. (७३) प्रत्योत्तरे–प्रत्युत्तरें = प्रश्न उत्तरें, संवाद, भाषण, उत्तरावर पुन्हः उत्तर. चावळिली = बोलिली, सांगितली. (७४) जन्यजनकभावे = कार्यकारण न्यायानें. आईका–ऐका. (७५) सरता–सरते = शेवटचे. काणी घेतली = क्लेश मानले. (७६) विषी–विषयीं. उगला = उगा. (७७) धालयाहिवरी = तुष्ट झाल्यावरही. न वचावी–न जावी. (७८) चाड = आवड, इच्छा. पढियंताठायी = आवडतयाच्या ठायी. (७९) मिषे = निमित्तानें. हे प्रेमाची जाति–प्रेमाची हे जाती. पार्थ–आणि पार्थु. (८०) अव्यय वस्तु हरि असे–अव्यवहार वस्तु असे = निष्कर्म वस्तु हारी आहे. (**अव्यय** = अक्षय्य, नाशरहित, विष्णु. **वस्तु** = ब्रह्म, असामान्य वस्तु ) आरिसा–दर्पणी. (८१) पारूषे–पारूखे = राहे. थांबे. साहावेल = सहन करवेल. लांचावलेया = संवकलेल्यास, सोकलेल्यास. थोके = बंद होतें, संपतें. भोगणे भोगिता–भोगिता भोगणे. (८२) उपरतविले–उपलविलें = उघडे केलें, उघडलें. दुस = वस्त्र, प्रमेय. (८३) अवधारिजो = ऐकावी. (८६)

ज्ञानास पाचारणें–आमंत्रणें जें स्तुतिपर वाक्यांनी केलें होतें–ज्ञानास बोलावणें जें मंत्रांनीं जें ज्ञानच एक, पिकतें असें उत्तम क्षेत्र–उत्तम भूमी, जें मंत्र पिकतें असें उत्तम क्षेत्रच एक तेथें ज्ञानतंतु मुळी, आकर्षिले गेले–ओढले गेले ह्या सूत्रतंतूनी नियम, संततीनें शास्त्रातल्या संक्षिप्त वाक्यांनीं, सूत्रांनी (प्रेम दोरा संतती सूत्रतंतु)–ज्ञान आवाहन मंत्र सुक्षेत्र सूत्रतंतु ज्ञान आकर्षिते मंत्र हे सूत्रधार त्यांनीं ज्ञानसूत्रतंतु आकर्षिले होतात. (७१)

तें मंत्रज्ञान का मंत्र पिकतें सुक्षेत्र का आकर्षिते सूत्रतंतू–तें ज्ञानच म्हटलें. तेथें संन्यास व त्यागाचे अनुष्ठान करावें म्हणून जग हें आनंदतें–ऋणमुक्त होऊन आनंदास येऊ असे म्हणतें. (संन्यास त्याग अनुष्ठानाचें करून जप इत्यादि कर्में विशेषप्रकारें करून–जग हें सुटावें–सुटतें. जग हें मुक्त होतें) करितां हेंच आतां उत्तम असें आहे म्हणून तें व्यक्तीचें उत्तमतेचें चांग, व्यवहार्य, असें भलेपणाचें तें कशानें कां कसें तें होत असतें तें विचारूं. तेथें जीव पदार्थ तो स्पष्टतेचा व्यक्तीचा तो कसा ते विचारण्याचें करूं या. (७२)

असें विचारलें व तशी ती संन्यास व त्यागाची प्रत्यक्ष मूर्ती–रूप–आम्हांस कशी पाहाण्यास मिळेल असें विचारपुसीचें (पृच्छ्–पुसणें) तो अर्जुन करीत आहे.

पार्थानें असें म्हणणें करून आतां तो संन्यास त्याग, (त्याग संन्यास) स्थापना स्थिति कां शास्त्रानुरूप विधीसंबंधीचें रूप (समजावे,) व्हावें–असा प्रश्न तो करीत आहे. रूप (म्हणजे स्वभाव, शरीर, आकृती, प्रकार, सौंदर्य, वर्ण) तें कसें प्रत्यक्षास यावें–प्रत्यक्ष पाहाण्यास मिळावें म्हणून तेथें तो आतां प्रश्न करीत आहे, त्यानें प्रश्न केला आहे. (७३)

श्रीकृष्ण जे तेथें प्रश्नोत्तर संवादरूपी बोली बोलले–चावळले, तो संवादच म्हणजेच '**अठरावा अध्याय**' होय. त्या संवादाची व्यक्ती अठराव्या अध्यायामुळें झाली. (व्यक्ती म्हणजे स्पष्टता का जीवच तो का पदार्थंच कीं अहो, का प्रकृती जी आहे ती ह्या मन बुद्धि चित्त इत्यादिकांना पदार्थंच म्हणते जसे.) (७४)

येणेंप्रमाणें जन्यजनक भावाचे म्हणजे कार्यकारण न्यायानें अध्याय प्रकरण हेंच मुळीं अध्याय प्रकरणांस प्रस्तावनेस प्रसवते. प्रकरणापासूनच मुळीं प्रकरण उत्पन्न होतें जन्मतें असें आहे. यावर आतां जें कांहीं अर्जुनानें पुसलें, विचारलें–तें आतां लक्ष देऊन ऐकण्याचें करावें. (७५)

आतां पुढें सांगावयाचें तें म्हणजे त्या पंडुकुमरानें (म्हणजे अर्जुनानें) देवाचें तें सरतें पुरतें केलेलें बोलणें अगदीं अंतःकरणपूर्वक समजून घेऊन तेंच आतां कृष्ण काना–कृष्णकाणी म्हणजे क्लेशाचें का कष्टाचें, फुटके असें होय असें मनानें घेतलें. (७६)

एरव्ही बुद्धीनें तत्व समजलें असें भलेपणच मानून घेतलेलें, तेथें तत्त्वामध्येंच तो अगदीं निश्चितपणें स्थिर झाला आहे. पण देव उगे राहिले ते कांहींच बोलेनात, ते बोलणें त्यांनीं आवरिलेलें तें कां हें कांहीं त्यास सहन करवेना व सोसेना, तें कां (हें स्वाभाविकच होय.) ! (७७)

प्रीतीपूर्वक हांक मारण्याचा जो शब्द तो वत्स का वांसरू का वर्ष होय. तेंथें (बोलणें, वांचणें, उच्चार, ऋषि, वचन, वाक्य नियम, भाषण) जी धेनूकडून होणारी 'न अन्य', अनन्य प्रीतीची ती परी म्हणजे सीमा ही पण अशीच आहे कीं धेनु ही वत्सापासून दूर जाऊ नये. वासरूं तृप्त झाल्यावर धेनूनें दूर जाऊ नये. (७८)

(काम्य काजाशिवाय–काम्य म्हणजे सुंदर काज हेतूशिवाय इच्छिले बोलावे–तेंच काज इच्छेचें ऐच्छिक का सहेतुक तेच सुंदर असें.) सुंदर तें कसें हें हेतुशिवाय बोलावें, बोलण्याचें होतें. तेथें देखणें देखिलें जरी का तरीच तें पाहावें–पाहाण्याचें होतें व तें भोगिलें रमविलें, वापरलें, अनुभविलें, सोसलें, सुखाचें केलें, मेजवानीचें केलें, रतिसुखाचें केलें, तर आवडहीपण आवडल्याच्या ठायीं दुपटीची होते. (७९)

अशी प्रेमाची जाती आहे : असे जातीचें तें प्रेम आहे : येथें पार्थ पाहावा, तर तोच मुळीं एकजात प्रेमच सर्व ! असा मूर्तिमान् ! आणि म्हणूनच तर, तेथें जें कांहीं उणें पडलें, त्याविषयीं खंती मानूं लागला ! (जातीचें तें प्रेम पक्षीस्मरे रामराम) मनांत हुरहुर करूं लागला. (८०)

तेथें उणेपण तें इच्छाशक्तीचें तें ह्या मनास आलें, लागलें; व वर म्हणतां कीं, ह्या संवादाच्या निमित्तानें जी जी वस्तू (अक्षय्य, नाशरहित, विष्णु, ब्रह्म, असामान्य वस्तु) हारीस येऊन आहे, अथवा जी वस्तु ब्रह्म–हारी कां,–आहारी असतेच असते ती जसें आरशानें रूप पाहिलें होतें, तशी ती वस्तु भोगण्याचें करावें.

अव्यवहार निष्कर्म अशी जी असामान्य वस्तु ब्रह्म ! जी अव्यय विष्णु ! म्हटली जी ह्या प्रकृतीच्या हारी आहे. प्रकृतीच्या जन्य विकाराच्या हारीच आहे. विकारांनींच जी मुळीं जिंकिली आहे–ती ह्या संवादाच्या निमित्तानें जसें आरशांत रूपाचा भोगच होतो एक, जसा कां तशी ती वस्तु–ब्रह्म ! भोगण्याचें करावें, अनुभवाचें करावे–सुखाचें करावें. (८१)

तेथें मग तो संवादचमुळीं राहातो, थांबतो, (बंद होतो, संपतो.) तरी आतां तर सहजपणेंच अनुभव अनुभविता–(भोगणें कां भोगिता, रमणें कां रमविता) तो बंद होतो, थांबतो, पण असें हें थांबणें, जो तेथें संवकलेला आहे, लांचावलेला आहे त्यास, तर अगदीं सहज सुखानें साहवेल–सहन होईलच असें नाहीं. (८२)

आणि एवढ्याचकरितां कीं, त्यास संन्यासाबाबत पुसण्याविचारण्याचें मिस, निमित्तच एक, घेऊन गीतेचे ते वस्त्र प्रमेय–सिद्धांत–तेचमुळीं उपरतविले, (सिद्ध करण्याची गोष्ट का अनुमान, उपलविलें, उघडलें, उघडे केलें ते अगदीं जवळचें करून तेथेंच रतणें केलें जें.) (८३)

अठरावा हा कांहीं एकच अध्याय आहे असें नसून ! अहो ! ही एकाध्यायी गीताच कीं म्हणावी ! अहो जेव्हां प्रीतीपूर्वकच हांक मारणारे जे वत्स कां वासरूवानेचमुळीं जर गाय पान्हवली–पिळिली तर तेथें दोहनाची वेळ तरी कसची ती ! (८४)

तशी ही गीता संपता संपताच मुळीं आपल्या वेळेस आल्यानें ती माघारी पुन्हां आणीक आदराची केली, आदरविली गेली ; कीं तिचा माघारच एक व्हावा, जसा का स्वामी हा भृत्याचा संवाद करणारा होत नाहीं काय ? (माया ही एकदम आकळिली जात नसल्यानें तेथें मार्गामध्यें भेटणारे होणारे चुकीचे भाव ते पुन्हः पुन्हः सुलाखावे लागतातच. ताव पडलें पण त्याचा पुन्हः पुन्हः संवाद, उच्चार होण्यानें, बुद्धि सत्त्व तें स्थिर होतें; आत्मा स्वामी, देह, नोकर भृत्य जसा, ज्ञानी हा स्वामी व ज्ञान हा नोकरच एक असें होणारे) (८५)

पण हे असें असो ! अर्जुन विचारीत आहे कीं, अहो विश्वेशा ! माझी एक विनंति आपण ऐकून घ्यावी अहो जी ! (८६)

**अर्जुन उवाच—**

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक् केशिनिषूदन ॥ १ ॥**

संन्यासस्य = कर्मफल त्यागाचें तत्त्व. (तत्त्व = तथ्य, सार, निष्कर्ष.) महाबाहो = महान् बाहु असा परम समर्थ जो श्रीकृष्ण. [**बाहु** = हात, (ग०) त्रिकोणाची बाजू, पशूचा पुढील पाय, (वै.) देहाचा उर्ध्वभाग. **बाहुगुण्य** = वैपुल्य. **बाहुक** = ठेंगू, खुजा. बाहुदंतिन्, बाहुदंतेय = इंद्र.] वेदितुम् = जाणण्यास (वेदितुं = जाणणें, जाणतेपण, जाणण्यास, जाण.) त्यागस्य = सांडोवा, त्याग जो आहे त्याचे तत्व पृथक् = वेगवेगळें, निरनिराळें हृषीकेश–हृषीक + ईश = (हृषीकेश) विष्णु. केशिनिषूदन = केशिहंता. [केशिन् = सिंह, सुंदर केसाची स्त्री, दुर्गा; अश्वरूपी आसुर–(**अश्व** = घोडा, 'सात' ही संख्या. **अश्वकः** = घोडा, चुकलेला घोडा, भाडोत्री घोडा, काकाकुवा पक्षी. **अश्वत्थ** = पिंपळ. **अश्वस्तन** (अश्वस्तनिक) = आजचें, एका दिवसाचें, एका दिवसाचाहि संग्रह न करणारा. **अश्विनी** = १ लें नक्षत्र. **अश्विन्** = घोडेस्वार (ठि.) अश्विनीकुमारः **अश्वत्थक** = मोगरीच्या फुलाच्या पाकळ्या. अश्वत्थ फलकाली, वैशाखात देण्याचें कर्ज.) **केशिनी** = असमंजसाची माता, सगर राजाची स्त्री. **निषूदन** = निः–सूद–सूदन, अतिशय पाप जें त्याचा नाशक, आज्ञाच एक–पाप नाशन करण्याची, कायमपणा–पाप नाशन करण्याचा, कौशल्य–पापनाश करण्यानें जवळ जवळ पाप नाश करणारा.]

अन्वय— अर्जुन उवाच—**महाबाहो** संन्यासस्य तत्वं वेदितुम इच्छामि । हे हृषीकेश ! हे केशिनिषूदन ! त्यागस्यच तत्वं । पृथक् । वेदितुम् इच्छामि ॥ १ ॥

**अर्थ**—अर्जुन म्हणाला हे माहाबाहो ! (ज्याच्या देहाचा उर्ध्व भाग महान् आहे) संन्यासास संन्यास या शब्दाच्या अर्थाचें यथार्थलक्षण, तत्व,—मी जाणूं इच्छितो. तसेंच अहो हे हृषीकेशा ! हे हृषीकम् = ज्ञानेंद्रिय–ईश = विष्णो ! त्याग शब्दाचें यथार्थ लक्षण रहस्य,— त्याग व संन्यास ह्या दोन्ही शब्दार्थाचें रहस्य वेगवेगळें समजून घेण्याची माझी इच्छा आहे. करितां तें हे केशिनिषूदना ! निरनिराळेपणानें सांगावें.

(श्लोक १ ला ओव्या ८७–८९)

**ह्रां जी संन्यासु आणि त्यागु । या दोही येक अर्थी लागु ।**
**जैसा सांगातु आणि संगु । संगातेचि बोलिजे ॥ ८७ ॥**
**तैसा त्यागे संन्यासे । त्यागुचि बोलिजत असे ।**
**आमचेनि तंव मानसे । हेचि जाणिजे ॥ ८८ ॥**
**ना कांहीं आथी अर्थ भेदु । तो देवो करितु विषदु ।**
**तेथे म्हणे श्रीमुकुंदु । भिन्नचि पै हे जाणिजे ॥ ८९ ॥**

या–इया. येक–एक. सांगातु–संघातु. संगु–संघु. संगानेचि–संघातेचि. (८७) हेचि जाणिजे–जाणिजे हेचि :: तैसा–तैसे. त्यागे–त्यागे आणि (८८) देवो करितु–देव करोतु. विषदु–विशदु. तेथे–तेथ. म्हणे–म्हणती. हेचि जाणिजे–भिन्नचि पै हे–भिन्नचि पै (हे) जे. (८९)

**त्याग व संन्यास या शब्दांचे पारिभाषिक अर्थ—** ८७–९२

**अर्जुन म्हणाला:—**

जी अहो देवा ! हां ! मी असें समजलों कीं त्याग व संन्यास या दोन्ही शब्दांचा अर्थ एकच; ह्या दोहींनी एकच अर्थ पाहिला होय. ज्याप्रमाणें सांगातु संघात व संगु संघ हे दोन्ही शब्द एका संगासच (संघासच) लागू होत. (स्थूल, देह, पिंड ह्या तिन्ही शब्दांनीं एक संगच का संघच पाहिला होतो.) (८७)

त्याप्रमाणें त्याग व संन्यासानें एक त्यागच प्रदर्शित केला होतो (म्हटला होतो, वागविला जातो.) येथें आतां त्यागच एक संन्यासाचाहि सर्व महत्व भार घेऊन आहे हें साहाजिकच ! आणि माझ्या मनानें हाच **'त्याग व संन्यास'** या शब्दाचा अर्थ असावा असें वाटतें. [आतां 'त्यज्' शब्दाचें व्यापकपण पहावें तों तें म्हणजे त्याग करणें, टाकून देणें, सोडणें, देणें, वगळणें, वर्ज्य करणें, पर्वा न करणें (प्राण) सोडणें इत्यादि होय.] व आमच्या मानसानें तर हेंच तत्त्व कसें असतें तें जाणावें व त्याप्रमाणें आचरण करावें–असें आहे. ("माझ्या मनिचें तुम्हीं काहो नेणा । माझा बळिया तो पंढरिराणा । नंदनंदनु घडिघडि आणा । तयाविण न वजति प्राणा गे माये ।") (८८)

येथें कांहीं अर्थभेद असला तर तो देवांनी स्पष्ट करावा–[ जर का कांहीं तेथें अर्थ म्हणजे शब्दाचा भाव, अभिप्राय, पैसा का मालमत्तेसंबंधी निराळेपणा फरक, भिन्नभाव आहे, तर तो देवांनीं विशद (म्हणजे स्पष्ट शोभिवंत, उघड प्रसन्न–तेथें गंधविशेष जो पृथ्वीचा गुण तसेंच स्पर्शविशेष जो वायूचा गुण तो शांत तसेंच प्रसन्न करणारा निर्मळ) करावा–कीं जेथें पण अहो श्रीमुकुंद ते म्हणतात कीं तेथीलचे तें जाणणें भिन्न भिन्न असें निराळें आहे. (श्रीमुकुंदानी यावर म्हटलें कीं त्याग व संन्यास हे तर भिन्न होत की)] (८९)

**श्लोक २ रा—श्रीभगवान उवाच—**

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

**काम्य**=इच्छिण्याजोगें, ऐच्छिक, सहेतुक, सुंदर, इच्छा. **कर्म**=(कर्मन्–कर्म) करणें, कृत्य, कामगिरी, धंदा, काम, कर्म, धार्मिक, मेहनत, परिणाम, गुणधर्म, दैव, पूर्वकर्म, (व्या.) कर्म, (न्या.) गति, चलन, इंद्रिय, कर्मेंद्रिय. **न्यासिन्**=संन्यासी. न्यासाः=ठेवणें, खूण, छाप, ठेव, गहाण, त्याग, संन्यास (स्वाधीन करणें) मंत्रांनी देव इत्यादिकांची शरीरावर स्थापना करणें, सोपविणें, लिहिणें. **संन्यसनं**=टाकणें, सोडणें, स्वाधीन करणें. **संन्यस्त**=ठेवलेला, टाकलेला, अर्पित, युक्त. **संन्यास**=ठेव, प्रपंचाचा त्यागरूपी चौथा आश्रम, काम्य कर्म त्याग, त्याग. **संन्यासिन्**=तपस्वी, अन्न वर्जणारा, संन्यासी, त्याग

करणारा. **कवि**=विचारी, ज्ञानी, स्तुत्य ज्ञाता, विद्वान, काव्यकर्ता, सर्वज्ञ, शुक्राचार्य, वाल्मिकी, ब्रह्मदेव, सूर्य, लगाम. **कविका**=लगाम. **कवी**=लगाम. **कवि (वी) यः**=लगाम. **कविता**=काव्य, कवित्व. **विद्**=जाणणें, मानणें, अनुभवणें, कळविणें, शिकविणें, चर्चा करणें, सांगणें, वास करणें, स्थिर रहाणें, व्यक्त करणें, संवाद करणें, जागे करणें, निश्चय करणें, असणें. विद्=ज्ञाता, आत्मा. प्राहुः [अंह (अहि)=बोलणें, प्रकाशणें, निघणें, जाणें, पाठविणें.]=नांव दिलेला, बोलाविलेला, बोलणें, चोरून नेणें. विचक्षुः=आंधळा, नेत्रहीन, गोंधळलेला. विचक्षस्=अध्यापक, गुरु. विचक्षण=विद्वान्, कुशल, निपुण, ३ दूरदर्शी, (स्त्रीलिंग).

अन्वय— कवयः। काम्यानां कर्मणां न्यासं। संन्यासं विदुः। सर्वकर्मफलत्यागं। विचक्षणाः। त्यागं। प्राहुः॥ २॥

अर्थ—स्तुत्य असें जें तें ऐच्छिक का सहेतुक अशा (कर्मीयांना)–कर्मांना–'खूण ठेवणें', 'ठेव स्वाधीन करणें' त्यास **संन्यास** म्हणतात. दूरदर्शी, निपुण जे ते सर्व कर्म-फलाचा त्यागच जो त्यास **'त्याग'** (टाकून देणें, वगळणें, वर्ज करणें, पर्वा न करणें) असें नाव देतात. (श्लोक २ रा, ओव्या ९०–१३४)

**येऱ्हवी अर्जुना तुझां मनि। त्याग संन्यास दोन्हि।**
**येकार्थ गमले हे मानि। मीही साच॥ ९०॥**
**किर दोही इही शब्दी। त्यागुचि बोलिजे त्रिशुद्धि।**
**परि कारण येथे भेदी। येतुलेची॥ ९१॥**
**जे निपटुनि कर्म सांडिजे। ते सांडणे 'संन्यास' म्हणिजे।**
**आणि फल मात्र त्यजिजे। तो 'त्यागु' गा॥ ९२॥**
**परि कोणा कर्माचे फळ। सोडिजे कोण कर्म केवळ।**
**हे सांगो विवळ। चित्त दे पां॥ ९३॥**
**तरी आपैसी दांगी डोंगर। न लाविताहि (झाडे लागती) अपार।**
**तैसे लांबे राजागर। नुठती ते॥ ९४॥**
**न पेरता सैंघ तृणे। उठती तैसे साळीचे होणे।**
**नाही गा राबा उणे। जयापरि॥ ९५॥**
**का अंग जाहले साहजे। परी लेणे उद्यमे किजे।**
**नदी आपैसी आपादिजे। विहिरी जेवी॥ ९६॥**
**तैसे नित्य नैमित्यक। कर्म होय स्वाभाविक।**
**परि न करिता कामिक। न निफजे जे॥ ९७॥**
**(कां) कामनेचेचि दळवाडे। जे उभारावया घडे।**
**अश्वमेधादिक फुडे। याग येथ॥ ९८॥**
**वापी कूप आराम। अग्रहारे हन ग्राम।**
**आणीकही नाना संभ्रम। व्रतांचे जे॥ ९९॥**
**ऐसे इष्टापूर्त सकळ। जया कामना येक मूळ।**
**जे केले भोगवी फळ। बांधोनिया॥ १००॥**
**देहाचया गावा आलया (आलिया)। जन्ममृत्युचया सोहळया।**
**ना म्हणो नये धनंजया। जयापरी॥ १०१॥**

६

**का ललाटीचे लिहिलें। न मोडे गा कांहीं केले।**
**काळेगोरेपण धुतले। फिटो नेणे ॥ १०२ ॥**
**केले काम्य कर्म तसे। फळ भोगावया धरणें बैसे।**
**न फेडिता रिण जैसे। वोसंडीना ॥ १०३ ॥**
**का कामना ही न करिता। अवसांत घडे पांडुसुता।**
**तरी वाय कांडेने झुंजता। लागे जैसे ॥ १०४ ॥**
**गुळ नेणता तोंडी। घेतला देचि गोडी।**
**आगी मानुनी राखोंडी। चेपिला पोळो ॥ १०५ ॥**
**काम्य कर्मी हे येक। सामर्थ्य आथी स्वाभाविक।**
**म्हणौनि नको कवतिक। मुमुक्षु येथे ॥ १०६ ॥**
**किंबहुना पार्था ऐसे। जे काम्य कर्म गा असे।**
**जे त्यजिजे विष जैसे। वोकोनिया ॥ १०७ ॥**

ये=ह्वी–तरी. तुझा–तुझिया, तुझ्या, येकार्थ=एकार्थ (ऐसा अहंकारा रूढ। एकदेशी मूढ 'तया हा परमार्थ गूढ। प्रगटावा नां ॥ १७९ ॥' त्रिशुद्धि=केव्हांहि निश्चित. (९०) किर दोही इही शब्दी–इही दोही कीर शब्दी. येथे–एथ. (९१) फल मात्र–फल मात्रका कां (९२) परिकोण–तरि कोणा. सोडिजे–सांडिजे. हे–हेही. विवळ–एक वेळ=स्पष्ट निवळ–स्वच्छ करून. (९३) दांगी–दांगे=अरण्यें, झाडी, वन. [**अरण्ययानं**–अरण्यअयनं=संन्यास घेणें, संन्यास घेतलेला. **अरण्यवासी**=अरण्यसद, अरण्यओकस. **अरण्यधर्म**=वानप्रस्थधर्म, रानटी स्थिति, स्वभाव. अरण्यानि = मोठे वन, वन. **अरण्यतिलकं** = निरर्थक गोष्ट, तैलरहित रानतीळ.] न लाविताहि अपार – न लाविताहि झाडे लागती अपार – झाडे लागती किती अपार – झाडाळी किती अपार (झाडे लागती तैसे) लांबे = पाणी घातलेले लांबीचे भात. राजागर = बागेतील झाडे; [रा = रस्ता. जागर = जाग्रण करणारा जागृती अवस्था राज=शोभणारा, शोभणें स्वामित्व, देश, गवंडी, राजा. राजस्=रजोगुण प्रधान राजन्य=क्षत्रिय, अग्नि. आगर–आकर=खाण, उत्पत्तिस्थान. राजगीर=कारागीर. राजदार=रहस्य सांगणारा.] राजागर=आगर–आकर=खाण. रा=रस्ता; उत्पत्तिस्थान, खाणीचा मार्ग-रस्ता रहदारीचा हमदारीचा–रस्ता. राजागर=(शोभा–आगर आकर=समुदाय, खाण, समूह, श्रेष्ठ, प्रमाणभूत ग्रंथ उदा.- पातंजल भाष्य.)=समूहत्वें शोभणारे जसें, समुदाय जाती ती सर्व प्रेमच त्या जातीचें–किंवा जातीचें तें प्रेम –असें तेथें एक सर्व प्रेमच शोभणारें असें. नुठती=उभी रहात नाहींत, उगवत नाहींत (९४) सैंघ= बहुत, पुष्कळ. राबा उणे=मेहनत, रात्रंदिवस तेथेंच राबणें, असणें; शेतांत राब घालतात (त्यावांचून) तेथें राबणेंच एक जें त्यांत उणेपण केव्हांही नाहीं. जयापरि–जियापरि. (९५) सहजे–साहजे=स्वाभाविकपणें, मूळचे, सख्खे (सहज) (सहजत=अस्वाभाविक.) उद्यमे=उद्योगानें, मेहनतीनें. आपादिजे–आपादावी= संपादावी. (पद+आ (आपदणे-)=स्थितीला पावणें, स्थितीला जाणें, जवळ जाणें, अवलंबणें, जाणें.) मुद्दाम आपल्यावर ओढून घेऊन सरळ रस्त्याची–नीट करावीत. (इंद्रियें) गुणाधारे। राहाटती निजव्यापारे। ते परकर्मे बलात्कारे। आपादी जो ॥ १८५/३) (९६) स्वभाव=प्रकृती, सहजकर्म. स्वाभाविक= नैसर्गिक, स्वभावसिद्ध. नैमित्तिक=प्रसंगोपात्त, अनुषंगिक, (ज्योतिषी) प्रासंगिक संस्कार, कार्य, परिणाम. करिता–कामिका इच्छित, सकाम. (९७) दळवाडे=भांडवल. फुडे=स्पष्ट. कामना इच्छा. अश्व- मेधादिक याग=अश्वमेधादिक यज्ञ याग. [कामि–कामिकः=विलासी रती. पादपूरक, शुद्ध, गतिमान्, मत्सरं, जीवात्मा, डौलानें चालणारी स्त्री. हंसनादिनी=स्त्री भेद. हंसकः पैंजाण, वाळे, पादभूषण.]

(९८) [अराम–अग्रहर–हे व्यक्तिगत पाठभेद असल्यामुळें तेथें महत्व नाहीं.] आराम=बाग. वापी=विहिर, पुष्करिणी. अग्रहार=देवा ब्राह्मणाला दिलेला गांव. ग्राम–महाग्राम=मोठे गांव. संभ्रम=भ्रांति, समारंभ, उत्साह, आनंददायक कृत्यः व्रत=महाव्रत, दान. (९९) इष्टापूर्ति=यज्ञादि, कूप, तलाव, बाग इत्यादि. (१००) ललाटींचें=नशिबातील. फिटणें=पुसलें होणें, नाहींसें होऊं शकत नाहीं. (१०२) ओसंडीना=सोडीत नाहीं. (१०३) अवसांत=अकस्मात. वायकांड झुंझता=वायफळ बाणांनीं झुंझता. (१०४) राखुंडी–राखोंडी चेपिला पोळी=पोळते (१०५) कवतिक–कौतुक. (१०६)

येऱ्हवी पाहिलें असतां हे अर्जुना ! तुझ्या मनानें त्याग व संन्यास हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत हे कांहीं खोटें नाहीं–एकाच अर्थाचे मानिले होतात हें मीही पण खरेपणानें जाणतो. (९०)

(मांसवसादि विकार जेव्हां का मानावेत) ह्या दोन्ही शब्दांनीं एक त्यागच मुळीं निश्चितपणें बोलिला आहे, बोलिला होतो त्यागाचाच बोध होतो, परंतु तेथीलच्या भेदासंबंधीचें जें कांहीं आहे तें येवढेंच कीं, अहो ! (९१)

जे का अगदीं सर्वथैव कर्म करणेंच मुळीं टाकून द्यावें व तेंच मुळीं (सांडणे जे) तो–मुळीं कर्मच करावयाचें नाहीं या कर्मत्यागाला– **'संन्यास'** म्हणावा; व कर्म करून कर्माचे फल टाकणें जें, फळ तेवढेंच मुळीं त्यागिलें जेथें होतें, तो **'त्याग'** होय.–कर्माचें फळ (परिणाम, लाभ, अग्र) तेवढेंच टाकणें जें त्यास **'त्याग'** म्हणतात. (९२)

कोणत्या कर्माचें फळ टाकावयाचें (तें कोणीही), का कोणतें कर्म तें मुळींच करावयाचें नाहीं जें तें सांडावेंच केवळपणें, लहानपण स्वीकारून) ] या संबंधीही (विवळ करून) एक वेळ स्पष्ट करून स्पष्टपणें सांगण्याचें करूं या ! चित्त देऊन ऐस. (९३)

**त्याज्यात्याज्य कर्मविचारासंबंधीं सर्वज्ञ श्रीकृष्णाचें मत— ९३ ते १५२**

तरी आपोआप अगदीं आपैसेच मुळीं डोंगराच्या ठायीं अपार अशी किती तरी झाडें अरण्यें लागलीं होतात–उगवून असतात; पण त्याप्रमाणें कांहीं पाणी घातलेले लांबीचे भात का बागेंतील झाडें आपोआपच उगवलेली नसतात. (९४)

गवत (हेंही) न पेरता आपोआप सर्वत्र बहुततेनें उगवतें पण तशा साळी कांहीं आपोआप उगवत नाहींत. त्या तर पेराव्याच लागतात–त्यासाठीं जमीनीचा राब करून मग बी पेरावें लागतें व रोपे तयार झाली म्हणजे मग तीं शेतांत लावावीं लागतात. त्यांची मशागत केल्यावांचून पीक येत नाहीं जसें त्याप्रमाणें— (९५)

अगदीं सहजपणें अवयव–शरीर आहे, पण अलंकृत होणें जें, तें तर येथें उद्योगानेंचमुळीं अंग–स्वीकृत होतें–अलंकृत होतें–अंगिकृत करावें लागतें : अहो नदी जशी कां पुष्करणीच एक जशी कां सहजच संपादावी. अंगास उद्यमानें संपादनतेचें, सामर्थ्याचें, करावें लागतें ना ! (९६)

त्याप्रमाणें **नित्य** म्हणजे स्नानसंध्यादि–चिरस्थायी, रोजचे, स्वाभाविक, स्वभावसिद्ध का अविनाशी जे प्रसंगोपात्त, **नैमित्तिक** म्हणजे श्राद्धादि कर्में (देहनिमित्तावरच होणारे) कर्म हेंच मुळीं स्वाभाविकपणेंच घडणारें :: **काम्य कर्में** मात्र फळाची इच्छा न करतां होत नाहींत. सख्खे सहज असें जरी, तरीपण विषयेच्छेनें, कामिक असें न करितां, न कामिता कमाविता ते उत्पन्न होत नाहीं, विलासी असें न करितां, रती करितां न इच्छिता, प्रेमास यावें असें न इच्छिता, इच्छा ही इच्छेस यावी असें कर्म न करितां, ते विलासी पुरुषाचे विलास रतीनें अगदीं आपोआप उत्पन्न होणें होत नाहीं. (९७)

अहो ! येथें असेंही कां म्हणाना कीं, इच्छा (कामना) हेंच भांडवल घेऊन जें कांहीं उभारावयाचें घडतें तेथें काम्यकर्मे म्हणजे अश्वमेधादि **यज्ञ** भूमिदान वगैरे तेंच स्पष्टपणें येथें '**याग**' म्हटलेंत कीं. (९८)

काय पुष्करिणी हौद, बागबगीचे, तसेच देवाब्राह्मणानां दिलेलें इनाम अशी मोठमोठी ग्रामें-गांव, तसेंच आणखीहीपण व्रत उपास इत्यादि नियमादीचें अनेक तऱ्हांनीं गौरविणें जें. (९९)

असें जे यज्ञादि (इष्ट, पूर्त) कूप, तलाव, बाग, आदिकरून सर्व कांहीं सकळ येक, ज्यांचें मूळ पहावें तो ती कामना * कामासक्त अशी इच्छाच एक मुळीं, असणारी व तीचमुळीं इच्छा ही–, जे कांहीं, थोडे कां बहुत केलेले तेंचमुळीं तेथीलचे फळ भोगण्यास लावते–बांधून आणून तें फळ भोगविते उपभोगविते. (१००)

अहो, ह्या देहधारीपणानें असणें जें म्हणजेच ह्या देहाच्या गांवास आल्यावर तेथीलच्या जन्ममृत्यूच्या सोहळ्याला हे धनंजया, ना म्हणो नये. ज्याप्रमाणें व्यवहारानेंचमुळीं ते सुखदुःखादि भोगणें तेंचमुळीं, जन्मणें का मरणें म्हटलें–तेथें '**सुख पाहाता जंवापाडे दुःख पर्वताएवढें**' असें जें तेथें कांहीं घाबरून जाऊ नये : स्वतःस अडचणींत फसवूं नये. वृत्ती ही मोकळी ठेवून तें निर्णयाचें करावें लागतें ना ! शरीर (धारण केल्यावर) गांवास आल्यावर (गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः) जन्मणें व मरणाच्या सोहळ्यांस, कां आनंद पावणें, क्रीडा करणें या बाबीना केव्हांही ना म्हणूं नये. (१०१)

अहो ! ललाटामध्यें, नशिबामध्यें लिहिलेलें तें कांहींही जरी केलें तरी मोडतच मुळीं नाहीं ! गोरेपण तें अहो ! काळें झालें, तें कसेंही धुतलें तरी केव्हांही नाहींसें होऊ शकत नाहीं. (१०२)

केलेलें जें कांहीं काम्य (म्हणजे इच्छिण्यास योग्य, सुंदर, इच्छित प्राप्तीसाठीं केलेलें.) कर्म तसें तेथीलचें तें फळ भोगण्यासाठीं कां भोगविण्यासाठीं, तर काम्य तें धरणेंच धरून बसते जसे; अहो ! जे ऋण द्यावयाचें आहे तें दिल्या फेडल्याशिवाय कधींही चुकत नाहीं ! तें ऋण फेडावें तेव्हांच सुटका होते ! (१०३)

*अथवा हे पांडुसुता ! असेंही हो कीं, कामासक्त-विषयासक्ततेची अशी इच्छा जरी केली नाहीं पण अकस्मिततेनें (अवसांत) तसें भोगणें घडलें तर–ज्याप्रमाणें वायफळ का बोथट बाणांनीं झुंजणें होत आहे* तेथें लागणें होतेंच (तसें काम्य कर्म हें कर्म भोगवितेच). (१०४)

अहो गूळ हा गोड असतो पण गुळ आहे असें न जाणतां जर गूळ तोंडात घातला तर तो आपली गोडी ही देतोच नां ! आग जी आहे तिला राखोंडी समजून जर पाय दिला तर अविचारी, चुकलेला जो *त्यास पोळणें होणारच केव्हांही.* (१०५)

असें हें *काम्य कर्मीं* म्हणजें सुंदर असें इच्छित प्राप्तिसाठीं केलेलें कर्म जें त्यामध्यें (समान, पूज्य, उचित,) (कर्म करणाराचा नाश–घात करण्याचें) सामर्थ्य स्वाभाविकपणें असतेंच म्हणून मुमुक्षु जे आहेत त्यांनीं कौतुकानेंसुद्धां–सहजेंसुद्धां–काम्य कर्माचें आचरण करूं नये (कारण वायफळ जाणारा कां बोथट बाण जरी असला तरी त्यानें झुंजलें असतां जखम होते; आग ही राखोंडी समजून त्यावर पाय दिला तरी पोळणें

---

* **कामना**—काम्य म्हणजे फलेच्छेनें केलेल्या कर्माचें फळ भोगल्यावांचून सुटका नसते : जाणून म्हणा का अज्ञाततः म्हणा केलेल्या कर्माचें फळ भोगावयास लावणें, हें ह्या कर्माकर्माचें स्वाभाविक सामर्थ्य आहे; म्हणून मुमुक्षूनीं काम्य कर्माचे ठिकाणीं आवड ठेवूं नये. इतकेंच नाहीं तर काम्य कर्म विषाप्रमाणें ओकून टाकावें याला म्हणतात संन्यास :: काम्यकर्म टाकणें म्हणजेच वासनेला समूळ खणून काढणें होय.

होतेंच. त्याप्रमाणें काम्य कर्म, चांगल्या अगर वाईट हेतूनें केलें काय! किंवा न कळत झालें काय! आचरिलें गेलें काय त्याच्या अंगीं काम्य कर्म करणारास त्याचे फळ भोगावयास लावण्याचें (स्वाभाविक सामर्थ्य आहे, म्हणून मुमुक्षूंनी काम्य कर्माचें कौतुकानें सुद्धां आचरण करूं नये.) (१०६)

म्हणून हे पार्था! काम्य कर्माच्या अंगीं ते आचरणास त्याचें फळ भोगावयास लावण्याचें स्वाभाविक सामर्थ्य आहे. विष समजून तें ओकून टाकावें–त्या काम्य कर्माचा विष समजून त्याग करावा, हेंच बरें! याला 'संन्यास' म्हणतात! (१०७)

मग तया त्यागातें जगीं। संन्यासु ऐसिया भंगी।
बोलिजे अंतरंगी। सर्व द्रष्टा ॥ १०८ ॥
हे काम्य कर्म सांडणें। ते कामनेतेचि उपडणें।
धन त्यागे दडवणे। भय जैसे ॥ १०९ ॥
आणि सोम सूर्य ग्रहणें। येउनि करिती पार्वणे।
कां मातापितर मरणें। अंकित जे दिवस ॥ ११० ॥
अथवा अतिथी हन पावे। हे ऐसेसे पडे जे करावे।
तैसें कर्म जाणावे। नैमित्तिक गा ॥ १११ ॥
वारिषिया क्षोभे गगन। वसंते दुणावे वन।
देहे श्रृंगारी यौवन। दशा जैसी ॥ ११२ ॥
का सोमकांतु सोमे पाल्हाळे। सूर्ये फांकति कमळे।
येथें असें तेचि पघळे। आन न ये ॥ ११३ ॥
तैसे नित्य जे कां कर्म। तेचि निमित्ताचे लाहे नियम।
येथें उंचावे तेणें नाम। नैमित्तिक होय ॥ ११४ ॥
आणि सायंप्रातर्माध्यान्हीं। जे करणें तेहीं प्रतिदिनी।
परी दृष्टी जैसी लोचनी। अधिक नव्हें ॥ ११५ ॥
का नापादिता गति। चरणीं जैसी अधी।
नातरी ते दीप्ती। दीप बिंबी ॥ ११६ ॥
वासु नेदिता जैसे। चंदनी सौगंध असे।
अधिकाराचें तैसें। रूपचि ते ॥ ११७ ॥
नित्य कर्म ऐसें जनि। पार्थ बोलिजे ते हे मानि।
एवं नित्य नैमित्तिके दोन्हि। दाविली तुज ॥ ११८ ॥
हेचि नित्य नैमित्तिक। अनुष्ठेय एक अवश्यक।
म्हणोनि म्हणो पाहती येक। वांझ याते ॥ ११९ ॥
कीड आगिठा पडे। तै मळु तुटे वानी चढे।
यया कर्मा तया सांगडे। फळ जाणावे ॥ १२० ॥
परि भोजनी जैसे होय। तृप्ती लाभे भूक जाय।
तैसें नित्यनैमित्यिकी आहे। सर्वांगी फळ ॥ १२१ ॥

ऐसया भंगी–ऐसिया भागी = अशा भेदाने, अशा खुणेने. द्रष्ट्र = पाहाणारा, न्यायाधिश. दृष्टि = अवलोकन शक्ति. (१०८) उपडणे = (उत्पटणे) फोडणें, चिरणें, नाश करणें, गुंफणें, वेष्टणें, बोलणें. धन = प्रिय वस्तू, स्नेह, धनिष्ठा नक्षत्र, स्थावर जंगम मिळकत, द्रव्य. दवडणे = घालविणें. भय जैसे–

जैसे भय भय=भीती, अरिष्ट, भयंकर, संकट. (१०९) सोम सूर्य ग्रहणादिक-ही नित्यनैमित्तिक भेदातील नैमित्तिक कर्मे होत. पार्वणे=पर्वकाळीं श्राद्ध, दान, वगैरे क्रिया. करिती-करविती. अंकित [अंक (ग) तिः=वारा, अग्नि, ब्राह्मण, अग्निहोत्री; अंकती=गति. अंकिनी=सुखांचा समूह. अंक=पाणी. अंकिन्=मांडीवर वाजविण्याचें तबला इत्यादि वाद्य.]=(दिवसाचे) स्वाधीन, जागेचे, शरीर, (११०) **अतिथींचे अठरा उपचार**=पूजा, सत्कार, आसन, स्वागत, पाद्य अर्घ्य, आचमनी, स्नान, वस्त्रोपवित भूषण, गंध, पुष्प, धूपदिप, अन्नतर्पण, माल्य, अनुलेपन, नमस्कार, व विसर्जन. **ब्राह्मणाचे आठ गुण** =दया, शांति, अनसूया, शौच, अनायास, मंगल, अकार्पण्य, अस्पृह. (१११) वार्षिया=पर्जन्यकाळीं. दुणावे=दुप्पट होते. यौवन=तारुण्य. (११२) पाल्हाळे-पघळे=विस्तारतो, द्रवतो. सोमकांत=चंद्रकिरणांनी द्रवणारा चंद्रकांतमणि. दुसरे=आन-नये. असेतेचि-असतेचि. (११३) नाम=संभावन, निश्चय, स्मरण, वितर्क, क्रोध इत्यादि अर्थी. (११४) जें करणें तेंही कां-करणीय=करण्यास योग्य. सायंप्रात-र्मध्यान्ही=सकाळीं, दुपारी, संध्याकाळीं=संध्याकाळीं सकाळीं दुपारीं. (११५) अधि आधी-आथि= आहेच आहे. दीप्ती=तेज, शोभा, कांती. नापादिता=न संपादिता. (११६) वासु-वास=सुगंध, सुवास. सौगंध-सौरभ्य=सौंदर्य शोभा, सुवास, कीर्ती. अधिकाराचे=योग्यतेचे, पायरीचे, सत्तेचे, हक्काचे, अंमलाचे. (११७) ते मानी-ते हे मानी. (११८) अनुष्ठेय=केलेच पाहिजे असें करणीय, प्रवृत्तीचे ते. वंझ=निर्फळ. (११९) कीड आगिठा पडे=कीड अग्नीत जळते. वानी=कस. सांगडे =बरोबरीनें, प्रमाणें करून. (२०) सर्वांगी=अंगोअंगी, प्रत्येक अवयवामध्यें, सगळा उपाय लाभाचा झाला, परिणामास आला. (१२१)

मग त्या त्यागास जगानें **'संन्यास'** अशा तेथीलच्या त्या ठेवणीनें-वागविणें का उभें होण्यामध्यें जी कांहीं पद्धत स्वीकारिली असेल तेथें (अशा त्याच मुळीं) त्या वेळच्या रिवाजास संन्यास म्हणावें. तो कसा तर आतां सर्व कांहीं पाहाणारा असा न्यायाधीशच एक 'सर्वद्रष्टा' म्हटला-अंत म्हणजे जवळच्या सर्व रंगाचा तोच होऊन आहे, मनाचें जें अंग का छिद्र तेंच त्यानें जाणलें व हृदयींच्या सर्व रंगामध्यें-क्रीडेमध्यें तोच एकटा आहे असा पाहाणारा व प्रेक्षकगणहि तोच एकटा कीं, त्या त्या भागानें कां अंगानें म्हणजे खुणेनें, खुणेच्या भेदानें तो त्यागच मुळीं अंतरंगी असा संन्यासच म्हटला. (१०८)

अहो हें सुंदर कर्म सांडणें का सोडणें तेथें तर इच्छा, मदन, भोग्यवस्तु-लंपट, तल्लीनता, या कामासक्तीची इच्छाच मुळीं दूर व्हावी, दूर करावी, लागते नां! जसें कां धन त्यागानें भयचमुळीं लांबचें केलें, अंतराचें केलें, दूर केलें, दवडिलें, घालविलें, स्तब्ध केलें जसें: (१०९)

चंद्रसूर्य ग्रहणें जीं नित्यनैमित्तिक भेदांतील **नैमित्तिक कर्मे हीं** तर येऊन पर्वकाळीं श्राद्ध, दान, वगैरे क्रिया करतात, करवितात, अथवा जें कांहीं दिवस मातृपितृ तिथीनी अंकित (त्या दिवसाच्या जवळच्या बाजूचे स्वाधीन शरीर जसें) केलेले तेथें ते तें दान श्राद्ध करावें लागणारें. (११०)

अतिथि म्हणजे पाहुणा घरी आला, पावला, पोहोंचला, तर अतिथि योग्य पाहुणचार (आतिथेयी) करणारा तेथें आतिथ्य दक्ष व्हावें लागतें वर सांगितलेलें तें नैमित्तिकतेचें जें कांहीं करावें लागतें तसें कर्म हें नैमित्तिक म्हणजे कारणपरत्वेचें आहे असें जाणावें. (१११)

पर्जन्यकाळीं-पावसाळ्यामध्यें गगन (आकाश-शून्य, पोकळी,) हें क्षोभाचें होतें. त्या गगनाच्याठायीं व्यग्रता, बाधा, चांचल्य, उद्वेग, गलबल, ही होऊं लागते. षट्ऋतुपैकीं पहिला जो वसंतऋतु तो आला म्हणजे वन-अरण्य-उदक दुपटीचें होतें-,द्विगुण, द्विगुणित गुणवान् तो मूळधर्म होतो-, दुपटीचें होऊन बांधलेलें होतें. देहास अलंकार घातले-देह श्रृंगारला असतां जशी यौवन दशाच कीं मुळीं खुलूं लागली-बांधली गेली. (११२)

[(अष्टवसूंपैकी तिसरा) सोम म्हणजे] चंद्र किरणांनीं चंद्रकांत द्रवतो; सूर्य उगवल्यावर कमळें विकासित होऊं लागतात: येथें आतां असेंच म्हणावें लागतें कीं जें कांहीं येथें आहेच आहे तेवढेंच मुळीं विस्तरतें–द्रवतें–पघळतें दुसरें तिसरें कांहींहीं तेथें येतच मुळीं नाहीं तेथें दुसरें कांहींच मुळीं येत नाहीं. (११३)

तसें **नित्य** जें कायमचें सततचें, नेहमींचें, अवश्यक स्वभावसिद्ध, जेथें सतत तत्पर राहाणें होतें असें जें कांहीं कर्म तेच मुळीं निमित्ताची कारणपरत्वानें व्यवस्था (निश्चय, निर्बंध, आचार, मर्यादा, कायदा, अट, संयमन, धर्मानुष्ठान) लाभतें व येथेंच मुळीं तें खरोखरीनें, खरोखरीच्या नांवानें उंचावतें–महत्वाचें आहे असें होतें. उच्च श्रेष्ठ असें उंचीचें होतें. स्पष्ट होतें, स्पष्टतेस येतें व **नैमित्तिक म्हणजे प्रसंगोपात्त-तेचें कारण–परत्वेचें असें होतें.** (११४)

संध्याकाळीं, सकाळी, का माध्यान्हकाळी–जें कांहीं रोजच्या रोज करणेंच करावें लागतें जरी, तरीपण तेथें तें सहजतेनेंच होणारे असल्यानें तेथें लोचनाच्या–डोळ्याच्या ठिकाणची ती दृष्टि अवलोकनशक्ति, नेत्र, बुद्धि, मत इत्यादि ही कांहीं एकाद्या अधिकतेची अशीं मुळींच होत नसते–नसते. (११५)

गति न संपादिता चरणामध्यें जी कांहीं गति असतेच असते (जशी कां) दीप–बिंबाच्या ठायीं दीप्ती–शोभा, कांती, तेज–आहेच आहे तसें— (११६)

सुवास नच देता चंदनाच्या ठायीं जसें सौगंधत्व असतेंच असतें अधिकाराचे तसें रूपच कीं अहो! योग्यता, पायरी सत्ता, हक्क, अम्मलाचें रूपच एक चंदनाचा अंगचा सुवास तो सुवास न परत्वे सौंदर्यानें शोभेनें, सुवासानें, कीर्तीनेंच कीं सौंदर्यास आणून, शोभेचे करून, सुवासानें परिमळाचें करून, पाहिले होते— (११७)

नित्य–कायमचें असें जें कांहीं ह्या जनामध्यें जगामध्यें, लोकामध्यें बोलिले जाते, तें हेंच जाण–मान. याप्रमाणें तुजला नित्य तें कोणतें व नैमित्तिक–कारणपरत्वें–तें कसें व कोणतें अशीं ही दोन्हीं तुजला दाखविली–रूप करून दाविलीं. (११८)

हेंच नित्य–कायमचें का सततेचें (असें अथवा जें कांहीं तें) तसेंच कारणपरत्वे होणारे नैमित्तिक हे अवश्यक असें संपादणीचें, अनुसरण्याचें करणें करावेंच लागतें आणि म्हणूनच कोणी ह्यांस **वांझ म्हणजे निर्फळ** असें म्हणतात. (११९)

पण कीड अग्नींत जळते तेव्हां हिणकट मळीन तें तुटतें व कस वाढतो. वानी योग्यता चढते; म्हणून ह्या क्रिया त्या कर्मास मैत्रीनें संयोगानें, संबंध ठेवून जोडीचे बरोबरीनें फळ देणाऱ्या जाणाव्यात. (१२०)

भोजन–पोषण, अन्न उपभोग, खाणें–जेवणामध्यें, जसें होतें; भूक नाहींशी होते, संपते व तृप्ति भेटते. त्याप्रमाणें **नित्य म्हणजे कायमचे** का **नैमित्तिक म्हणजे कारणपरत्वें होणारें** जें कर्म त्याचें-ठायीं सर्वांगी–कर्माच्या आपल्या सर्वच्या सर्व अंगांनीं फळावेंच, फळ द्यावेंच द्यावें असें आंगोआंगी फळ भेटतें: प्रत्येक अवयवामध्यें सगळा उपाय लाभाचा होतो. परिणामास येतो. (१२१)

**जें प्रत्यवाय तंव गळे। स्वाधिकारु बहुवे उजळे।**
**तेथें हन फळीं मिळे। सद्गतीसि ॥ १२२ ॥**
**येवढेवरि ढिसाळ। नित्य नैमित्तिकीं आहे फळ।**
**परि ते त्यजिजे मूळ—। नक्षत्रीं जैसे ॥ १२३ ॥**
**लता पिके आघवी। तंव चूत (चूतक) बांधे पालवी।**
**मग हातु न लाविता माधवी। सोडुनि घाली ॥ १२४ ॥**

तैसी नोलांडिता रेखा। चित्त दीजे नित्य नैमित्तिका।
पाठी फळ कां अशेखा। वाताची वाणी (वाताचे वानी) ॥ १२५ ॥
यया कर्मफळ त्यागाते। त्यागू (म्हणि) म्हणति पै जाणते।
एवं संन्यास त्याग तूंते। परिसविले ॥ १२६ ॥
हा संन्यासु जै संभवे। तै काम्य बाधु न पावे।
निषिद्ध तंव स्वभावे। निषेधे गेले ॥ १२७ ॥
आणि नित्यादिक (जे) असे। ते येणें फळत्यागे नाशे।
शिर लोटलिया जैसे। येरे अंग ॥ १२८ ॥
मग जैसे सस्य फळ पाकांत। तैसे निमालया कर्मजात।
आत्मज्ञान गिवसित। आपैसे ये ॥ १२९ ॥
ऐसिया निरूती हे दोन्ही। त्याग संन्यास अनुष्ठानीं।
पडिले गा आत्मज्ञानी। बांधती पाटु ॥ १३० ॥
नातरी हे निगुती चुके। मग त्यागु कीजे हात तुके।
तैं कांहीं न त्यजे अधिके। गोवी पडे ॥ १३१ ॥
जे वोखद व्याधी अनोळख। घेतले परते विख।
कां जे अन्न न मिळता भूक। मारीना काइं ॥ १३२ ॥
म्हणौनि त्याज्य जे नोहे। तेथ त्यागाते न सुआवे।
त्याज्यालागीं न व्हावे। लोभा परां ॥ १३३ ॥
चुकलिया त्यागाचे बेंझे। केला सर्व त्यागुही होय वोझे।
न देखती सर्वत्र दुजे (निषिद्धेसी झुंजे)। विरागी ते (वीतरागा) ॥ १३४ ॥

प्रत्यवाय=आज्ञाभंगाचे विरूद्ध आचरण, दोष, पापीपण. हनफळी–हातोफळिया = तत्काळ, हातोहात. हन्=पुजारी, परलोकी दुःख भोगतो, स्वहित न जाणणारा.) सद्गतीस=मोक्षास. (१२२) येवढेवरि ढिसाळ=येथवर मोठे. (१२३) लता–कस्तुरिका (लतिका–लत्तिका)=वेल, शाखा. [लतांतं= फूल. लताबाण=मदन. लतालकः=हत्ती. लतातरू=नारिंग, ताड. लतापनसः=टरबूज, कलिंगड. लतापर्णी=मूसली, मेथी. लतामणि=पोंवळे. लतामृग=वानर. लतापावकं=अंकुर. लतावलय = लतामंडप लतावेष्टनं=आलिंगन. लतिका=मुक्ताहार, लहान लता. लत्तिका=गणपत, सरग (चोपई) कस्तुरिका मल्लिका=कस्तुरीमृगाची नाभी. कस्तुरीमृग = काळवीट. मल्लिका=पाय व चोच पिंगट असलेला हंस; माघ मास; कोष्टयाचा धोटा, पांढरी जाई, मोगरी, मत्स्यभेद, मृत्पात्रभेट. मल्लिकाक्ष– मल्लिकाख्य=शुभ्र नेत्राचा घोडा. मल्लिका पुष्प=पांढरा कुडा (व.).] चूत–चूतक=आंबा आम्रवृक्ष; २५ वें नक्षत्र पूर्वा भाद्रपदा–भाद्रमातुर–सद्गुणी व पतिव्रता स्त्रीचा पुत्र. च्यू=गळणें, पडणें. (आम्रेडितं =दोन तीनदां म्हणणें) माधवी=वसंतऋतुंत. (१२४) रेखा–कर्म रेखा. फळा कीजे अशेखा–फळ का अशेखा. वाताची वाणी-वांतीच्यिे वानी=ओकारी सारखे. [पंचतत्वें ही पंचदेव म्हटली. पण वात हा त्रिदोषापैकीं एक दोष. येथें आतां वानी म्हणजे कस लाविला तर दोषाची ती योग्यता कशी बोलावी? पण वायूदेवच जसा येथें कसास लाविला गेल्यानें तेथें तो तर पोटच मुळीं तपासतो व आतां दिव्याची वात जशीं कां आत आहे का तपासिली गेल्यानें तेथें वांती 'करून' कीं वायूदेव आपला कस पाहविती.] (१२५) म्हणति–म्हणि. (१२६) निषिद्ध गेले–निषेध गेले=निषिद्ध कर्मानें. (निषिद्धः=रिंगणी. निषिद्ध=वर्ज्य केलेले, दूषित.) (१२७) लोटलिया=ढकलिले, तोडले असतां. नाशे–नासे (१२८) सस्य=शस्त्र खड्ग, गुणोत्कर्ष, मणि, फळ, धान्य. फलपाक=करवंद, फलपक्वता, फल परीणाम संपादणी. वंदथ=स्तुती

करणारा, स्तुत्य, लाभ पाक. निमालिया = नाहींसे झाले असतां. गिवसित = हुडकित, शोधित. (१२९) निरुती–निगुती = युक्तीनें. पाट = योग्यता. (१३०) हात तुके–हत तुके = अटकळीनें. गोविचि = गुंतव्याचा-तच, गुंतागुंतीत. (१३१) वोखद परते = औषध होतें. मिळता–मानिता. न मारी काय–मारीना काइं. (१३२) त्यागाते न सुआवे–सुअवे (घालावे) त्या ज्यालागीं नोहावे (न व्हावे) लोभपर = अत्याज्याचा त्याग व त्याज्याचा लोभ हीं नसावींत. (१३३) वेंझे = सूक्ष्म मार्ग, छिद्र, युक्ति, वटकन्, टेकण. वीतराग = वैराग्य संपन्न न देखती सर्वत्र दुजे–निषिध्दे त्या सर्वत्र जुंझे. (१३४)

असें जोडीचें तें फळ तेथें आशाभंग, अपकार, नुकसान, अडथळा, विघ्न, अव्यवस्था, गोंधळ, विरुद्धाचरण, त्यायोगें करून दोष अथवा पापीपण हें गळतें, मागें पडतें, सरतें, बाजूस पडतें, मागे टाकिलें होतें, व स्वतःच्या आपलेपणाचा, स्वभावाचा, स्वजातीय, स्वतःचा, अधिकार, योग्यता–पायरी, सत्ता, हक्क हाचमुळीं कीं अनेक तऱ्हानी अनेक प्रकारानीं उजळला होतो, प्रकाशतो (स्वच्छ डोळस असा सुंदर होतो.) तेथें तर अहो तत्काळ अगदीं हातोहातच कीं, क्लेश जे टाळावेच ते टाळले होऊन–अयोग्य ते जेरीस आणून, प्रतिबंधाचे करून त्या मोक्षासच तें फळ पोहोचवितें, तें फळ सद्‌गतीसच मिळतें, पोहोचतें, मोक्ष प्राप्त होतो. (१२२)

केवढें मोठें तरी ह्या नित्य–कायमच्याचें, सततच्या कर्माचें तसेंच कारणपरत्वें नैमित्तिक होणारें जें कर्म त्याचें फळ आहे जरी तरीपण तें त्यजावेंच–जसें कां जें मूळ नक्षत्रीचें तें केव्हांही मुळासचमुळीं मनपणाच्या मूलतत्त्वासच तें बिघडविणारें असल्यानें अपाय करणारें म्हटलेलें असल्यामुळें कीं अहो तें मूळ नक्षत्रीं जन्मलेलें तें जसें–सांडावें असेंच म्हणणें होत आहे. (१२३)

(कामदुहा) लता–कस्तूरिका, आघवी सर्व पिकते, पिकली होते आनंदाच्या भरास येते, प्रौढपण मिरविते, आंत मुरून जाऊन असते. तेथें अहो जो आंबा–आम्रवृक्ष–जो कोकिल आवास का कोकिलानंद, म्हटलेला तो तर आपली बांधणीं पालवीस येण्याची ती (जेथें पाल + वी = जेथें संरक्षण करणें हेंच वीऊन असते.) बांधून घेतो. तरुणतरतेस येतो. पालवी धारण करतो. रचतो. तेथेंच मन लावतो. मग त्या बांधणीस हातहीपण न लाविता जी कांहीं ती बांधणी ती जशीच्या तशीच अवघी सोडून मोकळी करून; तो माधवी म्हणजे वसंतऋतूंमध्यें घालतो. ती आपली बांधणी सर्वच्या सर्व वसंतऋतु आला म्हणजे त्याचेठायीं ती ओततो. (१२४)

त्याप्रमाणें कर्मरेखा न उल्लंघिता नित्यनैमित्तिकास चित्त द्यावें तेथें मग सहजच अगदीं पाठोपाठच सर्वच्या सर्व अशेष फळ म्हणावें तो तें दोषाचा कस का बोलणारी योग्यता वाताची वाणी–ओकारीसारखें–म्हटलें होतें. तेथें जें कांहीं नित्य नैमित्तिक तेंच त्यानें ओकून टाकलें, त्यागिलें, टाकून दिलें, सोडलें, वर्ज्य केलें, तेथें पर्वा नच केली गेली, तें त्यागाचें केलें असें होय. (१२५)

अशा ह्या कर्मत्यागास जाणते जे ते त्याग म्हणतात. याप्रमाणें तुजला संन्यास अथवा त्याग जो तो त्या त्या ठाणावर, देहबांधणीं, मांडणीवर होणारा ऐकविला. (१२६)

हा संन्यास (सर्व कर्मफलत्याग) जेव्हां संभवतो, योग्यतेचा होतो, सख्ख्याचा होतो तेव्हां काम्य म्हणजे इच्छित प्राप्तीसाठीं केलेलें कर्म बाधा करणारें होत नाहीं, निषिद्ध म्हणजे वर्ज्य केलेलें दूषित म्हटलेलें तें स्वभावेंकरूनच निषेधाचें नकार–बंदी निवारणाचें–मनाईचें–अपवादाचें केलें गेल्यानें निषेधानें निवारणानें नकारानें गेलें होतें. (१२७)

(आवश्यक, स्वभावसिद्ध, नेहमीचें, सततचें, कायमचें असें जें नित्य) जेथें सतत तत्पर रहाणें होतें. तें जें कांहीं, नित्य आदिकरून जें असतें तें अशा ह्या फळ त्यागानें नाहीसें होतें, नासतें, जसें शिर लोटलें

ढकललें, हालविलें, घुसळलें तेथें अहो सर्वेच्या सर्व अंगहीपण (दुसरें जें) इतर जें तेंही ढकललें, लोटले होतेंच नां ! (अंगलोटावरच शिर जें त्याची ठेवण असणारी केव्हांही) (१२८)

धान्य पिकल्यावर जशीं पिकाची वाढ खुंटते. धान्य पिकलें तें फळरूपी स्वयंपाकास येतें, तसें कर्मजात नाहींसें झाल्याबरोबर '**आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान**' हें आपोआपच शोधीत हुडकीत येते. (१२९)

अशा युक्तीनें ह्या दोन्हीं त्याग व संन्यासाच्या अनुष्ठानामध्यें–करण्यामध्यें, ब्रह्मज्ञानी हे अधिकार योग्य होणें करतात, पडलेलें तें योग्यता बांधून घेऊन असतात तेथेंच मन लावून असतात. (१३०)

अथवा ही युक्ती जर का चुकत आहे तर त्यागच एक अटकळीच्या हातानें केला होतो. (तेव्हां कांहींही अधिक असें टाकिलें होत नाहीं. पण अधिकतेनें गुंताड्यात पडतो–गुंतागुंती होते. (१३१)

व्याधी कसली आहे ? दुखणें कोणतें आहे ? हें न जाणतां जर औषध घेतलें तर तें विष बनतें, विषासारखें होतें. जसें कां अन्न मिळालें नाहीं तर भूकेनें तडफडून मरणें होत नाहीं कां. (१३२)

म्हणून जें अत्याज्य आहे त्याचा त्याग करूं नये, व त्याज्य जें आहे त्याचा लोभ धरू नये. (अत्याज्याचा त्याग व त्याज्याचा लोभ हीं नसावींत.) (१३३)

त्यागाचें वर्म, छिद्र, सूक्ष्म मार्ग, चुकले तर सर्व त्याग केलेला जो त्याचें ओझेंच होतें. वैराग्यसंपन्न जे ते तर सर्वत्र दुजें असें पाहात–मानीत नाहींत. एक त्यागच पाहातात सर्वत्याग ओझें झाल्यानें वीतरागासहीपण निषिद्धतेमुळें झुंजणेंच पडतें. (१३४)

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥**

मनीषिणः = पंडित, चतुर. (मनीषा = बुद्धि.) अपरे = कोणी दुसरे, पूर्वीचें, निराळे.

अन्वय—कर्म । दोषवत् । त्याज्यं । एके मनीषिणः । प्राहुः । यज्ञ दान तपः कर्म । न त्याज्यं । इति । अपरे च (प्राहुः) ॥ ३ ॥

अर्थ—कर्म हे दोषाप्रमाणेंच त्याज्य आहे असें कोणी मनस्वित मनीषीनी म्हटलें आहे. दुसरे कोणी यज्ञ, दान, तप, कर्म हें त्यागाचें करूं नये असें म्हणतात. (श्लोक ३ रा ओव्या १३५–१४३)

**येका फलभिलाख न टके । ते कर्माते म्हणती बद्धके ।**
**जैसे आपण नग्न भांडके । जगाते म्हणे ॥ १३५ ॥**
**कां जिव्हा लंपट रोगिया । अन्ने दूषी धनंजया ।**
**अंगा न रूसे कुष्टिया । मासिया कोपे ॥ १३६ ॥**
**तैसे फळ कामुक काम दुबळ । म्हणती कर्मचि किडाळ ।**
**मग निर्णयो देती केवळ । त्यजावे ऐसा ॥ १३७ ॥**
**येक म्हणती यागादिक । करावेचि अवश्यक ।**
**हे (जे या) वांचुनि शोधक । आन नाहीं ॥ १३८ ॥**
**मन शुद्धिच्या मार्गी । जै विजई होवावे वेगी ।**
**तै कर्म बळा लागी । आळसु न कीजे ॥ १३९ ॥**
**भांगार आथी शोधावे । तरी आगी जेवी नुबगावे ।**
**कां आरिसयालागी सांचावे । अधिके रज ॥ १४० ॥**

**ना लुगडी चोख होआवी। ऐसे आथी जरी जीवी।**
**तरी संवंदणी न मवावी। मळीन जैसी ॥ १४१ ॥**
**तैसी कर्मे क्लेशाकारे। म्हणौनि न्यावी अव्हेरे।**
**कां अन्नलाभे अवारे। रांधितिये उणे ॥ १४२ ॥**
**इही इही गा शब्दी। ये कर्मी बांधविती बुद्धि।**
**ऐसा त्यागु विसंवादी। पडोनि ठेला ॥ १४३ ॥**

अभिलाष=इच्छा. टके–ठाके. बद्धके–बंधके (बद्धके=कर्मानी बांधणारी बंधके=गहाण ठेव, बांधणारी दोरी.) भांडके=(भांड=थट्टा, अलंकार, वाद्य, भांडवल, चे भांडे) भांडखोर, (१३५) कुष्टिया–कोडिया. (१३६) फळ कामुक काम दुर्बळ–फळ काम दुर्बळ. (कामुक=विषयासक्त, अशोक, चक्रवाक्. दु=जाणे, पीडा सोसणे,) निर्णयो–निर्णो=निश्चय, निवाडा. (१३७) हे वांचुनि–जे हे वाचौनि. नाहीं–नसे. शोधक=शुद्ध करणारा हे–जे या: (१३८) विजई होवावे–विजयी व्हावें. बळा–संबळा=शस्त्र संबळ. (शबल=शिदोरी. बळ=सामर्थ्य.) अळसु–आळसु. (१३९) अथी–आथी. नुमगावे–नुबगावें. आरिसया–दर्पणा. अधिके–अधिक. रज=साफ करण्याची पूड (१४०) ना लुगडी–नाना वस्त्रें होवावी–होआवी. अथी–आथी. संवंदणी=धोब्याचें कपडे धुण्याचें भांडें. मवावी–मानावी. (१४१) क्लेशाकारे–क्लेशकारे. अव्हेरे–आव्हेरे=हेळसांडीनें. अवारे अरूवारे=मृदु, सुंदर. राधतिये उणे=स्वयंपाकीणीस उणें बोलूं नये, विरुद्ध वादात (१४२) ये–एक. विसंवादी=खोटे बोलण्यांत, विरुद्ध वादांत असंबद्धतेंत. (१४३)

एकास फल इच्छेचा त्याग साधेना, फलइच्छा ही कांहीं गडी कां स्थिर करतां आली नाहीं. ते तर कर्मासच मुळीं दोष देतात. अहो! कर्मानींच बांधलेलें होणें होतें असें म्हणतात. कर्म कर्मेच मुळीं अहो! बांधणारी दोरीच एक गहाणीची ठेवच जशीं असें म्हणतोः अहो! आपणच जो मुळीं वस्त्रहीन, नग्न आहे तो जगासच भांडखोर म्हणतोः तो तर जगासच कीं थट्टा, अलंकार, वाद्य, भांडवलाचे भांडे, भांडक म्हणतो. (१३५)

रसना–जिव्हेचा आसक्त, विषयी रोगी, जिव्हा लंपटपणाचा, असा कमरपट्टाच ज्यानें घातला आहे असा रोगी–हे पार्था! धनंजया! अन्नाना, (अन्नें म्हणजे भक्षणीय पदार्थ शिजविलेला भात इत्यादींना) बळेंच टपका, दोष, लावतो. अहो! कुष्ट रोगी आपल्या अंगावर माशी बसलीं तर मात्र तो रागावतो त्यास आपल्या अंगावर माशी बसलेली खपत नाहीं पण आपल्या कुष्ट अंगाबाबत कांहीं दुःख मानून रागें (रागानें) भरत नाहीं; रागावत नाहीं; तो विरागाचा होत नाहीं, देह हा तपश्चर्येनें कष्टवावा असें त्याच्या मनांत सुद्धा येत नाहीं. (१३६)

त्याप्रमाणें फलेच्छु=फल काम दुर्बल, फळाच्या लोभाला बळी पडणे जे तेथें काम, इच्छा, (भोग्यवस्तु, मदन बाधेची पीडा सोसण्यास चुकीनें दुर्बळ)—दुर्बळ असें जें, तें तर कर्मेच की (किडाळच म्हणजे) हिणकट होय असें म्हणतातः व मग कर्म तें निखालस केवलपणें अगदीं सोडावेंच असा आपला (निश्चय, निर्णय) निवाडा देतात. (१३७)

दुसरे कोणी असें म्हणतात की याग यज्ञ आदिकरून जे प्रकार आहेत ते तर अवश्यपणें करावेतच; अहो, यज्ञ यजन यागादिकर्माशिवाय तितकें तसें चित्त शुद्धि करणारें (का शोधक) दुसरें कांहींही नाहींच कीं. (१३८)

अहो, मन शुद्धिच्या मार्गावर वेगानें विजयी व्हावें तर कर्माचें दृढ आचरण करण्यांत कर्मसबळालागीं आळस करूं नये. (१३९)

भांगार म्हणजे सुवर्ण अग्निमध्यें तापवून कसास लावावें, तें कसास उतरविण्यास त्रासूं नये, कंटाळूं नये : आरशांत प्रतिबिंब स्पष्ट दिसावें असें वाटत असेल तर तो स्वच्छ करण्याचें साधन–पूड संग्रहीं ठेवावीच –ठेवलीच पाहिजे.

उत्तम सुवर्ण पाहिजे असेल तर तें अग्नित तापवून कसास लावावें लागतें, तसें आपलें मुख स्पष्ट दिसावें म्हणून आरसा स्वच्छ करावा लागतो तेथें (ज्यास्तीत ज्यास्त रजोगुण) धुराळ्यामुळें तें दिसणें स्पष्टपणें दाखवीत नाहीं म्हणून धुराळा हा पाहिजेच तरच मुळीं आरसा स्वच्छ करण्याचें होतें नां ! (१४०)

लुगडी (कपडे) अगदीं उत्तम प्रकारची स्वच्छ निघावीत असें जर वाटत असेल तर संवंदणी म्हणजे धोब्याचे कपडे धुण्याचें धातूचें किंवा दगडी भांडें खराब–,मलीन–होईल असें म्हणून चालणार नाहीं. (१४१)

त्याप्रमाणें कर्में क्लेशकारक आहेत म्हणून तीं आचरण्यांत–करण्यांत–हेळसांड करूं नये, जेवायला चांगलें अन्न पाहिजे असेल तर स्वयंपाकीणीस वाईट शब्दानें बोलून चालणार नाहीं. (तेथें चांगलेंच बोललें पाहिजे. स्वयंपाकिणीची स्तुती केली पाहिजे तरच ती उत्तम स्वयंपाक करून तुम्हाला लावण्यवतीपणानें आनंदविल. तीच गोष्ट कर्माची ! 'कर्म' केलें असतां ह्याचा परिणाम वाईट होतो म्हणून त्या 'कर्माचा' अव्हेर करून ती आचरण्यांची हेळसांड करून मनुष्याला सुख मिळणार नाहीं. जसें जेवण उत्तम पाहिजे असेल तर स्वयंपाकिणीस टोंचून बोलून जमणार नाहीं तसें.) (१४२)

अशा या शब्दांनीं–(भाषणांतील वाक्यांनीं–शब्दिततेनें 'कर्म' याचा अर्थ उघड केल्यानें) कोणी एक आपली बुद्धि, (ज्ञान विचार, अंतःकरणशक्ति पूर्व कर्म दैव किंवा गुणधर्म.) कर्माच्याठायीं बांधवून घेतात. या योगेंकरून कर्म, नित्य कर्म, नैमित्तिक कर्म, इत्यादींचें स्पष्टिकरण करण्यामध्यें **'त्याग'** म्हणजे काय ? हें मतभेद, संशय, इत्यादि विरुद्ध वादामुळें सांगावयाचें (बाजूस राहिले) राहून गेलें. (१४३)

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥**

भरत सत्–तम = भरत कुलांतील अति उत्तम अशा. त्रिविधः = तीन प्रकारचा, तीन पद्धतीचा, तीन उत्कर्षाचा, तीन तऱ्हेच्या कर्माचा, वर्तन क्रमाचा. संप्रकीर्तितः (कीर्तितः + संप्र) = प्रसिद्ध, वर्णिलेला आहे, (ऐकिवात आहे, माहीती आहे.) तत्र = तेथें, तेव्हां त्याप्रसंगी, त्याबाबतींत अथवा ठिकठिकाणीं. पुरुष-व्याघ्र = पराक्रमी, श्रेष्ठ पुरुष. पुरुषः त्यागः = विवेक, दान, तप, विरक्तता, विसर्जन, पृथक्करण, वर्ज करणें कां सोडणें जें. निश्चय = निर्णय, खात्री, संकल्प.

अन्वय :—भरतसत्तम । तत्र त्यागे मे निश्चयं श्रृणु । पुरुष व्याघ्र । त्यागः । त्रिविधः संप्रकीर्तितः । ॥ ४ ॥

अर्थ :—हे भरतकुलातील अत्युत्तम अशा पार्था ! पुरुष श्रेष्ठा ! तेथें त्याप्रसंगी (अथवा ठिकाणीं त्याबाबत) किंवा त्यासंबंधी माझ्यापासून त्याग म्हणजे काय याचा निर्णय ऐक. **'त्याग'** हा तीन प्रकारांनीं वर्णिलेला आहे, (लौकिकास आणलेला आहे, प्रसिद्ध आहे, नांवाजलेला आहे, प्रख्यातीचा आहे.)

(श्लोक ४ था ओव्या १४४–१४८)

**परि आतां विसंवादु तो फिटे । हा त्यागाचा निश्चयो भेटे ।**
**तैसे बोलो गोमटे । अवधान दे ॥ १४४ ॥**
**तरी त्यागु येथें पांडवा । त्रिविधु पै जाणावा ।**
**तयाहि त्रिविधा बरवा । विभागु सांगु ॥ १४५ ॥**

**त्यागिते चिन्ही प्रकार । किजती गोचर ।**
**तरी इत्यर्थाचे सार । येतुले येथे ॥ १४६ ॥**
**मज सर्वज्ञाचिये बुद्धि । जे अलोट माने त्रिशुद्धि ।**
**ते निश्चित तव आधि । अवधारि पां ॥ १४७ ॥**
**तरी आपुलिये सोडवणे । जे मुमुक्षु जगो म्हणे ।**
**तया सर्वस्वे करणें । हेचि येक ॥ १४८ ॥**

परि आता–तरि. दे–देई. (१४४) बरवा–हि बरवा : सांगु–करू. (१४५) त्यागिते चिन्ही–त्यागाचे तिन्ही. गोचर–जरी गोचर=प्रत्यक्ष, स्पष्ट : तन्ही–तन्ही तूं. येतुले येथे–इतुले जाण. इत्यर्थाचे–तात्पर्याचे. (१४६) अलोट–आलोट=खरे, निश्चित तंव–निश्चय तत्त्व. आधि–अधि. (१४७) जे–जो. जगो–जागो. (१४८)

तरी आतां, बाकीचें बोलणें राहूं देत, ज्यामुळें त्यागासंबंधीचें बोलणें बोलावयाचें राहून गेलें तेंच सांगतों. त्यागासंबंधीचा विसंवाद–(विषय सोडून झालेलें बोलणें), अथवा विरुद्ध वाद तो नाहींसा होईल व 'त्याग' म्हणजे (अमूक एक गोष्ट) हें निश्चयानें तुला समजेल असें स्पष्ट–गोमटें–बोलणें करूं. त्यागासंबंधीच्या संशयाचें निराकरण करू–अवधान–लक्ष दे. (१४४)

हे पांडवा! ज्याला 'त्याग' म्हणतात तो (किंवा त्याग त्याग म्हणून जो आहे तो) तीन प्रकारांनी जाणण्यास येतो. तेथीलच्या त्या तीन प्रकारांचेंहीपण आणखी बरवें–गुण श्रेष्ठ असें (वाटा, अंश, वाटणी,) विभाग आहेत तेही सांगण्याचें करतों–(करू). (१४५)

(त्यागिजे वर्ज्य, विरक्तता, सोडणें, टाकणें, दान, विवेक, योजण्याचे लक्षणामध्यें जरी) त्यागाचे तीन प्रकार आटोक्यांतले (इंद्रियज्ञान गोचर) केले जातात ते दृश्य का सुलभ केले जातात. प्रत्यक्षास येतात.) तरी तेथीलच्या इत्यर्थाचे, (तात्पर्याचें, सारांशाचें) सार, तें इतकेंच आहे कि,— (१४६)

मज सर्वज्ञ परमात्म्याच्या (सर्व जाणणाऱ्या परमेश्वराच्याहि अंतःकरणशक्तीनें ज्ञान विचारानें) बुद्धीनेंहीपण जें (कांहीं त्रिशुद्धि अपारपणच केव्हांहि) खरेंच असे मानणें होतें तें निश्चयतत्वच अगोदर अवधारण्याचें कर. (१४७)

अहो! ज्यानें, आपल्या सोडवणीसाठीं, (ऋण मुक्त–मुक्त आत्मा) मुक्तीची इच्छा करणारानें, जगावें–जागावें असें म्हणणें त्यानें तर सर्वस्वपणें (सर्वस्वासहित सर्वथैव स्वसत्तेचें आगळें धन–तत्व, अंश)–हेंच एक करावें, जें का.

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥**

न त्याज्यम्=टाकण्यास योग्य नव्हत. कार्यम् एव=नियमानें, निश्चयानें, करण्यास योग्य. तत्=म्हणून, यावरून. [एतत कर्म (एत=चित्रविचित्र, हरिण.) एतद्=हे; चित्रविचित्र रंग. **तत् कर्म**=म्हणून कर्म. **त्वंअसि**=तूं आहेस. **ततस्त्य**–तत्+अस्त्य=म्हणून आहे त्यासंबंधीं, आहे तिकडचे. **तद्** (विशेषण)=तो, ती, ते, प्रसिद्ध अनुभवलेलें, जोर, सोऽहम्, ब्रह्म, म्हणून, तेथें, तर, नंतर. **तदर्थ**. तत्कर=सेवक. **तत्काल**=वर्तमान काल. **तत्क्षण**=लागलीच. **तत्क्रिय**=फुकट काम करणारा. **तज्ञ**=ज्ञानी, वेत्ता. **तद्पुरुष**=परमात्मा (व्या.) समास (वि.). **तत्फल**=चोर ओवा. **तद्बल**=बाण (वि.) तन्मात्रः **तन्मात्रं**=पृथ्वी, जल इत्यादींचें सूक्ष्म रूप. **तद्वत्**=त्याप्रमाणें. **तद्हित**=प्रत्यय (वि.) तदा (तद)=तेव्हां, म्हणून. **तदात्वं**=वर्तमान काळ. **तदानींतव**=त्या काळचा.]

पावनानि = उदकें, शुद्धें, शुद्धोदकें, परलोक, परब्रह्मसंबंधीं साधक संस्कार. मनीषिणाम् = चतुर मनुष्यांना, पंडिताना, बुद्धि चातुर्याचे जे त्यांना.

अन्वय :—तत् यज्ञ दान तपः कर्म। न त्याज्यम्। तत् (यज्ञ दान तपः कर्म) कार्यम् एव। मनीषिणाम् पावनानि। यज्ञः। दानं। तपः। एव। च ॥५॥

अर्थ :—जे यज्ञ कर्म, दान कर्म, तप कर्म, ते केव्हांहि टाकून देण्याचें नव्हे. तें यज्ञ (काम) कर्म, दान (काम) कर्म, तप (काम) कर्म, कर्तव्यच एक आहे. म्हणून तें करावेंच करावें. असें महत्वाचें आहे म्हणून कार्यम् म्हणजे (केव्हांहि ह्या देहासचमुळीं रचना का संभावना (संभाराचे करणारें म्हणून) तें करावेंच (ते करण्यांत आळस करू नये.) विद्वानांना यज्ञ पावन अग्निसारखा पवित्र करणारा, गंगेसारखे शुद्धि देणारे, पापध्वंसक एक जसे, आहे दान पावन आहे तप पावन आहे. (तेथें भावरूपी पाहुणाचमुळीं ह्या जीव गोडीस जोडीचा आधार देणारा–'पश्चात्तापेन शुद्धते' का अनेक जन्माचें प्रायश्चित हरी तसें प्रायश्चितच एक घेऊन असणें सहजपणेंच कीं) (श्लोक ५ वा ओव्या १४९–१६४)

जे यज्ञ दानतपादिके। ये कर्मे जे अवश्यके।<br>
(तिये) तये न संडावी पंथिके। पाउले जैसी ॥ १४९ ॥<br>
हरपले न देखिजे। तंव मागु न संडिजे।<br>
का न धाता लोटिजे। भाणे जेवि ॥ १५० ॥<br>
नाव थडी न पवता। न संडिजे केळी न फळता।<br>
का ठेविले न दिसतां। दीपु जैसा ॥ १५१ ॥<br>
तैसी आत्मज्ञान विखी। जव निश्चिती नाही निकी।<br>
तव न व्हावे त्यागादिकी। उदासीना ॥ १५२ ॥<br>
पै स्वाधिकारानुरूपे। तिये दान याग तपे।<br>
अनुष्ठावीचि साक्षेपे। अधिकेवर ॥ १५३ ॥<br>
जै चालणे वेगावत जाय। तो वेगु बैसावयाचि होय।<br>
तैसा कर्मातिशय आहे। नैष्कर्म्यालागी ॥ १५४ ॥<br>
अधिके जंव औषधि। सवेंचि मोडे बाधि।<br>
तंव तंव मुकिजे व्याधि। तयाचिये ॥ १५५ ॥<br>
तैसी कर्मे हातोपाति। जै कीजती गा यथा निगुति।<br>
तै रजतमे झडति। झाडा देऊनि ॥ १५६ ॥<br>
का पांतिचा वाटी पुटे। भांगारू खारू देणे घटे।<br>
तै कीड झडे करि तुटे। निर्व्याज होय ॥ १५७ ॥<br>
तैसे निष्ठा केले कर्म। झाडी करूनि रजतम।<br>
सत्वशुद्धीचे धाम। डोळां दावी ॥ १५८ ॥<br>
म्हणोनि गा धनंजया। सत्वशुद्धि गिंवसितया।<br>
तीर्थे सेवावया। आली कर्मे ॥ १५९ ॥<br>
तीर्थे बाह्य मळु क्षाळे। कर्मे अभ्यंतर उजळे।<br>
एवं तीर्थे जाण निर्मळे। सत्कर्मेचि ॥ १६० ॥<br>
तृषार्थिया पामरू देशी। झळे अमृते वोळली जैसी।<br>
का अंधालागी डोळ्यासी। सूर्य आला ॥ १६१ ॥

**बुडतया नईचि धावीनली । पडतया पृथ्वी कळवळिली ।**
**निमतया मृत्यूने दिधली । आयुष्य वृद्धि ॥ १६२ ॥**
**कर्मे कर्म बद्धता । मुमुक्षु सोडविले पांडुसुता ।**
**जैसा रसरिती मरता । राखिला विखे ॥ १६३ ॥**
**तैसी येकहृवटिया । कर्मे केली धनंजया ।**
**बद्धकेचि सोडावया । मुख्य होती ॥ १६४ ॥**

जे–जिये. ये–इये. अवश्यके–आवश्यके. तये–तिये. संडावी–सांडावी. पाथिके–पांथिके=प्रवासी. (पाथ=सूर्य, अग्नि, उदक. लघुपाथ=पायवाट. पांथ=पथिक, प्रवासी. पाथिरू=समुद्र, नेत्र, वाहाणारा, व्रण. पाथेय=कन्या रास, शिदोरी, प्रवास सामुग्री. पाथोद=मेघ.) (१४९) हरपले–हारपले. न देखिजे= देखणें, पाहाणें होईना जर म्हणून. मागु–तयाचा मागु. संडिजे–सांडिजे. न धाता=तृप्त न होता. भाणे= जेवणाचें ताट, भोजन. (१५०) न संडिजे–न सांडिजे. न दीसता–न दिसता. दिपु–दीपु. (१५१) विखी– विषी. न व्हावें–नोहावें. उदासीना–उदासीन. (१५२) पै–तरि. दान याग–यज्ञ दान. साक्षपे–साक्षेपे. (१५३) वेगु=त्वरा, घाई, प्रेम, आनंद, अतिशय=उत्कर्ष, आधिक्य. (१५४) जव–जंवजंव. सवेचि मोडे बाधि–सेवनेचि मांडी बांधी : नियम वेग. (१५५) हतोपाति–लवकर, वारंवार. यथानिगुति=निश्च-याचे खरे जसे, विधिपूर्वक. (१५६) पातिचा वाटि–पाठोवाटि=एकामागून एक. (पाति=धनी, गती, पक्षी. वाटी=बाग. वाट=जांघ, जोंधळा, वास्तुभूमि, मंडप, बाग, आवार, वडाचें झाड.) खारू=क्षार, रस, भस्म. झडेकरि–झडकरि. निर्व्याज=शुद्ध, सरळ, निष्कपट. (१५७) कर्म–कर्मे तें. (१५८) म्हणोनि गा–म्हणोनिया. गिंवशीतया–गिंवसितया. तीर्थे सेवावया–तीर्थाचिया सावाया. (सोबतीला, मदतीस, बरोबरीला, साह्याला.) (१५९) तृषार्थिया–तृषार्ता. (**तृषा**=तहान, इच्छा, लोभ. **तृषित**=ताहानेला, इच्छा करणारा.) पामरू–मरू (देशी)=मारवाड देशाला. झळे=उन्हाची तिरप, अंगे भाजणारी उष्ण वाताची झुळुक लागत असता : अमृते वोळली जैसी=उदके वृष्टि करीत आली. का–की. सुर्य–सूर्यू. (१६१) नईचि–नदीचि. धाविनली–धाविन्नली. निमतिया=मरणारास (१६२) कर्मे–तैसे कर्मे. विख– विष. कर्मेचि कर्मबद्धता=कर्मबंधापासून कर्मच सोडविते. जैसा रसरिती मरता राखिले विखे=रसायनाप्रमाणें विष अमृत होऊन जगवितें. (१६३) येकहृतवटिया–एक हातवटिया. केलि–कीजति. बद्धकेचि–बंधकेचि. सोडवावया. मुख्य–मुख्ये. (१६४)

जीवित जगण्यास आवश्यक असणारी जी यज्ञयागासंबंधी कामें, कर्मे, **दान** देणें, देणगीचीं कामें कर्तव्य कर्मे, **तप** (म्हणजे सामर्थ्य असणें तपश्चर्या, तपाचरण, मुख्याश्रमाची जागा, स्वतःबद्दलच्या अभ्यासाचें प्रकरण, कामें.) कर्तव्य कर्मे ती आत्मज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत पांथिक (मार्ग चालणारे ते मार्गस्थ पांथिक योगीच म्हणावेत कीं,) योग्यांनीं टाकू नयेत, ती पुढें गेलेले जे योगी त्यांच्या पाऊलावर चालण्याची ती पाउलेंच होत म्हणून टाकूं नयेत पण पाउल जलद उचललें तर त्याला विश्रांति लवकर मिळते जशी. (१४९)

(हरपले, नाहींसे झाले) हरवले ते (जर पाहाण्यास येत नाहीं, देखण्यांत येत नाहीं, नच देखण्यास आले, तर जे हरपलेले तें देखणें) पाहाणे होई तो त्याचा माग सांडू नये (मागमूस पत्ता हरवूं नये.) जसें का (न धाता) तृप्त न होता पुढचे भोजनाचे ताट बाजूस करू नये. (१५०)

पर (थडी) तीर गांठल्याशिवाय नाव बाजूस सारू नये–(दूर करू नये.) केळ फळल्याशिवाय पाडू नये. ठेवलेली ठेव दिसल्याशिवाय हातचा दिवा (सांडू नये) सोडूं नये. (१५१)

त्याप्रमाणें आत्मज्ञानासंबंधी जोपर्यंत कांहीं निश्चित गोष्ट पदरांत पडत नाहीं तोपर्यंत यज्ञ दान तप आदिकरून जी कांहीं योजना तेथें उदासीन होऊं नये. जोपर्यंत आत्मज्ञान हें कांहीं प्रमाणानें पदरांत पडणारें होत नाहीं तेथें उदासीन असूं नये. ती यज्ञ, दान, तप, कर्मे आचरत असावीच. (१५२)

## कर्मत्याग—त्रिविध—सात्विक, राजस, तामस— १५३-२१६

पण आपल्या अधिकारानुरूप तपें तीं दान यज्ञादि (संभावनेप्रत-प्रवृत्ति-कार्यारंभसिद्धतेस) अधिकाहून अधिक अशी आचरणांत (साक्षित्वानें-प्रत्यक्षत्वानें-स्थापनेप्रत) घ्यावीतच. (१५३)

जसजसें चालणें (कर्माचरण-प्रवाहानें शक्तिनें) वाढत असतें, तों तों बसावें असें वाटतें-प्रेमास येतें ओढ घेऊन असतें त्याप्रमाणें कर्म हें अतिशयतेचें झालें म्हणजे नैषकर्म्यच एक उभें होते. पाउल जलद उचललें तर विश्रांती लवकर मिळते. (१५४)

औषधी (आधिक्य का उत्कर्ष, मुळीं) सेवनानें कीं नियम, (वेग, उत्कर्ष) मांडते तो तो त्या त्या रोगास व्याधीस मुकणें होतें रोग्यानें नेमानें औषध घेतल्यास त्याचा रोग हटतो. औषधीची दिव्यता ही व्याधीस-रोगासच मुळीं ती रोगीट अथवा व्याधीची ती तनु मुकण्यास-टाकण्यास लाविते तेथें नेमानें चालणें हें महत्वाचें होय. (१५५)

त्याप्रमाणें कर्मे ही योग्य रितीनें जलद केल्यास कां वारंवार अथवा त्वरेनेंच उरकून घेणेचें करणें तें विधिपूर्वक खऱ्या निश्चयानें जेव्हां होतें; तेव्हां (चंचलता, दुष्ट वासना) चित्तांतील रज व तम हे दोन्ही गुण झडतात. आपआपला झाडा देऊन (झडले होतात) नाहींसे होतात. (१५६)

अथवा एकामागें एक पुटें दिलीं तर सुवर्णाला क्षार देणें कमी होतें कीड का हिणकट तें लवकर तुटून जाऊन सोनें निर्दोष होतें. (१५७)

त्याप्रमाणें निष्ठेनें केलेलें कर्म जें तें आपल्या आंगचे रज व तम हें झाडून टाकून सत्वशुद्धीचे अंतःकरण शुद्धीचें स्थान ते डोळयास दाखवितें-बुद्धींत उतरतें-रूपाप्रत येतें. (१५८)

असें आहे म्हणून हे धनंजया! सत्वशुद्धीची इच्छा करणारास तीर्थाच्या बरोबरीला (तपाच्या तादृश्यासच मुळीं) ही कर्मे आलीं आहेत कीं. (१५९)

तीर्थानें बाह्यमळ क्षाळला धुतला जातो. कर्मानें अभ्यंतर (मध्यभाग-आशय माजघर) उजळतें. येणेंप्रमाणें तीर्थे हीं सत्कर्मानेंचमुळीं निर्मळ अशीं होत. (१६०)

तहान भागविण्याच्या इच्छा लोभानें तृषार्त, ताहानेला, मारवाड देशामध्यें आला जसा, त्याजवर उन्हाचे चटके, उन्हाची तिरिप, अंग भाजणाऱ्या उष्ण वाताच्या झुळुका ह्या लागत असतांत्या अमृताची (उदकाची) वृष्टि, वर्षल्या; का अंध जो त्याचे डोळयामध्यें सूर्यच येऊन उतरला जसा. (१६१)

(अहो, बुडल्यास हात द्यावा, घाबरल्या धीर, ताल गीताला; अशी नीती आहे.) अहो, येथें तर बुडत्याला हात देण्याकरितां नदीच कीं धांवली! पडल्यास तर पृथ्वीनेंच कीं अहो उचलून (धरलें) घेतलें; मरणारा जो त्यास तर मृत्यूनेंचमुळीं आयुष्यवृद्धी दिली-मृत्यूनेंच त्याचें आयुष्य वृद्धिंगत केलें. (१६२)

(कर्मी बांधिता) कर्म बधापासून कर्मच सोडवितें, असें हे पांडुसुता आहे. म्हणून मुमुक्षु हेंच मुळीं आतां साशंकतेपासून सोडविले गेले. जसें का रसायनामुळें विषच अमृत होऊन जगवितें. रस रीती-मध्यें मरत असलेला तोंचमुळीं आतां ती रसरीती पद्धत, तऱ्हाचमुळीं, रसायन झालीं, अमृत झाली व तिनेंच त्यास मरणापासून वांचविलें. (१६३)

त्याप्रमाणें कर्मे (एकहतवटिया) एकाच हातवटीनें (एकत्रित) केलीं तीं हे धनंजया, बद्धके म्हणजे कर्मबद्धक जे कांही सेवा करणारे जन–मुमुक्षु–साधक इत्यादिकांचा तो कर्माच्या बद्धकते संबंधीचा भ्रमचमुळीं नाहींसा करून टाकतात. मुख्यत्वेंकरून कर्मामधील बंधकतेपासून सोडविण्यास तीं कर्मेंच मुख्य अशी होतात. (१६४)

**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥**

एतानि = ही. कर्माणि = कर्मे. संग = संगत, सोबत. कर्तव्यान् = करावीत. केली पाहिजेत, करणें हिताचें आहे.

अन्वय—पार्थ। मे उत्तमंमतं। निश्चितं मतं। संगंत्यक्त्वा। फलानि च त्यक्त्वा च। एतानि कर्माणि कर्तव्यान् इति ॥ ६ ॥

अर्थः—हे पार्था ! माझे निश्चित व उत्तम असें मत हें कीं, कर्माची संगत–सोबत सोडून तसेंच कर्माचें फल नच इच्छिता ही कर्मे करावींत कीं. (श्लोक ६ वा, ओंव्या १६५–१७७)

**आतां हेचि हातवटी । तुज ही सांगो गोमटी ।**
**जया कर्मासी कीरीटी । कर्मचि रूसे ॥ १६५ ॥**
**तरी महायाग प्रमुखे । कर्मे निपजताहि अचुके ।**
**कर्तेपणाचे का न ठके । फुंजणे अंगी ॥ १६६ ॥**
**जो मोले तीर्था जाय । तया मी यात्रा करितु आहे ।**
**ऐसी श्लाघ्यता नव्हे । तोषु जीवी ॥ १६७ ॥**
**का मुद्रा समर्थाचिया । जो येकटु झोंबे राया ।**
**तो मी जिणत असे यया । गर्वा न ये ॥ १६८ ॥**
**जो कासे लागोनि तरे । तया पव्हती उर्मी नुरे ।**
**पुरोहितु नाविष्कारे । दातेपणे ॥ १६९ ॥**
**तैसे कर्तृत्व अहंकारे । नेघोनि यथा अवसरे ।**
**कृत्य जाताची निरहरे (मोहरे) । सारिजति ॥ १७० ॥**
**आणि केल्या कर्मी पांडवा । जो आथी फळाचा यावा ।**
**तया मोहरा हो नेदावा । मनोरथु ॥ १७१ ॥**
**आधीची फळी आसतुटीया । कर्मे आरंभावी धनंजया ।**
**परावे बाळ धाया । पाहिजे जैसे ॥ १७२ ॥**
**पिंपरूवाचिया आशा । न सिंपिजे पिंपळु जैसा ।**
**तैसिया फळ निराशा । किजती कर्मे ॥ १७३ ॥**
**सांडुनि दुधाची टकुळी । गोवरी गोधने वेटाळी ।**
**किंबहुना कर्मफळी । तैसे कीजे ॥ १७४ ॥**
**ऐसी हे हातवटी । घेऊनि क्रिया जे उठी ।**
**आपुलिया आपण गांठी । लाहेचि तो ॥ १७५ ॥**
**म्हणोनि फळी लागु । सांडुनि देह संगु ।**
**कर्मे करावी हा चांगु । निरोपु माझा ॥ १७६ ॥**

**जो जीव बंधे शिणला। सुटिके जचे आपुला।**
**तेणे पुढत पुढती या बोला। आन न कीजे ॥ १७७ ॥**

हतवटी–हातवटी. कर्मासी–कर्मातें. (१६५) का न टके–न ठके (१६६) ऐसी श्लाघ्यता नव्हे–ऐसिया श्लाघ्यतेचा नोहे. (१६७) येकटु–येकवटु. जिणत असे यया–जिणता ऐसिया. गर्वा नये–न येचि गर्वा. (१६८) पव्हती–पोहती. (१६९) कर्तृत्व–कर्तुत्व. कृत्यजाताची–कृत्यताचे. निरहरे [ निरहर–निरहस्=अहंकार रहित.]–मोहरे. (१७०) केला–केलिया, केल्या. (१७१) आश–आस. बाळ [बालक =आंगठी, अज्ञ मूल. बाल=५ किंवा १६ वर्षापर्यंतचा मुलगा, केश, नवीन, हत्तीचें किंवा घोड्याचें पुच्छ घोडा, लहान, कोंवळा. बालगर्भिणी = प्रथम व्यायलेली गाय. बालगोपाळ=श्रीकृष्ण. बालतनय. बालपत्र=खैर. बालदायादिक=अनाथ लहान मुलाचे. बालप्रिय=वनगाय, बैल. बाल पाश्या= आंगातला दागीना, (केकत केवडा) वेणीतला मुक्तहार. बालपुष्पा=जुई. बालइष्ट, बालप्रिय=बोर. बालवत्स=पारवा. बालवायज्=वैडूर्यमणि. बालव्यंजन = चवरी. बालसात्म्य=दूध बालसूर्यक= रानबकरा, वाळा (व.) बालप्रिया=केळ.] (१७२) पिंपलु [पिप्पल=(१) पिंपळ (२) स्तनाग्र (३) बाही, अस्तनी (४) पक्षी पिंपळी (व.); पिप्पलमूळ=पिंपळ मूळ, रतिसुख, कर्मजन्य फळ, उदक, वस्त्र. पिप्पलकं=स्तनाग्र, शिवण्याचा दोरा. पिप्पिका=दांतावरील बुरशी. पिप्लु=अंगावरील तीळ लासे इत्यादि ] तैसया–तैसिया. (१७३) टकुळी–टकळी=आशा, इच्छा गोवारी=गुराखी. गोधने–गांवगोधने गावधेनु. (१७४) गाटि–गांठी. (१७५) सुटिके जाचे आपुला–सुटके जाचे आपला=सुटके संबंधी परिश्रम करतो. (१७७)

आतां हींच कर्मे (एकटेपणानें, एकटेपण) एकत्रित करून, कर्म करण्याची पद्धत हातवटी–शैली ही तुजला सांगतो. ही पद्धत कशी आहे म्हणशील तर येथें इंद्रियांचें जे कांहीं एकांगाचें होणें, तेथें डोकेंचमुळीं का देहरक्षक तोच (बुध; चंदन) चांगुलपणाचा म्हटला. तेथें कर्म आचरतेवेळीं कर्मच त्या पद्धतीस कां कर्मास रुसतें, दूर करतें (आवडतें होत नाहीं, नावडतें असें असतें.) (१६५)

करिता पंचमहायज्ञादि प्रत्येक कर्म, कर्मे [ब्रह्म देव, पितृ भूत व मनुष्य. पंचपिता=(१) जन्मदाता (२) उपनयन कर्ता (३) सासरा (४) अन्नदाता (५) भयत्राता.] (प्रत्येक मुख्य, प्रमुख, प्रधान, श्रेष्ठ, उत्कृष्ठ असा महा तेथें) हातून अचूक घडली असली तरी ती मी केली असा अभिमान धरू नये. यथाशास्त्र कर्मे निपजलीं होतात, जरी तरीपण कर्तेपणाचे फुंजणे गर्व, अहंपण, अभिमान अंगी धरूं नये : ठाकत–(खळत–खवळत–चढत) नाहीं (ते कां)! (१६६)

जो (आपले मोल देऊन) मोलमजुरीचे पैसे घेऊन तीर्थास जातो. स्वतःची आपली किंमत ते मजुरीचे पैसे देणारास दिली व तीर्थयात्रेस निघाला, त्यास मी यात्रा करीत आहे अशी (श्लाघ्यता, स्तुत्यता, प्रशंसा, का) बढाई ही कांहीं जीवभावास तोष देत नाहीं. तेथें संतोष–(संतुष्टता का तृप्ति, का आनंद हा कांहीं जीवास) तुष्ट करणारा होत नाहीं. (१६७)

अथवा समर्थाच्या मुद्रेस जो असहाय, एकटा, (एकाकिन् हे राया! समर्थाच्या रायपणास) झोंबतो तो मी जिंकत आहे, जिणता आहे, जाणता आहे जीवित जिंकीत आहे, असा गर्व धरीत नाहीं, तो तसल्या गर्वास–उद्दामपणास–मुळीच येत नाहीं. (१६८)

जो दुसऱ्याच्या (का एकाद्याच्या) कांसेस लागून तरतो, उद्धरतो (तरून जातो, पोहतो, जिंकतो, पारंगत होतो, मुक्त होतो, पैल नेला जातो तो) त्यास पोहण्याची ऊर्मी–मी पोहणारा असा गर्व–(वेग का प्रकाश, भरा, लाट) उरत नाहीं. अहो! यजमानाच्या वतीनें दान करणारा पुरोहित म्हणजे उपाध्याय

(कुलाचार्य किंवा कारभारी) जो आहे, तो कांहीं दाता म्हणून आपलीच दातेपणाची प्रख्याती डौलानें प्रगट करीत नाहीं. (१६९)

त्याप्रमाणें कर्तृत्व हें तितका काळ गेला असतां, अहंमन्यतारूपी अहंकारास न घेतां (अथवा कर्तृत्व हे यथा अवसरे करून माघारच घेतें, व) कर्तव्यजात कर्माचे समुदाय, (हेतूचे प्रकार, कार्यांचे स्पष्टरूप, हेतूचे स्पष्टपण, ते कसें म्हणून त्याची) मोहरे जेवढी तेवढीहीपण सारिली व्हावीत, करावीत (नाहींशी केली होतात) उरकावीत (नाहींशी करावीत). जी जी कर्मे यथाकाल समोर येतील ती ती बुद्धिबळातल्या मोहऱ्याप्रमाणें सरती करून सारावीत–सारती करून असावीत. (१७०)

केलेल्या कर्मास हे पांडवा, जो कांहीं फळ प्राप्तीचा ठाव येतो त्यास मनोरथाच्या मार्गी होऊ देऊ नये. देह दिवसाचा प्रकाश नाहीं, अशी जी कांहीं अज्ञानजन्य भूमिका, तेथें सर्व महत्त्व स्वतःसच येऊन असतें. हेंच मुळीं जसें का स्वामीच नटविला, भूषविला, अशी ती जातीभेदानें त्या त्या प्रकारची ती मोहरेपणाची सीमा, तीच मुळीं आतां यथा अवसर प्राप्त झाल्याने, (तितका काळ गेल्यानें) आपल्या निरहंकर्तृत्व भावनेस येऊन असते कदाचित ती योग्यता स्वामीचे पायीच (वाहावी)–वाहाती करून तें तें ऋण फेडावें त्या त्या ऋणातून मुक्त व्हावें. तसेंच केलेल्या कर्मामध्यें कर्मापासून प्राप्त होणारा जो कांहीं फळाचा, (घावडाव) वर्षाव (लाभ प्राप्ती) त्या मार्गाकडेसच मुळीं आपला मनोरथ होऊं देऊं नये, आपली इच्छा तिकडे करूं नये वळवूं नयें. (१७१)

अगोदरचमुळीं फळाची इच्छा, (आशा सोडून, निरिच्छपणानें,) आसतुटीची करून हे धनंजया ! कर्मे आरंभावींत– दाई दुसऱ्याच्या मुलाला धारण करणारी– जशी त्याकडे उदासपणें पाहाते त्याप्रमाणें (परावी, दुसरी, इंद्रिय धारणेची ती, चहाडखोर निंदा सूचक ती स्वजीवित प्रेमचमुळीं हरवले म्हणून धाय मोकलून रडत असलेली पाहाणें जसें कां.) (१७२)

अहो, पिंपरूवे म्हणजे पिंपळाची फळे खाण्यास मिळतील म्हणून फळाच्या आशेनें पिंपळाचें मूळ सिंपणें होतें असें नाहीं ; पिंपळाचे 'मूळी' पाणी घालण्याचें होतें असें नाहीं देवाची विभूतीच एक मानलेली तेथें पिंपळाला पाणी घालणें म्हणजे पिंपळाची फळें खाण्यास मिळतील असें तें केव्हांही नव्हेच जसें तसें फळाच्या निरासतेनेंच निरिच्छतेनेंच मुळीं कर्मे करावींत. (१७३)

कर्मफळासंबंधी तसें करावें, जसें कां दुधाची आशा सोडून गायराख्या, गांवातील धेनूंना वेटाळतो, राखतो म्हणजेच कर्मफळाची आशा न ठेवतां कर्मे करावीत. (१७४)

अशी ही हातवटी (हातोटी–शैली) अंगीकारून जी कांहीं कर्मे करण्याची क्रिया उभी होते राहाटते तेथें आपळीच आपणांस भेट होते (तेथें आपणच आपली गांठभेट घेणे होतें, आपणच आपणांस लाभतो गांठतो भेटतो.) (१७५)

म्हणून फळाचा संबंध व देहसंग (देह बुद्धि आवड, आसक्ती) सोडून कर्मे चांगल्यारितीनें (चांगुलपणानें) करावींत, असा हा (उत्तमप्रकारचा उत्तमतेचा असा) माझा संदेश जाण. (१७६)

जो जीव, जीव बंधामुळें–देहाभिमानामुळें–शिणला भागला आहे, व आपल्या सुटकेसाठीं परिश्रम करीत आहे त्यानें तर (वारंवार) नेहमीच्या नेहमींच त्या बोलाहून निराळें दुसरें कांहींही करू नयें. हा बोल मानावा. (१७७)

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

नियतस्य=इंद्रियें ताब्यांत ठेवलेला, जितेंद्रिय, स्थिर, एकाग्रचित्त, नेहमीं बांधलेला–पाळलेला, अनिवार्य, निश्चित, नित्य, अपरिहार्य. संन्यासः=काम्य कर्म त्याग, चतुर्थाश्रम. (कर्मदिन्=संन्यासी. कर्मन्=कर्म करणाऱ्यांनीं; कर्माधिकारी जे) कर्मणः=(कर्मिन्) कर्म करणारानीं-कर्माधिकारी जे त्यांनीं, पूर्व-कर्म–,दैव, गुणधर्म, धार्मिक कार्य करणारानी. न उपपद्यते=जवळ जाणें, मिळणें, प्राप्त होणें, शक्य असणें, शोभणें, उत्पन्न करणें, घडवून आणणें, जवळ आणणें, मिळविणें, तयार करणें, उपपादन=युक्तीनें सिद्ध करणें, प्रतिपादणें. मोह=देहाला आत्मा मानणें, प्रेमाचे वेड. (मोहनिद्रा म्हणजे फाजिल आत्मविश्वास.) घोंटाळा, मतिभ्रम, अज्ञान, आश्चर्य, दुःख. परित्याग=सर्वथा त्याग, सर्वथा–सोडून देणें, त्याग, औदार्य, न करणें, वगळणें, वर्ज्य करणें, पर्वा न करणें, देणें. तामसः=तापट मनुष्य, तमोगुण संबंधी, अज्ञानी, दुष्ट, चवथा मनु, निद्रा, अज्ञानी. परिकीर्तितः=उच्चारिला, सांगितला, स्तुति केला. (परिकीर्तिन्=बढाई मारणें, जाहीर करणें, सांगणें. परिकर्मन्=अलंकार धारण करणे, शुद्ध करणे.)

*अन्वय :—संन्यासः । नियतस्य । कर्मणः । तु । न उपपद्यते । तस्य नियतस्य । कर्मणः । मोहात् । परित्यागः । परिकीर्तितः । तामस इति ॥ ७ ॥*

अर्थ :—(१) पण नित्य कर्में जीं यज्ञयागादिक, त्याचा त्याग करणें मात्र उचित नाहीं: त्या नित्य कर्माचा जर कोणी अज्ञानानें सर्वथा त्याग करील तर त्या अज्ञानकृत त्यागाला तामस त्याग म्हटलें आहे– (संध्या इत्यादि नित्य ब्रह्मकर्म त्याचा त्याग कर्माधिकारी पुरुषानें कधींहीं करूं नये तो आचार त्याचा अर्थ–मूलक आहे.)

(२) नियमन केलेलीं, मिळविलेली, बांधलेली, (धारण केलेली) नित्यब्रह्मावर उभी केलेली, जी कर्मियानी म्हणजे कर्म करणारानी केलेली नित्य कर्में त्यांचा त्याग का संन्यास शक्य नसतो. त्यांचा त्याग कां संन्यास करणें शोभत नाहीं. का यदाकदाचित् कोणी मोहानें–मतिभ्रमानें, मतिभ्रमाच्या घोटाळ्यानें गोंधळून जाऊन त्या कर्माचरणाबद्दल पर्वा न करणारा होईल तर, तो तामस (तमोगुणी) त्याग म्हटला आहे–, बढाईखोरपणाचा म्हटला आहे.

(३) कर्म करणारानां नियमन केलेल्या (धारण केलेल्या) कर्माचा–(यज्ञमार्गादि नित्य–संन्यास काम्य-कर्म) त्याग करणें शक्य नसतें (शोभत नाहीं.) तरीसुद्धां, नियमन केलेल्या (नित्यब्रह्मावर, उभें केलेल्या) कर्माचा त्याग (पर्वा न करितां बुद्धि गोंधळाची करून ती कर्में वर्ज्य केलीं, तर तो त्याग) बढाईचा म्हटला होतो–तो त्याग तामस होय, असें सांगितलें आहे.

(४) **अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥**

कर्मन्–कर्मा–कर्म करणारा–कर्मणः—कर्म करणाराला, धारण केलेल्या कर्माचा त्याग शोभत नाहीं, शक्य नाहीं, (कारण वृत्तीच मुळीं, तेथेंच स्थिर केलेली. ह्या शरीराचे धारण पोषणादि धर्मच मुळीं वृत्तीवर उभे असलेले) कांहीं एक इच्छा धरून केलेलें जें कर्म तें काम्य–कर्म म्हटलें व शरीरावर जें कांहीं न्यासानें धारण केलेलें धर्म–धारण तेथें संन्यास त्याग हा केव्हांही इष्ट नव्हेच नव्हे. आतां कदाचित् देहाला आत्मा मानून मोहानें जो कांहीं त्याग करणें तो केव्हांही अज्ञानकृत त्याग म्हणजे तामस त्याग होय, मूर्खपण होय. त्यास नुसता बढाईखोरपणा का श्लाघ्यता म्हटली होते. (देह × शरीरिन्–आत्मा; कर्म × ब्रह्म)

(श्लोक ७ वा ओव्या १७८–१८३)

**ना आंधाराचेनि रोखें । डोळा रोविजति नखें ।**
**तो कर्म द्वेषे जो असिके । कर्मचि सांडी ॥ १७८ ॥**

**तयाचे कर्म सांडणे । ते तामस पैं मी म्हणे ।**
**सिसाराच्या रागी लावणें । सिसचि जैसे ॥ १७९ ॥**
**हा गा मार्गु दुवाड होये । तरी निस्तरितील पाये ।**
**किं तेचि खांडणे आहे । मार्गापराधे ॥ १८० ॥**
**भूकेलया पुढील अन्न । हो कां भलतैसे उन्ह ।**
**तऱ्ही बुद्धि न घेता लंघन । भाणे पांपरा हल्या ॥ १८१ ॥**
**तैसा कर्म बाधु कर्मे । निस्तरिजे करितेनि वर्मे ।**
**हे तामसु नेणे भ्रमे । माजविला ॥ १८२ ॥**
**कि स्वभावे आले विभागा । ते कर्मचि वोसंडी पैं गा ।**
**तरि झणें आतळा त्यागा । तामसा तया ॥ १८३ ॥**

ना–ना तरी. असिके–अशेखे. (असिका = बैठक.) कर्मचि–कर्मेचि. (१७८) कर्म–जे कर्म. सिसाराच्या रागी लावणें शिसचि जैसे–सिसाराचा रागे लोटणें, शिरचि जैसे. (सिसार = डोके दुखी.) बुद्धि = विचारानें. (१७९) भुकेलया पुढिल–भुकेलिया पुढे. पांपरा हल्या = पायांनीं झुगारिल्यासः [**हाली** = जलद, लौकर. **हालाकी** = यद्यपी, जरी. **भणना** = बोलणें, सांगणें : पपडा = पापुद्रा, ढलपा. **पपडी** = पोपडा, पापुद्रा. **पापडी** = एक प्रकारची मिठाई ] (१८१) कर्म–कर्माचा. (१८२) झने–झणे. (१८३)

**कर्मत्याग तामस—**

इतका अज्ञान–अंधार कीं, डोळयांत बोट घातलें तरीसुद्धां दिसत नाहीं व त्यमुळें अज्ञान अंधःकाराच्या रागानें, रोखानें, द्वेषानें, रोषानें तसें ज्यानें कर्मद्वेषानें सर्व कर्में टाकिलीं–, जो सर्व कर्में टाकतो. (१७८)

त्याचें तें कर्म टाकणें तें, मी म्हणतो, तामस जाण. अर्धशिशीला (शिसाचे) रागानें, द्वेषानें, (अर्ध वस्तूंच्या सारख्या दोन भागांपैकीं एक.) शीर्ष (डोके, शेंडा, का) शिसच जसें का लवविणें लावणेचें केलें. लोंबणेचें लोंबविणेचें केलें, (पाडिलें, तोडिलें, कापिलें.) (१७९)

अहो! मार्ग हा दुवाड–खराब–(आहे–) असेल (तर होईल जरी) तरी पाय ते मार्ग तो चालून संपवितील, निस्तरितील, भोगतील–तेथें जसे का ते पायचमुळीं मार्गापराधामुळें (मार्ग शोधणें, रस्ता काढणें, हा अन्यायच का विशेषत्वावर उभे होऊन बाकी सर्व दोषाचे म्हणजे गुन्हाच एक समजून खांडणे,) खांडणेच करावें लागणार. तत्त्ववेत्त्याचे तें मार्गमार्गावर आरूढ होऊन मार्गच शोधित राहाणें तेथें त्याचें तें प्रतिपादणें बोलणें, हें खंडन करावें लागणारें होय. (१८०)

भुकेल्यापुढें अतिशय उन्ह गरमागरम अन्न ठेविलें जरी तरी त्यानें तें बुद्धिच्या विचारानें न घेता तें भाणे–भांडें–पांपरा हल्या म्हणजे पायांनी हाणल्यास लंघन मात्र घडेल. (१८१)

तसा कर्माचा बाध म्हणजे दोष–उद्देश–तो कर्मनिंच मुळीं तें कर्म करण्याचें वर्म जाणून निस्तरावा. अहो! तामस जे आहे ते तर ह्या अज्ञान भ्रमामुळेंच माजविलेले (तामस म्हणजे तापट मनुष्य का बुद्धिमति प्रसर घेऊन असलेला माजविला असें होतें) विशेषसे सूत्रच माजविलें असें. (१८२)

स्वभावेंकरूनच जें कांहीं आपल्या वाट्यास आलेलें तें सहज कर्म तें उतूं जाऊ देऊं नये, बेपर्वाईचे करू नये, त्यागू नये (पण जर का तें त्यागाचें केलें) पण तेथें अशा तऱ्हेच्या त्यागास तर मुळींच आतळूं नये, तसला त्याग करण्यासाठीं तळमळूं नयेच! (कर्माचें बंधन कसें तोडावें.)* (१८३)

---

* **कर्माचे बंधन कसे तोडावे**—कर्मावर रागावून ती टाकणें हें अंधारांत दिसत नाहीं म्हणून डोळ्यांत बोटें घालण्यासारखें तामसी होय–कर्माचें बंधन, युक्तीनें कर्में करून तोडावें लागतें हें भ्रमानें वेडा झालेल्या तामसी माणसास कळत नाहीं. आणि तो स्वाभाविक कर्म ही टाकतो म्हणून अशा तामस त्यागाचा विटाळही तू आपणा स्वतःला होऊ देऊ नको.

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयास्त्यजेत् ।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥**

दुःखम् एव इति=नुसतें दुःखच एक व येथेंच मुळीं इति म्हणजे सर्व प्रकृती अडविली गेली. राजस =राग, अनुराग, प्रेम, आसक्ति.

अन्वयः—काय क्लेशभयात् यत् कर्म दुःखम् एव इति त्यजेत् । एव राजसं त्यागं कृत्वा । स न लभेत त्याग फलम् ॥ ८ ॥

अर्थः—मोठे जीवावरच आलें आहे असें दुःखच एक कीं, उठावणीचें का (अक्कड घेऊन)—या शरीरास क्लेश कष्ट होतील म्हणून भीतीच एक घेतली, व त्या भीतीनें जें कर्म त्यागिलें होतें, तो केवळ नुसता एक राजस त्याग होय ! त्यामुळें प्रवृत्ती नडविली गेल्यानें त्या पुरुषास त्यागाचें (उपरतिचें कां विरक्तीचें) फल (मिळत नाहीं) मिळणारें होत नाहीं. (श्लोक ८ वा, ओव्या १८४–१९९)

**अथवा स्वाधिकारू बुझे । आपुले विहितही सुझे ।**
**परि कर्तव्या उभजे । निबरपणा ॥ १८४ ॥**

**जे कर्मारंभाची कड । नावेक होय दुवाड ।**
**वाहतिये वेळे जड । सिदोरी जैसी ॥ १८५ ॥**

**निंब जिभे कडवटु । हिरडा पहिले तुरटु ।**
**तैसा कर्मा ऐल सेवटु । खणुवाळ होय ॥ १८६ ॥**

**गाई दुवाड सिंग । सेवतीये अडव अंग ।**
**भोजन सुख माहे ग । रांधिता ठाई ॥ १८७ ॥**

**तैसे पुढत पुढती कर्म । आरंभीच अति विषम ।**
**म्हणौनि ते ते श्रम । करिता मानी ॥ १८८ ॥**

**ये-हवी विहीतत्वे मांडी । परी घालिता असुरवाडी ।**
**येथें पोळला ऐसी सांडी । आदरिलेही ॥ १८९ ॥**

**म्हणे वस्तूं देहा सारिखी । आली बहुवे भाग्य विशेखी ।**
**मा जाचु का कर्मादिकी । पापिया जैसा ॥ १९० ॥**

**का केलां कर्मी जैं हे पावे । ते झणे मज होआवे ।**
**आजि भोगु ना बरवे । हातिचे भोग ॥ १९१ ॥**

**ऐशा शरिराचया क्लेशा । भेण कर्म वीरेशा ।**
**सांडी तो परियसा । राजस त्यागु ॥ १९२ ॥**

**ये-हवी तेथ ही कर्म सांडे । परि त्याग फळ न जोडे ।**
**जैसे उतले आगी पडे । ते हा मी नलगे (ते न लगेचि हो मा) ॥ १९३ ॥**

**का बुडोनी प्राण गेले । तो अर्धोदकी निमाले ।**
**हे म्हणो नये जाले । दुर्मरणचि ॥ १९४ ॥**

**तैसे देहाचेनि लोभे । जेणे कर्मा पाणी सुभे ।**
**तेणे सांचां न लभे । त्यागाचे फळ ॥ १९५ ॥**

**किंबहुना आपुले । जै ज्ञान होय उदया आले ।**
**तै नक्षत्राते पाहले । गिवी (गिळी) जैसा ॥ १९६ ॥**
**तैसिया कारण क्रिया । हारपती धनंजया ।**
**तो कर्मत्यागु ये जया । मोक्ष फळासी ॥ १९७ ॥**
**ते मोक्ष फळ अज्ञाना । त्यागिया नाही अर्जुना ।**
**म्हणोनि तो त्यागु न (नव्हे) मना । राजस ते ॥ १९८ ॥**
**तरी कोण पा येथें त्यागे । मोक्ष फळ घर रिघे ।**
**हेही ऐक प्रसंगे । बोलिजैल ॥ १९९ ॥**

बुझे=समजे, समजतो. सुझे=सुचते, जाणतो. कर्तव्या (करितया) उभजे-(उबजे) निबरपणा= करितया कर्माच्या-कर्तव्य कर्माच्या कठिणपणास निबरपणास (उभजे) कंटाळतो, त्रासतो. उभजे=ऐकतच मुळीं नाहीं अशा नित्यपणाचा तो जें कांहीं तेथें (प्रकृति पुरुष; पतिपत्नि; उजवा डावा-तेथें उजवेही ऐकेनात व डावेहीपण त्यामुळें क्लेशास पात्र होणारें होतें.) (१८४) कर्मारंभाची कड-कर्माची ऐलकड=प्रारंभ. होय-दिसे. जे वाहतिये=खांद्यावर नेतांना. (१८५) निंब-जैसा निंब. खणुवाळ=कठिण, खरबुडित. (१८६) गाई दुवाडसिंग-का धेनु दुवाडसिंग=मारकी गाय. सेवतिये=काटे शेवंतीचें अंग अडव. (वाईट) माह ग-महाग=न मिळणारे. रांधिता ठाई-पाकु करिता. (१८७) ते-तो. (१८८) असुरवाडी-आसुर-वाडी=(सुरवाड=सुख) कष्ट, त्रास होऊ लागतात. पोळला=कढत वस्तूनें हात भाजलेला-पोळला-जसा ताट टाकून देतो तसा हा कर्म मध्येंच टाकतो. (१८९) बहुवे-बहुवी. (१९०) केला-केले कर्मी जे पावे (द्यावे)=कर्म करून जें फळ मिळणार तें नकोच. ना-ना कां. (१९१) मेण-मेणे. कर्म-कर्में. परियसा-परियेसा. (१९२) त्याग-तया त्याग. ते हा (हो) मी नलगे-ते नलगेचि हो मा=उतूं गेलेलें तूप अग्नींत पडलें तर त्याला होमाची योग्यता नाहीं. (१९३) अर्धोदकी=जलसमाधि, उपोषण करून अर्धे शरीर बुडेल इतक्या गंगेच्या पाण्यांत उभे राहून प्राणत्याग करणें. हें म्हणो नये=जलसमाधि म्हणवत नाहीं. दुर्मरणचि=अपघातच तो. (१९४) सांचा-सांच. सुये=पाणी सोडलें. (१९५) गिवी जैसा-गिळी जैसा (गॄ=गिळणे). पाहले=प्रभात, प्रातःकाळ. (१९६) तैसिया कारण-तेशा सकारण. (१९७) मना-माना. राजस ते-राजसु तो. (१९८) कोण-कोणे. (१९९)

**राजस त्याग :—**

आपला अधिकार काय कर्तव्य काय तें तो जाणतो, समजतो. तसेंच आपलें विहित कर्म तेंही जाणतो पण कर्माच्या करितया वेळेस तेथीलच्या निबरपणास, क्लेशास, कठिणपणास उबजे म्हणजे कंटाळतो, भीतो. (१८४)

कर्माचा प्रारंभ खरोखरीच कीं, दुवाड म्हणजे कष्टकारक आहे वाईट आहे असेंच त्यास दिसतें कारण त्या कर्माची वाहाती जेव्हां तेव्हां त्यास ती जडच वाटते; खांद्यावर नेतांना शिदोरीच जशी कां ! (१८५)

जसा निंब जिभेस कडूं लागतो-हिरडा अगोदर तुरट असतो-त्याप्रमाणें कर्माच्या सुरवातीचा शेवटच मुळीं कठिण का खरबुडित असा (खणुवाळा) त्यास होतो. (१८६)

अहो ! मारकी गाय (तेथें तिजपासून धार का दूधच मुळीं न मिळणारें) काटे शेवंतीचें अंग (अडव म्हणजे वाईट), कांटेरी असल्यानें तेथीलची फुलें नच मिळणारी, स्वयंपाक करतां करतांच मुळीं तें भोजन सुख चाहणें तें न मिळणारें असेंच होय. सैपाकाचा त्रास घ्यावा तेव्हां सुग्रास भोजन ! (१८७)

त्याप्रमाणें नेहमी का पुन्हः पुन्हः कर्म हें आरंभीच मुळीं अति विषम दुःसह असें असल्यानें तें कर्म करतांना तो तर अनेक श्रमच मुळीं असें मानतो. (१८८)

एरव्हीं पाहिलें असतां योग्यतेनुरूप त्याची मांडणी कर्माची पण कष्ट होऊ लागताच हात पोळलेला जसा ताट टाकून देतो तसा हा कर्मे आदरलेली तरी मध्येंच टाकून देतो. (१८९)

तो म्हणतो कीं विशेष भाग्येंकरून ह्या देहासारखी वस्तू–सोन्यासारखी देह वस्तु भाग्य विशेषेंकरून आलेली तिजला तर पापियाप्रमाणें कां बरें कर्मादिकांचा तो जाच व्हावा? कसा कष्टवावा देह! (म्हणून कर्मे टाकतो)! (१९०)

कर्म करून जें फळ मिळणार तें नकोच. कर्म करण्यानेंच मुळीं जर का भोग मिळणारे तर ते नकोतच. अहो, जे कांहीं आज हातचे आहेत तेच भोग कां न भोगावेत? पूर्वीं केलेल्या कर्मामुळें जें मिळावयाचें ते मला प्राप्त व्हावें असें आहे. हातींच आहेत जे भले! ते कां न भोगावेत! (१९१)

याप्रमाणें अशा तऱ्हेनें शरीराच्या क्लेशास भिऊन जाऊन (कर्म तें) कर्मेच तो टाकून देतो. अशी कर्मे टाकणें जें, टाकून देणे जें, तो राजस त्याग म्हटला आहे. (१९२)

एरव्ही तेथेहीपण त्याग हा आहेच! (कर्मेच टाकून दिल्यानें कीं आहो–) पण त्यास कांहीं त्यागाचें फळ मिळत नाहीं. अहो! तूप ऊतू जाऊन अग्नींत पडलें तर तेथें काय होम केल्याची त्यास योग्यता लाभेलच असे नाहीं सोमास तें पोहोचत नाहीं. त्याग खरा पण त्यागाची फलप्राप्ति नाहीं. (१९३)

अहो! बुडून मेलेल्यानें काय जलसमाधि घेतली म्हणतां येत नाहीं : तेथें तर (अपघाताचें मरण का) अपघातच कीं तो! (१९४)

त्याप्रमाणें देहाचा लोभ धरून ज्यानें विहित कर्मासचमुळीं पाणी सोडलें तेथें त्याला खऱ्या कर्मत्यागाचें फळ नच मिळणारें! (१९५)

अहो! आपले ज्ञान उदयास आलें, तेव्हां तर नक्षत्राना प्रातःकाळानें तसें समजून ते अज्ञान गिळून टाकले. प्रातःकाळ झाला, चांदण्या आपोआप लोपतात तसा आत्मज्ञान उदय तेथे सर्व कर्मे अज्ञानासह लोप पावतात. (१९६)

कारण व क्रिया हे धनंजया! ह्या दोन्हीं हारपून जातात तेव्हांच खरा कर्मत्याग घडतो अशा कर्म त्यागास मोक्षरूप फळ मिळते–तो कर्मत्याग मोक्ष फळास येतो. (१९७)

तें मोक्षफळ अज्ञानानें·कर्मत्याग करणाराला हे अर्जुना, मिळत नाहीं; म्हणून तो त्याग 'त्याग' म्हटला जात नाहीं; मानला होत नाहीं : त्याग असा जो तो तर **राजस** असाच त्याग होय. (आपले ज्ञान उदयास आलें तें जसें प्रातःकाळानें नक्षत्रेंच गिळून टाकिली तसें तशा कारणासहित क्रिया **हारपतात**. तो कर्मत्याग मोक्षफळ देणारा होतो. ते मोक्षफळ अज्ञान कर्मत्यागि यानां नाही म्हणून तो राजस त्याग नव्हे.) (१९८)

आतां ह्या येथें कोणत्या त्या त्यागानें तें मोक्षफळ आपल्या घरी येईल, घरचें होऊन असेल, हेंही सहज प्रसंगानें बोलण्याचें करूं! (१९९)

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन।**
**संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विको मतः ॥ ९ ॥**

नियतं क्रियते=एकाग्र चित्तानें धारणा करून करावें. कार्यम् इति=करण्यास योग्य; करावेंच–करणें आहेच, केलेंच पाहिजे. संग=आवड, आसक्ति. मतः=मान्य आहे, मानिला आहे. सात्विक=सत्वगुणयुक्त, स्वभाव मूळधर्म आवृत्ति.

अन्वय :—अर्जुन। यत् कर्म कार्यम् इति। तत् कर्म। नियतं क्रियते। (संग। फलं। त्यक्त्वा। च।) स त्यागः मतः सात्त्विकः ॥ ९ ॥

अर्थ :—हे अर्जुना! जे कर्म करण्यास योग्य, करावेंच असें आहे तें त्या कर्माबद्दलची आवड (संग) तसेंच फल सोडून देऊन एकाग्र चित्तानें धारणा धरून करावें, असें जें संग व फल सोडून कर्म करावें त्यास सात्विक त्याग (तपाचरण, विरक्तता, विवेकता, दान) म्हणतात. (श्लोक ९वा ओव्या २००–२११)

तरी स्वाधिकाराचेनि नावे। जे वांट्या आले स्वभावे।
ते आचरे विधि गौरवें। श्रृंगारूनि ॥ २०० ॥
परी हे मी करितु असे। ऐसा आठउ त्या माजी नसे।
तैसाचि पाणि दे आशे। फळाचिये ॥ २०१ ॥
पैं अवज्ञा आणि कामना। मातेच्या ठाई अर्जुना।
केली दोन्ही पतना। हेतु होती ॥ २०२ ॥
तरी दोन्ही ये त्यजावी। मग माताचि ते भजावी।
वांचूनि मुखालागी वाळावी। गायेच (गायचि) सगळि ॥ २०३ ॥
आवडतिये फळि। असारे साली आंटुळी।
तया सांटी अवगळी। फळाते कोण्ही ॥ २०४ ॥
तैसा कर्तृत्वाचा मदु। आणि कर्म फळाचा आस्वादु।
या दोहोची (दोहींचे देहीचा) नांव बंधु। कर्माचा कीं ॥ २०५ ॥
तरी यया दोहीच्या विखी। जैसा बापु नातळे लेकी।
तैसा हो न शके दुःखी। विहिता क्रिया ॥ २०६ ॥
हा तव त्याग तरूवरू। जो गा मोक्ष फळे ये थोरू।
तरी सात्त्विकु ऐसा डगरू। यासीच जगी ॥ २०७ ॥
जाळुनि बीज जैसे। झाडा कीजे निर्वंशे।
फळ त्यागुनि कर्म तैसे। त्यजिले जेणे ॥ २०८ ॥
तया लागत खेंवो परिसी। धातुची गंधी काळिक जैसी।
जाती रजतम तैसी। तुटती दोन्ही ॥ २०९ ॥
मग सत्वे तेणे चोखाळे। उघडती आत्मबोधाचे डोळे।
तेथें मृगांभा सांजवेळे। होय जैसे ॥ २१० ॥
तैसा बुध्दयादिका पुढां। असतचि असतु विश्वाभासु हा येवढा।
तो न देखे कोण्ही कडा। आकाश जैसे ॥ २११ ॥

वांट्या—वांटिया. श्रृंघारूनि—शृंगारोनि. (२००) आठउ त्यामाजी नसे—आठऊ त्यजी मानसे. पाणी दे असे—पाणी दे आशे=आशेवर पाणी सोडतो. (२०१) गायेच—गायचि. (२०३) अंटुळी—आंठोळी. अवगळि—अवगळी=टाकते. (२०४) कर्तुत्वाचा—कर्तृत्वाचा. दोहीची—दोहीचे. (२०५) हो न शके दुःखी विहित क्रिया=कर्तृत्वाहंकार व फलेच्छा टाकून विहित कर्मे जो करतो तो दुःख पावत नाहीं. (२०६) तंव—तो. डगरू=प्रसिद्धी. (२०७) निर्वंशे=आधीनतेचा अभाव, मोहितपणाचा अभाव, ग्रस्त होणेचा निषेध. (२०८) तया—लोह. लागत खेंवो परिसी=परिसाचा स्पर्श होतांच. गंधि काळिक—गंधि काळिमा. तुटती—तुटली. (२०९) मृगांभा—मृगांबु=मृगजळ जसें सायंकाळी नाहींसे होतें. (२१०) कोण्ही—कवणी. (२११)

**'खरा त्यागी'-सात्त्विक त्यागः—**

आपल्या अधिकाराच्या योग्यतेप्रमाणें जें कांहीं स्वभावेंकरून आपल्या वांट्यास आलेलें आहे, तें विधिविधान अनुष्ठान, नियम, उपाय, सेवा प्रकारांनी–श्रृंगारून शोभवून आचरावें. (२००)

पण हें मी करीत आहें अशी आठवण मनानें तो करीत नाहीं (त्यजावी) त्याचप्रमाणें फळाच्या आशेवरही तो पाणी सोडतो. (सोडावें) (२०१)

हे अर्जुना! आईच्याठायीं (आई, गाय, पृथ्वी, लक्ष्मी) मातेविषयींची अवज्ञा, अपमान, अवज्ञान, अथवा कामना इच्छा! (मन कामना कामासक्तता) केल्यास ही दोन्हीही पतनास–पातकास–नाशास–अवनतीस–पडण्यास, कारण हेतु होतात. (२०२)

करिता दोन्हीही (अवज्ञा का कामना) सोडावीत, त्यजावीत व मग मातान्चि ते भजावी, सेवेची करावी, उपासनेची करावी, सेवा–उपभोगाची–अनुभवाची करावी अहो! गाय ती सगळीच मुळीं [मुखालागी–(वांचून) वाळावी त्यजावि–सगळि गाय, वांचून मुखालागी, वाळावी त्यजावी] गाईच्या मुखावांचून बाकी सगळी गाय ती सेवावी. (२०३)

अति आवडती–अति आवडणारी अशी फळें, तेथें असार निःसत्त्व त्या साली व आठुळया म्हणून काय कोणी फळांना टाकतें? टाकून देतें, टाकून देईल? (२०४)

तसा कर्तृत्वपणाचा, कर्तेपणाचा, कर्तृत्वाचा मद (अभिमान धुंदी, उन्माद) व कर्म फळाचा आस्वाद–रूचि लज्जत उपभोग–ह्या दोहींना मद व आस्वाद यांनाचमुळीं दोहीच्या नामें बंध, कर्माचा बंध हें नांव (आलें) आहे. (२०५)

करितां ह्या दोहीबद्दल, जसा का बाप कन्येच्या ठायीं, ताबा मानून, स्पर्श करीत नाहीं, हात लावीत नाहीं, लांचावलेल्या जीवाचा होत नाहीं–त्याप्रमाणें कर्तृत्वाहंकार व फलेच्छा टाकून विहित कर्मे जो करतो तो दुःख पावत नाहीं. अहो विहिता क्रिया–विधिविहित–अनुष्ठान नियम, उपाय, सेवा, प्रकार, क्रिया तप स्वाध्याय ईश्वर प्रणिधान (परमेश्वराचे सर्व कांहीं असून तें त्यास केव्हांहि अर्पण आहे असें जें एक समजणें) इत्यादि आचरतांना अवघड न वाटतां दुःखी न होतां सहजपणेंच त्या क्रिया हातून होणाऱ्या होतात. (२०६)

असा हा त्यागरूपी श्रेष्ठ वृक्ष मोक्षाजोगा, मोक्षास आवडणारा असा असल्यानें, त्यास थोर म्हटलें त्यास मोक्षरूपी फळ लागत असल्याकारणानें, हा त्यागरूपी वृक्ष श्रेष्ठ, थोर कीं, अहो असें महिमान घेऊन असल्यानें, – ह्या जगतामध्यें ह्या जगीं–जनीं–लोकी प्रसिद्धीचा असा त्यासच कीं अहो सत्त्वगुणयुक्त असा स्वभाव मूळधर्म आवृत्ति–सात्त्विक म्हटलें. (२०७)

बीज भाजलें–, जाळल्यानंतर, तें बीजचमुळीं आपल्या गुणधर्माचा झाडा देतें तेथें आधीनतेचा अभाव, मोहित होणें नाहीं, मोहग्रस्त होण्याचा निषेध करून असलेलें तें आपलें डोळसपण टाकित नाहीं जसें, तसें कर्माचें कर्मफळ टाकून दिल्यामुळें कर्मच जसें का त्यजिलें, सांडलें आहे ज्यानें असें जो करतो. (२०८)

असें तें फळ त्यागून कर्मच सांडलें त्यजिलें तेथें नामच कानास भेटल्यानें, सप्त धातूची (मेद, मज्जा, अस्थि, मूत्र, रुधिर, श्लेष्म, संधि) जी लपेटून असणारी काळिमा, नाहिंशी होते व सुवर्णाप्रमाणें तें दर्शन चित्त पाहातें. त्याप्रमाणें रज तसेंच तम ही दोन्हीहीपण तुटून जातात.

लोह हें, परिसाचा स्पर्श झाल्याबरोबर, आपलें तें लपेटलें असणारें लोहपण, तसेंच, तेथीलची काळिमा टाकून देऊन स्वच्छ सुवर्णच कीं अहो तें होतें. त्याप्रमाणें रजोगुण (आसक्ति राग) तसेंच तमोगुण (अज्ञान)

असें दोन्हीही तुटून जातात–बाजूस पडतात. (२०९)

असें जें तेंच की अहो शुद्ध सत्त्व सुकृत म्हटलेलें त्यानें तर देह दिवस उगवल्यामुळें आत्मबोधाचे डोळेच उघडले होतात. तेथें आतां जसें मृगजळ सायंकाळी नाहीसें होतें, असत नाहीं, अहो सायंकाळ म्हणावी तों तेथें लग्नच कीं, ह्या गुणमयीचें पण येथें तर शुद्ध सत्त्वानें आत्मबोधच सडोळस होतो. (२१०)

त्याप्रमाणें ह्या बुद्धि, मन, चित्त इत्यादिकांच्या पुढें हा एवढा थोरला विश्वाचा आभास असलेलाच असूनही पण; तो तर कांहीं कोणाकडे मुळींच न पाहाणारा असा, जसें का आकाशच सर्व व्यापक असलेलें तें. (२११)

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

न द्वेष्टि=द्वेष करीत नाहीं. अकुशल कर्म=क्लेशदायक अथवा अकल्याणकारक वाटणारें कर्म न अनुषज्जते कुशले=सुखदायक कर्मात आसक्त होत नाहीं (अनुषंग=अनुसरणारा, दया करणारा.) सत्त्व-समाविष्टः=शुद्ध सत्व गुण युक्त. (सत्व=बळ. सम=तुल्य, पूर्ण. आविष्टः=संचरलेला, शिरलेला.) मेधावी=ज्ञानवान, बुद्धिमान. (मेधा=बुद्धि, धारणाशक्ति.) छिन्नसंशयः=संशयरहित. त्यागी=त्यागी पुरुष. (त्यागिन्=विरक्त, कर्मफल सोडणारा, विवेकी, तपस्वी.)

अन्वयः—अकुशलं कर्म न द्वेष्टि । कुशले न अनुषज्जते । छिन्न संशयः । मेधावी । सत्वसमाविष्टः । त्यागी (पुरुषः) ॥ १० ॥

अर्थ :—अकुशल म्हणजे क्लेशकारक, अकल्याणकारक वाटणाऱ्या कर्माचा जो द्वेष करीत नाहीं, शत्रु होत नाहीं, आणि सुखकर वाटणाऱ्या कर्मामध्यें जो आसक्त होत नाहीं (दयेसच अनुसरणें करीत नाही) असा तोच त्यागी (विरक्त) पुरुष होय, तो शुद्ध सत्त्वगुणयुक्त–सत्त्व बल पूर्ण असा–पुरुष ज्ञानवान्-बुद्धिमान् असा, संशयरहित असा, त्यागी (विवेकी, विरक्त) जाणावा. (श्लोक १० वा ओव्या २१२–२१७)

**म्हणौनि प्राचीनाचेनि बळे । अलंकृते कुशळा कुशळे ।**
**तिये व्योमा आणी आभाळे । जिराली जैसी ॥ २१२ ॥**
**तैसी तयाचिये दिठी । कर्मे चोखाळली किरीटी ।**
**म्हणौनि सुखदुःखी उठी । न पडे तो ॥ २१३ ॥**
**तेणे शुभकर्म जाणावे । मग ते हरिखे करावे ।**
**का अशुभालागी हो आवे । द्वेषिया ना ॥ २१४ ॥**
**तरी ये विखीचा काही । तया येकही संदेहो नाही ।**
**जैसा स्वप्नाचा का ठाई । जागिनलिया ॥ २१५ ॥**
**म्हणौनि कर्म आणि कर्ता । यया द्वैतभावाची वार्ता ।**
**नेणे तो पांडुसुता । सात्त्विक त्यागु ॥ २१६ ॥**
**ऐसेनि कर्मे पार्था । त्यजिली त्यजिती सर्वथा ।**
**अधिके बांधती अन्यथा । सांडिली तरी ॥ २१७ ॥**

प्राचिनाचेनि–प्राचीनचेनि. अळंकृते–आली कृत्यें. जिराली–विराली. (२१२) उठी=भेटते, सेवा करते, सज्ज करणें होतें, जवळ जाणें, हजर होणें. (२१३) हरिखे=उल्हास पावून, संतुष्ट होऊन (खोटें बोलणें, करणें, केंस उभे राहाणें). द्वेषिया–अप्रिय, द्वेषार्ह, शत्रु. (२१४) संदेह=संशय, भीति. स्वप्न=झोंप, आळस, निद्रेत दिसणारे नाना प्रकार. जागिनलिया=(जागणें) जागे झाल्यावर, जागृ=जागणें.

(२१५) द्वैत=भिन्नपणा, भेदबुद्धि. भाव=स्वभाव, मनोविकार, चेष्टा. वार्ता=संभाषण, राहाणी, (व्यापार व शेती) वार्ता=वांगे. सात्विक=सत्त्वगुणयुक्त. त्यागु=वर्ज्य करणें, सोडणें, दान, विरक्तता, विवेक, तपस्या. (२१६) अधिके=जास्त, वरचढ, वाजवीहून ज्यास्त, गौण, अतिशयोक्ति. अन्यथा=खोटेपणानें, चुकीनें, निराळ्या रीतीनें, दुसऱ्या कारणानें. (२१७)

प्राचीनावीती–अपसव्य केलेलें यज्ञोपवीत–म्हणून पूर्वकालच्या–जुनेपणाच्या बळानें हितकर अशीं (कल्याण चतुरपणा पुण्य खुशाली, प्राविण्य शहाणपणा सुख) अथवा अमंगळ कां पाप म्हटलेली ती शोभविलेली, भूषविलेली ती जशीं कां (व्योमाच्या ठायीं) आकाशाच्याठायीं अथवा जलाच्याठायीं जिरालेली (आभाळे) अभ्रेंच जशीं— (२१२)

तशीं त्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां कर्में हीं चोखाळली शुद्ध केलेलीं अशींच हे किरीटी! अर्जुना! असल्यानें तो सुख प्राप्त झालें असतां, अथवा दुःख प्राप्त झाले असतां सुखदुःखाची धग आपणावर ओढून घेत नाहीं सुखाची सेवा करणारा होत नाहीं का दुःखाच्या जवळचा होत नाही सुखाची सेवा करणारा का दुःखाच्या उपस्थिततेनें दुःखित होणारा होत नाहीं. (२१३)

त्यानें शुभ कर्म, (कल्याणकारक, मंगलकारक, सुखकारक तें काम, कर्म) जाणावें व जाणल्यावर मग उल्हासाप्रत पावून का संतुष्टतेनें तें करावें व्हावें असें नाहीं अथवा अशुभ असें जें अमंगल का पाप म्हटलेलें जें त्या कर्माचा त्यानें द्वेष करावा असें नाहीं. अमंगल, अकल्याणकारक–अहितकारक जें पाप तेथें द्वेषार्हे का शत्रू व्हावें का अप्रियपण घेऊन असावें असें नाहीं. (२१४)

यासंबंधी त्यास कसलाहि एक संशय का भीति (नाहीं) नसते; जें कां स्वप्न जें–, निद्रेस न दिसणारें नानाप्रकार, तेथें जो जागला आहे, जागता आहे, जागृत झाला आहे असा तो असल्यानें— (२१५)

म्हणून कर्म काम, (तसेंच कर्ता) कृति करणारा कर्म–कर्ता अशा शक्तीचा, अशा ह्या कर्म का कर्त्यामध्यें भेदबुद्धीचा मनोविकार, ज्यावर परीणाम करीत नाहीं (भिन्नपणाच्या स्वभावाची राहाणी ज्याचें ठायीं नाहीं) असा तो सात्विक–सत्त्वगुणप्रधान विवेक समजावा. तपस्याच का विरक्तताच ती **सात्विक त्याग** म्हटली— (२१६)

**कर्मे**

*अशा तऱ्हेनें हे पार्था! कर्में, कामें तीं सर्वथैव अशीं (त्यजिलेलीच टाकिलेली तीं, टाकिलीं होतात–त्यजिली असतात) त्यजिलिच त्यजितात व यावर जीं कांहीं कर्में अधिक अशीं वाजवीहून ज्यास्त गौण,* अतिशयोक्तीचीं तीं तर दुसऱ्याच काहीं कारणानें, निराळ्याच रीतिनें, खोटेपणाची अशीच (समजून, समजली होऊन) जरी ती सांडिली तरीसुद्धां बांधतातच, संसारपाशाची करतात, होतात. (२१७)

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥**

देहभृत–देहवत्=प्राणी, जीवात्मा. अशेषतः=समग्रपणें, पूर्णपणें, सर्वतः. कर्मफलत्यागी स त्यागी इति अभिधीयते=(अभिधेय=सांगण्याजोगें; नांव देण्याजोगें, वस्तु, बोलण्याचा विषय, अक्षरशः अर्थ.) कर्माच्या फलाचा त्याग करणारा तोच मुळीं त्यागी होय. असेंच सांगण्याजोगें, नांव देण्याजोगें आहे, होणें, त्यासच त्यागी असें नांव दिलें होतें– त्यागी अशी वस्तूंच तो, तोच त्यागी असा अक्षरशः खरा अर्थ.

अन्वयः—कर्माणि। अशेषतः त्यक्तुं। देहभृता शक्यं न हि। तु यः कर्मफलत्यागी। स त्यागी। इति अभिधीयते ॥ ११ ॥

अर्थः—प्राण्यास जीवात्म्यास कर्में, काम सर्वतः पूर्णपणें सोडणें शक्य नाहीं म्हणून जो कर्मफलाचा त्याग करणारा आहे तोचमुळीं खरा त्यागी असें अक्षरशः खरें मानलें आहे, मानलें होतें.

(श्लोक ११ वा, ओव्या २१८–२३२)

आणि हां गा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची ।
खंती करिती कर्माची । ते गावंढे नां ? ॥ २१८ ॥
मातीयेचा विट्टु । घेउनि काय करील घट्टु ।
केउता तांथु पट्टु । सांडील तो ॥ २१९ ॥
तेवीचि वन्हित्त्व आगी । आणि उवे उभगणे आंगी ।
तो दीपु प्रभेलागी । द्वेषु काय करि ॥ २२० ॥
हिंगु त्रासलिया घाणि । तरी सुगंधत्व कैंचे आणि ।
द्रवपण सांडुनि पाणि । केवि राहे ते ॥ २२१ ॥
तैसा शरीराचेनि अभासे । नांदतु जंव असे ।
तंव कर्म त्यागाचे पिसे । काइसे तरी ॥ २२२ ॥
आपण लाविजे टीळा । म्हणोनि पुसो ये वेळोवेळा ।
मा घाली फेडी निडळा । का करूं ये गा ॥ २२३ ॥
तैसे विहित स्वये आदरिले । म्हणोनि त्यजु ये त्यजिले ।
परि कर्मचि देहे आंतले । ते कां गा सांडे ॥ २२४ ॥
जे श्वासोच्छ्वास वरि । होत निजलियाहि वरि ।
कांही न करणेचि परि । होती जयाची ॥ २२५ ॥
या शरीराचेनि मिसके । कर्मचि लागले असें असिके ।
जिता मेलया न टके । यया रीति ॥ २२६ ॥
याते सांडिती येथ परि । येकचि ते अवधारि ।
जे करिता जाइजे हारि । फळाशेचिये ॥ २२७ ॥
कर्मफळ ईश्वरी अर्पे । तत्प्रसादे बोधु उद्दिपे ।
तेथ रज्जुज्ञाने लोपे । व्याळ शंका ॥ २२८ ॥
तेणें आत्मबोधे तोषे । अविद्येसी कर्मनाशे ।
पार्था त्यजिजे ऐसे । ते त्यजिले होय ॥ २२९ ॥
म्हणौनि या परी जगी । कर्म करिता मानु त्यागि ।
ये मूर्च्छे नांव रोगी । विसांवा जैसा ॥ २३० ॥
तैसा जिणे कर्मी येकी । की विसांवो पाहे आणिकी ।
दांड्याचे घाय बुकी । धाडणे जैसे ॥ २३१ ॥
परि हे असो पुढती । तोची त्यागी त्रिजगती ।
जेणें फळ त्यागे निकृति । नेले कर्म ॥ २३२ ॥

सव्यसाचि = सव्य म्हणजे उजवा व सांचि (सत्यता–देव सत्य प्रकृति) अशा दोन्ही उजव्या व डाव्या (प्रकृति पुरुषांनीं) बाजूंनीं जो बाण चालवितो; चित्त मदन बाण वापरतोः देहाची मूर्ती = देहधारीपणा शरीरिन्–नित्यस्य शरीरिन्. खंती = चिंता काळजी. गावंढे = गावंढळ, अडाणी, व्यर्थ जगणारे अज्ञानी जीविताच्या व्यर्थतेनें असणारे. ना–गा [ ३ :: १४५ ॥ तरी परीस पां सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची

संती करिती कर्माची । ते गावंढे गा । ] (२१८) मातियेचा–मृत्तिकेचा; विटु=त्रास, अप्रियपणा थुतां=तंतु. पटु=कापडाचा तागा, वस्त्र, पडदा, कापड, उत्तम वस्त्र, रंगित वस्त्र, चित्र काढण्याचा कपडा. [पटकर्मा=विणकरी; पटकार=कोष्टी, चितारी. पटकुटी=तंबु (पटमंडप, पटमय, पटवाप, पटवेश्मन्) पटवासः पटवासकः=बुक्का. पटभासः=जाळी पटच्चर=जीर्णवस्त्र, चोर, पटकः=कापसाचें वस्त्र, छावणी, तळ.] (२१९) आगि–आंगि. उबे उबगणें=उबाऱ्यानें त्रासणें, ऊब, दाह, उष्णता, धग लागते म्हणून जे कांहीं कंटाळणें, उष्णतेचा अग्निला कंटाळा येईल काय? आंगी–आगी. दीपु=दिवा, आपल्या प्रकाशास म्हणतो काय? प्रकाशाबरोबर द्वेष करीत नाहीं, करतो काय? करील काय? काय द्वेष प्रभेसाठीं, प्रभेलागी दीप करील? (जर दिवा उत्तम प्रकारें प्रकाशत नाहीं–, तर दिव्यानें तें प्रशस्त.उजेड, प्रकाशासाठीं प्रकाशाशीं, प्रभेशी, प्रभेबरोबर, द्वेष करणें तें काय कसलें तें म्हणावें तरी) (२२०) सुगंधत्व, (सुगंधि=सुवासिक, सुवास). सुगंध=गंधक, केवडा, जोंधळा, नारळ, रोहिस गवत, हरभरा, मोगरी, रास्ना, चंदन, शहाजिरे, कमळ. द्रवपण=पातळपण. [**द्रव-द्रवंती**=नदी. **द्रविणं**=सोनें, जिनगी, द्रव्य, शक्ति, पराक्रम, पदार्थ, रत्न, **द्रव्य**=विनय, पैज, औषध, अधिभूत संपत्ति, रत्नें, पशु, जमीन, वस्त्रें, दासदासी व सोनें, झाडाचे मूळतत्त्व; योग्यवस्तु.] (१२१) अभासे–आभास=प्रकाश, प्रतिच्छाया, भ्रम. [अ=स्वल्पता. भास=प्रभा, कांति.] गंध. वेळवेळा–वेळोवेळा–सहज अवलीला. माघाली फेडी निडळा=पण (निडळ–निटिल) कपाळ घालील किंवा वाढून टाकिल असें थोडेच. [निठिल=निढल कपाळ. निटल ईक्षण; =निटल अक्षः=शिव. (२२३) आंतळे=झाले. (२२४) मिसके=निमित्तानें, मिसें, टके–ठाके यया–ईया. (२२६) परी=प्रकार. जाईजे हारी– न जाईजे हारी=फळाशेच्या स्वाधीन, जाऊ नये, होऊ नये. (२२७). बोध उद्दीपे=ज्ञान प्रगटे. (२२८) अविद्येसी=अज्ञानासहित, अज्ञानासह. ऐसे–जै ऐसे. ते–तै. (२२९) यापरी–इयापरी. कर्मे करिता मानुत्यागी–कर्मे त्यजि तो महा त्यागी. ये मूर्छे–येरे मूर्च्छे–येर मूर्च्छने. [मूर्च्छा=भोंवळ, बेशुद्धी, अज्ञानः मूर्च्छन=वाढः मूर्च्छनं, मूर्छना=वाढ, पाऱ्याचें भस्म करणें, स्वराचा चढ उतार, प्रत्येक दोन स्वरामधील तीन तीन सूक्ष्म स्वरांश. विसावा जैसा–विश्रांति जैसी. रोगी=(रोगिन्=आजारी) आजाऱ्यास. (२३०) जिणे कर्मी एकी–कर्मी शिणे एकी. की–तो. धाडणें–सोसणें. (२३१) जेणें–तेणें. निष्कृति=नैष्कर्म्यतेच्या योग्यतेस प्रायश्चित्त, उपकाराची फेड, माफि, क्षमा, धिक्कार, टाळणें. (२३२)

हे अर्जुना, असें हें लक्षांत येतें कीं, जो देहधारी आहे, जे देहधारी आहेत, जे ह्या देहाची मूर्ती मिळूनही कर्माबद्दलची चिंता कां काळजी वाहातात ते अडाणी, अज्ञानी, व्यर्थ जगणारे जाणावेतः [अर्जुना, देह तर प्राप्त झाला पण कर्माचा कंटाळा, असे लोक अज्ञानी म्हटलें पाहिजेतः मातीचा कंटाळा करून मातीचें कसें चालेल? हिंग घाणीला कंटाळला म्हणून त्याला सुगंध थोडाच येणार आहे? तसें हा देह जोपर्यंत आहे तोपर्यंत कर्मत्यागाचें वेड काय कामाचें! शरीराच्या रूपानेंच येथें कर्म अवतरलें आहे, तेथें कर्म कसें टाकतां येईल? श्वासोच्छ्वासादिक स्वाभाविक कर्मे आपल्या झोपेंतही चालू असतात, विहित कर्मे टाकण्याचा एकच मार्ग व तो म्हणजे फलाशा न धरणें हा आहे. आत्मज्ञानानें अज्ञानाबरोबर कर्माचा नाश होतो व असा त्याग करणारा तो खरा त्यागी.] (२१८)

अहो, ह्या मृत्तिकेचा (ह्या मातीचा, माती जड का हलकी, कंटाळा करून–त्रास मानून अप्रियपणास येऊन माती जडाचा) कंटाळा करणें घड्यानें का घटानें तर तें कसचें त्याचें असणें कां घटपण पावणें तें! अहो, पट म्हणजे जें वस्त्र आहे तें आपलें तंतुपण सांडील काय? निखळ तंतूचें विणलेलें तें वस्त्र, तेथें त्या वस्त्रानें तें तंतूपण टाकणें केव्हांहीं नाहींच! (२१९)

उष्णतेचा अमिला कंटाळा येईल काय! कंटाळणें केन्हांहीं नाहींच, दीप तो आंगच्या प्रभेच्या कांतीचा द्वेष करतो काय? (नीट प्रकाशत नाहीं म्हणून, का प्रकाशणें होत नाहीं म्हणून!) (२२०)

हिंग आपल्या घाणीस त्रासला जरी, तरीपण तेथें सुगंधत्व कांहीं त्याचेनें आणणें होणें नाहीं, मग त्याचें तें त्रासणें काय उपयोगाचें? तरी अहो पाणी जे आहे, ते आपले द्रवपण टाकून कसें तें असणार? राहाणार! तें तर द्रवपणच एक ना! ह्या देहापाण्याचें जसें! (२२१)

त्याप्रमाणें ह्या शरीराच्या आभासानें (तेथीलच्या प्रभा–कांतींच्या स्वल्पपणानें, अभासानें, प्रकाशानें, प्रतिच्छायेनें, भ्रमानें,) जोपर्यंत देहाची मूर्ती लाहून शरीरधारी नांदत आहे तोपर्यंत तेथें अहो, कर्मत्यागाचें तें वेडेपण तें कशास पाहिजे? तें वेडेपण कसचें न् काय? (२२२)

अहो! ह्या कपाळास जें कांहीं टिळ्यानें शोभविणें–, जसें कां नशीबच का दैवच एक उगवावें, रात्रंदिन जेथें–, तेथें आपणच तो टिळा लाविला तेथें, वेळोवेळां, वरचेवर कीं, का सहज अवलीळाच पुसणें विचारणें करीत आहे ह्या देवाबाबतचें जसें! अहो येथें तो कपाळच तें दैव मुळीं घालील अथवा तें काढून टाकील असें, कपाळ–दैव–घालील असें त्यास कांहींतरी करिता येईल काय? (२२३)

त्याप्रमाणें आपण स्वतःसचमुळीं तें [विधीप्रमाणें (शास्त्राधारें) योग्य का] विहितकर्म–आदर गौरवाचें करून आहे जो त्यानें, तें त्यज् म्हणावें तर त्यजिलें होतें; पण जें कर्म पाणी देहानें (देहाकडून) झालें तें सांडू म्हटलें तरी सांडणें होणारें नव्हेच. (२२४)

झोप लागली तरी श्वासोच्छ्वास घेणें चालूं असतेंच. तेथें कांहींही न करणें असेंच तें प्रकाराचें का परीचें श्वसणें होय. (२२५)

ह्या शरीराच्या गरीबीपणावर–निमित्तानें कां मिसे करूनच कीं अहो कर्म हें सर्व आहे (असिके) तें, तर जिवंतपणीही संपणारें नव्हे. मरणें केलें तरीपण, तें सुटणारें नव्हेंच; ह्या रीतीनीं जगणें मरणें झालें तरी, कर्म तें सुटत नाहीं. (तें कर्म दैव असें उभें होत नाहीं.) (२२६)

**निष्काम कर्मः—** **२२७ ते २३२**

ह्या कर्मा सांडिती परी, प्रकाराप्रकाराची झाल्यामुळें तेथें (त्यागणेंच जसें, ती) प्रकारणा का रीती एकच आहे. ती ऐक, ती योग्यता म्हणजे फळाशेच्या आहारीं=स्वाधीन जाऊं नये; जी तन्हा आचरल्यानें फळाशेच्या द्वारीच जाणें होतें–ती सांडावी (परिकर्मा म्हणजे अलंकारच एक धारण केला असें तें होय :: शुद्धीच आपली केली असें तें जाण.) (२२७)

अहो! कर्मफळ तें ईश्वराच्याठायीं अर्पण केल्यानें परमेश्वराच्या (प्रसादानें) प्रसन्नतेनें बोधच एक वर येतो, बुद्धीस मिळतो, ज्ञान प्रगटतें. तेव्हां तर अहो! हा जगत्‌रूपी व्याळ नसून, एक रज्जूच आहे. असें स्पष्टपणें समजू लागून ती व्याळाची शंका, (भीती, संशय) संदेह नाहींसा होतो. (२२८)

अशा त्या स्पष्ट ज्ञान प्रगटतेनें–आत्मबोधानेंच मुळीं तोषणा–तुष्टी होते–, अविद्या अज्ञानासह सर्व कर्म नाश पावते. हे पार्था! येथें आतां त्यजिजे (त्यजिजे म्हणून जें कांहीं मोठ्या आवेशाचें म्हणणें) तेंच मुळीं येथें त्यजिलें साडलें होतें, (व तो त्यागी होतो.) (२२९)

करितां याप्रमाणें ह्या जगामध्यें–(जनामध्यें–लोकामध्यें) कर्म करण्यानेंच कीं अहो! त्यागासच मान मिळतो. सहज त्याग सन्मानाचा होतो–तेथें अहो हे मूर्च्छे म्हणजे (अज्ञान, भोंवळ, वाढ, बेशुद्धी कां स्वराचा चढ उतारच तो जसा कां) आजाऱ्यास मिळालेला विसांवा होय विश्रांतीच होय. याप्रमाणें ह्या जगीं येथें कर्में त्यजी तो महात्यागी–व विचेष्टतेस मूर्च्छनेस काय म्हणावें तों ती आजाऱ्याची विश्रांतीच म्हटली का असें नांव दिली गेली. (२३०)

त्याप्रमाणें एका कर्मामध्यें शिणणें तेंच आणिक दुसऱ्या (कर्मामध्यें–कर्मात) कर्मानें विसांवा पाहिला असें आहे. जिणणें, जिंदगी–जगणें, कर्मानें एका, तेथें दुसऱ्या आणीक कर्मानें ती जिंदगीच मुळीं स्थिर केली होते. जसें का (दांड्याचा घाव बुक्कयानीं सोसणें) दांडा जो त्याचे घाय दाय ते बुक्कयानीं धाडले सोसले जसें कां. (२३१)

पण असें हें असो वारंवार असेंच म्हणणें होतें. कीं तोच मुळीं ह्या तिन्ही जगतामध्यें त्यागी म्हणावा कीं, ज्यानें फळाच्या हारी न जातां फळत्यागानेंच मुळीं कर्म जें तें निष्कर्म स्थितीस–नैष्कर्मतेच्या योग्यतेस नेलें–उपकाराची फेडच केली. प्रायश्चित्तच घेतलें क्षमाच एक आचरिली–सर्व माफीच एक असें तें कर्म, कर्माच्या आहारी न जातां संपादिली होते. (२३२)

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥**

मिश्र=मुख्य, श्रेष्ठ, सन्मान्य, पूज्य, हत्तीभेद, मोठा मुळा, जोडलेले, मिस केलेले विविध. (ज्यो.) कृत्तिका व विशाखा नक्षत्र. [मिश्रकावर्ण=नंदनवन. मिश्रव्यवहार=गणना भेद–(ग.) मिश्रओदन= खिचडी. मिश्रक=भेसळ करणारा, मिसळीचे. विविध, नंदनवन, मुळा.] अनिष्ट=अपराध, पाप, अशुभ, नुकसान, संकट, अप्रिय, निषिद्ध. (अनिस्तीर्णाभियोगः=निरुत्तर. आरोपी) इष्ट=(इष्) हितावह, योग्य, यज्ञानें पूजिलेले, शमी (व.) यज्ञ पुण्य, प्रिय, इच्छिलेले, कल्पिलेले; (१) अग्नि, होम, (२) तप. (३) सत्य. (४) वेदरक्षण. (५) आतिथ्य. (६) वैश्वदेव. [इष्टकर्मा=(ग.) कल्पित अंक धरून गणित सोडविणें. इष्टभागिन्=कृतकृत्य. इष्टका=देवीविशेषः इष्ट(ष्टि)का=वीट. इष्टकाचयनं=यज्ञाग्नि ठेवण्याचा विटांचा विशिष्टाकृति ओटा. इष्ट(ष्टि)कान्यास:=घराचा पाया घालणें. इष्टापूर्तें=इष्ट व पुर्त ही पुण्यकर्में. इष्टि=इच्छा, प्रयत्न, इष्ट गोष्ट, यज्ञ, दर्शादिकर्म, आमंत्रण.] प्रेत्य=मरणानंतर, परलोकीं. प्रेत्यभाज्=कर्मफल भोगणारा. प्रेत्यभाव=पुनर्जन्म. अत्यागी=कर्म न टाकणारा. त्याग न करणारा, विषय त्याग न करणारा, दान न देणारा, औदार्याचा नाही असा. नच तपस्वी असा. त्यागी=दाता, संन्यासी. त्यागपत्र=सोडचिठ्ठी (न देणारा).

अन्वयः—कर्मणः फलम् । त्रिविधं । भवति । अनिष्टं । इष्टं । मिश्रं । च । तत् अत्यागिनाम् प्रेत्य भवति । तु । क्वचित् संन्यासिनाम् न (प्रेत्य) भवति ॥ १२ ॥

अर्थः—कर्म करणाराला तीन प्रकारचें फळ मिळतें, एक अप्रिय, दुसरें हितावह व तिसरें मुख्य असें; ते अत्यागी जे त्यांना मरणानंतर भोगावें लागणारें असें असतेंच. संन्याशाला मात्र त्याचें फळ मरणानंतर भोगावें लागणारें (असतें व) नसतें.

फलासक्तीचा त्याग न करणारे अत्यागी–त्यांनां मरणानंतर मिळतात अशी त्रिविध फलें (१) पशु आदि योनि प्राप्ति का नरक दुःख (२) स्वर्ग आदिकरूनची प्राप्ति का संसारिक सुख (३) मनुष्य योनीमध्येंच कधीं सुख तर कधीं दुःख. खऱ्या संन्यासीयांनां कर्तृत्वाभिमान व कर्मफल सोडून कर्म करणारे जे त्यांनां ही भोगावी लागत नाहींत. (श्लोक १२ वा, ओव्या २३३ ते २७७)

**येऱ्हवी तऱ्ही धनंजया । त्रिविधा कर्मफळा यया ।**
**समर्थ ते की भोगावया । जे न सांडितीचि आशा ॥ २३३ ॥**
**आपणचि विउनि दुहिता । न मम म्हणे पिता ।**
**तो सुटे की प्रतिग्रहिता । जावाई शिरके ॥ २३४ ॥**

विषाचेही आगर वाहाती । ते विकिता सुखे लाभे जिती ।
ये निमाले जे घेती । वेंचुनि मोले ॥ २३५ ॥
तैसे कर्ता कर्म करू । अकर्ता फळ आशे न धरू ।
येथ न शके आवरू । दोघातेही कर्म ॥ २३६ ॥
वाटे पिकलिया रूखाचे । फळ अपेक्षी तयाचे ।
तेवि साधारण कर्माचे । फळ घे तया ॥ २३७ ॥
परि करूनि फळ ने घे । तो जगाच्या कामी न रिघे ।
जे त्रिविध जग आघवे । कर्मफळ (कमळ) हे ॥ २३८ ॥
मनुदेव मनुष्य स्थावर । या नांव की जगडंबर ।
तरी हे तंव तिन्ही प्रकार । कर्मफळ पै ॥ २३९ ॥
तेचि येक गा अनिष्ट । येक ते केवळ इष्ट ।
आणिक येक इष्टानिष्ट । त्रिविध ऐसे ॥ २४० ॥
परि विषयमंता बुद्धि । आंगिसुनि अविधि ।
प्रवृत्ती (प्रवर्तती) निषिद्धी । कु व्यापारी ॥ २४१ ॥
तेथे कृमी, कीट, लोष्ट । हे देह लाहाती निकृष्ट ।
तया नाव ते अनिष्ट । कर्मफळ ॥ २४२ ॥
का स्वधर्मा मानु देता । स्वाधिकारू पुढा सुता ।
सुकृत कीजे पुसता । आम्नायाते ॥ २४३ ॥
तै इंद्रादिका देवांची । देहे लाहिजति सव्यसाची ।
तया कळा (कर्मफळा) इष्टाची । प्रसिद्धि गा ॥ २४४ ॥
आणि गोड अंबट मिळे । तेथें रसांतर फरसाळे (फळरसाळे) ।
उटी दोही वेगळे । दोही जिणते ॥ २४५ ॥
रेचकुचि योगवशे । होय स्तंभावया दोषे ।
तेवी सत्यासत्य समरसे । असत्य सत्यासत्यचि जिणिजे ॥ २४६ ॥
म्हणोनि समागे (समभावे) शुभाशुभे । मिळोनि अनुष्ठानाचे उभे ।
तेणे मनुष्यत्व लाभे । ते मिश्रफळ ॥ २४७ ॥
एवं त्रिविधा या भागी । कर्मफळ मांडले असे या जगी ।
हे न संडी तयासी भोगी । जे सूदले आशा ॥ २४८ ॥

यया– गा यया. [ त्रिविध (त्रिवृत्त=तीन पदरी, त्रिगुणात्मक अहंकार, तीन प्रकारचे, त्रिवर्णात्मक–ओंकार–त्रिसुती दोरी, यज्ञ, यज्ञविशेष.] (२३३) न मम–की न मम. प्रतिग्रहिता=दान घेणारा. [प्रतिग्रहिता–ग्रह+पति=दान घेणें, विरोध करणें, संमती देणें, आश्रयणें, स्वागत करणें, विवाह करणें, हरण करणें, अनुसरणें.] शिरके–सिरके. (२३४) आगरही=बाग किंवा शेतें. (२३५) दोघातेही–दोहीते. तैसे–तैसा. कर्ता–करिता. फळ आशे–फळाशा. [शकते–शक् (शक्र)=समर्थ असणें, बलवान् असणें, संभवणें, शक्य असणें.] (२३६) घेतया–घे तया. (२३७) अघवे–अवघे. (त्रि=तीन. विश्व=प्रकार, इत्तीचें अन्न, विमान, वेध करणें, समृद्धि.) (२३८) देवमनु–देव मनुष्य स्थावर–देव मनुष्य स्थावर–देव मनुष्य स्थावर. देव=ईश्वर, देवता, राजा. मनु–मनुज, मनुष्य=मानव, माणूस. स्थावर=स्थितीशील अबल. जगडंबर =जग, लोक, जगत् प्रख्यातीचे–विस्ताराचे, समुहत्त्वेकरून भाषणच एक सुंदर असें. या–यया. तरी–

आणि तरी. कर्मफळ पै–कर्मफळाचे. (२३९) आणीक–आणि. (२४०) विषयमंता–विषयमता = विषयासक्त. प्रवर्ती–प्रवर्तती. निसिद्धी–निषिद्धि. कुव्यापारी = (कु = वाईट, निंद्य, अल्प, पृथ्वी, त्रिकोणाचा पाया, व्यापार = कर्म.) अविधान–अविधि = ब्रह्म–ज्याचा निर्देश करणें कठिण तेथें नियमविरुद्ध वर्तन करून. (२४१) कृमी–क्रिमी. किट–कीट. नांव–नाम. (क्री = विकत घेणें) (२४२) आम्नायातें = वेदातें, वेदांना, वेदास. (२४३) इंद्रादिका–इंद्रादिक. कळा–कर्मफळा. (२४४) अंबर (व्यक्तिपाठभेद)–अंबट–आंबट. तेथें–तेथ. फरसाळे–फळरसाळे = स्वाद. दोही वेगळे–देही वेगळे. दोही–दोन्ही. जिणते = दोहीपेक्षां वरचढ. (२४५) रेचकुचि–रेचकचि = बाहेर सोडण्याचा प्राणवायु. स्तंभावया दोषे = कुंभक होण्यास कारण होतो. समरसे = ऐक्याने. असत्य–सत्यासत्यचि. जिणिजे = जिंकीले जाते. (सत्यानृतं = वाणिज्य, व्यापार.) (२४६) समभागे–समभावे. उभे–उभारणीं. (२४७) एवं त्रिविधा या–ऐसे त्रिविध यया. मांडले असे–मांडलेसे. संडितयासी–सांडीतया. सुदले आशा = आशेने गुंडाळले. (२४८)

### कर्मफलाचे इष्टानिष्ट प्रकार व तदनुसार येणारे जन्मः— २३३–२४८

येऱ्हवी पाहिले असतां हे धनंजया ! पार्था ! अशा ह्या तीन तऱ्हाचें कर्मफळास भोगण्याची पात्रता त्याच्याच आंगी येते–असते कीं जे आशा मुळींच सोडीत नाहींत. ज्यांनी म्हणून ह्या भविष्याविषयींची आशा का, दिशा अथवा इच्छा ही सोडिली नाहीं, टाकिलेली नाहीं. मुळीं अशा ह्या तीन तऱ्हेच्या कर्मफळास भोगण्याची पात्रता–खाणेंपिणें, सुखदुःखाचा अनुभव शरीर, हितकर, उपयुक्त, बलवान असें घेऊन असतात. (२३३)

आपणच दुहितेला जन्म दिला (प्रसवला, व्यायला) –प्रभुत्वपणाचा–तरी तो पिता तो तर 'न मम' माझें नव्हे असें म्हणतो. येथें अहो, तो तर प्रतिग्रह जो तो जांवयाच्या मस्तकीं मारून ठेवून आपण त्या प्रतिग्रहापासून मोकळा होतो, सुटतो कीं. (२३४)

अगदीं आगरच कीं विषाचे असे वाढून असतात, ते विष विकण्यानें वर तर सुखाच्या लाभानें जगतात, जिंकतात, दुसरे जे कोणी आपलेपण, मोल वेंचून किंमत देऊन विकत घेतात, असे ते कितीतरी निमाले आहेत कीं. (२३५)

तसें, त्याप्रमाणें कां येणेंप्रमाणें **कर्ता** हा कर्म करो अथवा न करो **अकर्ता** तो फळाची आशा (करो का) न धरो, तरी अहो, येथें तर ह्या दोघांनाही दोहींनाही कर्म कांहीं आवरू शकत नाहीं. भरणें निवारण करीत, लपवूं, झांकू शकत नाहीं. (२३६)

(१) वाटेनें जातां जातां भेटलेल्या एकाद्या वृक्षाचे जे त्याचे पिकलेलें फळ घेणाऱ्यांस (जो त्याचें फळ घेऊं इच्छितो, अपेक्षितो, तसें) साधारणच, एक समाईक, मध्यम, तें कर्माचें फळ होय.

(२) वाटेनें–वाटेमध्येंच, का मार्गानें, जात असतां, एकाद्या पिकलेल्या वृक्षाचें फळ इच्छावें, अपेक्षावें, जसें तें सर्वांस लागू असें, सामान्य सर्वोपयोगी, समाईकतेनेंच मिळणारें तसेंच, फळ घेणारा, जो फळ घेईल त्यास तें कर्माचें फळ, मध्यम असेंच अनेकांचें हेतु आभास विशेषत्वेंकरून समाईकतेचें होय. (२३७)

प्रारंभ करून (समूहत्वेंकरूनचें असें जें तसें तें करून, तेथें अलंकार धारण केला अथवा शुद्धीच एक पाहिली, कमरच मुळीं बांधली तें करण्यास गृह जसें का शेतीचें राहाणें जें तेंहीपण जोडलेलें. तेथें विश्रांती ही जमिनीवरची, का पलंगच एक मांडला अशी ती.) फळ घेत नाहीं तो जगाच्या कामामध्यें (विषयेच्छा, काम भोगेच्छा इच्छा इच्छितार्थ. स्वेच्छा, खुशालपणें, संतोषणें, ज्यास्त चांगले समजून चालेल म्हटले.) शिरत नाहीं, आपला रिगाव करीत नाहीं. त्यानें असेंच समजूतीचें केलें कीं, कर्मफळ म्हणजे अवघे सर्व हें त्रिविध म्हणजे तीन प्रकारचें जगच एक जाण. (२३८)

देव मनुष्य, स्थावर ह्यांस मिळूनचमुळीं जगडंबर, (जगत्, जन, लोक, गर्व, अवडंबर, सादृश्य, समूह प्रसिद्धी) हे नांव आलेलें आणि म्हणूनच की हे तिन्ही सादृश्यतेचे–भेदाचे–प्रकारचे असे म्हणजे कर्मफळच होत. (२३९)

असें तें एक प्रकारचें अनिष्ट, अप्रिय असें, व दुसरें तें केवळ इष्ट, हितावह असें आणि आणिक एक तिसरें तें इष्टानिष्ट, मिश्र, मुख्य असें त्रिविध, तीन प्रकारचें, भेदाचें, सादृश्यतेचें असें. (२४०)

बुध्दी ही विषयासक्त अशी आपल्या आंगची करून–नच अनुष्ठानानें, नच नियमानें, नच उपायानें जे कुव्यापारीनेंच (मुळीं, निंद्य कर्मानेंच मुळीं, अल्प कर्मानें) निषिध्दाच्या ठायींच प्रवर्ततात. (२४१)

तेथें कृमि, किडामुंगी, कीट, किडा, कीटक, लोष्ट म्हणजे मातीचें ढेंकुळ, लोखंडाचें कीट, असें हलकें, अधम, निंद्य देह लाभतात, पावतात. अशासच मुळीं ते 'अनिष्ट' असें नांव येतें. (२४२)

स्वधर्मास मान दिला असतां–नेहमीं तोच स्वधर्म एक मानून आहे तोच वागवीत आहे तेथें स्वाधिकारच एक पुढें करून महत्वमान्य केला–उपजविला, उगवूं केला. तेथें आम्नायते म्हणजे वेदांना विचारलें असतां शब्दब्रह्म तेंच मुळीं जेथें तेथें अनुमतीस घेऊन, सुकृत आचरणें होत आहे. (२४३)

तेव्हां तर अहो इंद्र, अग्नि, वायु आदि जे देव त्याची देहे हे सव्यसाची, अर्जुना! पावली होतात. देवाचे देहचमुळीं, असें जे शब्द ब्रह्म आचरणारे ते होत. तेथेंच मुळीं इष्ट असें कर्मफळ प्रसिध्दी पावून आहे. (२४४)

गोड आंबट रस मिसळला तेव्हां रसांतराचे स्वाद उठतात, येतात ह्या दोन रसांपेक्षां वरचढ असें (फळ रसाळ) स्वाद येऊ लागून ह्या दोन्ही रसांना जिंकणारे होतात, जिंकतातच की, जिणतातच. (२४५)

बाहेर सोडावयाचा जो वायु श्वासोच्छ्वास करतांना जो काही वायु बाहेर सोडला जातो तोच योगवशेकरून योगबळावरच मुळीं स्तंभावया उद्देश होतो, कुंभक होण्यास कारण होतो ज्याप्रमाणें, त्याप्रमाणें सत्य व असत्य यांच्या ऐक्यानें शपथेनें खोटेपण व्यापारणें जिंकलें जातें. (२४६)

म्हणून सारख्या किंवा तुल्य मनोविकार, विकासानें शुभ अथवा अशुभ अशी दोन्ही मिळून अनुष्ठानाचें तें कार्यारंभाचें का सिद्धतेचें तें उसें म्हणजे उभारणें झाल्यानें, तेथें मनुष्यपण, मनुष्यत्व, माणुसकी, जी कांहीं तें मिश्र (मिसळं असें सभ्य गृहस्थपणाचें) फळ होय. (२४७)

याप्रमाणें ह्या तीन (त्रिविध यया भंगि) तऱ्हेच्या भागामध्यें दैवामध्यें वांट्यामध्येंच मुळीं हें कर्मफळ ह्या जगामध्यें मांडलेलें, देखीस दिलेलें आहे हें जे कोणी त्याग करीत नाहींत, त्यानांच हें कर्मफळ (भोगतें) उपभोगण्यास लावतें, जे कां आशेने गुंडाळले झाले गेले म्हणून कीं. (२४८)

**जेथ जिभेचा हात फाटे। तव जेविता गमे गोमटे।**
**परि परिणामी शेवटे। अवश्य मरण ॥ २४९ ॥**
**संवचोर मैत्री चांग। जव न पविजे ते दांग।**
**सामान्य भली आंग। न शिवे तंव ॥ २५० ॥**
**तैसे कर्म करिती शरीरी। लाहती महत्वाची फरारी।**
**पाठी निधनी येकसरी। पावती फळे ॥ २५१ ॥**
**समर्थु का ऋणिया। मागो आला वाहणिया।**
**न लोटे तैसा प्राणिया। पडे ती भोगु (पडे तो भोग) ॥ २५२ ॥**
**मग कणिसोन कणु झडे। तो विरूढला कणिसा चढे।**
**पुढती भुई पडे। पुढती उठी ॥ २५३ ॥**

**तैसे भोगीजे फळ होय। ते फळांतरे वीत जाय।**
**चालता पावो पाय। जिणिजे जैसा ॥ २५४ ॥**
**उताराचिये सांगडी। ठाके ते ऐलथडी।**
**तेवी न मुकती ओढी। भोग्याचिये ॥ २५५ ॥**
**पै साध्य साधन प्रकारे। फळ भोगु तो गा पसरे।**
**एवं गोविले संसारे। अत्यागी ते ॥ २५६ ॥**
**येरी जाईच्या फुलां फाकणें। तयाची नाव तया सुकणें।**
**तैसे कर्म मिसे न करणें। केले जिही ॥ २५७ ॥**
**बीजचि वरोसी वेंचे। तै वाढती कुळवाडी खांचे।**
**तेवी फळत्यागे कर्माचे। सारिले काम ॥ २५८ ॥**

येथ–जेथें. जिमेचा–जिव्हेचा. हत–हात. गमे–वाटे. परी–मग. अवस्य–अवश्य. (२४९) सामान्य–सामान्या. सिवे–शिवे. (२५०) समर्थु का ऋणिया–जैसा समर्थ आणि ऋणिया. पडे ती–पडे तो. (२५०) कणिसोन–कणिसोनि. भूई–भूमी. पावो पाय–पाये पाय. (२५४) ऐल–ऐलीच. मुकती–मुक्जिति. (२५५) अत्यागीते–अत्यागि ते. (२५६) येरी जाईचया फुला फांकणे–येऱ्हवी जाति पुष्पाचे विकसणें. तयाचि नाव–त्याचि नाम. केली–केले. (२५७) तै–तेथें. (२५८)

**जीवास सतत संसार कां :—**

जेथें जिव्हेचा हात स्वच्छंदपणें फिरतो खादाडपणच एक परिणाम करून असतें तेथें तर अहो मोठे गोमटें चांगलें असेंच जेवतांना वाटतें पण परीणामी तर न टळणारें असें निःसंशय कांहीं झालें तरी मरणच एक न टळणारें असें होतें. (२४९)

संवचोराची सोबत केली, चोर सोबती केला त्याची मैत्री चांग चांग भली, भली अशी वाटते जोपर्यंत दांग, अरण्य आलें नाहीं तोपर्यंतच. अहो, सामान्या जी वेश्या ती भली अशीच सभ्यतेच्या आंगानें असते, जोपर्यंत तिचे आंग स्पर्शलें नाहीं तोंपर्यंत. (२५०)

त्याप्रमाणें ह्या शरीरामध्यें अथवा देहीच्या ठायीं मोठेपणाचा भास–फरारी–लाभतात, मिळवितात व नंतर मग एकसारखी ती फळेंच मुळीं नाशाची गरीबपणाची बाहेर निघणारी होतात मरणाचे वेळेस तींच फळें सर्वत्र परीणाम करूं लागतात. (२५१)

जसा समर्थ, श्रेष्ठ, बलिष्ट व सावकार हा मार्गी म्हणजे वायद्याच्या मुदतीस आला तर तो जसा टाळता येत नाहीं तसा ह्या प्राण्यांस तो भोग सुखदुःखाचा अनुभव होतो, होत असतो; तसें तें शरीर ह्या प्राण्यांस असतें–तें भोगणें, सोसणें पडतेंच, भोगावें लागतेंच लागतें. (२५२)

कणसांपासून जो कण पडतो तो ( पेरल्यानंतर ) उगवला म्हणजे पुन्हां कणसाप्रत येतो आणि पुन्हां तो भूमीमध्येंच पडतो व पुन्हां उगवतो, कणसास येतो. (२५३)

त्याप्रमाणें भोगांमध्यें–उपभोगांमध्यें जें फळ असतें तें दुसऱ्या कर्माच्या फळानें प्रसवत जातें, चालतांना पायानेंच मुळीं पाय हा जिणावा लागतो जसा, चालण्याच्या अनुकूलतेचा करावा लागतो जसा. (२५४)

पैलतीर गांठण्यास उतार आहे तेथें सांगड जी जिची संगती बरोबरी जोडी केलेली असते ते तर ऐलथडी म्हणजे अलिकडच्या तीरावरच मुळीं असते. ठाडी ठाकते, उभी असते ज्याप्रमाणें त्याप्रमाणें भोग्य-जात जे आहे त्याच्या ओढीमुळें तें भोगण्याचें करण्यास होण्यास ते कांहीं मुकत नाहींत–भोग्य जें त्याची ओढी त्यास भोगातून मुक्तविण्याचें करीत नाहीं. (२५५)

पण साध्य जें कांहीं आहे तेथें जो कांहीं साधन प्रकार योजला असेल त्या साधन प्रकारावरच मुळीं तो फळभोग पसरिलेला असल्यानें तेथें साधन अत्यागिते जें तेंच मुळीं संसारानें गोविलेलें होत. (२५६)

अत्यागितें जें त्याच्याशिवाय दुसरें जें तेथें तर जसें का जाति पुष्पाचें विकसणेंच एक, का जाईच्या फुलाचें फाकणेंच जें तेंच मुळीं सुकणें म्हटलें तसें कर्माच्या मिसानें केलेलें तेंच न करणें केलेलें असें त्यानीं केलें. (२५७)

बीजच त्या वरूनें (वरोनें, वरानें) वेंचलें खर्च केलें झाल्यानें तेथें वाढती व्हावी अशी जी कुळवाडी तीच खांचतें–खचते–तिचे डोळेच (बुद्धि डोळस असें होत नसल्यानें) ते खांचले होतात, त्याप्रमाणेंच फळत्यागानें कर्माचें कामच सर्वथैव संपविलेलें होय. (२५८)

ते सत्वशुद्धि साह्यकारे । गुरुकृपामृत तुषारे ।
सिंचिनलेनि बोधे वोसरे । द्वैत दैन्य ॥ २५९ ॥
तेव्हां जगदाभास मिसे । स्फुरे त्रिविध फळ नाशे ।
येथ भोक्ता भोग्य अपैसे । निमाले हे ॥ २६० ॥
घडे ज्ञान प्रधानु ऐसा । संन्यासु जया वीरेशा ।
तेचि फळ भोगही सोसा । मुकले गा ॥ २६१ ॥
आणि येरे (येणे) कीर संन्यासे । जै आत्मरूपी दिठी पैसे ।
तै कर्म येक ऐसे । देखणे आहे ॥ २६२ ॥
पडोन गेलिया भिंती । चित्राची केवळ होय माती ।
की पाहलया राती । आंधारे उरे ॥ २६३ ॥
जै रूपचि नाहीं उभे । तै साउली का ह्याची शोभे ।
आरिसे न विण बिंबे । वदन के पां ॥ २६४ ॥
फिटलया निद्रेचा ठावो । कैंचा स्वप्नासि प्रस्तावो ।
मग ते सांच कीं वावो । कोण म्हणे ॥ २६५ ॥
तैसे गा संन्यासे येणे । तंव अविद्येसीचि नाही जिणे ।
मा तयेचे कार्य कोणे । घेपे दिजे ॥ २६६ ॥
म्हणौनि संन्यासि ये पाही । कर्माची मातु कीजैल काई ।
परि अविद्या आपुला देही । आहे जै का ॥ २६७ ॥
जे कर्तेपणाचेनि थांवे । आत्मा शुभाशुभी धांवे ।
दिठी भेदाचिये राणिवे । रचिलीसी जै ॥ २६८ ॥

सत्वशुद्धी = प्रकृति स्वभाव, पवित्रता. साह्यकारे–साह्यकारें = साह्यानें, अनुकुलतेनें, मदतीनें, स्वाभाविक असें तोंडाचे भाव. तुषार = पाण्याचे–अमृताचे बारीक कण. सिंचितलेनि–सासिन्नलेनि = शिंपडण्यानें, पूर्ण झाल्यानें, सांचले झाल्यानें. (२५९) जगदाभास = जग, जन, लोक, प्रकाश, भ्रम. स्फुर = कंप, हालणें. भोक्ता = भोगणारा. भोग्य = भोग्यास योग्य. (२६०) घेपे दीजे–घेपे दीपे = घ्यावें घ्यावें. (२६६) थांवे = बळानें. (२६८)

## कर्मोत्पत्तीस व वृद्धीस हेतु पंचक— २५९–३५३

प्रकृती स्वभाव, पवित्रतेच्या साह्यानें, अनुकुलतेनें, (स्वाभाविक असे जे तोंडाचे भाव, त्यांच्या मदतीनें.) तसेंच श्रीगुरुकृपारूपी अमृत तुषार सिंचनानें तेथें बोध म्हणजे ज्ञान जागृत करणें झाल्यानें द्वैत–जीवात्मा व परमात्मा यास भिन्न मानणारे–जे भेदबुद्धीचे–दैन्य स्वारस्य हे ओसरून जाते. (२५९)

तेव्हां जगत् प्रकाश भ्रम निमित्तानें, स्फुरे, स्फुरते स्फुरणारे जे ते तीन तऱ्हेनें असलेले फळ नाहींसें होतें-झाल्यानें-येथें आतां भोगणारा व भोगास योग्य असें जें भोग्य तेंही पण आपोआपच निमालें कीं. (२६०)

असा ज्ञान बोध, बुद्धि, जाणिव श्रेष्ठपणाची, प्रधानतेची, त्रिगुणात्मिका प्रकृती (गुणमयी माया) परमात्मा बोध, श्रेष्ठ असा ज्ञानप्रधान संन्यास काम्य कर्म त्याग हे वीरेशा ! ज्यांत घडतो ते तर फळरूपी भोगाच्या सोसपणास मुकले होत.

असा ज्ञानप्रधान संन्यास हे वीरेशा ! ज्यास घडतो, त्याचें असें ते फळभोग, त्यांना फळभोग, सोसपणास मुकले होतात, सोसपण त्रास देत नाहीं. परिणाम घात होणारे ह्या शरीरावर सुखदुःखाच्या अनुभवाचे ते त्यास होत नाहींत. फळलाभ, खाणेंपिणें द्रव्य इत्यादि भोग ह्या शरीरास मिळणारे ते त्यास त्रास देत नाहींत–हपापलेपणाचे करीत नाहींत, फलप्राप्तीच्या महत्वामुळें शरीर हें सोस करणारें होत नाहीं. तेथें 'ज्ञान प्रधान संन्यासच' एक बोध सर्व महत्त्व पावून आहे असा काम्य कर्म त्यागच एक साधला, घडला. (२६१)

(मांसवसादिविकार) अशा ह्या संन्यासानें जेव्हां आत्मा, ब्रह्म, मूळ स्वभाव, आकार प्रकार इत्यादि आत्मस्वरूपामध्येंच दृष्टी ही पैसपणाची होऊन असते फैलून असते, तेव्हां कर्म एक तें करणें, काम व्यापार, हालचाल ती असेंच देखणें तें होय. (२६२)

ज्या भिंतीवर चित्रें काढलेली ती भिंतच पडून गेली तर चित्रांची तर केवळ मातीच होणारी (मातीरूपी मायाच एक झाली, देह दिवसास आली, देहजलाची झाली.) अहो, रात्रीनें उजाडणें पाहिलें, दिवस उगवत आहे असें पाहिल्यावर तेथें मग आंधारें तीं कसची बरें. (२६३)

जेव्हां का स्वभाव, प्रकार, सौंदर्य, शरीर आकृति वर्ण ते रूपच मुळीं, उभें नाहीं. अहो रूप आकृतीनें आकारलें नाहीं, उभें झालें नाहीं, तेथें साउली ती कशाची बरें शोभणारी ती ! आरशाशिवाय वदन तें कुठें बरें बिंबमंडल घेऊन असणार तें ! अहो ! आरसा नाहीं तर मुख जें तें कसें बिंबलें होइल ? का बिंब घेऊन वदन उठलें असेल असें तें कसें ? (२६४)

देहबुद्धीचा ठाव नाहिंसा झाला, अज्ञानरूपी निद्रा संपली, तेथें स्वप्नास आरंभ किंवा स्वप्नाचा प्रसंग स्वप्नच एक पडत आहे असा (स्वप्नाचा) प्रसंग केव्हांहीं उद्भवणार नाहींच, तेथें मग तें स्वप्न खरेखुरें कां मुळीं व्यर्थतेचें असें कसचें म्हणणें तें होणारें ! कोण जाणे ! कांहीं माहित नाहीं असें ह्या स्वप्नप्रसंगाबाबत म्हणणेंच नाहीं. (२६५)

तसें ह्या काम्यकर्म त्यागानें–संन्यासानें–तर अविद्येसच मुळीं जिणें, जगणें जियालेपण जीवित नाहीं जेथें-तेथें त्या (अविद्येचें--अज्ञान) मायेचें कार्य (हेतु किंवा उद्योग का करण्यास योग्य असें तें) कुणी द्यावे घ्यावे असे देहच दिव्याचे, प्रकाशाचे, दिवसाचे करून, घ्यावे (का द्यावे) ते कुणी बरें ! (२६६)

म्हणून ह्या काम्यकर्म त्यागाचे–संन्यासाचेठायीं कर्माची गोष्ट करणें ती कसची बरें ! ती कसलीही नाहीं –कर्माची गोष्ट मातच मुळीं तेथें बोलिली जात नाहीं. पण अविद्या (अज्ञान देहबुद्धि) ही ह्या आपल्या देहावर परिणाम करणारी आहे (जेव्हां) जर कां—! (२६७)

तेव्हां असें तें म्हणावें कीं कर्तेपणाच्या थांवानें म्हणजे बळानें आत्मा, उत्सुकता, उत्कंठा शुभ हितकारक का अहितकारक अशा कर्मांनी किंवा कर्मांकरिता धांव घेतो, तेव्हां तर दृष्टी ही भेदबुद्धिच्या–भेदभावाच्या जाणिवेनेंच अधिकारारूढ झाली, दृष्टि भेदबुध्दिच्या शोभेनेंच सुखभोग दिवाळी राज्यतेनें मुळीं ती रचिली उभारली असें होतें, असें होय. (२६८)

ते तऱ्ही गा सुवर्मा । बीजावळी आत्मया कर्मा ।
अपाडे जैही पश्चिमा । पूर्वेसि कां ॥ २६९ ॥
नातरी आकाशा आणि आभाळा । सूर्या आणि मृगजळां ।
विजावळी भुतळा । वायुसी जैसी ॥ २७० ॥
पांघरूनि नईचे उदक । असे नयी माजी खडक ।
परी जाणसी की वेगळिक । कोठिची ते ॥ २७१ ॥
हो कां पापिया जवळि । परि सिन्हीच ते बाबुळि ।
काई संगास्तव काजळि । दिपु म्हणो ये ? ॥ २७२ ॥
जऱ्ही चंद्री झाला कळंकु । तऱ्ही चंद्रेसी नव्हे येकु ।
आहे दिठी डोळया विवेकु । अपाडु जैसा ॥ २७३ ॥
नाना वाटा वाटे जातया । वोघा वोची वाहतया ।
आरसा आरसा पाहतया । अपाडु जेतुला ॥ २७४ ॥
पार्था गा तेतुलेनि माने । आत्मेनसि कर्म सिन्हे ।
परि घेचविजे (घेवविजे) अज्ञाने । ते कीर ऐसे ॥ २७५ ॥
विकाशे रवी उपजवि । द्रुति अली करवी भोगवी ।
ते सरोवरी का बरवी । अब्जिनी जैसी ॥ २७६ ॥
पुढत पुढती आत्मक्रिया । अन्य कारणकाची तैसिया ।
करूं पांचाही तया । कारणा रूप ॥ २७७ ॥

तऱ्ही–तरी. सुवर्मा=(वर्मन्=क्षत्रियाची पदवी, प्रहारवर्मा, रविवर्मा) आश्रय, शुभ, उत्तम, उत्तम, अतिशय साल. बीजावली–बिजावलि=वेगळेपणा, दुजेपण, द्वैतभाव, भिन्नता, मूळ कारण, परंपरा, आशय, सत्य, बीज, पंगत, ओळ. अपाडे=अत्यंत. (२६९) (आभा=कांती, शोभा) आकाश=अवकाश, पोकळी, आभाळ. भुतळा=पृथ्वीतळा, पृथ्वीची सपाटी. (२७०) पांघरूनि–पांघरोनि. नयीमाजि–नयीचि माजी. जाणसी–जाणिजे. कीं–का. कोठिचि–कोठीची=कोटपटीची. (२७१) पाणिया–उदका. सिन्हीच–सिन्हानीच =वेगळीच. बाबुळी=शेवाळ. काइ–काय. दीपु–दीप. (२७२) दिठी डोळ्या–दृष्टी डोळ्या. अपाड= अत्यंत विलक्षण अंतर. जैसा–जेतुला–तेतुला. (२७३) वाटा वाटे जातया=मार्ग व मार्गस्थ यांत. आरसा–आरिसा. अपाड=मोठे अंतर. (२७४) आत्मेनसी–आत्मनेसी. सिन्हे-सिने. घेचविजे–घेवविजे. अज्ञाने ते कीर ऐसे=अज्ञानामुळे आत्मा व कर्म एकत्र वाटतात. (२७५) रवी–रवीते. अब्जिनी–अब्जिणी विकाशे=अब्जिनी कमळिणी विकासानें सूर्य उगवल्यानें प्रगट करितात, सूर्योदय झाल्याचें कळवितात. (द्रुती) मकरंदाचा (अलि) भ्रमराकडून भोग घेववितात. (२७६) आत्मक्रिया अन्यकारण का=कमल-क्रिया अन्यकारण म्हणजे सूर्य उगवल्यानें प्रगट करितात, त्याप्रमाणें आत्मक्रिया म्हणजे आत्म्याच्या ठिकाणीं असणारीं कर्मे, अन्य कारणानें (मुळें) होतात. तया कारणा रूप करूं=तीं कारणें आतां सांगण्याचें करतों. [कारण कारणं=सूक्ष्म भूतें किंवा परमाणु. कारणिक=घडवणारा, परिक्षक. कारण=साधन, हेतु, फल, उत्पादक, मूलतत्त्व. कारू=कलाकुशल, कारागिर, (उदा. सुतार, कोष्टी, न्हावी, धोबी, चांभार) सेवक.] (२७७)

हे सुवर्मा! उत्तम तेंच आश्रय केलें आहे ज्यानें अशा अर्जुना! दृष्टीभेदाच्या राणिवे रविलीसे जै-तै आत्म स्वतःचे हितच, कर्म तें झाले–आत्मलाभ झाल्यानें कर्मामध्यें आनंद मानणारा, तेथें काम–काज कर्म तें स्वतःचें हितच पाहिलें असें पण येथें आत्मा व कर्म ह्याची बीजावळि म्हणजे भिन्नता, वेगळेपणा,

दुजेपण का द्वैतभाव पाहावा तो, मूळकारण परंपरा बीज पहावें तो ती तर मोठ्याच मोठ्या अंतराची जशीं, का पश्चिम व पूर्व ह्यांमधील अंतराची परंपरा ती. (२६९)

किंवा अवकाशच जो सर्व–तें आकाश म्हटलें, त्यास व आभाळास अभ्र जेव्हां येतें, तेव्हां त्या अवकाशामध्यें व अभ्रामध्यें अहो सूर्य जो ज्यामुळेंच मुळीं हें मृगजळ उगवणारें, वाहाणारें पृथ्वीचा तळ का पृथ्वीची सपाटी ही वायूस जशीं कां भिन्नताच एक, तेथें मूळकारण परंपरा, सत्य, बीज, आशय पहावा तो त्यामध्यें द्वैतभावच एक, दुजेपणच तें, भिन्नता, का वेगळेपणाच मुळीं. (२७०)

नई–नदीमध्येंच खडक तो नदीचे–नईचे उदक पांघरून असतो जसा, पण तेथें ती वेगळीक कोठची ती, कां कोटपटीची ती कीं ! (२७१)

अहो ! पाण्याजवळीच, जवळची पाण्याजवळच असणारी अशी पण, बाबुळी म्हणजे शेवाळे ते निराळेंच कीं, अहो ! काय अहो ! दिव्याचा–दीपाचा संग, आवड, आहे म्हणून काय काजळी ही दीप म्हणावी ? दीप म्हटली जाते ? (२७२)

जरी चंद्राचे ठायीं कलंक जाहला तरी चंद्र व कलंक कांहीं एक नव्हत–कलंक कांहीं चंद्र म्हटला होत नाहीं. त्याप्रमाणेंच कीं अहो ! दृष्टीमध्यें विवेक–विवेकाची ती दृष्टी तेथें तसलाच तितकाच मुळीं का अत्यंत फरक जाणावा कीं. (२७३)

वाट का मार्गस्थ, वाटसरू यामध्यें वाटेनें जात असणारे जे मार्गस्थ त्यांना मार्ग किंवा वाट जशीं वोसरावी लागते, शोधण्याची होते, कदाचित् किंवा ओघाबरोबर का ओघामध्यें वाहात आहे. त्यामध्यें जेवढें अंतर किंवा आरसा व आरशांत पाहाणारा जो आहे. त्यामध्यें जसें जेवढें अंतर तसें येथें अंतर आहे. (२७४)

हे पार्था, त्या तितक्या मानानें आत्म्यास कर्माचें केलें का आत्म्यानें कर्म केलें असें म्हणणें जें त्यामध्यें –आत्म्याशीं कर्म हें निराळेंच पडतें, पण अज्ञानानें तें आत्म्याकडून झालें असें घेवविलें होतें. आत्म्याकडून तें घेवविणें असेंच तें कर्म सिने म्हणजे निराळें जरी, तरी तें अज्ञानानें केलें असें होय. (२७५)

सूर्यविकासी कमल विकासलें तेथें केव्हांही सूर्यच उगवला (उगवता केला, प्रगट केला) असें होय; असें नव्हे कां ? मकरंद, सुवास भ्रमराकडून भोगविण्याचें होतें, भोगविला जातो–तें प्रेम सरोवरामध्येंच होय. तेथें कमळिणीच ती आपण अन्य कारणावर उभी होते व अन्यासच कारणपरत्वें उदय देणारी का गुणश्रेष्ठ अशी ती कमळिणी जशी पढियंता भावच एक वर आणणारी कां उदय करणारी ती. (२७६)

वारंवार हेंच एक *आत्मक्रिया, अन्यकारण कां रूप होय. तेथें ह्या आत्मक्रिया कमलक्रिया जशा तशा अन्यकारण का होत. अशा त्या पांचाना पंच आत्मक्रियांना–आत्म्याच्याठायीं क्रिया कारणानीं उत्पन्न* होणाऱ्या–आतां रूपास आणूं, त्यांना रूप देऊन, रूपाचे करून त्या सांगण्याचें करूं अन्यकारण कां–कारण कारणं=सूक्ष्मभूतें, परमाणु. अन्य बाप :—अन्यभृत कोकिल. [ अनन्यता हीच तेथें अन्यास उदय कारण होते. पण–एरव्हीं विरह जसा नलिनी व सूर्य कां चक्रवाक मिथुन पण ते अनन्यपण ती विरह दशाच मुळीं एका प्रेमावरच विराजमान झालीं जशीं, विकासानें रवीस जन्म देतें. भ्रमराकडून मकरंद भोगवितात; *प्रेमसरोवरी कमळिणी गुणगरुवी अशी बरवी अब्जिनी.*] (२७७)

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥**

पंच=(१) व्यक्त करणें, विस्तार करणें, प्रसरणें, पसरलेले. (पंचआनन, पंचस्य, पंचमुख=सिंह, विद्वान.) (२) पांच. कारणानि=हेतु, साधन, इंद्रिय, मूलतत्त्व क्रिया, पूर्ववासना, प्रेरणा, लेखक, समुदाय,

प्रमाण. कारण = शरीर (लिंग देह). करणिक: = न्यायाधिकारी. निबोध = जाणणें. कळवणें, (निबोधनं). सांख्य = सांख्यदर्शन, तर्कज्ञ. कृतांत = अशुभ कर्म, दैव, कर्मफल, सिद्धांत, देवाच्या ठायीं. (कृतात्मा = शुद्ध चित्ताचा.) प्रोक्त = सांगितलेले, प्रसिद्ध. सिद्धी = कार्याची पूर्णता, फलोत्पत्ती, कल्याण. देवशक्ति, शेवटची मुक्ति. कर्मन् = काम, कर्म.

अन्वय :—महाबाहो! मे। निबोध। एतानि। पंचकारणानि। कृतांते। सांख्ये। प्रोक्तानि। सर्व कर्मणाम्। सिद्धये ॥ १३ ॥

अर्थ :—हे महाबाहो! माझे कळविणें जे ह्या पांच कारणाचें तें–, कर्मफलासंबंधी सिद्धांत ज्यांत सांगितला आहे अशा सांख्यदर्शनामध्यें तें प्रसिद्धतेनें सांगितलें आहे. सर्व कर्माची सिद्धी, पूर्णता व्हावी म्हणून. (श्लोक १३ वा ओव्या २७८–३१४)

पांचही कारणें तिये। तूंही जाणसिल विपाये।
जे शास्त्रें उभवोनि बाहे। बोलती तयाते ॥ २७८ ॥
वेदरायाचिये राजधानि। सांख्य वेदांताच्या भुवनि।
निरूपणाचिया निशाण ध्वनि। गाजती तिये ॥ २७९ ॥
जे सर्व कर्म सिद्धी लागी। इयेचि मुद्दल हो जगी।
येथ न सुवावा अभंगी। आत्माराजु ॥ २८० ॥
या बोलाची डांगुरटी। तये प्रसिद्धी आली कीरीटी।
म्हणोनि तुझां कर्ण पुटी। वसो कां जे ॥ २८१ ॥
आणि मुखांतरी ऐकिजे। ऐसे काइसे हे वोझे।
मी चिद्रत्न तुझे। असता हाती ॥ २८२ ॥
आरिसा पुढां मांडलिया। की लोकांचया डोळया।
मानु द्यावा पाहावया। आपुले निके ॥ २८३ ॥
भक्तु जेथ जैसेनि पाहे। तेथ ते तेचि होत जाये।
तो मी तुझे जाहला आहे। खेळणे आजी ॥ २८४ ॥
ऐसे प्रीतीचेनि वेगे। देवो बोलत से नेघे।
तंव आनंदामाजी आंगे। विरतसे येरू ॥ २८५ ॥
चांदणेयाचा पडिभारू। जालया सोमकांताचा डोंगरू।
विघरौनि सरोवरू। हो पाहे जैसा ॥ २८६ ॥
तैसे सुख आणि अनुभूति। यया भावाची मोडुनि भिंती।
अंतैल (आंतले) अर्जुनाकृति। सुखाची जेथे ॥ २८७ ॥
तेथें समर्थु म्हणौनि देवा। अवकाशु जाला आठवा।
मग बुडतया धांवा। जिवे केला ॥ २८८ ॥
अर्जुना येसने ढेंढे। प्रज्ञा प्रसरेसी बुडे।
आले भरिते येव्हडे। ते काढोनि पुढती ॥ २८९ ॥
देवो म्हणे गा पार्था। तूं आपणपे देख सर्वथा।
तंव श्वासोनि येरे माथा। तुकविला ॥ २९० ॥
म्हणे तु जाणसी दातारा। मी तुजसी व्यक्ति सेजारा।
उबगलासि आदी येक हारा। येवो पाहे ॥ २९१ ॥

उभवोनि–उभवुनि. तयाते–जयाते. बाहे–बाहू (२७८) निशाण ध्वनि–निःसाण ध्वनि. गाजति तिये = गर्जती जिये. (२७९) मुदल–मुदले = भांडवल. येथ–तेथ. न सुवावा = न चालावा. (सुवावा = अनुकूल वारा देवाचा वारा अंगावर वाजणारा तो अगदीं आपल्याच अनुकूलतेचा आहे असें समजूं नये.) (विकार × भंग) अविकारी–अभंगी. [अभंगी = व्याजोक्ति नव्हे, नच फोडणें, नच खालीवर होणे, प्रत्यक्ष कथन, वक्रता नाहीं, लाट नव्हे, सबब नाही, मिष नव्हे, लबाडी नाहीं, (भंगी = चातूर्य, रचना, पायरी, कोटिक्रम); अभंग (सा.) शब्द न तोडता होणारा श्लेष (सा.) अनेक अर्थ, शब्दालंकारविशेष, समागम, संभोग, आलिंगन, चिकटणें.] (२८०) डांगुरटी = दौंडी. तये–तिये. कर्णपुटी–कर्णपुट = पर्णपात्र, द्रोणाकृति, अंजलिपुट (पोकळी). (पुटउदक = नारळ) कर्ण = दीर्घ स्वर, छंदशास्त्र, कान, सुकाणु. कर्णपूर = निळें कमळ, कदंब, अशोक, कर्णभूषण. कर्णमोटा = बाभळ. कर्णाट = देशविशेष. कर्णाट कलह = खोटे भांडण. कर्णमंदु (इंदुः) = चंद्रकोरीच्या आकाराच्या बाळया. तुझा–तुझ्या हून वसो का जे–वसो काज का जे. (२८१) मुखांतरी = दुसऱ्याकडून ऐकणें, मिळविणें. काइसे–कायसे. वोझे–ओझे. ऐकिजे–आइकिजे. ऐसें–तैसे. चिद्रत्न = ज्ञानरत्न. (२८२) आरिसा = दर्पण = आरसा. मानू–मान=आदर, गौरव, सन्मान, स्वाभिमान, मत, ग्रह, मोजणें, प्रमाण, लांबीचें माप. (संमान–संमानता = सत्कार, आदर.) निके = चांगुलपण. (२८३) जेथ जैसेनि–जैसेनि. जाहला–जाहलो. (२८४) ऐसे–ऐसे हे. से = आठवण. विरतसे येरू–विरत पार्थ = पार्थ निमग्न झाला, विरघळला. (२८३) चादिणेयांचा–चांदिणयाचा. पडिभार–पडिभर = भर. जालया–होता. विघरौनि–विघरोनि = पाझरून. (२८६) अनुभूती = अनुभव. अंतैल–आंतले = नटले, शोभले, दिसूं लागले, व्यापले, झाले. सुखाची जेथें–सुखचि जेथें. (२८७) समर्थ म्हणोनि देवा = [अवकाशु जाहला आठवा–देव समर्थ म्हणून आठवणीचा अवकाश लागला : महत् पैसच झाली–आठव्याची. आठवण ही आंधळी, अधु झाल्यानें, तेथें नेहमींच्या नेहमीं अवकाश वेळच द्यावा लागल्यामुळें एक बुडणेंच (नारायण घरबुडी) पुढें राहिल्यानें धांवा करावा लागला–नेहमीं आळविणें, धांव गा! पाव गा देवा! आठवण ही जागती असूं दे असेंच म्हणणें होत नाही कां? चुकीवरच अज्ञानरात्रीवरच (नक्त = रात्र, गुलबक्षी, मखमल, फक्त प्रदोषकाळीं जेवण्याचें व्रत.) नक्त म्हणजे (रात्रीच बळ करणारी चोर पिशाचें वगैरे तेथेंच मुळीं) अज्ञानरात्रीवरच बळ करणारी ती आठव्याची–आठवा–आठव–चुकी काय झालीं ती–जेथें आठवणच [नक्तंदिव = अहोरात्र. नक्तमाल = करंज (व.); नक्तकः = फडकें, जीर्ण वस्त्र]. नक म्हणजे नाक देऊन स्वर्ग पाहविणारी अशी ती आठवण, आठवा. (२८८) येसने ढेंढे–येसणे ढेंढे–येसणे धेंडे = येवढें थोर. भरिते–भरते. ते काढोनि पुढती–ते सांवरोनि. (२८९) गा–हा गा. श्वासोनि–सांवरोनि = सावध होऊन. तुकविला–तुकियेला = डोलविला. (२९०) तुं —. व्यक्ति सेजारा–व्यक्त शेजारा = वेगळया व्यक्ति सान्निध्याला. उबगलासि–उबगला = त्रासून, कंटाळला. येक हारा–एका हारा = एकत्वास. (२९१)

ती पांच कारणें तूं केव्हांहि एकदा जाणशील–जे कांहीं शास्त्रांनीं (आपली बाही उभी करून, आपला बाहू उभा करून) सर्वांचे तिकडे लक्ष वेधावें म्हणून बाहू उभविला. व ती त्या पांच कारणाविषयीं बोलत आहेत (त्या कारणांशींच जसें ते शास्त्र बोलत आहे. त्या कारणांना बोलावीत आहे. विचार–पूसी करीत आहे. (२७८)

(रायणं म्हणजे शब्द करणें, वाजणें,) वेदराय जो–शब्दब्रह्म, गुणिराय, गुणागोविंद, राया प्रिया, जिवलगा, जीवीच्या, शब्द (देवराय–राव) ब्रह्म.—त्याच्या [श्रेष्ठ (धान–धानक–धनिका, धानी.) अशा] राजधानींमध्यें सांख्यदर्शन जे वेदांताचें अंग त्याच्या जगी म्हणजे लोकी (जन, पाणी, आकाश, स्वर्ग) पाहाणें आकार, शोध, चौकशी, व्याख्या, विचार, निदर्शनाच्या–निदर्शनाने (निःसाण, ध्वनि) निशाणच एक ध्वनिरूप तेथेंच गाजत आहेत, गर्जत आहेत की. (२७९)

सर्व कर्मांची सिद्धी व्हावी की, कर्म फलद्रूप व्हावें, त्याची फलप्राप्ति व्हावी, म्हणून अहो ! ह्या जगामध्यें हींच कीं, मुदल, मुदलें, मांडवलें होत–येथें आतां आत्मराज तो जीवात्मा त्याचेठायीं (महत्तत्व, परमात्मा, स्थूल शरीर.) शब्द न तोडता होणारा जो (अनेक) अर्थ–अलंकार विशेष अथवा समागम–संभोग तेथें नच घालावा. (२८०)

अशा ह्या म्हणण्याची, बोलाची, दौंडीच [ झांगुरटी=भिंगुरटी म्हणजे कुंभारीण माशी) एकसारखा होत असलेला आवाज डोक्याच्या अशा ठोकळ्यानें–लोळीनें–मग तो घंटीचा–कां घांटीचा असो अथवा दुसरा एकादा कसलाही असो, पण तेथें ठोका एकसारखा गुंगत असणें हे जसें ] ती तिजला प्रसिद्धी आली आहे. हे अर्जुना ! म्हणूनच ते बोलिलेले तुझ्या कर्णपुटामध्यें दीर्घस्वररूपी आकृतीमध्यें, कानामध्यें वस्ती करून असो. तेथीलचें तें (काज कारण काम) तुझ्या कर्णपुटामध्यें वसो; कां जें काम काजच एक, कारणच एक. (२८१)

मी ज्ञानरत्न (ज्ञानबुद्धिरूप उत्तम वस्तू–चिद्रत्न–ज्ञान चिंतामणि) तुझ्या हातींच असल्यानें–हातीचा झाल्यानें दुसऱ्याकडून मिळवावें–दुसऱ्यापासून शिकावें का दुसऱ्याकडून ऐकावेंच ऐकावें असें हें काम तुला ओझें वाटतें. (२८२)

ज्ञानबुद्धिरूप उत्तम वस्तु–, आरसा पुढें मांडला असतां लोकांच्या डोळ्यांना आपलें निकें हितकारक धाकुटपण–लहानपण तें पाहाण्याचा मान द्यावा. (२८३)

भक्त म्हणजे उपासक–अनुरक्त, तल्लीन, उपचारक, रचना आकृतीस आणणारा, आराधना करणारा, उपासनेची आवड घेऊन असणारा, उपासना भागाचा जो=ज्या कांहीं ठिकाणीं ज्या कां ह्या ज्ञानबुद्धीरूप उत्तम वस्तूंनें पाहातो आहे, तेथें जें पाहिलेलें तेंच ज्ञानबुद्धिरूप उत्तम वस्तूच झाले, होत जात आहे; अशी जी उत्तम वस्तू ती–मी आज तुझे (क्रीडा–विहार–विलास–करमणूक, क्रीडास्थान शोभा, सुखोपभोग–खेलन–खेळ) खेळणेंच एक जाहला आहे, कां जाहालों आहें कीं ! (२८४)

असे प्रीती अनुराग, आनंद, आवडीच्या प्रवाहानें, शक्तीनें, उकळीनें कां त्वरेनें, वेगानें देव बोलत आहेत; तों तों (त्याची आठवण करण्याचें राहिलें, आठवच आठवणीचा होईना–) स्मरणशक्ति मागें पडली व आतां पहावें तों अर्जुन तर आपल्या सर्वच्या सर्व आगें–आंगें जीवें–अंगांनीं आनंदामध्यें निमग्न झाला (विरून गेला). (२८५)

चांदणें भरपूर असलें म्हणजे सोमकांताचा डोंगरच्या डोंगर विघरला तेथें एक प्रेमाचें सरोवरच आनंदाचें, प्रीतीचें तळेंच जसें, झालें असें होतें, तेव्हां देखणी अशी सोमवल्ली (चंद्र, अमृत, जिला) सुखकारक अशी का चंद्र हा पतीच एक सुखकारक असा. (२८६)

तसें **सुख** (पुण्यवंत आनंद) व अनुभव **अनुभूति** (संपत्ति, ऐश्वर्य, समीपता, संगति, सादृश्य) सुखामुळें येणारी ती **संगती ऐश्वर्य** जें त्या भावाची, अभिप्रायाची, चेष्टेची, मनोविकाराची विलासप्रियता तेथीलची ती (आड असलेली भिंत–आडपडदाच) भिंतच का अवकाशच मोडून काढला गेल्यानें तेथें सुखाची अशीच एक आर्जुनाकृति दिसूं लागली, नटली, शोभली (व्यापिलेली) झाली. (२८७)

तेथें समर्थ म्हणून, कां उपयुक्तता हितकर, का बलवान् अशी, याहून देव म्हणजे खेळणेंच एक, का देव म्हणजे ईश्वर (देवता राजा), विषयीं आठवण करण्याचा प्रसंग अवकाशास आला: वेळ आठवणीच्या प्रसंगाचा झाल्यानें तेथें अहो ! हा जीवच बुडत आहे; म्हणून ह्या जीवदशेनें (अहो ! देवा बुडल्यास हात द्यावा म्हणून) देवाचा–ईश्वराचा–धांवा केला. आठवण आंधळी–अधु झाल्याने, वेळ द्यावा लागणारा, झाल्यानें, बुडणेंच पुढें येऊन आहे–(नारायण घरबुडी) धावा करावा लागला–नेहमीं आळविणेंच 'धांव

गा देवा! पाव गा देवा!!' 'आठव नाठव दोन्हींही त्यागुनि आत्मा स्वयें होणें, होणें न होणें वृत्तीविण ते अंगी अनुभविणें'–माया पैस–पोकळी अवकाश एक वेळ–'आत्मा आठवा तोच सर्व ते झाला. त्यानें सर्व पैस आक्रमण केली. त्यामुळें हा जीव धांवा करूं लागला कीं हे परमात्मा! ह्या बुडत्यास हात द्यावा की अहो जी! तेथें आठवण ही जागती कशी तर अज्ञान रात्रीवरच बळ करणारी ती.

बुडता जीव जो, त्या बुडत्यास–, (पाण्यांत बुडणाऱ्यास तर) हातच द्यावा. त्यास तर धावावरच (परीघ, व्याप्ती, चाकाची धाव, शब्दगर्भ) उभें केलें. ह्या जीवाभावानें (जीवो गुरू) अथवा परमेश्वराचा धांवाच आरंभिला ह्या बुडणाऱ्यानें. देव–वासुदेव आत्मा, संकर्षण–जीव, प्रद्युम्न मन, अनिरुद्ध भूतादीम् अहंकार. **देवसमर्थ म्हणून आठवणीला अवकाश लाभला.)** (२८८)

हे अर्जुना, येसन म्हणजे मनुष्यत्व–पुरुषत्व हींच धेंडें तेथें प्रज्ञावेली आपला प्रसर घेऊन आंत बुडून आहे. तेथें प्रेमाची याचना–प्रणयविस्तार घेऊन आहे. (त्याचें त्याचें मनुष्यत्वच–पुरुषत्वच वाळिलें गेल्यानें –उपाशीपणच एक का सर्व अभावच परिणाम करून आहे, अथवा आत्माच तो आपणच सर्व कांहीं होऊन आहे.) त्यामुळें जें कांहीं भरतें आलें तें कांहींबाहीच पण तें काढून तसेंच राहू देऊन सांवरून धरून ठेविलें. (२८९)

देवांनीं आतां म्हणूं केलें कीं, हे पार्था! कांहीं झालें तरी आतां येथें तूं आपलें सर्वस्वासच पाहा–देखणें देख. असें हें देवाचें बोलणें होत आहे नाहीं तोंच, प्राणच तो श्वास घेणारा झाला. श्वासच एक प्राणच जसा वर आल्यानें पार्थानें आपलें मस्तक तुकविलें, माथा डोलविला. (२९०)

व म्हणूं लागला कीं अहो दातारा! दानशूरतेचे धनीच आपण अशा अहो स्वामीन्! मी आपणास तर वेगळ्या व्यक्ति सान्निध्याच्या असा–अथवा सान्निध्य हेंच व्यक्त होऊन त्यानें मजला दाखविलें. मजला मीच तेथें दिसूं लागलों. पण वेगळेपणाच्या व्यक्ति सान्निध्यास कंटाळून जाऊन त्रासलों, व आतां आदि जे पुरुष का आद्य तेंच आपण असल्यानें आपल्या मध्येंच मी एकत्वास येऊं पाहात आहें. (ऐक्य एकत्व), 'एकस्थ' असें आपण देव व मी अर्जुन, असे वेगळे नच होऊन, आपणच जे एक (आदि, पहिले, मुख्य,) आदिब्रह्म, तेथें आदिचेही सनाथत्व ते आपणच जे परब्रह्म त्या तुमच्याशी, एकत्व ऐक्य पावून असावें, असें वाटत आहे.

मी तुम्हांशीं व्यक्ति सेजाराचा, पण अशा ह्या व्यक्त शेजारास, आपण त्रासून गेला आहांत, कंटाळला आहांत, अथवा मीच त्रासलों आहें, व आदि ब्रह्म जें तेंच तुम्हीं असें जाणून, आतां, येकहारा (म्हणजे एकत्वासयेण्याची इच्छा करून आहे.) एकत्वास येत आहे. (**देव आतां भानावर आले व बुडत्या अर्जुनाला वर काढण्यासाठीं अर्जुनाला म्हणाले.)** (२९१)

**तयाही हा ऐसैसा। लोभे देयाल जरी लालसा।**
**तरी काहो घालितसा। अड अड जीवा॥ २९२॥**
**येथें श्रीकृष्ण म्हणे निके। अजुनु नव्हे मा ठाऊके।**
**वेड्या चंद्रा चंद्रिके। मिळणे आहे॥ २९३॥**
**आणि हाही बोलोनि भावो। तुज दावू आम्ही मेवो।**
**जे रुसता बांधे थावो। ते प्रेम गा हे॥ २९४॥**
**येथे एकमेकाचिये खुणे। विसंवादु तंवचि जिणे।**
**म्हणौनि असो हे बोलणे। इये विषींचे॥ २९५॥**
**मग कैस कैसी ते आतां। बोलता (बोलतु) हे पांडुसुता।**
**सर्व कर्म भिन्नता। आत्मेनसि॥ २९६॥**

तंव अर्जुन म्हणे देवे । माझिये मनिचे स्वभावे ।
प्रस्ताविले बरवे । प्रमय ते जी ॥ २९७ ॥
जे सत्कर्माचे बीज । कारण पंचक तुज ।
सांघेन ऐसी पैज । घेतली जे का ॥ २९८ ॥
आणि आत्मया येथें कांहीं । सर्वथा लागु नाही ।
हे पुढारलासि देयी । लाहाणे माझे ॥ २९९ ॥
यया बोला विश्वेशे । म्हणितले तोषे बहुवसे ।
येविखि धरणे बैसे । असे के जोडे ? ॥ ३०० ॥
तरी अर्जुना निरोपिजेल । जे किर भाषेची आंतुल ।
परि मेचुवे होईजेल । (रिगिया) ऋणिया तुज ॥ ३०१ ॥
तंव अर्जुन म्हणे देवो काई हो कां । आता अवधान प्रसरू निका ।
करूनिया आईका । पुढारलो ते ॥ ३०२ ॥
[ तंव अर्जून म्हणे देवो । काई विसरले मागील भावो ।
हे गोष्टी कीर राखत आहो । मी तूं पण जी ॥ ३०२ ॥ ]
येथ श्रीकृष्ण म्हणे हो कां । आतां अवधान प्रसरू निका ।
करूनिया आईका । पुढारलो ते ॥ ३०३ ॥

म्हणे–म्हणती. अझुनु–अझुणु = अद्यापि. नव्हे–नाहीं. वेडया–वेडेया. चंद्रिके (चंद्रिका = लाक्षणिक अर्थ, अर्थबोधक टीका)–आणि चंद्रिके = चांदण्यास. (चंद्र = छत, चांदवा, श्रेष्ठ, आल्हादक वस्तू, पाणी, सोनें, कापूर.) मिळणें–न मिळणें. (२९३) मेवो–मिवो. यावा = बळ येतें (ठिकाणा). दाउ–दाउनि. (२९४) येथे–येथ. विसंवाद = वेगळेपण. विषीचे–विषयींचे. (२९५) कैस कैसी–कस कसें–कैसी कैसी. बोलता हो–बोलतु होतो. कर्म–कर्मा. आत्मेनसी–आत्मेनिसी. (२९६) मनिचे–मनीचेनि–मनीचि. प्रमय प्रमेय = अनुमान, जे सिद्ध करण्याचें तें. प्रस्ताविले = आरंभाचें केलें, प्रसंगास पाहिलेलें, सांगण्यास आरंभ केला. (२९७) सत्कर्माचे–सकळ कर्माचे. बिज–बीज. साघेन–सागेन. (२९८) पुढारलासि = कबूल झालास, बोललास. येथे–येथ. देयी–ते देई लाहाणें देणें लाग = संबंध. (२९९) बहुवशे–बहुवसे. विखी –विषयीं. धरणें = ताब्यांत ठेवणें, मनांत आणणें. के = कोठे. असे–ऐसे. (३००) निरोपिजेल–निरूपिजेल. (अवलोकन विचार.) (भासे) भाषेची आंतुल–भाषे आंतुल = भाषेतील वर्म, सिद्धात. मेचुवे–मेचु इये–मेचु ये = प्रेम, प्रीती, आवड. रिगिया–ऋणिया. (३०१) गोष्टी–गोठी. अवधान (लक्ष)–(निश्चय, निर्णय) अवधानाचा. प्रसरू–पसरू = प्रेमाची याचना, प्रणय, विस्तार. पुढारला = कबूल केलें तें बोलिले. (३०३)

शेजारच व्यक्त झालेला असा मी आपण जे आदिब्रह्म त्याजशी एकत्वास येऊ पाहात आहे–येत आहे. व अशा मलाही आपण लोभानें, लाभाच्या इच्छेनें, मोहवशेकरून, हावेनें (स्नेहवशेंकरून जीवदशेचें वालभ सोनेंच जसें कां वसादिविकार म्हणा.) लोभ करून मिळविण्याची ती उत्सुकता कौतुकास आणिली असें केलें तर मग त्या जीवदशेस–जीवभावास, हा जीवच कीं अहो ! नेहमीं आडाडच एक असा नेहमीं गरजूच करून ठेवित आहांत–तेथें अडथळा का प्रतिबंध तो कां ? मिळविणेंच एक तेथें मग नेहमीं पुरतें होईना असें आड आडच ! हा जीव पुरता होईना असा, नेहमींच तेथें कांहीं पुरतें पडेना गरज भागेना असें कां बरें होत आहे ? (२९२)

तेथें श्रीकृष्णांनीं म्हणूं केलें कीं, तुझें हित तें अर्जुना अगा कशांत आहे ? तें तुजला अद्याप ठाऊक नाहीं. येथें तर वेडा चंद्र आपल्या ज्योत्स्नेवर–चांदण्यावर, कौमुदीवर फिदा, वेडा होऊन आहे. आतां चंद्रानें वर त्या चंद्रिकेस नच मिळणें, भेटणें, संयोगाचें नच होणें, असें होत आहे. (२९३)

पण असा हा भाव तुजला बोलून दाखविण्यास तर आम्हास अशी भीती वाटत आहे कीं, जर कां तूं येथें ह्या प्रेमामुळें रुसून बसलास तर–बळास येतें आपल्या ठावाचें होतें–ठिकाणच सांपडलें म्हणतें–सोयच झाली म्हणतें–असें जें–तो भावच हा–तें हें प्रेमच एक असें–तें एकच एक प्रेम जाण. (२९४)

ह्या प्रेमामध्यें एकमेकांच्या खुणांनीं–चिन्हांनीं, ध्वजांनी, न जुळणारे असंबद्ध–वेगळेपण विरुद्ध असणें, न जुळणें, खोटें होणें, जोपर्यंत आहे तोपर्यंतच हें जिणें जीवित (वेगळेपण) तेंच जगणें, होत असतें. याकरितां त्याविषयीं बोलणें हें राहूं देत. (२९५)

येथें आतां आपण ती गोष्ट कसकशी करीत होतों बरें! कीं अगा हे पार्था! आत्म्याशीं सर्व कर्माचा कांहींही संबंध नाहीं–आत्म्याचा व कर्माचा कांहींही संबंध नाहीं. (२९६)

तेथें अर्जुन म्हणूं लागला कीं, देवांनीं माझ्या मनाच्या स्वभावावरच असें हें बरवें, उत्तमपणाचें तें अनुमान सिद्ध करण्याचें कां सिद्धांत तो–सांगण्यास आरंभ केला आहे. (२९७)

सर्व कर्माला मूळ असें '**कारण पंचक**' तें बीजच. त्याविषयीं अगदीं पैजेनें सांगण्याचें करीनच करीन अशी जी कांहीं मी पैज करून होतो. (२९८)

तसेंच येथें (कर्मामध्यें का कर्मासंबंधी) आतां आत्मा म्हणजे आपला संबंधीच एक असें (ह्या कर्मानें) म्हणणें हेंही पण असंबद्धतेचें असें होय. असें जें कांहीं आपण लाहाणा देण्याचें कबूल केलें आहे तें माझें देणें द्यावेंच कीं. (२९९)

**कर्म आणि आत्मा यांचा संबंध नाहीं तेथें सिद्धांतच एक तो ते अनुमान सिद्ध करण्याचा, तोच मुळीं सांगण्यास आरंभ केलेला**–[ येथें अर्जुनानें तेंच मागणें मागितलें की **'इथें आत्म्याचा कांहीं सुद्धां संबंध नाहीं, असें जें कांहीं मजला देण्याचें आपण कबूल केलें आहे, तें मजला द्यावेंच.**] अशा ह्या अर्जुनाच्या बोलण्यानें विश्वेश–भगवान श्रीकृष्ण अतिशयतेचे होऊन म्हणतात कीं, 'इथें ह्या विषयींचें तें मनांत आणणें व तेथेंच आपला ताबा ठेवणें हें ज्यायोगे होईल तें कसें बरें जोडणारें–जोडीचें सांपडेल बरें–हट्टच घेतला, फिदाच झाला; माझें देणें मलाच दे; असें कांहीं एक मागणें का असें धरणें घेऊन बसणेचें होईल तरच नां हें देणें मिळेल? कां कोठे होईल बरें! (३००)

करितां हे अर्जुना! असें तें शब्दानें देण्यासारखें तेथें आवडच तुझी ती तें ऋण फेडील–ती प्रेमाची आवड का आवडीचें प्रेम तें, तेंच तुझें आभार आहेत असें म्हणूं लागेल. मी तुझा ऋणाईत आहे असें तें प्रेम म्हणूं लागेल! [जे कीर भासे आतुल। परिमेचु ये होईजेल। (होईल) ऋणिया तुज=शब्दानें देण्यासारखी ही आवडच तुझें ऋण फेडिल.] (३०१)

तेव्हां अर्जुन म्हणतो कीं, अहो देवा! काय तुम्हीं पूर्वी सांगितलेला 'मी' 'तूं' पणाचा भाव तो भाव हाच मुळीं त्या 'मी' 'तूं' पणासच महत्त्व देऊन आहे. (३०२)

यावर श्रीकृष्ण म्हणाले कीं असें हें खरेंच पण, आतां यावर अवधान, लक्षाचा विस्तार तो प्रेमाची याचना का प्रणय हाच विस्तारला असें करून (लहानपण स्वीकारून असावें.) आतां बोलतों सांगण्याचें करतों तें ऐकण्याचें करावें. तेथें ती प्रेमाची याचना ही निश्चयाची अशी सर्व निर्णयाची अशीं–तें जें कांहीं पुढें केलें–कबूल केलें–बोलिले–तें ऐकावें. (३०३)

**तरि सांचचि धनुर्धरा। सर्व कर्माचा उभारा।**
**होय बाहेर बाहिरा। करणी पांचे ॥ ३०४ ॥**

आणि पंचकारण दळवाडे। जिही कर्माकरू मांडे।
ते हेतुस्तव घडे। पांच आथि ॥ ३०५ ॥
येरे आत्मतत्त्व उदासीन। ते ना हेतु ना उपादान।
ना अंगे करी संवाहन। कर्म सिद्धिचे ॥ ३०६ ॥
तेथें शुभाशुभी अंती। निफज कर्मे ऐसी।
राती दिवो आकाशी। जयापरी ॥ ३०७ ॥
का तोय तेज धुमु। यया वायुसी संगमु।
जालया होय अभ्रागमु। व्योम ते नेणे ॥ ३०८ ॥
नाना काष्टी नाव मिळे। ते नावडेनि चळे।
चाळिजे अनिळे। उदक साक्षी ॥ ३०९ ॥
का कोण्हे येके पिंडे। वेंचता अवतरे भांडे।
ते भवंडिजे दंडे। भ्रमे चक्र ॥ ३१० ॥
आणि कर्तृत्व कुल्लाळाचे। तेथें काई पृथ्वीचे।
आधारू वांचुनि वेंचे। विचारी पां ॥ ३११ ॥
हेही असो लोकांचिया। राहाटी होता आघविया।
कोण काम सवितया। अंगा आले ॥ ३१२ ॥
तैसी पंच हेतु मिळणी। पांचेचि येही कारणी।
कीजे कर्मलतांची लावणी। आत्मा सिन्हा ॥ ३१३ ॥
आतां इयेचि वेगळाली। पांचै विवंचु गा भली।
तुकोनिया घेतली। मोती जैसे ॥ ३१४ ॥

सांसचि–सासचि गा. होय बाहेर बाहिरा–होतसे बाहिर–बाहिरा = बाहेरच्या बाहेरच, परभाऱ्याच होत असतो. करणीं पांचै = पांच साधनांची. (३०४) दळवाडे = समुदाय. हेतुस्तव घडे–हेतु तंव उघडे. अथि–अथी–आथी. (३०५) येर–येथ. उदासीन = तटस्थ, वैराग्ययुक्त उपादान = मूळ कारण, द्व्यर्थी वाक्य, ग्रहण, निमित्त. संवाहन = साह्य, अंग चुरणे, ओझें वाहाणें. अंगे–ते अंगे. (३०६) अंती–अंशी निफज–निफजती. दिवो–देवो = दिवस. जयापरी–जियापरी. (३०७) जालया–जालिया. (३०८) चळे = चालते. चालिजे–चाळविजे. उदक–उदक ते. (३०९) कोण्हे एके–कवणे एके :: पिंडे = मातीच्या गोळ्याचें. अवतरे = आकारास येते, तयार होते. (३१०) कुल्लाळाचे–कुलालाचे. तेथें काइ–तेथ काय. पृथ्वीचे–पृथ्वियेचे. (३११) राहाटी = वागणूक, राहाणी, व्यापार, व्यवहार. सवितया = सूर्याला. (३१२) तैसी पंच हेतू–तैसे पांच हेतू [पंचहेतु = सहेतुकपणें, इच्छा धरून केलेले काम, (तेथें हेतू तो मायेचा बाजार उठवितो कारण सर्व कांहीं हे मायेचे प्राबल्यच एक म्हणून) अहेतु–निष्कामता–अहेतुकपणेच कर्मे करावी असें म्हटले.] मिळणी = पांच कारणें मिळाल्यानें. येही–इही. सिन्हा–सिना = वेगळा, साक्षी, निराळा. (३१३) इयेचि–येचि. पांचै–पांचहि. विवंचू = सांगू, विचारास घेऊ. तुकोनि = वजन करून. मोती जैसे–मोतीये जैसी. (३१४)

असें हें खरेंच कीं, हे धनुर्धरा! सर्व कर्माचा उभारा–कर्मे उभारिलीं होतात–घडतात तें तर परस्परच, बाहेरच्या बाहेरच, परभाऱ्याच ह्या पांच करणांनी म्हणजे क्रियेच्या साधनांनीं अथवा कारणांनी होतो. (३०४)

येथें (पसरलेले इंद्रिय मूळतत्त्व साधन) पांच कारणाचा समुदायरूपी, दळवाडे, ज्यानें ह्या कर्मांना

आकाराचें केलें होतें. कर्मांवर कर्मांना आकारच दिला जातो. आकारावरच–आकारानेंचमुळीं तीं कर्में मांडिली–मोडली होतात. तेथें पांच हेतूच घडले होतात. स्पष्ट होतात. ते पांच अशा पंचकडीच्या (हेतु) कारणानेंच घडते, होतें. (३०५)

येथें येरे–दुसरे जे आत्मतत्त्व, म्हणजे ब्रह्म अथवा परब्रह्मस्वरूप तें तर तटस्थच असतें कर्मसिद्धीचें कार्याची तें कांही हेतू पूर्णता का फलोत्पत्तीचें कारण नसतें; का उपादान म्हणजे निमित्तहीं पण नव्हे, अथवा तें अंगानें साह्य होणारें का ओझें वाहाणारें असेही नसतें. (३०६)

येथें शुभ अथवा अशुभ अशा निर्णयावरच अथवा अंशतः शुभ का अशुभ असा निपज कर्मांचा होणारा तीं कर्में म्हटली होतात. जसें आकाश हें दिवसाचें म्हटलें म्हणून शुभ का अशुभ असें दिवसांचें का रात्रीचें पर्यायानें आलें चित्त म्हणा का आकाश ते. (३०७)

[ (व्योमाच्या ठायीं–व्योमीं) व्योमाच्या आधारावर वायूबरोबर का वाऱ्याबरोबर, धुराचा, तेजाचा अथवा पाण्याचा संगम झाला असतां तेथें अभ्र आभाळ येणारें होतें. पण व्योम आकाश कांहीं तें जाणत नाहीं. ] धूमाचा अथवा तेजाचा का तोयाचा वायूशीं संगम झाल्यानें अभ्र येणारें होतें. पण व्योम तें उगेंच असतें तें कांहीं त्या अभ्राचें येणें जाणत नाहीं. ((१) पर्वता वन्हिमान् धूमात् (२) भुंवई अबु ही तेजच म्हटली. (३) तोयाचे परि नांवही न उरतें संतप्त लोहावरि). (३०८)

(१) अथवा काष्ठाची–लाकडाची केलेली नाव–लाकडाचीच का काष्ठाचीच ती नाव होते. ती नाव चालविणारा जो नावाडी त्यानें हाकिली, चालविली, पाण्यांत घालून तरंगविली–चालविली–नावाड्यानेंच ती चालवावी लागते किंवा अनुकूल वाऱ्यानें ती चालविली होते; पण उदक का पाणी ते तर साक्षी असेंच.

(२) अनेक जातीच्या लाकडाची बनविलेली नाव ती नावाडी चालवितो–किंबहुना नावाड्यामुळेंच ती पाण्यांत चालविली होते, अथवा अनुकूल वाऱ्यामुळें ती चालते. पण येथें उदक जे ते तर साक्षी असेंच असतें–तें कांहीं हें सर्व जाणत नाहीं, तें कांहींही करीत नाहीं, जाणत नाहीं. (३०९)

मातीच्या गोळयामुळें अथवा मातीचा गोळा योजिला खर्च केला अंगचा केला, घडविला; का मातीच्या गोळ्याला भांड्याचा आकार तेव्हां प्राप्त होतो जेव्हां कुंभार तो गोळा चाकावर घालून तें चाक काठीने दंडाने–फिरवील तेव्हां; तेथें चक्र तें फिरतच असतें; त्याचा भांडे तयार होण्याशीं कांहीं संबंध नसतो; कारण— (३१०)

भांडे तयार व्हायला कुंभार चक्र फिरवितो पण तयार करण्याचें कौशल्य तें कुंभाराचें असतें : येथें आतां (भार सहन करणारी) पृथ्वी ही चाकाचा भार तेवढा सहन करून असते : पृथ्वी ती फक्त साक्षी असते. (ती भांडे तयार करणें वगैरे जाणत नाहीं.) कुलालाचें कर्तृत्व–पृथ्वीचें तें पिंड तेथें ह्या दोहीं शिवाय दुसरें कांहींच वेचलें खर्च होणें जाणें नव्हे हें विचार केला असतां कळू लागतें. (३११)

असें हें म्हणणें असो. जगाच्या (जनाच्या, कां लोकांच्या) वागणुका (राहाणी व्यापार) का व्यवहार, होणारे जाणारे, राहाटीचे असे जे तेथें ते सूर्याच्या अंगास आले कां सूर्यानें ते केले (सूर्यच ती राहाणी करीत आहे) असें म्हणणें होत नाहीं: अवघ्या सर्व राहाटी लोकांच्या तेथें सविताच्या–सूर्याच्या अंगास एकादें कां आलें असें कोणतें तें काम काज, सूर्यानें केलें असें म्हणणें पाहात नाहीं. (३१२)

(हेतु अथवा कारण, मूळतत्त्व, साधन हें पसरलेलें असेंच मायेचें तें तेथें हेतू इच्छा मिळणीची झाली) ह्या पांच हेतूच्या मिळवणीनें ही पांच कारणें जीं त्यानींच कर्मवल्लीची लावणी–पेरणी केली. आत्मा तर सिन्हा म्हणजे वेगळाच कृताकृत्याचा अध्यक्ष, निराळाच एक साक्षी असा जाण. (३१३)

आतां हीच वेगवेगळीं अशीं पांच भलेपणाच्या विचारास घेऊन सांगण्याचें करूं. तीं जशीं का मोत्येंच लवन्धिक अंगाच्या दर्ज्याची श्रेष्ठ अशींच तुकिलेली वजन करून घेतलेली अशीं भलेपणाचीं का भलेपणाच्या विचाराचीं अशीं (३१४)

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥ १४ ॥**

अधिष्ठान = ठिकाण, नांदणूक, प्रभाव, नेमधर्म. कर्ता = (कर्तृ) करणारा. करणं = इंद्रिय, कारण, क्रियेचें साधन, (अर्धी तिथी.) पृथक = भिन्न खेरीज (पृथुक = बालक पोहे.) विध = प्रकार. (विधः = विमान, हत्तीचे अन्न प्रकार, वेध करणें, समृद्धि.) विविधाः = नाना प्रकारच्या. पृथक = वेगळ्या, निराळ्या, खेरीज वांचून, परिमित. चेष्टा = क्रिया, प्रयत्न, वागणूक, हावभाव, गति, चळवळ. दैवम् = भाग्य, देवासंबंधी, स्वर्गीय, देवाचे, पूज्य, सत्त्वगुणविशिष्ट, प्रारब्ध, धर्मकृत्य, देवता ध्यान, दैवत, राजाचें कर्तव्य, देवभक्त. (दैव = उत्पातशास्त्र) उत्कर्ष, शुभाशुभसूचक भूतविकार, गाडीचा हबका. पंचमम् = पांचवे, पंचमांश, कुशल, दक्ष, सुंदर, गाण्यातला पांचवा स्वर. (पंचमास्य = कोकिल.)

अन्वय :—(पंच हेतवः — नरः यत् कर्म प्ररभते । शरीर वाङ्मनोभिः । तस्य न्यासं वा विपरितं वा कर्मस्य एते पंचहेतवः)—

अधिष्ठानं । तथा । कर्ता । पृथकविधम् करणं । च । पृथक । विविधाः । चेष्टा । दैवं । च । एव । अत्र । पंचमम् ॥ १४ ॥

अर्थः— पहिले कारण म्हणजे शरीर हें होय. ह्यासच मी म्हणजे क्रियेला आधारभूत अधिष्ठान ठिकाणीं म्हटलें. दुसरें कारण तें जीव का जीवात्मा हाच कर्ता म्हटला. तिसरें कारण तें म्हणजे भिन्न भिन्न इंद्रियें-पृथक्विध करण म्हटलें. चौथें कारण तें – पृथक्विध चेष्टा (प्राणानेंच प्राण प्राणाचा केला, चेष्टविला-व्यापारविला जसा) म्हणजे प्राण आदीचे का इत्यादीचे भिन्नभिन्न व्यापार म्हटलें. व पांचवें कारण तें दैव म्हणजे अदृष्ट किंवा ईश्वरी इच्छा का प्रारब्ध होय, अशी ही पांच कारणें होत.

(श्लोक १४ वा ओव्या ३१५ ते ३५१)

**तैसी यया लक्षणें । आईक पां कर्म कारणे ।**
**तरी देहे हे मी म्हणे । पहिले येथें ॥ ३१५ ॥**
**याते अधिष्ठान ऐसे । म्हणिजत यया दोषे ।**
**जे स्वभोग्येसी वसे । भोक्ता येथे ॥ ३१६ ॥**
**इंद्रियांच्या दाही हाती । जचौनि देहोराति ।**
**सुखदुःखे प्रकृति । जोडिति जिये ॥ ३१७ ॥**
**ते भोगावया पुरुषा । आनु ठावोचि नाही देखा ।**
**म्हणोनि अधिष्ठान भाषा । बोलिजे देहे ॥ ३१८ ॥**
**हे चोविसाही तत्त्वाचे । कुटुंब घर वस्तीचे ।**
**तुटे बंध मोक्षाचे । गुंतले येथे ॥ ३१९ ॥**
**किंबहुना अवस्थात्रया । अधिष्ठान धनंजया ।**
**म्हणौनि देहा या । हेचि नाम ॥ ३२० ॥**
**आणि कर्ता जे दुजे । कर्माचे कारण जाणिजे ।**
**प्रतिबिंब म्हणिजे । चैतन्याचे जे ॥ ३२१ ॥**

आकाशचि वरिषे नीर । ते तळवटि बांधे नाडर ।
मग बिंबोनि तदाकार । होय जेवी ॥ ३२२ ॥
का निद्रा भरे बहुवे । राया आपणपे ठाउवे नव्हे ।
मग स्वप्नीचा न माये । रंकपणी कां ॥ ३२३ ॥
तैसे आपुलेनि विसरे । चैतन्यचि देहाकारे ।
आभासोनि आविष्करे । देहपणे जे ॥ ३२४ ॥
जया विचाराचा देशी । प्रसिद्धि गा जीउ ऐसी ।
जेणे भाष्य केली देहयासी । अघवा विषी ॥ ३२५ ॥
पैं प्रकृति करी कर्मे । तो म्या केली म्हणे भ्रमें ।
येथ कर्ता येणे नामे । बोलिजे जिउ ॥ ३२६ ॥
मग पातयाची केशी । येकचि उठी दिठी जैसी ।
मोकळी चवरी ऐसी । चिरीव गमे ॥ ३२७ ॥
कां घरा आंतुल येकु । दीपाचा तो अवलोकु ।
गवाक्ष भेदे अनेकु । आवडे जेवी ॥ ३२८ ॥
तेवी बुद्धिचे जाणणें । श्रोत्रादि भेदे येणे ।
बाह्य इंद्रियपणें । फांके जे कां ॥ ३२९ ॥
ते पृथग्विध करण । कर्माचे यया कारण ।
तिसरे गा जाण । नृपनंदना ॥ ३३० ॥
आणि पूर्व पश्चिम वाहाणी । निघालिया ओघाचिया मिळणी ।
होय नदी नद पाणी । येकचि जेवि ॥ ३३१ ॥
का एकुचि पुरुषु जैसा । अनुसरतु नवा रसा ।
नवविधु ऐसा । आवडो लागे ॥ ३३२ ॥
तैसी क्रिया शक्ति पवनी । असे जे अनुपायिनी ।
ते पडिली नाना स्थानी । नाना होय ॥ ३३३ ॥
जै वाचे करी येणे । तै तेचि होय बोलणे ।
हाता आली घेणे । देणे होय ॥ ३३४ ॥
अगा चरणाच्या ठाई । गती–तेचि पाही ।
अधोद्वारे दोही । क्षरणे तेचि ॥ ३३५ ॥
स्कंदौनि हृदयवरी । प्रणवाची उजरी ।
करिता तेचि शरीरी । प्राणु म्हणिपे ॥ ३३६ ॥
मग उर्ध्वीचिया रिगि निगा । पुढती तेचि शक्ति पै गा ।
उदानु ऐसिया लिंगा । पात्र जाली ॥ ३३७ ॥
अधोरंध्रीचेनि वाहे । अपानु हे नाव लाहे ।
व्यापकपणें होय । व्यानु तेचि ॥ ३३८ ॥
आरोगिलेनि रसे । शरीर भरी सरिसे ।
आणि न संडिता असे । सर्व संधी ॥ ३३९ ॥
ऐसिया या राहाटि । मग तेचि क्रिया पाठि ।
समानु ऐसे कीरीटी । बोलिजे गा ॥ ३४० ॥

आणि जांभई सिंक ढेंकरू । ऐसा होता व्यापारू ।
नाग कूर्म कृकुरू । इत्यादि होय ॥ ३४१ ॥
एवं वायूची हे चेष्टा । येकीचि परी सुभटा ।
वर्तनास्तव पालटा । येतसे जे ॥ ३४२ ॥
ते भेदली वृत्ती पंथे । वायु शक्ति गा येथें ।
कर्म कारण चौथे । ऐसे जाण ॥ ३४३ ॥
ऋतु बरवा शारदु । शारदी आथी चांदु ।
चंद्री जैसा संबंधु । पौर्णिमेचा तो ॥ ३४४ ॥
का वसंती बरवा आरामु । आरामही प्रिया संगमु ।
संगमी आगमु । उपचारांचा ॥ ३४५ ॥
वाचें बरवे कवित्व । कवित्वीं बरवे रसिकत्व ।
रसिकत्वींहीं परतत्त्व- । स्पर्श जैसा ॥ ३४६ ॥
नाना कमळीं पांडवा । विकाशु जैसा बरवा ।
विकाशीही यावा । परागांचा ॥ ३४७ ॥
तैसी सर्व वृत्ति वैभवी । बुद्धिचि एकली बरवी ।
बुद्धीही बरव नवी । इंद्रिय प्रौढि ॥ ३४८ ॥
इंद्रिय प्रौढि मंडळा । श्रृंगारू येकुचि निर्मळा ।
जे अधिष्ठात्रि या कां मेळा । देवतांचा जो ॥ ३४९ ॥
म्हणोनि चक्षुरादिकें दाहे । इंद्रिय पाटी स्वानुग्रहें ।
सूर्यादिकां कां आहे । सुराचे वृंद ॥ ३५० ॥
ते देववृन्द बरवें । कर्मकारण पांचवें ।
अर्जुना येथे जाणावे । देवो म्हणे ॥ ३५१ ॥
एवं माने तुझी आइणी । तैसी कर्म जाताची हो खाणी ।
पंचविध आकर्णि । निरोपिली ॥ ३५२ ॥
आतां हेचि खाणी वाढे । मग कर्माची सृष्टी घडे ।
जिही ते हे उघडे । ते दाउं पांचै ॥ ३५३ ॥

यया लक्षणें–यथा लक्षणें. देहे–देह. येथे–एथ. (३१५) याते–ययातें. म्हणिजत यया दोषे–म्हणिजे ते याचि उद्देशे. येथे–येथ. भोग्य=इंद्रियांचे विषय. (३१६) हति–हाती. जचौनि–जाचोनिया. देहोराति–दिवोराती. जोडिति–जोडिजति. (३१७) ते–तिये पुरूषा–पुरूखा. अनुठावोचि–आन ठावोचि. भाषा–भाखा. देहे–देह. (३१८) गुंतले येथें–गुंताडे येथ. (३१९) अधिष्ठान–हे अधिष्ठान. या–यया. (३२०) ते–हे. (३२१) (नीर=मृगजळ.) वरिषे–वर्षे. (३२२) न माये–सामा ये. (३२३) आविष्कारे (आविष्कार, आविष्क्रिय.) प्रगट करणें. (३२४) विचाराच्या–विसराच्या. भाष्य–भाष (भाष्य=सर्व आत्मरूपच एक होय असें, युक्तीप्रयुक्तीनें समजवून सांगितलेले ते येथें मुळीच पुढें होत नाहीं. पण देहावरच सर्व वाजणें झालें असें देहभ्रमाचे ते.) देहयासी–देहेसी. विषी–विषयीं. (३२५) तो–ते. जीउ–जीवु. (३२६) [ चवरी=(१) पक्षी, चवर डोल नांवाचा गाणारा; (२) मासा आपल्या कल्ल्यामधून पाणी बाहेर टाकतो त्यामुळें त्यास पोहणें होतें. ('केशव' मत्स्याची देवता.) (३) घरे आहेत पण दारे नाहींत. (४) ब्रह्म-अंडाचे रडणेंच जसें, दुःखच एक सर्व असे. (५) फटींच्याफटी, अनेक फटी असलेल्या चिरी व पडदे, दार. (बोटे जशीं, पण बोटांना पंखे असतात, मांजर इत्यादि, प्राण्यांची नखे, पंजाची नखे,

ती जशी कां ते पंखेच पण रक्षणार्थ तीक्ष्णतर असलेली नखें होत.) चमर=हरणाची एक जात. ᐟचमरी= चवरी. पातयाच्या–पातेयाच्या=पापणीच्या. येकचि–एकीच. (३२७) जाणणे–एक जाणणें. बाह्य–बाहेरि. [*बाह्य=आलेले, वाट चुकलेले, बाह्य, आकस्मिक, यदृच्छागत, पाहुणा, आगंतुक. (घुसडलेला पाठ, पाहुणा =आगंतुक.) (अयाचित=न मागता मिळालेले अन्न. अयाचित वृत्ति, अयाचित व्रत=न मागता मिळेल त्यावर निर्वाह करणें)*] (३२९) *यया*–इया. (३३०) वाहाणि–वाहणी. (३३१) रस=प्रीती, स्वाद, षड्स (गोड, आंबट, तिखट, तुरट, कडवट, रुक्ष.) अन्न, शब्द, चीक, द्रव पदार्थ, वीर्य. नवरस=शृंगार, वीर, करुण, बीभत्स, भयानक, रौद्र, अद्‌भूत, शांत, **हास्य**. (नव=नवा, तरुण, ताजे. **नवम्**=आताच.) (३३२) **अनुपायनी**–आनपायिनी (अनपायिन्). (३३३) आली–आली तरी. (३३४) गाती–तरी गती. अधोद्वारे–अधोद्वारी. (३३५) स्कंदौनि–कंदौनि. म्हणिपे–म्हणिजे. (३३६) बाहे–वाहे. नाव–नाम (३३८) संडिता–सांडिता. (३३९) या–इया. ऐसे–ऐसी. (३४०) ऐसा होतो–ऐसैया होतसे. कुकुरू–कुकर. (३४१) पंथे–पथे. (३४३) ऋ–आणि ऋतु. ऋतु=वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत, शिशिर. शारदु=(शरद्=आश्विन कार्तिक महिन्यात येणारा एक ऋतु. शरदकामिस्=कुत्रा. शरद पर्वन्=कोजागिरी–आश्विन शुद्ध १५–पौर्णिमा.) शरद् ऋतुसंबंधी, वार्षिक, नवीन, नम्र, वर्ष, मृग, आकाशतृण, आश्विनमास, सरस्वती, ब्राह्मी, कोजागिरी, श्वेतपद्म, धान्य. (शारदिक=बकुल. शरदाया=शरद्‌ऋतूंतील दुर्गा पूजा. *शारद्वतः=कृपाचार्य. शारद्वती=कृपी, कृपपत्नि) आथी–पुढती=अग्रतः श्रेष्ठ. (अग्रतः=* समोर, पुढें अग्रसर, पहिल्याने.) चंद्री [**चन्द्र** = चंद्र, कापूर, पाणी, सोने, लाल मोती, आल्हादक वस्तू, श्रेष्ठ, छत–चांदवा, मोराच्या पिसावरील डोळा. **चन्द्र** (स्त्री.) = चंदन, रात्र, चंद्रविकासी कमळ, (ज्यो.) रोहिणी, चांदणे. **चन्द्रक**=नख, मोराच्या पिसावरचा डोळा, पाण्यावरील तेलाची चंद्राकृति. **चन्द्रकिन्** = मोर. **चन्द्रहास** = तरवार, रूपे. **चन्द्रउदय** = छत, चादवा, रसायन (वि.); **चंद्रआपीड**=शंकर. **चंद्रदार**=नक्षत्रें. **चंद्रशालिका**=गच्ची. **चंद्ररेणू** =काव्यचोर. **चांद्र**=रूपे, मृगनक्षत्र, आले, चांद्रायण. **चांद्रव्रतिकं**=चंद्राप्रमाणें सर्वांना आनंदविणारा.] संबंधु (संबंध=स्नेह, योग्यपणा, नातलग, शरीरसंबंध, नाते, संयोग, जोडणे, संसर्ग) (३४४) वसंती [**वसंत**=सहा ऋतु वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत, शिशिर पैकी पहिला–चैत्र–वैशाख महिन्यांत येणारा–ऋतु, गायनातील एक राग, कोकिळ, शब्द दिवटा; शीतलकारी, मनास भारीनें आवडणारा असा, ऋतु, पुष्प, फळे येण्याचा हंगाम, नियमित काळ, तेज, नेत्रांजनविशेष; सहा ही संख्या, पुष्पमास, ऋतुपति, वसंत अभि:: (*ऋतुप्राप्तिपासून १६ दिवस संभोग काळ.*) वसंत पुष्प= कदंब वृक्ष.]; आरामु [आराम=आनंद, विश्रांती, नयनाल्हाद वस्तूं, बाग, खेळ.] *प्रिया*=सेवा, हित, इष्टगोष्ट, प्रीती, प्रेमाचे भाषण, सुखवार्ता सुख, आनंद. संगम=संगम=भेट, संगत, संगती, स्पर्श, मैथुन. आगमु (आगम=येणे, दृग्गोचर होणे, प्राप्ती, लाभ, उत्पत्ति, प्राप्तीचा मार्ग, विद्या, औषध. तात्त्विकज्ञान, शास्त्र, वेद, मंत्र, तंत्रशास्त्र, शब्दप्रामाण्य, प्रतिकार, शब्दांत नवीन येणारा वर्ण, पूजाप्रकार नदीचे मुख, येण्याचा रस्ता, घडणें, फल, स्त्रीगमन घडणें. उपचारांचा=इलाज करणें, प्रतिकार करणें, त्या निमित्तानें जवळ येणे, जवळचे होणें, नुसतेच उपयोगी आहे म्हणणें, तेथें इलाज न करतां ते देवास आकळणारे होत नाहीं, म्हणून उपयोगी व्हावे, इलाज करावा, स्वकल्याण पाहावे, नुसतेच दासीपणात आयुष्य क्रमूं नये, **पंच उपचार**, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, **पंचभक्ति** उपचार–जप, होम, पूजा, तर्पण, विप्रभोजन, **औषधोपचार**=बोलणें, भेटणें, वागविणें, आदर, गायन, रागरंग इत्यादि. (३४५) परतत्त्व स्पर्श=आत्मरूपाचा संबंध. (३४६) याबा=पुष्परजांचा उद्भव. (३४७) अधिष्ठात्रि या कां–

अधिष्ठात्रियांचा = आश्रयभूत (देवतांचा) (३४९) चक्षुरादिके–चक्षुरादिकी. दाहे–दहाही. इंद्रिय पाटी (स्वानुग्रहे) इंद्रियापाठी स्वानुग्रहे = कृपेने. (३५०) देवो–देव. (३५१) आइणी–आयणी = आवडीला. **पंचविध** = १ देह, २ जीव, ३ इंद्रियगण, ४ प्राणपंचक व ५ इंद्रियाचे देवतामंडळ ही पांच कारणे होत. (३५२) हे–हेतु ही. (३५३)

**अधिष्ठानः—**

अशी नांवानुरूप, गुणवर्णनानुरूप, चिन्हानुरूप, लक्षणानुरूप ती पांच कारणें, ऐक. येथें तर देह हे 'मी' म्हणणे जे, ते '**पहिले कारण**' होय. (३१५)

ह्यांस आधार का ठिकाण–'**अधिष्ठान**' असें म्हणणे होते ते ह्याच उद्देशानें की जे कांहीं आपल्या भोग्यासह–विषयासह भोक्ता हा येथें वस्ती करून असतो म्हणून. (३१६)

दहा इंद्रियांचे जे दहा विषय ते येथें दहा हातच म्हटले अशा ह्या (इंद्रियांच्या) दहाही हातांनीं रात्रंदिवस जयौनि–जाचोनि–श्रम करून सुखदुःखरूप प्रकृति जी, का तीच ह्या प्रकृतीच्या योगानें होणारी सुखदुःखे तीच अंगी जडवून घेतली, गोळा केली, सांठविली. (३१७)

प्रकृतीनें जोडलेलीं सुखदुःखें ह्या पुरुषानें भोगण्यास दुसरा कांहीं एकादा ठावच नाहीं आणि म्हणूनच कीं *अधिष्ठान या शब्दानें देह हा समजावा बोलावा.* (३१८)

हा देह चोवीस तत्त्वांच्या (पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, अव्यक्त, दशइंद्रियें, एक मन, पंचविषय = २४) वस्तीचें कुटुंब घरच जसें. तेथें तर बंध का मोक्षाचें तें गुंताडें (गुंतलेलें) तें तुटतें सुटतें. (३१९)

बहुत काय लिहावें पण जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थानां हे धनंजया, हेंच की अधिष्ठान स्थान असल्यानें या देहास अधिष्ठान असेंच म्हटलें. (३२०)

(तथा कर्ता) [पांच कारणांनीं पांच करण हेतूच्या मिळण्यानें कर्मलतांची ही लावणी होत असते. आत्मा तर वेगळा साक्षी असा] आतां कर्ता असें कर्मीचे दुसरे कारण जाणणें तेंच हें चैतन्यरूपी जो परमात्मा (का ज्ञान) त्याचें प्रतिबिंब ते तो जीव का जीवात्मा होय. (३२१)

आकाशांतून पाऊस पडतो, तेथें तें पाण्याचें डबकेंच कीं एक भूतळीं होतें. त्या डबक्यांत आकाश तें प्रतिबिंबीत होऊन (आकाशीं आकाश भिनलें तसें) तदाकार होतें जसें. (३२२)

अथवा असें जाणा कीं निद्रेच्या अतिभरामुळें रायास रायपण तें ठाऊक होत नाहीं (राया रायपण जाणत नाहीं–रायास रायपणाचा विसर पडतो) आणि मग तो स्वप्नामध्यें रंकपणाचा अनुभव घेतो (रंकपणांत समावतो). (३२३)

त्याप्रमाणें आपल्या स्वरूपाचा विसर पडून चैतन्यानें आपल्या त्याच्याठायीं देहाचा आभास उत्पन्न करणें होतें व मग चैतन्य तेंच कीं देहाभिमानानें नटतें प्रगटतें. (३२४)

चैतन्यानें देहपणानें प्रगटणें हें विचारास घेतलें तर आत्मस्वरुपाच्या विस्मरणामुळें त्यासच की जीव हें नांव प्राप्त होतें व त्याची या देहाबरोबरच राहण्याची प्रतिज्ञा शब्द देणें घेणें आणभाक झालेली होते. (३२५)

प्रकृति कर्में करिते तीं म्यां केलीं असें जीव तो भ्रमानें म्हणूं लागतो आतां तेथें जीवच का जीवात्माच की कर्ता असा बोलिला कीं, (३२६)

(करणंच पृथग्विधम्) मग (पातेयांच्या केशि) पापण्यांच्या केसांनीं एक स्वरूप आणणारी दृष्टी ती चवरीसारखी चिरल्याप्रमाणें वाटते, होते, गमते, दिसते. (३२७)

घराआंतल्या एका दिव्याचा अवलोक म्हणजे प्रकाश झरोका (खिडक्या) इत्यादीच्या योगानें वेगवेगळा अनेक तऱ्हांचा हवा त्या आकाराचा वाटेल तसा झाल्यासारखा आवडतो, भासतो दिसतो. (३२८)

नऊ रसांनां एकच पुरुष अनुसरला तर तो नऊ तऱ्हांच्या अशा निरनिराळया पणानें क्रमाक्रमावर आवडतो का असतो का होतो जसा. (३२९)

त्याप्रमाणें बुद्धिनें जाणणेंच एक जें तें जसें बुद्धिची शक्ति जाणण्याची ती एकस्वरूप म्हटलेली, ती कान डोळे इत्यादि भेदामुळें (इंद्रियांच्या बहिर्मुखत्वानें) बाह्य इंद्रियांच्या द्वारानें निरनिराळ्या रूपानें फांकतें, प्रगटते जी का यालाच पृथक्‌विध करण निरनिराळी इंद्रियें (करण) म्हणावें. (३३०–३३१)

(विविधाच पृथक्चेष्टा) पूर्व दिशेनें वाहण्याच्या व पश्चिम दिशेनें वाहण्याच्या ओघांचें मिळणें झालें म्हणजे पाणी एकच तें नदी का नद अशा निरनिराळ्या रूपानें होतें भासमान होतें. (३३२)

त्याप्रमाणें तशी ती प्राणवायूंत असणारी रजोगुणाची क्रियाशक्ति जी मूळचीच अविनाश अशी असते ती निरनिराळ्या ठिकाणीं पोहोंचल्यानें का प्राप्त झाल्यानें निरनिराळ्या स्वरूपाची होते, गमते भासू लागते. (३३३)

ती वाचेनें येऊं लागली म्हणजे किंवा ती वाचेच्या ठिकाणीं असली म्हणजे तीच की बोलणें अशी (शक्ति) होते. हातास का हातांत आली म्हणजे ती शक्ति देणें घेणें होय, देणें घेणें करिते. (३३४)

तीच शक्ति चरणाच्या म्हणजे पायांत आली म्हणजे चालणें घडतें संभवतें (ज्यास गति असें म्हटलें आहे) व मलमूत्र दोन्ही द्वारी आली तर क्षरणें होतें मल विसरतो. (३३५)

कंदापासून म्हणजे नाभिकमलापासून हृदयापर्यंत ओंकाराची उजरी योग्यता म्हणजे अभिव्यक्तीची झाल्यानें तीच की या शरिरामध्यें प्राण म्हटली तिलाच प्राण वायु म्हणतात. (३३६)

मग उर्ध्व अशा वरल्या भागास येऊं जाऊं घुसूं लागली कीं–हिच्या वरच्या रिघण्या रिघण्यानें पुढें तीच शक्ति उदान (कंठस्थ वायु) अशा संज्ञेस लिंगास–चिन्हास प्राप्त होते. तिचें नांव उदान असें योग्य होतें. (३३७)

ती प्राणशक्ति अधोद्वारानें जाऊं लागली म्हणजे ती अपान (गुदस्थ) वायु होते. तिला अपान असें नांव येतें. तीच शक्ति सर्व शरीरभर व्यापून राहण्यानें कीं तिलाच व्यान व्यापक शरीरस्थ वायु असें नांव येतें. (३३८)

भक्षिलेल्या अन्नाचा रस शरीरभर सरिसेपण पोहोचवितो, शरिराच्या निरनिराळ्या भागाला शक्ति देतो, व नच सांडला होऊन संधीसंधींनां कोनाकोपऱ्यांतही व्यापून असतो राहातो. (३३९)

अशा प्रकारें वरच्यावर याच राहाटीनें मग तीच क्रिया की नाभिकमळाच्या स्थानीं स्थिर झाली म्हणजे तिला नाभिस्थ वायु असें बोलतात. (३४०)

मग जांभई, शिंक, ढेंकर इत्यादि अशीं रूपें जीं वायुक्रियेचीं तीं "नाग", "कूर्म", "कृकर" इत्यादि नांवानीं दर्शविलीं होतात. (३४१)

याप्रमाणें ही वायूची चेष्टा, क्रिया, शक्ति, हालचाल एकच जरी तरीपण रीतीच्या म्हणजे निराळेपणाच्या नांवानें वर्तनास्तव निराळेपणाची का भिन्न अशा नांवाची होते. तेथीलची तीं तिचीं नांवेंही चेष्टा, क्रिया, शक्ति अशीं भिन्नभिन्न होतात. (३४२)

ते (वृत्ति भेदिली पंथे) भेदिलेली ती वृत्ति मार्गानें वायु शक्ति ती चौथें कारण जाण. (३४३)

**तरतम भावांचा उत्तम असा उल्लेख :—**

( दैवंचात्रपंचमम् ) उत्तम बरवा असा ऋतु जो शरद, त्यांतही पुन्हा शरिराचा चंद्र जो त्याहूनही उत्तम-तेथें शरद्चंद्री पूर्णिमेचा संबंध आला तर अतिशयच कीं उत्तम-सर्वोत्तम कीं. (३४४)

बरवा असा वसंत त्या उत्तम वसंत ऋतूमध्यें उत्तम अशी ती आराम बाग, उत्तम अशा बागेमध्यें पुन्हा प्रियेचा संगम, आवडत्या माणसाचा समागम, तो त्याहूनही उत्तम. या अशा प्रियसंगमांत तर पुष्पमाला, चंदनउटी इत्यादिकांचे उपचाराचा आंगम तो, पूजाप्रकाराला याची भर पडली तर उत्तमतेचा कडेलोटच की तेथीलची बहार पुसूच नये. (३४५)

अगोदर कमल तें सुंदर, त्यांतही तें विकासलेलें तर जास्त चांगलें. विकासावरही त्या सुगंधि पुष्परजांचा उद्भव असला तर तें त्याहिपेक्षां उत्तम. (३४६)

वाचा अगोदर चांगली, त्यांतही कवित्व असलें तर तें विशेष चांगलें-कवित्वावरही उत्तम असें तें रसिकत्व गोडी ती उत्तम व त्याहीपेक्षां ब्रह्मात्मरूप निरूपणस्पर्श तर विशेष चांगलें असें- (३४७)

याप्रमाणें सर्व वृत्तीच्या वैभवाचें स्थान जी बुद्धि ती श्रेष्ठ अशी. तेथें इंद्रियांच्या प्रौढीवरच कीं तें तिचें नवे होणें, नटणें शोभणें आवेशास येणें तें. तेथें त्या इंद्रियांच्या आवेशाला तर त्याच्या त्या अधिष्ठात्रि देवतांचे मंडळ विशेष शोभादायक होतें. (३४८-३४९)

म्हणून डोळे आदिकरून जीं दहा इंद्रियें त्यांच्या पाठीशीं आपल्या कृपेनें बळ देणारे का अनुग्रह करणारे असे सूर्य आदिकरून ते सुराचे समुदाय आहेत. (३५०)

असे ते उत्तम देव समुदाय का देवतामंडळ ते तेथें पांचवें कर्मकारण जाणावें, असे देव श्रीकृष्ण अर्जुनास म्हणत आहेत. (३५१)

देव म्हणाले कीं याप्रमाणें तुझ्या आवडीला येईल, तुझ्या समजुतीस पटेल अशी ही कर्मजातांची खाणि जिला कर्माची मूळ कारणें म्हटलें आहे तीं (कारणें तूं ऐकिलीस.) (३५२)

आतां हीच खाण ती वाढते व मग कर्माची सर्वथैव अशी सृष्टी घडते. ज्या सृष्टीवरच की ते पांचही हेतू स्पष्टपणें दाखवूं. (३५३)

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥ १५ ॥**

शरीरवाङ्मनोभिः = शरीर, वाणी व मनानें. प्रारभते = कर्म आरंभास प्रारंभाचे करतो. नरः = मनुष्य. न्याय्यम् वा = यथाशास्त्रविधीप्रमाणें कसें तें; विपरीतं वा = अथवा विपरीत कीं. हेतवः = उद्देश, हेतू, दोष.

**अन्वय :—** नरः । यत् कर्म । न्याय्यं वा । विपरीतं वा । शरीर वाङ्मनोभिः । प्रारभते । तस्य । पंच हेतवः सन्ति ॥ १५ ॥

**अर्थ :—** मनुष्य प्राणी शरीरानें, वाणीनें अथवा मनानें, जें कर्म करण्याचा आरंभभर हा प्रारंभाचा करतो, तेथें तें कर्म न्याय्य म्हटलें का विपरीत म्हटलें, तरी त्यास पांच हेतू, ( उद्देश किंवा दोष ) असतात.

(श्लोक १५ वा ओव्या ३५४-३७७)

**(मनोभिः मनसा) तरी अवसांत आली माधवी । हेतु होय नवा पल्लवी ।**
**पल्लव पुष्प पुंजु दावी । पुष्पीं फळातें ॥ ३५४ ॥**

कां वारीषि आणि मेघु। मेघें वृष्टि प्रसंगु।
वृष्टिस्तव भोगु। सस्य सुखाचा॥ ३५५॥
नाना प्राची अरुणातें विये। अरुणें सूर्योदयो होये।
सूर्ये सगळा पाहे। देवो जैसा॥ ३५६॥
तैसें मन हेतु पांडवा। होय कर्म संकल्प भावा।
संकल्पु लावी दिवा। वाचेचा गा॥ ३५७॥
(वाचा) मग वाचेचा तो दिवटा। कृत्यजाताचिया वाटा।
तेव्हां कर्ता रिघे कर्मठा। कर्तृत्वाचा॥ ३५८॥
(शरीरेण) तेथ शरीरादिक दळवाडें। शरीरादिका हेतुची घडे।
लोहो काम लोखंडें। निर्वाळिजे का जैसें॥ ३५९॥
का तांथुवाचा ताणा। तांथु घालिता वैरणा।
तंतु तोची विचक्षणा। होय पटु॥ ३६०॥
तैसें मना वाचा देहाचे। कर्म मनादि हेतुचि रचे।
रत्नी घडे रत्नाचे। दळवाडे जेवी॥ ३६१॥
(यत्) येथ शरीरादिकें कारणें। तेचि हेतु हे केवि कोणें।
अपेक्षिजे तरी तेणें। अवधारि जो॥ ३६२॥

हेतु–ते हेतु. नवा पल्लवी–नव पल्लवी. पुंजु–पुंज. पुष्पी–पुष्प. (३५४) नाना–नातरि. अरुण=(१) सूर्य सारथी, (२) सोनें, (३) केशर, (४) पहांट, (५) तांबुस, (६) पिंगट, धुरकट, (७) हिमालयाचे शिखर (८) माघ महिन्यातील आदित्य, (९) पहांटेचा तांबुस प्रकाश, (१०) सूर्य (जास्वंदी, तांबडी कापशी लाल गुंज, रक्त, अतिविष इत्यादि.) [अरुण अग्रज–अनुज–अवरज=गरूड. अरुण अर्चिस=सूर्य. अरुण आत्मज=(१) जटायू (२) सूर्य पुत्री, यमुना नदी. अरुण आत्मिका=(धान्य) लोक. अरुण उदय=पहाट. अरुण उपल=माणिक. अरुणचूड=कोंबडा. अरुणज्योतिस्=शंकर. अरुणनेत्र–लोचन=कबुतर, पारवा, भारद्वाज. अरुणप्रिया=सूर्यपत्नि, सांवली, छाया. अरुण सर्प=तक्षक. अरुणसारथि=सूर्य. अरूणिमन्=तांबडेपणा. अरूणित=तांबडा रंग दिलेला.] देवो–दिवो. (३५६) संकल्पु–तो संकल्प. (३५७) कृत्यजाताचिया–दावी कृतजातांचिया=सर्व कृत्यांच्या वाटा दाखवितो. रिघे–रिगे. कर्मठा कामठा=संभ्रमांत, व्यापारांत. कर्तुत्वाचा–कर्तृत्वाचा. (३५८) शरीरादि[२]–शरीरादि का. लोहो काम–लोह काम (लोह=लोखंड, रक्त, धातु, तांबडे, तांबडा बोकड). (३५९) तंतु तोचि–तो तंतुचि तांतुवाचा=तंतूंचा. वैरणा=थोडे थोडे घालता. (३६०) मना वाचा देहाचे–मन वाचा देहाचे. (३६१) अपेक्षिजे=जाणण्याची इच्छा करावी. हे केवि–केवि हे. (३६२)

## मनानें, वाचेनें, शरीरानें मनुष्य कर्में आरंभतो; तेथील न्याय्य का विपरीत हेतु ते पांच–३५३–३७७

तरी अहो अगदीं अकस्मात वसंत ऋतु प्राप्त झाला; वसंतश्री हीच येऊन पोहोंचली, तेथें नव पल्लव येण्यास उद्देश कां निमित्त, कारणच ती वसंतश्री झाली. पल्लव हेच कारण निमित्त झाल्यानें पुष्पांचे पुंजच्या पुंज दिसूं लागतात पुष्पांच्याठायीं फळ दाखवितें; व पुष्प हेंच फळ येण्यास निमित्त–कारण झालें, का होतें जसें— (३५४)

अहो, वर्षाकाळ आला तो मेघ आणतो; मेघ आणण्यास वर्षाकाळच कारण होतो. त्या मेघामुळें *वृष्टीचा प्रसंग; पाऊसाचें येणें होतें : सर्वांचे डोळे त्या प्रसंगाकडे लागलेले. असा तो प्रसंग, समय, संधि होय;*

। वृष्टि झाली तरच लोक सुखी दिसतात. मग लोक, सुख भोगणारे–उपभोगणारे होतात नां! तेव्हां (सस्य) धान्य सुखाचा तो भोग येणारा, होणारा होतो ना! (३५५)

अथवा असेंही म्हणूं करूं कीं, प्राची, पूर्वदिशा ही अरुणास वीते : पूर्व दिशा हींच अरुणाचे विण्यास कारण होते. तिजमुळेंच नां ती दिशा अरुणास जन्म देते; व अरूणाचा जन्म झाल्यावरच ना मग सूर्याचा उदय होतो; सूर्यानेंच दिवस उगवला असें होतें, दिवस उजेडाचा होतो. (३५६)

त्याप्रमाणें, हे पांडवा! मनच दोष, उद्देश हेतु ह्या कर्मकरण्याच्या संकल्पाचे (भावना भावनेस येते,) होते. तेथें तो संकल्पच ह्या वाचेचा दिवा लावतो कीं; संकल्पावर ही वाचा बोलूं लागते, तेथें मग शब्दरूपी देवाच एक प्रकाशला, प्रकाशाचा केला, दिवाच लावला असें होतें–स्नेहवात (दिवा) ज्योत लागली होते. (३५७)

यावर मग तो वाचेचा दिवटा–शब्दरूपी प्रकाश (ज्योत) दिवाच त्या सर्व कर्मांच्या वाटा दाखवणारा होतो; तेथें सर्व कृत्यजात म्हणून जें आहे: काम काज सर्व जें कांहीं; तेंचमुळीं त्या (दिव्यानें) वाचेच्या शब्दाच्या (तेलवात ज्योत) दिव्यानें वाट दाखवूं लागलें असें होतें ना! अहो! तेथें मग कर्ता जो तोच कर्तृत्वाचा व्यापार म्हटला–(कर्ता जो, तोच ते कर्मस्थान. कर्ता तोच कीं कारखानाच जसा सर्व, काम काजाचा म्हटला होतो नां.) (३५८)

तेथें शरीरवाचामनरूपी जें त्रिदळ तेंच ह्या शरीरास, वाचेस, तसेंच मनास पुढें करतें, (हेतूचें करतें, उद्देशाचे करतें), शरीर वाचा तसेंच मन हें पुढें घेऊन (उद्देशून) बोलणें केलें असें होतें. अहो, लोहकाम जे ते तर लोखंडानेंच सिद्ध होणारें; सुवर्णासारखा प्रकाश का रुप्यासारखा शुभ्र प्रकाश, किंवा तांब्याचा तांबुस प्रकाश, हा तर चित्तानें सिद्ध (करावा) होणारा होतो नां! अहो! चित्तच एक ह्या स्वभावास सिद्ध करण्यांस योजिलें होतें जसें. (३५९)

अहो! शरीर, वाचा तसेंच मन हेंच म्हटलें कीं, (तंतूचा ताणा करून)–तंतू ताणले करून त्यांत तंतूचीच आडवी भर (बाणा) घातली वैरणाच की ती म्हटली ती: तांदुळाच एक सगुणतेचा जसा विरवला का आंत बसविला तेथें असेंच म्हटलें कीं हा जो हा आडवा तंतू आंत बसविला गेला, तोच अहो! पट होण्यास कारण झाला; (तेथें आतां तो आडवा तंतूच की पट म्हटला, तो आडवा तंतू, विचक्षतेचा असा, गुरूच म्हटला होतो: तो विचक्षणतेचा तंतू निपुण, कुशल, विद्वान, दूरदर्शी असा पटच म्हटला:–तेथें विचक्षस् ते अध्यापकच का गुरूच कीं तो एक, तोंच पट झाला की, "तंतूच तो गुरूत्वाचा पट झाला कीं!) "तंतुच्या ताण्यांत तंतु थोडे थोडे घालतां तो तंतूच दक्षतेचा चतुरतेचा असा पट होतो." (३६०)

तेव्हां तेथें मनाचें कर्म काम करणेंचें अथवा वाचेचें कर्म, बोलणें जें अथवा देहाचें कर्म (देहधर्माच्या ऊर्मीच जशा) प्रवृत्त होणें जें तेंच मनास कर्म करण्यास उद्देशून केलें होतें–; वाचेच्या बोलण्यासच पुढें घेऊन केलेलें होतें. शरीराची हालचाल का प्रवृत्त होणें तें तेथेंच उद्देश रचिला गेला होतो : वाचेच्या बोलण्यास वाचाच मुळीं हेतू झाली, मनाचे कर्म करण्यास मनच मुळीं पुढें झालें–उद्देशाचें झालें; शरीर हें कर्म करण्यास शरीरा शरीरानेंच कीं अहो प्रवृत्त झालें, हेतूनें रचलें गेलें, मनाचे कर्म करण्यास मनानेंच उद्देश पुढें पुढें केला; हेतू रचिला; जसे का रत्न जें प्रकाशतें, तेथें रत्न व प्रकाश हें कांहीं दोन नसून एकच ते प्रकाश दळवाडे, प्रकाशच रत्न म्हटलें, तेथें प्रकाशच एक सर्व (पण रत्न तें कांहीं रत्न म्हणण्याचें उरत नाहीं.) पण उद्देश व ते कर्म करणें हेंचमुळीं सर्व प्रकाशच एक, तसें येथें मन का वाचा का शरीर हें मुळींच पुढें न घेतां तो हेतूच सर्व कांहीं होऊन आहे. (३६१)

येथें आतां ह्या शरीरमनवाचेकरितां तो उद्देश हा कसा तें कुणीं जर तेथीलच्या अगल्याचें लक्षाचें

का आदराचें करें तें (अपेक्षण्याचें) इच्छिण्याचें केलें (करावेंच केलें असें होत आहे–तर त्यानें तें हें ऐकण्याचें करावें कीं.) (३६२)

सूर्याचया प्रकाशा। हेतु कारण सूर्यची जैसा।
का उसाचे कांडे उंसा। वाढि हेतु ॥ ३६३ ॥
नाना वाग्देवता वाणावी। तै वाचाचि लागे मवावी।
का वेदा वेदेचि बोलावी। प्रतिष्ठा जेवि ॥ ३६४ ॥
तैसी कर्मा शरिरादिके। कारण कीर ठाउके।
परि हेचि हेतु हे न चुके। हेही येथ ॥ ३६५ ॥
आणि देहादिकी कारणी। देहादि हेतु मिळणी।
होय जया उभारणी। कर्मजाता ॥ ३६६ ॥
ते शास्त्रार्थे मानिलेया। मार्गानुसारे धनंजया।
तरी न्यावो तो न्याया। हेतु होय ॥ ३६७ ॥
जैसा पर्जन्योदकाचा लोटु। विपाये धरी साळीचा पाटु।
तऱ्ही जिरे परी अचाटु। उपेगु आथि ॥ ३६८ ॥
का रोषे निगाले अवचटे। पडिले द्वारकेचिया वाटे।
तै सिणे परि सुनाटे। न वचती पदे ॥ ३६९ ॥
तैसे हेतु कारण मेळे। उटी कर्म आंधळे।
ते शास्त्रांचें लाहे डोळे। तै न्याय म्हणिपे ॥ ३७० ॥
ना दुध वाढिता ठावो पावे। तंव उतोनि जाय स्वभावे।
तेही वेचु परि नव्हें। वेंचले ते ॥ ३७१ ॥
तैसे शास्त्र साहयेविण। केले नोहे जरी कारण।
तरी लागो कां नागवण। दान लेखी ॥ ३७२ ॥

सूर्याचया–आइका सूर्याचिया; सुर्यचि–सूर्यूचि. (३६३) वाणावी-वानावी = मवावी–कां मवावी–कामवावी = श्रमवावी. (३६४) किर–हे किर. (३६५) मार्गानुसारे–मार्गा अनुसरे. न्यावो–न्याय. मानिलेया = मान्य केलेल्या. (३६७) प्रजन्योदकाचा लोढु–पर्जन्योदकाचा लोटु. तऱ्ही–तो. अथि–आथि अचाट = विलक्षण. (३६८) निगले–निघाले. सुनाटे = व्यर्थ. (३६९) उटी–उठी. कर्म–कर्म जे. (३७०) पावे–न पावे. उतोनि–उलंडोनि. तेहि–तोहि. वेंचले–वेंचिलें. (३७१) कारणं–अकारण. (३७२)

अहो सूर्याचा प्रकाश जो त्या प्रकाशास सूर्यच कारण ना–सूर्यामुळेंच तो प्रकाश आहे ना सूर्य प्रकाशास सूर्यच कारण (का उद्देश का हेतु का दोष) ना जसा; अथवा उसांच्या वाढीस उसाचें कांडेच मुळीं तें हेतू का कारण नां! उसाच्या वाढीस कारण तें उसांचें कांडेच ना जसें! (३६३)

(अग्निप्रकाश–संयमाग्नि–वैराग्याग्नि.) अहो वागीश्वरांची स्तुती करावयाची तर वाचाच मुळीं श्रमानें कमविली पाहिजे. वाग्देवता, शारदा, सरस्वती, जी वाचेची देवता, अग्नि ती जर वानण्याची स्तवण्याची आदराची गौरवाची करणें जर आहे तर वाचाच मुळीं ही कमवावी, श्रमवावी का कामवावी लागते नां? अहो, वेदाची प्रतिष्ठा ती वेदानींच की अहो बोलावी कीं, वाचेची देवता वाखाणावी तर वाचा वाणी हीच मवावी–मावावी पैस द्यावी–व्यापक करावी–प्रशस्तपण हें मनाचें देऊन (आकाशच का वारा झाला, वायूच तो आकाश झाला, जशी भूतें ही आकाशामध्येंच जन्मली, वाढली, निमली आकाशच झाली तसें) आंत

भरून घेऊन तिला पैस देण्याचें करावें लागतें जसें–तसें वाचेचें देवरूपानेंच आपणच मुळीं वाचारूपी देवता होऊन (देवाची प्रतिष्ठा ती प्रतिष्ठित करावी) वेदांनीं वेद होऊन वेद प्रतिष्ठिले (आधारास घेतले, आधार दिले गेले, प्रतिष्ठेचे महिम्याचे–आश्रयाचे महिम्याचे केले होत जसे.) (३६४)

अहो! अगत्य जर, लक्ष असावें जर, का आदर हा तेथें द्यावाच असें जर, अहो अगत्य आदर का लक्ष ह्या देवताच जशा कां म्हटल्या जाणाऱ्याः तेथें देहामुळेंच नां! त्या प्रतिष्ठा पावल्या होतात (प्रतिष्ठित स्थापित केल्या होतात) नां! तसें येथें अहो! अगत्य–आर्जव हेंच मुळीं सर्व प्रतिष्ठा दिली गेल्यानें तेथें कर्म काम काज कर्तव्य (करतूद का तरतूद) ह्यांस तर हें शरीर वाणी, का मन हेंचमुळीं प्रस्थापिततेचें करावें (प्रतिष्ठित–स्थापित करावें) असेंच तें हेतूचें का कारणाचें–आधाराचें का उद्देशाचे ते प्रतिष्ठिणें, ठाऊक आहेच अहो शरीरास शरीरचमुळीं उद्देश हे काय ठाऊक नाहीं म्हणावें? समजत नाहीं म्हणावें? वाणी शरीरास का मनास मनच–वाणीच का शरीरच मुळीं ठाऊक असलेलें कारण आधार घेणें होय तेथें मांस-वसादि विकारच मुळीं तो उठाव घेणारे कारण आधाराचे हें जसें शरीर धर्मानें–मनोधर्मानें वाणीधर्मानें आश्रयिलें होतें तो तो धर्मच मुळीं प्रतिष्ठिला व दया दानत हीच स्तविली (प्रतिष्ठिली) समृद्धतेची (अशी प्रशस्त) केली आसरा दिला–आश्रयांस घेतली करावी लागणारी होय. अहो ह्या विकारांना तर 'सविकार-मुदाहृतम्'—अशी ती प्रकृतीच्या आहारीच केव्हांही जाणारी भुतें–पंचमहाभूतें–का क्षेत्र ज्याचें घडलें आहे अशीं तीं तत्त्वें–तीच मुळीं कारण का आधार तेथें कारणावरच–(आधारावरच) कारण (आधार) वाजणारे होय, हें ठाऊक आहेच पण तेथें तो उद्देश प्रतिष्ठितता ही सिद्ध करावी लागणारी नां! असें हें आहे म्हणून कर्मास काम करण्यामध्यें शरीर वाणी मनच मुळीं शरीर वाणी मनास जाणतें केव्हांहि व असें तें ह्या मन शरीर वाणीनें–मन शरीर वाणीस जाणणें हाच तेथें हेतु उद्देश होतो हें चुकू नको (असें हें जें आहे तेहीपण येथें जाणण्यास चुकूं नको) हे नीट समजूनच–जाणून ऐस–शरीर का वाणी का मन मनास जाणतेंच जाणतें पण असें हें जें जाणणें तेथें चुकी करूं नको असें हें जाणणें जाणून ऐस तें चुकूं नको. (३६५)

कर्म काम काज हालचाल ही जी सर्व तेथें (कर्म हा शब्दच पुढें घेतलेला) कर्म हेंच पुढारून घेतलें आहे. तेथें देह वाणी मनादिकांचा आधार घेऊनच कीं, (कारणच कीं तें देहवाणी मनादिकांचा आधार घेऊनच कीं कारणच कीं तें देहवाणी मन तेथें) देहमन वाणी ह्याचें ठायींच कीं मिळणी का मिळवणी होणारी व मग एक उभारणेंच झालें (उठणेंच, रक्षणें, भरणें, पोसणें, व्यापणें, भोगणें, धारण करणें, मजुरीनें लावणें–झालें) जसें, का प्रवृत्ततेचें झालें, प्रतिष्ठिलें–आश्रयलें आधारास घेतलें कीं; म्हणून ह्या कर्मजातांना–कर्मसमूह –जेवढें म्हणून कर्म आहे त्यास (देह वाचा मनाचा आश्रय हेतू कारण लेखक समुदाय–जसा कां चित्रगुप्तच तो ते कर्म लिहिणारा तेथें कारण उद्देशानेंच ह्या) देह वाचा मनातच मुळीं, मिळवणी त्या हेतूची उद्देशाची झाली असें केव्हांही. (३६६)

कर्मजाताचें उभारणें तें–समूहपरत्वें कर्म तें उभें झालें, प्रवृत्ततेस आलें असें तें जर का शास्त्राच्या अर्थानें पुरूषच एक प्रतिष्ठिला तेथें धर्म अर्थ काम हेंच प्रशंसिलें तेंच आधारात घेतलेलें असें जर मानणें सन्मानाचें केलें मान्य असें जर मानिलें होऊन आहे, तेथें हे धनंजया मार्गामार्गाच्या अनुसरण्यानें तर तेथें न्याय हाच न्यायास हेतू होतो. (अन्यः अन्वयः न अन्यः अन्वयो) न्याय म्हणजे पद्धत, सन्मार्ग, राजनीती, विचार उपपत्ति, नियामक प्रमाण, पूर्वापार चालत आलेली म्हण का दृष्टांत, न्याय, प्रकरण, तेथे सन्मार्ग हाच सन्मार्गास हेतू, उद्देश, कारण आधार झाला जसा. (३६७)

(जन्मलेले, उत्पन्न केलेले, घराण्यासंबंधीं, वधुपक्षीय, करवला, मनुष्य, वरपक्षीय बाप, लोक, प्रेम, बाजार, राष्ट्र, उपस्त्रा, मनुष्य, आईची मैत्रीण.) गर्जणारा ढग, पाऊस, पावसाच्या पाण्याचा लोट जर का कदाचित् साळी पेरतांना जो कांहीं एक पाण्याचा पाट तेथें असावा लागतो तो जर का धरून असेल–

पुरवून असेल तरच कीं जिरतो पण तेथें अचाट असाच कीं उपयोग तो कर्म अचाट म्हणजे विलक्षण असेंच तें दंडिलें जसें कां उपयोगाचें केलें कां प्रिय मानलें तेथें स्तुतिपर भाषणच एक करून तें जसें वापरलें–कामास आणलें, आलें. लायकीच तेथें इष्ट हेतु साधक कर्मच तें उपयोगास घेतलें. (३६८)

तेथें असें तें होय जसें: अथवा अवचटपणें अकस्मिततेनें रोषे रागास येऊन निघालेलें तें द्वारकेच्या वाटेस लागले–(द्वारकेस जाणारी वाट जी) तेथेंच ते पडले जर तर तें शिणतेंच पण सुनाटपणानें कां घाबऱ्या घाबऱ्याचमुळीं तें त्याचें जाणें निघणें कां धांवणें झाल्यामुळें त्यांस पाउलेंच ती सांपडली जरी होत नाहींत–(ती पदे सांगण्यासारखी होत नाहींत जरी तरी) तरी तीं पावलें कां पाउलांनीं चालणें व्यर्थ होत नाहीं–पदें कां पाउले ती व्यर्थ जात नाहींत. (३६९)

तसें हेतु उद्देश व कारण, आधार, आश्रय, ह्या दोहींच्या मेळ्यानें जें कांहीं आरशात न दिसणारें ते–आधले असें (हपापलेले) कर्म उठते, होते ते जर का शास्त्राचें पाहाणें घेऊन असेल करू लागले–त्यास शास्त्राची दृष्टी जर लाभली असेल ते शास्त्राचे डोळे लाभते झाले, डोळे दृष्टी शास्त्रांनीं यथाशास्त्र असेंच तें त्यांनीं पाहाणें जर कां केलें तर मात्र तें न्याय्य म्हणजें पुण्यकर्मच म्हटलें होतें–तें पुण्य कर्मच म्हणावें कीं. (३७०)

पण तें कांहीं जडवलें मुक्त केलें–वसविलें, समृद्ध झालें. गोळा केलें धुंडाळलें झालें, वाढ पावलें–आप्तपणाचें केलें असें होत नाहीं, दूध वाढतां वाढतां आपला ठावच पाहूं पावलें तर तें स्वभावें करूनच उतून जातें, उलंडोन जातें तेही पण वेंचलें म्हणजे खर्च केलें असें होतें पण तें कांहीं, कां चढविणें खरें जडविणें नव्हे, वसविलें का उपयोगास आणले असें कांहीं खरें खर्च करणें नव्हें.

दूध तापविता तापविता–वाढविता वाढविता, वरवर येऊन भांड्याच्या कांठाला पोहोचून सीमाच पावणारें झाल्यानें तें मग सहज स्वभावें करूनच उतूं गेलें तर तें खर्च झालें सार्थकी लागलें नाहीं. पण उतून जाऊ लागतें असें जें उतूं गेलें होणारें तेंहीपण खर्च झालें वेंचलें गेलें होय–पण तें कांहीं खरें असें आटविलें, उपयोजिलें–कामास लाविलें, खर्ची लागलें–खर्च झालें असें नाहीं, असें नव्हे. (३७१)

*तसें शास्त्राच्या साह्याशिवाय जरी तो उद्देश का हेतू, आधार का आश्रय तरी कारणीं लागले असा* होत नाहीं–तो आधार हेतू वायां गेला असें होतें आणि म्हणून अहो, अशीं जी तेथें नागवण होऊन–का चोरांनी लुटिलेलें द्रव्य तें दानाच्या काय हिशेबी धरतां येईल नागवण कां फसवणूक होणारी ती दानाच्या योग्यतेची होईल काय? (करावी वायां जाऊं देऊं नये.) (३७२)

**अगा बावन्ना वर्णापरौता। कोण मंत्र आहे पांडुसुता।**
**कीं बावन्नाहि उच्चारिता। जिउ आथि ॥ ३७३ ॥**
**परि मंत्राची कडसणि। जंव नेणिजे कोदंडपाणि।**
**तंव उच्चार फळ वाणि। न पवे जेवि ॥ ३७४ ॥**
**तेवी कारणहेतुयोगे। जे बिसाट कर्म निगे।**
**ते शास्त्राविणें न लगे। कांसे जंव ॥ ३७५ ॥**
**कर्म होतचि असें तेव्हांहि। परि ते होणे नव्हे पाहि।**
**तो अन्यावो गा अन्याई। हेतु जाणावा ॥ ३७६ ॥**
**एवं पंचकारका कर्मा। पांचै हेतु हे समुहिमा।**
**आतां पाहे पां येथें आत्मा। सांपडला असे ॥ ३७७ ॥**

बावन्न वर्णा परौता–बावना वर्णा परता. कि बावन्नाहि उच्चारिता–का बावन्नाहिनुच्चारिता. जिऊ आथि–जीवु आथी. (३७३) उच्चार फळवाणि–उचारफळ वाणी. (३७४) अन्यावो–अन्यायो. अन्याई –अन्यायीं. जाणावा–होय. (३७६) कारका–कारणा. पांचै–पांचहि. (३७७)

स्वर व व्यंजनें मिळून बावन्न अक्षरें जीं त्या अक्षराच्याहि पलिकडे असणारा असा कोणताहि मंत्र नाहीं. म्हणून तीं बावन्न अक्षरें उच्चारित नाहीं असा एक तरी जीव आहे काय ? (३७३)

हे कोदंडपाणि ! हे धनुर्धरा अर्जुना ! अशी मंत्राची कडसणी म्हणजे विचार जोंपर्यंत जाणला होत नाहीं तोंपर्यंत नुसत्या वर्णोच्चाराला मंत्राचें फळ नाहीं. (३७४)

त्याप्रमाणें कारण आधार व हेतु म्हणजे उद्देशामुळेंच कीं जें कांहीं अनियमित म्हणजें बिसाट कर्म होतें निपजतें तें शास्त्राशिवायच मुळीं, कांहीं कासेस लागणारें होत नाहीं. कांहीं कां आधाराचें का आश्रयाचें होत नाहीं. (३७५)

तेव्हांहीपण कर्म हें होतच असतें पण तें होणें खरें असें नव्हें, कर्म होतच आहे पण तें कर्म कांहीं सांचेपणानें होत आहे असें नव्हें–असें नाहीं तेथें पापकर्म–पापकर्माला हेतु होय असें जाण. तेथें अन्यायच एक अयोग्य कृत्य असा अन्य ठायीं परठायीं न्याय विरुद्ध वर्तनाकरितांच–अन्याकरितांच उद्देशिला होतो. योजिला होतो. (३७६)

याप्रमाणें पांच कारणें असलेल्या कर्मासही पण पांच हेतु–उद्देश हे सुमहिमा ! पार्था जाण. आतां येथें आत्मा तोच मुळीं सांपडला कीं आहे–पंचकार असलेल्या कर्मास पांच हेतु आहेत. [पंचकार पंच उपचार गंध, फूल, धूप, दीप, नैवेद्य. पंच उष्मन् = देहस्थ पांच पाचक अग्नि. पंच कर्मा = वमन रेचक नस्य, निरूह (वाग्युद्ध, निर्णय) व अनुवासन–सुवासित करणें, उटि, पिचकारी–हे उपचार.] (३७७)

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥**

कर्तारन् = (कर्तृ) करणारा, ईश्वर, ब्रह्मदेव, (व्या.) कर्ता, वायु; : अकृतबुद्धित्वात् = योग्य रीतीनें न केलेलें, तयार न केलेलें अन्न इत्यादि. (कारण–बुद्धिजाणिवेनें. बुधित = जाणलेलें.) केवलं आत्मानम् = पूर्ण शुद्ध–मिश्र नव्हे तें–केवल, फक्त, आत्मा–आपलेपण, स्वत्व, दुर्मति = दुष्ट, कपटी.

**अन्वय :**— तत्र कर्तारम् एवं सति । यः केवलं आत्मानम् अकृत बुद्धित्वात् पश्यति । स दुर्मतिः । न पश्यति ॥ १६ ॥

**अर्थ :**— (१) अशी स्थिति असल्यानें तेथें शुद्ध आत्म्यास–, जो (बुद्धि ही योग्य रीतीची नच केलेली अशा त्या जाणिवेनें का कारणानें बुद्धिनें–) कर्ता म्हणतो तो दुष्ट बुद्धि पाहातच मुळीं नाहीं–(भेट घेत नाहीं–शोध घेत नाहीं) कीं, न पाहाता समजतांच मुळीं तसें मानतो, म्हणतो. (पश्यतोहरः = समक्ष चोरणारा तो. दिसणें दाखविणें का हजर करणें, सिद्ध करणें कां पुरावा देणें तें तो करीत नाहीं.)

(२) अशी स्थिति असतां जो केवळ आत्म्यासच कर्ता मानतो–म्हणजे आपणा स्वतःलाच कर्ता समजतो–त्या दुर्मतीला कांहींच समजत नाहीं कारण त्याची बुद्धि सुसंस्कृत नसते—.

**भानु न होनि रूपे जैसी । चक्षु रूपाते प्रकाशी ।**
**आत्मा न होनी कर्मे तैसी । प्रगटीतसे ॥ ३७८ ॥**
**पाहि प्रतिबिंब आरिसा । दोनी न होनि वीरेशा ।**
**दोहीतेही प्रकाशी जैसा । न्याहाळिता तो ॥ ३७९ ॥**

का अहोरात्रे हे सविता। न होनि करी पांडुसुता।
तैसा आत्मा कर्म कर्ता। न होनि दावि ॥ ३८० ॥
परी देहाभिमान भुली। जयाचि कुडी दोहोचि आंतली।
जे या आत्मविषी जाली। मध्य रात्री ॥३८१॥
जे येण (जेणे) चैतन्य ईश्वरा ब्रह्मा। देहेचि केले परमसीमा।
तया आत्मा कर्ता हे प्रेमा। अलोट उपजे ॥ ३८२ ॥
आत्माचि कर्ता। हा निश्चयो नाहि तत्त्वता।
देहोचि कर्म कर्ता। मानिती (मानिता) सांचे ॥ ३८३ ॥
जे आत्मा मी कर्मातितु। सर्व कर्मा साक्षिभुतु।
हे आपुली काही मातु। नाइकेचि काणि ॥ ३८४ ॥
म्हणोनि उपमा आत्मयाते। देहेचिवरी मविजे येथे।
चित्र काई रात्री दिवसाते। डुडुळ न करी ॥ ३८५ ॥
पै जेणे आकाशीचा कही। सांच सूर्य देखिला नाही।
तो थिल्लरीचे बिंब काइ। मानुन ल्हाये ॥ ३८६ ॥
थिल्लाराचेनि जालेपणे। सूर्यासी आणीक होणे।
तयाच्या नाशी नाशनें। कंपे कंपु ॥ ३८७ ॥
अगा निद्रिताचे बोनये। तंव स्वप्न सांचे हो लाहे।
दोरी नेणता सापे बिहे। विस्मो कवणु ॥ ३८८ ॥
जव कवळ आथीं डोळां। तंव चंद्रु देखावा पिवळां।
काई मृगी ही मृगजळा। भाळावे नाही ॥ ३८९ ॥
तैसी शास्त्रागुरूचेनि नांवे। तो वाराहि टेको नेदी जिवे।
केवळ मौढ्याचेनि जिवे। जियाला जो कां ॥ ३९० ॥

प्रगटीतसें–प्रगटीत असें गा. (३७८) पाहि–पै. दोनी–दोन्ही. (३७९) अहोरात्र. (३८०. देहाभिमान–देहाइमान. कुडी–बुद्धि. देहोचि–देहीच. जे या–तया. विषी-विषयीं (३८१) येण–जेणे) चैतन्य–चैतन्या. देहेचि. प्रेमा–प्रभा. (३८२) कर्ता–कर्मकर्ता. हा–हाही. मानिती–मानितो. साचे–साच (३८३) कर्मातितु–कर्मातीतु. सर्वकर्मा–सर्वकर्म. अपुली कांहीं–आपुली कही. नाइकेचि काणि–नायकेचि कानी. (३८४) देहेचि वरि–देहचि वरी. चित्र–विचित्र. (३८५) अकाशीचा–आकाशीचा. साच सूर्य–सत्य सूर्य. मानु–मानू ल्हाये–लाहे. (३८६) आणीक–आणी. तयाच्या–त्याच्या. नाशने–नाशणें. (३८७) अगानिद्रिताचे बोनये–आणि निद्रिस्ता चेवो न ये. सांचे–सांच. दोरी=रज्जु. सापे–सापा. (३८८) अथी–आथी. देखावा–देखावा की काइ–काय. (३८९) तैसी–तैसा. तो–जो. जिवे–शिवे. ज्याला–जियाला. शास्त्र=पंधरावा अध्याय। श्रीकृष्णांनीं सर्व शास्त्र सिद्धांत उगाणिला. गुरु=(उदार ज्ञान) तेराव्या अध्यायीं बोलिले.

[ज्ञान उपाय :—

त्या मज पुरुषोत्तमा। ज्ञाने भेटे जो सुवर्मा।
तो सर्वज्ञु तोचि सीमा। भक्तीचीही ॥ ४८ ॥
ऐसे हे त्रैलोक्य-नायके। बोलिले अध्यायान्त श्लोके।
तेथ ज्ञानचि बहुतेके। वानिले तोषे ॥ ४९ ॥

भरूनि प्रपंचाचा घोटु । कीजे देखतयाची देखतया द्रष्टु ।
आनंद साम्राज्यी पाटु । बांधिजे जीवा ॥ ५० ॥
येवढेया लाटेपणाचा उपावो । आनु नाहीचि म्हणे देवो ।
हा सम्यक ज्ञानाचा रावो । उपाया माजी ॥ ५१ ॥] (३९०)

**याप्रमाणे पांच कारण कर्मास पांच हेतु आतां येथें पहा आत्मा सांपडला असें—ओव्या ३७८–४०२**

सूर्य उदित झालेला नाहीं–दिवस नाहीं. सूर्य वर आलेला नाहीं, तरी स्वरूप हें असतेंच दर्शन विषय हा असतोच–तेथें डोळाच मुळीं हा त्या रूपास प्रकाशित करतो. तसें आत्मा सर्वसाक्षी आहेच आहे पण तो असा जरी पाहिलेला नाहीं तरी कर्में तीं तो प्रगटित–उघडपणें, स्पष्टपणें उघड जाहीरपणें करीत असतोच. (३७८)

असें पाहा कीं प्रतिबिंब व आरसा हीं कांहीं नच होतां हे वीरेशा! पार्था! दोन्हीसही प्रतिबिंबास व आरशासहीपण त्या आरशांत पाहाणारा तो त्यानें न्याहाळणें केलें तर दिसणें होतें. पाहाणें होतें–आरसाच एक पाहाणें केलें तर तेथें आरसाही दिसतो व प्रतिबिंबही दिसतें. (३७९)

अहोरात्र हें काय सूर्यानें केलें असें म्हणावें तर तसें तें सूर्यानें नच करिताही अहोरात्र होतातच ना? तसा आत्मा कर्म करणारा नच होऊनही कर्म करणारा आहे असें भासवितो, दाखवितो, दाखिवतो (३८०)

पण देहाभिमान देह अहंतेस भुलल्यानें ज्याची बुद्धि जागृती व स्वप्न अथवा स्थूल व सूक्ष्म शरीरामधीलच तेवढी झाली आहे अशी ती, ती ह्या आत्म्याबद्दल पूर्ण अशी देहात्म म्हणजे अज्ञानाची (मध्यरात्रीची) होय–असते. (३८१)

जीव ईश्वर व ब्रह्म हे सर्व देहालाच समजतो. अहो ह्या जीवचैतन्यावरचमुळीं हे देहच परमसीमेचे असें ईश्वरच एक का ब्रह्मदेवच एक असें केलेले. त्यांच्या सीमेचे त्यांना तर आत्माचमुळीं कर्ता आहे असें म्हणण्यांत तर खूबच रंग येऊन असतो. आत्मा कर्ता म्हणण्याचा (अलोट अतिशय) बिनचूक असा प्रेमा–प्रमा विचार त्याच्याठायीं असतो. (३८२)

पण आत्माच एक कर्ता होय असा निश्चय त्याचेठायीं तत्त्वदृष्ट्या नसल्यानें देहच मी कर्म करणारा खरा असें ते मानतात. (३८३)

मी आत्मा कर्मापासून अलिप्त असा सर्व कर्मांना साक्षिभूत असा तो तर आपली अशी ही कांहीं गोष्टचमुळीं आपल्या कानांनीं ऐकत नाहीं. (३८४)

म्हणून सीमा ह्या आत्म्याची ती तर देहापर्यंतच मुळीं पोहोचणारी होय, आत्मा देहाएवढाच असतो. अहो येथें डुडुळ म्हणजे पिंगळा जो तोच मुळीं कीं दिवस की रात्र, असे करतो. हे विचित्र नव्हें काय? दिवसासच मुळीं रात्र होय असें का रात्रच एक असें डुडुळ करतें नां? (३८५)

पण ज्यानें तो आकाशींचा खरा सूर्य कांहीं पाहिलेला नाहीं तो काय त्या एका डबक्यामधीलचे जें सूर्याचें प्रतिबिंब तेंच मुळीं सूर्य होय असें मानील–मानणार नाहीं काय? (३८६)

डबक्यामध्यें सूर्याच्या प्रतिबिंबामुळें तर सूर्यासच मुळीं आणीक एका अधिक अशा सूर्याचें होणें झालें. व त्याच्या नाशानेंही–नच दिसण्यानें–नाहीसें होणें कां कंपानें कंपित होणें होतें नां! (३८७)

अहो जो झोपीं गेलेला आहे त्यास पडणारें स्वप्न तें तर सर्वथैव खरेंच असें होऊन असतें. जोपर्यंत तो जागेस येईना–जागा होईना–जागृतीस येईना. अहो दोरीच एक ती नच जाणून भ्रमानें सांपच म्हणू

करीत आहे असा हा विस्मय तो कसला का केवढा तरी! (३८८)

जोपर्यंत काविळ आहे तोपर्यंत डोळे काविळीचे पिवळे असे आहेत तोपर्यंत चंद्र तर केव्हांहि पिवळाच दिसणार नां! अहो मृगी–हरणी जी तिनेंहीपण मृगजळास भाळणें–भुलावें (भाळावें) होतेंच नां! तें जल मृगाचें असें तरीपण मृगी ही तेथें भाळली होतेच ना! (३८९)

तशी ती भाळलेली बुद्धि तर शास्त्राच्या नांवानें–शास्त्राचे वारें लागू देत नाहीं–अंगास लागूं देत नाहीं त्याचप्रमाणें (देव द्विज) गुरुच्या नांवानेंहीपण ते देवाचे वारे अंगास लागूं देत नाहीं–अंगास टेकू देत नाहीं (तेथें दुगुण्याच झाडणें होते जसें कां) अहो केवळ एक मूढपणाच असें हें जीवित्व जो जियाला का जन्मला आहे जसा का त्या शास्त्रांना कोणी गुरु असेल नसेल असा तो विचारच मुळीं त्या शास्त्रांना तो शिवूंच मुळीं देत नाही असा मूढच एक मौढ्यच जिवंत एक असा जो जन्मलेला जियालेला मौढ्यच जीवित्व घेऊन जन्मलेले आहे. (३९०)

तेणे देहात्म दृष्टीमुळे। आत्मया घापे देहाचे जाळे।
जैसा आभाळाचा वेगु कोल्हे। चंद्री मानी ॥ ३९१ ॥
मग तया मानणयासाठीं। देहे बंदीशाळे कीरीटी।
कर्माच्या वज्रगांठि। कळासे तो ॥ ३९२ ॥
पाहे पां बंधन भावना दृढा। नळिये करी तो बापुडा।
काइ मोकळाहि चवडा। न टके पुंसा ॥ ३९३ ॥
म्हणऊनि निर्मळे आत्मरूपी। जो प्रकृतीचे केले आरोपी।
तो कल्प कोटीच्या मापी। मवीचि कर्मे ॥ ३९४ ॥
आतां कर्मामाजि असें। परि तयाते कर्म न स्पर्शे।
वडवानळाते जैसे। समुद्रोदक ॥ ३९५ ॥
तैसेनि वेगळेपणे। जयाचे कर्मी असणें।
तो किर जाणावया कोणे। तरी सांगो ॥ ३९६ ॥
जे मुक्ताते निर्धारिला। लाभे आपली मुक्तता।
जैसे दीपे दिसे पाहाता। आपुली वस्तु ॥ ३९७ ॥
नाना अरिसा जंव उटिजे। तंव आपणया आपण भेटिजे।
का पाणी पावता पाणी होइजे। लवणे जेवि ॥ ३९८ ॥
हे असो परतौनि माघौते। प्रतिबिंब पाहे बिंबाते।
तंव पाहाणे जाउनि आइते। बिंबची होय ॥ ३९९ ॥
तैसे हरपले आपणपे पावावे। ते संताते पाहाता गिंवसावे।
म्हणोनि वाणावे ऐकावे। तेचि सदा ॥ ४०० ॥
परि कर्मी असोनि कर्मे। जो नाचरे समे विषमे।
चर्मचक्षुचेनि चामे। दिठी जैसी ॥ ४०१ ॥
तैसा सोडवला जो आहे। तयातें रूप आतां पाहे।
उपपत्तीचेनि बाहे। उभवोनि सांगो ॥ ४०२ ॥
तरि अविद्येचिया निद्रा। विश्वस्वप्नाचा धांदा।
भोगित होता प्रबुद्धा। अनादि जो ॥ ४०३ ॥

**तो महावाक्याचेनि नांवे । गुरुकृपेचेनि थांवे ।**
**माथा हातु ठेवणे नव्हे । थापटिला जैसा ॥ ४०४ ॥**
**तैसी विश्वस्वप्नेसि माया । ते निज सांडोनि धनंजया ।**
**साहसा चेईला अद्वया— । नंदपणे जो ॥ ४०५ ॥**
**तेव्हां मृगजळाचे पुर । दिसती येक निरंतर ।**
**ते हारपती का चंद्रकर । फांकता जैसे ॥ ४०६ ॥**
**का बालकत्व निघोनि जाय । तै बागुला नाही त्राय ।**
**पै जळालिया इंधन (न होय) नव्हें । इंधन जेवि ॥ ४०७ ॥**

देहात्मदृष्टि=देहच आत्मा असें पाहाण्याचें ते त्यामुळें. घापे=घातले. आभाळाचा-अभ्राचा. (३९१) देहे-देह. वज्रगांठी=बळकट गांठीने. (३९२) बंधन-बद्ध. दृढा=घट्ट बांधितो. नळियेकरि-नळियेवरी. काइ मोकळाहि-काय मोकळे पायाचाहि=पायाचे पंजे मोकळे असूनहि तो राघु-पुसां उभा राहात नाही अडकून पडत नाहीं काय? टके-टकेचि. (३९३) कोटिच्या-कोडीच्या. म्हणउनि-म्हणोनि. (३९४) आसणे-असणे. जाणावा-ओळखावा. कोणे-कवणे. तऱ्ही-तरी. (३९६) जे-जो. निर्धारिता =निश्चय करिता, विचार करीता. (३९७) ना ना आरिसा-नातरी दर्पणु. उटिजे=आरसा स्वच्छ करावा. अपणया अपण-आपणपया आपण. पाणी-तोय. (३९८) माघौते-मागुते. अइते-आयिते. (३९९) हरपलें अपणपे पावावें-हारपलें आपणपे (स्वस्वरूप) पावे. पाहे-पाहाता. गिंवसावे=सांपडावें. वाणावे-वानावे. (४००) नावरे-नागवे. समे विषमे भावात-सम विषमें=बरें वाईटपणांत सांपडत नाहीं. दिठी-दृष्टी. चामे=कातड्यानें [चामे (चर्मन्=त्वचा, कातडे, ढाल, स्पर्शेंद्रिय. चर्मज=केंस रक्त. चर्मपुट= बुधला, कातड्याचा, चामड्याचा कृत्रिम हत्ती. चर्मवसनः=शंकर.)] (४०१) तया-तयाचे. उपपत्ति-चेनि-उपपत्तीची (उपपती=जार.) साधन, कारण, यदृच्छा, प्रमाण, युक्तिवाद, सिद्ध करणें, सिद्धांत, संबंध, शेवट, उत्पत्ति, घडणे, मिळणें सिद्धीस नेणें. उभवोनि-उभवुनि. (४०२) निदा-निद्रेत. धांदा= व्यापार, कर्म. प्रबुद्धा=विकसित, जागृत, प्रौढ, हुशार, विद्वान. अनादि=आरंभ उपपत्ति रहित ईश्वर. (४०३) महावाक्य=चार वेदांची चार महावाक्यें (१) अहं ब्रह्मास्मि. (२) प्रज्ञानं ब्रह्म (३) तत्वमसि (४) अयंमात्मा. थांवे=बळानें. थापटिला=डोक्यावर हात ठेवून थापटून जागा केला. (४०४) निज सांडोनि-निद सांडुनि. अद्वयानंदच एक जागा झाला केला. (४०५) दिसती-दिसते. (४०६) बालकत्व-बाळत्व. त्राय=सत्ता, अस्तित्व. नव्हे-न होय. इंधन-रंधन=स्वयंपाक रांधणे, शिजविणे. (रंधन्= नाशक, विध्वंसक, नाश पीडा.) (४०७)

त्यानें "**देहच आत्मा या दृष्टीमुळें**" आत्म्यासच देहाचें जाळे घातले असें कां कोल्हे आभाळाचा का अभ्राचा वेगच मुळीं चंद्रीच, चंद्राचा तो आहे असें मानतो. (३९१)

*मग त्या मानण्यासाठींच-देहच आत्मा मानल्यामुळें*-मानणें तेच मुळीं खरें करण्यासाठीं देहरूप बंदिशाळेमध्यें हे कीरीटी अर्जुना! कर्माच्या बळकट गांठीनें तो तेथें खुंटविला बांधून टाकला जसा कां खुंटीच जशी मारून, त्याचे ते देह हाच आत्मा असें मानणें तेच बळकट केलें (कळासिला) कर्मच एक सर्व अशा सीमेचें ते झालें. (३९२)

अहो असें पाहा कीं, दृढ अशा बद्धतेच्या भावनाच कीं मुळी तो बापुडा पुंसा नळीवर करीत राहिला *काय त्याचें पाय मोकळें ते त्यास कांहीं समजत नव्हते-त्या पोपटाचे पाय मोकळें असूनही तो पोपट (पुंसा)* उभा राहात नाहीं. त्या बद्ध भावनेत अडकून पडत नाहीं काय? तेथें त्याच्या बद्ध भावनांनी ठकविला जात नाहीं काय? (तो विचारावर उभाच मुळीं होत नाहीं.) (३९३)

असें आहे म्हणून निर्मळ अशा आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जो ह्या प्रकृतीचें सविकारत्व आरोपतो तो तर कोटिच्या कोटि कल्प जरी गेले तरी (मापतो) तरी पण कर्मच मवीत मोजीत कल्पाच्या मापाचे करीत राहातो. (३९४)

आतां तो कर्मामध्यें आहेच आहे पण त्यास कांहीं ते कर्म स्पर्शही मुळींच करीत नाहीं. जसें समुद्राचें उदक ते काय वडवानळ अग्नि त्यास केव्हांही स्पर्श करणारें नव्हेंच कीं. (३९५)

त्याप्रमाणें अगदीं वेगळेपणानेंच असणें, ह्या कर्माच्याठायीं–कर्मामध्यें असणें ते वेगळेपणानेंच कीं तो विकाराचा किंवा कसा जाणावा कां ओळखावा असें म्हणा का म्हणाल तर तेहीं सांगण्याचें करतो. (३९६)

अहो, मुक्त म्हणजे मोक्ष मिळालेला आनंदित उघडलेलें का उमललेलें (वस्त्रविशेष) तेथें मुक्तीबद्दलचा निश्चय का विचार केला असतां का निश्चयानेंच तेंच होणे केले असतां आपलीच मुक्तता, का मोक्षाच्या लाभाची ती स्थिती ही आपणांस लाभणार हे केव्हांहीं ज्याप्रमाणें (हातांतील) दिव्यानें पाहिलें असतां–मूळ गुण सत्य पदार्थ–आपली वस्तू आपणांस दिसणारी होते. (३९७)

अथवा आरसा जेव्हां का उटावा म्हणजे स्वच्छ करावा तेथें जसजसा आरसा निर्मळ स्वच्छ करणें होते. तसतसें–, आपण स्वतः आपल्या स्वतःस भेटणें होते. आपण स्वतःच ते वस्तु होऊन असणें होते. आरसा उटिजे तंवतंव स्वतःस भेटिजे पाहिजे, देखिजे, स्वतःच ते होऊनि असिजे असें होय जसें लवण हे पाण्यांत झळंबले ते पाणीच होऊन जाते. आंगचे पाणी द्रव पदार्थच तो सर्व तेज–दान हात दुकान होऊन जाते. (३९८)

हे असो पण परतून माघारी प्रतिबिंब पाहिले असतां आपण मूळचें तें बिंबच होऊन जाणें होते. तेथें तें प्रतिबिंबच मुळीं बिंबास पाहाते तेथें मग तें पाहाणें जाऊन आपणच तें बिंब होऊन असणें होतें–आइतेच ते बिंबच होणे होय. (३९९)

तसें करण्यानें हरपलेले, हरवलेलें तें स्व-स्वरूप (आपण) आपणांस पावते भेटते, प्रसन्न होते. असे तें संतांना भेटलें असतां गिंवसणें होतें, गिवसतें, सापडतें, ते संतांना भेटून गिंवसून घ्यावें कीं, असें आहे म्हणून तेंच एक सर्वथैव नेहमीच्या नेहमीच मुळीं सदा सर्वदा ऐकत असावें, वानीत असावे. तेंच सर्व काळ विनंतीचें करावें स्तुतीचे करावें वाखाणावें तसेंच ऐकत असावें कीं. (४००)

कर्म करीत असतां–कर्मामध्यें असतां–कामकाजामध्यें असतां–कर्माच्याठायीं प्रवृत्त असतां तें कर्म जें तें (कर्म) बरें का वाईट असें करून–सम का विषमतेचें करून आचरूं नये. कारण असें तें बरें वाईट मानण्यानें तर तें कर्मच मुळीं आडवले आवरिले, आवरून धरिले गेल्यानें व्यवस्थित सांपडण्याचें होत नाहीं. आंगाचें होत नाहीं. तें व्यर्थच आडविले हाते. असें ते बरें वाईट मानण्यानें होते. चर्मचक्षू म्हणजे स्थूल दृष्टीचें पाहाणें ते तेथें चाम म्हणजे स्पर्शेंद्रिय जे तेंचमुळीं ते दृष्टीचें पाहाणे बरें का वाईट करून आडवितें–आवरून घेते, दृष्टीसच आळा बसल्यानें तेथें पाहणें तेंचमुळीं सम का विषम बरें का वाईट असें तेथें स्पर्शेंद्रियचमुळीं सर्वच्या सर्व बरें का वाईट असे करून आहे त्यामुळें कर्म तेंच आडविले होते–तेथें कांहींच निष्पन्न होत नाहीं व व्यर्थच एक ते कर्म आचरणें होते : विषय हे उपमिले जेथें कातब्ययाचा कृत्रिम हत्तीच जसा का असे तें व्यर्थतेचें एक तें कर्म करणें होते. (४०१)

तसें बरें का वाईट असें कर्म आचरतांना मानण्याचें करूं नये तेथें मनच मुळीं वेगळें पडतें व विषयासच मिठी देणारें झाल्यानें व्यर्थ असें ते आचरणें कर्माचे होते, असें ते कर्मामध्यें–कामकाजामध्यें असणें तेथें वृत्ति ही पाण्याप्रमाणें आपलीच पातळी धुंडणारी अशी स्वच्छच जाण) तो त्या कर्मापासून सोडविला होतो व आतां त्यांस ते रूपचमुळीं पाहूं लागते (बाल्यच एक नटले, भूषित झाले, जसें कां रूपास आले) व ते

आतां उपपत्तीच्या हातानें म्हणजे युक्तीवादाच्या का यदृच्छेनें होणाऱ्या प्रमाणांच्या साधनाच्या का कारणाच्या हातानें सिद्धांतच एक सिद्ध केला जसा, असा तो हात उभा करून सांगण्याचें करतो, सांगण्याचे करूं या। (४०२)

## अहंकृत भाव नाहीं ज्याला, त्याला अहंममता उरत नाहीं.

अहो पंचक्लेशापैकीं जी अविद्या, अज्ञान, झोपेत राहून (विश्व जगत्‌रूपी स्वप्नच तो व्यवहारीत आहे वागवीत आहे.) आरंभ उत्पत्तिरहित जो अनादि ईश्वर तोच तर ह्या विश्वरूपी स्वप्नाचा व्यापार कर्मच तें जसें कां हे विश्व स्वप्नरूप ते तेथें स्वतःचमुळीं जागृत राहून विकासीत होऊन, प्रौढपणाचा असाच एक होऊन हुशार का विद्वान असा होऊन तें स्वप्नच कर्माचें केलें असें तो तें भोगीत, उपभोगीत, अनुभवित होता. (४०३)

### बंधमुक्ताचें लक्षण :—

असा तो जागृत ईश्वरच महावाक्याच्या नांवालौकिकावर–खालीं, (संभावन, वितर्क, निश्चय, स्मरण, क्रोध, इत्यादि अर्थी नामांनीं) नांवांनी व गुरूकृपेच्या बळावर–गुरूंनीं डोक्यावर हात ठेवून थापटून जागविला जसा असा तो अनादि ईश्वर. (४०४)

तेथें मायाच जशीं का ती विश्वस्वप्नासहित तीं त्यानें सांडिली, त्यागिली, झोपी जाणें ते त्यानें टाकलें नित्यतेची अशी मानलेली ती मायाचमुळीं त्यानें सांडिली, माया तीच मुळीं अज्ञान निद्रा–निद ती सांडिली व आतां सहसा एकदमच मुळीं तो एक अद्वय असा आनंदच मुळीं जागविला, जागला, चेईला कीं जसा, चेईला जागविला अद्वय जे ब्रह्म त्या ब्रह्मतेच्या साक्षात् आनंदच एक कीं असा तो तरूण कां नवविधींपैकीं जो नंद नांवाचा आनंद तेथेंच तो वृद्धि पावून आहे, आनंदाचा असा होऊन, तेथें आतां आनंदजनक असें ते विष्णूचे खड्गच तो होऊन आहे. (४०५)

तेव्हां मृगजळाचे पूर जे तेंच मुळीं पदार्थमात्र एकजात असें मुख्य असें (निरंतरच्या ब्रह्माचें जसें कां) दिसतात कां दिसत होते तेंच आतां चंद्रकांत फांवला प्रफुल्लित झाल्यानें विकसित झाल्यानें नाहीसें झाले हारपले व एक ब्रह्मच ते ब्रह्मसत्तेचे झाले. अस्तित्वच तेथें ब्रह्मतेचे होऊन आहे. (४०६)

अहो बालपण निघून गेल्यावर (बाल म्हणजे सोळा वर्षापर्यंतचा मुलगा केश, नवीन, मूर्ख.) का बालकत्व (मूलपण, अज्ञपण, आंगठी) संपले म्हणजे तेथें बागुलाची सत्ता कां बागुलाचें अस्तित्व हे केव्हांहि नाहींच–बागुलास महत्व ते मुळींच नाहीं. अहो इंधन म्हणजे देहबुद्धीचें होणें कां विषयच सर्वथा घेऊन असणें, तेथें देहबुद्धि नाहीशी झाल्यावर वैराग्य अग्निमध्यें ते देहबुद्धिचें इंधन का जळाऊ लांकडे का देहबुद्धीच एक सर्वथा असें केव्हांही नाहीं. (तेथें ते सर्पण समजून ते स्वयंपाकाच्या उपयोगी लावणे व्हावे असें नव्हे.) (४०७)

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १७ ॥**

अहंकृत भावः=मीपणाचा मनोविकार मीपणाची मनोवृत्ति अहंममतेची सर्वथैव म्हटली स्वार्थाची अशी. (अहंकृतिः=मीपणा, अविद्येचा प्रकार, अहंतत्त्व यापासून पंचमहाभूतें होतात अव्यक्त तत्त्वे.) बुद्धिः=जाणणे विचार समजूत प्रकृति मति विवेक न लिप्यते=व्यापिली होत नाही. हत्वा=[(वध, वह, हन त्यज, न्यस, हिंस) हन्=पराजय करणें, जेरीस आणणे, हाणुन पाडणें, मागे हटविणें, निवारणें] निवारिले तरी इमान् (इदम्=हे, ह्या) लोकान्=ह्या भुवनांना लोकांना–लोक तीन तीन आहेत (१) स्वर्ग (२) मृत्यू (३) पाताळ लोकत्रय, लोकत्रयी–[लोकः=भूवन, लोक, जन, चक्षुरींद्रिय, विषयभोग्यवस्तु,

सामान्यप्रचार (वैदिक नव्हे.) लोक अलोक=सप्तद्वीप पृथ्वीला प्राकारभूत पर्वत.] निबध्दयते=(बंध+नि =बांधवणे.) बांधवला होत नाहीं. बांधला जात नाहीं. (बंध-स्वार्थिसन्=वीट येत नाहीं, विटला होत नाहीं.)

**अन्वय :—** यस्य अहम् कृतः भावः न। यस्य बुद्धि लिप्यते न। स लोकान् इमाम् अपि हत्वा। स न हंति। स न निबध्दयते ॥ १७ ॥

**अर्थ :—** (१) ज्यांस मीपणाचा मनोविकार नाहीं, (ज्याची वृत्ति मनोविकाराच्या मीपणाची नाहीं, ज्याची बुद्धि प्रकृति मनोविकारानें लिंपली होत नाहीं, व्यापिली जात नाहीं, दूषित केली होत नाहीं, चेत घेत नाहीं) त्यानें ह्या लोकांना-(शब्दमात्रांना-भुवनांना. हत्वा अपि-निवारिले तरी, मागे हटविले तरी,) पराजित केले तरी तो कांहीं ते हटविणें (निवारणें, पराजित करणें, तें करतो असें नाहीं : त्याचा जो परिणाम विकाराचा होणारा तो शब्दच ते जसें, ते सत्तात्मकतेनें दूर केले (स्वर्ग, मृत्यू, पाताळ) त्यानें (तें नाहींसें केलें कां त्याचा स्वतःवर परिणाम होऊ दिला नाहीं,) मागें हटविणें केलें असें (नव्हे! असें नसतें-असें होत नाहीं) वर त्या निवारण्याच्या (का अपरिणामी करण्याच्या योगानें मागें हटविण्याच्या) कर्मानें, कृतीनें, तो बांधला होत नाहीं. (बांधवला जात नाहीं कां स्वार्थी सन् विटला होत नाहीं त्यानें हिंसा केली असें होत नाहीं. तिन्ही लोकी तो विटला का) त्यानें हिंसा केली असें मानणें होत नाहीं.

(२) अहंकारयुक्त नसते ज्याचे अंतःकरण, फलासक्तीने मलीन झालेली नसते ज्याची बुद्धि त्यानें ह्या लोकाना मारले नाशिले तरी तो मारणारा का नाश करणारा ठरत नाहीं व त्या मारण्याच्या नाश करण्याच्या कर्मानेही तो बद्ध होत नाही.

(होणें×नाहीं होणें, हन×हिंसा×त्याग (संन्यास=सर्वकर्मफलत्यागः)×लोक×एथ समर्थ एक आथी। जयापासूनि भूते होती। हे वायाचि काय बोलती। जगा माजी ॥ २/११/९६)

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते।
तस्मादेवं विदित्वैनम् नानुशोचितुमर्हसि ॥ २/२५/१४८-१५१

**पुरुषोत्तम—**

हा तर्काचिये दिठी। गोचर नव्हे कीरीटी। ध्यान याचिये भेटी। उत्कंठा वाहे ॥ १४८ ॥
हा सदा दुर्लभ मना। आप नव्हे साधना। निस्सीम हा अर्जुना। पुरुषोत्तम ॥१४९॥
हा गुणत्रयारहितु। अनादि अविकृतु। व्यक्तीस अतीतु। सर्वरूपु ॥१५०॥
अर्जुना ऐसा हा जाणावा। सकळात्मक देखावा। मग सहजे शोक आघवा। हरेल तुझा ॥१५१॥

**लोक**—आ-लोक ह्या शब्दाचे उपकार अत्यंत आहेत कारण तो आरसाच एक होऊन असतो. पण तो कसा वागवावा हे तेव्हां समजलें पाहिजेच म्हणून आरसा कसा वागवावा हें समजतें त्यास उपदेशाचे असे सर्व ज्ञान झालें असे होय.

**हन्**—*सिंह-सिम् घ्नन्ति असौ सिंहः*
**न हिंस्यात् सर्व भूतानि।** (श्रुति)
सर्व भूतात्म भूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ (५:/७:)
न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्। (१३/२८:)

प्रकृतीनें हारी दिलेली भूतें ही प्रकृति परतंत्र अशीच होत म्हणून देहधारी जो त्याचा देहाभिमान हाही पण प्रकृति परतंत्र असाच पण ज्याचा अहंकृति भाव नाहींसा झाला म्हणजे ज्याचे अंतःकरण अहंकार

युक्त नसतें–त्यानें भूते जिंकली, त्याचे प्रकृति परतंत्रपण परिणामात्मक होऊ दिले नाहीं त्यानें (**वासना या स्वनाशेन हर्षदा**) त्या मधील परतंत्रपण प्रकृतीचे ते काढून टाकून ती आत्मवश केली तेथे प्रकृतीचे ते भूतादीम् नाहींसे केलें व आत्मा जिंकला. **हन्**=परतंत्रपण काढून टाकून आत्मवश करणे जिंकणें, नाश करणें जशा वासना ह्या स्वतःचा नाश करून घेऊन हर्ष देणाऱ्या होतात.

**ना ना चेवो आलियापाठि । ते स्वप्न न दिसे दिठि ।**
**तैसे अहंममता किरीटी । नुरेचि तया ॥ ४०८ ॥**
**मग सूर्यो अंधारालागी । रिघो का भलते सुरंगी ।**
**परि तो तयाचा भागी । नाहीची जैसा ॥ ४०९ ॥**
**तैसा आत्मत्वे वेठला होये । तो जया दृश्याते पाहे ।**
**ते दृश्य दृष्टपणेसी होत जाये । तयाचेचि रूप ॥ ४१० ॥**
**जैसा वन्हि जया लागे । ते वन्हीच जालया आंगे ।**
**दाह्य दाहक विभागे । सांडिजेते ॥ ४११ ॥**
**तैसा कर्मकारा दुजया । तो करीतेपणाचा आत्मया ।**
**अवलाहे ते गेलया । कांहीं बाही उरे ॥ ४१२ ॥**
**तये आत्मस्थितिचा जो रावो । तो मग देही ये जाणवेल ठावो ।**
**काइ प्रळयांबुचा उना हो । ओघ मानि ॥ ४१३ ॥**
**तैसी ते पूर्ण अहंता । का देहपणे पांडुसुता ।**
**आवरे काई सविता । बिंबे धरिला ॥ ४१४ ॥**
**पैं मंथुनि लोणी घेपे । ते मागुते ताकी घापे ।**
**तरी ते अलिप्तपणें सिंपे । तेणेचि काई ॥ ४१५ ॥**
**नाना काष्टौनी विरेशा । वेगळाविलिया हुताशा ।**
**राहे काष्टाचिया मांदुसा । कोंडलेपणे ॥ ४१६ ॥**
**का रात्रिचया पोटा आंतु । निघाला जो हा भास्वतु ।**
**तो रात्री ऐसी मातु । आइके काई ॥ ४१७ ॥**
**तैसे वेद्यवेदकपणेसी । पडिले का जयाच्या प्रासी ।**
**तया देहा मी ऐसी । अहंता कैची ॥ ४१८ ॥**
**आणि आकाशे जेथ येथौनि । जावे तेथ असें भरौनि ।**
**म्हणौनि ठेले कोंदोनि । आपेआप ॥ ४१९ ॥**
**तैसे जे तेणे करावे । ते तोचि आहे स्वभावे ।**
**मा कोणे कर्मी वेठावे । कर्तेपणें ॥ ४२० ॥**
**नुरेचि गगनाविण ठावो । नव्हेचि समुद्री प्रवाहो ।**
**नुठी ध्रुवा जावो । तैसे जाले ॥ ४२१ ॥**
**ऐसेनि अहंकृतिभावो । जयाच्या बोधी जाला वावो ।**
**तरी देहा जंव निर्वाहो । तवं आथी कर्मे ॥ ४२२ ॥**
**अगा वारा जरी वाजोनी सरे । तरी डोलु रूखी उरे ।**
**का सेंव दृती राहे । कापुरे वेंचलेनि ॥ ४२३ ॥**
**सरलया गीताचा समारंभु । न वचे राहवलेपणाचा क्षोभु ।**
**भुई लोळोनि गेले अंबु । वोल थोर ॥ ४२४ ॥**

**अगा मावळलेही अर्के । संध्येचिये भूमिके ।**
**ज्योतिदीप्ती कवतिके दिसे जैसी ॥ ४२५ ॥**

ना ना–नाना=अथवा पाटि–पाठी. ते–तै. तैसे–तैसी. किरीटी–किरटी (४०८) सूर्यो–सूर्य (ज्ञान–सूर्य) अंधारालागी=अंधार पहावा म्हणून, अंधार शोधण्याकरितां. सुरंगी=भुयारामध्यें (सुरंगा–सुरुगा=सुरूंग भोंक भुयार) सुर=देव, विद्वान्. अंग=(१) संबोधनार्थी ठीक (कबुली) खरोखर (२) अर्थ, पुरवणी दुय्यम भोग, दुय्यम साधन अवयव. भागि=[भाग=वांटणी, वाटा, दैवभाग, चौथा हिस्सा, अंश, तुकडा, स्थल, जागा, पुण्य (अकरा संख्या)] अज्ञान अंधकार, दैवभागामध्यें आंधाराच्या वांटणीत, दैवाची का कर्माची वांटणी अर्थ पुरविण्याचा का वाटा घेण्यात. (४०९) आत्मत्वे–आत्मपणानें, वेठला (वेष्टिला) गुंडाळलेला [वेष्ट, वेष्टणें, पागोटे, चीक, डिंक. वेष्टक=पगडी, विशेष धूप, कोंडाळ, वई इत्यादि.] जया–जया–जया–जया तया. दृश्य=(१) दिसणारे, (२) सुंदर, (दृशि=डोळा, दर्शन, शास्त्र) दृष्टेपणेसि=(द्रष्टव्य=सुंदर, देखणा) पाहाणारासहित (साक्षीपण) न्यायाधिश (अध्यक्षपण) (४१०) दाह्य दाहक विभागो=दाह्य म्हणजे काष्ट व दाहक म्हणजे अग्नि हा भेद नाहींसा होतो. (४११) कर्म=कृत्य, काम, मेहनत, पूर्णकर्म, कर्म, कामगार. आकारः=चेहरा, आकृति, स्वरूप, चेहऱ्यावरील विकार, मुद्रा, सौंदर्य, अभिप्राय, प्रकार, सूचना, [आकार (सां.) ऐक्यज्ञान.] दुजया=दुसरेपणानेंच ती चेहरेपट्टी स्वरूप. करीतेपणाचा=[कर्तु=करणारा ईश्वर, ब्रह्मदेव (व्या.) कर्ता, वायू] अवलाहे ते गेलया, –आलु आला तो गेलिया. (अवलाहे–अव=क्वचित्. लाहा=मोठा. लाहाणे=प्राप्त होणे. लाहते=संबंध. लाहाते=चिरकालचा लाभ. (४१२) आत्मस्थिति–ब्रह्मस्थिति (आत्मस्थ=स्वाधीन.) ये–इये. ठावो=सीमा. काइ प्रळयांबूचा उनाहो–काय प्रळयांबूचा उन्नावी. वोघ मानि–वोघु मानी=प्रळय काळच्या वाढत्या जळाला कांहीं का ते नदीनाल्याचे असणें तें कसचें न् काय! तेथें नदीनाल्याचें कांहिं आहे? (उन्नाहः (स्तन)=(१) वृद्धि, (२) उच्छंखळपणा, (३) बांधणें, (४) पुढें येणें, (५) कांजी) (४१३) पूर्ण अहंता=मी ब्रह्म हा अहंकार. देहपणे आवरे=काय देहाला–(देहपणाला) आंत घेईल का देहपणाला, (देहाला) बाहेर ठेवील का देहपणाने आवरिली होईल काय सूर्य हा बिंबानें धरिला होतो. (धारण करणें, आवरणे, ताब्यांत ठेवणें, बाळगणें, जगणें, असणें, राहाणे) (४१४) मथ (मथे) घुसळणें, ढवळणें, घेपे=घेतले. घापे=घातले. सिंपे=स्पर्शते, मिसळते. लिप्तपणें=वितळलेपणें, कां अपवित्र-पणास स्पर्शतें काय? मिसळतें काय? अपवित्रपणानें माखलें जातें काय—अपवित्रपणाचा त्यास लेप दिला होतो काय? (लिप=माखणें, लेप देणें, व्यापणें, दूषित करणें,) तेणेचि–तेणेसी. (४१५) काष्टौनि=अग्नि लाकडापासून वेगळा केला, वेगळा काढला असतां. वेगळाविलया–वेगळाविलिया. वीरेश–वीरश्रेष्ठ. हुताशः, हुताशनः हुतवाह=अग्नि, मांदुस=पेटी. [मंदुरा=(१) गादी, (२) चटई, (३) हातरी (४) तबेला घोड्याची जागा. दुस=(दुः) दुःसाध्य, कठिण इत्यादि.] (४१६) रात्रीचया–रात्रीच्या–रात्रिचिया. पोटाअतु–उदाराआंतु. आइके काइ–ऐके कायी. (४१७) वेद्य जाणण्यास योग्य वस्तु, ज्ञेय. वेदक==जाणणारा जो त्यास गट पडिले का जयाच्या प्राप्ती=ज्यानें गिळून टाकिलें. (४१८) जावे–जाईजे. कोंदोनी=व्यापकपणें भरून राहिले (४१९) वेठावे–वेष्टावें=शिवलें जावें का विणलें जावें तें. (वे=विणणें सिवणे+परि=गुंडाळणें. +प्र=जडवणें, बांधणें. कर्तेपणें–कर्तृ=कर्ता=करणारा ईश्वर, ब्रह्मदेव वायु. (४२०) तुटी (तुटीचि) ध्रुवा जावो=ध्रुवमंडळाशी (१) ध्रुव उत्तर दक्षिण (२) अष्टवसुपैकीं. दुसरा. (३) स्वर्ग (४) आकाश (५) सद्गुणी स्त्री, (६) ब्रह्मा, विष्णू, महेश (७) वड, (८) ध्रुवतारा, (९) निश्चळ अविनाशी, शाश्वत, स्थिर. प्रवाहः=व्यवहार, तळे, उत्तम घोडा, अखंडपणा, वाहाणे, प्रवृत्ति, जल इत्यादीचा ओघ. ठावो=(आचार, मर्यादा) पराकाष्ठा, हद्द, मर्यादा, किनारा (वृषण, शेत,) जाले–

जाहले (४२१) अहंकृति-भावः=मीपणाचा मनोविकार. बोधी=[बोधि=पूर्ण ज्ञान, पिंपळ] ज्ञान, जाणीव, विचार, बुद्धि, जागृति, उमलणें, उपदेश, जागे करणें, नांव (नामीच) नामामध्यें, नामाच्या ठायीं. निर्वाहः (निर्वहणं)=कार्यसिद्धि, समाप्ति, तडीला नेणे, उपसंहार, पुरवठा, चरितार्थ (४२२) सरे-वोसरे= बंद होतो. तऱ्ही-तरी. डोलु-तो डोलु रूषी-रुखी=वृक्षी. [रूष=दुःख देणे, दुखविणे, रागे भरणें. रू=शब्द करणें. रूक=दाता, उदार, रूच (चा) प्रकाश, तेज, सौंदर्य रंग, कांति, इच्छा बीज, पोपटाचे-मैनेचे गाणें. का सेंदेद्रुतिराहे कापुरेवेंचिलेनि (वेंचलेनिही) कापुर संपला तरीपण ज्या करंड्यात (सेंद) तो ठेविला होता त्यांत तर (द्रुति) सुगंध राहातोच, असतोच. (द्रुति=द्रवणें. दृति=चर्म, पिचकारी, बुधाला, पखाल) (४२३) सरलया-का सरलेया. राहवलेपणाचा-राहिलेपणाचा-वाहवलेपणाचा (क्षोभु)= तन्मयपणाचा आनंद, क्षोभ, मनाची खळबळ. भुई-भूमि. गेले-गेलिया. (४२४) संध्येचिये-संध्याचिये भूमिके=संध्याकाळी, संध्या, शोभा, रचना, भूषण. संधि=मधले अंतर, विश्रांति-तेज सौंदर्य, (दीप्ती) संधिवेला=रात्र व दिवस या दोहोमधला काळ. ज्योति दीप्ती=संधिप्रकाश. कवतिके=कौतुके. (४२५)

**आरंभी आत्म्याहून निराळे दिसणारे-कर्मामुळें आत्म्यावर आलेला कर्तेपणाचा आळ किंवा आरोप गेल्यावर शब्दांनीं न सांगता येण्यासारखें जें कांहीं उरतें तीच आत्मस्थिति होय. ह्या स्थितीला आत्मराज तो मी देह आहे असें कधीं तरी मानील काय? ताक घुसळून काढलेलें लोणी पुन्हा ताकांत मिळू येईल काय? तसें कर्म त्याच्या स्वरूपाहून वेगळें उरतच नाहीं त्यानें कोणत्या कर्माचा कर्तेपणा आपलेकडे घ्यावयाचा तो? येथें उपमा कोटि त्या आकाश, समुद्र, कुंभाराचे चाक अशा होत.**

अथवा निद्रेतून जागे झाल्यावर स्वप्न पडणारे तें दृष्टिस दिसतच मुळीं नाहीं, जसें, त्याप्रमाणें अहंममता, अहम् पातक-देहासक्ति स्वार्थदृष्टि पृथकत्व-स्पर्धा-बढाई-गर्व, अज्ञान मीपणा, स्वतःस श्रेष्ठ मानणें हे अर्जुना त्याचे ठायी दिसत नाहीं. उरत नाहीं. असत नाहीं. [मम-अस्मद्-ममकारः= =आपलेपणा, स्वार्थ, ममता, ममत्व=आदर, गर्व, अहंकार, पृथकत्व स्वार्थ दृष्टि ममत्व तालः=इंद्रियांचा विषय (उंट, खेचर). (४०८)

अहो, सूर्य हा अंधःकाराकरितां भलत्याहि छिद्रामध्यें शिरला तरीपण तो कांहीं तेथीलच्या छिद्र अंधकाराचा वाटेकरी हिस्सेदार होत नाहीं. ज्ञानसूर्य का विद्वान अहो अज्ञान तें पाहावें म्हणून भलत्याहि जरी विद्वत्तेच्या अवयवामध्यें रिघाला चर्चा करीत राहिला तरी तो तेथीलच्या अज्ञानाचा-कर्माचा वांटेकरी होत नाहीं. (४०९)

तसा आत्मत्वेंकरून आपलेपणे करून आत्मस्वरूपानेंच जो गुंडाळलेला आहे वेष्टिलेला आहे तो जें कांहीं देखणें देखतो, पाहाणें पाहातो, दिसणारें पाहातो, तो जो आपल्या डोळसपणानें सर्व सुंदरतेचा भाव घेऊन आहे तो ज्या सौंदर्यास पाहातो, तें पाहिलें जाणारें दृश्य दिसणारें सौंदर्यच सुरेख सुंदर देखणें असें पाहात आहे असें होत जात आहे जें तें तर मुळींच त्याचेच बुद्धि-दृष्टीचे सडोळस असे सुंदर रूप होय. (४१०)

अहो, अग्निमध्यें जें पडतें-तें तर स्वतःच मुळीं, आपल्या त्याच्या अंगचाच तो वन्हि असें होतें तेथें तें एक निराळें व वन्हि निराळा असें राहात नाहीं तेंच मुळीं तो वन्ही होतो. मग काष्ठ व अग्नि हा भेद नाहिंसा होतो-स्वार्थबुद्धि, देहबुद्धि, योगवन्हि, देहच ब्रह्मरूप झाल्यानें (काष्टाकडे दाह्य विभाग आला व वन्हिकडे तो दाहक विभाग आला असें राहात नाहीं. दाहक म्हणजे (१) अग्नि, (२) जाळणारा. दाह्य=जळलें जाणें, लाही होणें, आगी होणें, लाल होणें. विभाग=अंश, वांटणी, वाटा.) अहो, जें लांकुड अग्नि झालें

त्याच्या वांट्याला तें जळलें जाणें येत नाहीं. कारण तें तर आतां वन्हीच झालें–त्यामुळें अग्निच्याठायीं जो दाहक असा अग्निचा भाग जाळण्याचें करणारा तोही आतां त्या सत्तेच्या अशा अग्निरूप झालेल्या लाकडावर मुळींच परिणाम करीत नाहीं म्हणून. येथें आतां तें सत्‌चे रूप तेंचमुळीं सत् ब्रह्म सत्तात्मक तें दोहींनाही-पण अग्निसारखेंच लेखण्याचें करितें व आतां तो दाह्यदाहक भावच मुळीं विभागाचा असा उरला नाहीं तेथें अग्नि व अग्नि होणें हें वाट्याचें असें होणें उरलेंच नाहीं. **सत् वस्तु विचारानें निर्मळ ज्ञान होते.** जी ब्रह्म **सत्वस्तु शक्ति** ती आतां दोहोठायीं शांत ब्रह्म तेंच झाल्यानें दोहोच्याठायीं एकच अशीं ती जरी जाणण्यास योग्य तरीपण तीं सहज साध्य नसल्यानें फक्त **कार्यावरूनच अजमाविली जाते.** असें तें आतां एकाच अग्निसारख्या अग्नीचे पण तेथें तें सत्‌ब्रह्म तेंच सत्तात्मक तें कर्मेंकरून अनुभविलें होतें, अनुमेय होतें. (४११)

तसें मेहनत, कृत्य कर्म, काम कर्म, चेहरा आकृती स्वरूप चेहऱ्यावरील विकार मुद्रा सौंदर्य असें तें दुसरेपणानें पाहाणें दुजेपणाचा भावच तेथें भाव तो कर्ता जो, कर्म करणारा जो ईश्वर का ब्रह्मदेव अथवा वायुदेवपणाचा तो आत्म्यावरच–आत्म्यासच आत्म्यावरच, तो (जिव्हाळा का) आळ आलेला कर्तेपणाचा तो गेल्यावर शब्दांनीं सांगतां नसण्यासारखें असें जें कांहीं एक उरतें, जें जसें कांहीं असेल, तसें जे कांहीं उरतें तीच मुळी आत्मस्थिति. (४१२)

—अशा त्या आत्मस्थितीचा का स्वाधीनतेचा जो कोणी स्वामी तोच मुळीं ह्या देहाच्याठायीं का देही आत्म्याचा ठावच पाहणारा जाणणारा असा आत्मराज तो मी देह आहे असें कधी तरी मानील काय? अहो, प्रळयकाळाच्या वाढत्या जळाला काय तेथें ओढ्या नाल्याचें असणें का नसणें तें? प्रळयकाळचें पाणी तें सर्व वृद्धि घेऊन असणारें तें पुढें येणेंच सर्व तें त्याचे तेथें इतर ओघाचे तें येणें असणें तें मानलें होत नाहीं. हें कांहीं आहे आहे नाहीं नाहींचें असेंच होणार तेथें ते प्रघाताचे असें मानणें नाहींच नाही.

[अहो, समुद्रच सर्व जो तेथें प्रवाह तो कसचा! तेथें प्रवृत्ति व्यवहारादींना तो मानणें ते आहे आहे नाहीं नाहीं असेंच होय. (४२१)] (४१३)

ब्रह्मसागरच तेथें प्रवृत्ति ही प्रवृत्ति म्हटली जात नाहीं–प्रवृत्तिचे होऊनहि ते प्रवृत्तिवर झाले असें मानले होत नाहीं. पूर्ण अशी ती अहंता देहपणानें आवरिली होत नाहीं–जसा सूर्य तो बिंबानेचमुळीं ताब्यांत ठेविला असें होत नाहीं. मी ब्रह्म अशी अहंता–, पूर्ण जें तेंच मुळीं अहंतेचें आहेपणानें देहधारीपणानें असण्याचें जें येथें देहपणानें आवरिलें तेथें पूर्ण ब्रह्म तेंच एक वागणारे होय: देहपणाचा देहाएवढेपणाचा देहबुद्धिचा, प्रकृति दोषांचा गंधच तेथें नाहीं; एक ब्रह्मच तेथें वागत असलेले तें पूर्ण असेंच म्हटलें व्हावे असें केव्हांहि. अहो! परिपूर्ण जो सविता त्रैलोक्य प्रकाशणारा सूर्य तो व्यापक ब्रह्मच! तो काय एकाद्या-चमुळीं बिंबाएवढ–जेथें कां त्या बिंबानेंच तो सर्व सूर्य आडविला व्हावा असें नाहीं. अहो सर्व सूर्य तो काय एका बिंबानें धारण केला जाईल? ताब्यांत ठेविला जाईल का बाळगून ठेविला असें नाहीं

मी ब्रह्म हा अलंकार काय देहाला बाहेर ठेवील असें देहाएवढेंपणच देहाचा गंध असल्याशिवाय असेल? अल्पज्ञान ठिपसा–सूर्याचें बिंब हें काय सूर्याला ज्ञानाला बाहेर ठेवील? ज्ञानसूर्य असल्याशिवाय असेल?

पूर्ण असा सागरच तो विश्वामधील देहपण तोच मुळीं अनेकत्वानें एकाच त्या पूर्णाचे झाले, तेथें पूर्ण ब्रह्म ते व्यापक असेंच पण देहबुद्धीवरच सारी भिस्त टाकिली असें नाहीं. (४१४)

दह्याचें मंथन करून लोणी काढलें, काढून घेतलें तें पुन्हां ताकामध्येंच घातलें तरीपण तें अलिप्त असेंच केव्हांही असल्याकारणानें काय तें ताकांत पुन्हां मिसळून जातें–अहो तें तर केव्हांही निराळें अलिप्त असेंच असणार नां? (४१५)

काष्टामधुन अग्नि वेगळा केला असतां, काढून घेतला असतां, वेगळा असा तो हुताशनु, हुतावहः अग्नि तर कोंडलेपणाने काष्टाच्याचमुळीं मांदुसी म्हणजे पेटीमध्येंच राहातो, असतो, कीं, कोंडलेपणानें बंद-पणानें वस्तू ही आंत कोंडून धरिली व देहभावानें पूजिली तेथें आगळेपणच एक असें वेगळें लोकोत्तरतेचे ते देहभावानें पूजिले असें तेथें वस्तु ही कोंडिली आंतच बंद करून ठेविली आपल्याच हृदयींची केली, प्राणच तो तेथें कोंडला तो तर देहामधीलच्या भावाची सर्व सोय करून आहे. तेथें सर्व त्याचे ते आगळेपणानें वर्तणें ते तर भावासच मुळीं, अलंकार करणारे असें अद्वितीय ते तर केव्हांहीं देहरूपी देहधारणेंस आवरिले आपलेसे केले, हृदयीच्या भावाचे केले, ओढून धरिले आवरून घेतले आकळिले असें असून ते व्यापकत्वेंकरून केव्हांहीं पूर्ण अशा भावाचे व्हावेच व्हावे असें होय. (४१६)

अहो, रात्रीच्या पोटामध्यें–उदरामध्यें अविद्येच्या आंत तर विद्येचे असणें होणे आहे. अज्ञानरात्रीच्या पोटी उपयाचे योजणें करून ज्ञानोदयाचे होणें आहे. ह्या पंचक्लेशामध्यें ह्या प्राण्याचें सर्व अंग बुडालें आहे पण तेथें क्लेशनिवारणार्थ उपाय करणें जे ते (तर पुढें होणारे क्लेश आतांच मुळीं त्याच्या निवारणार्थ) उपाय करून नाहींसे करावेतः ज्ञानच एक गूढपणानें असलेले तेथें उपाय ते आंगचे करून ते ज्ञानच आपलेसें केलें, ज्ञान होणें केलें; ज्ञानलक्षणेंच मुळीं, ती सर्व वागविली तर मग काय तें अज्ञान, का रात्र का क्लेश म्हणावेत असें नाहीं, त्याप्रमाणें अज्ञान रात्रीच्या (मायेच्या उदरामध्यें असलेला) पोटामधुन जो ज्ञान उदयरूप सूर्य, निघतो (उगवतो, प्रकाशतो) तेथें सर्व प्रकाशच एक असणार! असा तो सूर्य प्रकाशला व्हावा तर मग अज्ञान का रात्र अशी गोष्टच मुळी ती केव्हांही नाहींच. (४१७)

अहो! जाणत्यानें जाणणेंचमुळीं गिळून टाकिलें तें त्याच्या पोटामध्येंच गेलें–जाणणें व जाणणारा वेद्य म्हणजे जाणण्यास योग्य वस्तू जी ब्रह्म ती तर जाणत्यानें जाणणारा जो त्यानें तर स्वतःसकटचमुळीं जाणणारासहीत वस्तूच गिळून टाकिली. ब्रह्ममुळीं (घासाचें) ग्रासाचें केलें व स्वतःच्या पोटींच भरलें (आपलेपणाचे केलें, हृदयीचे केलें, हृदयाकाशीच भरलें) तो तर मुळीं सर्व एक ब्रह्म पाहाणारा केव्हांहि त्यास मी देह आहे अशी अहंता दैव हुशियारपण का अहंभावना कसची ती? अहो, अहंताममतेवरचमुळीं ती माझे माझे करणारी स्वार्थ बुद्धि आपालपोटेपणानें कां मालकीपणानें वाजणारी पुढें होणारी होते पण जो व्यापकपणाने असणारी अशी वस्तु (वेद्य ज्ञान जाणणें जाणतेपण–वडिलपण कुटुंबवत्सल) तो तर असें तें जाणणें जाणणाऱ्यासहितच मुळीं गोडपणें अशा (घांसाचे का जाणण्याचे वागण्याचे का) वागविण्याचे करतो तेथें कुटुंबच पोसले असे होय. (४१८)

आणि येथून आकाशानें जेथें जावें, तेथें तर ते मूळचेंच सर्वत्र व्यापक भरलेले असें भरून आहेच आहे, आणि म्हणूनच कीं आपोआपच ते आतां कोंदकोंदून भरलेले असें झालें. (४१९)

तसें त्यानें जें काहीं करावें–सवरावें तें तर आतां तोच मुळीं सहजच कीं स्वभावेंकरून आहेच आहे, असाच होय व असा तोचमुळीं तेथें असल्यानें आतां असें म्हणण्याची कांहीं काय जरूरी ती नाहींच कीं, तेथें कर्तेपणाचा एक निराळाच असा हुशियारपण–, अभिमान अंगी लावून घेण्याचा ते कसचें! कर्तेपणानें (जो आत्मरूपच एक वेठीस बांधून आहे त्यानें काय कर्तेपणाचा तो लाटेपणा मिरवावा असें नाहीं, असें केव्हांही नकोच कीं.) अहंममतेस–कर्तेपणास–कर्तृत्वाभिमानास शिंवणे का स्वतःसच त्या स्वार्थ प्रेमांत अहंममतेत आपणच मालक अशा, मालकपणांत माझे माझे आपलपोटेपणांत विकून (जिंकून विणून) घेणें उगीचच्या उगीचच कोण (करील?) करीत बसेल बरें! (४२०)

अहो, गगन सर्वत्र व्यापक असल्यामुळें तेथें गगनाशिवाय मुळीं ठाव ठिकाणा (केव्हांही मुळीं असणारा का) उरणारा नाहींच. अहो! समुद्र जो अपरंपारपणें भरलेला (सागरच जसा महोदधीच एक) तेथें निराळेपणाचा एकादा प्रवाह (प्रवृत्ति का व्यवहार हा) कसचा! [तेथें ओघ म्हणजे काय तो एकादे

निराळें तळें करून असेल? का उत्तम घोडाच एक असा आपल्या निराळाच एकाया प्रवृत्तीचा प्रवाहाचा कां ओघाचा होईल? कां होणारा नव्हेंच कीं.] तेथें अखंडपणाच एक सर्वच्या सर्व अहो! ध्रुवतारा जो तो स्थिर असा मध्यवर्तीच एक तो, (काय कसाहिपण आपल्या मध्यवर्ती ठिकाणाहून उठून जाणारा केव्हांही नव्हेंच-निश्चळ अविनाशी शाश्वत स्थिर असा जो गगनीचा ध्रुव तो) काय उठून जाईल? कां जागचा हालेल म्हणावा? अहो ब्रह्मा, विष्णू, महेश, (अशी ही त्रिगुण साम्यावस्थेत असलेले जेथें) अशी जी गुणमयी महदादि ती तर केव्हांहीं स्थिर अशाच आपल्या मूळमायेच्या त्रिगुण साम्याची ती (तेथें तीन गुण ते नित्य साम्य घेऊन असलेले ते गुणमयी म्हटली ती काय आपलें साम्य सिद्धपण टाकून देऊन जागची हालेल कां? उठून जाईल काय?) अहो! बाप श्रीविठ्ठल तो शक्तीचा दादुलाच एक होय कीं! चतुरपणामुळें चतुर आनन म्हटला गेला, शिवपणानें शिवरूपच झाला हरिपणानें हरीच्या अंगीचा होऊन आहे जरी तरी पण त्या तिहींचा कांहीं एकमेळा दिसत नाहीं कीं, **श्रीज्ञानेश्वर महाराज—'बापरखुमादेवीवर श्रीविठ्ठल' ते—म्हणतात** कीं अहो शक्तीदेवी जी तिचा विठ्ठल हा दादला म्हणजे नवरा आहे हो-तेथें स्वर्गच एक आकाशासारखे व्यापकत्व सर्वत्र. वटवृक्षाचा व्यापकपणा जसा तेथें तसा तो ध्रुव गगनीचा तो काय केव्हांही उठून हालेल का? तर तो हालला जाणारा नव्हेंच नव्हे हें त्रिवार सत्य होय. तो केव्हांहि स्थिर असाच होय तसें आतां त्या कर्तेपणाच्या ईश्वरत्वाचा म्हणा का ब्रह्मदेवपणाचा का वायुदेवतेचा तो होऊन आहे. कर्तेपण आहेच आहे तेथें आणखी एकादे निराळेपणाचें कर्तेपण तें कसचें!

गगनाशिवाय ठाव नाहीं. गगन सर्वत्र भरून आहे. समुद्र परिपूर्ण तेथें प्रवाह नाहीं. ध्रुव नक्षत्राला हालणें नाहीं. (४२१)

अशा तऱ्हेनें ज्याचा मीपणाच्या अविद्येचा प्रकार नाहींसा झाला आहे, मालकच एक माझें माझें असें; आप्पलपोटेपणावर अहंममतेच्या स्वार्थाची अशी मनोवृत्ति ज्याचेंठायीं नाहीं. तेथें बोधच एक नांव नामीच जागृति विचार जागेपण आपला परिणाम करून आहे तेथें कर्मे ती तर जोपर्यंत देह आहे तोंपर्यंत केव्हांहि होतच असणार कीं. जीं कांहीं कर्मे तेथें ह्या देहधारणेनें आधी म्हणजे योग्य अशीच तीं सहजपणेंच कीं (हा देह जोपर्यंत तोपर्यंत चरितार्थाचा तो कर्मामध्यें रत होण्याचा प्रकार तो) होतच असणार—देह आहे पावेतों, आचरणाचा तो पुरवठा असतोच कीं. (४२२)

[अहो तोंडचे वारे वाजून संपते—ह्या देहीचा वाटा तो ह्या मुखाच्या बोलण्यानें वाजला, वाजविला व संपला तरीपण तेथें त्या बोलण्याचा परीणाम हा उरतोच नां!] अहो वारा वाहिला वारा वाजला, तें वाहाणें वाजणें वाऱ्याचें संपलें, तरीपण वृक्षाच्याठायीं तें वाऱ्याच्या वाहण्याचें परिणामात्मक जें डोलणें तें उरतेंच नां! अहो डबीमध्यें ठेविलेला कापुर जरी नाहींसा झाला, उडून गेला (उघडा ठेविल्यामुळें वायूनें तो सुगंध नेला तेथें कापुर संपविला का संपला) तरी करंडामध्यें का डबीमध्यें ती हती सुगंध मागे राहतोच —उरतोच—असतोच डबीमध्यें कापुराचें द्रवणें तें सुगंधाचें असणें असतेंच ना? (४२३)

*गीत गाण्याचा समारंभ* (स्वीकारलेल्या कार्याचा प्रारंभ भार) *गीत गाण्याचा* उद्योग (राहविला) *संपला तरीपण तेथें गीत गाण्याचें बंद झाल्यानें* (जो कांहीं क्षोभ, तन्मयपणाचा आनंद) मनाची खळबळ संपली असें (होत नाहीं) जाणवत नाहीं आवरत नाहीं. अंबु—पाणी लोट घेऊन आलें, तें वोसरलें तरीपण (आलेपणाचा) ओलावा हा असतोच. (४२४)

अहो! अर्क म्हणजे सूर्य मावळता झाला तरी (होता होता का झाल्यानें कां होत असतांना) संध्याकाळच्या (रात्र व दिवस यामधील अंतर) संधि वेळेची शोभा (भूषण रचनेचा संधिप्रकाश—मधले अंतर विश्रांती तेज सौंदर्य दीप्ती सहजपणेंच) कौतुकानेंच एका, दिसत असते-दिसूं लागते. (४२५)

पै लक्ष भेदलियाहि वरी। शरू धावेचि अंबरि।
जंव भरली आथीं उरी। बळाची ते ॥ ४२६ ॥
नाना चाकी भांडे जाले। ते कुंभारे परौते नेले।
तरी भ्रमेचि (भ्रमेचि) ते मागिले। भवंडिलेपणे ॥ ४२७ ॥
तैसा देहाभिमानुहि (गेलिया) गेल्या। देह जेणे स्वभावे धनंजया।
जाले ते आपैसया। चेष्टवीचि ते ॥ ४२८ ॥
संकल्पेविण स्वप्न। न लाविता दांगीचें वन।
न रचिता गंधर्व भुवन। उठी जैसे ॥ ४२९ ॥
आत्मयाचेनि उद्यमेविण। तैसे देहादिपंचकारण।
होय आपणया आपण। क्रियाजात ॥ ४३० ॥
पै प्राचीन संस्कार शेषे। पांचहि कारणे सहेतुके।
कामविजति गा अनेके। कर्माकारे ॥ ४३१ ॥
तया कर्मामाजी मग। संव्हरो का अवघे जग।
अथवा नवे चांग। अनेक (आन) करो ॥ ४३२ ॥
परी कुमुद कैसेनि सुके। कैसे ते कमल फांके।
इये दोनी रवी न देखे। जयापरी ॥ ४३३ ॥
का विजु वरषौनि आभाळ। ठिकरिया अतो भूतळ।
अथवा करूं शाड्वळ। प्रसन्ना वृष्टि ॥ ४३४ ॥
परी तया दोहीते जैसे। नेणिजे का आकाशे।
तैसा देहीचि जो असे। विदेह दृष्टी ॥ ४३५ ॥
तो देहादिकी चेष्टी। घडता मोडताही सृष्टी।
न देखे स्वप्न कीरिटि। चेईला जैसा ॥ ४३६ ॥
येऱ्हवी चामाच्या डोळया वाऱ्ही। जे देखती देहेचिवरि।
ते किर तो व्यापारी। ऐसोन्चि मानिती ॥ ४३७ ॥
काई तणाच्या बागुला (बाहुला)। आगरामेरे ठेविला।
तो सांचचि राखता कोल्हा। मानिजे नां ॥ ४३८ ॥
पिसे नेसले कां नागिवे। हे लोकी येऊनि जाणावे।
ठाणौरियाचे मवावे। आणिकी घाय ॥ ४३९ ॥
का महासतीचे भोग। देखे किर अघवे जग।
परी ते आगी ना आंग। लोकु देखे ॥ ४४० ॥
तैसा स्वस्वरूपे उठिला। जो दृश्येसि द्रष्टा आटला।
तो नेणे काई राहाटला। इंद्रिय ग्रामु ॥ ४४१ ॥
अगा थोरी कल्लोळी कल्लोळ साने। लोपता तिरीचेनि जने।
येकी येक गिळिले हे मने। मानिजे तऱ्ही ॥ ४४२ ॥

लक्ष=लक्ष्य निशाण. शरू, शर=बाण. अंबरी-तंववरी (अंबर=आकाश, कापड, वय, कापूस, मेघ.) उरी=शिल्लक, अवशेष. ते-तया (४२६) चाकी-चक्री. कुंभारे-कुलाले. पौरोते-परते. भ्रमेचि -भ्रमेचि. ते=चक्र. तऱ्ही-परी. भवंडिलेपणें-भोवंडिलेपणें. (४२७) गेलया-गेलिया. देहे-देह. ते-

तो. चेष्टवीच ते–चेष्टवीचि. आपैसया–आपसया=आपोआपच. स्वभावे=कर्मामुळें. (४२८) दांगीचे अरण्यांतले. उटी–उठी. (४२९) आपणया आपण=आपल्या आपणांसच (४३०) प्राचीन=पूर्वजन्माच्या संस्कार शेषे=संस्कारानें. कामविजति=क्रिया करवितात, कर्मे करवितात.) (४३१) संव्हरो–संहरो= जबरीने घेवो, एकत्र करो. अनेक करो–अनुकरो–आन करो=उत्पन्न करो, निर्माण करो, रचो. (४३२) कुमुद चंद्रविकासी कमल. इये–ही. (४३३) वीजु वरषौनि= (आकाशांतून) वीज पडून. टिकरिया–ठिकरिया. अतो–आतो–भूतळ=भूतळाच्या (जमिनीच्या) ठिकऱ्या ठिकऱ्या होवोत. शाडूळ=हिरवेचार गवताचे करो. (अथवा वृष्टि प्रसन्नतेने भूमीवर हिरवेचार गवत उगवो.) प्रसन्ना=मनसोक्त वृष्टी, कृपाळुपणाने संतुष्ट होऊन–(प्रसन्न संतुष्ट स्वच्छ, उघड अर्थ, बिनचुक) दोहिते–दीहीते. देहीचि–देहीच. विदेह दृष्टी= देहापलिकडच्या स्थितीत, देहातीत स्थितीत, देहाभिमान रहित. निराकार स्थितीत. चेइला=जागा झालेला. (४३५) हे–ही. स्वप्न कीरीटी–स्वप्न दृष्टी. (४३६) चामाच्या डोळया चाऱ्ही–चामाचे डोळेवरी=चर्मदृष्टीने, चामड्याचे डोळयांनीं. देहच्चिवरी कीर=विकाराचा ('एतद् मांसवसादि विकारं मनसि विचारस्य वारंवारम्)' (४३७) काई–कां. तणांच्या–तणाचा. बागुला–बाहुला राखणदार आगरामेरे–आगारामेरे=शेताच्या सीमेवर, कडेवर. सांचचि=सत्य. राखता=संरक्षक. मानिजे नां? न मनी काई. (४३८) पिसे=भ्रमिष्ट वेडे. नागिवे नागवे लोकी–लोकांनी. ठाणौरियाचे–रखवालदाराचे, खरा रखवालदार, युद्धांत मेलेल्याचें. मवावे–मोजावे. घाय=घाव डाव. (४३९) महासतीचे भोग=सती (जेव्हां) सती जाते (त्या) वेळचे स्नानादि भोग. (४४०) आटला–आंतला=लय पावला, नाहीसा झाला. राहाटला इंद्रियग्राम=इंद्रिय समुदाय राहाटला, व्यवहारला. (४४१) येकी येक–एकी एक–एकाएकी. कल्लोळी=तरंग, लाटा. (४४२)

निशाण भेदून सोडलेला बाण, अंबरी तंववरच धांवत, सणाणत असतो. जोपर्यंत का बळाच्या त्या अवशेषानें कां शिलकीनें तो भरलेला असा–आभरून असतो. (४२६)

अथवा चाकामुळेंच भांडे घडलें बनविलें का बनलें गेलें, (झालें) तें कुंभाराने काढून घेऊन बाजूस केलें, तरी चाक तें अगोदरचमुळीं फिरविलेलें भवंडिलेलें तें तर भ्रमतच (का भ्रमतच) असतें नां? (४२७)

त्याप्रमाणें देहाबद्दलचा देह अभिमान, देहाचा अभिमान जरी नाहींसा झाला तरी देह ज्या कांहीं स्वभावास नैसर्गिकतेमुळें कां स्वभावसिद्धतेमुळें जन्मलेले ते कर्मामुळें (देह तो नैसर्गिकच मुळीं, ते देह) सहज आपोआपच चेष्टवीत असतेच असते, (वर्तवीत असतेच) तेथें शरीर व्यापाराची खळबळ हालचाल आपोआप होतच असते. (४२८)

*संकल्पविकल्पाशिवाय, मागचें पुढचें कांहीं विचारणें केल्याशिवाय, जें कांहीं एक स्वप्न पडतें (कर्मफलत्याग, संकल्पाचा त्याग म्हणजे संन्यास म्हटलेला.) तेथें स्वप्न [स्वप्न=प्राणसु फन्ना झालेले, आलिंगिलेले, छातीशी छाती भिडली–निराळा–सिन्हेशी सिन्हा लावला, मिळविला] जें कांहीं एक पडणारें तें जसें उठतें दिसतें पडतें, घडतें; अथवा अरण्यातील वृक्षाचें वनच एक जसें का लाविलेलें तेथें वनच एक पुढें दिसणें होतें–नच कांहीं रचणें केलेलें असें जें आकाशामध्यें उत्पन्न होणारें गंधर्व भुवन (आकाशामध्यें उगवणारें, दिसणारें) आकार ते जसे (येतात उगवतात आरशात दिसल्याप्रमाणें कां सहज आकारास आलेले) आकाराचे झालेले दिसतात.* (४२९)

आरम्यामुळेंच आरम्याच्या कांहीं एका उद्योगाशिवाय (उद्यमाशिवाय–मेहनत घेतल्याशिवाय मुळीं) ते आरशांतच जसें का दिसत आहेत असें दिसतात. त्याप्रमाणें देह आदिकरून जी पंचकरणें (१) अधिष्ठान (शरीर). (२) कर्ता (ईश्वर, ब्रह्मदेव, प्रजापति–मनु–का वायुदेव) (३) करण इंद्रिये पृथक्विध अशी (४) विविध अशा निरनिराळ्या हालचाली, वर्तणुकी, चेष्टा, व (५) दैव ते पांचवें कारण, (देवाचे जे कांहीं त्या

देहावर मनुष्यप्राण्यावर–असणारें ग्रहाचें कृपा छत्र)=अशी देह आदिकरून पंचकारणेंच मुळीं ती (आपल्या आपणासच आपोआपच) एकूण एक क्रियाजात (तपणें का वेद वेद्य अभ्यास स्वातंतर्य ईश्वरत्वाजवळचे होणें जें का सर्व हे कांहीं एक परमेश्वराचेच आहे) ईश्वराच्या अधिष्ठानावरच होत आहे असे जें कांहीं (सर्व क्रिया का कर्म अभ्यासानें असणें–ज्ञानलक्षण वागविणे ते) होत असतें. (४३०)

तरीपण प्राचीनतेच्या पूर्वजन्मीच्या संस्कार शेषामुळें–मनुष्यप्राण्याची पूर्णता पूज्यता – अलंकृत करण्यामध्यें जें कांहीं एक अभिषेक होणें (का शास्त्रोक्त करणेचें केलेलें) तेथें उरलेलें (बाकी राहिलेले) शेष जें त्यामुळेंच कीं, ती पांचही कारणें सहेतुक अशी इच्छा (इच्छिलेली) कामना [(कामवावी इच्छित प्राप्तीसाठीं सुंदर अशी–हेतु धरून साधन योजून इंद्रिय का मूळतत्त्व तेंच कारणाचे का हेतूचे करून तेथें अनेक अशी कर्म आवारे आकार (कर्म आकार–मनुष्याचा मनुष्यांशी संबंध)] कामविली–कामविजली होतात क्रिया करवितात–कर्में तेथें कामकरी (होणें का शिल्पीच जसा) कर्मकार म्हटला कीं. (४३१)

अशा त्या कर्मामध्यें–(दीर्घप्रयत्नामध्यें–सहकारामध्यें–कामामध्यें मग) सर्व जगहि जरी जबरीनें नेलें गेलें (कां एकत्र केलें गेलें, संहरलें, आवरीलें झालें तरी, असें होतेंच. (असें होवो का नवीनतेचें असें) नवनाविन्याचें उत्तम असें चांग दुसरेच एक घडलें, (जन्मविलें, रचिलें, बनविलें आकारास आणलें–असें अनुकाराः अनु अनु कसे उत्पन्न करो कीं, अनेकी एक असें करो)–तेथें दीर्घ प्रयत्न हेंच कर्म म्हटलें कीं. (४३२)

येथें आतां कुमुद ते (चंद्रविकासी कमल) कुमुदबांधव जो चंद्र त्याच्या तेजाच्या अंशानें विकास पावणारें कमल तें कां किंवा कसें सुकतें (कुमुद हें एका दिग्गजाचें नांव आहे; तसेंच कुमुद म्हणजे पांढरे कमळ; अथवा रक्त म्हणजे तांबूस कमळ, अथवा रुपे अथवा कापूर) अथवा प्रफुल्लित होते (फांकतें, उमलतें उमललें, होतें, हास्ययुक्त होतें, विकासित होतें) येथें त्या कमलाचें तें खिन्न होणें कां आनंदित अशा हास्य युक्ततेचें होणें असें दोन्हीही (पण कांहीं) तो सहस्रकर सूर्य ते देखणं देखवत नाहीं पाहाणें पाहात नाहीं जसें त्याप्रमाणें. (४३३)

विद्युल्लतेनें सर्व आभाळ तें पृथ्वीच्या खंडाचें केलें, (मेघाचें केलें) तेथें आतां (विजेच्या का) मेघाच्या गडगडण्यानें वीज पडण्यानें सर्व भूमितळ (पृथ्वी नांवाचा एक छंद आहे.) पृथ्वीतळ हे आतां ठिकरिया (–ठी म्हणजे आंतल्या मोजमापाचे) केले, (गणिले, मोजले, केले, अंगे आतां अनेक अशीं झाली, ठिकरी–ठिकरी अशी लहान लहान मूळ अंग तें कोणतें हें उल्लेखणें होईल) आणि म्हणूनच कीं ज्यायोगें ती आधार शक्तिच एक लेखिली अथवा वृष्टी ही प्रसन्नतेची करून सर्व पृथ्वीतळ हें जसें का एक हिरवाचार गालिचा पसरला आहे अशीं प्रसन्न वृष्टि झाल्यानें कोंवळें गवत हें उगवलेलें असें करो अथवा शरद ऋतुसंबंधींचीं ती शारदीय पार्वती का सरस्वतीच एक अशी करो–वृष्टी प्रसन्ना अशी ती भूः समर्थ भूमि–आधार शक्ति करो ['अतोदेवेति मंत्रेसहित'–देव हा कर्मावर टेकणारा असल्यानें तेथें समर्थपण ते भूमीचें होय–आधार शक्तिचे होय–म्हणून भूमि समर्थ म्हटली कीं,। **'पेंढारा दाऊनिया थाकसी'**–अभंग पाहा.] वीज पडून जमिनीच्या ठिकऱ्या होवोत अथवा मेघ वर्षून जमीनीवर हिरवेगार गवत उगवो. (४३४)

मूळ उल्लेखिलें कां शारदीय केलें हें कांहीं तें आकाश जाणत नाहीं. अहो आकाशानें तें कांहीं जाणणें नाहीं–(होत नाहीं) त्याप्रमाणें जो देहधारीपणानें असूनही पण देहापलीकडच्या स्थितीत (देहाभिमान रहिततेच्या स्थितीत) असलेला जो (असा असतो) आहे. (४३५)

तो ह्या देह आदिकरूनच्या देहादि पंचकारणावर होणाऱ्या चेष्टासंबंधी (देखणे देखत आहे) पाहात नाहीं (तेथें त्या पंचकारण हालचाली ज्या ह्या सृष्टीच्या घडण्याच्या होणाऱ्या का मोडण्याच्या होणाऱ्या

त्या पाहात नाहीं) जसा का स्वप्नामधून जागा झालेला एक तो (स्वप्न दृष्टीमधून जागेस आलेला तो) जसा. (४३६)

येरव्ही पाहिलें असतां (स्पर्शेंद्रियाची एक खोळ कां वारच जशी कां असें) डोळे जे त्यांनीं जे पाहतात ते सर्व देहच एक ते तर अहो ह्या 'एतद् मांसवसादि विकाराचे व्यापारीच मानिले होतात-: तो खराखुरा असा सर्वांनी मानला, समजला, जाणला, लक्षिला, व्यापाराच्या अशाच त्या वसादि विकाराच्या महत्वाचा अंसा, सत्य जें त्रिकालाबाधित त्यासचमुळीं तो व्यापारी अनृत सत्यानृत-म्हणणारा असा व्यापारीच तो (लोक) मानितात कीं. (४३७)

अहो अहो! तणाचा [तण-फोंकी काडेच ती असा-तंतु लागलेले अशा ताणा तण-लुटुपुटीच्या-घरांचा] तृणाच्या काड्याचा केलेला (पेंढा भरलेला काडाचा केलेला) बुवा-(बाहुला-बागुल) क्षेत्राच्या शेताच्या सीमेवर-(आगरामेरे) ठेविलेला जो तोच मुळीं एक खराखुरा राखणदार (का रखवालदार) आहे असें कोल्हा तो मानतो नाही काय? [धूर्तपण तोंचमुळीं कोल्ह्याचें तो कोल्हा तण बागुल आपणच मूर्त धूर्त कोल्हाच तो स्वतःस भीणारा झाला.] (४३८)

भ्रमिष्ट वेडे ते वस्त्र नेसले आहे कां नागवेच मुळीं आहे हे लोकांनीच मुळीं (तेथें येऊन) जाणावें लागतें; (वावानीं वारा पैसच करून ते) युद्धांत पडलेल्याचे घायाळपण घाय-ते (घायकपण-आणिका) दुसऱ्यांनीं मोजावे होतात (धरिले होतात आपलेच ते घाय मानिलेः रक्षकाचें तें राखणें जें, तेथें रक्षण करणाराचें राखण करणाराचे त्याचे ते घाय डाय होतात.) (४३९)

महासती जी तिचे नवऱ्याच्या मृतदेहाबरोबर सती जातांना जें कांहीं स्नानादि भोग भाग्य ते अवघे सर्व जग (तर ह्या नवविधा धातूंचे केलेल्या देहाचे जे प्राणिधर्म, तेथें मांसवसा आदि विकारच मुळीं) पाहाते [जनानें तर त्या विकारांचेच सर्वथैव एक पाहाणें होते. पण ते जग अथवा जन ते कांहीं तेथीलचे ते स्वर्ग लोकीचे ते वैराग्याग्निचे का स्वर्गांगाचें होणे जे सतीचे वैभव ते कांहीं जन जे आहेत ते पाहात नाहींत धगधगीत आगीचे का स्वर्ग लोकीच्या आंगचे ते जे कांहीं एक सतीचे ऐश्वर्य ईश्वराची आपलीच ती उत्तमांगाची=उत्तम अंग चेईले संसार आंग-भाव अंग-देव अंग-देव देवीचे ते आंग-प्रकृतीस पुरूषाची जोड झाल्यानें सर्व जीवित हे गोड झाले असें जे कांहीं एक पुरुषाच्या आंगचें होणे तेथें दिव्यच एक देवी-दैवी, दैव व्यायली अशी ब्रह्मसंपदाच मुळीं ती म्हटली की, उत्तम हा शब्दचमुळीं जसा एक जीव-अखंड असा स्वरूपभारानें निर्मळ असा (आरसाच एक) सती पतीचे वैभवच ते ती सती पाहाणारी=अशी ईश्वरत्वच एक पाहाणारी ती पतीची एक गती सद्‌गती-शिवशक्तिच्या-बरोबरीच्या जोडीत बसविली जाणारी जी तिची योग्यता ती कांहीं जन ते पाहात नाहींत कीं, अहो]

पण ती सती जाणारी ती कांहीं आग अथवा देह (कां आग) का जमलेले लोकही पाहात नाहींत तिचें तें पाहाणें तें पतीच्या जीवित्वाशीं एकजीव झालेलें असेंच तें केव्हांहि होय.

महासती जी तिनें (आपल्या नवऱ्याच्या मृतदेहाबरोबर) सती जातांनां [जो कांहीं स्नानादि भोग, भाग्य ते अवघे सर्व जग पाहाते पण ती सती जाणारी ती कांहीं ती आग [अग्नि अथवा देह (का आंग) का जन, लोक, ही पाहात नाही] तिचें तें पाहाणें तें पतीच्या जीविताशीं एकजीव तादात्म्य झालेलें असेंच ते केव्हांही होय. (४४०)

तैसा स्वस्वरूपाच्याठायीं निर्मळ केलेला जो द्रष्टा (देखणा, सुंदर, पाहाणारा, साक्षी) तो, दिसणारे सुंदर जें त्या दृश्यासहित (लय घेऊन आहे, नाहींसा होऊन आहे) आटला आहे, तो तर इंद्रियसमुदाय तो काय व्यवहारला राहाटिला ते कांहीं जाणत नाही. (४४१)

थोर लाटाच्या कल्लोळामध्यें लहान लहान लाटांचे कल्लोळ तरंग जर लोपले (लोप पावले असतां) तर किनाऱ्यावरील (कां तीरावरीलच्या) जनांनीं तर अहो! मनानेच जरी, 'एका मोठ्या लाटांनीं एक लहान लाट गिळिली' असे मानावे. (४४२)

—तऱ्ही पाणियाकडे पाही। कोणि गिळिजत आहे काई।
तैंसे पूर्णा दुजें नाहीं। जे तो मारी। ४४३ ॥
सोनयाचिया चंडिका। सुवर्ण शुळेचि देखा।
सोनयाचिया महिषा। नाशु केला ॥ ४४४ ॥
तो देवलसिया कडा। वेव्हारू गमला फुडा।
वांचुनि शुळ महिषु चामुंडा। सोनेंचि आहे ॥ ४४५ ॥
पै चित्रिचे पाणि हुतांशु। तो दिठिचा भागु आभासु।
पटि आगी बोल्हांशु। होवोनि (दोनी) नाही ॥ ४४६ ॥
मुक्ताचे देह तैसे। हालत संस्कारवशे।
देखोनि लोक पिसे। कर्ता म्हणती ॥ ४४७ ॥
आणि तया करणेया अंतु। घडो तिही लोका घातु।
परि तेणे केला मातु। बोलोचि नये ॥ ४४८ ॥
जरी आंधारूचि देखावा तेजे। मा तो फेडिजे हे (फेडी हे केवि) बोलिजे।
तैंसे ज्ञानिया नाहीं दुजे। करील काई ॥ ४४९ ॥
म्हणौनि तयाचि बुद्धि। नेणे पाप पुण्याची गंधी।
गंगा मिनलिया नदी। विटाळु जैसा (जैसा विटाळ नाही) ॥ ४५० ॥
आगी (अग्निसी) आगी झगटलिया। कांहीं पोळे धनंजया।
की (ते) शस्त्ररूपे आपणया आपणचि? ॥ ४५१ ॥
ते (तैसे) आपणया परौते। जो नेणे क्रियाजाताते।
तेथें काय लिंपवी बुद्धिते। तयाचिये ॥ ४५२ ॥
म्हणौनि कार्य कर्ता क्रिया। हे (रूपस्व) स्वरूपचि जाले जया।
नाही शरिरादिकी तया। कर्मी बाधु ॥ ४५३ ॥
जो कर्म कर्ता जिउ विंदानी। काढुनि पांचै खाणि।
घडत आहे करणि। आउती दाहे ॥ ४५४ ॥
तेथें न्यावो आणि अन्यावो। हा द्विविधा साधोनि आवो।
उभिता न (लवी) लविती खेवो। कर्म भुवनें ॥ ४५५ ॥
यया थोराडा कीर कामा। विरजा नोहे आत्मा।
परि म्हणती हन उपक्रमा। हातु लावि ॥ ४५६ ॥
तो साक्षी चिद्रूपु। कर्मप्रवृत्तीचा संकल्पु।
उठि तो कां निरोपु। आपणचि हे ॥ ४५७ ॥
तरी कर्म प्रवृत्तीहीलागी। तया आयासु नाही आंगी।
जे प्रवृत्तिचेहि उलंघी। लोकचि हाथि ॥ ४५८ ॥
म्हणउनि आत्मयाचे केवळ। जो रूपचि जाला निखळ।
तया नाही बंदिशाळ। कर्माची हे ॥ ४५९ ॥

**परि अज्ञानाचां पटिं । अन्यथा (ज्ञानाचे) चित्र उटिं ।**
**तेथ चितारिणी हे त्रिपुटी । प्रसिद्ध जे का ॥ ४६० ॥**

पाणियाकडे–उदकाप्रति. कोणे गिळिजत आहे काई–कोण ग्रसितसें काई. (४४३) सोनयाच्या. सुवर्णाच्या. सोनयाचया–सुवर्णाच्या. चंडिका = देवीने महिषा–महिखा. (४४४) देवलसिया = देव आंगांत आणणाऱ्याच्या गुरवाला वेव्हारु–व्यवहारु. सोनेचि आहे–सुवर्णचि ते. (४४५) पाणि हुतांशु–जळ हुतांशु. दिठिचा–दृष्टिचाचि. वोल्हांशु होवोनि नाही–वोलांशु दोनी नाही. (४४६) जरी–अगा. फेडावा = घालवावा. मा–मग. ते–तो. करील काई-जे तो मारील. (४४९) गंधी = गंधवार्ता. विटाळु जैसा–जैसा विटाळ नाहीं. (४५०) आगी आगी–अग्नीसी आगी. झगटलिया. काही–काय. (४५१) ते आपणपया परौते–स्वरूपचि. बाधु–बांधु (४५३) जो–जे. जिउ–जीव. पांचै–पांचहि. घडत–घडित. करणी आउती (आहुती) दाहे = इंद्रिय रूप दहा नांगरांनी विंदानी = विज्ञानी, कुशल, लाघव. (४५४) द्विविधा–द्विविधु. उमिता न लवि खेवो = क्षणाचाहि विलंब लावीत नाही (४५५) थोराडा = मोठ्या विरजा = साह्यकर्ता: उपक्रम = आरंभ (४५६) उटि तो–उठी तो. निरोपु–(निःशेष) = आज्ञा, संकल्पाला तो आज्ञा करील काय? हे–दे. (४५७) उल्लंघी–उळिंगी = बिगारीत. (४५८) अन्यथा–अन्यथा ज्ञानाचे = द्वैताचे चितारणी त्रिपुटी = चित्र, चित्र काढणारा व चित्रपट ही त्रिपुटी (४६०)

तरीपण (म्हणजे) जेथें उदकामध्येंच उदक लोपलें (तेथें उदकाप्रत) सर्व एक परिपूर्ण उदकच जेथें, तेथें उदकाप्रत (का उदयास) कोणी कांहीं गिळित आहे काय? तसा तो भरलेला (अखंड) का सगळा, सर्वश्रेष्ठ [(पूर्णावतार = नारसिंह, रामकृष्ण)] ५ मी १० मी १५ या तिथी सर्वपूर्ण, परिपूर्णा, एकच एक तेथें पूर्णास दुजे असें कांहींच नाहीं. येथें आतां जे का तो मारील असें [दुसरेपणानें पाहिलें असतांच मुळीं तें दिसणारें, पण येथें तर एकच एक असें असल्यानें तेथें मारणें हा भावच मुळीं नाहीं] कांहींच नाहीं तेथें तेंच मुळीं एकच एक पूर्ण सर्वश्रेष्ठ सर्वपूर्ण असे जेथें. (४४३)

अहो सुवर्णाची केलेली चंडिका देवी जी तिनें, सुवर्णाच्या शूलानें, सुवर्णाचा केलेला, जो महिख तो नाशिला, हे म्हणणें कसें तर— (४४४)

देवलसी–(देवलाप्रमाणेंच होत्री) देवलाची ती होती, तिच्याकडेसचमुळीं हा देव आंगात आणण्याचा व्यवहार अगदीं खरेंपणानें आला आहे असें (गमलें, वाटलें, असे) कळत आहे अहो! काय शूल, काय महिष का काय चामुंडा, तेथें एक सोनेच मुळीं तें सर्व अहो! देऊळामध्यें देव व देऊळ वसविलें–देऊळ देव रावामध्यें राव राऊळ असें जे कांहीं एक देऊळच वसविलें–देऊळ वसविणारी जी देवळवसी तिच्यावरच मुळीं ती व्यवहाराची जबाबदारी व्यवहार्य करण्याचें तें काम अगदीं खरेपणानें पडलें असें भासत आहे, (दिसत आहे) एरव्हीं सोनेच एक सर्व तेथें कसची ती चामुंडा का शूल का महिष तो–पण ह्या शूलास का महिषास अथवा चामुंडेस ती ती देवपणानें देवता रंगारूपास आणण्याकरितां आपल्या अंगानें योजावी लागलेली ती मांडणी तीच एक मुळीं ह्या देवलवसीसच आली असें होय. द्विजपा ती आपआपल्या त्याच्या त्याच्या त्या योग्यतेवर देखणे वसविण्याचे करणें ते ती देवलवसीवरच येऊन पडले असें गमत आहे, जाणवत आहे, तेथें जिव्हा रसना ती यज्ञसूत्रानें—योग्यतेनेच मुळीं, योग्यता पावणारी—

देव अंगात आणणें असाच प्रसाद कड–व्यवहार–देव अंगांत आणणाऱ्या गुरवाला खरा व्यवहारच एक आला आहे असें वाटतें; कारण काय तर शूल, महिष, चामुंडा तेथें सुवर्णच एक–वालभाचे करणें तें व्यवहारतें जीवजीवन व्यवहार्य करणें होते. (४४५)

अहो! भिंतिवर काढलेलें चित्र का एकाया चित्राचें, चित्रामधील पाणी अथवा अग्नि तो तर दृष्टि-

त्याच मुळीं भ्रमाचा आभासाचा भाग अंश पण पट–पटावर म्हणजे वस्त्रावर काढलेलें चित्र, तेथ जळ पाणी अथवा हुतांश अग्नि तो तर पाहा. त्या दृष्टिच्या भ्रांतीचा भाग, अंश होय. मायारूप वस्त्राचें ठायीं काय अग्नि अथवा ओलावा दोन्हीहीं नाहींतच कीं—, तेथें पाणी होणें नाहीं, व अग्निही होणें नाहीं, तेथें पाणी अग्नि दोन्हीही नाहींत. (४४६)

अहो ! येथें आतां मुक्ताचे–(चारी वाचा ऋणमुक्त आत्मा जो त्याचे) देह हेंच त्या त्या जाती गणगोताच्या गृह गृह्य संस्कारवशतेवरच मुळीं हालत चालत डोलत, असणारें तेथें लोक तर पिसेंच जसे (वेडाचे का भ्रमिस्ततेचे) ते त्या हालण्यास चालण्यास का डोलण्यासच मुळीं कर्ता–(शंकर, ब्रह्मदेव, प्रजापति वायुदेव असें) म्हणतात. (४४७)

आणि त्या कर्त्यामध्यें (शरीरामध्यें हावभाव साधन नर्तन प्रकारावर) त्रैलोक्यासही जरी घात घडला तरी त्या कर्त्यानें तो घेला अशी गोष्टच मुळीं बोलूं नयें कीं, असें म्हणताच मुळीं येत नाहीं. (४४८)

अहो ! तेज जें, त्या तेजानें अंधःकार पाहावा, असें होईल तरी कसें ? जेथें सर्व तेजच एक तेथें अंधःकाराची गोष्टच बोलता येत नाहीं. व मग तो दूर करावा हें कुठचें तें बोलणें; तसें ज्ञानिया जो आहे तो सर्व ज्ञानच एक असल्यानें "त्यास दुजें असें कांहीं नाहींच" व असें असल्यानें तेथें त्यानें मारणें, घालविणें, नाही करणें, तें का कसचें कां कुठचें ! (४४९)

आणि म्हणून "जेथें दुजे नच तेथें" त्याच्या बुद्धिवर पापपुण्याची ती गंधि–, वार्ता [ गंध (संबंध शेजार का गर्व ] नाही. अहो ! शुचित्वें शुचि गंगा ती नदीस मिळाली असतां जसा तेथें त्या नदीस (पाण्यास गंगा नदी म्हटलेले जे तिथे) विटाळ नाहीं. (४५०)

अग्निसच अग्नि भेटला, झगटला, तर अग्नि तो काय पोळला म्हणावा ? हे धनंजया ! शस्त्र जें तें आपणया आपणासच रूपेल खुपेल काय ? (४५१)

जेथे आपणा स्वतःशिवाय दुसरे ठायीं त्याचें तें सर्व क्रियाजात नाहींत, तेथें त्याच्या बुद्धिस लिंपवी असें कांहींही नाहींच. (४५२)

म्हणून कार्य (करणार जो) व ते क्रिया करणें, हें तर रूपच एक स्वरूपाचें झालें एक रूप झालें ज्यास, त्यास तर बुद्धियोगच योगास आल्याकारणानें शरीर आदिकरून जे, ते कर्मबंध होत नाहींत. (४५३)

शरीर आदिचें असणें हें त्यांस कर्मी वागत असतां बाधत नाहीं. जो कर्म करणारा असा कर्ता, जीव तो कौशल्यानेंच मुळीं पंच भूतांच्या पांचही खाणी उकरून काढून (खणून) इंद्रियरूप दहा नांगरांनी नांगरास जोडलेल्या इंद्रियरूपी दहा बैलानी नांगरून घडीत आहे, आकारास आणीत आहे. (४५४)

तेथें न्याय अन्याय असा द्विविध आकार साधणें उभारितां उभारितां क्षणभरही (लवत नाहीं.) कर्म भुवनांना लिगटण्याचें कां आलिंगण्याचें कां करीत नाहीं. (४५५)

अशा त्या मोठ्या [ आडवे तिडवे वाढणें मोठे होणें, उंच सोटासारखे थोराड होणें; थोरल्याशा–, (मांसवसादिविकारः **'राही रखुमाईसमभाव'** कृ=कृपा कीर ] कामास आत्मा कांहीं साह्यकर्ता नव्हें पण असें म्हणतात कीं, तेथें आरंभास का प्रारंभास कां चिकित्सेस तर आत्मा हात लावतो. (४५६)

साक्षी जो ज्ञानस्वरूप त्याचे ठायी चिद्रुप जो आत्मा त्याच्या साक्षित्वानें कर्म प्रवृत्तीचा एक संकल्पच मुळीं निश्चय का उद्देश असा उभा होतो (उठतो) तो काय आपणच आपणास बिगारीत देतो, फसवितो ?– तो उद्देश तो काय आपणच आपणास पूर्ण निःशेषपणें (देतो) लिप्त करतो म्हणावा ? (४५७)

(१) तो चित्तरूप साक्षी, कर्मप्रवृत्तीच्या संकल्पाला आपणच आज्ञा करील काय ?

(२) कर्मप्रवृत्तीचे संकल्प ते हे काय तो, ज्ञानस्वरूप (साक्षी) आपणच उद्देश होतो का विशेष असा होतो असा आहे? तर नाही.

(३) तरीपण कर्मप्रवृत्ती करीता त्यास तर मुळींच कांहीं आंगचे आयास पडत नाहींत कारण ह्या प्रवृत्तीच्या अनादरात असलेले ते ओलांडण्यांतच मुळीं, बिगारीत, हे लोकच असतात. प्रवृत्तीस अनादराचें करणें का उल्लंघणें जे त्यास 'लोक' असे म्हणतात. (४५८)

आणि म्हणून जो केवळ आत्म्याचे-आत्मयाचे निखळ रूपच झाला आहे त्यास तर ही कर्माची बंदिशाळ केव्हांही नाहींच नाही. (४५९)

पण अज्ञान रूप वस्त्रावर अन्यथा म्हणजे विपरीत ज्ञानाचे जे कांहीं एक चित्र उठते उमटते, बिंबते तेथें (तिकोनी बाण, तळहात, तीर) त्रिपुटी जी प्रसिद्ध अशीं आहे, तीचमुळीं ह्या अन्यथा ज्ञानाचें द्वैताचें चित्र रेखाटते, चित्राची मांडणी करते. (चित्रकर्मा=चितार काम, सुशोभित करणें. चितारी, चित्रकार=चितारी, नट.) चितारणी त्रिपुटी=चित्र, चित्र काढणारा व चित्र त्रिपुटी. (४६०)

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥**

ज्ञानं=बोध, जाणिव, बुद्धि. ज्ञेय=जाणण्यास योग्य. परिज्ञाता=पूर्णज्ञान जाणणारा, पंडित. त्रिविधा=तीन प्रकार, पद्धति, उत्कर्ष, कर्म. कर्मचोदना=कर्मास उत्तेजन, कर्मप्रेरणा. [चोदना=उत्तेजन, प्रेरणा. कर्म=काम, कर्म, प्रयत्न, कर्म करणें, कृत्य, धार्मिक कार्य, पूर्व कर्म, देव, गुणधर्म, गति, चलन कर्मेंद्रिय, इंद्रिय, कामगिरी करणें.] करणम्=क्रियेचे साधन, कारण, इंद्रिय. कर्ता=(कर्तृ) करणारा. संग्रहः=रक्षक, काबिज करणें, स्वीकार, सांठा, संचय, समावेश, निष्कर्ष, निग्रह, नियमन, रक्षण, कृपा, स्वागत, उन्नति, उद्योग.

अन्वयः—**कर्मचोदना**–, त्रिविधा। ज्ञेयं ज्ञान। परिज्ञाता। **कर्मसंग्रहः** त्रिविध। करणं। कर्म कर्ता ॥ १८ ॥

कर्माच्या प्रेरणेची तीन अंगें तीं–ज्ञान, जाणण्याचा विषय व जाणणारा–अशी होत तसेच कर्माच्या निष्पत्तीची तीन अंगे ती–कार्य करण्याचे साधन, साधावयाचे कार्य व कार्यकर्ता अशी आहेत.

अर्थः—(१) एक ज्ञान दुसरे ज्ञेय व तिसरे ते परिज्ञाता अशा ह्या तीन प्रकारानी म्हणा करा उत्कर्षानी म्हणा कर्मास उत्तेजन दिलें जातें का कर्मास प्रेरणा केली होते–तसेंच एक करण दुसरें कर्म तिसरें कर्ता अशा ह्या तीन तऱ्हानी कर्म ते संग्रहाचें केलें होतें संचयाचें केलें होते.

(श्लोक १८ वा ओव्या ४६१–५१६)

**तेचि ज्ञाता ज्ञान ज्ञेय। हे जे जगाचे का बीजत्रय।**
**ते कर्मचि निःसंदेह। प्रवृति जाण ॥ ४६१ ॥**
**आता तयाचि गा त्रया। व्यक्ति वेगळालिया।**
**आयिकै धनंजया। करूं रूप ॥ ४६२ ॥**
**तरी जीव सूर्यबिंबिचे। रश्मि श्रोत्रादिके पांचे।**
**धांवोनि विषयपद्माचे। फोडित मढ ॥ ४६३ ॥**
**किं जीव नृपाचे वारू उपलाणे। घेऊनि इंद्रियाची कैंकाणें।**
**विषय देशींचे नागवणे। आणीत जे ॥ ४६४ ॥**

हे असो (इही) इंद्रियी राहाटे। जे सुखदुःखेसि जिवा भेटे।
ते सुषुप्तिकाळी वावटे। जेथ ज्ञान ॥ ४६५ ॥
तया जीवा नांव ज्ञाता। आणि हे जे सांघितले आता।
तेचि येथें पांडुसुता। ज्ञान जाण ॥ ४६६ ॥
जे अविद्येचे पोटि। उपजत खेंवो कीरटि।
आपणयातें वांटि। तिही ठांई ॥ ४६७ ॥
आपुलिये धांवेपुढा। घालुनि ज्ञेयाचा गुढा।
उभारी मागिले कडा। ज्ञातृत्वाते ॥ ४६८ ॥
(मग) ज्ञातया ज्ञेया दोघां। तो नांदणुकेचा बगा।
माजी आलेनि पै गा। वाहे जेणे ॥ ४६९ ॥
ठाकुनि ज्ञेयाची सिंव। पुरे जयाची धांव।
सकळ पदार्थी नांव। सूतसे जे ॥ ४७० ॥
ते गा सामान्यज्ञान। येथ नाही आन।
ज्ञेयाचे चिन्ह। आयिक आतां ॥ ४७१ ॥
तरी शब्द स्पर्शु। रूप गंध रसु।
हा पंचविध आभासु। ज्ञेयाचा जो ॥ ४७२ ॥
जैसे येकचि चूत फळे। इंद्रिया वेगळ वेगळे।
रसे वर्णे परिमळे। भेटिजे स्पर्शे ॥ ४७३ ॥
तैसे ज्ञेय तरी येकसरे। परी ज्ञानेंद्रियद्वारें।
घे म्हणौनि प्रकारे। पांचै झाले ॥ ४७४ ॥
आणि समुद्री ओघाचे जाणे। सरे लाणीपासी धांवणे।
कां फळी सरे वाढणें। सस्याचे जेवी ॥ ४७५ ॥
तेंवी इंद्रियाच्या वाहवटी। धांवतया ज्ञानाचे थाटी।
होय ते गा कीरटी। विषय ज्ञेय ॥ ४७६ ॥
एवं ज्ञातया ज्ञाना ज्ञेया। तिही रूप केले धनंजया।
हे (ते) त्रिविध सर्व क्रिया। प्रवृत्ति जाण ॥ ४७७ ॥
जे शब्दादि विषय। हे पंचविध जे ज्ञेय।
तेचि प्रिय का अप्रिय। येकीपरीचे ॥ ४७८ ॥

तेचि–जे. कर्मचि–कर्माची. निःसंदेहे–निःसंदेह. (४६१) तयाचि–ययाचि. (४६२) फोडित–फोडिती. (४६३) आणीत–आणिती. नागवण=लूट, (विषय देशीची सुखदुःख भोगरूपी लूट.) असो–असो इही. वावटे–वोहटे. (४६५) हे जे सांघितले–जे हे सांधितले. येथे–एथ. (४६६) अविद्येचे–अविद्येचिये (४६७) गुढा–गुंडा. मागिले–मागिली. (४६८) ज्ञातया–मग ज्ञातया. (४६९) टाकुनि–ठाकुनि. सिवें–शिंव. सूतसे जे–सूतसे. (४७०) येथ–या बोला. ज्ञेयाचे–ज्ञेयाचेहि. (४७१) जो–तो. (४७२) चूत–चूतक=आम्रवृक्ष (च्यू=गळणे, पडणें. च्युत=भ्रष्ट, पतित) वेगळ वेगळे–वेगवेगळे. (४७३) ज्ञानेंद्रियद्वारे–ज्ञान इंद्रिय द्वारे. पांचौ–पांचे. (४७४) तेवी–तैसे, ज्ञानाचे थाटि–ज्ञाना जेथ ठी. (विषय)–ज्ञय–ज्ञेय. (४७६) ज्ञाता ज्ञान ज्ञया–ज्ञातया ज्ञाना ज्ञेया. हे ते–ते हे. (४७७) शब्दादी–शाब्दादि. येकी परीचे–एक परीचे. (४७८)

जगाची तीन बीजें जी (१) **ज्ञान** (२) **ज्ञाता** (३) **ज्ञेय** तींच मुळीं सर्व कर्माची प्रवृत्ति होय. (४६१)

आतां ह्याच तीन बीजांना वेगवेगळ्या आकाराचें करून ऐकण्याचें कर, हे धनंजया! ह्या तीन बीजांचें आतां स्पष्टीकरण करूं या. (४६२)

जीव हाच जसा सूर्याचे बिंबच एक त्याची श्रोत्र आदिकरून जी पांच इंद्रिये ती किरणें म्हटलीं. तींच मुळीं धांव घेऊन विषयरूपी पद्माची फळी फोडतात. [जीव रूपी सूर्यबिंबाचें कान, श्रोत्र, नयन, रसना, शब्द, त्वचा, गंध, आदि पांच किरणें–ते किरण विषयरूप पद्माच्या कळी (मढ) उमलवितात.] (४६३)

अहो तीं इंद्रियें कशी म्हणावींत तर ह्या जीवरूपी नृपाचे ते घोडेच होत. पण त्यांचे पाठीवर कांहीं खोगिर वगैरे नाहीं असे ते इंद्रियांचे खिंकाळणें घेऊन विषय देशीची हेतूची सुखदुःखें भोगरूपी लूट आणण्याचें करीत असतात जे कां. (४६४)

असे हे असो, ह्या इंद्रियानीं (राहाटते– राहाटावे) राहाटणे जें तेंच कीं ह्या जीवदशेस सुखाच्या कां दुःखाच्या रूपानें भेटतें. व तेंच पुढें सुषुप्तिच्या वेळेस म्हणजे गाढ झोंपेत जेथीलचे जाणणें का **ज्ञान** जीवदशेच्या अहंकारासहित तें ज्ञान तें हातच्या कांकणास आरसा कशास पाहिजे? असें लय घेतें ओसरतें, नाहीसें होतें. जेथें— (४६५)

त्या जीवदशेस जीवास नांव **ज्ञाता** (म्हटलें) होय. व आतां जे कांहीं सांगितले तेंच येथें हे पांडुसुता! **ज्ञान** होय असें जाण. (४६६)

जे कांहीं अज्ञान ते अविद्येच्यापोटी जन्मल्याबरोबर हे कीरीटी! आपणासच मुळीं तीन ठिकाणीं ति–ठायी वांटते. (४६७)

आपल्या धांवेचे पुढें पुढें असेंच होऊन जाणावयाचा विषय हाच दगड–गुढा उभारून–झेंडा घालून (दगड घालून) मागील बाजूस ज्ञात्याला उभे करतें, मागचे बाजूस ज्ञात्याला (तयार करते) तयार ठेवते. (४६८)

व मग ज्ञातयास व ज्ञेयास अशा दोघांना तो नांदणुकीचा व्यवहार–नांदणुक वहिवाटीचा मार्ग, संबंध (ज्ञात होय) दोघामध्यें त्या ज्ञानानें होतो. (४६९)

सकळ पदर्थानां नांव घालते जे पदार्थावर नांव ठेवते जे तेणें ज्ञेयाची हद्द टाकून–ज्ञेयाची हद्द गांठल्यानेंच ज्याची धाव पुरते. (४७०)

असें ते **सामान्यज्ञान** होय–येथें दुसरें कांहींही बोलणें पुरत नाहीं आतां ज्ञेयाचे चिन्ह तें आईक. (४७१)

ज्ञेयाचा तो आभास–भास–शब्द, स्पर्श, रूप, रस गंध असा पंचविध पांच प्रकारचा आहे. (४७२)

जसें एकाच आम्रफळानें इंद्रियांना वेगवेगळ्या प्रकारांनीं रसानें वर्णनें–परिमळानें व स्पर्शानें भेटणें होतें.

[असा हा पांच प्रकारचा आभास–चिदाभास हा बुद्धीनें व्यापून तो निश्चय का निर्णय केला होतो– येथें तो अगोदरचा आभासरूपी भ्रम त्या निर्णय करण्यानें नाहींसा होऊन खरा तो परीणाम का दर्शन–स्पर्शानाचा तो उगवूं लागतो–असा हा चिदाभास व बुद्धि याचा मिलाफ पांच प्रकारांनीं परिमाणात्मक स्पष्ट होतो. जसा आम्रफळाचा चिदाभास ते बुद्धिस व्यापून तेथें परिणती प्रिय आभास आंबा हा शब्द

उच्चारल्याबरोबर शब्दानें कानास समजतो-रसानें जिभेस आवडतो-रंगानें डोळ्यांस प्रसन्न करतो-गंधानें नाकास सुवासाचें सौख्य देतो. व स्पर्शानें त्वचेस प्रियपण देतो.] (४७३)

तसें ज्ञेय हें एकसरच आहे पण त्याचें ज्ञान इंद्रियद्वारांनीं घेतल्यामुळें तें पांच प्रकारचे झाले. (४७४)

ओघ समुद्रीं जाण्यानें शेवटच्या मुक्कामावर गेला. तेथें ओघाचें धांवणे सरतें. धान्यरूपी फळ देण्यानें वाढणें संपतें जसें (फळांनी रस वाढणें ते धान्याचें होणें झाल्यानें जसें). (४७५)

त्याप्रमाणें इंद्रियांच्या-इंद्रियाचा मार्ग वहिवाटिलेला तेथें ज्ञानच आपल्या शेवटास आलें असें तें विषय ज्ञेय होय-वाहत्या वाटेनें-वाटेवर धांवत्या ज्ञानासच जेथें शेवट होतो तेथें तेंच मुळीं हे कीरीटी! विषय ज्ञेय होय. (४७६)

याप्रमाणें ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ह्या तिहींचे निरूपण केलें अशा ह्या सर्व त्रिविधा क्रिया प्रवृत्ति होत त्या प्रवृत्ती जाणाव्यात. (४७७)

हे शब्द आदिकरून जे विषय तेंच मुळीं पंचविध ज्ञेय म्हटलें, तेच एके परीनें प्रिय अथवा अप्रिय असेंच जाण. (४७८)

ज्ञान मोटके ज्ञातया। दावि ना जंव धनंजया।
तंव विश्वाकारा (स्वीकारा की) त्यजावया। प्रवर्तैचि तो ॥ ४७९ ॥
परि मिनाते देखोनि बकु। जैसा निधनाते रंकु।
कां स्त्री देखोनि कामिकु। प्रवृत्ति धरि ॥ ४८० ॥
जैसे खालारा धांवे पाणी। भंवरू फुलाचिये घाणि।
नाना सुटला सांजवणि। वत्सुचि पा ॥ ४८१ ॥
अगा स्वर्गीची उर्वशी। ऐकोनि जेवि मानसी (माणुसी)।
वरत (वराता) लाविती आकाशी। यागाचिया ॥ ४८२ ॥
पै पारिवा जैसा किरिटी। चढला नभाचिया पोटि।
पारवी देखोनि लोटि। आंग सगळे ॥ ४८३ ॥
हे ना घनगर्जना सरिसा। मयोरू वोवांडे आकाशा।
ज्ञाता ज्ञेय देखोनि तैसा। धांवचि घे ॥ ४८४ ॥
म्हणोनि ज्ञान ज्ञेय ज्ञाता। हे त्रिविध गा पांडुसुता।
होयचि कर्मा (स असता) समस्ता। प्रवृत्ति येथे ॥ ४८५ ॥
परि तेचि ज्ञय विपाये। जरि ज्ञातयाचे प्रिय होये।
तरि भोगावया न साहे। क्षणहि विलंबु ॥ ४८६ ॥
नातरी अवचटे। ते विरू होउनि भेटे।
तऱ्ही युगांत वाटे। सांडावया ॥ ४८७ ॥
व्याळा का हारा। वरपडा जालया नरा।
हरिखु आणि दरारा। सरिसाचि उठि ॥ ४८८ ॥
तैसे ज्ञेयी प्रियाप्रिये। देखिलेनि ज्ञातया होये।
मग त्यागस्वीकारी वाहे। व्यापाराते ॥ ४८९ ॥
तेथ रागी प्रतिमल्लाचा। गोसावी सर्वे दळाचा।
रथु सांडुनि पायाचा। होय जैसा ॥ ४९० ॥

तैसे ज्ञातेपणे जे असे। ते ये कर्ता ऐसे दिसे।
जेविते बैसले जैसे। रंधन करूं ॥ ४९१ ॥
का भंवरेंचि केला मळा। वरकलु जाला अंकसला।
नाना देउचि निगाला। देउळाचया कामा ॥ ४९२ ॥
तैसा ज्ञेयाचिया हांवा (हवा)। ज्ञाता इंद्रियाचा मेळावा।
रहाटवी तेथ पांडवा। कर्ता होय ॥ ४९३ ॥
आणि आपण होऊनि कर्ता। ज्ञाना आणी कारणता।
येथे ज्ञेयचि स्वभावता। कार्य होय ॥ ४९४ ॥
तैसा ज्ञानाचिया निजगति (जुगुति)। पालटु पडे गा सुमति।
डोळ्याची शोभा राती। पालटे जैसी ॥ ४९५ ॥
का अदृष्ट जालया उदास। पालटे श्रीमंतांचा विलास।
पुनवेपाठि सीतांश। पालटे जैसा ॥ ४९६ ॥

मोटके=अल्प, थोडे. विश्वाकारा-विश्व आकारा-स्वीकारा कीं. त्यजावया=अहेतुकतेचा होण्यास कां करण्यास त्याग=निर्हेतु, हेतु नसणें, हेतु त्यजणें (अहेतुकतेचे होणे) जसा 'हन्' शब्द अर्थ वैचित्र्याचा तसाच 'त्यज' हा शब्द आहे. (४७९) 'निधान=द्रव्य, ठेवा. कामुक=विषयीं (४८०) खालारा= उतरणीचे उतरणीकडे घाणी=वासावर सांजवणी=संध्याकाळी धार काढण्याच्या वेळेस (४८१) मानसी- माणुसी. वरत-वरता-वराता शिष्या. (४८२) पारिवा=पारवा. (४८३) वोवांडि=उडतो. (४८४) कर्मासम असता-कर्मास अस्ता-कर्मात असतां-कर्मसमस्ता. (४८५) विपाये=कदाचित् (४८३) अवचटे =एकाएकी ते विरू-तेचि विरूद्ध. युगांत=अप्रिय वस्तु टाकण्यास लागणारा काळ युगासारखा लांब वाटतो. (४८७) व्याळा=सर्पाला. वरपडा=प्राप्त. (४८८) ज्ञेय प्रियाप्रिये=प्रिय किंवा अप्रिय ज्ञेय विषय पाहून ज्ञात्याला तसें होते. त्या स्वीकारी-त्याग स्वीकारी. (४८९) रागी=प्रेमी (बरोबरीचा मल्ल पाहून कुस्ती करण्याचें प्रेम येते अशाला); सर्व दळाचा=सर्व सैन्याचा पायांचा होय=पायी चालत जातो, पादचारी होतो. (४९०) वरकल=कसोटी. अंकसला=धातु कसोटीला लावुन त्याची परीक्षा करणारा. (४९२) ज्ञेयाचि हांव=विषयाच्या लालचीनें. इंद्रियांचा मेळावा=इंद्रिय गण. (४९३) कारणतः= अंतःकरणानें. (४९४)

हे धनंजया! शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध असें पंच प्रकारचें 'ज्ञेय' आहे, व तेंच मुळीं एका तऱ्हेनें प्रिय अथवा अप्रिय असें असल्यानें तेथें जें कांहीं थोडेंसें ज्ञान ह्या ज्ञात्यास दाखवीत आहे नाहीं, कीं लगेच मुळीं तेथें त्याचा स्वीकार करावा अशा विचाराच्याठायीं तो प्रवर्ततो-असा विचार वागवूं लागतो-विश्वाकार उगवण्यांस जो कांहीं एक अहेतुकपणाचा विचार असावा लागतो तो तेथें आचरणास आणण्याकरितां प्रवर्ततो व्यवहारतो-वागूं लागतो. (४७९)

अशी ही तऱ्हा वागण्याची प्रवर्तण्याची ती जसा बगळा माशास पाहून प्रवृत्ति धरितो यत्न आरंभ करतो रंक म्हणजे भिकारी जसा निधान-द्रव्य तें पाहून जशी प्रवृत्ति धरितो-वागतो का कामुक रागी तो स्त्री पाहून जशी प्रवृत्ति धरितो-वागणें प्रचारांत आणतो-तशा तऱ्हेचें त्याचें तें प्रवर्तणें, चालणें आरंभ करणें प्रवृत्त होणें, निर्वाह करणें होत असतें. (४८०)

पाणी उतरणीकडे धांवते भ्रमर फुलांच्या वासाकडे धांव घेतो, सांजवणी संध्याकाळी धार काढण्याच्या वेळेस वत्स जसें धांव घेतें. (४८१)

स्वर्गामधील अप्सरा ऊर्वशी ऐकून आकाशास यागाच्या शिड्या लावतात. (४८२)

हे किरीटी ! नभाच्या पोटि चढलेला पारवा तो पारवी पाहून आपले सगळेच्या सगळे आंगच मुळीं पारवीत लोटतो. (४८३)

एवढेंच नाही पण घनगर्जनेबरोबर मोर तर आकाशींच उडूं लागतो, उडतो, तसें ज्ञाता हा ज्ञेय पाहून धांव घेऊन येतो. (४८४)

म्हणून हे पांडुसुता ! ज्ञान ज्ञेय व ज्ञाता असें त्रिविध तेंच समस्त कर्मास प्रवृत्ति म्हटली. (४८५)

पण कदाचित तेच ज्ञेय जर का ज्ञात्याचे प्रिय असें झाले तर ते उपभोगण्यास क्षणाचाहि विलंब साहवत नाहीं. (४८६)

पण अकस्मात जर का ते विहरच एक (का विरूद्ध होऊन) भेटले तर ते (सांडण्यास का) त्यजण्यास तर काळ युगासारखा (लांब) वाटतो. (युगांतच एक होत आहे असें वाटतें ! (४८७)

सर्पाला अथवा हारास भेटलेल्या मनुष्यास तर हर्ष व दरारा एकदमच येऊन असतो. (४८८)

त्याप्रमाणें ज्ञेयाच्या ठायीं प्रियपण अथवा अप्रियपण पहिल्यानें ज्ञात्यास होतें. व मगच त्याग कां स्वीकाराच्याविषयीं तो व्यापारतो ; त्याची हालचाल त्यागासंबंधी का स्वीकारासंबंधीं होऊं लागते. (४८९)

तेथें रागी म्हणजे प्रीतियुक्त प्रेमी जसा बरोबरीचा मल्ल पाहून (प्रतियोद्धा किंवा दुसरा मल्ल पाहून) झुंजायाचें प्रेम येतें. व सेनानायकही बरोबरीचा मल्ल पाहून समोर दुसरा मल्ल पाहिल्याबरोबर पायींचालत जातो पादचारी होतो. [कुस्ती करण्याच्या प्रेमास येतो सर्व (दळभाराचा) सैन्याचा स्वामी जरी, तरीपण रथ सोडून पायाचा होतो दुसरा मल्ल समोर पाहिल्यावर पायीं चालत जातो.] (४९०)

तसें ज्ञातेपणानें जें असतें तें कर्ता अशा दशेस येते (कर्तेपण घेते.) जसें कां आयते जेवणारा तोच मुळीं स्वयंपाकी बनवा. जेविते जे तेंच मुळीं स्वयंपाक करण्यास बसले. (४९१)

## कर्ता-जीव (ज्ञाता) आपण याप्रमाणें कर्ता बनून ज्ञानास साधनता आणतो.

जसें भंवरूनें का भ्रमरानेंच मुळीं फुलांचा मळा करावा बगीचा किंवा फुलांची बाग लावावी-कसोटी पाहाणारा (वरकल) तोच मुळीं धातु कसोटीस लावून परिक्षा करणारा झाला अथवा देवच मुळी देउळाचें काम करण्यास निघाला काम करूं लागला. (४९२)

हे पांडवा ! त्याप्रमाणें (ज्ञेयाच्या हावांनीं म्हणजे) विषयाच्या लालचीनें, कां विषयेच्छेने ज्ञाता जो तोच मुळीं सर्व इंद्रियपण (मेळावा, मिलाफ) राहाटवितो तेथें कर्ताच तो होतो. (४९३)

**व आपण कर्ता होऊन अंतःकरणानें त्या ज्ञानास आणतो ज्ञान हेच क्रियेचे साधन करून** (ज्ञानपणास ज्ञानास येते) **करतो व आतां स्वभावें करूनच (मग तें ज्ञेयच मुळीं कार्य (होय) झालें मग तेथें तें ज्ञेय (विषय) सहजच कार्य होते—** (४९४)

त्याप्रमाणें हे सुमति अर्जुना ! ज्ञानाच्या (युक्तीनें आपल्या) सहज निज गतीनेंच मुळीं पालट घडतो तेथें ह्या डोळ्याची शोभा रात्रीं अथवा द्रव्याच्या देणगीने (राति) जशी पालटते तसें. (४९५)

किंवा, दैव जर कां उदास झालें तर श्रीमंतीचा विलास पालटतो; पूर्णिमेनंतर सीतांशु-चंद्र पालटतो तसा-, चंद्रबिंब पालटतें तसा. (४९६)

**तैसा चाळिता करणें । ज्ञाता वेढिजे कर्तेपणें ।**
**तेथिचीहि लक्षणें । आइक आतां ॥ ४९७ ॥**

तरि बुद्धि आणि मन । चित्त अहंकारू हन ।
हे चतुर्विध चिन्ह । अंतःकरणाचें ॥ ४९८ ॥
बाहेरी (बाह्य) त्वचा श्रवण । चक्षु रसना घ्राण ।
हे पंचविध जाण । इंद्रिये गा ॥ ४९९ ॥
तेथ आंतुले तंव करणे । कर्ता कर्म कर्तव्य घे उमाणें ।
मग ते जरि जाणे । मुखा येते ॥ ५०० ॥
तरी बाहिरिले तियेही । चक्षुरादिके दाही ।
उठोनि लवलाही । व्यापार सुये ॥ ५०१ ॥
मग तो इंद्रिय कदंबु । करविजे तंव राबु ।
जंव कर्तव्याचा लाभु । हातासी ये ॥ ५०२ ॥
ना ते कर्तव्य जरी दुखे । फळेल ऐसेन देखे ।
तरी लावी त्यागमुखें । तेचि (तिये) दाहाही ॥ ५०३ ॥
मग फटे दुःखाचा ठावो । तंव राहाटवी रात्री देवो ।
वियणुअते का रावो ( विकणवाते वाहावोः विकणवाते करा ) । जयापरी ॥ ५०४ ॥
तैसेनि त्याग स्वीकारी । वाहाता इंद्रियाची धुरी ।
ज्ञातयाते अवधारी । कर्ता म्हणिपे ॥ ५०५ ॥
आणि कर्तव्याचा (कर्तयाचा) सर्व कर्मी । आउताचिया परी क्षमी ।
म्हणौनि इंद्रियाते आम्ही । करणें म्हणो ॥ ५०६ ॥
आणि हेचि करणवरी । कर्ता क्रिया जे कां उभारी ।
तिया व्यापे ते अवधारी । कर्म येथें ॥ ५०७ ॥
सोनाराचे बुद्धि लेणें । व्यापे चंद्राकारी (चंद्रकरी) चांदणे ।
का व्यापे वेल्हाळपणे । वेली जैसी ॥ ५०८ ॥
नाना प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षुरसु ।
हे असो अवकाशु । आकाश जैसा ॥ ५०९ ॥
तैसे कर्तयाचीया क्रिया । व्यापले जे धनंजया ।
ते कर्म गा बोलावया । आन नाही ॥ ५१० ॥
एवं कर्ता कर्म करण । यया तिहीचेही लक्षण ।
सांगितले तुज विचक्षण— । सिरोमणि ॥ ५११ ॥
येथ ज्ञाता ज्ञान ज्ञेय । हे कर्माचे प्रवृत्तित्रय ।
तैसे कर्ता, कर्म, (कारण) कार्य । हा कर्म संचयो ॥ ५१२ ॥
वन्हि ठेविला असे धुमु । आथी विजी जेवी द्रुमु ।
का मनी जोडे कामु । सदा जैसा ॥ ५१३ ॥
तैसे कर्ता क्रिये करणि । कर्माची हे आहे जितवणी ।
सोने जैसे खाणि । सोनयाचिये ॥ ५१४ ॥
म्हणौनि हे कार्य मी कर्ता । ऐसे आथी जे पांडुसुता ।
तेथ आत्मा दुरी समस्ता— । क्रियापासी ॥ ५१५ ॥
ययालागी पुढती । आत्मा वेगळाचि सुमती ।
आणि (आता) असो हे किती । जाणसि तु ॥ ५१६ ॥

तेथिचीही–तेथिची तिये. आईक–ऐक (४९७) बाहेरि=बाह्य. (४९९) कर्तव्य घे–कर्तव्या घे. करणे=अंत:करणाने. उमाणे=अटकळ (५००) बाहेरिले=बाहिरिले. दाही–दाहाहि. (५०१) राबु=व्यापार (५०२) दुखे–दुःखें. तेचि दाहाही–तियेचि दाही (५०३) दुखाचा–दुःखाचा रात्री देवो–रात्रि देवो. विकणुअतकारावो–विकणुवाते करावो–विकणवाते वाहावो=फोलकट ते वाऱ्यानें (फुंकाऱ्यानें) उडवावे. (५०४) धुरी=पुढारीपण (५०५) कर्तव्याचा–कर्तयाच्या. आऊताचिया परी क्षमी=आउता सारखा इंद्रियांना राबवितो (क्षमी) करणें=क्रिया साधनें. (५०६) करणवरी–करणेवरी. जे कां–जया–ज्या. (५०७) चंद्राकारी–चंद्रकरी. वेल्हाळपणे=विस्ताराने. (५०८) अकाश–आकाशे–आकाशीं. (५०९) कर्ता कर्म कार्य–कर्ता करण (कारण) कार्य=कर्माचे साहित्य, त्रिपुटी. (५१२) द्रमु–द्रुमु (५१३) क्रिये करणी–क्रिया करणी. कर्माची हे–कर्माचे जितवणी=जीवनोदक, जिव्हाळा. सोनयाचिये–सुवर्णाचिये. (५१४) अथी जे–आथी जेथ (५१५) ययालागी पुढती–यालागी पुढत पुढती. आणी–आतां जाणसि–जाणतासि तु–तूं (५१६)

करणें म्हणजे साधनें–इंद्रिये चालता चालता ज्ञाता तर कर्तेपणानें वेष्टिला होतो. येथें आतां ती तेथीलची लक्षणें आईक. (४९७)

तरी बुद्धि आणि मन, चित्त व अहंकार (बुद्धि, मन, चित्त, अहंकार, असें हे चार प्रकारचे–चिन्ह–अंतःकरणाचें जाण.) (४९८)

बाह्य त्वचा, श्रवण, चक्षु, रसना, घ्राण हीप ंच प्रकारची पंचविध इंद्रियें (आहेत)–जाणावींत. (४९९)

तेथें आंतल्या अंतःकरणानें कर्ता अटकळीनें कर्तव्याचे होणें करतो–कर्तव्य करण्याची अटकळ बांधतो व मग ते सुखाचे येणें झालें असें मानतो सुखाचे झालें का सुखास आलें असें जाणतो. (५००)

तरीपण बाहेरची (बाहिरिली) जी चक्षु आदिकरून दहाहि ती ताबडतोब (लवलाहि) उठून व्यापारास प्रवृत्त होतात. (५०१)

मग तो इंद्रिय कदंब–, इंद्रिय जोडि समुदाय मिलाफा करवि जो व्यापार करविला होतो: तेथें त्या कर्तव्याचा लाभच एक हातास येतो. (५०२)

अथवा ते–येथें आतां कदाचित् ते कर्तव्य जर का दुखवट्यानें फळलें, कां दुःखाचें झालें का दुःखाचे कदाचित् होईल असें जर का देखिलें तर मग त्या कर्तव्याचा त्यागच एक अथवा अहेतुकपणाचा–अगदीं सहजपणानें वर्ज्य करण्याचा धडा त्यांस देतें व दहाही इंद्रियें, आता कर्तव्य तें वर्ज्य करण्यानें तेथें मुखच मुळीं आपलें लावीत नाहींत: ते काम, कर्तव्य, कर्म, कदाचित् दुःख देणारें होईल असें कर्ता पाहिल तर दहाही इंद्रियें तीं मुखवर्जित अशी करतो. तेथें उदास राहातो व आपलें मुख देत नाहीं. दाही इंद्रियाची मुखें त्याग स्वीकारतात. कर्ता, तो विरक्तीची ती मुखें करतो. तेथें तो उपरती स्वीकारतो. (५०३)

ज्याप्रमाणें वाऱ्यानें फलकट उडवावें (व मग कणाची राशीच एक हाती येते। त्याप्रमाणें येथें आतां दुःखाची सीमा ती फिटते नाहींशी होते, अति दुःखाचा डाव माहित झाल्यानें इंद्रियें ही तर रात्रंदिवस व्यापारी राहाटविली होतात, व्यापारामध्येंच इंद्रियें ती तो कर्ता राहाटवितो. (५०४)

अशा तऱ्हेनें त्याग स्वीकारतो अथवा अशा तऱ्हेनें **त्यागामध्यें इंद्रियांची महती वागविणारा जो 'ज्ञाता' त्यास 'कर्ता' म्हणावें**, अथवा कर्तव्याचा स्वीकार केला तरी इंद्रियाचें धुरंधरपण वागविण्यास (का वागविणारा) तो ज्ञाता कर्ता म्हटला होतो, कर्ता म्हणावा. (५०५)

कर्तयाच्या सर्व कर्मामध्यें आउताप्रमाणे समर्थ आहेत, इंद्रियें हीं आणि म्हणून आम्ही त्या इंद्रियानां करणें म्हणजे क्रियासाधनें म्हणूं कीं— (५०६)

कर्त्यानें अगदीं मनापासून, (अंतःकरणापासून) ज्या कांहीं क्रिया उचलिल्या किंवा कामें उभारिलीं होतात (आरंभ तो कर्ता करण्याचें करतो) ती तर व्यापाची अशीच की असल्यानें तेंच येथें **कर्म** जाण. (५०७)

सोनाराच्या बुद्धिनें लेणें अलंकार ते व्यापाचे म्हटले-, चंद्रकर जो सोमकांत त्याच्या व्यापावर चांदणें म्हटलें-वेल्हाळपणाच्या विस्तारानें व्यापून आहे ती वेली म्हटली. (५०८)

(प्रभाकर म्हणजे चंद्र, सूर्य, अग्नि, समुद्र, माणिक रत्न,) आतां प्रभा म्हणजे-(व्या०) नित्य, सबद्ध, आच्छादन, सर्वव्यापी विस्तृत-प्रकाश (तेज-किरण अथवा तेज का किरण, प्रकाश-तेज व्याप्ति-मुळेंच की प्रकाश) म्हटला जाणारा गोडीच एक सर्व तेथें इक्षु रस म्हटले व सर्व अवकाशच जो तें आकाश म्हटलें जसें. (५०९)

त्याप्रमाणें कर्त्याच्या क्रियांनीं [क्रियायोगानीं-तप, स्वाध्याय, ईश्वर प्रणिधान (वापरणे, प्रयोग)] जें हे धनंजया ! व्यापलें आहे तेंच मुळीं **कर्म** जाण-येथें तें कर्म दुसरें तिसरें कांहीं आहे असें बोलणें नाहीं. (५१०)

याप्रमाणें हे विचक्षण ! दूरदर्शी, कुशल असा, विद्वान, का निपुणामध्येंही श्रेष्ठ, अशा हे पार्था ! **कर्ता, कर्म व करण** या तिहींचेही लक्षण म्हणजे गुणवर्णन, खूण, नांव तें तुजला सांगितलें. (५११)

**आतां येथें वर सांगितलें तें (१) ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय हे तिन्ही कर्माची प्रवृत्ति प्रेरणारे आहेत. (२) कर्ता कारण (साधन) कर्म हा कर्माचाच सांठा, संचय आहे, कर्मच कर्ता करण, कार्यरूपानें उदित होते.**

येथें आतां ज्ञाता ज्ञान व ज्ञेय असें हें तीन कर्माच्या प्रवृत्तिपर आहेत व कर्ता, **कर्म** करण कारण कार्य हा कर्मसंचय होय. [**प्रवृत्ति**=प्रगति, कर्तव्य, पुण्यभूमि उज्जयिनी मनाचा कल, प्रयत्न, प्रघात, प्रवाह **प्रवृत्तिमार्ग**=प्रपंचमार्ग] (५१२)

**("यत्र वन्हिस्तत्रधूमः"—न्यायशास्त्र)**

वन्हि तेथें धूम असायचाच, बीज तेथें द्रुम असणारच केव्हांहि [(द्रु-, द्रुम=वृक्ष (द्रु=गमन, गति, जाणे)] मन तेथें काम निरंतर नेहमी जडतोच, जोडतोच. मनाच्या-ठायीं सदासर्वदा काम हा निरंतर असतोच आहे, जडतोच जोडतोच. (५१३)

त्याप्रमाणें कर्ता क्रिया व करणी (**कर्ता**=ब्रह्मा, ईश, प्रजापति. **क्रिया**=यज्ञ, दान, तप, स्वाध्याय ईश्वर प्रणिधान **करणि**=इंद्रियांनीं विषयामध्यें असावें, इंद्रियांना इंद्रियाचा भोग देणें, तें करणीं म्हटलें किंवा मन हेंच निरंतर कामाचें करणें जें का, काम (-मदन इच्छिण्यास योग्य सुंदर वस्तु-) जोडण्याचें करणें जें) त्यानीच कर्माची (जीवित) शोभा, (जीवन उदक का) कां कर्माचा तो जिव्हाळा जाण-सोन्याच्या खाणीस जसें सोनेच एक जीवन वालभ. (उदक जीवित, पाणी, तेज जिव्हाळा जीवितास जोडलेले वालभ सुवर्ण तें तेज एक सर्व जीव गतीचे.) (५१४)

म्हणून हें एक कार्य व मी एक कर्ता असें जें मानणें का पाहाणें हें पांडुसुता ! तेथें आत्मा तर सर्व क्रियापाशी अथवा क्रियेंत आडवला गेल्यानें-दूरच जसा राहिला [त्या क्रियेच्या जवळच मुळीं कीं, तो आत्मा ठेविला अथवा तो क्रिया मार्गेंच की घालवून दिला असें होतें. सर्वथैव त्या क्रियांचाच आत्मा (स्वसर्वस्व) झाला असें होतें.] (५१५)

एवढ्याच करितां वारंवार हें सांगण्याचें करतों कीं आत्मा (आपलेपणा) हे सुमति ! निराळाच वेगळाच आहे कीं, अहो ! पण असें हें किती ही जरी बोललें तरी (पण तुला) हें (ठाऊक आहेच आहे.) तूं जाणतच आहेस, तूं जाणताच आहेस. (५१६)

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥**

ज्ञानं=जाणीव, जाणतेपण, संवेदन, जागतेपण, आपणच एक जे **कर्म**= इंद्रियांना इंद्रियांचे विषय पुरवणें कां न देणें; काम, कृति, करणी. **कर्ता**=ब्रह्मदेव का प्रजापति अथवा ईश का वायुदेव. त्रिधा एव =तीन प्रकारचें होणारे केव्हांहि. **गुणभेदतः**—गुण, लिंग, बुद्धि, कमी अधिक्यता गुणानें गुणांस चमत्कार कमजास्त प्रमाणामुळें. प्रोच्यते गुण संख्याने–गुण संख्यानें प्रोच्यते=गुणाच्या, लिंगाच्या, बुद्धिच्या प्रमाणामध्यें जें कांहीं दुजेपण पाहिलें होणारें तेथें सर्व तें गुणाचें रण बुद्धिनें वाजविण्याचें केलें तेथें योग्य रीतीनें –नियमानुसार–बिनचुक–यथावत्–जें कांहीं जसें कां असेल तसें होणारें तें. प्रोच्यते=(वद+प्र) जाहीर करणें, प्रकाशणें, बोलणें. (गुण) संख्यानें=प्रादुर्भावामध्यें, परीक्षेमध्यें ज्ञानामध्यें, किंमत करणें होणें जें, जाणणें तें. सांख्य=(१) संख्येसंबंधीं (२) तर्कप्रवीण, (३) ज्ञानवान् (४) सर्व जग परमाणुपासून झालें असें मत, यांत फक्त पंचविस तत्त्वें मानतात. (५) तत्वज्ञान (६) संन्यास मार्ग. संख्यान=मोजणे, किंमत करणें, परीक्षणें, ज्ञान, प्रादुर्भाव. तान् गुण संख्यान्=त्या गुण संख्यांना–प्रादुर्भावाना– गुणाचें रण मोजलेलें–तें जसें कां आपणच एक महत्व घेऊन आहे. तें विस्ताराचें विस्तीर्णतेची बुद्धिच मुळीं येथें गुणास आली असें समजून.

अन्वय :—गुणभेदतः ज्ञानं । कर्म च । कर्ता च । त्रिधा एव । यथावत् । गुण संख्यानें प्रोच्यते । तान् गुणभेदान् अपि । श्रृणु ॥ १९ ॥

अर्थ :—गुणाच्या भेदामुळें तसेंच कमीआधिक्यानें, ज्ञान कर्म व कर्ता हे तीन तीन प्रकारचे केव्हांही होणारे असे गुण संख्यानें म्हणजे सांख्य शास्त्रात सांगितलें आहे ते गुण भेदाचे आतां यथाशास्त्र नीट समजून घे. (श्लोक १९ वा ओव्या ५१७–५२८)

**परी सांगितलें जे ज्ञान । कर्म हा कर्ता हन ।**
**ते तिन्हीही तिठाई भिन्न । गुणी आहाती ॥ ५१७ ॥**
**म्हणोनि ज्ञाना ना कर्म कर्तया । पातेजो नये धनंजया ।**
**जे दोन्ही बांधिती सोडावया । येकचि प्रौढ ॥५१८॥**
**तें सात्विक ठाउके होये । तो गुण भेदु सांगो पाहे ।**
**जो सांख्य शास्त्री आहे । उवाइला ॥ ५१९ ॥**
**ते विचारक्षीरसमुद्र । स्वबोध कुमुदिनी चंद्र ।**
**ज्ञानडोळसा नरेंद्र । शास्त्रांचा जे ॥ ५२० ॥**
**कि प्रकृति पुरूषे दोन्हीं । मिसळले देवोरजनि ।**
**ते निवडिता त्रिभुवनि । मार्तंड जे ॥ ५२१ ॥**
**जेथ अपारा मोह राशी । तत्त्वाच्या मापि चोविसी ।**
**उगाणा घेवोनि परेसी । सुरवाडिजे ॥ ५२२ ॥**
**अर्जुना ते सांख्यशास्त्र । पढे जयाचे स्तोत्र ।**
**ते गुणभेदचरित्र । ऐसे आहे ॥ ५२३ ॥**
**जे आपुलेनि आंगिके । त्रिविधपणाचेनि अंके ।**
**दृश्यजात जितुके । अंकित केले ॥ ५२४ ॥**
**एवं सत्वरजतमा । तिहीचा पवढा असे महिमा ।**
**जे त्रैविद्या आदिब्रह्मा । अंती क्रिमी (कृमी) ॥ ५२५ ॥**

**परी विश्वीची अवघी मांदी। जेणे भेद्लेनि गुण भेदी।**
**पडिली ते तंव आधी। ज्ञान सांगो ॥ ५२६ ॥**
**जे दिठी जरी चोख कीजे। तरी भलते चोखचि सुझे।**
**तैसे ज्ञान शुद्धे लाहिजे। सर्वेहि शुद्ध ॥ ५२७ ॥**
**म्हणउनि ते सात्विक ज्ञान। आतां सांगो दे अवधान।**
**कैवल्यगुणनिधान। श्रीकृष्ण म्हणे ॥ ५२८ ॥**

ती–तिही. गुणी = गुणवान् (अ, ए, ओ,–व्याकरणामध्यें). गुण = मूळधर्म, आवृत्ति; (१) गुणवान् (२) मनुष्य पदार्थ इत्यादींचा मूळधर्म (३) उपयोग (४) परिणाम, (५) दोरी (६) वीणा इत्यादीची तार (७) सत्व रज तम प्रत्येकी (८) दिव्याची वात (९) ज्ञानेंद्रिय (१०) रूपादि पंचविषय (११) देह (१२) अंतःकरण बुद्धि, (१३) गौण भाग, (१४) अधिकार, श्रेष्ठत्व (१५) दास (१६) विशेष (१७) 'अ' 'ए' 'ओ' हे वर्ण (१८) माधुर्य, ओज, प्रसाद हे काव्यगुण, (१९) अवस्था (२०) आचारी (२१) भीमसेन (२२) त्याग, (गणि.) त्रिज्या, गुणक, आवृत्ति, पट. **गुणक** = गणिती गुणणारा अंक. **गणक** = मूल्यवान, गणिती, ज्योतिषी, कारकून. (५१७) पातेजो नये = विश्वासूं नये कर्म–कर्मा. प्रौढ = विवाहित धीट, पूर्ण, दाट पूर्णदशेला आलेला. पोक्त वयोवृद्ध, निर्भिड, ३० ते ५० वर्षांची स्त्री. प्रौढपद = आसनावर पाय ठेवून बसलेला (५१८) तै–ते. ठाउके–ठाउवे. उवाइला = विस्तारानें सांगितला. (५१९) ते–जे. (५२०) मिसळले देवो रजनि–मिसळली दिवो रजनी. मार्तंड–मार्तंडु = मार्तांड (१) सूर्य (२) रानडुक्कर. मार्तिक = मातीचे परळ, मातीचे ढेंकूळ. मार्त्य = देहसंबंधी (५२१) दृश्य (ज्ञान = गुरू, ब्राह्मण, नृत्य.) दृश्य = दिसणारें, सुंदर. दृश्य जात = पदार्थमात्र, प्रकार. (५०४) तिहीचा एवढा–तिहींची एवढी. त्रैविद्या–त्रैविध्य. क्रिमी–कृमी (कृमि = किडा, गाढव, लाख, कोळी. क्रिमिजं = आगारू चंदन, लाख. क्रिमि शत्रु = निंब. क्रिमिशात्रवः = खैर. क्रिमिशैल = वारूळ. कृमिलिका = रक्त वस्त्र. कृमिणः = पुष्कळ मुले प्रसवणारी स्त्री. कृमीलक = (१) मटकी, (२) रान मुंगुस (३) समुदायात्मक. (५२५) [(मेह)–पशु = जनावर, गुरु, यज्ञपशु, बलि, बोकड, मूर्ख जीव, शिवाचा गण देव] (५२६) भलते–भलतेही. शुद्ध = निर्मळ, प्रामाणिक, पवित्र, बिनचुक (रूपे) परब्रह्म. शुद्धि = पार्वती. शुद्ध अद्वैत = माया विरहित (शुद्ध) अशा जीव ब्रह्माचे ऐक्य हे मत. शुद्धांतः = अंतःपुर, राजाची स्त्री. शुद्ध जंघ = गाढव. शुद्ध कोटि = काटकोन त्रिकोणाची बाजू. (५२७) म्हणउनि–म्हणोनि. (५२८)

**वर सांगितुलेलें ज्ञान कर्ता आणि कर्म हे तीन तीन ठिकाणीं सत्व, रज, तम ह्या गुणांनीं वेगवेगळे होतात.—**

पण जें कांहीं ज्ञान कर्म सांगितलें तसेंच हा कर्ता जोडला असे हे तिन्हीही तीन तीन ठिकाणीं भिन्न भिन्न गुणांनीं असतात... (५१७)

—असें आहे म्हणून हे धनंजया! कर्म कर्त्याच्या ज्ञाना (गुणा) संबंधी, कर्मकर्त्याच्या ज्ञानाचे (गुणाचे) ठायीं [ज्ञानास अथवा कर्म कर्त्यास कां कर्म करणारा जो कर्ता म्हटलेला त्यास] पातेजो नये–विश्वासूं नये कारण रज व तम हे दोन गुण बंधन करणारे असून एक पूर्ण तो सत्वगुणच सुटका करण्यास समर्थ आहे–जे दोन्ही रज तम ते बांधतात–बंधन करण्याचे करतात व येथें सोडण्यास तर एकच तो प्रौढ (जो तोच समर्थ आहे— (५१८)

—असें तेव्हांच मुळीं) सात्विक (म्हणजे सत्वगुणयुक्त–ते ठाऊक होते ज्यायोगे सात्विक प्रकार (समजेल तो गुणाचा भेद सांगतो हा गुणभेद कपिल सांख्य शास्त्रांत–ज्या शास्त्रांत तत्व गणना संख्येनें केली त्यामध्यें स्पष्ट केलेला आहे. सत्त्व म्हणजे प्राणी प्रकृती स्वभाव, बळ, धैर्य, उत्साह, अस्तित्व, प्राण,

द्रव्य आत्मा, चैतन्य–असा तो गुणाचा भेद प्रकार कमिअधिकपणा तो सांगण्याचें पाहूं या (असा गुणप्रकार –निराळेपणा, फरक, भाव, भेग, भिन्न–भिन्न करणारा का फोडणारा तो अडथळा का विघ्न करणारा) जो सांख्य तर्कतत्त्व ज्ञान, नियम, आज्ञासंबंधी धर्मग्रंथ शास्त्र–शास्त्रानें विस्तारानें सांगितला आहे. सांख्य म्हणजे तर्क प्रवीण तत्त्वज्ञान का संन्यास मार्ग. त्याचें मत असें आहे की सर्व जग हें परमाणुपासून झालें आहे. यांत फक्त पंचविस तत्वें मानिली आहेत. (५१९)

[असें तें सांख्य तत्त्वज्ञान, आज्ञा नियम, तें तर विचाराचा एक क्षीर दुग्ध का उदक–समुद्रच आहे. ते स्वबोध–स्वतःचे, स्वाभाविक ज्ञान देणारा जाणीव, विचार बुद्धि, जागृती, उपदेश, जागे करणें, नांव कुमुदिनी पांढऱ्या कमळ पुष्पांचा समुदाय रूपी चंद्र (कुमुद बांधव) आहे. ज्ञानाचें डोळस असें जे नर (शास्त्र) त्यामध्यें श्रेष्ठ–शास्त्राचा राजा–असें तें आहे, सर्व शास्त्रांचेही नरेंद्र असें नरश्रेष्ठ (सर्वश्रेष्ठ.)]

असें तें सांख्यशास्त्र तर विचाररूपी दुधाचा अथवा उदकाचा समुद्र–आत्मबोधरूपी–राजा–कमळाचा विकास करणारा चंद्र, ज्ञान देणाऱ्या शास्त्रांचा राजाच आहे. (५२०)

तसेंच प्रकृति पुरुष [आदिमाया, मूळस्वभाव, अविद्या, जीवात्मा, व पुरुष म्हणजे नर विष्णू ईश्वर. पुरुषार्थ–धर्म, अर्थ, काम, मोक्ष, यापैकी प्रत्येक] ही रात्रंदिवस मिसळलेली देव व रजनी अविद्या ही त्यांना निवडणारे असें त्रिभुवनामध्यें मार्तंडच एक सूर्यच एक, जें.

स्वर्ग व रात्र हीं दोन्हीं व्यापार करणें, प्रकाश, स्तुति, भुलणें, पीडा, शोक, खुष होणें, इत्यादि तेथें आकाश का स्वर्ग, हे मिसळले असल्यानें तें निवडणें अवघडच एक पण ह्यांना निवडणारे जे मार्तंड–सूर्य [लांछनरहित चंद्र–तापहीन मार्तंड, असें ते सज्जन सदा सोयरे व्हावेत असा एक आशिर्वादच मागितलेला. –ओवी १७९९ अध्याय १८ वा.] (५२१)

–ते तर अपार अमर्याद, उल्लंघण्यास कठिण, अशा मोहराशीमधून चोविस तत्वांना ठाव देऊन परतत्त्वाचें माप घेऊन सुख देतें. (५२२)

अगा अर्जुना ! असें तें सांख्य शास्त्र ज्याचें गुणाचें चरित्र वाचन, अभ्यास, पठंती, साळूंखी म्हणजे आचरण, इतिहास, पढते असें ते गुणभेद चरित्र आहे. (५२३)

जे त्यानें आपल्याच आंगच्या बळानें, आकारानें तीन तीनपणाचें होऊन जेवढें म्हणून दृश्यजात म्हणजें पदार्थमात्रप्रकार ते सर्व आपल्या अंकित केले आहेत, आपल्या स्वाधीन करून ठेविले आहेत. (५२४)

याप्रमाणें ह्या सत्त्व रज व तमाचा ह्या तिहीचा एवढा थोरला महिमा आहे जे का रक्षणच एक ही विद्या ह्या तिहींनी वेधल्यामुळें का भोंक पाडल्यामुळें आदि ब्रह्माहीपण क्रिमीच एक कीं असें म्हटलें; ह्या तीन गुणांनी बनवल्यामुळें का पूजा सत्कार करणें जें तरी पहिला ब्रह्मदेव जो तोहीपण अंती गाढवच एक कां किडाच एक कीं, (५२५)

पण ह्या विश्वामधील जी समुदायात्मक सर्व मांदी ज्या गुण भेदानें भेदल्यामुळें गुण भेदातच–भेद– पशु चतुष्पाद प्राण्याचें होणें जसें–पडिली होते तें ज्ञान अगोदर सांगण्याचें करूं. (५२६)

येथें अहो आपली पाहाण्याची जी दृष्टी ती जरी चोख करावी तरीपण भलतें सलतें तेंहीपण चोख असेंच की समजतें, समजेस येतें समजेस घेतलें होतें त्याप्रमाणें **ज्ञान शुध्दे उदारे प्रसिध्दे देशहीन स्थानहीन असें जें माया ब्रह्म त्यानें सर्व शुद्ध पावणें होतें** ज्ञान हें शुद्ध असें ज्ञान शुद्धि जर उत्तम अशी तर सर्व कांहीं शुद्ध असें परब्रह्मच भेटणारें होतें. (५२७)

म्हणून तें सात्विक ज्ञान आतां सांगण्याचें करू, अवधान लक्ष दे असें शुद्ध मोक्षाच्या गुणांचा सांठाच ठेव, स्थानच एक असें, अहो! कैवल्य गुणनिधान अशा श्रीकृष्णांनी म्हटलें. (५२८)

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥ २० ॥**

एकं भावं अव्ययम् = अविनाशी असा एकच भाव आहे. विभक्तेषु अविभक्तं = निरनिराळे तरी अविभक्त म्हणजे निराळे नव्हेत असे जें एकच ज्ञान.

अन्वय:—येन। सर्वभुतेषु। एकं। अव्ययं। भावं। ईक्षते। (सर्वभुतेषु) विभक्तेषु। एकं। अविभक्तं। यत् ज्ञानं ईक्षते। तत् ज्ञानं। सात्विकं विद्धि ॥ २० ॥

अर्थ:—(१) ज्या ज्ञानाच्या योगेंकरून सर्व भूतांमध्यें एकत्व आहे असा एकच एक एकत्वाचा अविनाशी–अव्यय असा प्रेमा देखिला जातो भाव पाहिला होतो तसेंच भूतांमधील चें विभक्तपण निरनिराळेपण तें अविभक्तपणेंच दिसूं लागतें–पाहिलें होतें तें ज्ञान 'सात्विकज्ञान' होय असें जाण.

(२) ज्या ज्ञानाच्यायोगेंकरून सर्व भूतांमध्यें, एकत्व आहे असा एकत्वाचा अविनाशी प्रेमा (देखणें) देखिल जातो. एकच (अव्यय) अविनाशी असा भाव रूप अर्थ पाहिला होतो. भूतांमधील जे विभक्तपण तें निरनिराळेपण तरी अविभक्तपणेंच–(ऐक्यानेंच एकत्वानेंच) दिसूं लागतें पाहिलें होतें तें ज्ञान '**सात्विक ज्ञान**' (होय असें) जाण. (श्लोक २० वा ओव्या ५२९–५३७)

**तरी अर्जुना गा ते फुडे। सात्विक ज्ञान चोखडे।**
**जयाचां उदयी ज्ञेय बुडे। ज्ञातेनसी ॥ ५२९ ॥**
**जैसा सूर्य नदेखे आंधारे। सरिता नेणिजति सागरे।**
**का कवळिया न धरे। आत्मच्छाया ॥ ५३० ॥**
**तयापरी जया ज्ञाना। शिवादि तृणावसाना।**
**या भूत व्यक्ति भिन्ना। नाडळती ॥ ५३१ ॥**
**जैसे हाते चित्र पाहाता। होय पाणिये मीठ धुता।**
**का चेऊनि स्वप्ना येता। जैसे होय ॥ ५३२ ॥**
**तैसे ज्ञान जेणे। करिता ज्ञातव्याचे पाहाणें।**
**जाणता ना जाणणे। जाणावे उरे ॥ ५३३ ॥**
**पै सोने आटुनि लेणी। न कळती आपुलिया आणि (आयाणि)।**
**कां तरंग न घेपति पाणि। गाळुनि जैसे ॥ ५३४ ॥**
**तैसी जया ज्ञानाची पाहाता। न लगेचि हे दृश्य पथा।**
**ते ज्ञान जाण सर्वथा। सात्विक शुद्ध ॥ ५३५ ॥**
**आरिसा पाहो जाता कोडे। जैसे पाहिजेचि का रिघे पुढे।**
**तैसे ज्ञेय लोटुनि पडे। ज्ञाताचि ते ॥ ५३६ ॥**
**पुढती तेची सात्विक ज्ञान। जे मोक्षलक्ष्मीचे भुवन।**
**हे असो आईक चीन्ह। राजसाचे। ५३७ ॥**

ज्ञातेनसी–ज्ञातेनिसी. (५२९) नेदखे–न देखे. कवळिया–कवळिया = (पड) छाया धरू गेल्यानेही सांपडत नाही. (५३०) तुणावसाना = गवताच्या काडीपर्यंत. (५३१) चेउनि–चेवोनि. (५३२) ज्ञान–ज्ञाने ज्ञानव्याते = ज्ञेयाला विषमाला जाणवे–जाणणे. (५३३) ज्ञानाची पाहता–ज्ञानाचिया हाता. न

लगेचि दृश्य कथा–न म्हणेचि हे दृश्य प्रथा–पथा शुद्ध–गा. (५३५) पाहिजेचि–पाहातेचि. ज्ञेय लोटुनि –ज्ञेय लोटोनि ते–जे. (५३६) आईक–ऐक. (५३७)

**'सात्विक ज्ञान'—**

**"सात्विक ज्ञानाला मोक्ष लक्ष्मीचे भुवन म्हटलें आहे" तें सात्विक ज्ञान स्पष्ट आणि निर्मळ असें उत्पन्न होतांच ज्ञेय ज्ञात्यासह निःशेष होतें ब्रह्मी ऐक्य होतें. ब्रह्मरूप होणे होतें:**

तरी बारे! अर्जुना! हे खरे असें सात्विक शुद्ध ज्ञान होय; ज्याच्या उदयाने–ज्ञातेनसी ज्ञेय बुडते, जाणणाऱ्याच्या भावासहित जाणणें योग्य तें जाणलें होतें. (५२९)

जसा सूर्य हा सर्व प्रकाशच तो आंधारें कांहीं देखत नाहीं–सागर हा परिपूर्ण तो कांहीं नद्या जाणत नाहीं. एका कवळामध्यें (आत्मछाया) पडछाया कांहीं धरतां येणार नाहीं. पडछाया कवळिल्यास का धरू गेल्यास सांपडत नाहीं. (५३०)

त्याप्रमाणें ज्या ज्ञानाच्याठायीं शिव आदिपासून तो गवताच्या काडीपर्यंत ह्या ज्या कांहीं भिन्न भिन्न अशा भूत व्यक्ति त्या भिन्नपणें नसतात, भिन्नपणानें आढळत नाहींत. एकत्वातच सांपडतात. (५३१)

हात काय डोळस म्हणावा? चित्तामध्यें हातच एक दाहाणे कां हातानेंच मुळीं चित्त तें पाहाणें, तेथें कांहींच हातीं येत नाहीं. (उरत नाहीं, दिसत नाहीं.) मीठ पाण्यानें धुतलें तर मीठ उरतच नाहीं, अथवा जागें झाल्यावर जागें होऊन स्वप्नातच आहे असें पाहिलें तर (कांहींच तेथें नसतें.) काहींच हातीं येत नाहीं. (५३२)

तसें ज्या ज्ञानानें जेथ ज्ञातव्याला म्हणजे ज्ञेयाला कां विषयाला पाहाणें तेथें जाणताही नव्हें जाणणेंही नव्हें पण जाणावें असेंच एक उरतें. (५३३)

जसें सोने आटविल्यानें लेणी (कां अलंकार दागीने हे कांहीं आपल्याच बुद्धिनें) आंग काढीत नाहींत (आयणीनें म्हणजें बुद्धीनें इच्छेनें कां तत्व निर्णयानें कळत नाहींत) पाणी गाळून घेतले असतां तरंग कांहीं ते (पाण्यानें घेतले जात नाहींत, पाण्यांत) दिसत नाहींत. (५३४)

त्याप्रमाणें ह्या ज्ञानासंबंधानें विचार केला असतां दृश्य तें पाहाण्यास योग्य असें सुंदर–अशा पथाच्या ज्ञानाची कथा सांगणारे आहे असे नाहीं–ज्ञान हें दिसणारें (कां सुंदर) आहे अशी गोष्टच बोलूं नये. तेथें अहो! असें म्हणूंच नयें कीं एक दृश्य तें दिसणारें सुंदर अशा ख्यातीचे तेथें ज्ञानास एक स्थितीच आली दृश्यतेची असें तें नव्हे. अहो तें ज्ञान तर सर्वथैव '**सात्विकच**' असें शुद्ध होय. निर्मळ होय. (५३५)

आवडीनें अथवा अगदीं सहज कौतुकानेंच जरी आरसा पाहाण्याचें झाले तरी पाहातें तेंच कीं पुढें होतें त्याप्रमाणें विषय म्हणजे ज्ञेय दूर करून कां लोटून देऊन ज्ञाताच तें (पाहाते) ज्ञेय विषय होतें किंवा तो विषयच तो ज्ञाता होतो. (५३६)

वारंवार एक सांगणें करतों कीं, तेंच सात्विक ज्ञान जें मोक्षलक्ष्मीचें भुवन ऐश्वर्य तें होय असें हें असो आतां राजसाचे चिन्ह तें ऐक. (५३७)

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥**

पृथक्विध = निरनिराळ्या प्रकारचें. पृथक्त्वेन = निरनिराळे, पृथक् असें.

अन्वय:—सर्वेषु भूतेषु। पृथक्विधान्। नाना भावान्। पृथत्वेन वेत्ति। यत् ज्ञानम्। तत् ज्ञानं। तु राजसम् विद्धि ॥ २१ ॥

अर्थ:—तसेंच सर्व भूतमात्रांमध्यें-(प्राणीमात्रांमध्यें) असलेलें, असें भिन्न भिन्न अनेकविध भाव (जीव गुण धर्म) ते (पृथक्‌तेनें म्हणजे) वेगळेपणानेंचमुळीं जाणले जातात ज्या ज्ञानानें तें ज्ञान **'राजस'** म्हणावें. (श्लोक २१ वा ओव्या ५३८–५४८)

**तरी पार्था परीयस। ते जाण गा राजस।**
**जे भेदाची कांस। धरूनि चाले ॥ ५३८ ॥**
**विचित्रता भूतांचिया। आपण आतौनि ठिकरिया।**
**बहुचकै ज्ञातया। आणिली जेणे ॥ ५३९ ॥**
**जैसे सांचा रूपा आड। घालुनि विसराचे कवाड।**
**मग स्वप्नाचे काबाड। वैरी निद्रा ॥ ५४० ॥**
**तैसे स्वज्ञानाचिये पौळी। बाहेरि मिथ्येच्या महिखळी।**
**तिही अवस्थेच्या बाहाळि। दाविजे जीवा ॥ ५४१ ॥**
**अलंकारपणें झांकले। वाळा सोने कां वायां गेले।**
**तैसे नामरूपी दुरावले। अद्वैत जया ॥ ५४२ ॥**
**अवतरली गाडुगा (गाडग्या) घडा। पृथ्वी अनोळख जाली मुढा।**
**वन्हि जाला कानवडा। दीपत्वासाठीं ॥ ५४३ ॥**
**का वस्त्रपणाचेनि आरोपे। मूर्खाप्रति तंतु हारपे।**
**नाना मुग्धाप्रति लोपे। दाउनि चित्र ॥ ५४४ ॥**
**तैसी जया ज्ञाना। जाणोनि भूतव्यक्ति भिन्ना।**
**ऐक्य बोधाची वासना। निमौनि गेली ॥ ५४५ ॥**
**मग इंधनी भेटला अनळु। फुलावरी परिमळु।**
**का जळभेदे सकळु। चंद्र जैसा ॥ ५४६ ॥**
**तैसे पदार्थ भेद बहुवस। जाणौनि लहानथोर वेश।**
**आंतले ते राजस। ज्ञान येथें ॥ ५४७ ॥**
**आतां तामसाचेहि लिंग। सांगैन वोळख चांग।**
**डावलावया मातंग। सदन जैसे ॥ ५४८ ॥**

परियस–परियेस. जाण–ज्ञान. (५३८) अड–आड. वैरी–ओपी. (५४०) मिथ्येच्या–मिथ्या. महिखळि–मोहखळी. अवस्थेच्या–अवस्थाचिया. वाहाळी–वाह्याळी (ब्याहाळी=क्रीडा, खेळ) दाविजे–दावी जे. (५४१) बाळा–बाळका. (५४२) गाडगा–गाडग्या. कानवडा–कानडा. (५४३) वासना =आवड. (५४५) भेटला–भेदला. (५४६) वोळख–ते वोळख (५४८)

**राजस ज्ञान—**

*तरी हे पार्था! आतां तें ज्ञान राजस जाण, जें का भेदच एक वाटाड्या करून चालतें: एक जें कमी आधिक्य, त्याचीच मुळीं कांस धरून जें चालतें तें 'राजस' होय.* (५३८)

ह्या भूताभूतांच्या विचित्रता त्या कशा म्हणशील तर आपल्या ठिकऱ्या (अनेकत्व) करून घेतल्या आहेत अशीं भूतें, त्यांनीं तर ह्या ज्ञात्याला चकविणेंच एक करणें होतें भूल पडते, बाळमतीच्या चावटीचें करतें. (५३९)

ज्याप्रमाणें खऱ्या रूपाच्या आड विसराळूपणाचें कवाड का पडदा घालूनच तर स्वप्नाचें असेंच एक काबाडकष्टाचें ओझें तेंचमुळीं निद्रा वैरणें (वोहरणे) करतें–निद्राच एक तेथें घातली होते. (५४०)

त्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या (स्वज्ञानाच्या) भोंवतालच्या, (कोट, तट) भिती कां मंदिरामध्यें तसेंच बाहेर मिथ्या मोहाच्या खळ्यामध्यें, तिन्हीं ह्या बाल, तरूण, वृद्धाप्य, अशा अवस्थाची क्रीडा का खेळच एक असें पारखेंपण–नवखेंपण ह्या जीवांना दाखवितें जें. (५४१)

अलंकारपणानें जें झांकले आहे पण बालकास ती जीवनरूपी सुवर्णाची–ती सोन्याची दृष्टी नसल्यामुळें तें अलंकारपण वायांच गेलें जसें; त्याप्रमाणें अद्वैत तेंच मुळीं नामासाठीं कां रूपासाठींच मुळीं दुरावलें झालें आहे ज्यांनां. (५४२)

(पृथ्वी गाडगी का घडे अवतरली)–पृथ्वी जशीं का गाडग्याच्या का घड्याच्या रूपानें अवतीर्ण झाली आहे, पण मूढास तर त्या पृथ्वीची ओळखच नाहीं. पृथ्वी अनोळखीची झाली. अहो! वन्हि जो तो तर, दिवा लाविला कीं, अग्निची ओळख विसरतो दिव्यास अपरिचित मानतो. (दिपत्वानेंच मुळीं वन्हि, अग्नीस विसरतो.) (५४३)

अथवा वस्त्रपणाच्या आरोपावरच की तंतू जो तो मूर्ख मुळीं पाहात नाहीं. येथें तंतूच मुळीं तो मूर्ख हारवून बसतो; अथवा मुग्धास तर चित्र दाखवून पटत्व लोपतें–(दूर होतें–हारपतें पट जे ते लोपलें होते.) भोळयास, मुग्धास चित्र दाखवून योगपटत्व तें लपतें.

वस्त्रपणाचें झाड लावून वस्त्रपणाचा बोजा लादून (वस्त्रपण चढवून, वस्त्रपणानें, नसता गुण कल्पून वस्त्रपणानें, ऐक्य मानून वस्त्रपण ठेऊन) तंतू जो तो तर मूर्खास हारपला होतो–नाहींसा होतो. (मूर्खपण जे तेथें तंतू दिसतच नाहीं. जसें कां (गोंधळलेला घोटाळलेला, मूर्ख भोळसर अथवा) तरूण व सुंदर (रम्य मनोहर, नवे सुरस) त्यास तर एक रम्य मनोहर चित्र दाखवून पटत्व तें वस्त्रपण तें लोप पावतें. (५४४)

त्याप्रमाणें ज्या ज्ञानास (जाणतेपणास) जाणून भिन्न भिन्न भूतव्यक्ति भिन्नभिन्नच आहेत असें समजल्यामुळें एकत्व तें (बोध अथवा ऐक्यज्ञान बोधाची ती आवडच मुळीं) निमून गेले कीं, जग हें विचित्र भासलें अथवा भूतें ही व्यक्ती व्यक्तींनी भिन्न जरी दिसली **तरी ज्ञान म्हणून जें आहे तें तर (सर्वांठायीं) एकच आहे. तरी भूत पृथकत्व भिन्नतेमुळें ऐक्यबोध आवड निमती झाली** ("एकचि ज्ञान असें। ज्ञान असें। विचित्र जग जरि भासे"–**पंचदशी**) (५४५)

त्यामुळें (इंधनामध्यें अनल भेटला) इंधनाच्याठायीं असलेला अग्नि तो तर भेदला गेल्यामुळें, अग्नि तो एकच तरी तेथें अनलपण तें भिन्नभिन्न असेंच समजल्यामुळें तेथें अग्नि का अनल (ऐक्य बोध–ज्ञान सूर्य) तो भेटला नाहीं असें मानलें होतें–अथवा इंधनानें अनल भेदला नाहीं असेंच मानणें झाल्यानें देहबुद्धीची कष्टाची ती काबाडेंच मुळीं अज्ञानाचा बोजा लादला अशीं होतात; फुलांफुलांवर परिमळ तो, पण फुलाचें भिन्नपण मानल्यामुळें परिमळाचें तें ऐक्यबोधाचें आवडणें तें निमलें गेलें. जळ हें भिन्न भिन्न मानल्यामुळे चंद्र जो परिपूर्ण असा आंवसेच्या ठायीचा तो तर नेहमीं कलाचा असाच आहे असेंच मानलें होतें (कलाकुसरीचा आहे–तीन काष्ठाचा कलाचा जसा अंशतः आहे सोळा भागाचा आहे थेंब थेंबाचा आहे असें जल मानून तेथें चंद्र तोहीपण तसाच अंशा अंशाचा आहे असें मानलें. चंद्राचे किरण तेच मुळीं चंद्र असें मानलें; मूर्ति देहजल भेदाभेदाचे तेथें देह जलातील तो चंद्रही पण देह (मूर्तिच ऐक्यबोध नच मानून तेथें भागाचे ते देह) भिन्न मानल्यामुळें ज्ञानबोध आवड तीच नाहींशी झालीं. सकाळ झाली. सूर्य उगवला तेथें ऐक्यबोधच जसा एका सूर्यानें पुढें केला.

इंधनीं अग्नि भेटला फुलांमध्यें सुगंध–सुवास पाहिला जळामध्यें चंद्र देखिला (येथें वायू व आकाश ह्या पंचतत्वामधीलची ती, तर ह्या मनुष्य देहानेचमुळीं मनुष्य अशीं आकारास आलेली नामरूपाची झालेली). (५४६)

**पदार्थाचे जे पुष्कळसे लहान मोठया आकृतीनी भेद दिसतात–याचें आंतलें 'कारण राजस ज्ञान' होय–'सर्व भिन्नता राजस ज्ञानाचा परिणाम—'**

त्याप्रमाणें पदार्था पदार्थाचें बहुवस, अनेक असे, भेद प्रकार जाणून, तेथें लहान अथवा थोर असें वेश का वेष नटलेले जे ते येथें '**राजस ज्ञान**' जाण. (५४७)

आतां अज्ञानाचे म्हणजे दुःसाध्य, कठिण, असे तामसाचेही व्यक्ति व्यक्त–चौथा मनु–तामस–तमोगुणी लिंग तें सांगतो तें चांगलेपणानें ओळखः स्त्रीपुरूष भेद ज्ञानसाधन चिन्ह, खुण हेतु, ते एक डावलणेंच जसें मातंग सदन जाण. [सद्=सभा. सद=फळ. सदन= पाणी, घर. सदशक=खेंकडा. (हत्ती वनचर, श्रेष्ठ–बलाहक) मातंग मकरः=महामत्स्यविशेष.] (५४८)

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।**
**अतत्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

कृत्स्नवत्=सर्ववत् पाणीवत्. एकस्मिन्कार्येसक्तम्=एकाच कार्यरूपी देहामध्यें अविरत आडविलेला, चिकटलेला, आसक्त. अहैतुकम्=[अहे (है) तुक=तर्कशून्य, तर्काला अगोचर] निःस्वार्थ. अहेतु==निमित्तरहित, सहज. अहे=निंदा, खेद, पृथक्करण इत्यादि अर्थी. तुक=तुलना. (असत्=ग्रह, खोडी गैरसमज असत् ख्यातिः=नसलेलें आहेसे भासणें अतत्वार्थवत्=(**तत्त्व**=सत्य, मूलतत्व, परमात्मा, मन्, शरीर, देवता, मंद, मंद, नृत्य, खरें स्वरूपः **अर्थ**=हेतु, इच्छा, ध्येय, कारण, दृश्य, ज्ञेय,–वस्तु, भावार्थ, मतलब, द्रव्य, प्रकार, पुरुषार्थ,) असत्य हेतु पुढें घेऊन, नच खरें स्वरूप, असा मतलब ठेवून, अन्ईश्वर प्रकार वाद देवता नाहीं, असें कारण हेतू घेऊन मूळ तत्वच नाहीं येथें असा एक करण पुढें घेऊनः अल्पंच–अल्प=थोडें विरळ, क्षुल्लक, तरुण. उदाहृतम्=नांव दिले, म्हटलें जाहीर केलें, उच्चारलें, सांगितलें.

अन्वयः—(१) यत् तु एकस्मिन्कार्ये कृत्स्नवत्–सर्ववत् अहैतुकम् सक्तम् अतत्वार्थवत् (अहैतुकम् सक्तम्) च (अतत्वार्थवत्) अल्पं तत् उदाहृतम् तामसम् ॥ २२ ॥

(२) एकस्मिन् कार्ये अहैतुकम् कृत्स्नवत् सक्तम् अतत्वार्थवत् यत् अल्पं तत् च तामसम् उदाहृतम् ॥ २२ ॥

अर्थः—(१) सर्व कांहीं येथेंच ह्या एकाच कार्यरूपी देहामध्यें सर्ववत् सांठविलेलें आहे तेथेंच जो आसक्तिनें आडविलेला, निंदा, खेद पृथक्पणा इत्यादिनीं तुकिलेला, असत्य, हेतू पुढें घेऊन चालणारा, तत्त्व कसचें न् काय तेथें खरें स्वरूपच नाहीं. असा मतलब ठेवून अन् ईश्वर वाद प्रकाराचा झालेला, देवता नाही असें कारण पुढें घेऊन मूलतत्त्वच नाहीं जेथें, तेथें महत्त्व तें कसचें! असें एक कारण का (कु) हेतु पुढें घेऊन असलेला, नेहमीं क्षुल्लकताच एक मानणारा, विरल कोठें आहे कोठें नाहीं असें थोडें, तरूण अल्प जे, ते '**तामस**' असें नांव दिलेलें होय.

(२) जें ज्ञान, कार्यरूप एका शरिरांतच, सर्वस्व सांठविलें आहे–असेंच मानलें व मानून असतें. तेथेंच आसक्त असणें केलें आहे. व युक्तिरहित युक्तीहीन तत्वार्थरहित असें तुच्छ असतें, तें '**तामस-ज्ञान**' म्हणतात. (श्लोक २२ वा ओव्या ५४९–५८५)

तरी कीरिटी जे ज्ञान। हिंडे विधीचे वस्त्रेहीन।
श्रुति पाठिमोरी नग्न। म्हणौनि तया ॥ ५४९ ॥
येरी ही शास्त्र वटकरी। जे निंदेचे (इटाळ) विटाळवरी।
वोळविले असें डोंगरी। म्लेंच्छ धर्माचां ॥ ५५० ॥
जे ज्ञान ऐसे। गुणग्रहेतामसे।
घेतले भवे पिसे। होवोनिया ॥ ५५१ ॥
जे सोयरिके बाधु नेणे। पदार्थी निषिद्ध न म्हणे।
निरोविले जैसे सुणे। सुनागांवीं ॥ ५५२ ॥
तया तोंडी जे नाडळे। का खाता जेणे तोंड पोळे।
तेचि येक वाळे। येर घेणेचि ॥ ५५३ ॥
सोने चोरिता उंदिरू। न म्हणें थर विथरू।
नेणे मांस खाईरे। काळे गोरे ॥ ५५४ ॥
नाना वनामाजी बोहरी। कडसणी जेवी न करी।
का जित मेले न विचारी। बैसता मासी ॥ ५५५ ॥
अगा वाता वाढलिया। साजुक का सडलिया।
विवेकु काउळिया। नाही जैसा ॥ ५५६ ॥
तैसे निषिद्ध सांडुनि जावे। का विहिता आदरे घेयावे।
हे विषयाचेनि नावे। नेणेचि जो ॥ ५५७ ॥
जेतुले आडपडे दिठी। तेतुले घे विषयाची सांठी।
मग ते स्त्री द्रव्य वाटी। शिस्नोदरा ॥ ५५८ ॥
तीर्थ अतीर्थ हे भाष। उदकी नाही वोळख।
तहान वोळे ते सुख। वांचोनिया ॥ ५५९ ॥
तयाचि परि खाद्याखाद्य। न म्हणे निंद्यानिंद्य।
तोंडा आवडे ते मेध्य। ऐसा बोधु ॥ ५६० ॥
आणि स्त्रिजात जितुके। त्वचेंद्रियेचि वोळखे।
विषय विषी सोयरिके। येकुचि बोधु ॥ ५६१ ॥
पै स्वार्था जे उपकरे। तयाचि नाव सोयरे।
देह बंधु न सरे। जये ज्ञानि ॥ ५६२ ॥
मृत्यूचे अघवेचि अन्न। आघवेची आगी (अंगी) इंधन।
तैसे जगचि आपुले धन। तामस ज्ञाना ॥ ५६३ ॥
ऐसेनि विश्व सकळ। जे विषोचि मानिले केवळ।
तया येक जाणोनि फळ। देहभरण ॥ ५६४ ॥
आकाश पतिता निरा। जैसा सिंधुचि येक थारा।
तैसे कृत्यजात उदरा— । लागीचि बुझे ॥ ५६५ ॥
वांचुनि स्वर्ग नरक अर्थी। तया हेतु प्रवृत्ति निवृत्ति।
हे अघवेचि राति। जाणिवेची ते ॥ ५६६ ॥
जो देहेखंडा नांव आत्मा। ईश्वरू पाषाण प्रतिमा।
या परौति प्रेमा। ढळो नेणे ॥ ५६७ ॥

विधीचे–विधीचेनि. श्रुति पाठमोरी=तामस ज्ञानाला नागवें पाहून, श्रुति माउली तोंड फिरवते. (५४९) शास्त्रबटकरी–शास्त्रबटिकरी=श्रुतीच्या दासी–बटिकरी–जी शास्त्रें त्यांनीं ही, निंदेचे दगड (इटाळ –विटाळ–) मारून ज्याला म्लेंछ धर्माच्या डोंगरावर हांकून दिलें आहे. (५५०) जे–जे गा. गुणग्रहे तामसे=जें असें तामस ज्ञान तें तर तसें गुणरूप आग्रहे–आग्रहानें ब्रह्मराक्षसाचा संचार होऊन जें वेडें होऊन भटकतें (भंवे–भोंवे) (५५१) निषिद्ध–निषेधु. सोयरिके बाधु नेणे=शरीरसंबंधी अडचण मानीत नाहीं. सुना गांवी–शून्य ग्रामी. जेणे तोंड पोळे–जेणे पोळे. निरोविले–निरोपिले सुणें=सोडून दिलेलें कुत्रें. (५५२) वाळे=सोडते. (५५३) थरविथरू=चांगले वाईट. मांस खाईर=मांस खाणारा. (५५४) बोहरी–बाहरी=वणवा. कडसणी=विचार. (५५५) वांता=ओकलेल्या. भाष–भाख. (५५६) वोळख–अनोळख. तहान–तृषा. (५५९) मेध्य=पवित्र. (५६०) विषयविषी–तियेविषयीं. (५६१) स्वार्था जे उपकरे तयाचि नाव (नाम) सोयरे (सोयिरे)=स्वार्थाला जे साधक ते सोयरे, देहबंधु–देहसंबंधु (५६२) अंगी–अगी–आगी. (५६३) जे विषोच्चि–जेणे विषयोच्चि. जाणोनि फळ देहभरण–जाण फळ देह भरण =पिंडाचे पोषण. (५६४) अर्थी–आथी. हे अघवेचि–इये अघवियेचि. (५६६) देहखडा नाव आत्मा =परिछिन्न देहालाच आत्मा–, देह तोचि देव–मानतात. प्रेमा–प्रमा=बुद्धि. (५६७)

**तामसज्ञान—**

## तामस ज्ञनाला मातंग सदन म्हटलें:—

करितां अगा हे कीरिटी! जें ज्ञान टाळण्यासाठीं मातंग सदन म्हटलेलें, त्याला विधीचे वस्त्रहीन असें नागवें पाहून श्रुति माउली तोंड फिरविते. (५४९)

श्रुतीच्या दासी (बटिकरी ज्या) जी अशी शास्त्रें धर्मग्रंथरचना त्यांनीहीपण शास्त्र बहिष्कृत करून शास्त्रावर बहिष्कार चालून निंदेचे दगड (इटाळ–विटाळ, विटाल) मारून त्याला म्लेंछ धर्माच्या डोंगरावर हांकून दिलें वोळविलें. (५५०)

अगा असें जें ज्ञान तें तर तमोगुणरूप आग्रह गुणरूपी पिशाच्चानें संचार होऊन जें वेडें (भंवे–भोंवे) होऊन भटकतें. (५५१)

जें देह सोयरिके संबंधी–शरीरसंबंधाविषयीं अडचण मानीत नाहीं. (खाद्यपेय) पदार्थाचेठायीं निषेध मानीत–(म्हणत) नाहीं–जसें कां ओस गांवामध्यें मोकळें सोडून दिलेलें कुत्रेंच एक, (५५२)

त्याच्या तोंडी जे पडत नाहीं, (आढळत नाहीं), अथवा खातानां ज्यायोगें (तोंड) पोळतें, तेवढेंच काय तें तें टाकतें–(वाळे) बाकी इतर सर्व कांहीं तें घेणेंच करतें. (५५३)

अहो! उंदरानें जेव्हां का सोनें चोरणें होतें तेव्हां (थरविथरू) चांगलें वाईट असें तो म्हणत नाहीं. मांस खाणारा (खाईरा) कांहीं काळेंगोरें जाणत नाहीं. (उदकातील काळेगोरें निवडणें नाहीं जसें.) (५५४)

वनास आग कां वणवा लागलेला तो जसा कांहीं विचार करीत नाहीं–, माशी बैसतांना, जिवंत आहे का मेलेलें आहे (असा कसलाही विचार कां विचारणें करीत नाहीं.) (५५५)

अहो! ओकलेल्याविषयीं अथवा वाढिलें पुसिलें आहे जें त्याविषयीं, नाजुक का सडलेलें आहे, असा विचार कावळयास नसतोच. (५५६)

तसें निषिद्ध तें सोडावें, का त्यजावें, अथवा विहित योग्य ते, आदर देऊन घ्यावें; असें विषया-संबंधी (विषयाच्या नांवा-विषय म्हटलेत जे त्याविषयी) जे जाणतच नाहींत. (५५७)

जेवढें कांहीं त्याची दृष्टि आडविणारें होतें तें सर्व कांहीं विषय म्हणूनच घेण्याचें करतेंच व मग ते स्त्रीद्रव्य–बुद्धिमत्त–धन–शिस्नोदरपरायणांना वाटण्याचे करिते. (५५८)

तीर्थ आहे का अतीर्थ आहे असें बोलणें भाष कां कांहीं ओळखी उदकाचे ठायीं नाहीं; तहान, तृष्णा, ज्यायोगे भागेल तेच घेते तेथेंच वांचुनि सुख असेंच ते. (५५९)

त्याचप्रमाणें खाद्य आहे का अखाद्य आहे हें पाहात नाहीं, निंद्य का अनिंद्य असें म्हणत नाहीं. तोंडास जें कांहीं आवडेल तेंच मुळीं पवित्र, अशी त्याची बुद्धि असते, (ऐसाचि बोध.) (५६०)

तसेंच स्त्रीजात (समुदाय, प्रकार, पदार्थमात्र,) तितके सर्व त्वचा इंद्रियानेंच मुळीं तो वोळखतो–तिज स्त्रीजातीविषयीं–विषयविषयीं–साधक सोयरीक करण्याकरितां अति सादर तेथें असतो. (५६१)

तसेंच, जें कांहीं आपल्या कामीं कामास येतें, जें स्वार्थाला साधक तेंच की सोयरे (त्यासच नाव सोयरे) अशा ह्या ज्ञानामध्यें कांहीं तेथें देहबंध (देहाचा बंध अथवा संबंध) कांहीं आड येणारी नाहीं. (५६२)

अहो! अहो अवघें अन्न, भक्षणीय पदार्थ तेथें मृत्यू आहेच=आगी जी तिचेंच मुळीं सर्व इंधन त्याप्रमाणें तामस ज्ञानास जग हे आपलेंच धन आहे असें वाटतें. (५६३)

अशा ह्या विचारांनीं ज्यानें सकळ हे विश्व केवळ विषयच एक होय असें मानिलें आहे त्यास तर एकच तें फळ तें म्हणजे पिंडाचें पोषण–, देहभरण होय. (५६४)

आकाशातून पडलेल्या पावसाच्या थेंबास का पाण्यास सिंधूच एक मुळीं थारा होय त्याप्रमाणें कृत्यजात कार्यजात हेतुजात प्रकार जेवढें म्हणून आहे तेवढें सर्व उदराकरितांच म्हणजे पोटासाठींच आहेत असें ते समजते. (५६५)

स्वर्ग का नरकच, असें जें कांहीं तेथें हेतु तो प्रवृत्ति की निवृत्ति, ह्यासंबंधीं जाणण्या नेणण्याची अवघी सर्व एक रात्रच एक सर्व अज्ञान की. (५६६)

तामस ज्ञान तें देहखंडा–नाम आत्मा–परिछिन्न अशा देहालाच आत्मा मानतें देह तोचि देव–म्हणते ईश्वर तो तर पाषाणाची एक प्रतिमा होय. याशिवाय दुसरी कसलीही गोष्ट नाहीं. यापरती ती प्रमा बुद्धि ढळूं यावी असें तो जाणत नाहीं. (५६७)

**म्हणौनि (म्हणे) पडिलोनि शरीरे। केलेनसी आत्मा विसरे।**
**मा भोगावया उरे। कोण वेपे?॥ ५६८॥**
**ना ईश्वरू पाहाता आहे। तो भोगवी हे जरी होये।**
**तरी देवचि खाये। विकोनिया॥ ५६९॥**
**गांवीचे देउळेश्वर। नियामकचि होती साचार।**
**तरी देशीचे डोंगर। उगे का असती॥ ५७०॥**
**ऐसा विपाये देवो मानिजे। तरी पाषाणमात्रचि आणिजे।**
**आणि आत्मा तंवचि म्हणिजे। देहातेचि॥ ५७१॥**
**येर पाप पुण्यादिके। ते अघवेचि करूनि अटिके।**
**हित मानी अग्निमुखें। चरणे जे कां॥ ५७२॥**
**जे चामाचे डोळे दाविती। जे इंद्रिये गोडी लाविती।**
**तेचि सांच हे प्रतीती। फुडी जया॥ ५७३॥**
**किंबहुना ऐसी प्रथा। वाढत देखसी पार्था।**
**धुवाची वेली वृथा। आकाशी जैसी॥ ५७४॥**

**कोरडा ना वोला । उपेगा आथीं गेला ।**
**तो वाढौनि मोडला । भेंड जैसा ॥ ५७५ ॥**
**नाना का उसाची कणिसे । का नपुंसके माणुसे ।**
**वन लागले जैसे । साबरियेचे ॥ ५७६ ॥**
**नातरी बाळकाचे मन । का चोराघरीचे धन ।**
**अथवा गळा जाले स्तन । सेळियेचे ॥ ५७७ ॥**
**तैसे जे वायाणे । वोसल (वोसाळ) दिसे जाणणे ।**
**तयाते मी म्हणे । तामसज्ञान ॥ ५७८ ॥**
**ते ज्ञान या भाषा । बोलिजे तो भावो ऐसा ।**
**जात्यंधाचा का जैसा । डोळा वाडु ॥ ५७९ ॥**
**बधिराचे नीट कान । अपेया नांव पान ।**
**तैसे आडनाव ज्ञान । तामसा तया ॥ ५८० ॥**
**हे असो किती बोलावे । तऱ्ही ऐसे ते देखावे ।**
**ते ज्ञान नव्हे जाणावे । डोळस तम ॥ ५८१ ॥**
**एवं तिही गुणी । भेदिले इही लक्षणी ।**
**ज्ञान श्रोतृ सिरोमणि । दाविले तुज ॥ ५८२ ॥**
**आता ययाचि त्रिप्रकारा । ज्ञानाचेनि धनुर्धरा ।**
**प्रकाशे होती गोचरा । कर्तयाच्या क्रिया ॥ ५८३ ॥**
**म्हणोनि कर्म पै गा । अनुसरे तिही भागा ।**
**मोहरे जालया वोघा । पाणी जैसे ॥ ५८४ ॥**
**तेचि ज्ञानत्रैवशे । त्रिविध कर्म असे ।**
**तेथ सात्विक तंव ऐसे । परिस आधी ॥ ५८५ ॥**

म्हणौनि–म्हणे. केलेनसी–केलेंनिसी. विसरे=केलेल्या कर्मासहित आत्मा नाहीसा होतो, नाश पावतो, विसरला जातो. (फक्त एक विसारच दिला जातो.) विसरला होतो. (५६८) अहे–आहे. विकोनिया–विकूनिया. (५६९) देउळेश्वर–देवळेश्वर. डोंगर उगे कां असती=मूर्ती त्या त्या डोंगरावरच्या दगडाच्या घडवितात, ते डोंगरचमुळीं शासनकर्ते कां होत नाहींत. (५७० ) देवो–देव. (५७१) अटिके –लटिके. (५७२) प्रथा=प्रख्याती, स्थिती. वाढत–वाढती. धुवाची–धूमाचीः केली–वेलीः आकाशे–आकाशीं. (५७४) उपेगा–उपयोगा. अथी–आथी. भेंड–भेंडू. (५७५) नाना का–नाना. साबरीचे–साबरियेचे=शेराचे अथवा पोकळ निरूपयोगी झाडाचे. (५७६) गळा जाले स्तन–गलस्तन. (५७७) वायाणे=व्यर्थ. वोसळ–वोसाळ=शून्य, ओशाळ, निस्तेज. (५७८) ते–तेही. या–इया. (५७९) बधिराचे–कां बधिराचे. नांव–नाम. (५८०) ते–जे. नव्हे–नोहे. डोळसा–प्रत्यक्ष. (५८१) भेदिले इही –भेदले यया. श्रोते–श्रोतृ. (५८२) ययाची–याचि. कर्मा–कर्म. अनुसरे–अनुस्वरे–[स्वर=हाळपते, बाग, हारः स्वर्=हाळपते, बाण,] स्वर=वर्ण मोहरे=मार्गास लागलेले. जालया–जालिया. पाणी–तोय. (५८४) त्रैय–त्रय. असे–जे असें (५८५)

या कारणास्तव अथवा तो असें म्हणूं करतो कीं, देह पडल्यानंतर केलेल्या कर्मासहितच मुळीं आत्मा तो विसरला होतो. (पण कर्म केलेलें जें, त्यानें तर आत्म्यासच मुळीं विसार दिला, तेथें ईश्वरत्व आपलें तें कुणी जाणावें असेंच पुढे घेतलेलें, स्वतःची किंमत करणें जें तेथें स्वमहत्त्व तें कुठें व कसें असेल याचा

विचारच नाहीं.) व मग तेथें तें केलेलें कर्म भोगण्यास कोण तो कोणत्या वेशानें बरें उरतो कां असणार! (५६८)

ईश्वर तो तर आहेच आहे व कदाचित् ईश्वर तो आहेच म्हणावा तर कां पाहिला असतां आहे व तो भोगवितो असें जरी मानलें का झालें, का व्हावें तर मग अहो! देवच तो विकून टाकून खाण्यापिण्याचा केला असे करतो. (५६९)

गांवचे देव (देउळ ईश्वर) ते तर नियामक असेंच केव्हांही म्हणण्याचें केलें ते देवळेश्वर नियामक (म्हणजे सुकाणुवाला, डोलकाठीवरून पहारा करणारा, नावाडी सारथी, शास्ता, सभ्य, गुरु, नियंता, निवारक असें वर्तन नियमानें असणारे, सद्वर्तनाचे शिष्टधाराचे चालरीतीचे, अन्न प्रावर्णाचे, खरेपणाचे, सहित, समान, सदृश्य, असतील तर मग, कां) आहेत म्हणावेत तर मग त्या मूर्ती ज्या डोंगरावरच्या दगडाच्या (घडविलेल्या) घडवितात ते डोंगरचमुळीं शासनकर्ते कां होत नाहींत–ते उगेच कां असतात, ते स्तब्ध असें कां असावेत. (५७०)

अथवा असाही जरी कदाचित् देव मानिला तरी मग तो तर पाषाण मात्रच जाणावा नां? तो देव पाषाण (दगडाच्या का लहानशा धोंड्याच्या परिमाणाचा पाषाण) इयत्तेचा कां पाषाण प्रमाणाचा (लहान अथवा सूक्ष्मांशाचा, इंद्रियाचे विषय का पदार्थाचा–पाषाणासारखेच विकाराचा कां रूपांतराचा बुद्धिचा–कर्णभूषणांचा, इंद्रिय वृत्तीचा–'ऐ' इत्यादि अक्षराची मात्राच एक) असाच कां मानूं नये बरें! (पाषाण चतुर्दशी–मार्गशीर्ष शु॥ १४, गौरीव्रत. पाषाण अंतक=आपटा. पाषाण कदली=रान केळ.) दगडच एक अशाच मापाचा का मर्यादेचा तो (म्हणावा कीं, जाणावा कीं,) व मग आत्मा तो तर देहच म्हणावा नां! (५७१)

इतर दुसरी जी कांहीं पापे का पुण्यें आदिकरून केलेलीं तीं (सर्व फिरणें एक केलेलें का भटकणेंच एक करून) लटिकी–लटिकें असेंच म्हणणें करून एक अग्निमुखानें चरणें तेवढेंच मुळीं हिताचें असें मानणें करतो ना! (मुख, अग्नि, ब्राह्मण, ब्राह्मणत्वें–अग्निहोतृत्वे का देवत्वानें चरणें, खाणें, वागणें, जाणें, सजीवता. (चरू चारूस्थली होमार्थ शिजविलेला भात) तेवढेंच एक हित असें उपयुक्त, पथ्यकर, इष्टसाधक, फायद्याचें असें कल्याणच एक मानतो. (५७२)

त्वगिंद्रियाचें डोळे जे कांहीं दाखवितात, इंद्रियें ज्याची म्हणून गोडि लावितात, तेंच मुळीं कीं अहो! खरें असें होय; व अशी ही प्रतीती आली म्हणजे तर खरेंच खरें असें हें मानतो. (५७३)

एवढेंच काय पण हे पार्था! अशी प्रख्याती का स्थिती जेथें नेहमीं वाढतच आहे वाढतीच होऊन आहे ती कशी होते म्हणावी तर धुराची केलेली वेली आकाशीं जशीं वृथाच–व्यर्थतेची ती (आकाशच ती होऊन वृथा जाणारी होय–आकाशत्व–आकाशेकरून ती व्यर्थच जशी.) (५७४)

मातीचा केलेला भेंडा कोरडा अथवा ओला नच उपयोगास आला–अथवा तो उपयोगासच कीं, खरेपणानें गेलेला तो वाढला (वाढून जाऊन) मोडला जसा कां होतो. (५७५)

अथवा उसाची कणसे (कां उसाचे तुरे) अथवा 'न पुंस्त्व' म्हणजे पुरुषत्व पुल्लिंग, वीर्य नसणारी माणसें [पुंस्=पुरुष, मनुष्य, सेवक, पुल्लिंग आत्मा, जीव (सा०) ईश्वर.] तेथें जसें कां पोकळ अथवा निरूपयोगी–शेर, निवडुंग–झाडाचे वनच एक लागलेले आहे जसें. (५७६)

किंवा बालकाचे मन अथवा चोराच्या घरचे धन का शेळीचे गलस्तन ज्याप्रमाणें निरर्थक तसें तेंः (५७७)

जे कां व्यर्थच असे शून्य, (पद, ज्ञप असणें, माहीत होणे, समजणें, जाणणें, ओळखणें, मानणे) ओशाळे असें, निस्तेज ओशाळलेलें असें जें त्यासच की अहो! 'तामस ज्ञान' म्हटलें आहे. (५७८)

**व्यर्थ निरूपयोगी जें शुन्य जें कांहींच नाहीं. उद्वस उद्धस्त यापासूनही ओस ओसाड–नांवमात्र–ज्ञान (ज्याला ज्ञान म्हणताच येत नाहीं असें जाणणें) त्यास 'तामसज्ञान' म्हणतात.—**

तेंहीपण 'ज्ञान' अशा भाषेनें बोलण्याचें का तर जसा कां वाड–म्हणजे वाढलेला कां नाहींसा होऊन आहे जात्यंध जो त्याचा डोळा शून्यपणानें आहेपणास आलेला; (५७९)

अथवा असेंही म्हणावें कीं (ज्याचें कान हे उपयोगास येत नाहींत) कान असूनही जो बधिर आहे, बहिरा आहे. येथें ते कान नीट नेटके जरी दिसले, (त्यास कान आहेत असें जरी ते नीट, सरळ, नेटके, कान असे असावेत अगदीं बरहुकुम जरी) तरी तेथें (एक कान या नावाच्या आडच लपलेले ते त्याचे असणें तेथें कानाचे) ऐकणे या आडनावावरच मुळीं त्याचें तें ऐकणें कां ह्या इंद्रियाचें विषयानें असणें तें जें मुळीं पेय नाहीं–पिण्याचा पदार्थ नाहीं तेंच पान म्हणावें जसें. पिण्याजोगें जें नाहीं तें पेय काय तें पेय म्हणावें! पान म्हणावें? पान या शब्देकरून रक्षण (श्वास, पाजळणें, पान, पात्र, पेय,) बोधित होणारें तें, तें तेथें अपेयत्वेंकरून पान नव्हेच असें होय–त्याप्रमाणें त्या तामसास तर ज्ञान हें एक आडनांवच जसें का होय. (५८०)

असें हे किती तरी बोलण्याचें तें! तरीपण, असें जें कांहीं पाहावें तें ज्ञान म्हणावें असें नव्हें पण तें एक प्रत्यक्ष डोळस असें प्रत्यक्ष पाहाणारें दिसणारें तमच कीं. (५८१)

याप्रमाणें एवं तिही गुणानां भेदून त्याचें तें यथालक्षण अनुरूप–चिन्ह–ज्ञान, हे श्रोतृ, श्रोते–शिरोमणी तुला दाखविलें. (५८२)

आतां ह्याच तीन प्रकाराच्या ज्ञानाच्या प्रकाशानें, हे धनुर्धरा! कर्त्याच्या (ईशा, ब्रह्मा, वायु, प्रजापती.) क्रिया गोचर–दृष्टीच्या आटोक्यांत येणाऱ्या अशा दृश्य होतात–(इंद्रिय ज्ञानाच्या होतात) सुलभ होतात. (५८३)

आणि म्हणूनच कीं ह्या तिहीं गुणांनां त्याचा तो तो वाटा हिस्सा का भाग देऊन कर्मास–अनुकरणाचे –मूळस्वभाव–पद्धतीचे सोबतीचे–कर्मास सोबत केली होते. पाणी जसें ओघ देऊन मार्गास लाविलें–लागलें जसें पाणी मार्गास लागलें म्हणजे ओघ प्रवाह जसा एक सारखा राहातो त्याप्रमाणें. (५८४)

आतां तेच वाहाणें तें ज्ञान हें रक्षण करणारें आहे अशा विचारवशेंकरून चें कांहीं तीन तऱ्हांचें–त्रिविधतेचें कर्म आहे तेथें सात्विक असें जें आहे तें अगोदर ऐकण्याचे करावें. (५८५)

**नियतं सङ्गरहितमरागद्वेषतः कृतम् ।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्विकमुच्यते ॥ २३ ॥**

नियतम् =(कृतम्) =एकाग्रतेने केलेले. निश्चित केलेलें, नित्य केलेलें, संगरहितम् (कृतम्) =सोबत संबंध, स्पर्शरहित, आसक्तिरहित केलेलें. अरागतः; अद्वेषतः (कृतम्) =रंग आवडरहित, मनोविकाररहित. अफल–प्रेप्सुना (कृतम् कर्म) अफल =फलहीन, वांझण, निरूपयोगी वृषणरहित, बोकड भ्रावुक वृक्ष प्रेप्सु= मिळवूं इच्छिणारा) ईर्ष्यारहित कामुकपणारहित, रागद्वेषद्वंद्वरहित केलेले फल इच्छित नाहीं असें जें, त्यांनीं केलेलें कर्म. सात्विकम् =सत्वगुणयुक्त–मूळधर्म स्वभाव, प्रकृतिधैर्य, चैतन्य, आवृत्ति. उच्यते =म्हणतात, बोलतात, वाचिले होते.

अन्वय :—यत् कर्म । अफलप्रेप्सुना । नियतम् कृतम् । संगरहितम् कृतम् । अरागतः कृतम् । अद्वेषतः कृतम् । तत् । उच्यते सात्विकम् ॥ २३ ॥

अर्थ :—(फल, लाभ, आशा न इच्छिता केलेले कर्म) ज्यांनी म्हणून फलाचा लाभ न इच्छिता, नच आशा धरून का मोहवश होऊन केलेले, तसेंच नित्य एकाग्रतेने निश्चित व आसक्ति रहित केलेले, जे कर्म ते '**सात्विक कर्म**' म्हणतात. श्लोक २३ ओव्या ५८६–५९४

**तरी स्वधिकाराचेनि मार्गे । आले जे मानिले आंगे ।**
**पतिव्रतेचिये परिष्वांगे । प्रियाते जैसे ॥ ५८६ ॥**
**सांवळया आंगा चंदन । प्रमदालोचना अंजन ।**
**तैसे अधिकारासी मंडण । नित्यपणें जे ॥ ५८७ ॥**
**जे नित्यकर्म भले । होय नैमित्तिके सावाले ।**
**सोनयासी जोडले । सौरभ्य जैसे ॥ ५८८ ॥**
**आणि आंगा जीवाची संपत्ति । वेंचुनि बाळकाची करी पाळती**
**परि जिवे उबगणे हे स्थिति । न पाहे माय ॥ ५८९ ॥**
**तैसे सर्वस्वे कर्म अनुष्टि । परि फळ ना सुये दिठी ।**
**उखिती क्रिया पैठी । ब्रह्मीची करी ॥ ५९० ॥**
**आणि प्रिय आलिया स्वभावे । (सबल) उरे वेंचे ठाउके नव्हे ।**
**तैसे ते प्रसंगे करावे । पारूखे जरि ॥ ५९१ ॥**
**तरी अकारणाचेनि खेदे । द्वेषाते जिवी न बंधे ।**
**जालयाचेनि आनंदे । फुंजु न ये ॥ ५९२ ॥**
**ऐसैसिया या हातवटिया । कर्म निफजे जे धनंजया ।**
**जाण सात्विक हे तया । गुणनामा गा ॥ ५९३ ॥**
**ययावरी राजसाचे । लक्षण सांगिजैल सांचे ।**
**न करी अवधानाचे । वाणेपण ॥ ५९४ ॥**

पतिव्रतयेचिये परिस्वांगे–पतिव्रतेचेनि परिष्वंगे=पतिव्रतेच्या आलिंगनानें. (५८६) सांवळ्या=काळया सांवळया, श्यामः मंडण=शोभादायक. (५८७) नैमित्यिके साबाले–नैमित्तिकी सावाइले=नैमित्तिकाचे साह्य झाले. सौरभ्य=सुगंध, सौंदर्य, शोभा, सुवास. (५८८) उखिती क्रिया पैठी ब्रह्मीचि करी=सर्व कर्मे ब्रह्मार्पण करणें, सर्व क्रिया ब्रह्मरूप करतो. (५९०) प्रिय–प्रिय मनुष्य. स्वभावे उरे वेंचे–स्वभावे (सबल, शबल) उरे वेंचें=अन्न सामुग्री. ठाउके–ठाउवे. ते–सत्. प्रसंगे=साधुसमागमे. पारूसे–पारूषे. पारूष्य=कर्कश, कटु) पारक्य=दुसऱ्याचे, शत्रु, पुण्यकर्मे. (५९१) अकारणाचेनि–अकरणाचेनि=उगाच निर्हेतुक, क्रियेचे साधन इंद्रिय नसल्यानें, न बंधे–न बांधे. जालयाचेनि–जालियाचेनि. फुंजु–फुंजो–नेणे=गर्वास चढत नाहीं: (५९२) ऐसैसिया–ऐसऐसिया. (५९३) वाणेपण=उणीव, कमतरता. (५९४)

**सात्विक कर्म :—**

**तीन प्रकारच्या (ज्ञाना संबंधामुळें) ज्ञानाच्या संपर्क का संयोगामुळे तीन प्रकारचे सत्व, रज, तम वशेकरून कर्म असते. त्यांत सात्विक कर्म ते अगोदर ऐक.**

आपलेपणाचा अधिकार (मालकी मार्गाने, प्रार्थिततेने नित्यब्रह्म, अविनाशी असें, स्वभावसिद्ध असें आले असे जे कांहीं शरीरानें कां अंगानें मानिले तेथें जसें का पतिव्रतेच्या आलिंगनाने प्रियास जसें प्रार्थितच आहे प्रिय मनुष्य जो प्रिया त्यांस (स्वंज=आलिंगन.) (५८६)

ब्रह्म नित्य आहेच आहेः अशा नित्यपणानें अधिकारास शोभादायक असते, अधिकारास शृंगारविते–अधिकारास अलंकार घालते जसें का काळया सावळया श्याम अशा अंगांस चंदन ते शोभादायक असें दिसते,

का प्रमदा म्हणजे सुंदर स्त्रीच्या डोळयांना (लोचनांना) काजळ, अंजन ते शृंगारपरत्वे, शोभादायक असें असते. (५८७)

असें ते भले म्हटलेले नित्यतेवर उभे झालेले कर्म ते तर निमित्तमात्र होणारी जी नैमित्तिकी कामें त्यांनीं (प्रश्न सवालाने–सबल केले (सवाल जमले मिळाले) साह्य केले होते. ते कसें म्हणावे तर सोनयास (एक वालभर जे जिवित सुवर्ण त्यासच कीं, अहो) एका सुगंधतेने कां सुवासानें सौंदर्याचे केल्याने शोभूं लागले.

ते नित्यकर्म भले असे नैमित्तिकाने साह्य केले होते जीवितरूपी सुवर्णास सौरभ सुगंधाचे जोडणे केले जसे (५८८)

तसेंच कीं अहो! (शरीर अवयव) अंगाची जी (कांहीं जीवरूपी जीव कीं) जीव कीं प्राण संपत्ती, ती एकत्रित करून बाळकाची पाळ–(पालन पोषण माय करते. (तेथें ती तर एक तीर्थंच पाठीवर वाहून असते–कमळ पाणी का आकाशच जसें) पण जीवाभावानें त्रासणें कां उबगणे ते (होणे अशी स्थिति का अवस्था माय) ती तर केव्हांही पाहात नाहीं. (५८९)

**श्रद्धेनें पूर्णपणें कर्म आचरण कर, फळाकडे आशा ठेवू नकोस, सर्व कर्म क्रिया, संपूर्ण ती–, ब्रह्माच्याठायीं स्थित कर, ब्रह्मार्पण कर.**

त्याप्रमाणें आपल्या सर्वस्वनिंच की कर्म हे अनुष्ठानाचे कर पण, त्या कर्माचे फळ दृष्टीने पाहू नको, अवघी सर्व क्रिया ब्रह्मीच अर्पण कर सर्वस्व जियेचे बालक जसे तसें स्वसत्तेचे सगळे धन त्यांतच एक असें तो अनुष्ठितो, कार्यरंभाचे करतो, सिद्ध करतो, पण ते कर्म केल्याची कांहीं फळासंबंधीं आशा ती तो आपल्या दृष्टीमध्यें ठेवीत नाहीं. एकदम सर्व कर्मे ब्रह्मार्पण करतो–जसें कां नित्य ब्रह्म जे त्याचें वर ऋणच वसुल करण्याकरितां ही क्रिया केलेली) क्रिया जी तेथें तपण्याची का पितृयज्ञच एक केला, अशी अथवा का ईश्वराचे स्तोत्र एक गाईले अशी ती क्रिया तो ब्रह्मीच बुद्धि स्थिर करून असतो. (५९०)

(१) आतां येथें प्रिय का प्रिय मनुष्य कदाचित् आले तर पाहुणाच जसा का तर मग सहजच स्वभावेकरूनच आपल्या अंतःकरणापासून की अन्नसामुग्री –शिदोरी ती खर्च करतो. आपले अंतःकरणच तेथें वसवितो–ते तर केव्हांही कुणालाहि नच ठाउक होता तो असतो वक्षस्थळच एक तेथें वेंचिले होते ते ठाउकही पडत नाहीं. जसें तसें ते सहज प्रसंगेकरूनच कीं जसें का (सत् प्रसंग–साधुप्रसंग साधुसमागमच एक–) साधु समागमातच, जसे कां आहोत असें समजून ते पुण्यकर्म अथवा ते वागणे नच उरकले असें समजत नाहीं पण ते करतोच, उरकतोच. [पारक्य=परक्याचे, का पुण्यकर्म अथवा शत्रु. पारूष (पारूख का पारूष्य असें कर्कश का कटु असे जरी.] (२) सहज स्वभावे आठवते मनुष्य आले तर भूषण का शोभा सामग्री आपल्या उरानें म्हणजे छातीनें गोळा करतो ते समजूही देत नाही. तसे ते सत्संगाचें करावे जरी राहिले कां मागे पडले असल्यासही कीं. (५९१)

तरीपण अकारणींच पडले, उगीचच्या उगीचच मुळीं निर्हेतुक असें झाले, अथवा क्रियेचे साधन इंद्रिय नसल्याने अकारणीचे न केले या विषयाचे झाले असे अन आवडीने द्वेष का मत्सर तो आपल्या जीवीभावी (जीव हा देहबंध, द्वेषाच्या बुद्धिचा करून बंध लावून घेत नाही.) बांधीत नाही. जीवभाव द्वेषाचा का अप्रिय केला असें तो करीत नाही तसेंच झाले आहे (आम्ही झालो असें जो म्हणे तो कांहींचि नेणे) ब्रह्मतेचे अशा आनंदाने फुंजत नाही–गर्वाचे होऊन चढून जात नाही फुंजपणास गर्वास आणिली असेही होत नाही का अपमान तिरस्कारपणानें माखिली होत नाहीं.

(२) नच केले या विषयीच्या खेदाने आपल्या जीवी द्वेष–बंध बांधीत नाही व केले का झाल्याच्या आनंदाने गर्वास चढत नाहीं [येथें माय ती किंवा कर्म कर्ता तो हे समजून घ्यावे.] (५९२)

ऐस ऐशा हातवटीनी जे हे धनंजया कर्म निफजते त्यास, मोठ्या गुणाचे एक नांव ते देण्याचें तें **'सात्विक'** असें होय. (५९३)

आतां यावर राजस गुणाचे लक्षण सांगण्याचे करतो–ते सांचे असेच (खरें ते राजस गुणाचे लक्षण) सांगिजैल, तरी अवधान लक्ष देण्यांस कमतरता करूं नये, लक्ष अवधान पुरते असावे. (५९४)

**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥**

कामेप्सु (काम+इप्सा) काम=मदन विषय वासना, उपभोग इच्छा भोग्यवस्तु. इप्सु=इच्छीणारा साहंकारेण=अहंकार सहित अहंकृति अभिमानासहित, त्या त्या प्रकृतीचा, लक्ष्मी पार्वती, यशोदा, देवकी, हंकारानें त्या त्या प्रकृतिमंततेच्या हंकारानें, कधीं काळी क्वचित् केव्हां केव्हां केले जाते ते कर्म. वा पुनः=१ पुन्हां परत तेच अथवा तेच कीं, २ तथापि, ३ शिवाय, ४ परंतु, ५ निश्चय, अवधान, ६ एकादे वेळीं. बहुलायासम् (बहुल+आयासम्=दाट, पुष्कळ परिश्रम करून थकल्याने)=पुष्कळ परिश्रमाने तसेंच अति थकावटतेने. उदाहृतम्=नांव दिले आहे, म्हटले आहे, सांगण्याचे केले आहे, जाहीर केले आहे.

अन्वय :—तत् कर्म तु राजसम् उदाहृतम् यत् कामेप्सुना स अहंकारेण वा पुनः बहुल आयासं क्रियते ॥ २४ ॥

अर्थ :—(१) पण ते कर्म राजस–राजसिक–रजोगुण प्रधान, म्हटले आहे–जे (भोग्य वस्तु अथवा) विषयोपभोग इच्छिणाऱ्यांनीं (का इच्छित वस्तु प्राप्त होण्यासाठीं केलेले.) साभिमानाने पुष्कळ परिश्रमाने व अति थकावटतेने केलेले होते व एकादे वेळेस भोग्य वस्तूंचा उपयोग घेतला असेंही जरी होते जे, (सर्वथैव कामच एक पुढाकार घेऊन आहे.)

(२) विषयोपभोग इच्छिणाऱ्यांनीं जें कांहीं कर्म केले जाते तेथें कामभोग आसक्ति इच्छा हीच सर्व पुढाकार घेऊन असल्यानें तेथें साहंकार (ऐट, दिमाख) साभिमान क्वचित् भोग असें कर्म पुष्कळ परिश्रमाचे व अति थकावटीचे होणारे, असें ते कर्म राजस म्हटले आहे. (श्लोक २४ वा ओ. ५९५–६१०)

**तरी घरी मातापितरा । धड बोलणे नाही संसारा ।**
**येर विश्वभरी आदरा । मुखं जैसा ॥ ५९५ ॥**
**का तुळसीचिया झाडा । दुरूनि घांपे सिंतोडा ।**
**द्राक्षाचिया बुटा । दुधाचि लावी ॥ ५९६ ॥**
**तैसे नित्यनैमित्तिके । कर्मे जये अवश्यके ।**
**तयाचां विषी न सके । बैसला उठु ॥ ५९७ ॥**
**येरा काम्याचे तरी नांवे । देहसर्वस्व आघवे ।**
**वेंचिताहि न मनवे । बहु ऐसे ॥ ५९८ ॥**
**अगा देवढी (देवडी वाढी) लाहिजे । तेथ मोल देता न धाइजे ।**
**पेरिता पुरे न म्हणिजे । बिजे जेवी ॥ ५९९ ॥**
**का परिसु जालया हाती । लोहालागी सर्व संपत्ती ।**
**वेंचिता ये उन्नति । साधकु साधक जैसा ॥ ६०० ॥**
**तैसी फळे देखुनि पुढे । काम्य कर्मे दुवाडे ।**
**करी परी ते थोकडे । केलेंही मानी ॥ ६०१ ॥**

तेणे फळ कामुके। यथाविधी नेटके।
काम्य कीजे तितुके। क्रिया जात ॥ ६०२ ॥
आणि तयाही केलयाचे। तोंडी लावी दौंडीचे।
कर्मी नांव पटाचे (नाम श्रेष्ठाचे)। वाणे सारी ॥ ६०३ ॥
तैसा भरे कर्माहंकारू। मग पिता अथवा गुरू।
ते न मनी काळज्वरू। औषध जैसे ॥ ६०४ ॥
तैसेनि साहंकारे। फळाभिलाषिये नरे।
कीजे गा आदरे। जे जे कांहीं ॥ ६०५ ॥
परी तेही करणे बहुवसा। वळंघोनि करी सायासा।
जीवनोपावो का जैसा। कोल्हाटियांचा ॥ ६०६ ॥
एका कणालागी उंदिरू। असका (अवघा) उपसे डोंगरू।
का शेवाळ दोषे दर्दुरू। समुद्र डहुळी ॥ ६०७ ॥
पाहि भिकेपरते न लाहे। तरी गारोडी साप वाहे।
काय किजे शिणुचि होये। गोड येका ॥ ६०८ ॥
हे असो परिमाणाचे लाभे। पाताळ लंघी वोळंबे।
तैसे स्वर्गसुख लोभे। विचंबणे जे ॥ ६०९ ॥
ते काम्यकर्म सक्लेश। जाणावे येथें राजस।
आतां चिन्ह परिस। राजसाचे ॥ ६१० ॥

बोलणे–बोली. मुर्ख–मुर्खु. (५९५) घापे–न घापे=चालूं देत नाहीं बुटा–तरि बुडा. लावी–लाविजे. (५९६) तैसे–तैसी. नैमित्तिके–नैमित्यकें. जये–जिये. तयाचां विषी–तयांचे विषयीं. सके–शके. (५९७) काम्याचे–काम्याचेनि. अघवे–आघवे. (५९८) देवडी–देवढी. वाढी. बिजे–बिज. (५९९) जालया–जालिया. हृती–हाती. (सपदि=आतांच: संयति=बद्ध, आवरलेला) संपति–संपत्ति (६००) देखुनि–देखोनि. (६०१) केल्याचे–केलियाचे. दौडीचे–दौंडीचे. कर्मी=कर्ता. नाव पाटाचे=नांवाच्या दिमाख्याचे (६०३) लाखिये–लाषिये. (६०५) असका–असिका. शेवाळ दोषे–शेवाळोद्देशे. समुद्र–समुद्रु. (६०७) पाहि–पै. गारोडी–गारूडी. साप–सापु. शिणुली शिणुचि. गोड–गोडु. (६०८) परमाणाचे –परिमाणूचेनि. लंघी–लंघिती. (६०९) येथे–येथ. (६१०)

आतां येथें एक तो विषयोपभोगचमुळीं पुढें झाल्यानें तेथें एका त्या कामाशिवाय–विषयोपभोगाशिवाय दुसरें कांहींही दिसणारें नसल्यानें त्याचीं ती वागण्याची तऱ्हा घरी का दारी ती कशीं म्हणावी तर, अहो! तो तर प्रपंच व्यवहाराचा नव्हेच असा–आईबापाशीं त्याचें धड बोलणेंही होत नाहीं: (पण त्याचें आपल्या संसारासंबंधीचें लक्ष सारें बाहेरच, विश्वाच्याठायींच आदरिलें गेलें होऊन आहे.) असा मूर्खच जसा कां. (५९५)

अहो! संसारवृक्ष जो आहे, तेथें त्याचें जुमानणें नाहीं, लक्ष नाहीं: दैवत का धार्मिकतेसंबंधी जें कांहीं तें तुळशीच्या रोपास तरी पाणी घालावेंच असें जें, तेथेंही पण तो अगदीं दुरूनच क्वचित् एकादा पाण्याचा सिंतोडा घालणारा न घालणारा असा: पण द्राक्षीच्या वेल बुडास बुडातळी मात्र दुध लावितोच की असा (द्राक्ष=काय अगदीं निव्वळ काटक्याच पण जेथें जोपासल्या पिकविल्यावर तरतरल्या म्हणजे अप्रतीम असे द्राक्षाचे पीक येणारें.) (५९६)

याप्रमाणें जी नित्य करावी लागणारी अशी अंगवळणी पडलेलीं तसेंच निमित्तमात्रेंकरून कदाकाळी होणारीं जीं, अगदी अवश्यक अशीं नित्यनैमित्तिक कर्मे कामें त्याविषयीं तर तो जसा का बसलेला आळशीच एक, तो मुळीं सुद्धां तेथें प्रवर्तण्याचें, कां उभे होण्याचें, उठून सुद्धां बसण्याचें करीत नाहीं–, मनावरच मुळीं घेत नाही. (५९७)

तेथें जी दुसरी एक काम्य म्हटलेली कर्मे इच्छिण्यांस योग्य अशी प्राप्ति सुंदरतेची तीं, इच्छित प्राप्ती-साठीं केलेलीं तीं कर्मे त्यामध्यें कां त्याच्या नांवानें तर आपलें सर्वस्व देहासहित सर्व ( अथवा देह हेंच मुळीं परमार्थ साधन तत्परतेचे व्हावेंच असें जें ) तेंच मुळीं त्यानें येथें वेंचले–(लाविलें–खर्च केलें व असें करतानाही पण तो काय फार बहु असें कांहींही केलेच नाहीं ) असें मनास आणीत नाहीं. दुसऱ्या काम्य कर्मामध्यें देहानें आपलें सर्वस्व लाविलें तरी विशेष कांहीं नुकसान झाले असें त्यास (मानवत नाहीं)–वाटत नाहीं. (५९८)

देव्हडी, दिढीने दुपटीनें वाढ, अशा व्यापारांत अमाप पैसे खर्चावे तितके थोडेच असें त्यास होते, ( दिढीने वाढ व्हावी तेथें मोल देतांना धाला होत नाहीं, आणीकही तेथें त्या वाढीकरितां मोल वेंचावेंच असें त्यास होते. ) अहो पेरतांना–तेथें बी पुरविणें जें तेथें ना म्हणणें नच व्हावें कीं. (५९९)

अथवा हातीं परीस आला असतां लोखंडासाठीं सर्व संपत्तीही खर्च केल्यानें केव्हांही (उन्नत्ती उल्हास) उत्कर्षच होणारा जसा: का साधकच एक (साधक जसा) श्रीगुरूकृपेकरितां सेवेंत कसुर करीत नाहीं (तेथें देहबुद्धीच मुळीं त्याची ती लोखंडास परिसानें स्पर्श केला कीं सुवर्णच जसें का होणारी योग भावावरच उभी झाली होते, होणारी होते. (६००)

तसें पुढें फळें पाहून (इच्छित वस्तु प्राप्तीकरितां केलेली) काम्य अशी कर्मे कठिण (दुवाड) अशीच ती तो करतो–पण तें थोडे असें जरी कांहीं एक केलेलें तरी तें अतिशयच मानतो. (स्वतःस मानाचे समजतो–गर्विष्ठ होतो.) (६०१)

(१) तेथें फळ विषयासक्त यथाविधीनें नेटकें असें क्रियाजात काम्य सुंदर करावें, इच्छिण्यास योग्य असेंच करावें व तितकें केलेलें जें तेंच मुळीं क्रियाजात–अभ्यास स्पष्ट–प्रकार–अथवा प्रायश्चित्त प्रकार होत. अथवा स्पष्ट अभ्यास तेच सुंदर करावेत इच्छिण्यांस योग्य असेंच व्हावेत. कर्माचें फळ इच्छि-णाऱ्यानें योग्य प्रकारें तें अनुष्ठानाचें करून केलेलें तें काम्य कर्म क्रियाजात समजावें. (६०२)

पण त्या केल्याचें पुकारणेंच एक (टिमकी वाजविणें दौंडीच पिटीत असणें असें) तो करतो. कर्ता तो पुरुषच एक अशा नांव लौकिकाचें मोठें नांव होईल अशा दिमाखानें ह्या कृतकर्माची वाणे–अधिकार पदवी नमुना पुढें करतो प्रख्यातीचे करतो वाटतो–पुकारा करतो. (६०३)

तसा तसा तो कर्माचा (अथवा कामाचा अहंकार अहंकृति–) अभिमान त्यास चढतो ( त्या कर्माच्या का कामाच्या तो अभिमानानें भरतो ) व मग काय वडील का बाप अथवा गुरू त्यास तर मुळींच मनावर घेत नाहीं, मानीत नाहीं (त्याचे ऐकत नाहीं, तेथें महत्त्व देत नाहीं, स्वतःलाच मोठा समजतो) जसा काळज्वर तो कसल्याहि औषधानें उतरणारा नव्हेंच कीं, (तेथें औषधच नाहीं, तो औषध मान्य करीत नाहीं–, मानीत नाहीं, तो अनावर असतो.) (६०४)

तसा तो फक्त फळाच्या अभिलाषामुळें प्रकृतिमंततेच्या अहंकाराचा झालेला असा साहंकार नर, तो त्यानें जें जें कांहीं (आदरानें प्रेमानें का सत्कारानें, काळजीनें, उत्सुकतेनें, विनंतीनें, लक्ष देऊन जें जें कांहीं) करावें— (६०५)

ते करणें पुष्कळांचा आश्रय घेऊन कष्टानें केलेलें असें का कोल्हाट्याचा जीवनउपाय तो (डोंबाऱ्याचें तें जीवित जगविण्याचें साधन तें). (६०६)

अहो! धान्याच्या एका कणासाठीं उंदीर जो तो तर (असका अथवा असिका म्हणजे) सर्व डोंगरच मुळीं तो उपसतो पोंखरतो कां शेवाळ्याच्या हेतूनें (दर्दुर म्हणजे) बेडुक तो समुद्रीहीपण ढवळण्याचें करतो, ढहुळतो. (६०७)

तेथे अहो! त्यास भिकेपेक्षां आणीक कांहींहीं जास्त मिळत नाहीं, तरीपण गारोडी तो तर (साप आपल्या अंगी शिरी वाहून असतो.) सापाचें ओझें तें वाहातो कीं! अहो! काय करावें येथें तर तो शीणच दुसऱ्या एकाला गोड वाटतो, गोडीचा होतो. (६०८)

**सूक्ष्म कणाच्या प्राप्तीसाठी (नर ओळंबे) नर-वाळवी जमिनीत खोल जातात, तसें स्वर्ग सुखाच्या लोभामुळें श्रम करणें जे ते (स्वर्ग प्राप्तीचे यज्ञयागादि) कामना-फळाची इच्छा करून केलेलें कर्म श्रमाचें दुःखाचें ते राजस समजावे—**

असें हें असो! पण (एक परिपरि-परिमाण, मेज, माप किंवा संख्येच्या लाभासाठीं कां) परम अणु अणु—परमाणुसाठीं सुद्धां वाळवी ती पाताळही उल्लंघिते, पाताळावरही चढतेः तसें स्वर्ग सुखाच्या लोभानें विचंबणे म्हणजे श्रम कष्ट करणें ते. (६०९)

असें हें पंच क्लेशसहिततेचें इच्छित प्राप्तीसाठीं केलेलें काम्य (म्हटलेले) कर्म तें येथें राजस (राजसिक-रजोगुण प्रधान) म्हणावें. आतां तामसाचें तें चिन्ह लक्षण ऐकण्याचें करः (६१०)

**अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम्।**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥**

*अनुबंधं=अविच्छेद संबंध, आरंभ, अवस्था, अटकाव, आसक्ति,* नाते, परिवार, वंशज, परिणाम, फल, इच्छा प्रयोजन, मागचें बंधन, अनुषंगिक लक्षण, उत्कर्ष, पाठलाग, संसारपाश, आज्ञाधारक पुत्र, शिष्य, गुन्हा, दोष, अखंडपणा (व्या.) मूळरूप (व्या.) प्रत्यय इत्यादींतील लोपणारे अक्षर उदा. 'क्त' पै 'क्'. क्षयं=ऱ्हास, क्षयरोग, ऋणसंख्या कमी होणे, नाश, प्रळय, रोग, घर, स्थान, सामर्थ्य. हिंसा= इजा, पीडा, वध, नासाडी, चोरी इत्यादी कुकर्म (हिंसा कर्म=जारण मारण.) अनपेक्ष्य=(ईक्ष+अप= पर्वा बाळगणें, गरज असणें, वाट पाहाणें, लक्ष देणें, इच्छिणें, आशा करणें,) नच पर्वा बाळगून. पौरुषम्= मानवी, मर्दानी (एका पुरुषाचे ओझे.) उद्योग, पराक्रम, पुरुषत्व, रेत, वीर्य, पुरुषभर (पांच हात) उंची. मोह=मूर्च्छा, बेशुद्धि, घोंटाळा, मतिभ्रम, अज्ञान, मूर्खपणा, आश्चर्य, दुःख, देहाला आत्मा मानणें, भुरळ पडणें, भ्रम, चूक. आरभ्यते=(रभ=उत्सुक होणे+आ=आरंभणे, करणें, बनवणें,) आरंभतो. कर्म= कृत्य, कामगिरी, धंदा, काम, मेहनत, धार्मिक काम, दैव, पूर्वकर्म.

अन्वय :—अनुबंध (अनपेक्ष्य)। क्षयं (अनपेक्ष्य)। हिंसा (अनपेक्ष्य)। पौरुषम् अनपेक्ष्य च। यत् कर्म मोहात् आरभ्यते तत् तामसम् उच्यते ॥ २५ ॥

अर्थ :—परिणाम, (मागचे बंधन,) अथवा दोषाची पर्वा न बाळगता,- स्थान, (घर, सामर्थ्य, रोग अथवा) ऱ्हासाची नच पर्वा करितां; हिंसा म्हणजे (इजा, पीडा, का) नासाडीकडे लक्ष न देतां, जें कांहीं कर्म केलें जातें, (कर्माच्याठायीं उत्सुक होऊन फक्त एका अज्ञानामुळें, मूर्खपणानें, भ्रमानें आरंभिलेलें जें (कर्म) तें तामस (म्हटलें आहे.) होय. (श्लोक २५ वा ओव्या ६११-६३०)

**तरी ते गा तामस कर्म। जे निंदेचे काळे धाम।**
**निषेधाचे जन्म। सांच जेणे ॥ ६११ ॥**

जे निफजल्यापाठि । कांहीच्चि न दिसे दिठी ।
रेघ काढिलया पोटि । तोयाच्या जेवी ॥ ६१२ ॥
कां कांजी घुसळल्या । सार स्वरू फुंकिलया ।
कांहीं न दिसे गाळल्या । वाळु घाणा ॥ ६१३ ॥
नाना उपणलिया भुस । विंधलिया आकाश ।
मांडिलिया पाश । वारयासी ॥ ६१४ ॥
हे अघवेच्चि जैसे । वांझे होऊनि नाशे ।
जे केलया पाठी तैसे । वायाची जाय ॥ ६१५ ॥
येऱ्हवी नर देहाहि येवढे । धन आटणिये पडे ।
जे (कर्म) निफजविता मोडे । जगाचे सुख ॥ ६१६ ॥
जैसा कमळवनी पाशु । काढिलिया कांटसु ।
आपण झिजे नाशु । कमळा करी ॥ ६१७ ॥
का आपण (स्वये) आंगे जळे । आणि नागवी पुढिलाचे डोळे ।
पतंगु जैसा सळे । दिपाचेनि ॥ ६१८ ॥
तैसे सर्वस्व वाया जावो । वरी देहाहि होय घावो ।
परी पुढिला अपावो । निफजविजे जेणे ॥ ६१९ ॥
मासी आपणयाते गिळवी । परी पुढिलया वांती शिणवि ।
तेवी कश्मळ आटवि । आचरण जे ॥ ६२० ॥
तेही करावया दोषे । मज सामर्थ्य असे की नसे ।
हेही पुढील तैसे । न पाहता करी ॥ ६२१ ॥
केव्हडा माझा उवावो (उपावो) । करिता कोण प्रस्तावो ।
केलियाहि आवो । काई येथ ॥ ६२२ ॥
ये जाणिवेची सोय । अविवेकाचेनि पाय ।
पुसुनिया होय । साटोपु कर्मी ॥ ६२३ ॥
आपुला वसौटा जाळुनि । बिसाट जैसा वन्ही ।
का स्वमर्यादा गिळुनि । सिंधु उठी ॥ ६२४ ॥
मग नेणे बहु थोडे । न पाहे माघे पुढे ।
मार्गामार्ग एकचढे । करीत चाले ॥ ६२५ ॥
तैसे कृत्याकृत्य सरकटित । आपपरू नुरवित ।
कर्म होय ते निश्चित । तामस जाण ॥ ६२६ ॥
ऐसी गुणत्रयभिन्ना । कर्मासी गा अर्जुना ।
हे केली विवंचना । उपपत्तीसी ॥ ६२७ ॥
आतां कर्मा याचि भजता । कर्माभिमानिया कर्ता ।
तो जिउही त्रिविधता । पातलासे ॥ ६२८ ॥
चतुराश्रमवशे । येक पुरूष चतुर्धा दिसे ।
कर्तेया त्रिविध तैसे । कर्म भेद ॥ ६२९ ॥
परी तया तिही आंतु । सात्विक तंव प्रस्तुतु ।
सांगेन दत्तचित्तु । आकर्णितु ॥ ६३० ॥

निदेचे-(निजेचे-निज = आपले-स्वाभाविक अज्ञान) निद्रेचे, निंदेचे = कुटाळीचें, तिरस्काराचें, मतिमेदाचें. निषेध = निवारण, मनाई, बंदी, नकार, अपवाद, विधिच्या उलट, मनाईचा नियम. धाम = ठिकाण, देह, स्वभाव, वासस्थान, घर, आश्रय. काळे = कृष्ण, दुष्ट, तामस, लोखंड, वद्यपक्ष, (कृष्णु = कर्ता, करणारा) (६११) निपजविणें-(उपजविणें = जन्म देणें-करणें) (६१२) गुसळलया-घुसळलिया. सारस्वरू [सार = मुख्य. स्वरू = उन्ह (विंचूभेद)]-का राखोंडी (राख) (६१३) उपणलिया = वाऱ्यावर धरिलें असता. विंधलया-विंधिलिया = वेंधणें, भोंक पाडणें, बनवणें. मांडिलिया-नाना मांडिलिया. पाश = फांस, समूह. (६१४) आटणिये = खर्च. (६१६) पाशु-फांस. कांटस = कांटेरी (६१७) नागवी = अंधार करतो. पुढिलांचे-जगाचे. सळे = द्वेषाने. (६१८) कश्मल = सदोष. (६२०) प्रस्तावो-पसारा. आवो-लाभ. (६२२) साटोप = साहंकार, उद्युक्त. (६२३) वसौटा = आधार, वसतिस्थान, वेळूचे बेट. जाळुनि-जाळुनि. बिसाट-बिसाटे = पसरतो. गिळुनि-गिळोनि (६२४) एकवढे-येकवढे = एकत्र. (६२५) सरकटित = रगडित. आपपरू-आपपर. (६२६) उपपत्तीसी = उद्देशासह. कर्मासी-कर्माची. (६२७) कर्मायाचि-याचियवाचि कर्मा. जिउही-जीवही. पातलासे = पातला असे. (६२८) कर्तेया-कर्तेया. त्रिविध-त्रैविध्य. कर्मभेद-कर्ममेदे. (६२९) आकर्णितु-आकर्णी तू. (६३०).

तामस म्हटलेलें तमोगुणासंबंधी [तापट मनुष्यच तो जसा का, अथवा मोह, शोक, पाप, अज्ञान अंधकार (जेथें सूर्यचंद्र अग्नि तमोपह का तमोनुद म्हटलेलें)] अज्ञानानें व्याप्त असें जें तें, तर संसारच एक पाठीवर घेतलेला जसा का तेथें तामस कर्म तें तर निंदेचें काळें धाम मतिमेदाचें, कुटाळीचें का तिरस्काराचें (कृष्ण म्हणजे काळे) काळें म्हणजे कृष्ण असें दुष्ट असा कर्ता कां करणारा असा ठिकाण देह स्वभावाचे तेथें तर अहो सर्व निषेध निषेध म्हणून जें कांहीं तो तर आतां अगदीं खरेपणानें दिसत आहे, जन्मत आहे. ह्यामुळेंच तर निषेध म्हणून म्हणतात जो कांहीं एक तो खराच होय असें ह्या येथीलच्या दुष्ट स्वभावाच्या वर्तणुकीने निदर्शनास आणून दिलें; म्हणून निषेध म्हणून म्हणतात जो तो कांहीं तरी पण आहेच आहे. अहो! असे निदर्शनास आणून देणारें: (२) निंदेचें अपवित्रतेचें काळें घर असें जें कांहीं म्हणतात तें ह्यानेंच की खरें असें केलें असें जें तें तामस कर्म होयः (६११)

जे उगवल्यार (निपजल्यावर) निषेधच एक जन्मला तेथें दृष्टीस कांहीच दिसत नाहीं. जसें का पाण्यावरच एक रेघ काढिली (ती तर वाऱ्यामुळे तरंगामुळे तर केव्हांच मुळीं मोडून जाणारी-) (६१२)

कांजी घुसळिली (तर लोणी कसचें निघणारें तेथें!) राखोंडी फुकिली (तर वन्हि नच दिसणारा) अथवा वाळूचा घाणा गाळला तर तेथें कांहींच मुळीं निष्पन्न झालेलें दिसत नाहीं. (६१३)

भूस वाऱ्यावर धरिलें, (उपणिलें) का आकाशास विंधिलें (भोकें पाडिली), का वाऱ्यावरच पाश टाकला (तेथें कांहींच निष्पन्न होणें नाहीं.) (६१४)

असें हें अवघें करणें अगदीं वांझच होऊन नासते, नाहींसें होतें, किंवा केल्यानंतर तें वायाच जातें व्यर्थच होतें (जसें कां) (६१५)

एरव्हीं नरदेहायेवढें धन खर्च झालें तर, वाहवलें असता आटणी (अण्डज जारज उद्भिज नाटे। हरिनाम, नाटे ते बरवे ॥' (अभंग ज्ञा.गा.) पडले तर, [जसें माळ्यानें जीव झाडांत आटविला-,अहो तेथें वसंताचे येण्यानें तें कष्ट फलप्रद होणारें-] एरव्हीं येथें विश्वाचें, देहाचें, जगाचें सुखचमुळीं जर का (पाहाण्याचे का निफजविण्याचे का) तें कर्म उपजविण्याचे पाहिलें तर तें केव्हाहि (नाहींच असें) मोडलेलेंच सुख तें मोडतेंच. (६१६)

(१) कमळिणी समूह सौंदर्य (वरूणास्त्र पाशविशेष) (पाश) तो कांटेरी होऊन आपण झिजतो वर कमळाचाही नाश करतो. (पाण्याचे सौंदर्य–कमलाचे सौंदर्य (कमल=तांबे, औषध, आकाश, फुप्फुस. तांबुस रंग, ब्रह्मा, हरिण, सारसपक्षी, सुंदर स्त्री, लक्ष्मी) तेथें जर पाश तर तो कांटेरी असा होऊन (अनीतीनें वागणें झाल्यास) तें पाणीही देहपाणी झिजूं लागतें तसेंच तें कमलही पण नाशतें) (२) कमलस्थान उदक तेथें काट्यांचा पाश काढल्यास तें कमळस्थान उदक आटते पाश झिजतो व कमळाचा पाण्याचा स्थानचा नाश करतो.

(३) देह पाण्याचा तांबुस रंग कमळस्थान सौंदर्यस्वभाव मायापाश तो काटेरी असाच की पाश (अनीतीनें वागूं लागले तर) होऊन–पाणी निवासस्थान विषयी अज्ञान माया अविद्या पाशरूपी आपण झिजतेच वर कमलपाणी (कमलाचा तांबुस रंग (ब्रह्मा) का देहाचे पाणी) ही तेथें नाशिले होतें. (४) फांस कमळवनी काढला ओढला तेथें त्या फांसाचे काटे झिजतात कमळाचाहि नाश करतात. फांकळया करतात.

(६१७)

(२) पतंग जसा दिव्याच्या द्वेषानें सळानें आपण स्वतः अंगानें जळतो व (पुढिलांचें– पुढच्यांचें म्हणजे) जगाचे डोळेहीपण काढून नेतो, हिरावून घेतो जसा. (६१८)

तसें आपले सर्वस्वहीपण वाया जावो (व्यर्थ होतो) वर आपल्या देहासहीं कांहीं घाव डाव होवो पण जगास (अथवा पुढिलाना)– पुढच्यांना ज्यायोगें कांहीं अपाय उपजला–उपजवावा होईल, व्हावा ज्या योगें–असे ते. (६१९)

माशी तर आपणा स्वतःस गिळविते वर (जगास) पुढिल्यास–(पुढच्यास) तर वांतीनें शिणविते, तसें (कश्मळ म्हणजे) सदोष आचरण तें जसें अरण्यांतच भटकणें होय. (६२०)

तसें तें वनी संचरण–, सदोष आचरण तें (पण उद्देशानेंच दोषानें हेतूनें एका करणें ते) करण्यास स्वतःला सामर्थ्य आहे कीं नाहीं हेहीपण पुढील परिणाम नच पाहातां जो करतो. (६२१)

माझा (उवावो–प्रसर, अवकाश, अथवा उपाय, (सामदामादि) साधन–केव्हढे तरी व आतां येथें (तें पसाऱ्याचें का प्रस्ताव्याचें तें कुणी करावें वर कांहीं जर कां झालें, केलें, तरीपण तेथें लाभ तो प्रस्तावना आरंभ) प्रसंग कोण तो, तो, केल्यावरही पण प्राप्ती ती कसलीन् काय !!! (साम, दाम, दंड, भेद) (६२२)

अशी जी कांहीं जाणीवेची कळा, सोय, (शहाणपणाची सोय, अनुकरू–चित्तासारखा गोवलु रानिचा) ती अविवेकाच्या पायानी पुसून टाकून (अविचारणीय ते नच जाणून घेऊन) पुन्हः कर्ममध्येंच सांहंकारानें उद्युक्त होतोः (६२३)

आपला बसौटा–आधारस्तंभ–आधार आपणच खाऊन टाकून जसा वन्हि पसरतो. अथवा आपली मर्यादा ती सिंधू (हत्तीचा मद, समुद्र) आपली पोटी घालून, (गिळून टाकून) अमर्याद असा (अफाट असा) झाला कां उठला कामास लागलाः (६२४)

मग तेथें थोडें का फार असें (जाणणें) म्हणणे नाहींच, मागें पुढें पाहाणें नाहीं–, काय (चालरीत पद्धत, रस्ता, खूण, साधन), मागे, काय अमार्ग (काय अमार्ग एकाहून एक वरचढ असेंच तो करणारा होतो–करतो), एकत्र करीत चालतो, जातो, असतो [अमार्ग=बेचाल, (बिन चालीचा बिनचाल) गैररीत, गैरशिस्त, आडवाट, बिनखुणेचें असें साधन रहिततेनें.] (६२५)

तेतें मग कृत्या (कार्य हेतु जे कांहीं काम करणें तें कारणावर का कार्यावर अथवा हेतुवर उभें असो नसो असें) अकृत्य, (कृत्य–करण्याजोगें शक्य योग्य कर्तव्य–कामगिरी हेतु कृति–[अकृत्य=तासणी इत्यादी

सुताराची इत्यारे] पीडा करणारी देवता विशेष अकृत्य-अयोग्य सेवा इत्यादी कामे, सरकटित-सरकटत का रगडीत जातो. तेथें आपलें दुसऱ्याचें असें कांहींच ऊरूच देत नाहीं. असें जें कांहीं कर्म तेंच निश्चित तामस होय. (६२६)

याप्रमाणें तीन गुणाप्रमाणें तीन तऱ्हांची भिन्न भिन्न अशी, विवंचना अशीच मुळीं ती उपपत्ती ती कारण हेतुसहित तुजला सांगितली. (येथें वचन तें कसें फसलें होतें म्हणून विवेकानें निश्चयाचें करावें तेंचमुळीं कसें तें सांगितलें (वचन म्हणजे बोलणें, उच्चार, भाषण, ऋषि इत्यादींचें वाक्य, नियम, आधारभूत वाक्य, आज्ञा, वचन संख्या-तेथचें एक वंचन तें होणारें-फसलें होणें कां फसविणें झालें कां एका कपट प्रकारचें झालें अथवा भ्रमच मुळीं तो तेथें कसा परिणाम करतो तें तेथें टपका येणारा निंदा होणारी, तेंचमुळीं कारण अथवा हेतूपरत्वें म्हटलेलें तेथें वचनाची सिद्धता शिस्त का आज्ञा तीचमुळीं वंचिली होते आणि म्हणूनच तर त्या क्षणासंबंधीं निश्चय का निर्णयच एक तो निश्चयाचा करावाच करावा लागणारा.) (६२७)

आता ह्या कर्माच्या भजनीं लागलें तर तेथें कर्ता जो कर्माभिमानी जीव तोहीपण तीन तीन तऱ्हांच्या प्रकारास येतो. त्रिविधतेस पावतो तीन तऱ्हाचा होत असतोः (६२८)

चार आश्रमाच्या वशतेंकरून एकच पुरूष पण तो चार-ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास आश्रमाचा-प्रकाराचा दिसतो. त्याप्रमाणें ह्या कर्त्यासहीपण कर्मभेदामुळें सात्विक राजस तामस असें त्रिविधपणाचें कर्माचे प्रकार भिन्न असे (तीन तऱ्हाचे) आहेत. कर्त्यास त्रिविधत्व, तीन प्रकारच्या गुणकर्माच्या गुणावरून, भिन्नता येते. (६२९)

पण त्या कर्त्याचे होणारे जे तीन प्रकार (कर्म भिन्नतेमुळें होणारें) अशा त्या तिन्ही कर्म भेदामध्यें आतां प्रस्तुत प्रसंगी कर्माच्या सात्विकतेचे ते भेद ते सांगण्याचे करतो-नीट लक्ष असूंदे दत्तचित्त होऊन ते आकलन करण्याचे करावे. (६३०)

**मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते ॥ २६ ॥**

मुक्तसंगः = फल आसक्तिरहित, फलाविषयीं आसक्ति विषयासक्ति सुटलेलाः भोगेच्छा आसक्ति जनक विषय एक=मोक्ष पावलेला सुटलेला मुक्तहस्त दानशील [यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः। तदर्थं कर्म कौंतेय **मुक्तसंगः** समाचर ॥ ९/३ ॥

परमेश्वराप्रीत्यर्थ केलेल्या कर्माहून इतर कर्म लोकांना बंधनकारक होतें, म्हणून हे कौंतेया! ज्याची फलाविषयी सर्व आसक्ति सुटली आहे असा तूं आसक्ति सोडून परमेश्वराप्रीत्यर्थ कर्म करीत रहा. ३/९ 'कर्मयोग'] संबंध संयोग, विगलित झालेला. अनहंवादी=निरहंकारी, मीपणा नसलेला ज्याच्या तोंडून मीपणाची भाषा निघत नाहीं. समन्वितः=(धृति उत्साह.) स्वकर्तव्याविषयी धैर्य हे उत्साहयुक्त असते, संबद्ध असते. सिद्धि असिद्धि=सिद्धि असिद्धि यश व अपयश या दोहोमध्ये. (सिद्धी आठ आहेत. (१) अणिमा (२) गरिमा (३) महिमा (४) लघिमा (५) प्राप्ति (६) प्राकाम्य (७) ईशित्व (८) वशित्व.) निर्विकारः=विकाररहित असा कूटस्थ रूपांतर, फेरफार रहित, अचल, नित्य, निस्पृह, उदासीन, विकार-शून्य. (अक्षर, निर्गुण व ब्रह्म, परमात्मा). कर्ता सात्विक=सात्विकतेचा असा. 'सात्विक कर्ता' स्वाभाविक, सद्गुणी, जोरदार, प्रामाणिक, सत्वगुणी, मानसिक. कर्तृ=करणारा, (१) ईश्वर (२) ब्रह्मदेव (३) (व्या.) कर्ता (४) वायु.

अन्वय —मुक्तसंगः कर्ता सात्विक उच्यते। अनहंवादी कर्ता सात्विक उच्यते। धृति उत्साह समन्वितः कर्ता सात्विक उच्यते। सिद्धि असिद्धि (जय अपजय) निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते ॥२६॥

अर्थः— कर्मफलाविषयी सर्व आसक्ति-रहित असा कर्ता तो सात्विक कर्ता म्हटला आहे. केव्हांहि मीपणाची भाषा देत नाहीं असा निरहंकारी कर्ता सात्विक म्हटला आहे. स्वकर्तव्याविषयी धैर्य संतोष व आस्था, उल्हास, प्रयत्न उत्सुकता, निश्चय, हिय्या, दीर्घोद्योग व उत्साह यांनी युक्त असा कर्ता सात्विक कर्ता म्हटला आहे. मोक्ष, फल दैवीशक्ति सिद्धि प्राप्त होवो तरी निर्विकार, अचल, स्थिर असा कर्ता सात्विक कर्ता म्हटला आहे. फल संपादना सिद्धि जरी प्राप्त झाली नाहीं तरी निर्विकार निस्पृह असणारा निर्विकार रहणारा असा कर्ता सात्विक कर्ता म्हटला आहे. (श्लोक २६ वा ओव्या ६३१-६४९)

तरि फलोद्देशे सांडिलया। वाढति जेवी सरलिया।
शाखा का चंदनाचिया। बावन्ना या ॥ ६३१ ॥
का न फळताहि सार्थका। जैसिया नाग लतिका।
तैसिया करी नित्यादिका। क्रिया जो गा ॥ ६३२ ॥
परि फळ शून्यता। नाही तया विफलता।
पैं फळासीचि पांडुसुता। फळे काईसी ॥ ६३३ ॥
आणि आदरे करी बहुवसे। परी कर्ता हे मी नुमसे।
वर्षाकाळीचे जैसे। मेघवृन्द ॥ ६३४ ॥
तेवीचि परमात्मलिंगा। समर्पावया जोगा।
कर्म कलापु पैं गा। निफजावया ॥ ६३५ ॥
तया काळाते नुलंघणे। देश शुद्धिही साधणें।
का शास्त्राच्या वाती पाहाणे। क्रिया निर्णो ॥ ६३६ ॥
वृत्ति करणे येकवळा। चित्त जावो न देणे फळा।
नियमाची सांखळा। वाहणे हन ॥ ६३७ ॥
हा निरोधु साहावया लागी। धैर्याचिया चांगाचांगी।
तिया जिंतवणी या अंगी। वाहे कां जो ॥ ६३८ ॥
आणि आत्मयाचिया आवडि। कर्म करिता वरपडि।
देहे सुखाची परवडि। येवो न लाहे ॥ ६३९ ॥
ऐसा निद्रा दुरावे। क्षुधा न बाणवे।
सुरवाडु न पावे। आंगाचा ठावो ॥ ६४० ॥
तंव अधिका अधिक। उत्सावो धरी आगळिक।
सोने जैसे तुक। तुटलिया कसि ॥ ६४१ ॥
जरी आवडी आथी सांच। तरी जीवितही सलंच।
आगी घालिता रोमांच। देखिजति सतिया ॥ ६४२ ॥
मा आत्मया येवढ्या। प्रिया वालभैला जो धनंजया।
देहेचि सिद्धता तया। काय खेदु होइल ॥ ६४३ ॥
म्हणौनि विषय सुरवाड तुटे। जंव देहबुद्धि आटे।
तंव आनंदु दुणवटे। कर्मी जया ॥ ६४४ ॥
ऐसेनि जो कर्म करी। आणि कोण्ही येकी अवसरि।
ते ठाके ऐसी जरी। वाहे जेव्हां ॥ ६४५ ॥

तरी कडाडी मोडला गाडा । तो आपणया न मने अवघडा ।
तैसा ठाकलेनिही थोडा । नोहे जो का ॥ ६४६ ॥
ना तरि आदरिले । अव्यंग सिद्धी गेले ।
तरी तेही जिंतले । मिरवूं नेणे ॥ ६४७ ॥
या खुणा कर्म करिता । देखिजे जो पांडुसुता ।
तयाते म्हणिपे तत्वता । सात्त्विकु गा ॥ ६४८ ॥
आता राजस कर्तया । वोळखणे हे धनंजया ।
जे अभिलाखा जगीचि या । वसौटा तो ॥ ६४९ ॥

चंद्रः=चंद्र, कापूर. चंदकः=चंद्र, मत्स्य, विशेष. चंदन=चंदन. (चंदनाचल=मलयपर्वत. चंदन पुष्प=लवंग. चंदन सारः=उत्तम चंदन, वज्राक्षार) चंदनीया=गोरोचन. चंदीर=हत्ती, चंद्र) (६३१) क्रियानिर्णो-क्रिया निर्णय. (६३६) वृत्तिकरणे-वृत्तिकरणा न देणे-ने दणे. नियमाची-नियमाचिया. वाहाणे हन-वाहेसदा. (६३७) जिंतवणिया आंगी-चिंतवणी जिती आंगी. का जो-जो का. (६३८) आत्मयाचिया-आत्मयाचिये. कर्म-कर्मे. देहे सुखाची-देहसुखाचिये. (६३९) ऐसा निद्रा दुरावे -आळस निद्रा दुऱ्हावे. बाणवे-बाणवे. (६४०) अधिका अधिक-अधिकाधिक. उत्साहो. (६४१) सतिया-सतिये. (६४२) देहेचि-देहहि. (६४३) जंव-जंव जंव. तंव-तंवतंव. (६ ४) येकी-एके. जरी -परी. जेव्हां-जरी. (६४५) मोडला-लोटला. आपणया न मने-आपणपे न मनी. (६४६) जिंतले-जिंतिले. (६४७) या इया. गा-कर्ता. (६४८) राजस कर्तया-राजसा कर्तेया. अभिलाखा-अभिलाषा जगीचिया-जगाचिया. वसौटा तो-वसौटा. (६४९)

[आगुर आगू, वचन, करार, संमती, आगुरव अगुरू चंदनाचा. गुर=उद्योग, दीर्घश्रम, बावन्न-वर्णापरौता कोणताही मंत्र नाहीं. दीर्घोद्योग परिश्रमानें ह्या देहाचें संसरणें-अक्षराचें संमरणें म्हटलें तें तेथें सर्वथैव संसारच एक थटलेला, आतां आसक्तिजनक विषय त्यागानें एक निस्पृहताच नटली शोभली, म्हणून ह्या कर्म करण्यामध्यें जर फळाच्या हेतूनें इच्छेनें कर्म करणें का उद्देश कारणपरत्वें, तें कर्म करणें तेथेही पण एक इच्छाच आकांक्षेनें आहे ह्या दोहींनीं म्हणजे फळ अथवा उद्देश नच पुढें करून सोडून देऊन जर नित्यनैमित्तिक कर्मे करीत राहिले तर तें जसें का सर्वोत्तम असा जो बावन्न चंदन त्या वृक्षाप्रमाणें सरळल्या जशा अशा वाढतात बावन्न का सर्ववर्णी, तशी कर्मी वाढ होते नित्यनैमित्तिक (नित्य जें कायमचें सततचें नेहमींचें अवश्यक स्वभावसिद्ध जेथें सतत तत्पर राहाणें, असणें होतें. असें जें कांहीं कर्म तेंच मुळीं, निमित्ताची, कारणपरत्वें व्यवस्था लाभतें, व येथेंच मुळीं तें महत्त्वाचें आहे असें होतें व नैमित्तिक प्रसंगोपात्ततेचें असें कारणपरत्वें होतें. (११४) तिन्ही काळीं तेजातें तेज करणेंच करावें लागतें जरी तेथें ते सहजतेनेंच होणारें असल्यानें डोळ्याच्या ठिकाणीं ती अवलोकनशक्ति कांहीं एकाद्या अधिकतेची अशी होत नसते. (११५) गति न संपादिता चरणामध्यें गति असतेच जशी दीपबिंबाच्याठायीं दीप्ती, तेज, कांती, शोभा जशीं का आहेच आहे. (११६) सुवास नच देता चंदनाच्याठायीं सौगंधत्व असतेंच असतें. अधिकाराचे तसें रूपच की अहो! योग्यतेचें, सत्तेचें रूपच तें एक चंदनाच्या आंगचा सुवास तो सुवासन परत्वें, सौदर्यानें कीर्तीनें पाहिले होते. (११७) नित्य कायमचे असें जें कांहीं ह्या जनामध्यें-जगामध्यें-लोकामध्यें बोलिलें जातें तें हेंच जाण. याप्रमाणें तुला नित्य तें कोणतें अशी ही दोन्ही तुजला रूप करून दाखविली. (११८) (अध्याय १८ वा) नित्यनैमित्तिक कर्माची वाढ होऊन येते. तेथें परमात्माच श्रीभगवान श्रीकृष्णच भेटणारा होतो व मुक्त आत्माच जसा का आदेश, खेंव, विरहिणीची उत्सुकता परिणमून असल्यानें उपमा ही उत्कृष्टपणानें शोभली होत आहे. फळाचा उद्देश राहिला पुढें घेतला नाहीं, सांडिला

पण जेथें पल्लव शाखा सरळपणें वाढल्या तशी कर्मे तेथें पानेचमुळीं ती शंकरास–शिवास–भवास वाहाणें जसें असें पाहुणेरूच उपयोगी जसें. [ म्हणउनि विसुरा काई येणे । ईश्वर आकळावा कवणे । जो आपले मान नेणे । आपणचि ॥ १७४ ॥ ५ ॥] (६३१)

नागवेलीची पाने–नागवेलीना कांहीं फळें येणारी नव्हत पण पानें तींचमुळीं सार्थकी का कारणी लागलीं–नागलतिका [ लस्त = आलिंगन, कुशल लतिका = लहान लता, मुक्ताहर. लत्तिका = गणपत, चौपई. लतांत = फूल. लता बाण = मदन ] त्या क्रियाच कीं नित्य अथवा नैमित्तिकतेच्या जो क्रियारूप होऊन आहे तेथें तप स्वाध्याय ईश्वर प्रणिधान हें त्या क्रियांच्या अंगभूत असल्यानें तेथें क्रिया शब्दानेंच-मुळीं तें नित्य का नैमित्तिकतेचें तें तपच स्वाध्याय इत्यादि म्हटलेलें. (६३२)

फळ उद्देश सांडिला–फळशून्य ब्रह्म [ ब्रह्म–ब्रह्मता : **आकार, निराकार, शून्या, शून्य अभंग** "आकारी नाही ते निराकारी पाही । निराकारी राही शून्या शून्य ॥ जेथे शून्यचि मावळलें तेथें काय उरलें । हेचि सांगे एके बोले मजपाशी ॥ १ ॥ शून्य कासयापासाव जाले । शून्य ते कवणें केले । हें सांगिजोजी येक्या, बोले ·गुरुराया ॥ ध्रु॥ आपण शून्याकार की आपण निराकार आकार निराकार मूर्तिमंत दाऊं । आकार निराकार ये दोन्ही नाहीं तेची तूं पाही आपणाचे ॥ २ ॥ जेथें अनुभवची नाही तेचि तूं पाही । स्वानुभवी राही तुझा तूचि तेथें चंद्रसूर्य एक होती तेथें कैची दिन राती । ऐसे जे जाणती ते योगीश्वर ॥ ३ ॥ कर्माकर्म पारुषले । देवधर्म लोपले । गुरुशिष्य निमाले जाले क्षीरसिंधु ॥ तेथें गोडीविण चाखणे, जिव्हेविण बोलणें, नेत्रेविण पहाणें तेचि 'ब्रह्म' ॥ ४ ॥ हातीं घेउनिया दिवटी, लागिजे अंधारापाठी अंधार न देखे दृष्टी उजियेडु तो ॥ **बाप रखुमादेवीवरू विठ्ठल देखणा** दृश्य द्रष्टेपणा माल्हावले ॥ ५ ॥ निजाचे तेज की तेजाचे निज । तेथील ते गुज सांग मज ॥ १ ॥ ब्रह्म ते कायी, ब्रह्म कायी । ब्रह्म ते कायी सांगा गोसावी ॥ २ ॥ ब्रह्म सदोदित असे सर्वा भूती । म्हणऊनि सागे जना प्रति ॥ ३ ॥ 'ब्रह्म' ऐसे नामयानें जाणिले । हृदयीं धरिले प्राणलिंग ॥ ४ ॥ **बाप रखुमादेवीवरू** हृदयीं प्रगटला । निवांत राहिला ज्ञानदेवो ॥ ५ ॥ ज्ञा. गा. ] वाढती शाखा जेवी–नाही तया विफलता, येथें आतां ही पल्लव शाखाच मुळीं ती सफळता म्हणून तेथें सफलतारूपी फळासच ती फळे कोणती तीं ! (६३३)

आदर देऊन जीवभावेंकरून ती नित्यनैमित्तिक कर्मे सारतो, बहु विपुलतेची अशी करतो, येकी अनेक–अनेकी येक, अशी ती कर्मे व्यापाची अशी करीत राहातो; पण मी कर्ता असा (अहंभाव) वाटत नाहीं (पण 'कर्ता' मी अशी उचल होत नाहीं. मीपण त्यास पाहात नाहीं) पावसाळ्यामधील मेघाचा समुदाय जसा विपुलतेच्या व्यापाचा असा [ इंद्रपदाचे तो स्वतःस मानीत नाहीं. इंद्रपदच जसें असें स्वतःस उमसचे नाही. बहुवसपणाचा असा सर्व गगनभर व्यापणारा असा तेथें मेघवृन्दच ते म्हटले वर्षाकाळीचे मेघ नुसतेच गर्जत नाहींत (ते वर्षतात) तसें. (६३४)

त्याचप्रमाणें कीं अहो ! परम आत्मलिंगास समर्पावयाजोगा असा कर्म (धार्मिक कार्य, गुणधर्म कामगिरी, गति, देव, कृत्य, परिणाम मेहनत) कलाप शहाण्यानी मानलेलें—

[ अलंकार समूह बुद्धिमान्य कटिभूषण, कमल बीज (कोकिळ, मोर) ] निपजण्याकरितांच की तो, तीं नित्यनैमित्तिकें करितो.

**ईश्वर, लिंग, ज्ञान, ज्ञेय, साध्य—**

ईश्वर हेतु साध्य करण्याकरितां ब्रह्मच तें जीवाचें सूक्ष्मस्वरूप तें गुणधर्मानी अलंकृत करण्याकडे धार्मिक कार्य शहाण्यानें केलेलें बुद्धिमान्यतेचें तें ब्रह्मयोग्यतेच्या सामर्थ्यास–समर्थतेस येतें. जसा का मोर तो मेघानें आल्हादणारा अथवा कोकिळ तो वसंत ऋतुमध्यें गाणारा तेथें योगच वर आणला–ऋतूचमुळीं

उत्तेजिततेच्या मदनसादृश्यतेच्या गुणधर्मास आणला, शाळूंकेतील शिवलिंग, ब्रह्मच तें, ईश्वरच कीं, तो असे खरेपणास आणणें ज्यायोगेंकरून तेथेंच धार्मिक कार्याचा सर्व भार अलंकार पुरविला, कंबरेचें वस्त्रच तें कंबर बांधण्यास कसून काम करण्यास उपयोगांत घेतलें जसें, एकंदरित ईश्वरलिंग ज्ञानसाधनतेच्या जोगें केलें ज्यायोगें अशीं कृत्यें अशा कार्याचा समूहच एक तो पुढें घेऊन असतो व तेथेंच रमतो. (६३५)

तपन नामध्वनिर्लिंगावरि प्रविष्ट आदि आत्मा ज्योतिर्लिंग मायावस्त्र त्यावरून लिंगावर वर्षण्यासाठीं–ज्यायोगें श्रीगुरू तुष्टतील असा कर्म कलाप–मूर्ति मूर्त झाली–आकारास आणिली निराकार तें आकारलें ज्यायोगें होईल असें जें कांहीं काळास चुकवणें (काळावर चढणें, काळाच्या पलीकडे जाणें, काळास ओलांडणें आक्रमणें, काळावरही ताण करणें, अथवा अन्न खाण्यानें, काळासही प्रकाशणें जें) तसेंच देश (जागा, नियम, टप्पा, प्रांत, देश-प्रामाण्य, पावित्र्य खरेपणा) शुद्धीही पण साधावी लागणारी अथवा शास्त्राच्या वाती म्हणजे प्रकाशानें (अथवा डोळ्यांनीं–डोळ्यातच वाती लावून पाहाणें जें–शास्त्रसंबंधीचा) जो कांहीं क्रिया निर्णय तप स्वाध्यायासंबंधीचा आज्ञा त्याविषयीं निश्चय जो सांगितला असेल तें पाहाण्यासाठीं, कीं, (६३६)

वृत्ति एकत्रित–एकाग्र करणें (जें एकवळा)–चित्त तें फळावर नच जाऊं देणें जें, निर्हेतुकतेचें करणें जें, याकरितां नियमांची ती (स्नान उपोषण जागरण तीर्थयात्रा अशी का असा तो कमरपट्टाच एक अथवा करगोटाच तो (अथवा नांगरच एक नांव थोपविण्याचें थांबविण्याचें वेळीं योजिलेला) का सांखळीच एक ती (एकजीव झालेली, एकमेकांत अडकलेली. ती कडी जशीं आपल्या व्यवस्थिततेने असावें अशी) वाहून आहे, उपयोगास आणून आहे. (६३७)

सहन करण्याकरितां असा हा तेथीलचा निरोध अटकाव (चित्त वृत्ति निरोध करून योगच एक-रूपच एक होऊन असणें) तेथें धैर्याची परमसीमा (ही अक्षराचें उत्तमत्व अहो ती देवी सरस्वतीच मुळीं वाङ्मयाचें उत्तमत्व घेऊन व्यवहार करण्यास आलीं असें तें करणें पाहाणें ते) धृतीची कमालच एक साह्यतेची केली. (वृजिनं संतरिष्यसि) उपाय योजणें जें. अहो जसें स्वर्गातील नदी जी पवित्र गंगा तीच मुळी अवतरण घेऊन ह्या भूलोकावरील लोकांना आपले दानतेची ती अपूर्वता पाहविण्याकरितां नेहमीं चांग, चांग तसेंच अचांग अचांग तें चांगविलें असें भलेपणाचें उत्तमत्व ह्या जगीं आपलेपणानें सुख सर्वस्व पोहोचविणारी ह्या लोकांना तेथीलच्या व्यवहाराची अपूर्वता ही तर देवलोकही पण दिपवून सोडणारी अशीच कीं–अहो योगयोग तो नुसता तो काय क्रिया नच जर तर तो योगाचा होईल? म्हणून तेथें क्रियाभारच तो उचलिला गेल्यानें तेथें रिपूंचे नांवच जिकलें जीव ऊर्मी त्या नाहीशा झाल्या व एक संचारच कीं आहो परम देवतेचा तोच मुळीं नामच एक पुढें करून मोहऱ्याचें करून आहे. असें तें आपलेपणाचें तें एकपणच कीं आतां तर तें एकमेव अद्वितीयतेचें तें सौजन्य तेच नटलें–अंगच सर्व तेथेंच मुरलें आहे असें जें क्रियाभाराचें उत्तम मध्यमत्व तेंच सर्वोत्तमतेच्या अंगानें जीवित साफल्याचें जियालेपण हे प्रेमच एक क्रिया धैर्यानें जिंतलें. जें तेंच कीं अहो परमात्मारूपच शोभविलें नटविलें रम्यपणाचें केलें व आतां तर अहो तेथीलची ती रमणीयता ती सात्विकाचें तेंच मुळीं काय अहो साधारण जीवित तें–जीवित भाराचें मोठेपण तेंच मुळीं झाडून टाकून चरणीं विनटलें. (६३८)

आत्म–आवडीनें नित्य नैमित्तिक कर्मे करितां करितां तेथें अनेक आत्म्यांच्या आवडीसाठीं कर्में प्राप्त झाली तरी जो देह सुखाची आस्था धरीत नाहीं.–परवा करीत नाहीं (दुसऱ्या तऱ्हांची जी कांहीं येणी होणारी–काय काम, काय क्रोध, काय लोभ, ह्यांची जी कांहीं तऱ्हतऱ्हांची ती आंगावर येणारी सीमा तेथें देहसुखाची परवडीच होणारी एक व्यर्थतेचे मिरवणेंच जसें हें तेथें येणार असणारे असें तेथें आले तरीसुद्धां जो) आत्म आवडीच एक पुढें घेऊन आहे. (६३९)

तेथें आंग मन हेंच मुळीं आपला ठाव पाहाणारे तेथें सुख का विश्रांतीचे सुरवाड-सुख नच भेटणारे -ती सुखावस्था पावत नाहीं क्षुधा हीच मुळीं वाणली नच होणारी, तेथें जेवण जेवणें का भोजन सेवणें हेंहीपण आठवतच नाहीं. जसें का मनानें आपला आंगाचा ठावच पाहिला निद्रा ही पण कसची न् काय-एक मुळीं ती आवडीच आत्म्याची तीच सर्व कांहीं हें सहन करून असतेच (असावेंच) अशी होणारी केव्हांहीं. (६४०)

तेथें आतां तर अधिकाहून अधिक असा आगळाच (अधिक तर) एक उत्साह परिणमून आलेला तेथें सत्वाची सीमाच पाहविली होणारी कीं, जसें कां सोनें आपला कस तो तुटणारा झाला असें पाहील तर तेथें केव्हांहीं सुवर्ण तें आपली आगळी का लोकोत्तर अशीं ती तप्त सुवर्णासारखी सीमा पुट पाहाणारी एक सत्व सीमाच-पाहून कां घेऊन असेल कीं. (६४१)

जरी आवडी खरी, तरी मग जीवितही कीं तुच्छ असे, दुःखरूप ते लाजिरवाणेच अहो सतीच्या अंगावर सहगमनाचे वेळी प्रेमाचे रोमांच येतात कीं, आगीत उडी घालताना सतीच्याहि अंगावर रोमांच उभारतात. (६४२)

अहो, अशा एवढ्या प्रियपणाच्या आत्म्यास जो वश झाला प्रियास प्रियाच्या आवडीने मिळाला त्यास देह हे कष्टतांना काय खेद होईल ? (६४३)

म्हणून विषयाची आवड का विषयसुख हे सुटते, तुटते, जों जों देह हे बुद्धीचे आटणेच एक पाहून आहे तो तो त्यास तर कर्ममध्येंच कीं आनंद तो दुपटीचा होऊन येतो. (६४४)

अशा तऱ्हेने जो कर्म करतो तसेंच एखादे वेळेस ते कर्म बंद पडले असा प्रकार झाला जरी-, अशी गोष्ट घडली-, जरीसुद्धा— (६४५)

—तरी देहगाडा जो मोडतो कां कडकडाटाने गाडा मोडला तो काहीं आपल्या स्वतःच्या मनीं अवघड वाटून घेणारा होत नाहीं त्याप्रमाणें थांबणेंच एक झाले तरी ज्याचा जीव म्लान, लहान, थोड थोडा असा होत नाही. (६४६)

अथवा आदरिलें तें व्यंगतेशिवाय सिद्धीस गेलें तरी कर्म तेंही पण जिंतले असें ते जागरुकतेचें का जिवंत असे तें तो कांहीं मिरवीत बसत नाहीं. (६४७)

अशा ह्या खुणा कर्म करतांना जो हे पाण्डुसुता पाहाण्याचें करतो त्यासच कीं अहो तत्त्वतः सात्त्विक कर्ता म्हणावा. (६४८)

आतां यावर राजस कर्ता जो, तो कसा ओळखावा हे धनंजया ! जो कीं जगाच्याहिपण अभिलाषाचा एक स्तंभच-आधारच वसौटाच जसा. (६४९)

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥**

रागी=कामुक, विषयासक्त, अनावर मनोविकाराचा. कर्मफल प्रेप्सु=कर्माचें फल इच्छिणारा (पसा). लुब्धः=लोभी, हावरा (लेब्धक, लुब्धता=जार कर्मी) हिंसात्मकः=घातकी. अशुचिः= अपवित्र, अशुद्ध, ओंगळ, अप्रतिष्ठ. हर्षशोकान्वितः=हर्ष (आनंद रोमांच), शोकानी (खेद दुःखानी) युक्त-ग्रासलेला परिकीर्तितः (कृत=स्तुति करणें, उद्धारणें, सांगणें) म्हटला आहे.

अन्वय :—रागी कर्ता राजस परिकीर्तित: । कर्मफलप्रेप्सुकर्ता राजसः परिकीर्तितः । लुब्धः कर्ता राजसः परिकीर्तितः । हिंसात्मकः कर्ता राजसः परिकीर्तितः । अशुचि कर्ता राजसः परिकीर्तितः । हर्ष शोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

**अर्थ**:—कामुक का विषयासक्त असा जो कर्ता त्यास राजस कर्ता म्हणतात. कर्मफलाची इच्छा करणारा (ईप्सा) असा जो कर्ता त्यास राजस कर्ता म्हणतात. लोभी हांवरा असा जो कर्ता त्यास राजस कर्ता म्हणतात. हिंसात्मक म्हणजे घातकी असा जो कर्ता त्यास राजस कर्ता म्हणतात. अपवित्र असा जो कर्ता असतो त्यास राजस कर्ता म्हणतात, हर्ष व शोक आनंद, खेद, दुःख, यांनीं युक्त असा जो कर्ता असतो त्यास राजस कर्ता म्हणतात. (श्लोक २७ वा ओव्या ६५०–६६२)

**तयापरि जो अशेषा। विश्वीचिया अभिलाषा।**
**पाय पाखाळणिया देखा। घरटा जाला ॥ ६५० ॥**
**जैसा गांवीचिया कश्मळा। उकरडा येकवळा।**
**का स्मशानी अमंगळा। अघवियाचि ॥ ६५१ ॥**
**म्हणउनि फळाचा लागु। देखी जिये असलगु।**
**तये कर्मी चांगु। राहो मांडी ॥ ६५२ ॥**
**आणि आपण जालिये जोडी। उफाळो नेदी कवडी।**
**क्षणक्षणी कुरोंडी। जीवाची करी ॥ ६५३ ॥**
**कृपणु चित्ती ठेवा आपुला। तैसा दक्षु परावया माला (मोला)।**
**बकु जैसा खुंतला। मासियासी (मासेयासी) ॥ ६५४ ॥**
**आणि गोवी गेलिया जवळि। के झगटलिया आंगफाळी।**
**फळे आंतु पोळी (पोकळी)। बोराटी जैसी ॥ ६५५ ॥**
**तैसा मने वाचे काये। भलतया दुखवितु जाये।**
**स्वार्थु साधिता न पाहे। परावे हित ॥ ६५६ ॥**
**तेवीचि आंगे कर्मी। आचरणें नव्हे क्षमी।**
**न निगे मनोधर्मी। अरोचकु ॥ ६५७ ॥**
**कनकाचया फळा। आंतु माजु बाहिर मैळा (मौळा)।**
**तैसा सबाह्य दुबळा। शुचित्वे जो ॥ ६५८ ॥**
**आणि कर्मजात केलया। फळ लाहे जरी धनंजया।**
**तरी हरिखे जगा या। वांकुल्या वाहे ॥ ६५९ ॥**
**अथवा जे आदरिले। हिनफळ होय केले।**
**तरी शोके तेणे जिंतिले। धिःकारो लागे ॥ ६६० ॥**
**कर्मी राहाटी ऐसी। जयाते होती देखसी।**
**तोचि जाण त्रिशुद्धीसी। राजसु कर्ता ॥ ६६१ ॥**
**आतां तयापाठी येरू। जो कुकर्माचा आगरू।**
**तोही करूं गोचरू। तामस कर्ता ॥ ६६२ ॥**

*पाय पाखाळणिया घरटा*=पाय धुण्याचें घर न्हाणीघर. (६५०) गावीचया–गावीचिया. येकवळा–होय येकवळा. अघवियाचि–आघवयाचि. (६५१) देखी–देखे. असलग=सहज. तये–तिये. राहो–रोहो–उपक्रमः मांडी=आरंभ करी. (६५२) जोडी=जोडी जोडलेल्या मिळवल्यापैकीं, जीवित जोडी. उफळो नेदी=खर्चित नाही. क्षणक्षणीं (क्षणोक्षणी)–क्षणक्षणा. (६५३) खुंतला–खुतला=ध्यानस्थ, भुकेला. मासियासी–मासेयासी. (६५४) फाळी=फोडतो–फाडी. आतु–तरी आंतु. पोळी–पोकळी. (६५५) तैसा–तैसे. वाचे–वाचा. दुखवितु–दुःख देतु. परावे–पराचे. (६५६) अंगे–आंगे, अचरणें–आचरणें.

नव्हे–नोहे. निगे–निघे. अरोचकु–अरोचक = अरूची, वीट आणणारी. (६५७) कनकाचिया = धोत्र्याच्या फळाला आंत माज म्हणजे कैफ व बाहेर कांटे. मैळा–मौळा = काटवण. बाहिर–बाहेरी. (६५८) केलया –केलिया. या–यया. हरिखे–हर्षे = हर्षानें. वांकुल्या वाहे–वाकुलिया वाये = वेडावतो. (६५९) जिंतिले– जिंतले–शोके तेणे जिंतिले = शोकाकुल होऊन. (६६०) त्रिशुद्धीसी = निश्चित खचित. (६६१) तया–यया. (६६२)

**राजस कर्ताः—**

त्याप्रमाणें जो सकळ विश्वाच्याहिपण अभिलाषांना पाय धुण्याचें न्हाणीवजा घरच, असा (न्हाणीवजा) झाला. (६५०)

जसा का गावांतील सर्वेच्या सर्व मलीन कश्मळास–पातकास केरकचऱ्यास तर (एकवळा ऐक्यच अथवा एकेठायीं जमाव) उकरडा हेच एक ठिकाण उकरड्याचा ढीगच एक जागानी अथवा अहो स्मशानीं तर अवघ्या सर्व (अमंगळाचें कीं) ओंगळ अशा पातकांचें एक ठिकाणच की स्मशान तें जसें. (६५१)

म्हणून जेथें कां एक सहज फळच हाती येईल अशाच मुळीं कर्माचा लाग पाहातो त्याच कर्माचेठायीं कीं आरंभ करतो. [फलाचा लाग, माग, मार्ग अगदीं सहज दिसणारा त्यानें, कर्माच्याठायीं आपण राहो म्हणजे मार्ग काढतो प्रारंभ मांडतो.] (६५२)

आपणच एक जोडी हित जीवित यात्रा झाला आहे. जन्मास येऊन ज्यानें जोडीच मिळविल्यापैकीचे प्रियकरपणाचें होणें केलें तो तर आपण जोडलेल्या पैक्या जोडीमधील एक कवडीही खर्चित नाहीं–वर आपल्या जीविताचीच मुळीं क्षणोक्षणी कुरोंडी करणारा असा. (६५३)

कृपण आपल्या ठेव्यास चित्तामध्यें अति दक्षतेनें बाळगणारा तसा दुसऱ्याच्या मोलास, मालास मालमत्तेस जीवित धनास (मरेलबिरेल कदाचित् जेथून पैशे येत आहेत ती जीवित संपत्ति म्हणून [जीवित अगदीं जगण्यापुरतेंच जीवन योगक्षेम पुरविणारा (फक्त जीवित जगणेंच एक पण) तेथें मालमत्तेची स्त्री, मुलें, घरें, दारें, गुरेढोरें का जमीन–जुमल्याची सर्व गोष्ट] त्यानें आपल्याच उपयोगी लाविलेलीं. तेथें त्यानें किती तरी बरें दक्षतेनें असावें जेथें कां आपली सर्व दानतच एका जगानें अजमाविली होणारी. अगदीं डोळ्यात तेल घालून राखत असलेला–पाहाणारा–झालेला जसा का बगळा, बकच एक तो माशा करितां मासे जे पाण्यामधिल कीं जसा भुकेला, मासा नदीतला जो त्याकरिता कां खुंटला.

**परावा**—कदाचित् मोक्षच कीं एक पाहाणारा, देणारा, का शत्रूच जसा का जपला गेला जचला गेला दुसराच कीं, एक असा मानला श्रेष्ठच कीं तो एक मानावा नां कीं, (आसक्तीची गोष्ट काय बोलण्याचालण्याची ती कसची) अहो, परतच मुळीं का संसाराकडेच कीं, एक सर्व जीव लाविलेला जेथें. तेथें मागें मागें फिरणेंच एक व्हावें, जसें का, ह्या पराव्याच्यानें फेरफेराच्यानें मोबदालाच एक कीं आतां वसूल-तेचा व्हावाच जसा, असाज अंदाज पाहविला गेलेला जेथें. (६५४)

आतां येथें उपमा ती कशीं नटली म्हणावी तर 'बोरांटीच' एक जशी का जवळ गेले असतां गोविते, अडकविते, अडवणुकीचे करते, फसविते, तेथें जर का झगटणें केलें झोंबणें केलें. जीवित धारण जीवन ज्योति ती स्थिर, शांत, निश्चळ करावीच पण प्राकृतिकतेच्या त्या ह्या देहधारणेच्या सहज जीविताच्या विकारवशतेच्या शरीरधाऱ्याच्या स्वाभाविक वृत्ति त्या जर का नच आवरल्या व तसेंच मुळीं अशांत घेऊन जर का तेथें हिसकणें केलें तर आंगच मुळीं फाळलें होणारें कीं, होतें जसें जेथें फळें पहावीत तों ती तर कांट्यांच्या आंतच मुळीं असल्यानें तेथें जर का ती फळें घेण्याचा उद्देश केला तर एक तें पोळणेंच पुढें होऊन असलेलें असतें. (६५५)

अगदीं त्याबरहुकुमच कीं, तो तर मनानें वाचेनें व कायेनें वाटेल त्यास, भलत्यासहिपण, कोणाही कसल्या एकास तर, दुखवितच राहातो, असतो-,जातो तेथें अहो एक जो स्वार्थ, स्वतःचे हित, मतलब, स्वःतच पैसा, अर्थ स्तुति वाद, लोकव्यवहार तोच मुळीं सर्व महत्त्वानें पुढें घेतलेला असल्यानें तेथें स्वार्थच एक सर्वथैव साधावाच साधावा कीं, असेंच मनानें-मनोभावेंकरून, वाचा पुरस्सर (बुद्धि) देहपरत्वेंही घेतलेलें तेथें कसचें तें दुसऱ्याचें हित पाहाणें तें.

त्याचप्रमाणें अंगानें मनानें, कर्माच्याठायीं, आचरणें तें, तें तर मुळींच सोशिक असें नसतें, सहिष्णुतेचें योग्य समर्थतेचें, शांतीचें, (क्षमाशील पृथ्वी जशी तसें मुळींच कीं नसतें.) क्षमा करणारें असें केव्हांहीं होतच तें नसणारें-अशी ह्या त्याच्या मनाची अथवा अंगाची गोष्ट झाली आतां मनोधर्मासंबंधीं [मनाचे धर्म तें प्रसन्नता (तृप्ति, समाधान, संतोष, शांति.) सौम्यत्व म्हणजे शांति मौन, मनोनिग्रह भाव संशुद्धि, शुद्धभावना, अंतःकरणाचें पावित्र्य हीच मुळीं तपे म्हटलेलीं तींच येथें मनाचा उत्तम धर्म तो पाहाणारी होत.] पाहावें तों तेथें मनाचे जे धर्म तेथें तर वीट आणणारे असेंच तें सर्व अरूचीच एक तो असा झाल्यानें मुळींच त्या मनधर्माचा विचारच करीत नाहीं. (६५६)

कनकाच्या म्हणजे धोत्र्याच्या फळास तर आंतमध्यें माजच (मज्ज-माझा-माजी-घर) निशा, धुंदी, कैफच एक व बाहेर पहावें तो 'अशोक स्तारणस्तरः शूरशौरिर्जनेश्वरः' अथवा स्वच्छतेसंबंधीं, शुद्धपणासंबंधीं, कांटे, मैळा, मौळा, तसा अंतःकरणीही पण दुबळा दुर्बळ कीं. तसेंच बाहेर पहावें तों (जमाव, संगत, रीतरिवाज-हीपण तसाच तो दुबळाच एक बलहीन असाच कीं, कृशच कीं, अशक्तच की, अशक्तपणाचा असाच कीं. (शुच्=शोक करणें, शुच्, शुचा=शोक. शुचि=ग्रीष्मऋतु, शुद्धपण, पांढरा रंग, शुद्ध, स्वच्छ. शुचिव्रता=सदाचारी, धार्मिक. शुचिष्मत्=तेजस्वी, शुद्ध, अग्नि. शुचिस्=तेज, प्रभा.) (६५७)

तेथें कर्मजात (कर्म म्हणून जेवढें कांहीं हालचाल करणें, उठणें, बसणें, निजणें, बोलणें, चालणें व्यवहारणें, रमणें खाणेपिणें इत्यादि) केल्याचें जरी का पण फळ मिळणारें होतेंच फळ मिळतेंच त्यास तरी हे धनंजया, तो तर हरकून जाऊन, हरकततेचा, हर्कणेचा होऊन हरिखला, हकिकला, गर्वानें फुगला, गर्वावर चढला असा होऊन जगास तर वांकुल्या वागविणारा, दाखविणारा, वाहाणारा असाच होतो जगास वेडावतो कीं. (६५८)

जग काय सर्व वेडेच व हाच काय तो एकला भला जसा का त्यास कोणीच विचारीना म्हणून जेवढी संधी सांपडली तेवढी त्यानें आपल्या उपयोगी करून घेतली म्हणून येथें मूर्ख म्हणून त्यागिलेला तो तर कांहीं साधनाची का तपाची वाट न धरितां जेवढा कांहीं एक ह्या जगासच मुळी 'जगानें कांहींही नाहीं दिलें तरी बेहेत्तर' म्हणणारा असा आइता ह्या हरिखण्यानें वाकुल्या दाखविणारा झालेला. (६५९)

जें कांहीं आदरानें केलेलें तेथें केलेपण, तेंचमुळीं फळहीन असेंच होणारें, केलें तरी, अहो ह्या जीवितासच मुळीं डाव देणारें तें मायेचे का प्रकृतीचे दोन गडी शोक व मोह तेथें आतां शोकतेचा होऊन की मोठ्या शौकीनतेचा असा गुंडच जसा त्यास तर शोकानें जिवितेतेचे ते जगणें तेंच शोकाचे झाल्यानें एक जगास तर धिःकारणेंच करूं लागतो.* (६६०)

*फूटनोट—राजस कर्त्याच्या ठायीं सगळया प्रकारच्या वासनांचा संग्रह असतो. फळ मिळेल अशीच कर्मे तो करावयाचा; आणि स्वतःचा कुणगा कुणबावा सांभाळून दुसऱ्याच्याहि वस्तूवर नजर ठेवावयाचा. बोरीचे कांटेरी झाड जसें जवळ जाणाराचे वाभाड काढतें त्याप्रमाणें दुसऱ्याला तो दुःख देतो आणि स्वतःच्या मतलबापुढें दुसऱ्याच्या हिताची त्याला पर्वा नसते तो कर्मफळ प्राप्तीने हुरळून जातो आणि तें फळ न मिळालें म्हणजे जगाला शिव्याशाप देतो.

अशा तऱ्हेची ज्याची कर्मामध्यें राहाटी होत आहे असें जें कांहीं देखशील तेंच मुळीं सर्वथैव त्रिशुद्धिही निश्चितपणेंच राजस कर्त्याचें जाण-राजस-राजसिक-रजोगुण प्रधान, असा तो कर्म (कर्ता)-करणारा जाण. (६६१)

आतां यावर जो कोणी एक कुकर्माचा (कु=शब्द करणें. कु=पृथ्वी, वाईट, किंचित् इत्यादि अर्थी.) आगरच (आगर:=अमावास्याच एक) कीं असा तोंच मुळीं तामस कर्ता तो कसा ते गोचर म्हणजे आटोक्यातलें दृश्य असे करू या. (६६२)

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥**

अयुक्त=मनोनिग्रह शून्य, निराळा, न जोडलेला, युक्तिविरुद्ध. प्राकृतः = अविचारी, ग्राम्य, हलका, मूळचा. स्तब्धः=ताठ्याने वागणारा जड, क्रियाहीन, शठः=ठक, धूर्त. नैष्कृतिकः=दुसऱ्याचा अपमान करणारा, दुर्वर्तनी, दुष्ट, आळशी. नैशिकात्मक, नैशात्मक=अंधःकाररूप. नैश, नैशिक=रात्रीचे. विषादी=दुर्मुखलेला, दुर्मुख, मनोभंग झालेला, खेदाचा, अनुत्साहाचा. दीर्घसूत्री=चेंगट, दीर्घसूत्री, रेंगाळणारा, मंद आळशी. तमस्=अंधःकार, तमोगुण, मोह, पाप, शोक, अलसः=आळशी, मंद.

अन्वय:—अयुक्तः कर्ता तामस उच्यते । प्राकृतः कर्ता तामस उच्यते । स्तब्धः कर्ता तामस उच्यते । शठः कर्ता तामस उच्यते । नैष्कृतिकः कर्ता तामस उच्यते । अलसः कर्ता तामस उच्यते । विषादी कर्ता तामस उच्यते । दीर्घसूत्री कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

अर्थ:—योग नच जोडलेला असा मनोनिग्रहशून्य कर्ता तो तर तमोगुणासंबंधीं कर्ता म्हणावा कीं, अविचारी. ग्राम्य, कर्ता तो तमोगुण संबंधीं म्हणावा कीं, ताठ्यानें वागणारा क्रियाहिन व जड असा कर्ता तमोगुणसंबंधीं म्हणावा कीं, शठ असा, ठक का धूर्त असा कर्ता तमोगुणसंबंधीं म्हणावा कीं, दुसऱ्याचा अपमान करणारा (नैष्कृतिक) दुर्वर्तनी, आळशी, दुष्ट, कर्ता, तमोगुणसंबंधीं म्हणावा कीं, अलस् (=आळशी, मंद) कर्ता, तमोगुणसंबंधीं म्हणावा कीं, दुर्मुखलेला, मनोभंग झालेला, खेदाचा अनुत्साहाचा कर्ता तमो गुणसंबंधीं म्हणावा की, चेंगट, दीर्घसूत्री, मंद, आळशी कर्ता तमोगुणसंबंधीं म्हणावा कीं.

(श्लोक २८ वा ओव्या ६६३-६९१)

**तरी मी लागलया कैसे । पुढील जळन असे ।**
**हे नेणिजे हुतांशे । जयापरी ॥ ६६३ ॥**
**पै शस्त्रे मिया तिखटे । नेणे कैसे निवटे ।**
**का नेणिजे काळकुटे । आपुले केले ॥ ६६४ ॥**
**तैसा पुढिला आपणपया । घाय करितु धनंजया ।**
**आदरी वोखटिया । क्रियाजात ॥ ६६५ ॥**
**तया करिताहि तये वेळी । काय जाले हे न सांभाळी ।**
**चळता वायु वाहदुळी । चेष्टे तैसा ॥ ६६६ ॥**
**पै करणया आणि जया । मेळु नाही धनंजया ।**
**तो पाहुनि पिसया । कैची भाय ॥ ६६७ ॥**
**आणि इंद्रियाचे वोझरिले । चोरूनि राखि जो जियाले ।**
**बैलातळी लागले । गोचिड जैसे ॥ ६६८ ॥**
**हसनया रूदना वेळ । नेणता आदरी बाळ ।**
**राहाटे उच्छृंखळ । तयापरी ॥ ६६९ ॥**

जो प्रकृति आंतलेपणे । कृत्याकृत्य स्वादु नेणे ।
फुगे केरे घालेपणें । उकरडा जैसा ॥ ६७० ॥
म्हणौनि मान्याचेनि नांवे । ईश्वराहि परी न लवे ।
स्तब्धपणें न मनवे । डोंगरासी ॥ ६७१ ॥
आणि मन जयाचे कल्लोळी । राहाटी फुडी चोरली ।
दिठी ते कीर वोळी । पण्यांगनांची ॥ ६७२ ॥
किंबहुना कपटाचे । देहेचि वळिले तयाचे ।
ते जिणे कीं जुंबराचे । टिटघर ॥ ६७३ ॥
नव्हे तयाचा प्रादुर्भावो । तो साभिलाख भिल्लांचा गावो ।
म्हणोनि न ये येवो जावो । भियाला वाटा ॥ ६७४ ॥
आणि आणिकाचे निके केले । विरू होय जया आले ।
जैसे अपेय पया मिनले । लवण करि ॥ ६७५ ॥
का हींव ऐसा पदार्थु । घातला आंगी आंतु ।
तयाचि क्षणी धडाडितु । अग्नि होय ॥ ६७६ ॥
नाना सुद्रव्ये गोमटी । जालिया शरीरी पैठी ।
होऊनि ठाति कीरीटी । मळुचि जेवि ॥ ६७७ ॥
तैसे पुढिलांचे बरवे । जयाचां भीतरू पावे ।
आणि विरूद्धचि आघवे । होवोनि निगे ॥ ६७८ ॥
जो गुण घे दोष । अमृताचे करी विष ।
दुध पाजिलिया देख । व्यालु जैसा ॥ ६७९ ॥

मी लागलया–मिया लागलिया जयापरी–जियापरी. (६६३) नेणे कैसे–नेणिजे कैसेनि. नवटे=मरे. (६६४) पुढिला आपणपया–पुढिलया आपुलिया. घाय–घात. करितु–करत. जात–जो का. (६६५) तिया करिताहि तयेवेळीं–तियाकरिताहि वेळीं चळता–चळला. (६६६) करणया–करणिया. पिसया–पिया. कैची त्राय=कैचे स्थान, जागा, कसची महती का महत्व ते. (६६७) वोझरिले–वैरिले–वोगरिले=तोंडी दिलेले. चोरूनि राखि–चोरोनि राखे. (६६८) हसनया–हांसया. वेळे वेळ (वेळु). (६६९) अतलेपणें–आंतलेपणे=स्वाधीनपणामुळें, प्रकृतिच शोभली जसें. फुगे करे–फुगे केरे. (६७०) लवे–खालवे=लवत नाहीं. डोगरासी–डोंगरासी. (६७१) कल्लोळी–कलाली कांळली= सकाम, कपटी, साभिलाष, पायरवानें काळी झालेली. फुगी (फुली) चोरली–फुडी चोरिली. ते कीरवोळी–कीर ते बोली–वोतली=गहाण. पण्यांगनेची–वेश्येची. (६७२) देहेची–देहचि. जिणे–जिणे कीं, जुंबाराचे–जुंबाराचे. टिटघर=तिव्यावरचे तीन वाटांवरचे घर, जुगाराचे घर ते, चोरी, चहाडी, शिंदळकी ह्या तिव्यावरचे तीन वाटावरचें घर. (६७३) नव्हे–नोहे. भियाला तिया वाटा–तया ठांया. प्रादुर्भाव=प्रगटपण, दर्शन, त्याची भेट ही भेट नसून लुटारू भिल्लाचे मकानच होय. (भिल्लतरू=लोध्र. भिल्ल गवी=वन गाय. भिल्ल भूषणं=तांबडी गुंज) (६७४) विरू=विरूद्ध, वैर. अपेयपया मिनले लवण करी=दुधाला मिठाचा खडा अपेय करतो. (६७५) घातला–घातलिया. तयाचि–तेचि. (६७६) मळुचि–मळचि. (६७७) भितरू–भीतरी. (६७८) घे दोष–घे दे दोख. विष–विख. पाजिलया–पाजिलिया. व्यालु–व्याळ. (६७९)

**तामस कर्ता** :—(घात करणारा, स्वार्थलंपट, सत्कार्य करण्याच्या कामी आळशी, अहंमन्य, विषय भोगावर चरणारा, स्वैर, खोटे समाधान बाळगणारा, पाप्री)

अहो ! मिया अग्नि लागल्या तेथें, कसें तें, पुढचें अग्नीत पडलेलें पदार्थ वस्तु (हुत = होम, आहुति, वैश्वदेव; हुताशः हुताशनः, हुतावहः, अग्नि.) जळत असतात ते, कांहीं तो हुताश अग्नि जाणत नाहीं. (६६३)

तिखट धारेच्या मियां शस्त्रानें कसें मरे का मरतें तें कांहीं तें शस्त्र जाणत नाहीं (मिया तिखट शस्त्रे पै कैसेनि निवटे ते नेणे अथवा) काळकूट विषानें विष होऊन परिणाम केलेला, तें कांहीं, तें काळकूट जाणत नाहीं. (६६४)

त्याप्रमाणें पुढल्यास घात करीत का आपल्याम घाताचें होतें अशा खोट्या क्रिया जो आदरानें करतो त्यानें खोट्या क्रियाच सर्व त्या आदराच्या केल्या होत. (६६५)

त्या करतानां (कां जेव्हां कां त्या होत असतात) त्या वेळेस जें कांहीं झालें (जन्मले—उगवले परिणामास आले) तें तर तो मुळींच आवरून असत नाहीं, सांभाळित नाहीं. (आंत भरून घेत नाहीं. आपल्याशा करीत नाहीं) त्यामुळें जसा वायू वावटळीमुळें पळाला तो तसा चेष्टतो वाटेल तिकडे जाणारा आकाशी चढणारा कां आकाशाएवढा उंच होणारा वावटळीचा वायू होतो, तसे (तसा तो हालचालीचा होतो) याप्रमाणें त्याचे व्यापार मात्र चेष्टेचे (कर्माचे, कर्म करण्याचे) होतात की. (६६६)

(तें करणें जें कांहीं एक क्रियेचें तेथें इंद्रियें हीं वाटेल तशीं चरत कां चालत असलेलीं जरी तरीपण तो कांहीं तें जाणण्यास घेईचना; हे धनंजया म्हणून असेंच म्हटलें की) इंद्रियें का करणें ह्यांचा व त्याचा कांहीं मेळच मुळीं नाहीं ! त्यामुळें अहो ! असेंच म्हणावें लागत आहे, कीं तें त्याचें करणें तें पाहिलें म्हणजे (वेड्यामध्यें व त्याच्यामध्यें कसलीही ती रक्षणाची बाजू कां रेघ येतच नाही) वेडेपणाच एक सर्व तेथें कसचें तें वेडेपणापासून रक्षण व्हावें असें होणें तें. (६६७)

तेथें अहो ! इंद्रियाच्या तोंडीं दिलेले, इंद्रियानां वाढलेलें, इंद्रियाकरितां वर्षलेलें तें, चरून (अथवा चोरूनच मुळीं) जो आपलें (जीविताचे जियालेपण) जगणें हे राखतो (ठेवतो, जगण्यानें असतो) तेथें तर कीं अहो ! विचित्रतेची अशीच कीं एक उपमा लाविली बोलिली कीं त्याचें तें राखलेलें जियालेपण तें तर जसें का बैलाच्या खाली लागलेले गोचिडाचेच जसें : : (६६८)

येथें आतां कसें तें म्हणावें तर जसें का जेथें हंसणें हंसावें का, हंसणें रडावे अशी जी कांहीं एक वेळा ती वेळा नच जाणून कीं अहो ! बाळ का अर्भक ते आदरिते तें हंसणें कां रडणें करतें त्याप्रमाणेंच कीं तो तर सर्व एक उत्छृंखळपणच राहाटत आहे असा, नेहमीं स्वेच्छाचारीच मनांत येईल तसेंच वागणारा कीं. (६६९)

प्रकृतीच्या आधीनतेनें, व्यापलेपणें—(अंगभूततेचें जें, प्रकृतीच्या शोभेच्या आंतील जेवढें तेवढेंच सर्व कांहीं जें त्याच्याच स्वाधीन होणें केल्यानें) कृत्य काय? अकृत्य काय? हें कांहींहीं मुळींच तो कर्माकर्माची रुची विचारास घेईना (आचार विचाराचें करीना, कृत्य कार्य ! हेतु ! तो कसा अथवा अकृत्य नच करावें जें तेंच मुळीं कोणतें हें जाणण्याची आवडच घेईना) कर्म करण्यामधीलचा स्वाद रस, आस्वाद, रूचि, लज्जत, उपभोग, गोडी, सौंदर्य मनोहारीपण ते कसें असतें तें कांहींच जाणेना—केरकचरा फुरफुरणारा का (प्रकाशणारा) तेवढ्याने मुळीं कीं धाला जसा कां उकरडाच हालणारा हात. (६७०)

म्हणून कीं, अहो ! मानीपण आपणाकडे घेऊन मानमान्यता सन्मान्य पूज्य आदरणीय. सत्कार, प्रेम, प्रेमच ते एक अशा ईश्वरासही पण तो लवत नाहीं. (परमेश्वर का स्वामी का श्रेष्ठ असा शक्तिमान जो ईश्वर प्रभु त्यासहीपण नमस्कार करीत नाहीं) त्याजपुढें नम्र होत नाहीं. स्वतःच्या पूज्यतेपुढें ईश्वरासही सन्मानाचें करीत नाहीं. (परमेश्वर का स्वामी का श्रेष्ठ असा शक्तिमान जो ईश्वर प्रभु त्यासहीपण नमस्कार करीत नाहीं) त्याजपुढें नम्र होत नाहीं. स्वतःच्या पूज्यतेपुढें ईश्वरासही सन्मानाचें करीत नाही.

तसेंच स्तब्ध जड क्रियाहीन असा ताठ्यानें वागणारा जसा का डोंगरच एक तो तो कांहीं मनवला समजला कां सत्कार केला गेला होत नाहीं. मनस्कार=मनाची सुखाविषयी तत्परता पूर्ण जाणीव मनसा गम= स्मरण करणे हे सदसद द्विवेक बुद्धिस तुझे नाहीं जसे माननीय पूज्य मनुष्य मानवः डोंगर पर्वत गिरी ( गिर —वाणी, सरस्वति, कीर्ति) मनुष्येंद्र=राजाः मनुष्यधर्मन्=कुबेर मनुष्ययज्ञ=आतिथ्य. (६७१)

[ज्याचे मन नेहमीच कपटी, सकाम असें, साभिलाष असें, ज्याचे मन शत्रूपक्षीय कल्लोळ अथवा मोठ्या लाटेचें असें तेथें काय शत्रूपक्षीय म्हणावें कां चोर म्हणावें का आनंद असें म्हणावें तें-तें तर चोरल्या वेळेनें फुगणाऱ्या राहाटीचें-चोरवेळच अशा राहाटीचें-त्याची दृष्टी पाहावी तो एक ती वेश्येचीच (पण्यांगना) विक्रिचा जिन्नस, (व्यापार) अशी (विक्री-खरेदी, पैज, निवाडा, किंमत) दुकानदारीची सर्वथैव ओतलेली अशी] ज्याचे मन साभिलाष तेथें खरी राहाटी ती चोरलेली दृष्टी पाहावी तो ती तर गहाण ठेवलेल्या वस्तूची-कां वेश्येचीच सर्वथैव अशी ओतलेली. (६७२)

बहुत काय पण त्याचे देहच मुळीं कपटाचे असेंच सर्वथा वळलेले (त्याच्या उदास देहानें तर कपटाचें जें कांहीं तेंच वळलेलें)-असें; तें त्याचें जागणें कसें म्हणावें तर तें (म्हणजे तिठ्यावरचे) तीन वाटावरचे घरच एक (त्या तीन वाटा त्या, एक वाट ती चोरी, दुसरी चहाडी, व तिसरी वाट शिंदळकी, की,) जसें टिटघर म्हणलेलें. (६७३)

जे कांहींच नव्हे त्याचे दर्शन का उद्भवतो तर अहो एकच एक, सर्वथैव उत्कट इच्छाच का मर्जीच मुळीं तेथें इच्छिणे, तेंच प्रेमाचें केलेलें, तेथें सदृश सहित कां एकच एक इच्छा इच्छिणें उत्कटतेनें, तोच मुळीं भिल्लाचा रानटी मनुष्याचा गांव म्हटलेला. तेथें तर अहो ज्या काहीं वाटा त्या वाटानाच मुळीं भ्यायलेला जो तो त्या वाटांनीं येवो जावो करीत नाहीं. (येण्याजाण्याचें त्या तर भीतीच्या अशाच म्हणून तेथें येणें जाणें यावेंच यावें असें नच का जाणेच जावो असेंही नच) तेथें अहो त्या ठिकाणची भेट ती भेट नसून लुटारू भिल्लाचे मकानच होय. (६७४)

आणिकांनी दुसऱ्यांनी कांहीं एक निके का हितकर असें केलेलें तें तर अहो ज्यासंबंधी वैरच एक मांडलें (कां विरूद्ध) असेंच केलें, असें ज्यास वाटतें-जसे कां दुधांत मिठाचा एक खडाच पडल्यानें तें अपेय असेंच केलें होतें कीं! (६७५)

अथवा अहो (हींव कां) हवि असा जो कांहीं एक तोंच मुळीं अग्नीमध्यें घातला तर अगदीं त्याचक्षणीं धडाडित असा अग्नि पेट घेणारा होतो कीं. (६७६)

अथवा हे कीरीटी! सुद्रव्यें उत्तम अशी (पदार्थ) गोमटी चांगलीं तीं शरीरी पैठी (स्थिर) झालीं तरी ती विष्टा, मूत्र, घाम, इत्यादि देहमळच (अशुद्धता, पाप) कीं, हे कीरीटी! होतात-, होऊन असतात ना! (६७७)

त्याप्रमाणें पुढिलांचे-(पुढच्यांचे, पुढे येणाराचे पुढें जें कांहीं आपले स्वतः का सर्वस्व असें) बरवें, चांगलें, उत्तम ज्याच्या भीतर म्हणजे आंतमध्यें (पावते) पोहोचतें तेथें तें (तर अहो काय चमत्कार कीं) सर्व (कांहीं) विरूद्धच कीं असें होऊन निघतें. (६७८)

जो गुणदोषच एक घेतो जो गुण दोषच एक देतो, जो गुण दोषच एक करतो (जो गुण दोषच एक पाहातो) अमृत जे त्याचे विषच करतो; दूध पाजले असतां व्याळ तो त्यास विषच की करतो-, तसा तो गुण तामस जाण. (६७९)

**आणि ऐहिकी जियावे। जेणे परत्रा सांच यावे।**
**ते उचित कृत्य पावे। अवसरी जये ॥ ६८० ॥**

तेव्हां जया आपैसी । नीज ये ठेविली ऐसी ।
दुर्‍ह वेव्हारी (दुर्व्यवहारी) जैसी । विटाळे लोटे ॥ ६८१ ॥
पै द्राक्षरसा आंब्र (म्र) रसा । वेळे तोंड सडे वायसा ।
कां डोळे फुटती दिवसा । डुडुळाचे ॥ ६८२ ॥
तैसा कल्याण काळु ये । तै तया आळसु खाये ।
ना प्रमादी तरी होये । तो म्हणो तैसे ॥ ६८३ ॥
जेवी सागराच्या पोटी । जळे अखंड आंगीठी ।
तैसा विषा दुवाडे (विषादु वाहे) गांठी । जिवाचिये ॥ ६८४ ॥
लेंडोरा आगी धुमावधि । का अपना आणी (आंगी) दुर्गंधी ॥
तैसा जो जीवितावधि । विषादे केला ॥ ६८५ ॥
आणि कल्पांताचिया पारा । वेगळेही जो वीरा ।
सूत्रधरी व्यापारा । साभिलाखा ॥ ६८६ ॥
अगा जगाही परौती । सूचना वाहे पै चित्ती ।
करिता विषी हाती । तृणेही (तृणही) न लगे ॥ ६८७ ॥
ऐसा जो का लोका आंतु । पाप पुंजु मुर्तु ।
देखिजे तो अव्याहतु । तामसु कर्ता ॥ ६८८ ॥
एवं कर्म कर्ता ज्ञान । तिहीचे त्रिधा चिन्ह ।
दाविले तुज सुजाण- । चक्रवर्ती ॥ ६८९ ॥
आतां अविद्येच्या गांवी । मोहाची वेढुनि मदवी ।
संदेहाची आघवी । लेउनि लेणी ॥ ६९० ॥
आत्मनिश्चयाची बरव । जै आरिसा पाहे सावेव ।
तये बुद्धिचीही धांव । त्रिधा असे ॥ ६९१ ॥

अहिकी–ऐहिकी–ऐहिकी = इहलोकासंबंधीं. इह = येथें, आतां. [ईह = यत्न करणें. ईहा = इच्छा, उद्योग खटपट] परत्रा = अन्यलोकी, अन्यकाळीं. जये–जिये. (**इहलोकीच्या व्यवहारे । नये डोळे धुरे । भरूनि राहो**) (६८०) नीज–निद्रा. दुर्‍हवेव्हारी–दुर्व्यवहारी = चालचलणूक, देवघेव तेथें दुर्वर्तन कां वाईट कामाचे वेळी आळस निद्रा, विटाळशी प्रमाणें त्यापासून दूर राहाते. [दुर हवे वारी– दुऱ्हवे वारी. दुर्वह = जोखमीचे, धारण करण्यास कठिण. (हवः = आमंत्रण, आज्ञा, यज्ञ. हवा = खरोखर निःसंशय.)] (६८१) आंब्ररसा–आम्ररसा. [आम्र = आंब्याचे झाड, आंबा (जो.) पूर्वाभाद्रपदा. आंब्र, अंब्र, अंबर = आकाश, कापड, कापुस, मेघांचा समुदाय. आम्रपेशी = आंबोशी. आम्रनिशा = आंबेहळद. आम्रावर्तः–आम्रातः = (१) आंबाडा (२) आंब्याचे साट. आम्रगंध = सुरण. आम्रवनं = आंबराई. आंब रस; आम् = (१) स्मरण, ठीक, खरेंच, (२) कच्चे न पचलेलें, न भाजलेलें, कोंवळें, आजार, अमांश, सडीक धान्य, अपक्कता. आमश्राद्धं = नुसत्या शिध्यानें करण्याचें श्राद्ध. आमांशय = कोठा. आमंजु = मोहक. आमंड = एरंड. आम (मा) नस्य = दुःख. आमन्द्र = हलका ध्वनि. आमयः = रोग, इजा, पीडा, नाश, (व.) कोष. आमरणांतिक = मरेपर्यंत रहाणारा. आमर्दः = चुरडणे, ओढाताण. आमर्दकः = वेताळ. आमर्शः आमर्शन = स्पर्श, घांसणें पुसणें, मनोवृत्ति. आमर्षः आमर्षणं = क्रोध, बलात्कार, हरणे. आमलक = आंवळा.] तोंड सडे वायसा = कावळ्याला मुख रोग होतो. डुडुळाचें (डुडुलाचे) = पिंगळ्याचे, दिवाभिताचे, लहान घुबडाचे. (६८२) ये–पाहे. तया–तयाचे. कल्याणकाळ ये = स्नान

संध्या श्रवण कीर्तनादि काळीः प्रमादी तरी होये तो म्हणे तैसे = अपराध गैरसावधपणा, उन्मत्तता, अन्याय चुका व्हावयाचें वेळीं तो म्हणतो तसें होतें. (६८३) जेवी-जेवीचि. आंगिठी-आगीठी = अग्नि. वडवाग्नि, वडवामुख, वडवानळ (समुद्रातला अग्नि) विषाद = मनोभंग, खेद, अनुत्साह दुःख, खिन्नता (६८४) लेंडोरा आगी = लेंड्यांच्या विस्तवांत. अपाना = गुदद्वारी (६८५) पारा = पलिकडे. साभिलाखा-साभिलाषा = इच्छेने. (६८६) सुचना-शुचा = चिंता, शोक. हती (हाती) तृणेही न लगे-हाती तृणही न लगे (६८७) जो का अंतु-लोकां आंतु. देखिजे-देखसी अव्याहतु = अकुंठित निःसंशय, सर्वथा. (६८८) सुजाण = भलेपणाचा, मैत्रीचा. (६८९) मदवी-वस्त्र = धुंदी, उन्माद, मद्य, गर्व, (मद = हत्तीच्या गंडस्थळांतून होणारा मद स्राव.) (६९०) बरव = लावण्य, शोभा, सौंदर्य. सावेव-सावयव = मूर्तिमंत स्पष्ट, शरीराच्या विभागासहित. (६९१)

अहो (तुका म्हणे इहलोकीच्या व्यवहारे नये डोळे धुरे भरूनि राहो) ह्या इहलोकीच्या व्यवहारानें जगावे जागावे (जेथें इच्छा तृप्त व्हावी म्हणून यत्न करणेंच एक) तेथें तर अहो खरोखरीच्या अशा त्या परलोकीच की पोहोचावें तेथें चलचलणुकीचे देवघेवीचे जें कांहीं उचित योग्य-कृत्य कर्तव्य ज्यावेळेस पुढें होऊन येतें—आपण होऊनच पुढें होतें. (६८०)

पण तेव्हां तर जशीं का सहजच निद्रा ही ठेविलेलीच (येणारच) जशीं का दुर्वतन कां वाईट कामाचे वेळीं निद्रा विटाळशीप्रमाणें त्या वाईट कामापासून दूर रहाते तेथें अज्ञान, तिमिर कारण जसें का उघडले तेथें निद्राच ती अंगिकारिली कां ठेविलेलीच होते व जें कांहीं उचित तें अंतरतें "चांगल्या कामाचे वेळीं झोप येते व वाईट कामाचे वेळीं पेंगणें झोंप उभी राहाते." (६८१)

द्राक्षाचा रसस्वाद घेण्याचे वेळीं का आंब्याचे मोसमांत कावळ्यास तर मुखरोगच झाला कां मुखरोगच यावा असें होतें दिवाभिताचे डोळे—दिवस असूनही-कीं—फुटले होतात दिवसाच्या प्रकाशात दिवाभिताचे डोळे आंधळे होतात जसे :: (६८२)

तसेंच कल्याणाची-(कल्याण होण्याची-हित साधण्याची) वेळ आली अथवा उगवली असतां, आळसच एक त्यास खातो-) तो तर आळसलेला होतो- अहो! स्नानसंध्या कीर्तनादि कल्याणाच्या वेळीं अपराध, (गैरसावधपणा, उन्मत्तता, अन्याय) परंतु चुका व्हावयाचें वेळीं तर तो जसें म्हणतो तसें होतें. कल्याणाची वेळ आली असतां आळसाच्या ताब्यांत जाऊन आळसानें ग्रासलेला होऊन (जसा असेल तसा भलताच) प्रमादी-(अपराधी गैरसावध, उन्मत्त, अन्यायाचा, चुकी करणारा असा) होतो. (६८३)

सागराच्या पोटामध्यें, वडवाग्नी अखंडतेनें (धडाडत असलेला) असतो. आंगीठीच-आगटीच एक अखंडतेनें जळत असणारी-(जळती रहाणारी-) तसा तो ह्या जीवदशेच्या भागास (पदरामध्यें) ओझेंच एक खेदाचें कां दुःखाचें कां विषादाचें असें वाहून असतो. (६८४)

लेंड्याच्या विस्तवामध्यें धूरच अथपासून इतिपर्यंत, तसेंच अपानाच्याठायीं दुर्गंधीच एक, तसा तो खिन्नता, मनोभंग अनुत्साहरूपी विषादच मत्सरामुळें नेहमीं कुजकाच एक सर्व! जीवीताचा झालेला देहधारी (होऊन जीवित घेऊन असलेला). (६८५)

त्रैलोक्य म्हणजे सृष्टी, प्रळयाच्याहि पलिकडे कल्पांताच्याहि पलिकडे ताणलेल्या अशा धाग्याचा होतो. कामिक व्यापारी संबंधीचें प्रेम उत्कट इच्छेने घेत आहे असा वेगळाच एक असतो. (६८६)

अहो! जगाच्याहि बाहेरची (परती) अशी मनी चिंता, (टोंचणी एक, रोवणीच एक) चिंतामध्यें वाहून असतो: असा विषयांनीं जर्जर, चहाडी केलेला कल्याणासंबंधी पाहिला तर त्याचे हातीं तृणही पण लागत नाहीं, (लाभत नाहीं) [(हती = बिघाड, विरोध, इजा, अडथळा.) विषयांनीं बिघाड केलेला. ह्याचे

हातीं तृणही लागत नाहीं. गवताच्या काडीचा आधारहीपण त्यास लाभत सांपडत नाहीं, भेटत नाहीं. त्यास गवताचें पातेंही आधाराचें होत नाहीं.] सूचनं=सूचना शुचा=टोंचणें (रोवणें अप्रत्यक्ष कथन, इशारा, कपट, खिकविणें. शुचा–शुच्=) दुःख शोक, अश्रु. (६८७)

असा लोकांमध्यें मूर्त पाप पूंजच एक असा पाहावा तो (मूर्तिमंत पापाचा पूंजच की जो देखिजे तो तर) निःसंशय, सर्वथैव, तामस कर्ता म्हणावा. (६८८)

मैत्रिचा–भलेपणाचा चक्रवर्ती असा राजमान्य का राजाच एक अशा हे अर्जुना! याप्रमाणें कर्ता व ज्ञान ह्या तिहींचें त्रिधा चिन्ह तुला सांगितलें. (६८९)

यावर आतां (अविद्या जी म्हटली तेथें तर) गांवच एक सर्व अविद्येचें का अविद्यतेचें होऊन असलेलें, तेथें (केवढा तरी मोह होणारा–अशा त्या) मोहरूपी वस्त्राचे वेढेच अंगी वेढून घेतले जसें (तेथें तर मदच एक का उन्मादच एक हे जीवितरूपी वस्त्र पांघरून असलेला.) ते तर अहो सर्व (संशयाची अशीं) संदेहरूपी लेणी, (अलंकार, लेवविलेली) लेईली. (६९०)

आत्मनिश्चयाची बरव–सौंदर्य–लावण्यशोभा जेव्हां का आरशामध्यें (मूर्तिमंत, स्पष्ट) सर्व अवयवासहित पाहिली (आरशानें दाखविली) तेथें जी कांही बुद्धी महत्त्व घेऊन असते त्या बुद्धीचेही पण तीन तऱ्हांनीं भांव घेणें होऊन असतें. (६९१)

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥**

बुद्धि=अंतःकरणशक्ति, मतिः बुद्धि गुणतः=मनुष्य, पदार्थ इत्यादींच्या मूळधर्मामुळें–गुणामुळें (गुणता=सद्गुण, गौणत्व, गुणणे) धृति=धारणाशक्ति, धैर्यः त्रिविध=तीन तऱ्हांचें तिन प्रकारचें, त्रिवर्णात्मक (ओंकार), त्रिगुणात्मक (अहंकार)–भेद. प्रोच्यमानम्=सांगतो. पृथक्त्वेन=वेगवेगळे करून. अशेषेण=संपूर्ण.

अन्वयः—धनंजय। बुद्धेःभेदं। धृतेः। च। एव। अशेषेण प्रोच्यमानम्। गुणतः। पृथक्त्वेन। च। शृणु ॥ २९ ॥

अर्थ—हे धनंजया! बुद्धि व धारणाशक्ति म्हणजे धृति ह्यांचेही गुणामुळें होणारे तीन तीन प्रकारचे भेद ते वेगवेगळे करून संपूर्णपणें सांगतो ते तूं श्रवण कर. (श्लोक २९वा ओव्या ६९२–६९६)

**अगा सत्वादि गुणी इही ही। कांहीं येक ती ती ठाई।**
**न कीजेच येथें पाही। जगामाजी ॥ ६९२ ॥**
**आगी नसता पोटी। कोण काष्ट असे सृष्टी।**
**तैसे ते कैचे दृश्य कोटि। त्रिधा जे नव्हे ॥ ६९३ ॥**
**म्हणौनि तिही गुणी। बुद्धि केली तिगुणी।**
**धृतीसीही वांटणी। तैसीच असे ॥ ६९४ ॥**
**तोचि येकेक वेगळाले। यया चिन्ही अलंकरले।**
**सांगिजैल उपाइले। भेदलेपणें ॥ ६९५ ॥**
**परि बुद्धि धृति या। दोही भागा माजी धनंजया।**
**आधी रूप बुद्धीचया। भेदासी करूं ॥ ६९६ ॥**

गुणीही–गुणी इही. ती–ती ठाई. कांही येक–काइ एक. तिठाई–तिहीठाई. येथें–येथ. (६९२) नसता–न वसता. दृश्यकोटि=ह्या दृश्य विश्वांत. त्रिधा–त्रिविध. नव्हे–नोहे. (६९३) तिगुणी–त्रिगुणी.

धृतीसही=धृतीची. (६९४) येकेक–येकयेक. अलंकारले अलंकरले. उपाइले=प्रशस्तपणें, सविस्तर. (६९५) या–इया. बुद्धिचया–बुद्धिचिया. (६९६)

कांही येक जी भूतमात्र भूतें म्हटलेली ती (सात्विक भाव=शरीरासंबंधीचे भाव) अहो सत्वादिगुणांची नेहमीची नित्याची असलेली असूनसुद्धां ती तीन भागाची, ठायीची, ठिकाणांची–विभागाची अशी केली होतात नां !!! (६९२)

पोटीं अग्नि असल्याशिवाय कोणतेही काष्ट (लाकूड इंधन) ह्या जगामध्यें असणारे तें कसचें ! लाकडाचे पोटी अग्नि असणारच केव्हांही ! अहो दृश्य जें दिसणारे म्हटलें, दृश्य जें सुंदर म्हटलें तें आधिक्याचे, प्रकर्षतेचे, अग्राचें अथवा (आणी) टोंकाचें येथें आतां कोटि ती मनुष्यजात (अथवा मनुष्य वर्गच की ते) तीन प्रकारें असते. [येथें आतां घटकावयव, मूळतत्त्व, देहस्थ धातु देहस्थ तत्त्वें, हीच जशीं कां आत्म्याच्या व्यापकतेमुळें महाभूत अशींच (पिंड का शरीर) अद्‌भुततेच्या व्यापकत्वामुळें] (चंद्रकलेची टोके=कोटि=मनुष्यजात, मनुष्यवर्ग, विश्व उत्कर्ष, आधिक्य, कोटि संख्येचें.) (६९३)

म्हणून ह्या गुणांनीं अथवा तीन गुणांनीं बुद्धि ही तिप्पट अशीं केली, (तीन तीन तऱ्हाची त्या, त्या गुणानें केली) होते, धृतीसहीपण तशीच वांटणी असते. (६९४)

तेंच प्रकारचें (का तऱ्हेचें) असें एक एक वेगवेगळें तें कसें, लिंगांनीं अथवा चिन्हांनीं शोभिवंत केलें होतें, (अलंकृततेचें होतें, अलंकारच एक केला अंगावर घातला जसा, असें ते भेदाचें होण्यानें, भेदले गेल्यानें, परिणामाचें झालें) तें कसें प्रसरतेचे–प्रशस्तपणाचें, सविस्तरतेचे होत असतें तें सांगण्याचे करतो. (६९५)

पण बुद्धि अथवा धृति, (धारिष्टय, धैर्य.) अशा ह्या दोन्हीही प्रकारा–भागामध्यें, हे धनंजया ! आधी ही बुद्धि (अडथळा फरक भाग बदल फाटाफूट, प्रकार) भेदाची कशीं होते–(बुद्धि भेद ते रूप करून सांगू या.) (६९६)

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**
**बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥**

प्रवृत्ती=मनाचा कल, प्रवाह, प्रघात, प्रवृत्ति, प्रयत्न. (प्रवृत्ति मार्ग=प्रपंच मार्ग.) निवृत्ति= निवृत्ति, परावृत्त होणे, विसांवा, विरक्ति, मुक्ति, मोक्ष, थांबणे अखेर, निवृत्तिः=मोक्ष, समाधान. शांति; समाप्ति; कार्य=कर्तव्य, फलप्राप्ति, उद्योग, हेतु, करण्यास योग्य. अकार्य=अकर्तव्य, करण्यास अयोग्य. भय=भय, भीती, अरिष्ट. अभय=अभय, धीर. (अभयदान=धीर देणें) बंध=बंध, बंधन, देह, ठेव, करार. मोक्ष=मोक्ष, सुटका, मुक्ति, मुक्तता; वेत्ति=यथार्थतेनें जाणते. विद्=जाणणें, विद्=ज्ञाता, आत्मा.) सा बुद्धि=सात्त्विका सा अत्र. (बुद्धि=धारणाशक्ति, ज्ञान, विचार.)

*अन्वय :—पार्थ । या बुद्धिः प्रवृत्तिं वेत्ति । सात्त्विका सा बुद्धिः ॥ या बुद्धिः निवृत्तिं वेत्ति सात्त्विका सा बुद्धिः ॥ या बुद्धिः कार्यं वेत्ति सात्त्विका सा बुद्धिः । या बुद्धिः अकार्यं वेत्ति सात्त्विका सा बुद्धिः । या बुद्धिः बंधं वेत्ति सात्त्विका सा बुद्धिः । या बुद्धिः मोक्षं वेत्ति सात्त्विका सा बुद्धिः ॥ ३० ॥*

अर्थ :—हे पार्था ! जी बुद्धि यथार्थतेनें प्रवृत्ति (प्रयत्नतः) जाणते ती बुद्धि सात्त्विका म्हणावी ! जी बुद्धि कार्य (कर्तव्य, हेतु अहेतु) यथार्थतेनें जाणते ती बुद्धि सात्त्विका म्हणावी. जी बुद्धि अकर्तव्य (अकार्य, करण्यास अयोग्य) यथार्थतेनें जाणते ती बुद्धि सात्त्विका म्हणावी. जी बुद्धि यथार्थतेनें बंध, (बंधन देह, करार) तो जाणते ती सात्त्विका बुद्धि म्हणावी. जी बुद्धि यथार्थतेनें मोक्ष सुटका मुक्तता जाणते ती बुद्धि (ज्ञान, विचार, धारणाशक्ति,) सात्त्विका म्हणावी. (श्लोक ३०वा ओंव्या ६९७–७१८)

तरी उत्तमा मध्यमा निकृष्टा। संसारासि गा सुभटा।
प्राणिया येतीया वाटा। तिनी आथी ॥ ६९७ ॥
जे अकरण काम्य निषिद्ध। हे ते मार्ग तिन्ही प्रसिद्ध।
संसार भय सबाध। जीवासि या ॥ ६९८ ॥
म्हणौनि अधिकारे मानले। जे विधीचेनि ओघे आले।
ते येकचि येथ भले। नित्य कर्म ॥ ६९९ ॥
तेचि आत्मप्राप्ति फळ। दिठिसूनि केवळ।
कीजे जैसे का जळ। सेविजे ताहाने ॥ ७०० ॥
येतुलेनि ते कर्म। सांडी जन्म भय विषम।
करूनि दे सुगम। मोक्ष सिद्धि ॥ ७०१ ॥
ऐसे कर्म करी तो भला। संसारभये सांडिला।
करणीयत्वे आला। मुमुक्षु भागा ॥ ७०२ ॥
तेथ बुद्धि ऐसा। बळि बांधे भरंवसा।
मा मोक्षु ठेविला ऐसा। जोडैल येथें ॥ ७०३ ॥
म्हणौनि निवृत्तिची मांडली। सूनि प्रवृत्ति तळी।
ये कर्मी बुकुडुळी। घावी निकी ॥ ७०४ ॥
तृषार्ता पाणिये जिणे। का पुरि पडलिया प्रवाहणें।
अंधकूपगता किरणे (कीर्णो)। सूर्याचेनि ॥ ७०५ ॥
नाना पथ्येसि औषध लाहे। तरी रोगे दाटिहिला जिये।
का मीना जिव्हाळा होये। जळचा जरी ॥ ७०६ ॥
तरि तया जीविता। नाही जैसे अन्यथा।
तैसे कर्मीये प्रवर्तता। जोडेचि मोक्षु ॥ ७०७ ॥
हे करणियाचि कडे। जे ज्ञान आथी चोखटे।
आणि अकरणीय फुडे। ऐसे जाणे ॥ ७०८ ॥
म्हणौनि सत्कर्मी भळा। संसारभये सांडिला।
कर्तृत्वे आला। मोक्षु भागा ॥ ७०९ ॥
जये तिन्ही काम्यादिके। संसार भयदायके।
अकृत्यपणाचेनि आंबुके। पडिले जया ॥ ७१० ॥
तये कर्मी अकार्यी। जन्म मरण समर्यी।
प्रवृत्ति (फळ विपाई) पळवि पायीं। मागीलीचि ॥ ७११ ॥
पै आगी माजी न रिघवे। अथांवी न घलवे।
घगधगित नांगवे। शुळु जेवि ॥ ७१२ ॥
मा काळया ना धुंधुवातु। देखोनि न घालवे हातु।
न चवे खोपे आंतु। वाघाचिये ॥ ७१३ ॥
तैसे कर्म अकरणीय। देखोनि महाभय।
उपजे निःसंदेह। बुद्धि जिये ॥ ७१४ ॥
वाढिले रांधूनि विषे। तेथ जाणिजे मृत्यू न चुके।
तेवी निषेधी कां देखे। बंधाते जो ॥ ७१५ ॥

**मग बंधभय भरिती। तेथें निषेधी प्राप्ती।**
**विनियोगु जाणे निवृत्ति। कर्माचिये ॥ ७१६ ॥**
**ऐसेनि कार्याकार्य विवेकी। जे प्रवृत्ति निवृत्ति मापकी।**
**खरा कुडा पारखी। जियापरी ॥ ७१७ ॥**
**तैसे कृत्याकृत्य शुद्धी। बुझे जे निरवधी।**
**सात्त्विक म्हणिपे बुद्धि। तेंचि तू जाण ॥ ७१८ ॥**

निकृष्ट=निंद्य, अधम, हलका. प्राणिया=(परि प्राणिया कामी भरू। देहाचिवरी आदरू। म्हणोनि पडिला विसरू। आत्मबोधाचा ॥ ४-२०) (प्राणिन्)=जीव, शरीरी. (६९७) हे ते. सबाध—संबंध. जीवासिया—जीवा यया. करणीय=करण—करणीय=इंद्रियें, क्रियेचें साधन, कारण. काम्य=इच्छिण्यास योग्य, सुंदर, इच्छित प्राप्तिसाठीं केलेलें कर्म. निषिद्ध=दूषित, वर्ज केलेले. सबाध—संबाध=भय, संकट. दाट, अरूंद, संबंध=संपर्क, संयोग. (६९८) विधिचेनि=दैव, उपाय, ब्रह्मदेव, क्रम, अनुष्ठान नियम. ओघ=परंपरा, समूह, पाण्याचा प्रवाह. (६९९) आत्म=स्वतःचे हित, जीव ब्रह्म, मूळ स्वभाव, मनबुद्धि. प्राप्ति=समुदाय, मिळकत. सूनि=प्रसवून, पाठवून (दृष्टीस प्रसवून) दृष्टि=अवलोकन शक्ति, नेत्र, बुद्धि, मत. (७००) विषम=विजोड, दुःसह, दुर्बोध. सुगम=सोपे, बालबोध. मोक्षसिद्धि=सुटकेची का मुक्ततेची पूर्णता, कल्याण देव शक्ति (७०१) करणीयत्वें—इंद्रिय करणीयपरत्वें—क्रियेच्या साधनानें, क्रियेचे केले त्यानें. मुमुक्षु=मुक्तीची इच्छा करणारा भाग=वाटा, दैव, अंश, प्रदेश. (७०२) तेथ—तेथ जे. वळि—वळिया=पूजा द्रव्य, (बलिन्=बलवान्) भरंवसा=विश्वास. (७०३) ये—इये. बुडकुळी=बुडी. निवृत्तीची मांडली=(प्रवृत्तीच्या तळी म्हणजे) प्रवृत्तीची उभारणी करून, मंडण, रचना, प्रवृत्तीच्या खालीं निवृत्तीचा बहुमोल पाया—(मांडली, मंडण, रचना—)घालून निवृत्तीच्या पायावर प्रवृत्तीची उभारणी केली—निवृत्ती रचिली. तिकी—की नां? (७०४) पाणिये—उदके. प्रवाहणे—पव्हणे=पोहणे. अंधकूप—अंधकूपा—(कूप=विहीर, खांच, डोलकांठी.) किरण=तेजाचा अंश. (७०५) दाटिलाहि—दाटलाहि=ग्रस्त. रोगे दाटिलाहिजिये=रोगग्रस्तही वांचतो. (७०६) तया—तयाच्या. जैसे—जेवी अन्यथा=मरणाचें भय. ये प्रवर्तता—इये वर्तता=उत्तेजनाची वागणूक, प्रेरणा, वृत्ति, उपजीविका. (७०७) करणियाचि—करणियाचिया=इंद्रिय साधन क्रियेचे कारण. अकरणीय—कर्णीय हे=साधन क्रियेचे इंद्रिय नच करणें कां करणेंच एक ते. (७०८) सत्कर्मी=आदराने (सत्कार, पालन, उत्तम लौकिक, चांगुलपणानें) केलेल्या कर्मामध्यें जो भलेपण घेऊन आहे. कर्तृत्व=कृति (क्रिया, रचना, पुण्यवान्, कुशल, समर्थ.) करण्याची शक्ति. भाग=दैव, अंश, वारसा. (७०९) जिये तिन्ही—जी तिये. काम्यादिके=(अकरण, काम्य, निषिद्ध उत्तम, मध्यम, निकृष्ट) अशी तीन्ही काम्य का निषिद्ध का अकरणीय अशी—अकृत्यपणाचेनि अकृत्यपणाचें. अकृत्य=अकार्य, अहेतु. आंबुखे=शितोडा, शिक्का, आवरण—आच्छाद, वेष्टन, आवरून धरणें जें. (७१०) तये—तिये. अकार्यी=करण्यास अयोग्य अशीं कर्मे, फळ विपाई—पळवी पायी, (उपाय, अपाय, विपाय) (७११) अथांवी=खोल पाण्यांत, (आंग देह, उडी) न घालवे—घालवत नाही. धगधगित नागवे शूळ जेवी=धगधगित तापून लाल झालेला शूळ हाती धरवत नाहीं. (७१२) काळया नाग—कालिया नाग—धुंधुवातु=फूत्कार टाकणारा कृष्ण सर्प फूत्कार टाकित असलेला, खोपे आंतु=जाळीमध्यें, गुहेंत. (७१३) अकरणीय=निषिद्ध, निःसंदेह=संशयरहितता, निःसंशयतेनें. निर्भयपणें. (७१४) वांटिले—वाढिले. निषेधी जो—निषेधी का—निषिद्धी (दूषित,वर्ज्य करतो जो) बंध=बंधन (ठेव, देह, करार.) (७१५) भरिती=पुष्ट, पूर्ण. निषेधी—निषिद्धी. विनियोगु=योजना, अर्पण त्याग. (७१६) माप=मोजण्याचे माप, तंतोतंत (७१७) निरवधि=सतत, अमर्याद. तैसे—तैसी. शुद्धि=पवित्रता, शुद्धता, शुद्ध करणें जें, निर्मळ, केवळ, अमिश्रित. (७१८)

जीव शरीरी प्राणिया येणारच केव्हांही, ज्या मोकळ्या वाटांनीं रस्त्यानीं ह्या संसार कोटीस त्या वाटा हे सुभटा योद्धयामध्येंही उत्तम अशा हे अर्जुना ! एक उत्तम, दुसरी मध्यम व तिसरी ती निकृष्ट म्हणजे हलकी का निंद्य, अधम म्हटली अशा ह्या तीन तऱ्हाच्या आहेत. (६९७)

**कोणत्याही जीवाला संसार कोटींत येण्याला मोकळया अशा तीन वाटा आहेत. त्या नित्यनैमित्तिक विहित, दुसरें कामिक, तिसरे निषिद्ध, संसार भयामुळें ह्या कष्टमय होतात—** ओव्या ६९८–७००

(अकारणं = उगाच, निःस्वार्थ, निर्हेतुक) इंद्रिय कारण होईना ! इंद्रिय क्रियेचे साधन होईना अकरण = स्वाभाविक असे एक नित्य नैमित्तिक विहित कर्म म्हटलें एक दुसरें (तें सुंदर म्हटलें जें इच्छिण्यास योग्य असें, कां इच्छित प्राप्तीसाठी केलेलें) कामिक (काम्य) कर्म; तिसरें तें दूषित (निषिद्ध कर्म वर्ज्य केलेलें) असें हें ह्या जीवास संसारभय (संपर्काचें संयोगाचें का संकटाचें का अरुंदतेचे असें हें) कष्टासंबंधी तीन वाटा प्रसिद्ध आहेत (ख्यातीच्या आहेत, अलंकाराच्या आहेत, शोभास्पदतेच्या आहेत. (एक संसार) दुसरी काम्य व तीसरी निषिद्ध.) (६९८)

या कारणास्तव जें कांहीं अधिकारानें, (सत्तेनें, हक्कानें, सत्काराचे केलेलें,) शोभणारें, मानलेलें (परिणामाचें, गौरवाचें, अभिमानाचें केलेलें) असें जें कांहीं दैवानें (उपायानें ब्रह्मदेवाच्या ओघामध्यें आलेलें, परंपरेनें,) आलेलें असें, तें येथें, एकच तें, नित्यकर्म जाण, तेंच एक सर्व कर्मांत खरोखर चांगलें होय. (६९९)

तेंच [स्वतःचें हित (जीव, ब्रह्म, मूळस्वभाव मनबुद्धि), केवळ अवलोकन शक्तिमध्येंच उत्पन्न करून प्रसव देऊन, प्रसवण्याचें करून जें का निव्वळ आत्मप्राप्तीसाठीं] आत्मप्राप्तीवर लक्ष ठेवून करावें जसें तहानेल्यानें जल तें प्यावें तसें कर्म आचरावें. (७००)

**स्वाभाविक क्रमानें आलेलें, अधिकारास शोभणारें, नित्यकर्म जें, तेंच एक, सर्व कर्मांत चांगलें व तेंच आत्मप्राप्ति रूप फळ लक्षून सेवावें, आचरावें, तें जन्मभय दूर करून सुलभपणे मोक्ष देणारें होतें** ओव्या ७०१–७१७

इतुलें हें कर्म, (जन्म, भय, विषम–विजोड दुर्बोध, दुःसह,) तेंचमुळीं सुटकेची का मुक्ततेची सोपी अशी (अथवा बालबोध अशी) पूर्णता प्राप्त करून देतें कल्याणच एक (का दैवशक्तीचें होणें तेंच परिपूर्णतेचें) होतें. (७०१)

असें कर्म जो करतो तोच की अहो ! भला म्हटलाः तो संसारभयानें सोडलेला होतो. त्यास संसारभय रहात नाहीः (इंद्रिय) = ज्ञानाचे किंवा कर्माचें साधन करण करणीय परत्वें–(क्रियेचें केलें त्यानें–क्रियेच्या साधनानें), मुक्तीची इच्छा करणारा असा मुमुक्षु दैव अंशाचा झाला, होतो. (७०२)

तेथें सर्व बुध्दी लाविली, असा एक सर्व भरंवसा ह्या जीवितास बळाचें करून आहे (बलवत्तर बळिया अशा एका भरंवशाचा हा जीवितभार झाल्यानें अहो) मोक्षच की एक केव्हांही ठेविलेलाच आहे असेंच येथें जोडले होईल, [प्राप्तीच लाभाची जोडलेली, ह्या कर्मास (जीविताच्या हालचालीस) की] ! (७०३)

म्हणून जी बुध्दी म्हणते कीं निवृत्तीला खाली दडपून–निवृत्तीची बहुमोल पाया घालून (निवृत्तीच्या पायावर) प्रवृत्तीची उभारणी करून ह्या कर्मांत बुडी देणें जें तें केव्हांहीं हितकारक असेंच नां (निवृत्तीच्या आधारावर प्रवृत्ती उभारून नित्य कर्म करावें तसें तें कां करूं नये बरें ? असें बुद्धि ती म्हणते.) (७०४)

(तृषार्ते) तहानेला जो आहे त्यास (तर उदकानेंच) उदक पिण्यानेंच (पाणी पिण्यामुळेंच नां जिणें जीवित) जीवन येणारें केव्हांहि अथवा पुरामध्यें पडलेल्यास पोहावें लागतें (पव्हण्यानेंच का प्रवाहणें–

मलोत्सारी स्नायु येण्यानें की सांधणारी तंतुरूप शीर येण्यानें की अहो जिणे जीवित जीवन येणारें केव्हांहीं)! अथवा (कूप–मंडूक वृत्तीमुळें अंध झालेला जो त्यास किंवा) खोल अशा अंधाऱ्या जागेंत पडलेल्यास सूर्याच्या किरणांनी गति म्हणजे रस्ता दिसणारा होतोः (सूर्याच्या तेजानें सूर्याचिया अंशानेंच की, अहो जिणे जीवित जीवन भेटणारें मिळणारें! केव्हांहि सूर्याच्या रंगारंगाच्या तऱ्हेतऱ्हेच्या मिसळलेल्या तेजानेंच की, मुळीं डोळे येणारे होतात नां?) (७०५)

पथ्यानें चालण्यावरचमुळीं औषध तें (मिळतें) लाभाचें होतें, तेथें तर अहो! जो कां रोगानें दाटलेला कां रोगग्रस्त तरीसुद्धां जगतो, (त्याचें जीवित जगते) किंवा (मीनास) माशास जळाचा जिव्हाळा भेटला तर मासा तो जगतोच, (मीन=मीनकेतन, मदन, मीनध्वजा. देहोदकाचा जिव्हाळा मीनकेतनास मदनास जर पावला, तर [ओपसरा तो येथें देहासंबंधीचा] तेथें मीनध्वज मदन जीये–जीवितास आला होतो. (७०६)

तर मग त्या जीवितास मरणाचें भय नाहीं. त्याप्रमाणें ह्या कर्माचे ठायीं उत्तेजनाची वागणूक (प्रेरणा वृत्ति उपजीविका) वर्तमानाची केली असतां (तेथेंच वर्तणें वागणें व्यवहारणें केलें असतां मग) मरणाचें भय नाहीं एवढेंच नाहीं तर तेथें अहो! मोक्षच एक जोडला (साधला) होतो. (७०७)

असें हें (१) तें इंद्रिय–साधन–क्रियेचे–करण्याकडेच मुळीं (सर्वथा) जें उत्तमतेचे ज्ञानच एक असणें होणें, होय. आतां (२) अकरणीय तें खरे किंवा कसें तें जाणणें जें (करणीय म्हणजे काय? अशा करणीया-संबंधीं जी बुद्धी निर्दोष असते व अकरणीय म्हणजे काय हेही जी बरोबर जाणतें.) (७०८)

असें आहे म्हणून सत्कारानें (चांगुलपणानें आदरानें) कर्म करण्यामध्येंच भलेपण घेऊन आहे. तोच मग आपोआपच संसारभयानें सांडला (सोडला) असा जाण. तो कर्तृत्वानेंच (कृति क्रिया रचना करण्याच्या शक्तीनेंच) मोक्षाचा होतोः दैवाचा असा वारसा घेऊन असलेला मोक्षाचा तो जाण. (७०९)

तेथें मग (१) अकरण (२) काम्य (३) निषिद्ध असें उरतच नाहीं–, एक तो मोक्षच साधणेचें होण्यानें॰ मग जें कांहीं (१) अकरण (२) काम्य (३) निषिद्ध जेथें संसारच मुळीं भयदायक वाटला कारण सर्व कांहीं अकृत्यपणाच्या शिंतोड्याचें मुळीं झाल्यानें (अकृत्यपणानें–अकार्य–अहेतुपणानें, आवरून धरिल्यामुळें) की! (७१०)

[अकृता=स्ववंशवृध्दीच्या संकल्पाने (पण स्पष्टोच्यारानें नव्हे) दिलेली मुलगी]

त्या (अकार्यी–) करण्यास अयोग्य अशा कर्मांनीचमुळीं तें जन्मणें कां मरणें तें (समय) प्रसंगाचें केल्यानें तेथें की अहो (एक मागीलच की ते अकार्य अहेतु अकृत्य असें प्रवृत्तिचें फळ विपाईले) कदाचितच मिळणारें (म्हणजे पूर्वीचेच ते फळ मिळतें–) अथवा सर्व प्रवृत्तीचमुळीं फळच तें मागच्या मागेच पळविते. (७११)

(कर्म अकार्य, जन्ममरण, प्रसंगच, प्रवृत्तिच मागे पडलीं, तेथें अहो! एक सर्व आणीबाणीचा प्रसंगच हातघाईचा तेव्हां दोन्हींही जन्मणें मरणें तें एकत्र होऊन एक महत् प्रखरतर असाच प्रसंग येऊन पडला.) तेथें आगीमध्यें रिघवणें कां शिरणें होत नाहीं, खोल पाण्यामध्यें उडी घालवत नाहीं, धगधगित आगीप्रमाणें तापलेला शूळ किंवा खिळा तो हाती धरवत नाहीं असें म्हणणें आपली सीमा पाहून आहे जसें. (७१२)

फूत्कार टाकणारा काळा कृष्णसर्प पाहून तो कांहीं हाती धरण्यांस धजणें होत नाहीं. वाघाच्या जाळींमध्यें (खोपेमध्यें) जाववत नाहीं. (७१३)

तसें अकरणीय म्हणजे निषिद्ध कर्मानें महाभयच उपजणारे देखोन, पाहिल्यामुळेंच की निःसंदेहाची (निःसंशयतेची निर्भयतेची) अशी एक बुध्दीच जन्मते, जन्मास येते, जिवंत होते. (७१४)

विषानें रांधून वाढले तेथें मृत्यु केव्हांहीं चुकणारा नच असेंच जाणावे समजणें–होतें त्याप्रमाणें निषेधामध्यें निषिद्ध जे– का दूषित का वर्जित केलेलें जें कोण आहे ज्यासंबंधी त्या त्यामध्यें जो कोणी एक अटकाव, अटक, पीडा अधीनता बंधन (बंध=बंधन, ठेव, देह करार) पाहातो. (७१५)

तो मग देहबंधकराररूपी भयानेंच मुळीं, पुष्ट [भरलेले, भारयुक्त, हिरवा, का पूर्ण (भरिमन्= पालनपोषण कुटुंब.)] असा तो त्यास तर निषेधाच्याठायींच प्राप्ती दिसते (भेटते तेथे विनियोग योजना (अर्पण त्याग) व्यवस्था तीच कर्मापासून सुटका (कर्माची निवृत्ति) म्हटली होते. (७१६)

अशा तऱ्हेनें कार्य म्हणाजे कर्तव्य अथवा अकार्य म्हणजे अकर्तव्याच्यामध्यें विवेकच एक जो पुढें घेऊन चालतो त्यासच कीं, अहो हीं प्रवृत्ति म्हणा कां निवृत्ति म्हणा, तीं तर तंतोतंतपणें, आपले मापच दाखविणारी होते ती प्रपंच परमार्थाचे माप घेणारी का ओळखणारी होते. मनुष्य हाचमुळीं मापला गेला तेथें महेशच एक योगाचा केला. महेशपणासच तो आला तेथें विवेक तो जसा पारखीच एक खऱ्या खोट्याचा निवाडा करणारा. (७१७)

**( देह ) दिवस व रात्र अशा अहोरात्रीच्या भेदाभेदाचा विवेक आंधळ्यास नसतो, डोळ्यानी कां डोळां न पाहातां जो मोती घेतो त्याच्या वांट्याला उत्तम माल येत नाहीं.**
( ओव्या ७१८–७२२ )

तसें कृत्यसंबंधीं का अकृत्यासंबंधीं पवित्रता शुद्धि ( निर्मळपण, केवळपण, अमिश्रित असें शुद्ध करणें जें असें जें कांहीं ) जो सतत अमर्यादतेनें जाणतो, ( समजतो, बुझतो ) त्याच बुद्धिला ( धारणाशक्तीला, विचाराला, ज्ञानाला, ) सात्त्विक* बुद्धि म्हणावें. (७१८)

---

* **फूटनोट** :—देवर्षि नारद भक्तिसूत्रामधील—सात्त्विक ते जे त्यानी सात्त्विकांनी वादापासून चार हात दूर रहावे; **"वादोनावलंब्यः ॥ ७४ ॥ बाहुल्यावकाशादनियतत्वाच्च ॥ ७५ ॥**

अर्थ—सात्विकानी वादांत पडूं नये, शब्दानें शब्द वाढतो तत्त्व बाजूला राहातें. व्यक्तीच्या गुण-दोषांची उठाठेव होते नियमांचा निर्बंध रहात नाहीं. शेवटी वैरांत त्याचा शेवट होतो.

(२) जनी वाद विवाद सोडोनि द्यावा ।
जगी सूख संवाद सुखे करावा ॥

(३) **श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात बोलावयाचेच झाल्यास पुढील दहा दोष टाळून बोलावे** (१) विरोध वादबळ (२) प्राणिताप ढाळ त्या प्राण्यास कासाविस करणें (३) उपहास (४) छळ (५) वर्मस्पर्श (६) आटु वेग–कोरडे आवेशाचे बोलणे (७) विंदाण कपटाचे भाषण. (८) आशा –(आशा पोटात ठेवून बोलणें जे) (९) शंका–शंका उत्पन्न होईल असें बोलणें जें. (१०) प्रतारण– (फसवेगिरी–ठकबाजी–)

**हे दहा दोष टाकून बोलणें बोलावें–**

(४) **अहो भगवान श्रीकृष्णानी बोलणे बोलिले ते कसें तर—**
साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ ३७० ॥ अ. १३ वा

(५) रसनेची दोन कार्ये एक आहार, दुसरे भाषण.

(६) जग आचरण पाहून सुधारते, तितके उपदेश ऐकून सुधारत नाही.
मतांतरे शोधू नका । तार्किकांचा संग टाका ।

(७) **त्रिसत्यस्य,– भक्तिरेव गरीयसी**[3] ॥ ८१ ॥

(८) **भक्तिचे प्रकार अकरा** (१ आसक्तिचे) गुण महात्म्य २ रूप ३ पूजा ४ स्मरण ५ दास ६ सख्य ७ कांता ८ वात्सल्य ९ आत्मनिवेदन १० तन्मयता ११ परम विरह आसक्ति रूपा एकधा अपि एकादशधा भवति भवति ।

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत् प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥**

धर्म = धर्म, पुण्य, नियम, कर्तव्य, सदाचरण, आचरण. अधर्मम् = अधर्म, अनाचार, पाप, अकर्तव्य, अनियम. कार्यम् = कार्य करण्यास योग्य, फलप्राप्ति उद्योग. अकार्यम् = कार्य करण्यास अयोग्य. अयथावत् = (अयतार्थ, यथार्थवत्–अयथातथ्य) अयोग्य, चुकीचें, संशयित, इत्यादि, प्रजानाति = बुद्धिनें निर्णयाचें केलें, नक्की किंवा पूर्णपणें जाणणें. राजसी = राजस बुद्धि.

अन्वय :— पार्थ ! यया धर्मं अयथावत् प्रजानाति सा बुद्धि राजसी । पार्थ ! यया कार्यम् अयथावत् प्रजानाति सा बुद्धि राजसी । पार्थ ! यया अकार्यम् अयथावत् प्रजानाति साबुद्धि राजसी ॥३१॥

अर्थ :—हे पार्था ! धर्माचा (पुण्य, सदाचार), अधर्माचा (अनाचार, पाप), कार्याचा, करण्यास योग्य अशाचा ज्या बुद्धीनें यथार्थ निर्णय होत नाहीं. ती बुद्धि राजस बुद्धि होय.

(श्लोक ३१ वा ओव्या ७१९–७२४)

**आणि बकांच्या गांवी । घे पे क्षीर नीर सकलवी ।**
**कां अहो रात्रीचिये गोवि । आंधळे नेणे ॥ ७१९ ॥**
**जया फुलाचा मकरंदु फावे । तो काष्टे कोरू धांवे ।**
**परी भ्रमरपणें नव्हे । अव्हां जेवि ॥ ७२० ॥**
**तैसे येचि कार्याकार्ये । धर्माधर्म रूपे जये ।**
**ते न चोजविता जाये । जाणती जे का ॥ ७२१ ॥**
**अगा डोळयाविण (डोळांविण) मोतिये । घेता पाडु मिळे विपाये ।**
**न मिळणें ते आहे । ठेविले तेथें ॥ ७२२ ॥**
**तैसे अरणिये अवचटे । नोडवे तरीच लोटे ।**
**येऱ्हवी जाणें येकवटे । दोन्हीं जे कां ॥ ७२३ ॥**
**ते गा बुद्धि चोख विशी । जाण येथें राजसी ।**
**अखत टाकिली जैसी । मांदियेसी ॥ ७२४ ॥**

क्षिर निर = क्षीर नीर. सकलवी = गुंताडा. अहोरात्राचिये–अहोरात्रीची. (७१९) भ्रमरपणें–भ्रमरपणा. अव्हां = (१) फुल (२) वाहून नेणे–अव्हांटा = नष्ट आडमार्ग. (७२९) तैसे येचि–तैसी इये. जये ते जिये–तिये. (७२१) डोळयाविण–डोळांवीण. (७२२) चोखविशी–चोखविषि. अखत–अक्षत. (७२४)

अहो ! बगळयाच्या गांवीं तर दूध व पाणी एकत्र घेतलें जातें; अथवा अहोरात्री ती गुंतागुंती का भेद ते कसें तें कांहीं आंधळें ते जाणत नाहीं. (७१९)

ज्यांस फुलांतील मकरंद, सुवास घेतां येतो तोच मुळीं काष्ठ लाकूड कोरण्यास धांव घेऊन येतो प्रवृत्त होतो, असें जरी तरीपण तेथें त्याचा तो भ्रमरपणा कांहीं फुलाचा अथवा काष्ठाचा झाला असा (नष्ट) होत नाहीं. (७२०)

तसें हीं कार्ये अथवा अकार्ये ती शास्त्रविहीत धर्मरूप म्हणावी का अधर्मरूप म्हणावींत जी ती नच समजून घेतां स्वतःस ज्ञानी समजतो शहाणा असा जाणता म्हणवितो, (ज्ञानी ज्ञानाचे ठायी जाणत्या बुद्धिचा असा शहाणा म्हणवितो व तसा वागतो, असा जो वागतो ज्ञानीच एक असा.) (७२१)

पाहिल्याशिवाय, डोळयाशिवाय मोती घेतले तर कदाचितच पाडाचे असें योग्य का उत्तम मिळणारें तें पण ठेवणेंच एक ठेविलें आहे असें उत्तम मोलाचे कदाचितच पदरांत पडणारें होते. (७२२)

(ज्ञान) निषिद्ध सहज प्राप्त न झाले तरच दूर राहातें त्याप्रमाणें अकरणीय अकस्माततेनें ओढवलें नाहीं. तरच मुळीं लोटले गेले कां दूरचें समजलें हो तें एरव्हीं दोन्हीं तीं कार्यें व अकार्यें तीं एकवटतेचीं एक एका सारखीच मानिली होतात. (७२३)

ती ह्या चोखतेबद्दलची तीच येथें राजस म्हटली होते, जसें कां जनसमुदाय त्यांत योगायोग विचार न करितां सरसगट मंडळीस, समुदायावरच आमंत्रण जसें द्यावें. अशी ती बुद्धि शुद्धाशुद्ध न पाहातां सर्वेच कर्माचा स्वीकार करते. (७२४)

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

अधर्मम्=पापास, अकर्तव्यास, अनियमास, अधर्मास. धर्मम्=नियन, कर्तव्य, धर्म, पुण्य, सदाचार, आचार, सुकृत. मन्यते=समजते, मानते, आदराचे करते, विचारास घेते. तमसावृता=तमोगुणानें व्याप्त. (तमस्=मोह, पाप, शोक, अंधःकार, तमोगुण. आवृत=आच्छादित, व्याप्त, वेष्टित. सर्वार्थान्=सर्व अर्थांना सर्वथैवपणेः (सर्व=सगळा, प्रत्येक. अर्थ=शब्दाचा भाव, अभिप्राय, कारण, प्रकार, पैसा, मालमत्ता. (सवार्थसिद्ध=युद्ध.) विपरीतान्=विरूद्ध, उलट. तामसी=तमोगुणासंबंधीं, तापट मनुष्य, सर्प.

अन्वय :—पार्थ । या बुद्धिः । तमसावृता । अधर्मम् धर्मम् इति । मन्यते । तथा च सर्वान् अर्थान् । विपरीतान् । च । मन्यते । सा बुद्धि तामसी ॥ ३२ ॥

अर्थ :—हे पार्था ! जी बुद्धि तमोगुणव्याप्त होऊन अधर्माला धर्म समजते, (अधर्मालाच धर्माचें महत्त्व देते, अधर्मालाच धर्म मानते असे) आदराचें करते. तसेंच अर्थ तेंच सर्वथैवपणें विपरीत (विरुद्ध, उलट) मानते, (विरूद्ध अर्थालाच महत्त्व देते, उलट अर्थाला आदराचें करते) ती बुद्धी तामसी जाण.

(श्लोक ३२ वा ओव्या ७२५–७३३)

**आणि राजा जया वाटा जाये । ते चोरासी आडवाट (आडव) होये ।**
**का राक्षसां देवो (दिवो) पाहे । रात्री होऊनी ॥ ७२५ ॥**
**नाना निधानचि निदैवा । होय कोळिसयाचा उडवा ।**
**पैं असते आपणपे जीवा । नाही जाले ॥ ७२६ ॥**
**तैसे धर्मजात तितुके । जिये वृद्धीसि पातके ।**
**सांच ते ते लटिके । ऐसेचि बुझे ॥ ७२७ ॥**
**ते आघवेचि जे अर्थ । ते करूनि घाली अनर्थ ।**
**गुण ते ते व्यवस्थित । दोष मानि ॥ ७२८ ॥**
**किंबहुना श्रुति जाते । अधिष्ठुनि केले सरते ।**
**तेतुलेहि उपरते । जाणे जे बुद्धि ॥ ७२९ ॥**
**ते कोण्हातेही न पुसतां । तामसी जाणावी पांडुसुता ।**
**रात्री काई धर्मार्था । सांच करावी ॥ ७३० ॥**
**एवं बुद्धीचे भेद । तिन्ही तुज (विशद) विषद ।**
**सांगितले स्वबोध- । कुमुदचंद्रा ॥ ७३१ ॥**
**आतां याचि बुद्धि वृत्ति । निष्टांकिला कर्मजाति ।**
**त्यांचु मांडिजे (बांधिजे) धृति । त्रिविधा जया ॥ ७३२ ॥**

**तये धुतीचेही विभाग। तिन्ही यथालिंग।**
**सांगिजति चांग। अवधान दे॥ ७३३॥**

जया–जिया. आडवाट–आडव=आडमार्ग (आडवी=रान, अरण्य) देवो–दिवो [दिवोपाहे=दिवस उजाडतो–आकाश, प्रकाशन] रात्रो–राती=देणगी, द्रव्य. (७२५) होय–होये, निदैवा निधानचि=भाग्य हीनाला ठेवा तो. कोळिसयाचा=कोळशांचा उडवा=ढीग, रास. (७२६) दोष–दोषची. (७२८) कोण्हाते–कोण्हाते. काई–काय. रात्री धर्मार्थी काय सांच करावी=अभाव करणारी रात्र ती धर्म अर्थाना काय उपदेशाची? (७३०) विषिद–विशद. (७३१) याचि–ययाचि. खादु–खांदु=आधार उपक्रम. मांडिजे–बांधिजे. जया–तया निष्टकिला=निष्ठेने स्थायी केला, भाविक केला, निष्ठा ओकित केला. (निष्ठा=स्थायी भाविक. (७३२)' तये–तिये. दे–देइ. यथालिंग=ज्या संज्ञेचे तसे. (७३३)

**राजमार्ग तो आडमार्गच** कीं, चोरास अहो! ह्या जीवदशेस आत्मस्वरूप ते नाहींसे असेच भासतें, तसें ज्या बुद्धीला **धर्मकृत्य तें पातकच** वाटते, **खऱ्यास लटके समजते, योग्य गुणास दोष मानतें. वेदांनीं योग्य म्हटलें तें अयोग्य जी ठरविते ती बुद्धी कुणासही विचारण्याच्या भानगडींत न पडतां बिनधोक तामस जाणावी.** (ओव्या ७२५–७२९)

राजमार्ग तो चोरास आडमार्ग होतो ज्या कांहीं रस्त्यांनी, वाटांनीं राजाची स्वारी जाते त्या वाटा का रस्ते चोरास तर आडवाटा, आडमार्ग, (आडविणारे रस्तेच) असें सांपडतात–होतात हेंच कसें म्हटलें कीं राक्षसास तर दिवस उजाडतो ती रात्रच झाली असे होते कीं [राक्षसगण (मनुष्यगण देवगण) जो त्यास तर विवाह पद्धती जी, ती तर दान द्रव्य देणगी (कुळगोत्र देवदेवतांचें केलेलें उत्तमत्व, माणुसकीचे दानच दिलेलें जें लग्नामध्यें नवरदेवानें नवरीस तीच हुंडणावळ म्हटली–तेथें (दिवसच एक) सर्व साहित्य दिवस होण्याचें होऊन आहे कीं.) अशीच राती एक देवपण पाहाणारी दाखविणारी होते. (तेथें रात्रि ती दिवसच एक उगवला असें राक्षसगणास होते नां?] (७२५)

निर्दैव जो त्यास (निधान) द्रव्य जें एक तें कोळश्याचा मोठा ढीगच–'उडवाच' दिसतो पण ह्या जीवाच्याठायीं (असलेलेच असतेपण) सर्वस्व (ते ते कांहीं) उगवलें नाहीं, (झालें नाहीं) तेथें (जें कांहीं) जीवदशेच्या सर्वस्वाचें तें आपण होणें झालें नाहीं कीं म्हणून जीवदशेस आत्मस्वरूपच नाहीं असें भासतें. (७२६)

त्याप्रमाणें धर्मजात (धर्मज्ञान–शास्त्रशुद्ध म्हणून) जेवढें कांहीं तेवढे सर्व ज्या बुद्धिस पाप वाटतें खरें तें खोटें अशी समजूत ज्या बुद्धीची होते ती तामसी बुध्दी होय ती बुद्धि धर्मज्ञान जितके ते सर्व पातकच एक तें कीं! कुणी जाणावें तें खरें कीं खोटें! का लटिकें तें, असेंच समजते! (७२७)

तें सर्व अर्थ पुरूष अर्थाचें जें जें कांहीं एक तें तें सर्व अनर्थच (निरर्थक उपद्रव, संकट.) असें करतें व गुण जे व्यवस्थित असे तेहीपण दोषच कीं अहो असें जी मानते. (७२८)

श्रुतिजात–सर्व (श्रुतिचे) जे–(श्रुतिचें एक सर्व तें तेंच मुळीं) अधिष्ठून मान्य केलेलें जें तेंहीपण, उलटें (उपरतें, विपरीत) अयोग्य होय असें जी बुद्धि ठरविते. (७२९)

ती बुद्धि तर नच कुणास विचारताहि कीं सर्वथैव तामसी हे पाण्डुसुता जाणावी, अहो (धर्म अर्थाला) धर्म कार्याला काय रात्रीची वेळ योग्य मानावी? अहो धर्म, अर्थ, इत्यादि जो पुरूषार्थ त्यास अज्ञानाची ती दशा योग्य मानावी (तीं योग्य म्हणावी) काय? (७३०) याप्रमाणें बुद्धिचे भेद तिन्हीं ते आत्मज्ञान बोध कमलाला विकासित करणाऱ्या चंद्रा हे पार्था! तुजला विषद म्हणजे स्पष्ट करून सांगितले. (७३१)

(आतां अशा ह्या बुद्धिवृत्ति ह्या कर्मजातांचेंठायीं निश्चित झालेल्या) तेणें ज्या तीन प्रकारच्या बुद्धि-वृत्तीनीं कर्ममात्राचा निश्चय केला जातो, त्या आधारभूत वृत्तिला धृति–धैर्यवृत्ति म्हणतात. अशा त्या धृतीचे आधार, भेद, प्रकार जे तीन तन्हांचे आहेत. (७३२)

ते धृतीचे तिन्ही (विभाग) प्रकार ज्या लक्षणाचे आहेत त्या क्रमानें उत्तम प्रकारें सांगण्याचें करूं या त्या अवधान द्यावें, अवधान असूं देत. (७३३)

[याप्रमाणें तीन प्रकारची बुद्धि जे अगोदर कर्म निश्चय करते–त्या निश्चयास धृति अशा सिध्दीस नेणे होते. **ती धृति सिद्धिमध्येंच गोविली होते** कीं, (७६४) अध्याय १८ वा]

**धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ।**
**योगेनाऽव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥**

धारयते = धारण करते, आवरते बाळगते, ताब्यांत ठेवते. मन प्राण इंद्रियक्रियाः = मन, प्राण, इंद्रिय यांच्या क्रिया. अव्यभिचारिण्याऽयोगेन = अव्यभिचारी नित्य चिकाटीच्या धारणाशक्तीच्यायोगेंकरून नित्य साहचर्यानें. सा सात्त्विकी धृतिः = ती सात्विक धृति जाण.

अन्वय :—पार्थ । मन प्राण इंद्रिय क्रियाः । यया धृत्या । धारयते । मन प्राण इंद्रिय क्रियाः । यया अव्यभिचारिण्या योगे न धारयते । सा धृतिः सात्त्विकी ॥ ३३ ॥

अर्थ :—पार्था मन प्राण इंद्रिय यांच्या क्रियांनां [तपन तेज जें ह्या मनांस देणें, तसेंच तें तेज प्राणास देणें, तसेंच इंद्रियास देणें जें त्यास क्रिया म्हणतात. मन प्राण, इंद्रिय–हीं प्रत्येक तपाची करणें (स्वधा) स्वाध्यायाची करणें व ईश्वराचे ठाणीं कर्मफल त्याग करणें, तेथें प्रयोजन, समाधान, भक्तिविशेष असें जें कांहीं करणें तें.] ज्या धैर्यानें धारण केल्या जातात. (अनुकूल, सर्वत्र लागू, अपवादरहित, नित्यसाहचर्य चिकाटीच्या योगेकरून मन प्राण इंद्रिय यांच्या क्रिया धारण केल्या जातात)–स्वाधीन ठेविल्या जातात–ती सात्त्विक धृति जाणावी. (श्लोक ३३ वा ओव्या ७३४–७४५)

**तरी उदेलिया दिनकरू । चोरीसी थोके अंधःकारू ।**
**का राजाज्ञा अव्यवहारू । कुंठवी जेवी ॥ ७३४ ॥**
**नाना पवनाचा साटु । वाजिनलिया निटु ।**
**अंगेसी बोभाटु । सांडिती मेघ ॥ ७३५ ॥**
**अगस्तीचेनी का दर्शने । सिंधु घेऊनि ठाति मौने ।**
**चंद्रोदई कमळवने । देती मिठी ॥ ७३६ ॥**
**हे असो पावो उचलिला । मदमुख न ठेविती खाला ।**
**गाजोनि पुढें जाला । सिंहु जरी ॥ ७३७ ॥**
**तैसा जो धीरू । उठिलया अंतरू ।**
**मनादिके व्यापारू । सांडिती उभी ॥ ७३८ ॥**
**इंद्रिया विषयाच्या गांठी । आपसया सुटती कीरीटी ।**
**मनोमायेच्या पोटी । रिगती दाही ॥ ७३९ ॥**
**अधोर्ध्व गुंडे (गुढे) काढी । प्राणु प्रणवाची (नवाची) पेंडी ।**
**बांधोनि घाली उडी । मध्यमेमाजी ॥ ७४० ॥**
**संकल्प विकल्पाचे लुगडे । सांडुनि मन उघडे ।**
**बुद्धिही मागिलीकडे । उगीचि बैसे ॥ ७४१ ॥**

ऐसे धीरराजे (धैर्यराजे) जेणे । मन प्राण करणें ।
स्वचेष्टाचि संभाषणे । सांडविजति ॥ ७४२ ॥
मग आघवीचि सांडी । ध्यानाचा आंतुला मढी ।
कोंडिजति (निरवडी) निर्वेडी । योगांचिया ॥ ७४३ ॥
परी परमात्मया चक्रवर्ती । उगाणति जीव हाती ।
तंव आंच नेघति (लांच न घेता) धृति । धरिजति जिया ॥ ७४४ ॥
ते गा धृति येथें । सात्विकी हे निरूते ।
आईक अर्जुनाते । श्रीकांतु म्हणे ॥ ७४५ ॥

चोरीसी थोके अंधःकारू=चोरी इत्यादि दुष्ट कर्मासह आंधार नाहींसा होतो, थोकतो, थोपविला होतो. अव्यवहार कुंठवी=खोटे व्यवहार विकलांग करते, बोथटले करते, ते मूर्खपणाचे ठरवून बंद करते. (७३४) पवनाचा साट=(कोरड्याचा) चाबूकाचा वेग, सोसाटा. बोभाट आंगेसी सांडिती=देहासगट म्हणजे शरीरासह गर्जना थांबवितात. (७३५) देती मिठी=मिटतात. (७३६) मदमुख=हत्ती गाजोनि –गर्जोनि. सिंह पाहाताच उचलिलेला पायही मदोन्मत्त हत्तीला खालीं ठेववत नाहीं इतका तो गर्भगळित होतो. (७३७) उठिलया–उठलिया धीर उभी=मन आदिकरून गर्भगळित होऊन (७३८) अपसया–अपैसया. मनोमायेच्या–मन मायेच्या. दाही=इंद्रिये दहाही. (७३९) अध ऊर्ध्व, गुंडे काढी (प्राणु प्रणवाची पेंडी–प्राणुनवाची पेंडी गांठोडी)=**खालचे व वरचे मार्ग नाहींसे करून**–प्राणाचा ऊर्ध्व व अपानाचा अधो (म्हणजे खालचा) मार्ग–हेंच गुंडे म्हणजे दगड धोंडे गूढे बांधून–ह्याची गाठोडी बांधून. मध्यमा=सुषुम्ना (७४०) कुगडे=वस्त्र. (७४१) धीर्यराजे–धैर्यराजे. करणें=इंद्रियें. (७४२) सांडी–संडी. मढी=(मढ=कळी) हृदय कमळांत मढि–मढी. निर्वेडी–निरवडी=युक्तीनें कौशल्यानें. योगाचिया–योगाचिये. (७४३) परि–पर उगाणति जीव हाती–उगाणिति. जंव हाती=[आंच–लांच नेघती –न घेता.] झाडा करून–ताब्यांत देई (तो पावे) पावेतो. ताब्यांत दिली जातात. (७४४) सात्विकी–सात्विक. (७४५)

**धीर अंगीं उसळला कीं, मनबुद्धि इत्यादींचे व्यापार उभ्या उभ्याच बंद होतात ते कसें तर**–ओव्या ७३४–७३५

सूर्य उगवला म्हणजें चोरी चहाडी इत्यादि दुष्कर्मासह तसेंच चोरासह कीं आंधार नाहींसा होतो. राजाची आज्ञा–(राजाचें रूप तेंच सर्व एकरूपतेचें शिक्कामोर्तब-तेथें तीच प्रकृती देव) मानीली (प्रकृतिलयानें) तेथें आज्ञा–व्यवस्था, बंदोबस्त प्रज्ञानाचा पर्याय–अवलोकन–(आज्ञा राजाची तेथें चोरीचे अयोग्य व्यवहारणें (म्हणजे खोटे व्यवहार विकलांग केले होतात–अयोग्य व्यवहार) बंद होते. (७३४)

[मन पवन वारा, वायूचा सोसाटा, वेग, नीट, वाजविण्याचें केलें जेथें गंधर्वाच्या पंखयुक्त घोड्याचा कोरडा अथवा–चाबुकच एक वाजविला जाणारा, तेथें मेघ, ढग, विषयाचा जोजार देहासगट गर्जना थांबवितात, वाऱ्यानें पवनानेंच–मनानेंच कीं ते मेघ अभ्र, ढग, देहाचें आक्रोशणें ते थांबविले होते] जोराचा वारा सुटला म्हणजे ढग नाहीसे पवनाचा वेग नीट वाजल्यास ढग वितळतात शरीरासह गर्जना करणाऱ्याचा होतात. मेघांची गर्जना बंद होते. मेघांचा गडगडाट थांबतो. (७३५)

मित्रा वरूणाचा अगस्ति [ज्यानें रामाला विष्णूचा खड्ग धनुष्य व अक्षय भाते दिले, ज्यानें विंध्याद्रीचा उंच वाढण्याचा गर्व हरण केला, जो मोठा तत्त्ववेत्ता धनुर्विद्येंत अद्वितीय असा ज्यानें दक्षिणेंत आर्यांची वस्ती केली–स्त्रीचें नांव लोपामुद्रा–समुद्रांत राहाणाऱ्या कालकेय असुराचा समुद्र पिऊन नाश केला.]

त्याच्या दर्शनानें (पाहाण्यानें, भयमीत होऊन अवलोकन, ज्ञान, नेत्र, आरसा, रूप, सांख्ययोग–मिमांसादि प्रत्येक अभिप्राय) जसें गर्जना करणारे सिंधू म्हणजे समुद्र (हत्तीचा मद, का हत्तीच मुळीं) मौन घेऊन असावे तसे–मौनाचेंच कीं ते), होतात–(चूप बसतात, मुकेच रहावेत) तसें चंद्राचा उदय झाला म्हणजे (चंद्र विकासी कमळें उमललेली पहावयास मिळतात.) सूर्य विकासी कमळें मिटतात, [कमलांचें समुदाय मिटतात कमलांचे पाणी आवरिलें होतें. (चंद्राचा उदय झाला म्हणजे कमलस्थान तें मिटतें अलिंगन देतें मिठी देतें.) (७३६)

किंबहुना–बहुत काय लिहावें पण (पायाची गती चालणें चालतांनां उचलिलेला पाय जरी सिंह गर्जना करीत पुढे झाला तरीपण मदमुख म्हणजे हत्ती तो गर्भगळित झाल्यामुळें तो) पाय कांहीं खालीं ठेवीत नाहीं. तो तसाच उचलिलेला राहातो. (७३७)

तसा अवकाशामध्यें अंतरामध्यें परा व अपरा यांच्या अंतरामध्यें जो कांहीं धीर (धृति, धैर्य) (=स्थिरता, धैर्य गंभिरपणा, शहाणपणा, पराक्रम सहनशील, शांत स्वप्रभाव.) उठतो, तेथें अंतर (अवकाश, छिद्र, आच्छादन, सीमा, मन) ते उभें होतें तेव्हां तर मन आदिकरून ती प्राण इंद्रियें हीं प्रत्येक तर उभ्या उभ्याच आपला व्यापार सांडतात ती स्तब्ध होतात ती गर्भगळित होऊन (दोही बाजूंनी–स्वर्ग व संसार–दोन्ही प्रकारांनीं दोहोशी–देहाशी–संबंध नच ठेऊन) अंतरंगांत धीर उसळी घेऊन आहे जर कां तर मन–मनाचे–बुद्धीचे इंद्रियांचें व्यापार) (ठायींच्या ठायींच) जेथल्या तेथेंच बंद पडतात. (७३८)

तेव्हां इंद्रियें व त्यांचें विषय जे त्याच्या गांठीं आपसुकच सुटतात. हे कीरीटी व (मनोमय कोश जो त्याच्या कां) मनरूपी मायेच्या अथवा मनोमयीच्या का मनोमायीच्या पोटी ती दहाही इंद्रियें (रिघून असतात), आपला रिघाव करणारी होतात. मनाच्या मायावीपणांत [(मायावी पैशाच्चिका का पिशाच्यते मध्यें) कां 'कल्पिता' मध्येंच] आपला रिघाव करतात. शिरतात. [(आत्म्याच्या पंच कोशापैकीं जो मनोमय कोश तेथेंच आपला रिघाव करणारी होतात.) जसें नऊही इंद्रिये दहाव्या श्रवणेंद्रियानें आपलीशीं केली, तसें येथें मनरूपी इंद्रियानें मायावीच्या पोटीची ती इंद्रिये व त्याचे विषय केले.] (७३९)

प्राणाचें ऊर्ध्व व अपानाचे अधो मार्ग असें दोन्हीहीं मार्ग रोधून, आडवून दगड धोंडे अथवा तेथीलचे गूढपण तें तो धीर काढून टाकतो. प्राण व नऊही इंद्रियांचे (वायूचें) गांठोडें बांधतो. व मध्यमा वाणीमध्येंच [उडी घालतो, सुषुम्नेस धडकतो–, प्राण तो हृदयस्थ वायू, जीव, आत्मा, बळ, पूर्ण ओंकाराची पेंडी विणून, गांठोडी बांधून मध्यमिका– का मध्यमा, (मध्यलोक पृथ्वी तूं तुम्ही मध्यम पुरूष न्हाण आलेली कन्या.)] हृदयोत्पन्न वाणी भेदामध्येंच उडी घालतो. [चार वाणी पैकीं दुसरी जी मध्यमा–'वैखरी शब्द निष्पत्ति-र्मध्यमा श्रुतिगोचरा। द्योतितार्थाच पश्यंती सूक्ष्मा वाग् अन् पायिनी'] (७४०)

संकल्प विकल्पाचें वस्त्र–, निश्चय, उद्देश, चूक, शंका, मतभेद इत्यादींचे तें वस्त्र–, [कपडा आच्छादन, पोशाक. वस्त्र अगारं–वस्त्र उट्टिमं=तंबू. वस्त्रनिर्णेजकः=परीट. वस्त्र भेदक=शिंपी. वस्त्र योनि=कापुस, रेशिम, लोकर, इत्यादि. वस्त्र रंजन–वस्त्र भूषण=कुसुंबा (व.)] लुगडे कां साडी टाकून देऊन मन तें उघडें असेंच झालेलें तें बुद्धिच्या उगेपणाच्या–मागिलीकडे उगेच बसतें. (७४१)

[असें धीरराज धैर्यराज धार्यम्=वस्त्र, राग आवणारी स्त्री धीरोदात्त नायक, नायिकाभेद] असें ज्यायोगें धैर्यच सर्व एक राजते, (प्रकाशते, शोभते, प्रकाशित होते, ओवाळू लागते.) त्यायोगेंकरून मन प्राण व इंद्रियें आपल्या स्वाभाविक (सजातिय, आपणच, आत्मा, स्वभाव, गति) क्रिया, हावभाव, (प्रयत्न वागणूक, चळवळ, संभाषा–, संभाषणानें, करारानें, खुणेच्या शब्दांनीं. परस्त्रीशीं भाषण–) सांडून असतात त्यांना आपले व्यापार सोडून द्यावे लागतात. (७४२)

मग सर्व ती, आघवी सही अशी, एकटीच कर्म निर्लेप झालेल्या स्थितींत, ती ध्यानाच्या आंतल्या तृतीय नेत्राच्या विस्ताराचा जो मढ ओपा हृदयकोश त्यामध्यें योगाच्या साधनानें योगांच्या युक्तीनें कोंडली जातात. (७४३)

पण (पर–परम श्रेष्ठ ईश्वर), परमात्मा, चक्रवर्तीच तो त्याच्या ताब्यांत किंवा त्याच्या हाती जेव्हां दिली होतात तेव्हां तर का कामना इच्छा तृप्तीची लांच न घेता ज्या धैर्यानें (धैर्यच एक अवलंबिले व ती सर्व मन प्राणें करणें ही) आवरून धरिली, स्वाधीन केलीं जातात. (७४५)

अशी जी धैर्य वृत्ति ती येथें धृति सात्त्विक होय, हें खरेंच खरें, गा हे अर्जुना ! हे नीटसे ऐकून ऐस. असें श्रीकांत, श्रीविष्णू कृष्ण, श्रीपति म्हणाले. (७४५)

**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ।**
**प्रसंगेन फलाकांक्षीं धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

धर्म काम अर्थ = चार पुरुषार्थांपैकी तीन. धृत्या धारयते = धैर्यानें संपादिले होतात. फला आकांक्षीं प्रसंगेन = प्रसंगानेंच फल तें याचिले, कारणाचें केले इच्छिले होणे जें.

अन्वय :—अर्जुन ! यया ! धर्म-काम-अर्थान् धृत्या धारायते । तु । पार्थ । यया फल आकांक्षी प्रसंगेन भवति । सा राजसी धृतिः ॥ ३४ ॥

अर्थ :—(१) हे अर्जुना ! धृति, जी जवळ असल्यानें (जी होऊन असण्यानें, जी आधार होऊन असण्यानें, (जी आधार घेऊन असण्यानें, जी स्थैर्यच एक जी धैर्यच एक जी संतोषच एक, जी आस्थाच की एक) **धर्म** = (यथाशास्त्र, शास्त्रदृष्टीचें आचरण, आचार, पुण्यकर्म, चाल संप्रदाय, प्राविण्य, शास्त्रोक्त, कर्तव्य, नीती, न्याय योग्यता, स्वभाव, विशिष्ट गुण) **काम** = इच्छा, प्रेम, इष्ट पदार्थ विषयेच्छा, कामभोगेच्छा, इच्छितार्थ, संमती का नाखुषीची संमती, मदन.) **अर्थ**(= हेतु, ध्येय, इच्छा, उद्देशून, निमित्त कारण, दृश्य ज्ञेय, वस्तु, इंद्रिय, कामकाज, इच्छिलेली वस्तु, प्राप्य वस्तु, विषय, मतलब, भावार्थ, द्रव्य, संपत्ति, इत्यादि पुरुषार्थच एक विनंती, मागणी, सत्यपणा धर्मादि पुरुषार्थ धैर्यानें बाळगली, धारण केली, आश्रय दिली गेली) आचरिली, (मनांत आणली, ताब्यात ठेविली, जगणें पदरांत पाडून घेतले) जिच्यायोगेंकरून तिला **राजसी धृति** म्हणतात–हे पार्था ! जी, क्वचित् प्रसंगीं, समयीं चटक, संयोगामुळें, फल आकांक्षते याचते, इच्छिते, ती धृति राजसी म्हटली.

(२) हे अर्जुना ! जिच्या आधारानें, धर्म अर्थ कामादि पुरुषार्थ, स्थैर्यानें धैर्यानें, धारण केला होतो, हे पार्था ! जिच्यायोगें क्वचित चटका लागल्यानें, प्रसंग, समय संयोगामुळेंच फल तें याचणें, इच्छिणें आकांक्षणें (कारणाचे) केलें होते ती धृति 'राजसी धृति' म्हणावी. (श्लोक ३४वा ओव्या ७४६–७४९)

**आणि होऊनि शरीरी । स्वर्ग संसाराच्या दोही घरी ।**
**नांदे जो पोटभरी । त्रिवर्गोपाई ॥ ७४६ ॥**
**तो मनोरथांच्या सागरी । धर्मार्थ कामाच्या तारूवरी ।**
**जेणे धैर्य बळे करी । क्रिया वाणिजे (वणिज) ॥ ७४७ ॥**
**जे कर्म भांडवला सुये । तयाची चौगुणी येती पाहे ।**
**येवढें सायास हे साहे । जया धृति ॥ ७४८ ॥**
**ते गा धृति राजस । पार्था येथे परियस ।**
**आतां आईक तामस । तिसरी जे कां ॥ ७४९ ॥**

होऊनि–होऊनिया. शरीर=देह. शरीरयात्रा=उपजीविका. शरीरिन्=जीव, प्राणी. त्रिवर्गोपाई -त्रिवर्गोपाये. त्रिवर्ग=(१) धर्म, अर्थ, काम (२) भय, स्थिति, वृध्दी. (३) सत्व, रज, तम. उपाय =इलाज, (प्रतिकार, पद्धति, साधन, राजनीतीतील साम, दाम, दंड, भेद. उद्दीपक सामग्री जोडणें, आगमन.) (७४६) धर्मार्थ कामाच्या तारूवरी=धर्मार्थ कामाचे तारूभरी वाणिजे–वणिज–वणिजे (७४७) येती पाहे–येती वाढी पाहे=पक्कदशा फायदा येतो तें पाहून; सूये=घालतो. चौगुणी=चौपट गुणवान्. (मनुष्य पदार्थ इत्यादींचा मूळ धर्म चौपटीचे झाले, सत्व, रज, तम प्रत्येकी, चौपट गुणाची दिव्याची वात चौपट गुणाचे ज्ञानेंद्रिय चौपट रूपादि पंचविषय, चौपट अंत:करण बुद्धि, चौपट गौण भाग, चौपट आधिक्य, चौगुण दास, चौपट माधूर्य, ओज, प्रसाद, हे काव्यगुण. चौपट, गुणाचे, रूपादि २४ गुण, चौगुण–चौपट आचारी–चौगुण=चौपट त्याग) सायास–साहस जया धृति=ज्या रजोगुणात्मक धृतीनें (७४८)

**(जीव तो शरीर धारण करून स्वर्ग व संसार ह्या दोन्ही घरीं) धर्म अर्थ काम असे त्रिवर्ग लाभून वैभवांत राहातो (धर्म अर्थ व काम ह्या तीन उपायानी पोटभर नांदतो) संकल्प विकल्प सागरांत भांडवल घातले तें ह्या जीवानें ज्या धैर्याच्या जोरावर तेथें कर्माचा व्यापार चालविणें तें धर्म अर्थ कामाचे गलबत तारू भरून कीं, चौपटीपेक्षां जास्त धर्म सायास सहन करतो.** ओव्या ७४६–७४८

शरीरी–शरीरिन् मूर्तिमंत जिवंत वस्तु प्राणी मनुष्य जीवात्मा होऊन जो स्वर्ग व संसार याच्या दोन्हींही घरांत पोटभर नांदतो–तो कसा तर त्रिवर्ग जे धर्म, अर्थ, काम याच्या जोडण्यानें— (७४६)

—तो इच्छांच्या मनोरथांच्या सागरामध्यें धर्म, अर्थ व काम अशा पुरुषार्थाच्या तारूवर–तारू तो भरला 'पांडुरंग' ज्या धैर्यानें, बळाने, क्रिया त्या तप (तप=तापणे, समर्थ असणें, प्रकाशणें, तापविणें, रूप करणें. तपस्=तपकरणें.) स्वाध्याय (स्वधा) ईश्वरप्रणिधन (ईश, ध्यान सायास, स्तोत्र) आदि वणिजे म्हटली ती व्यापार, उदीम, धंदा, वाणी–व्यापार वणिज म्हटली ती) करतो. (७४७)

ज्या कर्माच्या भांडवलावर चौपट लाभ होईल असें वाटतें, जें कर्म केलें असतां चौपट फळ मिळेल असे—जें कर्म भांडवलच एक वीते पुढें करतें, त्याची ती चौपटपणानें येणारी परिणामात्मकतेची पक्कदशा लाभाची ती पाहावी तो येवढें केवढें तरी धर्म सायासच ते प्रणिधान स्तोत्र, ध्यान हें ज्या धैर्यानें सहन केलें जातात. (७४८)

अगा हे अर्जुना! ती तेथें राजसी धृति होय असें जाण: आतां यावर **तिसरी जी का तामस धृति म्हटली ती**बद्दल ऐकण्याचें कर. (७४९)

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च।**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

स्वप्नं=झोंप. जीवावस्था विशेष, अज्ञानावस्था सुस्ति, आळस. (स्वप्नज=झोपाळू. स्वप्न्या=ज्या नाडींत जीव असतां स्वप्न पडते ती नाडी.) भयं=भीती, संकट, भयब्राह्म=मित्रा–(प्राणरक्षणार्थ ब्राह्मणत्व सांगणारा) ब्राह्मण. शोकं=दुःख खेद. (शोकअरि=कंदब वृक्ष. शोक स्थान=शोक कारण.) विषादं= खेद, दुःख, उत्साह भंग, निराशा, ग्लानि, गळाठा. मदम्=कैफ, धुंदी, उन्माद, गर्व, उत्कट कामेच्छा, इच्छा, सौंदर्य, गंडस्थळ इत्यादींतून वाहाणारे मादक पाणी. न विमुञ्चति=मुक्त करीत नाहीं, सोडीत नाहीं, त्यागीत नाहीं, हृदयाचा कठिण तो कळवळून अश्रु गाळीत नाहीं,–(मंद बुद्धि दुःख,) कष्ट वगळणें, सैल करणें, कपडे काढणें करीत नाहीं, (धीर्धागेस) आनंदवीत नाहीं, (प्रयत्नानें पुरुषास) मुक्त करीत नाहीं. दुर्मेधा=दुर्मेधस्=मूर्ख, मंदबुद्धि. तामसी=अंधकारमय, अज्ञानी, दुष्ट, निद्रेची अशी ती बुद्धि.

अन्वय :—पार्थ। यया (धृति) दुर्मेधस्। स्वप्न एव। न विमुञ्चति स्वप्नं। यया दुर्मेधस् भयं एवं। न विमुञ्चति भयं। च। यया। दुर्मेधस् शोकं एवं। न विमुञ्चति शोकं। यया दुर्मेधस्। विषादं एव। न विमुञ्चति विषादं। यया दुर्मेधस् मदम् एवं। न विमुञ्चति मदम्। —सा धृतिः तामसी ॥ ३५॥

अर्थ :—हे पार्था! ज्या मूर्खपणानें का मंदबुध्दीनें स्वप्न म्हणजे झोप आळस (अज्ञानावस्थाच होऊन असतो अज्ञानावस्था झोंप आळस) सोडीत नाहीं; ज्या मंदबुध्दीमुळें भय भीती (संकटच एक होऊन असतो भय भीती) सोडीत नाहीं, ज्या मंदबुध्दीमुळें शोक दुःख खेद (होऊन असतो. शोक दुःख खेद) सोडीत नाहीं. ज्या मंदबुध्दीमुळें खेद, दुःख (उत्साहभंग निराश, गळाठा, ग्लानिच होऊन असतो. खेद, दुःख उत्साहभंग निराशा गळाठा ग्लानीच) सोडीत नाहीं, ज्या मंदबुद्धिमुळें कैफ धुंदी, उन्माद, उत्कट कामेच्छा (सौंदर्य होऊन असतो. कैफ धुंदी, उन्माद उत्कट कामेच्छा इच्छा, सौंदर्य) सोडीत नाहीं, निर्हेतुकतेचें करीत नाहीं. ती धृति–धृति ती–तामसी म्हणावी. (श्लोक ३५ वा ओव्या ७५०–७७२)

तरी सर्वांही अधमे गुणे। जयाचे कां रूपा येणें।
कोळिसा (कोळसा) काळेपणें। घडिला जैसा ॥ ७५० ॥
अहो प्राकृत आणि हीनु। तयाही कीं गुणत्वाचा मानु।
परि न म्हणिजे पुण्यजनु। राक्षसु काई ॥ ७५१ ॥
पै ग्रहांमाजी इंगळु। तयातें म्हणिजे मंगळु।
तैसा तमांध शिळु (तमी घसाळ)। गुण शब्दु हा ॥ ७५२ ॥
जे सर्वा दोषांचा वसौटा। तमचि कामौनि (कामऊनि) सुभटा।
उभारिला आंगवटा। जया नराचा ॥ ७५३ ॥
तो आळसु सुनि असे कांखे। म्हणौनि निद्रेजेवि काही (कहि) न मुके।
पापे पोशिता दुःखें। न सांडिजे जेवि ॥ ७५४ ॥
आणि देहा धनाचिया आवडि। सदा भय तयातें न सांडी।
विसंबुं न शके धोंडीं। काठिण्य जैसे ॥ ७५५ ॥
आणि पदार्थजाति स्नेहो। बांधे म्हणोनि तो शोका ठावो।
केला न शके पाप जावों। कृतघ्नौनि जैसें ॥ ७५६ ॥
आणि असंतोष जीवेंसीं। धरूनि ठेला अहर्निशी।
म्हणौनि मैत्री तेणेंसीं। विषादें केली ॥ ७५७ ॥
लसणातें न सांडें गंधी। का अपथ्य शीळातें व्याधि।
तैसी केली मरणावधि। विषादें तया ॥ ७५८ ॥
आणि वयसावित कामु। यांचा वाढवि संभ्रमु।
म्हणौनि मदें आश्रमु। तोचि केला ॥ ७५९ ॥
आगीते न सांडी तापु। सळाते जातीचा सापु।
का जगाचा वैरी वासिपु। अखंड जैसा ॥ ७६० ॥
ना तरि शरीरातें काळु। न विसंबे कव्हणी वेळु।
तैसा आथी अढळु। तामसी मदु ॥ ७६१ ॥
एवं पाचढि निद्रादिक। तामसाच्याठायीं दोख।
जया धृति देख। धरिलें आहाती ॥ ७६२ ॥

तिये गा धृति नांवें । तामसी येथे हें जाणावें ।
म्हणितलें तेणें देवें । जगाचेनि ॥ ७६३ ॥
एवं त्रिविधा जे बुद्धि । कीजे कर्म निश्चयो आधि ।
तो धृतिचया सिध्दि । नेईजे येथें ॥ ७६४ ॥
सूर्यें मार्ग गोचर होये । आणि तो चालवी कीर पाये ।
परी चालणें तें आहे । धैर्यें जेवी ॥ ७६५ ॥

सर्वाहि अधर्मे=सर्वाधर्में कोळिसा–कोळसा. (७५०) परी–तरी. हिनु–हीनु. पुण्य जनः=(१) राक्षस (२) यक्ष, (३) यातुधानः [यातुधानः पुण्य जनो नैॠतो यातुरक्षसी] पुण्यगृह=(१) देऊळ (२) धर्मशाळा. पुण्येश्वर=कुबेर. पुण्य दर्शन=चाष पक्षी. लोहपृष्टस्तु कङ्कःस्यादथ चाषः किकीदिविः। पुण्यवत्=भाग्य संपन्न, पुण्यकं=(१) सत्कर्म (२) उपवासादि व्रत्, (३) पति प्रेम व पुत्र याच्या प्राप्तीसाठीं करावयाचे व्रत पुण्य=सुवासिक, गंभीर, सुंदर.) (७५१) तमांधशीळु–तमाधसाळु (७५२) सर्व दोषाचा कामौनि–कामऊनि=कमाऊन. आंगवठा=मूर्ति. (७५३) सूनि=बगलेत मारून. पोशिता दुखे–पोषिता दुःखे. (७५४) देहाधनाचि–देहधनाचिया. शके–सके. (७५५) याचा–ययाचा. (७५९) कव्हणी–कवणे. (७६१) पाचहि–पाचहि हे=स्वप्न, भय, शोक, विषाद, मद. जया–जिया. आहती–आहाति. (७६२) त्रिविधा–त्रिविध. आधि–आधी. घृतिचया–धृतिया. नेईजे येथे–नेई जो येथ. (७६४) चालवी–चालती. (७६५)

**काळाकभिन्न कोळसा निंद्य गुणानें प्रसिध्दीचा त्यास गुण म्हटलें; राक्षस त्यास पुण्यजन जसा निखारा त्यास मंगळ असे भपकेदार नांव तमाला दिले होत आहे: सर्व दोषाचा तो पुरूष आळसाला पोसतो आहे अशी जाणीव व झोंप त्याला सोडीत नाहीं दगड–कठिण (असा स्वहितावद्दल) देह-धन-प्रेम भयामुळें पदार्थमात्राची आवड म्हणून शोक व असंतोष.** ओव्या ७५०–७६५

तरी सर्वच्या सर्व नीच दुष्ट सर्व अधम अशा गुणामुळें ज्यास रूप आले आहे कसे तर जसा कां काळेपणाचा सर्वथैव असा कोळसाच एक घडीव असा. (७५०)

अहो क्षुल्लक ग्राम्य (हलका, मूळचा, स्वभाव सिद्ध सामान्य नेहमीचा अशिक्षित, अडाणी, प्रकृतिपासून झालेला, माया प्रकृति प्रर्वतक, नीच, हलका मनुष्य, 'संस्कृतोत्पन्न अपभ्रष्ट भाषा' विषयीं, अपभ्रष्ट पावलेले, यज्ञविषयीं) तसेंच हीन (म्हणजे टाकलेला, द्रव्यरहित, न्यून, उणा कमी प्रतीचा निंद्य नीच पदच्युत केलेला, अपूर्ण साक्षीदार, सोडलेला, वेगळा, वर्जित, (एकांत, रहित आत्मन्=शून्यात्मा) असा जो त्यासहि की अहो! (मनुष्य पदार्थ इत्यादींचा मूळधर्म, मनुष्य पदार्थास आणणारा गौरव, आदर) मान सन्मान (केला, वात गुण लावून, वात) गुणत्वाचे केल्याने (मान म्हणजे मत्सरजन्य क्रोध, गर्व ताठाच तेथें की त्या वात गुणत्वानें परंतु गौरवाने मनुष्य पदार्थ झाला, तरी सुद्धां ताठ्यामुळें मत्सराचा झाला) तर मग (सत्कर्म पवित्र धार्मिक शुभकारक–पुण्य ते) पुण्यजन तो [जन्यूः=जन्म, प्राणि, अग्नि, ब्रह्मदेव, जनुस=जन्म उत्पत्ति=आयुष्य, जन्म ३ जन्मभूमि. ४ प्राणि. जन्य=उत्पन्न केलेले घराण्यासंबंधी बाप, वरपक्षीय वधुपक्षीय, करवला, मनुष्य, टपका आईची मैत्रिण, करवली, प्रेम, सुख व आनंद, उत्पत्ति प्राणी देह बाजार लढाई निंदा, लोक व राष्ट्र.] राक्षस (सुकृतानें उत्पन्न केलेला तो, बाप पुण्यजन असा तो सत्कृत पुण्यजन न म्हणावा काय? यक्ष राक्षस न म्हणावा काय? यक्ष तो ज्याचा पुण्यजन मनुष्यजन्य–बाप) असाच म्हणावा ना! (पुण्यजन्यत् पुण्यजनः (जन्=प्रगट होणे, जन्मतः मिळणे, जन्मणें, उत्पन्न होणे, होणे घडणें.)

[अहो असल्या त्यास जेथे सर्व अधमपणच एक रूपास आलेले तेथें कोळसा जसा काळेपणाचा घडलेला

तसा तो सर्व अधमपणाच एक हलकटपणाचा, आतां असल्या त्यांस, प्राकृत व गुणहिनास जर गुण (बात) गुणवान् म्हणावे तर मग राक्षसास रक्षस् जो त्यास पुण्यजन साधुजन (सज्जन, समर्थ, योग्य,) का म्हणूं नये? त्यास पवित्र का धार्मिक का शुभकारक कां म्हणूं नये?] येथें स्वकर्म तेंच पुण्य म्हटले व मनुष्याचा जो धर्म का मूळस्वभाव तेंच जग. तेथें जन्मले जे तेच मनुष्य समुदाय का देश म्हटले. बात लाविली तरच प्रकाश, गुण, (गुणवान् गुणिवंत) बात तर स्नेह दिव्यानेंच, प्रकाश, देणारी, बोलच प्रकाशले असें जर तरच घर प्रकाशले का घरचे बोलणें केले नाहीतर अविद्यमान, असत्य, वाईटपणाचे अज्ञांधकाराचे जे तें काय सत्कृत् (आदर केलेले, सत्कार केलेले, पालन केलेले) म्हणावें? (७५१)

ग्रहामध्यें इंगळ आग, निखारा त्यास मंगळ कल्याण करणारा मंगळ नावाचा ग्रह म्हणावें तसा हा तमंधशील (तमोगुणी स्थूल दृष्टीचा) हा गुणशब्द जाणावा. (७५२)

हे वीरश्रेष्ठा! जो सर्व दोषाचे वसतिस्थान आगर असें तमच एक कमावून सिद्ध केलेला उभारिलेला तयार केलेला ज्या नराचा देहाकारः "सर्व तमाचा तो लाठा। की अधर्मी तोचि पैठा। आगि जैसा आगिठा। तैसा धडकें॥" (७५३)

तो नर आळस काखोटीस-(बगलेत) मारून असतो. म्हणून निद्रा ही त्यास नेहमी ठेवलेलीच (त्यास निद्रा नाहीं असें केव्हाहीं होत नाहीं तो नेहमीं निद्रेतच गुरफटून असतो) अहो! पापच एक जर पोसले तर दुःख ज्यानें पापच एक पोसले त्यास दुःख कधीही सोडीत नाहीं नेहमीं ठेविलेलेंच आहे. (७५४)

तसेंच देहरूपी धनाच्या, देह-द्रव्य (देह स्नेह देह देह प्रिय वस्तु) तृप्ती-संतोष-आवडीमुळें त्यास तर भय तें केव्हाहीं सोडीत नाहीं. अहो दगडपणावाचून दगडपण तें काठिण्य तें विसंबू शकत नाहीं दगडच जो त्यास काठिण्य (निष्ठूरपणा-दुर्बोधपणा) केव्हाही विसरावा लागत नाहीं.) धोंडा जो त्यास काठिण्य केव्हांहि सोडून जात नाहीं. (७५५)

पदार्थमात्राच्या ठायीं प्रीती ठेवतो वस्तुजाताच्या ठिकाणी एक स्नेहच बांधून ठेवतो; म्हणून तो शोकाचा ठावच एक केलेला जसें कृतघ्नापासून अनुपकाऱ्यापासून उपकार न मानणाऱ्यापासून कधींही पाप ते कांहीं जात नाहीं तसें. (७५६)

तो तर असंतोषच एक आपल्या पदरी जिवाशी-जीवप्राणेसी बांधून आहे-(असंतोषाशीं मैत्री करून आहे. नाखुषीच एक ह्या जीवन जीवित जगण्याबाबत रात्रंदिवस धरून आहे. पुढें घेऊन आहे) आणि म्हणूनच कीं, अहो एका विषादानेंच (उत्साहभंगानें-, हिरमुसलेपणच कीं एक जे त्यानें) त्याशीं मैत्री केली. (७५७)

लसणाची घाण कांहीं केल्या जात नाहीं, अथवा अपथ्य नेहमीं करणारा जो त्यास व्याधी (ही नेहमीचीच होय) कधींही सोडीत नाहीं. त्याप्रमाणें त्यास तर ह्या मनोभंग, अनुत्साह, खेदरूपी विषादानें की एक मरणसीमाच पाहविली होते (त्याचा तर मरणरूपी अपमानच एक दुःख, श्रम, शोकरूपी विषादामुळें केला होतो). (७५८)

आतां ह्या विषादाशिवाय आणीक एक त्यास तो मद (गर्व, ताठा, कैफ, सौंदर्याची धुंदी) तेथें कामइच्छेनें आपला (उन्मादाचा कैफाचा मदाचा उत्कट कामेच्छेचा) आश्रमच एक केला होतो तो माजुरी-पणाच घर होतो. [वय, उमर तारूण्य रूपी वित्त धन व काम ह्याचा मोठेपणा पदरीं बांधून वाढवीत राहातो आणि म्हणूनच गर्वानें तर तोंच की आपला आश्रम (गृह) केला होतो की.] (७५९)

(ताप, ज्वर का उष्णता ती) आगीस (कां वणव्यास) (सोडीत नाहीं अग्नि = वित्तव सुवर्ण पित्त) त्रितापामध्यें वणवा लागल्यासारखी आग भडकलेलीच नेहमीं असणार—अस्सल जातिवंत साप द्वेषास

शत्रुत्वास ईर्षेस म्हणजे सळास (पाणीदारपणांत) केव्हांही सोडीत नाहीं का जगाचा–लोकांचा जो वैरी म्हणजे सर्वांशीं जो विरूद्ध त्यास तर भय हें नेहमी असावयाचें कीं जगाचा वैरी अखंड भीतच असतो ह्या लोकीं प्रीती पाहाणें प्रकाशाचें नाहीं असा तो [(भीति कां) भय हे नेहमींच ह्या लोकीचें ह्या जगाचें वैरीच एक ते कधीही नाहींसे होत नाहीं] जगाला लोकींचा वैरी तो अखंड भीत असतो–तो भीति सांडीत नाहीं. (७६०)

(किंवा असें पाहा कीं,) शरीरास तर काळ तो केव्हांहीं (कवणेहि वेळी वेळ ती कसलीही तरी) विसंबत नाहीं. तसा तामसाच्याठायीं मद तो (धुंदी, उन्माद, गर्व, उन्मत्ततेचें हरखणें, मद्य तें जसें कां नेहमीचे) अढळ असतो. (७६१)

याप्रमाणें निद्रा आदिकरून पांचही दोष, (१) स्वप्न, (२) भय, (३) शोक (४) विषाद, (५) मद–तामसाच्या (तमोगुणासंबंधीं तापट मनुष्याच्या) ठाई असणारे तें दोष त्यांनीं तर धैर्यच एक पोटी बांधून असणें होत असलेले–, ज्या धैर्यानें निद्रा आदि दोष तामसी धृतीने सावरून धरिलेले असें दम धरून राहातात. (७६२)

तेंच ह्या धैर्याच्या नांवाखालीं, जरी तरी पण तामस ते तामसी होत असें जाणावें, असें जगाच्या देवाने म्हटले; (धैर्य तामस ते देह विकाराचा संसारच एक, तमाचा (संसाराचा) केलेला, जेथें प्रकृति विकारासच सर्व महत्त्व दिलेले.) (७६३)

याप्रमाणें तीन प्रकारची जी त्रिविध बुध्दि तीच मुळीं अगोदर कर्माचा निश्चय करिते तेव्हां तो निश्चय धैर्यानें सिध्दीस नेणें होतें: ती धृति (कार्याची पूर्णता–नित्य सिध्दीच एक–) सिध्दीमध्येंच गोविली होते. (७६४)

सूर्यामुळें मार्ग गोचर होतो, पाय ते तो मार्ग चालतात (मार्ग तो पाय चालवितो.) पण तेथें चालणें तें चालणाऱ्याच्या (मार्गामागाच्या) धैर्यानेच होते असावें लागतें नां? (७६५)

**तैसी बुद्धि कर्माते दावी । ते करण सामुग्री निफजवी ।**
**परि निफजावया होआवी । धीरता जे ॥ ७६६ ॥**
**ते हे गा तुजप्रति । सांगितली त्रिविध धृति ।**
**या कर्मत्रया निष्पत्ति । जालया मग ॥ ७६७ ॥**
**येथें फळ येक जे निफजे । सुख जयाते म्हणिजे ।**
**ते ही त्रिविध जाणिजे । कर्म वशे ॥ ७६८ ॥**
**तरी फळरूप ते सुख । त्रिगुणि त्रिविध भेदले देख ।**
**विवंचु आता चोख । चोखी बोली ॥ ७६९ ॥**
**परी चोखी वे कैसी सांघे । पै घेऊ जाता बोलबगे ।**
**कानीचेही (कानिचियेहि) लागे । हातीचा मळु ॥ ७७० ॥**
**म्हणौनि जयाचेनि अव्हेरे । अवधानहि होय बाहिरे ।**
**तेणे आइक हो अंतरें । जिवाचेनि जीवें ॥ ७७१ ॥**
**ऐसे म्हणोनि देवो । त्रिविध सुखाचा प्रस्तावो ।**
**मांडिला तो निर्वाहो । निरोपीत असे ॥ ७७२ ॥**

या–यया. जालया–जालिया. (७६७) येथे–येथ. फळ येक–फळ जें येक. (७६८) त्रिविध–त्रिगुणी. (७६९) सांघे–सागे. घेऊ–घेवो. कानीचे–ही–कानीचियेही. बोलबगे=शब्दाच्या मार्गाने (७७०) अव्हेरे=कानावर आलेलें अथवा कानी ऐकिलेलें त्यासही हातचा मळ लागतो म्हणून ज्याचा अव्हेर केल्यानें

अवधान लक्ष, तेंच मुळीं बाहेरच राहील तसें जीवाच्याहि जीवभावानें आदर देऊन ऐकण्याचें कर बाहेरे= बहिरे (७७१) निर्वाहो=व्यवस्था, संपादन, पुरवठा, चरितार्थ समाप्ति. निरोपित–निरूपीत अवलोकनास देत आहे. विचार पुढें मांडीत आहे (निरूपण). (७७२)

तशी बुध्दी ती कर्मास दाखविते तेथें इंद्रियाचा साधन समूह ते कर्म करतो (तेथें ती बुध्दी साधन सामुग्री निपजविते उत्पन्न करते पण तेथें तशी ती सामग्री निफजवीच निफजावी अशी) तेथें धीरता (गंभीरपणा धैर्य, स्थीरता, धीरत्व, सधीरता, धीरोदात्तता–करूण व वीर या दोन रसांनीं युक्तता धीरोदात्तता) निष्पत्ति निपजण्यास जी कांहीं धीरता असावी लागते.ती असावी की. (७६६)

ती धीरता ती हीच तीन तऱ्हांनी सांगितलेली धृति होय तऱ्हेच्या कर्माची (समाप्ति, निष्पत्ति, उत्पत्ति) सिध्दी झाल्यावर मगच की ती धृति निष्पत्ति म्हणावी की. (७६७)

त्या धैर्याप्रमाणें तीन प्रकारचे (कर्मठ व) कर्मानुरूप जे फळ होतें ज्यास सुख म्हणतात, तेहीपण कर्मसंबंधानें (कर्मवशेकरून त्रिविध) तीन (तऱ्हांचे) प्रकारचें आहे असे जाणावें. (७६८)

(धृति, सुख, फळरूप धृति म्हणजेच सुख ते) सुख फळरूप तें तीन गुणांनी (तीन प्रकारांनीं) भेदले होतें असें जाणावें–तेंच आतां कसें तें चोख उत्तम शब्द असेंच विवंचू विचारास घेऊ कसें तें ते तर की अहो चोखी बोलीच एक जी तीच मुळीं येथें बोलविली, जशी उत्तम अशा बोलीनें, (तें विवेचनाचें करूं) की. (७६९)

पण चोखी उत्तम बोली, ती कशी सांगते, सांगेल, तर जसें कां शब्दाच्या मार्गानें घेऊ गेले असतां कर्णद्वारा श्रवण केलें असतां कर्णरूपी हाताचा मळ लागेल तेथे त्या कानीचे त्या कानामध्यें (कानानें जें कांहीं ऐकीलें होते) जें कांहीं जातें त्याजलाही पण हाताचा मळ (सहजसाध्य यःकश्चितपणाचा तिटकारा) लागतो असा कां. (७७०)

म्हणून कानावर आलेलें का कानांनीं ऐकलेलें अतिशय अगौरव, अनादर, तिरस्कार, कानानी ऐकलेलें त्यासही हातचा मळ [**हात**=आंग, कर, हात देणे–खोई देणे=मदत करणें, हाताचा अंश; **हात**= अक्षर, वळण, लिपी, अक्षराची मोड. **हात**=गडी, माणूस, कामकरी. अगदीं थोडे हात=इन् मिन् साडेतीन इनमिन सव्वातीन, अगदी थोडीच माणसें. हातचा पसा=प्रसृति, पसा, चुरका, खोंगा, चूळ. **स्वच्छ हात**=निर्दोषता, अपराध नव्हे नाहीं अशी दोष मुक्तता, सहज सौंदर्य, बाल्य, बाल्यदशेचे मुग्ध ते सहज सुंदर, बालदशेचे निष्कलंक सात्त्विकतेचे, बापुडेपणा, दीनवाणा, दिलपाक, निष्कपट, दोषशून्यता निरूपद्रवी, अकृतापराध, निर्मळ, पाक, अपाप, अदोष, निर्दोष अविकार, निर्विकार, अनपकार, सात्त्विक. **हातीचा मळ**=दोष बाधा अपराध. जीवभाव ब्रह्मभाव तेथें देवतेचे दिव्यच जे त्या कर्माची विल्हेवाट लावणारी तेथें ब्रह्मच की, ब्रह्मभावानें कर्मदोष समाप्तीचें करणारे, अहो जग व्यापकत्वानें देवच की, तेथें वागणारे असें सरस्वतीचे हृदय जीवाचाहि जीवभाव देव—] लागतो म्हणून ज्याचा (शब्दाचा) अव्हेर (झिडकारणें) केल्यानें अवधान (लक्ष) तेंच मुळीं बाहेरच राहील–ऐकणारे कानही बहिरे होतील– तसें जीवाच्याही जीवभावानें आदर देऊन ऐकण्याचें कर तेव्हां तर तूं थकच होऊन जाशील, आश्चर्याचा होशील=अशा त्या जीवभावाच्या आदरानें ऐक–त्याचा त्याग केला असतां अवधान देखील बाहेर जाईल– जीवाचाही जीव अशा अंःतकरणानें ऐक–जें का जपाच्या सोडण्यानें लक्ष तें बाहेरचे होण्यानें असतें म्हणून. (७७१)

(असें देवांनीं म्हणून अथवा) असें आहे म्हणून देवांनी तो आतां तीन तऱ्हाच्या सुखाचा प्रस्ताव आरंभ, प्रसंग मांडिला, (पुढें केला आहे तोच आतां निर्वाहाचा असा पुरवठा चरितार्थ (समाप्ति, व्यवस्था) तेथिचा विचार देव ते पुढें मांडीत आहेत–, अवलोकनास देत आहेत. (७७२)

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥ ३६ ॥**

तु इदानीम् = (परंतु) आतां, सांप्रत, विषय बदलला तेथें. त्रिविधं = तीन तऱ्हांनीं, तीन प्रकारचे. भरतर्षभ = भरतश्रेष्ठ, (ऋषभध्वज = महादेव.) अभ्यासात् यत्र रमते = अभ्यास जो आहे तोच येथें ह्यांत रमवितो. क्रीडा करतो, आनंद पावतो. अभ्यासानेच ह्यांत रममाण होणें होतें. दुःख अंतंच निगच्छति = ह्या सुखांतच सर्व दुःखांचा अंत होतो.

अन्वय—भरतर्षभ । इदानीम् तु । त्रिविधं । सुखं । मे शृणु । यत्र अभ्यासात् रमते । दुखान्तं निगच्छति । च ॥ ३६ ॥

अर्थ :—हे भरतश्रेष्ठा ! आतां तीन प्रकारचें तें सुख, त्याचे प्रकार मजपासून ऐक; ज्या सुखांत, अभ्यासच (ध्यान, आचार, नामस्मरण, भजन, सेवा, संभावना इत्यादि) तो मुळीं रमवितो (अभ्यासानेंच आनंद पावतो, क्रीडा करतो—सुखांत रममाण होणें होतें व) ह्या सुखांतच सर्व दुःखाचा अंत होतोः [ज्या सुखामध्यें अहो पुण्यवंतच जसा का एक, पुण्यवंतामध्येंच—आनंदामध्येंच अभ्यासाचा आवृत्तीनें क्रीडा भोग करावा आनंदच आनंदास यावाः ज्या सुखामध्यें, शोक पीडा, कष्ट ते, सुखाच्या खरेपणामुळें, सुखाच्या जवळचे होण्यानें, सुखाची सीमेच्या निश्चयाचा होतो. सुख परिणामास पावतो, सुख व्यापाराचा होतो—ज्याशी बोलिलें तर वेदाप्रत येतो—वेदच घोकला का जसा, असा होतो. तेथें दुःखाचा अंतच कीं कां न म्हणावें ! ]　　(श्लोक ३६ वा ओव्या ७७३–७७८)

**म्हणे सुखत्रय संज्ञा । सांघो म्हणौनि प्रतिज्ञा ।**
**बोलिलो ते प्राज्ञा । आईक आतां ॥ ७७३ ॥**
**तरी सुख ते गा कीरीटी । दाविजेल तुज दिठी ।**
**जैसे आत्मियाचिये भेटी । जीवासी होय ॥ ७७४ ॥**
**परि मात्रेचेनि मापे । दिव्यौषध जैसे घेपे ।**
**का कथिलाचे कीजे रूपे । रसभावनि ॥ ७७५ ॥**
**नाना लवणाचे जळ । होआवा दोनी चारी वेळ ।**
**देवोन (देऊनि) सांडिजति ढाळ । तोयाचे जेवि ॥ ७७६ ॥**
**तेवी जालेनि सुखलेशे । जिउ भाविलया आभासे ।**
**जीवपणाचे नाशे । दुःख जेथें ॥ ७७७ ॥**
**ते येथ आत्मसुख । जाले असे त्रिगुणात्मक ।**
**तेही सांघो येकैक । रूप आतां ॥ ७७८ ॥**

आईक—ऐक. संज्ञा = नांव, खुण, बुद्धि. प्रतिज्ञा = निश्चय, वचन, अंगिकार. प्राज्ञा = बुद्धि, बुध्दीमान् स्त्री. प्राज्ञ = बुध्दीमान, ज्ञाता. प्रज्ञा = बुध्दी. प्रज्ञ = शहाणा (विश्व, तैजस, प्राज्ञ = हे स्थूल सूक्ष्म कारण देहाच्या ह्या ब्रह्मांडामधील अभिमानी देवता होत.) (७७३) जैसे—जे आत्मा—आत्मन् = जीव ब्रह्मः (मूळ स्वभाव, मन बुध्दि, स्वतः आपण) जीव = प्राणी, आत्मा बृहस्पति, जगणे, वांचणे. जीवात्मन् = शरीरातील प्राण. (७७४) मात्रा = परिणाम, सुक्ष्मांश, अक्षरावरची मात्रा, घन, ऱ्हस्व स्वर उच्चारण्यास लागणारा काळ. मापे = प्रमाण शुध्दीने, प्रमाणाने. रसभावानि = रसराज म्हणजे पारा, त्या रसराज्याच्या रसाची पुटे देऊन (किम् ! प्रश्न विकल्प, निंदा, इत्यादि अर्थी कोणता काय. मय म्हणजे मयासुर, देवाचा शिल्पि कृत म्हणावे !!!) रस, (प्रीती प्रवर्तक, रसन, स्वाद, शब्द प्रीति, चिंतक, वर्धक) संस्कारांनी (७७५) देवोन—देऊनि. ढाळ = प्रवाह (७७६) भाविलया—भाविलिया. अभासे (आभासे =

प्रकाश, भ्रम, प्रतिच्छाया)–अभ्यासे. भाविलया=(भाव=अस्तित्व, स्वभाव, अभिप्राय, आत्मा, चेष्टा, मनोविकार, विलास, उत्पत्ति) जीव, स्वभाव, प्रकाशतो, जाणला जातो, प्रवर्तती, उत्पन्न होतो. (चिंतन, ध्यान, कल्पना, निश्चय मिश्रित संस्काराने). जेथे–जेथ (७७७) सांधो-सांगो. येकैक-एकैक. त्रिगुणात्मक=तीन वातीचे आवृत्तीचे मूळधर्माचे-गुणच ते पाहिले जाणारे ह्या जीवदशेने–, ह्या बुद्धीनें (७७८)

**आत्म्याची भेट झाली=जीवाला सुख झालें=थोडथोडें सुख अनुभवास येईल=तसतसा अभ्यास चालू ठेवावा=ज्यायोगें जीवपणाचे दुःख संपेल=कसें तर दिव्यौषध मात्रेच्या प्रमाणानें घ्यावें=रसायनानें कथिलाचें रुपें होते मीठाचे पाणी होण्यास झळंबण्यास त्यावर पाणी शिंपडावें.** ओव्या ७७३–७७८

अवलोकनास देणे ते–तेथें त्यांनी म्हटलें की, सुख म्हणजे सुख देणारें पुण्य सुकृत का आनंद, तो तिघांचा समुदायच, तो खुणेचा, नांवाचा त्या त्या गुणाचा, तो कसा तें सांगावेच म्हणून एक प्रतिज्ञा, (वचन अंगिकारलें होतें.) केली=प्रतिज्ञेचे तें बोलणें निश्चयाचें तें बोलिलो, तें हें बुद्धिमंता आतां आईक. (७७३)

करितां तें सुख, (ते पुण्य, तो आनंद, तुजला) तुझ्या दृष्टीस देखणी करुन (बुद्धिस अवलोकन शक्तीप, डोळयास, नेत्रास) दाखविण्याचें करतो. तेथें तर जशीं का ह्या जीवाची माउली आत्म्याची भेटच झालीं असें होतें तेथें आत्म्याच्या भेटीमुळें जीवास होणारें सुख झालें पुण्य भेटलें असें होतें. (७७४)

मात्रेच्या प्रमाणानें म्हणजे परिमाणाच्या मापानेंच की अहो दिव्य असें औषध जें, तें घ्यावें लागतें, घेणें होतें, अथवा भस्म त्याच्या कृतीनें रसाची पुटे देऊन कथिलाचें एक रूपेंच करावें (का होतें) जसें [तेथें देवाच्या शिल्पीनें तें रूप्याचें होणें केलें म्हणावें? पण रस, प्रीति, प्रवर्तक, रसन, स्वाद शब्द प्रीती (चिंतक) वर्धक संस्कारांनीं ते केलेले होय कीः] (७७५)

[दिव्य औषधीची वार्ता ऐकोनिया कानीं व्याधी टाकी तनू। घालियाचें सुख भुकेला कैंवि जाणे कैसे निवे त्याचें मनु रया ॥ १॥ सुखाचा अनुभव कैसेनि जाणावा। तरी जीव शिवातें घालुनि पाहावा ॥ घृणा भेटीचें आर्त सकळासहि सारिखे होईजे देखा। आपण झालिया जागा न लगे सांगावें आणिका ॥ २ ॥ बाप रखुमादेवीवर विठ्ठल भेटलिया। तरि तुझी तुटतिल सकळिक विंदानें रया ॥ ३ ॥

अर्थ :—रामबाण औषधाची नुसती वार्ता ऐकण्यानें कां कोठे देहाचे रोग नाहीसे होतात? भोजनामुळें प्राप्त झालेल्या तृप्तीच्या सुखाचा अनुभव भूक लागलेल्या माणसास कसा कळेल? बाबा! एकाच्या सुखाचा अनुभव दुसऱ्याला कसा होईल? याकरिता जीवाशिवाचे ऐक्य करूनच तो अनुभव पाहावाः म्हणून सुखाचा अनुभव ज्याचा त्यालाच झाला पाहिजेः व तो जीवशिवाच्या ऐक्यानें होणारा आनंद सर्व मुमुक्षूस होईलः आपण जागे झालो हें सांगण्याला दुसऱ्या माणसाची जरूरी लागत नाही, कारण त्याचा अनुभव ज्याचा त्यालाच असतो ज्ञानेश्वर महाराज म्हणतात–रखुमादेवीचा पति श्रीपांडुरंग भेटला म्हणजे तुझे सर्व संसारिक छंद सुटतील. (ज्ञा. ग. आळंदी देवाची.)] (७७५)

[तोयाचे परि नांवही न उरतें संतप्त लोहावरी। तें भासे नलिनीदलावरि पहा सन्मौक्तिकाचे परी। तें स्वातीस्तव अब्धिशुक्ति पुटकीं मोती घडे नेटके। जाणा उत्तममध्यमाधमदशा संसर्गयोगे टिके ॥]

मिठाचे पाणी व्हावें तर दोनचार झळ देऊन–(बुडवून विरवून), झळंबिले करून, तोयाचे ते पुट, ढाळ, प्रवाह, हापके, पाण्याचे पाणीदारपण मिठाकडून सांडविले होते=जीवदशा जीवमनुष्य शरीर देहदशा तीच मुळीं जशी काः[(मुक्ताची साउली मजवरि पडली ढेसीढेसी हलु हलु पाणीदारपण हालतें ढाळ देती तनु) मुक्ताची सांवळी मजवर पडल्यानें ती सावली म्हणावी तो ती तर सर्व प्रकाशच की एक असल्यानें तेथें

जीवपणाचा धर्मचमुळीं टाकला गेल्यानें एक मुक्त आत्माच जसा का होणें ते.] अतिउत्तम पाणीदार मोती जसें असतें त्याप्रमाणें महद्‌भाग्यानें जीवास हें मनुष्य शरिर प्राप्त झालेलें असतें: भगवंतास शरण होण्यास मनुष्य शरीर हें उत्तम साधन आहे: ह्या परमात्म्यावरच बुद्धिउपाधि संबंधाने जीव भाव आला आहे–जीवाचे मुख्य रुप सहजच परमात्मा आहे: तो श्री गुरुच्या उपदेशाने माझ्या रुपानेच मला प्राप्त झाला हो: मुक्तावस्थेची छाया मजवर आली: ॥ज्ञा.गा. देवाची आळंदी:अभंग–'न गणवे परिमाणे'॥ 'मुढाळढाळाचें मोती "माझी मज पाडलेची भुली" निळोबाराय: (७७६)

त्याप्रमाणें सुख, (पुण्य) आनंद, लेशमात्रही जरी झाला तरीपण जीवपण जीव स्वभाव विलास' प्रियकृत असा प्रकाशाचा झाल्यानें एक ते यःकश्चित् जीवपणाचें (क्षुधा, तृषा, शोक, मोह, जन्म, जरा ह्या षडुर्मीचे) तें ओझेंच दु:खच मुळीं नाश पावते: ह्या जीवानें तो सुखानंद लेशमात्रही जरी तरी तोच सुखानंदभावाच्या अभ्यासाचा करून असावें व तेथेंच की दुःख जे जीवपणाचें तें नाहीसे होतें नां! (७७७)

असें तें जें आत्मसुख–(जीव–ब्रह्म–आनंद, मूळस्वभाव, सुकृत–मनबुद्धि मिश्र ब्रह्म) शरीरांतील प्राण आनंदास आला ते येथें तीन गुणांनीं युक्त असें (गुण वात आवृत्ति, मूळधर्मानें, गुणच ते ह्या बुद्धीनें पाहिले गेल्याने तसें त्या त्या गुणाचें केलेलें तें सुख आतां एक एक घेऊन, त्यास रुप करुन सांगू–सांगण्याचें करतो—. (७७८)

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्।**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥**

अग्रे = प्रमुखतेनें, पहिलें, अगोदर. विष = जहर. परिणामे = शेवटी, परिपाक पक्कदशेनें, फलरूपानें. अमृतोपम = अमृततुल्य, पीयुषधारा, सुधाप्रमाणें कां रस, मध, तुल्य. प्रोक्तम् = म्हटलें आहे, सांगितलेलें, प्रसिद्ध असे. आत्मबुद्धि = मूळस्वभाव, जीव, ब्रह्म, बुद्धिचे प्रसादणें, (प्रसन्न होणें झाल्यानें) प्रसादजम् = देवप्रसाद, प्रसन्नता,-स्वच्छता,-स्पष्टार्थानें कल्याणाची होऊन.

अन्वय:—यत्। परीणामे। अमृत उपमम्। तत् अग्रे। विषम् इव। तत्। (यत्) आत्मबुद्धि प्रसादजम्। सुखं सात्त्विकं प्रोक्तम्। 'तत् अग्रे। विषम इव। यत् परिणामे अमृत उपमम्।' ॥३७॥

अर्थ:—"ते प्रमुखतेनें पहिलें विषाप्रमाणें असतें, जें परिणामी का शेवटीं अमृततुल्य असतें"; 'उपममिति' सारखेपणा अमृताचा–, उपमा अमृताची दिलेली जेथें होते, असें तें सुख, सर्वत्र आत्मरूपच एक व्यापून आहे, अशी जी आत्मबुद्धि तिच्या प्रसादापासून जन्मलेलें जाण–, तिच्या प्रसन्नतेवरच मुळी होणारे तें "**सात्विक सुख**" जाण.

"मैत्री, दया, आनंद अथवा उपेक्षा या भावना, विषयासंबंधीं, चित्तांत वागविल्या असतां त्याच्यायोगानें तद्विरूद्ध भावनांचा उपशम होऊन चित्तांतील द्वंद्व नाहीसें होतें. आणि तें शांत होऊं लागतें, "मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां सुखदुःखपुण्यापुण्य विषयाणांभावनातश्चित्त प्रसादनम्" (योग सूत्र)

(श्लोक ३७ वा ओव्या ७७९–७९४)

**आतां चंदनाचें बुड। सर्पी जैसे दुवाड।**
**का निधनाचें तोंड। विवशिया जेवी ॥ ७७९ ॥**
**अगा स्वर्गीचे गोमटे। आडवे याग संकटे।**
**का बालपणा दाटे। त्रास काळे ॥ ७८० ॥**
**हे असो दिपाचिये सिद्धि। अवघड धुं आधी।**
**नातरी ते वोखदी। जिभेचा ठावो ॥ ७८१ ॥**

यापरी पांडवा। जया सुखाचा रिगावा।
विषमु तेथ मेळावा। यमदमांचा ॥ ७८२ ॥
देत सर्व स्नेहा मिठी। अंगी ऐसे वैराग्य उठि।
स्वर्ग संसारा कांटि। काढित जे ॥ ७८३ ॥
विवेक श्रवणे अति त्रासे (खरपुसे)। तेथ व्रताचरणें कर्कशे।
करिता जाती भोकसे। बुद्ध्यादिकांचे ॥ ७८४ ॥
सुषुम्नेचेनि तोंडे। गिळिजे प्राणापानाचे लोंढे।
बोहणियेसि येवढे। भारी जेथे ॥ ७८५ ॥
ते सारसाही बिघडता। वोहाडुनि वछ (वत्स) काढिता।
नव्हे भणगा दवडिता। भाणयावरूनि ॥ ७८६ ॥
पै मायेपुढुनि बाळक। काळे नेता (एकुलते) जै येक।
होय का उदक। तुटता मीना ॥ ७८७ ॥
तैसे विषयाचे घर। इंद्रिया सांडिता थोर।
युगांत होय ते वीर। विराग साहाती ॥ ७८८ ॥
ऐसा सुखाचा जया आरंभु। दावी काठिण्याचा क्षोभु।
मग क्षीराब्धी लाभु। अमृताचा जैसा ॥ ७८९ ॥
पहिल्या वैराग्य गरळा। धैर्य शंभु वोडवी गळा।
तरी ज्ञानामृते सोहळा। पाहे जेथें ॥ ७९० ॥
पै कोलिताहि कोपे ऐसे। द्राक्षाचे हिरवेपण असें।
ते परिपाकी का जैसे। माधुर्य आंते ॥ ७९१ ॥
ते वैराग्यादिक तैसे। पिकलया आत्मप्रकाशे।
मग वैराग्येसीहि नाशे।। अविद्याजात ॥ ७९२ ॥
तेव्हां सागरी गंगा जैसा। आत्मा (आत्मी) मिनलिया बुद्धि तैसी।
अद्वयानंदाची आपैसी। खाणी उघडे ॥ ७९३ ॥
ऐसे स्वानुभव विश्रामे। वैराग्य मूळ जे परिणमे।
ते सात्विक येणे नामे। बोलिजे सुख ॥ ७९४ ॥

विवशिया–विवसिया–[वसिः=वस्त्र. वस्=राहणे ठिकाण (वस् + वि=निघून जाणे, वेळ घालविणे बाहेर पाठविणे.) बाहेर निघून गेलेली जी विवशी म्हटली, नुमती–वेळ घालविणारी का करमणुक करणारी ती, विवशी म्हटली; पण येथें निधान आशेवर बसलेलें पिशाच्च का समंध म्हटले.] दुवाड=सर्पानें वेष्टिल्यामुळें अवघड. (७७९) स्वर्गींचे गोमटे आडवे (आडव) याग संकट=स्वर्गामध्यें मिळणारा भोग तेथें अगोदरची अडचणच कीं एक अडवणेच एक जसें का यज्ञ यागाच्या क्लेशानी–क्लेशांचीः दासट=पीडादायक, काळाचा त्रासच एक पीडा करणारा (७८०). धू–धूम. आघि–आधी. ते–तो. वोखदी–औषधी. (७८१) यापरी–तयापरी. विषमु–विषम=दुष्कर, कठिण, दुःसह, दुर्गम, उंचसखल, विजोड, दुर्बोध. (७८२) मिठी=गिळून टाकणें जे, मिटणें जे. काटि काढित जे–वाटी काढितचि=कुपण दूर सारीत. (७८३) अतित्रासे खरपुसे=तीक्ष्ण, तींव्र, तिखट, दुःसह, अधिकः कर्कशे=कठोरः तेथ–जेथ. भोंकसे=बाभाडे, विस्तृतता, फाडलेले. (७८४) सुषुप्ना=मध्यनाडीः वोहणियेसी–वोहणियेसी–बोहणियेसीचि=(भवानीच्या पारी.) बोहणिच्या वेळीं, सुरवातीसच, आरंभालाच. जेथे जेथ. (७८५) मायेपुढौनि=आईच्या पुढ्यातून सारसांही=सारस,

सारसादी, चक्रवाक जोडप्याला. (सारसपक्षी, चंद्र, कमळ, कमरपट्टा, हंस, सरोवर.) सारसक, सारसिक = चक्रवाक. ते–जें. वोहाहुनि वछ—होय वोहाहुनि वत्स, (ऊधस् = कांस ओटी, पोट, स्तन, गुप्तस्थान. ऊधन्यं–ऊधस्यं = दूध) स्तनापासून वासरू बाजूस करितांना. भाणयावरूनि = वाढलेल्या ताटावरून. नव्हे भणगा–ना भणगु. (७८६) पुढुनि–पुढौनि. जै–एकुलते. मिना–मीना. (७८७) विराग = अनिच्छा, उदासीनता, विराग साहती = विरक्त पुरूष. (वैरागिन वैरागिक = विरक्त.) (७८८) सुखाचा जया–जया सुखाचा. क्षीराब्धी लाभ = क्षीराब्धी मंथन क्लेश सोसण्याने–क्षीराब्धीस जसा अमृताचा लाभ झाल्याचा आनंद. (७८९) वैराग्य गरळा = वैराग्य रूप विषाला. वोडवी = पुढें करते. (७९०) पिकलिया = पूर्णतेस आल्यावर. (७९२) आत्मा मिनलया–आत्मी मिनल्या. (परिणेतृ = पति) परिणमे–परिणये–परिणमे = पक्व–दशा (परिणये–परिणमे = विवाह पक्वदशा. परिणाय्यं = लग्नांत वधूस दिलेले दान) (७९४)

**वैराग्यादि आत्मज्ञान प्रकाश पूर्णतेस आला : माया जानित नामरुपात्मक द्वैत नाहींसें झालें–त्यावेळेस गंगा सागरास मिळते तशी बुद्धि आत्म्यांत समरस झाल्यामुळें अद्वैतानंदाची खाण आपोआप उघडते–असें ज्याचें वैराग्य मूळ पण शेवट आत्मानुभवानंदात होतो तेथें (१) आरंभीचें धैर्य सायास केवढे तरी तसेंच तेथें तें (२) वियोगाचें दुःख तें प्रळय दुःखासारखें इंद्रियाला विषयांचे घर सोडतांना होतें–पण तें पूर्ण विरक्तीनेंच सहन करावे लागते.** ओव्या ७७९–७९३

**आरंभीचे** (१) चंदनाचे बूड विधानाचे तोंड भयंकर : यातायात : चटका : संकट : विरक्ति इत्यादी.
**वियोगाचे** (२) चक्रवाक गोवत्स : भिकारी, आईचे एकुलते, पाण्याशिवाय मासा.

येथें आतां असें आहे की, सर्पानें वेष्टिल्यामुळें, चंदनाचें बुड जसें दुवाड, दुर्गम, भयंकर तसें येथें आहे. अथवा निधान ठेवा, गुप्त ठेव्याचे तोंड म्हणजे विवसीच ब्रह्म समंधच ब्रह्म संबंधीच भयंकर, एक की, अहो, जसें कां. (७७९)

स्वर्गांत मिळणारे चांगले भोग–भाग्य तेथे अगोदरची ती अडचण जशीं कां यज्ञयाग क्लेशाची संकटाची यातायातीची एक (७८०)

असें हें असो, पण दीप लावण्याचे अगोदर (दिवा संपादन होण्याचे अगोदर–दीपाची उपयुक्तता तेथें दीप लावण्याचे अगोदर) धुर जो होणारा, त्यामुळें दीप लागणें (वात ज्योत लावणें हे) अवघडच की आधी पण ते धुराचे होणे सहन करावें लागतें ना! किंवा जिभेच्या स्वादाचा–, जिभेने, रसनेंद्रियानें चव घेण्याचा, ठावच की एक (आरडणे, वाजणे मेघ गर्जना) असें ते जिभेला चटका देणारें तें औषध होय. (७८१)

त्याप्रमाणें हे पांडवा! ज्या सुखाचा ठावठिकाणा प्रवेश, अति विषम, कठिण ज्या सुखाचे प्राप्ती, दुस्तर तेथेंच की प्राण संकटरूपी यमदमाची गर्दीच एक मेळाच एक होणारी (का होऊन असलेली असते) ('**यम**' = अष्टांग योगापैकीं पहिले अंग ते–'अहिंसा, सत्यास्तेय ब्रह्मचर्य परिग्रहा यमाः,' ह्याच यमास शरीरसाधन अपेक्ष नित्यकर्म म्हटलें आहे. '**नियम**' 'शौच संतोष तप स्वाध्यायेश्वर प्रणिधानानि नियमः **दम** = नियमान, इंद्रिय निग्रह, आत्मसंयमन इंद्रियें जिंकणें, दंड, शिक्षा म्हणजे शिकणें. शम् = सुख, आरोग्य इत्यादि.' **शमः** = (१) शांति, निर्विकारत्व, (२) मनोजय मनोनिग्रह (३) थांबणें (४) विश्रांती (५) निवारण प्रतिकार (६) ऐक्य (७) मोक्ष (८) हात. (शमांतकः = मदन.) (७८२)

सर्वेच्या सर्व दृश्य वस्तुविषय प्रेम स्नेहास गिळून घेतलें ग्रासिलें असे वैराग्यच एक अंगी उभे झालें आहे. तेथें स्वर्ग संसाराचे कुंपणच की उपटून टाकिलें, उठवून लाविलें दूर सारिले, ज्यायोगेंकरून असें तें प्रपंचाविषयीं उदासीन होणें–विरक्ति सुख. (७८३)

विवेकानें, श्रवण मननानें, अति त्रासतो. खरपुस तिखट, असेंच ते विवेकाचें येणें का श्रवणाचे होणें तेथें व्रतांची आचरणें ती तर अतिकर्कश अशीच मनावर ओरड करणारी व असे कठिण श्रवण तें केलें असतां विस्तृततेमुळें बुध्दि मन चित्त इत्यादिकांचे तर भोंकसे जातात, वाभाडे निघतात. (७८४)

तेथें सुषुम्ना जी मध्यनाडी—योगनाडी तिच्या तोंडेंकरून शरीरातील प्राणवायूचें तसेंच अपानाचे लोंढेंच्या लोढेंच मुळीं गिळिले होतात–अहो आतां येथें आरंभीच क्षा सुरवातीसच मुळीं अशी मोठी भारी किंमतीची अशी महिमानाची अवस्था होते. (७८५)

(सारमिति म्हणजे वेद साह्य म्हणजे स्नेह मदत विघडली असतां–) चक्रवाकाचे जोडप्याला विघडता आली वियोग झाला, विरहदशा प्राप्त झाली असतां—(प्रळय दुःखच एक युगांतच होणारा तेथें उदासीनता साहाती जे तेंच वीर म्हटले कीं: गाईचे ओटीखालून कांसेतून वत्स बाजूंस करतांनाही तसेंच होयः अथवा पुढें वाढलेल्या ताटावरून भणंग भिकारी तो बाजूंस होतांना का दवडतानाही तसेंच होय. (७८६)

माये पुढून—आईपासून–आईचे 'एकुलते एक' बालक तें काळानें नेलें असतां जसें होतें; अथवा मीनास त्याच्या उदकाची ती ताटातूट झाली म्हणजे जसें होतें तसें तें होय. (७८७)

तसें विषयाचे घर इंद्रियांनीं तें सांडतांना–का सोडतांना अति थोर असा युगांतच ओढवला आहे, असें होतें व येथे असें तें उदासीनतेनेंच अनिच्छेनेंच सहन करणारे ते तर वीरच कीं, वैराग्य, विरक्ति, विराग साहाती असे. (७८८)

असा ज्या सुखाचा एक सर्व आरंभ तेथें तर सर्व कठिणपणाच–काठिण्यच एक, सर्व क्षोभाचें झालेलें, असें अगोदरचें, पण नंतर जसा का क्षीरसागर मंथनानंतर देवदानवाना अमृताचा लाभ झाला तसा लाभ पदरीं पडणारा कीं. (७८९)

अहो, पहिल्या प्रथमचा जो कांहीं वैराग्यसंबंधीचा सुतीक्ष्ण विषाचा भर, तेथें धैर्यरूप असा शंभू विश्वाचें कल्याणच एक असा महादेव तोच आपला गळा पुढें करतो, ओढवितो, त्यायोगेंकरून तर ज्ञानरूपी अमृताचा सोहळा कौतुक, विलास पाहाणें होतें: (७९०)

अहो कोलिताहिपण चरका देणारा, क्षोभाचा होणारा, कोप करणारा, कोलतासही मागे सारते असें तें द्राक्षाचें तीक्ष्ण आंबटपण, हिरवेपण, असतें पण, परिपाकानें तें जसें कां माधूर्यच मधुरतेनें भूषविलें व्यापलें मंडित केलें जसें कां. (७९१)

*त्याप्रमाणें वैराग्य आदिकरून तें आत्मप्रकाशानें पक्कदशेस आलें म्हणजे मग वैराग्यासहितही अविद्या अज्ञान समूह तो लयाचा होऊन अमतो–नाश पावतो:* (७९२)

तेव्हां सागराचे ठायीं गंगेची मिळणी, तशी आत्मा भेटला असतां बुद्धिही अद्वयानंदाची अशी आपोआपच आत्मबुद्धिरुपी एक खाणीच उघडली आहे कीं अशी होते. (७९३)

*असें जे सुख आत्मानुभवाचें आनंदात विश्रामतें त्या सुखाला मूळ विरक्ति परिणामाला पावते ज्याचें मूळ वैराग्य पण त्याचा शेवट आत्मानुभवानंद तें सात्त्विक सुख: मूळ वैराग्य जें विरक्ति व आत्मानुभवानंद विवाहाप्रत पावतें, असें जें स्वानुभव–आत्मानुभव सुख आनंदातच विसांवतें तें सुख सात्त्विक या नांवानें बोलिलें होतें* (७९४)

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम्।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम्॥ ३८॥**

विषयेंद्रिय संयोगात् = विषय व इंद्रिय यांच्या संयोगानें.

अन्वयः—यत्। विषय इंद्रिय संयोगात्। अग्रे। अमृत उपमम्। परिणामे तु। विषम् इव। तत् सुखं। स्मृतम्। राजसम् ॥ ३८ ॥

अर्थ:—तें विषय व इंद्रिय संयोगाचे सुख होय जें कां अगोदर अमृत उपमेचे असें असतें पण परिणामी विषाप्रमाणें होतें तें सुख धर्मशास्त्रानें राजस म्हटलें आहे: (श्लोक ३८ वा ओव्या ७९५–८०६)

**आणि विषया इंद्रिया। मेळु होता धनंजया।**
**जें सुख जाय थडिया। सांडूनि दोन्ही ॥ ७९५ ॥**
**आधिकारिया रिगता गांवो। जाला जैसा उत्सावो।**
**का रिणावरी विव्हावो (विवाहो)। विस्तारिला ॥ ७९६ ॥**
**नाना रोगिया जिमेपासी। केले गोड साखरेसी।**
**का बचनागाची जैसी। मधुरता पहिली ॥ ७९७ ॥**
**का (पहिले) संवचोराचे मैत्र। हाटभेटीचे कलत्र।**
**का लाघवीचे विचित्र। विनोद ते ॥ ७९८ ॥**
**तैसे विषयेंद्रिय दोषी। जे सुख जिवाते पोषी।**
**मग उपटिला खडकी। हंसु जैसा ॥ ७९९ ॥**
**तैसी जोडी अघवी आटे। जीविताचा ठावो फिटे।**
**सुकृताचयाहि सुटे। धनाची गांठी ॥ ८०० ॥**
**आणि भोगिले जें जें कांहीं। ते स्वप्न तैसे होय नाही।**
**मग हाणिच्यान्चि घाई। लोळावे उरे ॥ ८०१ ॥**
**ऐसा (ऐसे) आपत्ति जे सुख। ऐहिकि परिणामे देख।**
**परत्रि कीर विख। होऊनि परते ॥ ८०२ ॥**
**जे इंद्रिजयाता लळा। दिधल्या धर्माचा मळा।**
**जाळुनि भोगिजे सोहळा। विषयांचा जेथें ॥ ८०३ ॥**
**तेथ पातके बांधती थांवो। तिये नर कीं देती ठावो।**
**जेणे सुखे हा अपावो। परत्री ऐसा ॥ ८०४ ॥**
**परिणमे (पै नामे) विष महुरे। परि मारूनि अंती खरे।**
**तैसे आदि जे गोडि रे। आंती कडु ॥ ८०५ ॥**
**पार्थ ते सुख सांचे। वळिले आहे रजाचे।**
**म्हणौनि न शिवे तयाचे। आंग कही ॥ ८०६ ॥**

विषया इंद्रिया–विषयेंद्रिया. (७९५) अधिकारिया=अंमलदार, हक्कदार, उत्सावो=सण, राग, रंग, उत्साहो=उल्हास, उल्लास, आनंद, विव्हावो–विवाहो=लग्न, पाणिग्रहण. (७९६) का–पहिले. संवचोर=संगतीनें चालणारा चोर, हाटभेटीचे कलत्र=बाजारांत भेटलेल्या स्त्रीचे, वेश्येचे, लाघवीचे–लाघवियाचे=बहुरुपी नटाचे. (७९८) दोषी–दोखी. पोषी–पोखी. उपटला–उपडिला=उडी घालून मरतो जसा. (७९९) जोडी=संपादिलेले. सुकृताचया–सुकृताचिया. धनाची गांठीं सुटे=पुण्यरूप धनाचाहि नाश होतो. अवघी–आघवी. ठावो–ठाय (८००). आणि–आणीक. जे–जे जे. हणीचान्चि–हानीच्यान्चि. घाई=विव्हळ होऊन. (८०१) ऐसा–ऐशा. आहिकी–ऐहिकी. की–कीर. (८०२) दिधल्या–दिधलिया. जेथें–जेथ. (८०३) परिणामे–पै नामे. आंती–अंती. (८०५)

**विषय व इंद्रियमेळः विषय व इंद्रियाचा दोषः जिभेचे चोचलेः रोग गोड म्हणूं करणारे विषय सुख आधी गोड अंती कडूः पुण्याची गांठ सुटतेः भोगिले तें स्वप्न असेः इंद्रियजाताना दिलेला लळा धर्माचा मळा जाळूनच की विषय सोहळा भोगणें होतें–पातकें उथळपणाने बांधून नरकी ठाव देतात. असा हा अपाय परलोकी ही होणारा विष महुर ते मारून विषच कीं असे खरे होते. म्हणून विषय सुख आधी गोड अंती कडू.** ओव्या ७९४–८०५

धनंजया विषयाचा व इंद्रियाचा मेळ झाला असतां जे सुख दोन्ही थडी–ऐहिक, परत्र (ओलांडून जाते) सांडून जाते. (७९५)

अंमलदार, अधिकारी, गांवास आला गेला असतां असा का राग रंग, सणच झाला, कां रिणावरच मुळीं विवाह तो विस्तारला, बिछाईला, व्याप्तीचा असा विशाल झाला. (७९६)

अथवा जिभेच्या चोचल्यावरच मुळी रोग ते गोड म्हणू केले किंवा बचनागाची पहिली ती मधुरता जशी का गोडच म्हटली. (७९७)

अहो असें हें पहिलेंच एक मैत्र जे संगतीनें चालणाऱ्या चोराचे, अथवा बाजारांत भेटलेल्या स्त्रीचे, वेश्येचे, सर्वथैव मायावी असें, अथवा लाघवी जो बहुरूपी नट त्याचे विचित्र असें ते विनोदच करणें जसे एक (७९८)

त्याप्रमाणें विषय व इंद्रियांच्या संयोगानें दोषाने, उद्देशानें, हेतूनें, जें सुख जीवास पोखते, पोषते, पाळते, वाढवितें, पुष्ट करतें व मग खडकावरच्या डबक्यांतील प्रतिबिंबात पाहून हंस जसा फसतो–व शुक्रादि चांदण्यांची प्रतिबिंबें खडकावरच्या डबक्यांतील पाण्यांत पाहून, मोत्येंच कीं ती असें समजून भ्रमानें त्यांत बुडी घालून मरतो तसें येथें होते. (७९९)

त्याप्रमाणें जोडलेले सर्व कांहीं संपतें, सर्व सुखसंपत्ति आटते प्राणाचा नाश होतो. मिळविलेलें संपादिलेलें जें जें कांहीं तें सर्व आटतें नाहीसें होतें व जीविताची सीमा पाहिली होतें जीवीताचाही ठाव पण फिटतो ह्या साधनरूपी देहाची–पुण्यरूप धनाचीही गांठ सुटते, पदरी असलेला पुण्यद्रव्य सांठा संपतो. (८००)

आजपर्यंत जें जें कांहीं भोगिलेले ते स्वप्न तसें लटिके खरे का खोटे कुणी म्हणावें ? ते आहे आहे, नाही नाही असें, त्यामुळें तर सर्व कांहीं नष्ट झालेल्या धनाच्या, चिंतनरूपी घायानें, विव्हळ होऊन हानीच, एक विव्हळ करणारी व तीतच, मुळीं लोळत रहाणें उरतें, शिलकीने असते. (८०१)

अशा तऱ्हेच्या आपत्तीने, (संकटाने, तक्रारीने, विपत्तीनें, हालानें) जें कांहीं सुख ह्या ऐहिकामध्यें परिणमून असते दिसते ते तर परलोकाच्या ठायीं विषच एक असें होऊन परतते, परत ह्या मृत्यूलोकी येते. (८०२)

अहो ज्या इन्द्रियजन्य–(ह्या इन्द्रियजातांना–) विषयांना एक लळाच दिलेला, तेथें अहो धर्माचा एक मळाच जाळून टाकून–धर्मक्षेत्राचा विध्वंस करून–जेथें या विषयाचा सोहळा भोगणें होतें. (८०३)

तेथें पातकें ती तर उथळपणच एक ह्या जीवासी बांधून ती नरकीचा ठाव–(दुःख, सीमा, हाल, विपत्ति–) देणारी होतात व अशा ह्या सुखामुळेंच कीं हा अपायच एक परलोकी होणारा असा. (८०४)

पण नांवानें तर विष महुर म्हटलें पण अंती खरेंच की तें विष (मातीच) मारून असतें तसें आधी जें गोडीरें पण तें अंतीं कडूच कीं. (८०५)

हे पार्था ! ते सुख खरेंच रजोगुणांनी सर्वथैव घडविलेलें वळलेले आहे, म्हणून कधींकाळीं तूं त्याचें अंगही पण स्पर्शु–, शिवू नये की. (८०६)

**यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥**

अनुबंधे=अविच्छेद संबंध अटकाव, अवस्था. परिणाम, आरंभ. सुख=सुख, आनंद, पुण्य. मोहनम् (आत्मनः) भुरळ, मदनाचे शस्त्र, मोहून टाकणारे, मैथुन. निद्रा आलस्य=प्रमाद उत्थं=उत्पन्न झालेले, उठते जे, निद्रेनें, आळसानें, प्रमादानें. उदाहृतम्=उच्चारणें, नांव देणें, म्हणणें, जाहिर करणें, स्तुतीचे केले.

अन्वय :—यत् सुखं । अग्रे आत्मनः मोहनं । अनुबंधेच आत्मन: मोहनं । यत् सुखं निद्रा उत्थं यत् सुखं आलस्य, उत्थं यत् सुखं प्रमाद उत्थं । तत् उदाहृतम् तामसम्॥ ३९ ॥

अर्थ :—जे अगोदर, प्रमुखतेनें, तसेंच परिणामी (अवजडपणाचें आरंभ अडथळा पाठलाग करणारे) आत्म्याला मोहात पाडणारें, (भुरळ घालणारें, मोहून टाकणारें असें अगोदर), तसेंच परिणामीही, निद्रा, झोंप, आळस, आळशीपण, प्रमादामुळें, म्हणजे गैरसावधपणा उन्मत्तता, अपराधामुळें उठते झालेले, असें तें सुख तामस म्हटले आहे. त्या सुखास तामस असें नाव दिले आहे. (श्लोक ३९ ओव्या ८०७–८११)

**अपेयाचेनि पाने । अखाद्याचेनि भोजने ।**
**स्वैर स्त्री संनिधानें । होय जे सुख ॥ ८०७ ॥**
**का पुढिलाचेनि भोरें । नातरि परमार्थापहरे ।**
**जे सुख अवतरे । भाटांचा बोली ॥ ८०८ ॥**
**जे आलस्यावरी पोषिजे । निद्रेमाजी जे देखिजे ।**
**जयाचा आदि अंती भुलिजे । आपुली वाट ॥ ८०९ ॥**
**ते सुख गा पार्था । तामस जाण सर्वथा ।**
**हे बहु सांगो जे कथा । असंभाव्य हे ॥ ८१० ॥**
**ऐसे कर्मभेदे मुदले । फळसुखहि त्रिविध जाले ।**
**ते हे यथागमे केले । गोचर तुज ॥ ८११ ॥**

स्वैर स्त्री=जारिणी वेश्या (८०७) परमार्था–पहारे,–परस्वापहारे=परद्रव्य लुबाडून (८०८) आदि अंति–आद्यंती. आपली वाट भुलिजे=आपल्या कल्याणाचा मार्ग चुकतो (८०९) असंभाव्य=निंद्य, अमान्य, मुदले=मूळ. त्रिविध–त्रिधा. (८११)

**निषिद्ध अन्न सेवन तें स्वैर स्त्रीशी संगत जाणः परधन चोरी, तोंड पुजा, सुख, आळस, पोसते झोपाळूपण, वाढविते, कल्याणाच्या हिताच्या मार्गाविषयीं भ्रम होतो; मार्ग चुकतो, असें सुख तें सर्वस्वी निंद्य म्हणून त्या गोष्टी ऐकणें नको. मूळ एक रूप तें कर्मभेदामुळें तीन प्रकारचें झालें त्याची फोड शास्त्रपद्धतीनें सांगतो. त्रिपुटीत तिन्ही गुण गुंतविलेले, म्हणून ह्या जगी पदार्थमात्रामध्यें त्रिपुटी (कर्ता, कर्म कर्मफळा) शिवाय कांहींही नाही.** ओव्या ८०७–८११

जें सुख पान करण्यास योग्य नाहीं. (पिण्यास योग्य नाहीं जे) त्याचें पान केल्यानें जें खाद्य नव्हे असें अखाद्य त्याचें भोजनाने होते अथवा स्वैर स्त्री जी जारिणी कां वेश्या म्हटली तिच्या संगतीनें (संनिधानानें, समागमानें, समीपतेनें, जवळचे होण्यानें) होते. (८०७)

पुढिलांच्या कां दुसऱ्याच्या भारामुळें होणारे जे सुख कां परद्रव्य अपहार केल्यानें होणारें जें अथवा परमार्थ जो त्याचा अपहार केल्यानें होणारें जें ते सुख म्हणजे तर अहो स्तुतीपाठकाच्या भाटांच्या याचकांच्या बोलीनें अति विचित्रतेनें वाखाणिलेले असे तोंडपुजाच जशी. (८०८)

जे आळसासच पोसतें, जें आळसानेंच मुळीं पोसलें होतें, जें निद्रेमध्येंच पाहिलें होतें, जें निद्रालुपणा का झोपाळुपण वाढवितें, ज्याच्या अगोदर व शेवटीही आपल्या कल्याणाचा मार्ग चुकतो भुरळ पाडलेला होतो. (८०९)

तें सुख हे पार्था, तामस सवैथैव जाणावें असें हें पुष्कळसे सांगावेंच असें आहे पण ही कथा गोष्ट तर अमान्य निंद्य अशीं आहे असंभवनीय अशी आहे. म्हणून ती ऐकणें नको. (८१०)

असें मुद्दल कर्मभेदानें, कर्मसुख फळ, हेही त्रिधा, त्रिविध झाले तें असें हें तुजला जसें का आगमामध्यें म्हणजे वेदामध्यें का शास्त्रामध्यें सांगितल्याप्रमाणें तुझ्या बुद्धी दृष्टीच्या टप्यांत येण्यासारखें करून सांगितलें. (८११)

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥**

तत् = ते (ब्रह्म) सत्वं = पदार्थ ब्रह्मच आपले सत्त्व पाहाणारे जसें असें तें ब्रह्म. पृथिव्यां = पृथ्वीमध्यें. दिवि = आकाशामध्यें, स्वर्गामध्यें. देवेषु = देवामध्यें, देवलोकामध्यें. पुनः = तसेंच. प्रकृतिजैः = प्रकृतीपासून उत्पन्न होणारे तें, सविकारतेचे अथवा प्रकृतीच ज्या सदतीस तत्त्वांची केलेली त्या प्रकृतीजानी मुक्त आहे म्हणजे ऋणातून उतराई आहे. मुक्त आहे असे एभिः त्रिभिर्गुणैः = ह्या तीन गुणांनी, (म्हणजे प्रकृतीपासून उत्पन्न होणारे जे तीन गुण त्यांनीं मुक्त आहे असें कांहींहीं ह्या स्वर्गी का देवलोकांत नाहीं. )

अन्वय :—(१) एभिः प्रकृतिजैः त्रिभिः गुणैः पृथिव्यां वा दिवि देवेषु पुनः वा मुक्तं न तत् अस्ति सत्त्वं ॥

(२) न तत् । अस्ति सत्त्वं । पृथिव्यां । वा । दिवि । देवेषु । वा । पुनः । प्रकृतिजै. त्रिभिर्गुणैः मुक्तं ।

अर्थ :—ह्या पृथ्वीवर, स्वर्गी, देवलोकी—ह्या प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या तीन गुणांनीं मुक्त आहे असें कांहींहीं नाही, असा पदार्थ नाही (जर आहे म्हणावें तर तत् (जीव) ब्रह्म नः ब्रह्मच जसें कां आपला ठाव पाहाणारे तत् सत्व म्हणजे पदार्थ प्रकृतिजैः मुक्त आहे असें कांहींहीं नाही. ते (जीव) ब्रह्म अस्ति सत्त्वं पदार्थ प्रकृतिजैः मुक्तं असें नाही ब्रह्म सत्त्व पदार्थ तेथें ते स्वत्व आपल्या जीव ब्रह्म पदार्थ सत्व–सत्त्वास टिकत नाहीं मग मुक्त असण्याची गोष्ट तर बाजूसच राहिली कीं, ' जीवो ब्रह्मैवनापरः ' तेथें जीव ब्रह्मपर–ब्रह्म तत्पर ह्याहून श्रेष्ठ ब्रह्म तें परम उपरम विराग एकः तेथें जीव ब्रह्मपर होणें तें कांहीं परब्रह्म होणें शक्य नाहीं. (श्लोक ४० ओव्या ८१२–८१८)

**ते कर्ता कर्म फळ । हे त्रिपुटी येकी केवळ ।**
**वांचुनि कांहीचि असे स्थूल । सूक्ष्मी इये ॥ ८१२ ॥**
**आणि हे तंव त्रिपुटि । तिही गुणी इही कीरीटी ।**
**गुंफली असे पटी । तांथुवी जैसी ॥ ८१३ ॥**
**म्हणोनि प्रकृतीच्या अवलोकी । न बांधिजे इहि सत्त्वादिकी ।**
**तैसी स्वर्गी ना मृत्युलोकी । आथि वस्तु ॥ ८१४ ॥**

**कैचा लोंबेविण कांबळा। मातियेविण मोदळा।**
**का जळेविण कल्लोळा। होणे आहे ॥ ८१५ ॥**
**तैसे न होनि गुणाचे। सृष्टीचा रचला रचे।**
**ऐसे नाहीच्चि गा सांचे। प्राणिजात ॥ ८१६ ॥**
**या लागी हे सकळ। तिही गुणाचेचि केवळ।**
**घडिले आहे निखळ। ऐसे जाण ॥ ८१७ ॥**
**गुणी देवा त्रई लाविली। गुणे त्रिकुटी लोकी पाडिली।**
**चतुर्वर्णी घातली। निशाणी उळिगे ॥ ८१८ ॥**

स्छूल–स्थूल. (८११) गुंफली-गुंफिली. तांतुवी–तंतूनी (८१२) प्रकृतीच्या अवलोकी–प्रकृतीच्या अवलोकी-प्रकृतीच्या आलोकी = मायेच्या आभासांत, दृश्य सृष्टीत. (८१३) लोंबेविण–लोंबेविण = लोंकरीवाचून. मोदळा = ढेकूळ, मातीचा गोळा. (८१४) सृष्टीचा रचला–सृष्टीच्या रचला–सृष्टीच्या रचना = सृष्टीची रचना. (८१५) निखळ–निखिल. (८१६) त्रयी = सत्त्वगुणी, विष्णु, रजोगुणी ब्रह्मदेव, व तमोगुणी शंकर: किंवा यक्ष, गंधर्व व देव: गुणे-गुणी. (लोकी–लोकी त्रिपुटी त्रिकुटी) = स्वर्ग, मृत्यु, पाताळ. निशाणी–सिनानी. उळिगे = वेगवेगळी कर्मे, व्यवसाय, कामे. (८१८)

**असा पदार्थ का वस्तू मृत्युलोकी नाहीं, स्वर्ग लोकीही नाहीं. जी का मायेच्या आटोक्यांत असूनही त्रिगुणांनीं आडविली का गुरफटलेली होत नाहीं. लोंकर नाहीं तर कांबळा नाहीं, माती नाहीं तर ढेंकुळ नाहीं, पाणी नाहीं तर तरंग (लाट) नाहीं गुण अंश नसतां–असें प्राणीजातीचें स्वरूपच नाहीं-जे का सृष्टीरचना रचूं घडूं शकेल म्हणून सर्व जग, विश्व ह्या तीन गुणांनीच घडविले आहे हे निश्चित. गुणांनीं देवांत तीन देव, वर्ग केले ते ब्रह्मा, विष्णू, महेश, (यक्ष, गंधर्व, देव) ह्या गुणांनीच स्वर्ग मृत्यू नरक असे तीन लोक निर्मिले आहे ह्या गुणांनीच चार वर्णाच्या मार्गे निरनिराळी कामें व्यवसाय लावून दिले आहेत.** ओव्या ८१२–८१८

अशी ती कर्ता रूप, कर्मरूप व कर्मफलरूप, त्रिपुटी जरी तरी येकच मानली आहे ह्या त्रिपुटी शिवाय ह्या स्थूलामध्यें म्हणा का सूक्ष्मामध्यें म्हणा कांहींहीं मुळीं आहे असें नाहीं–(कांहींच नाहीं कीं.) (८१२)

ह्या तीन गुणांनीं सत्त्व, रज, तमानीं, त्रिपुटी, ही कर्ता, कर्म व कर्मफळ अशीं हे कीरिटी, गुंफिली आहे जशीं कां वस्त्रांमध्यें तंतूची ती वीण. (८१३)

असें आहे म्हणून प्रकृतीच्या अवलोकी म्हणजे मायेच्या आभासात अथवा दृश्य सृष्टींत, ह्या सत्त्व रज तमादि गुणांनीं नच बांधली जाणारी अशी एकही वस्तुपणानें असणारी वस्तु स्वर्गामध्यें मृत्यूलोकामध्यें आहे असें नाहीं. (८१४)

अहो कसचा तो कांबळा होणारा जर लोंकरीचें लोंबें नाहींत; लोंकरीवांचून कांबळा नाहीं मातीवांचून मोदळा नाहीं, (मातीवाचून ढेंकूळ नाहीं) अथवा पाण्याशिवाय कल्लोळ कां लाट तरंग होणें कसचें! (८१५)

त्याप्रमाणें गुणाचे नच होऊन ह्या सृष्टीची रचना केली–सृष्टी रचिली–असें आहे पण कसलेहिपण प्राणीजातच मुळीं केव्हांहीं कोठेही नाहीं. (८१६)

एवढ्याचकरितां हे सर्व विश्व कांहिं केवळ ह्या तीन गुणाचेंच सर्वथैव असें बनविलें घडलें आहे, असेंच जाण असेंच समज. (८१७)

अहो ह्या देवास तर तीनपणाचे केलें, गुणनेंच कीं ह्या लोकांमध्यें; त्रिकुटीच स्वर्ग, मृत्यु, पाताळ अशी वहिवाटच एक पाडिली आहे. गुणांनीच कीं ह्या चतुर्वर्णांना तर निरनिराळीं अशीं त्या त्या वर्णाची वेगवेगळी कर्मेच लावून दिली आहेत. (८१८)

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणांच परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

ब्राह्मण = उपाध्याय, (ज्यो.) अभिजित्, ब्राह्मण, समूह, ब्रह्मज्ञानी, ब्रह्म (ज्ञा) जानाति असौः (ब्राह्मणी = बुद्धि, ब्राह्मण जातीची स्त्री.) क्षत्रिय = क्षत्रिय, क्षेत्रि (शेतकरी). क्षेत्रियः = जारः क्षत्रः = क्षेत्रियः = जारः क्षत्रः = योद्धा. क्षत्रिय जातः = क्षत्रियाचा दर्जा [क्षेत्र = पत्नि, शेत, क्षेज, तीर्थ, स्थान, देह, उत्पत्तिस्थान, मन, नकाशा, आकृति, नक्षत्र. क्षेत्र आजीवः = शेतकरी. क्षेत्रज = स्वस्त्रीस इतरापासून आपल्या आज्ञेने झालेला पुत्र. क्षेत्रज्ञ = प्रविण, जीवात्मा परमेश्वर, शेतकरी. क्षेत्रविद् = शेतकरी, जीवात्मा, आत्मज्ञानी. क्षेत्रव्यवहार = नवरा. क्षेत्रिन्–क्षेत्रिकः = शेतकरि. (क्षत्रियाणी = क्षत्रिय स्त्री. (क्षत्रियकाः, क्षत्रियिका.) क्षत्रियी = क्षत्रियाची पत्नि. क्षत्रिय = क्षत्रिय. (क्षत्रिय हणः = परशुराम) क्षतृ = सारथि, दासीपुत्र, द्वारपाळ, विदुर, नगररक्षक. खजिनदार. क्षत्र = अंमल, क्षत्रियजात, योद्धा, हिंसा, क्षत्रिय स्त्री. क्षत्रियाचा दर्जा, (क्षत्रविद्या = धनुर्वेद.) क्षत्रबंधु = क्षत्रिय, नीच क्षत्रिय. क्षंतृ = सहनशील] विश् = विशांपति, राजा, मुख्य व्यापारी. [विश = (१) कमळाच्या दांड्यामधील तंतू. (२) (समासांती) करणारा. विश् = द्रव्य, संपत्ति, मुलगी, प्रवेश, राजा, मनुष्य, वैश्य, लोक, प्रजा. विशाम् = प्रवेश करणाऱ्यामधील मुख्य.] शूद्राणाम् = शूद्र, शूद्र जातीय. शूद्रप्रिय = कांदा. शूद्र–आर्ता = वाघांटी. शूद्रवेदिन् शूद्रकन्येसी लग्न लावणारा. प्रविभक्तांनि = अविभक्तच असें करणारे, अविभक्ततेचे प्राधान्य (अभ्युदय, उगम.) स्वभाव प्रभवैः गुणैः = स्वभाव प्रभवति ज्या गुणांनीं. (प्रभव = उत्पत्तिस्थान, उगम, अभ्युदय मूळ कारण.)

अन्वय—परंतप । स्वभाव प्रभवैर्गुणैः । ब्राह्मण । क्षत्रिय विशाम् । शूद्राणाम् च । कर्माणि । प्रविभक्तानि ॥ ४१ ॥

अर्थ—हे परंतपा ! शत्रुतापना ! स्वाभाव प्रभावाच्या स्वभाविक, (अभ्युदय, मूळ कारण, उगम, उत्पत्तिस्थान) गुणामुळें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र याची कर्मे वेगवेगळी अशींच (भज, भज्य, भक्त विभक्त, प्रविभक्त अशीं कर्मे, अशी ह्या चतुर्वर्णाची) आहेत. (श्लोक ४१ वा ओव्या ८१९–८३३)

**तेचि चारी वर्ण । पुससी जरी कोण कोण ।**
**तरी जया मुख्य ब्राह्मण । धुरेचे जे कां ॥ ८१९ ॥**
**येर क्षेत्री वैश्य दोन्ही । ते ही ब्राह्मणाचेचि मानि ।**
**जे ते वैदिक विधानी । योग्य म्हणौनि ॥ ८२० ॥**
**चौथा शूद्र जो धनंजया । वेदी लागू नाही तया ।**
**तऱ्ही वृत्ति वर्णात्रया- । आधीन तयाची ॥ ८२१ ॥**
**तिये वृत्तिची जवळिका । वर्ण ब्राह्मणादिका ।**
**अहो शूद्र ही की देखा । चोथा जाला ॥ ८२२ ॥**
**जैसा फुलाचें सांगाते । तांथु तुरंबिजे श्रीमंते ।**
**तैसे द्विज संगे शूद्राते । स्वीकारी श्रुति ॥ ८२३ ॥**
**ऐसेसी गा पार्था । हे चतुर्वर्ण व्यवस्था ।**
**करूं आतां कर्मपंथा । यांचया रूप ॥ ८२४ ॥**

**जिही गुणी वर्णचारी । जन्ममृत्यूचिये कातरी ।**
**चुकोनिया ईश्वरी । पैठे होती ॥ ८२५ ॥**
**जिये आत्मप्रकृतीच्या इही । गुणी तत्वादिकी तिही ।**
**कर्मे चौघा चौ ठाई । वाटिली वर्णां ॥ ८२६ ॥**
**जैसे बापे जोडिले लेका । का वाटीले सूर्ये मार्ग पांथिका ।**
**नाना व्यापार सेवका । स्वामी जैसे ॥ ८२७ ॥**
**तैसे प्रकृतीच्या गुणि । जया कर्माची वेल्हावणि ।**
**केली वाहे वर्णी । चहूं इही ॥ ८२८ ॥**
**तेथें सत्वे आपलां आंगी । समिन निमिन भागी ।**
**दोघे केले नियोगी । ब्राह्मण क्षत्रि ॥ ८२९ ॥**
**आणि रज परि सात्त्विक । तेथ ठेविले वैश्य लोक ।**
**रज तमे मेषक । शूद्र ते गा ॥ ८३० ॥**
**ऐसा येकचि प्राणिवृन्दा । मेदु चतुर्वर्णधा ।**
**गुणी इही प्रबुध्दा । केला जाण ॥ ८३१ ॥**
**मग आपुले ठेविले जैसे । आईतेचि दीपे दिसे ।**
**गुण भिन्न कर्म तैसे । शास्त्र दावि ॥ ८३२ ॥**
**तोचि आतां कोण कोण । वर्ण विहिताचे लक्षण ।**
**हे सांगो आइक श्रवण । सौभाग्य निधि ॥ ८३३ ॥**

धुरेचे=प्रमुख, अग्रभागीचे. (८१९) क्षेत्रि-क्षेत्रिय, मानि-मानिजे, मानी. योग्य=वैदिक कर्माचें अधिकारी. (८२०) नाही-कीर नाही. लागु=अधिकार, संबंध. वर्णात्रया-वर्णत्रया. (८२१) जवळिका =सेवा वृत्तिच्या सान्निध्यामुळें. वृत्तीची- वृत्तीचिया. वर्ण-वर्णा. (८२२) फुलाचे-फुलाचेचि-फुलाचेनि. तांतु-तंतु किंवा दोरी मस्तकी खोंवतात, धारण करतात. (८२३) ऐसेसी-ऐसैसी. कर्मपंथा-कर्मपथा. याचया-याच्यिा (८२४) वर्ण-तो वर्ण. कातरी=अनर्थाला, कातरीला. पैठे=प्राप्त (८२५) प्रकृतीचा-प्रकृतीचे. चो-चहूं. (८२६) वेल्हावणि=विस्तार (वेली जाणे-वेल्हावणे.) (८२७) आपुलां-आपुल्या. समिन निमिन=अर्धे, अर्धे. नियोगी=अधिकारी, योग्य. क्षत्रि-क्षत्रिय (८२९) तये मेषक-तम मेस्क =तमोगुणी मिश्र. (मेष=मिणे. भिषज्या=चिकित्सा करणे.) (८३०) येकचि-एकचि. गुणी-गुणीची (८३१) अपुले-आपले. (८३२) सौभाग्यनिधि=भाग्यवंता. (८३३)

**हे चार वर्ण (कोणते तर) ज्यांत ब्राह्मण अग्रमानाचे क्षत्रिय व वैश्य थोरपणानें, ब्राह्मणाच्या तोलाचे, बरोबरीचे, त्यांनाही वैदिक धर्मक्रियांचा अधिकार आहेः म्हणून चौथा वर्ण शूद्र; वेदाचा अधिकार नाहीं. म्हणून ह्यांस ह्याचे जीवन तीन वर्णावर अवलंबून असल्यानें-जीवनवृत्तिसंबंधीं-शूद्र तो वर्ण-विभाग म्हटला; व चौथा वर्ण, चौथ्या वर्णाचा झाला. (ओव्या ८१९-८२१)**

कोण ते कां कोणते ते चार वर्ण, या बाबत पुसशील तर असें जाण कीं मुख्य ते धुरेचे असें, प्रमुख अथवा अग्रभागीचे ते जे का आहेत, ते ब्राह्मण होत ते ब्राह्मण जाण. (८१९)

[क्षेत्री शेतकरी] क्षत्रीय व वैश्य हे दोन्ही तेहीपण ब्राह्मणाचेच (केलेले) होत असे मान, कारण काय तर जें कांहीं ते वैदिक वेदविहित, पवित्र विधानास (विधान=हत्तीचे अन्न.) आज्ञा, आचरण, व्यवस्था, इलाज, नियम, संस्कार, द्रव्य, विधि वाक्य-वेदवाक्य, वेद शिकलेला, विधानामध्यें योग्य अधिकारी म्हणून (८२०)

हे धनंजया, चौथा वर्ण जो शूद्र म्हटला आहे, त्यास वेदाचेठायीं अधिकार, संबंध पोहोचत नाहीं. लाग संपर्क, संयोग (संबंधिन्=नातलग अथवा मित्र, अगदीं सत्तेनें तेथीलच्या संयोगाचे होणे, वा अंमलदारी चालविणें, हक्कानेंच एक संपर्क) तेथें पोहोचतो असें नाहीं, पण–तरीही पण त्याची वृत्ति उपजीविका, स्वभाव (अंतःकरणाचा व्यापार, वर्णरचना स्वभाव, पद्धति अस्तित्व, स्थिति वागणूक, व्यवसाय पोटाचा धंदा, शब्दांची अर्थबोधक शक्ति) तीन वर्णांच्या आधीन अशी वशतेची ताबेदारीची तीन वर्णांच्या ताब्यांतली अशी त्याची वागणूक परस्वाधीन अशी. (परस्वाधीन जिणे अन् पुस्तकी विद्या.) [ **सेवा ब्रह्मप्रतिष्ठा** वर्णव्यक्ति, मनुष्यधर्म, गौरव, आदर, आतिथ्य, सेवाधर्म, अध्ययन, अध्यापन, (२) सेवा योद्धा, ईश्वरभाव=जखम होण्यापासून जो रक्षण करतो तो क्षत्रिय म्हटला–येथें हीच सेवा जे कांहीं रक्षण जखम होण्यासंबंधी जी तेथे इलाज आदीची (३) **सेवा [ मुलगी, मनुष्य, प्रवेश, राजा**=रंजते लोकान् ] सेवाधर्म, जेथें वाणिज्याने गरजा पुरविणे, जे नरतत्व, प्रवेश, इत्यादींनी तो. (४) **सेवा परिपरिचर्य**)=सर्व सेवा ह्यावरील तिहीची तीच मुळीं 'सेवाच सर्व एक' अशीः सेवा तत्वाचे प्राधान्यच सर्व –अति महत्व पावून असलेले ते ह्या प्राण्याचा जीवात्म्याचा मूळस्वभावच ऐश्वर्यास आणिला जसाः कर (५) **परि परिचर्या**=रूप, मुख, चेहेरा, दिवसमान आयुष्य, तबीयत इत्यादींनी ती सर्व व्यापक सर्व साधारण चर्या सेवा ही चहूंनाहीं त्या त्या गुणकर्माप्रमाणें लागू होणारी] (८२१)

**तीनीं शूद्रास वर्ण व्यवस्थेंत घेतलें** कारण फुलांची माला केली तेथें दोरा हा कीं श्रीमंताच्या शरीरी धारण केला होतो फुलाबरोबर ना ! म्हणून असे ह्या चार वर्ण संस्थेचे स्वरूप जाण त्याच्या कर्माचे स्पष्टीकरण करतो. **जन्ममरणाच्या कैचीतून चारी वर्ण कर्माच्या गुणांनीं सुटतात, आत्मरूपास पोहोचतात** स्वरूप पावतात. **प्रकृतीच्या गुणांनीं चार प्रकारची कर्मे, चार वर्णांना वांटून दिली आहेत. बापानें जोडलेलें मुलांस वांटून द्यावें.** सूर्यानें वाटा दाविल्या त्या भिन्नभिन्न दिशांना जाणाऱ्या वाटसरूमध्यें वांटल्या होतातः धन्यानें नोकरामध्येंच कीं, कामें वांटून द्यावीतः कर्माची विल्हेवाट प्रकृतीच्या गुणांनीं चार वर्णांत वांटणीची केली आहेः **सत्त्वगुणानें आपल्या अर्ध्या, अर्ध्या भागानें ब्राह्मण, क्षत्रिय यांना आवरिलें. सत्त्व रज मिश्र वैश्य तमांत मिसळलेले रज ते शूद्र**–एक स्वरूप असलेल्या मूळच्या मानव संघांत **गुणांनीं चातुर्वर्णात्मक भेद उत्पन्न केला** –आपली वस्तू अंधारांत आहे ती दिवा दाखवितो; गुणांनीं झांकलेलें कर्म शास्त्र दाखवितेंः दैवी अर्जुना ! **स्वाभाविक कर्में निरनिराळ्या वर्णाची ती** योग्य अशी तीं कोणतीं तें सांगतों. ओव्या ८२२–८३२

सेवा (सेवा=सेवा करणें, सत्कार करणें, आश्रयणें, स्वीकारणें, अवलंबणें, सेवन करणें, उपभोगणें, वास करणें, वारंवार जाणें.) वृत्तीच्या सान्निध्यामुळें, त्या वृत्तीची जवळिकपणानें—तिजमुळेंच ब्राह्मणादिकांना वर्ण म्हटले, वर्ण आला–[ **वर्ण**=मनुष्याची जाती, वस्तुधर्म, उत्कर्ष, जात, प्रकार, कांती, रंग, सोने कसाला लावणें सौंदर्य, रूप भेद, केशर, अक्षर, आकृति, प्रकार, शब्द, कीर्ती. गुण, वस्त्र, आच्छादन, गीतक्रम, हत्तीची झूल, अव्यक्त राशि (ग०). वर्णमातृ=लेखणी. वर्ण अर्ह=हिरवा मूग. वर्ण अवकृष्ट=शूद्र. वर्ण आत्मन्=शब्द वर्ण चारकः=रंगारी. वर्ण तूलिः=लेखणी, कलम (वर्णवर्तिः) ] तेथें अहो ! आतां वर्णच कीं एक पण चौथा असाः शूद्रही जाला पाहा कींः (वर्ण=वर्णव्यक्ति, मनुष्यधर्म, आदर, आतिथ्य, गौरव, सेवाधर्म, अध्ययन, अध्यापन.) (८२२)

ज्याप्रमाणें फुलांच्या संगतीनें सांगातने (संगत=मिसळलेला, प्रसंगोचित) मुळें श्रीमंतांनीं दोरा का सूत्र तें मस्तकी खोवण्याचें होतें, त्याप्रमाणें द्विजसंगामुळेंच–द्विजांच्या [ द्विज, द्विजन्मन्, द्विजाति=(१) ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य, (२) दांत, (३) अण्डज, (पक्षी वगैरे) (४) संस्कार झालेला ब्राह्मण (५) ब्रह्मचारी]–सामंतती=शेजार–शेजारी, जवळ राहाणारा संगतीनें, सांगाततेनेच कीं, श्रुति माउली शूद्रास स्वीकारते (स्वीकार–स्वीकृति–स्वीकारणें, घेणें, स्वीकार, अंगिकार, संमति, लग्न) (८२३)

हे पार्था, अशा तन्हेच्या व्यवस्थेमुळें (व्यवस्था=शास्त्रानुरूप विधि, स्थापना, स्थिति, कायदा, कबुलायत नियम.) ह्या चार वर्णांना गुण, चातूर्य, सीमा, बोल, व्यक्ति होणें झालें आहे. याच्या कर्मपंथाचे आतां रूप करूं. (८२४)

ज्या गुणांनीं गुणवंत कर्मपंथामुळें, कर्मपथ, मार्गामुळेंच कीं, हे चारी वर्ण जन्ममृत्यूच्या अनर्थास स्वभावाचे कातरपण टाकून मनुष्यधर्मानें, देहबुद्धीस चूकून–चुकवून, श्रेष्ठ, शक्तिमान, ईश्वराच्याठायीं, प्राप्त होतात, पैठे होतात. (पथ=रस्ता, मार्ग पथ कल्पना=दंभ, पथिन्=पंथ, मार्ग, वर्तन मार्ग, रस्ता, टप्पा, आटोका. पथिन्द्रुम=खैर.) (८२५)

[आत्मप्रकृतीची–आत्मप्रत्ययिक = अनुभवानें जाणण्याचें–(तैसा आपुलिया विस्मृति। आत्मा आपणचि प्रकृति। सारिखा गमौनि पुढति। तिसीचि भजे ॥ ३५४ ॥ अध्याय १५वा.) जीव, प्राणी, देह, जीवात्मा, मूळस्वभाव, उत्पत्ति हेतु, संस्कार, शरीर, ब्रह्म, परमात्मा.] कर्मी गुणवान् अशा कर्मपथ मार्गानेंच ह्या चौघांना कर्मे तीं चार ठिकाण, ठाव पाहाणारीं अशीं वाटलीं आहेत–कर्माचे ठायीं गुणी–तत्वता जी तीन प्रकारची ती वाचा–शब्दाचे मूळरूप आत्म प्रकृतीचीच की ह्या गुण कर्मे (गुणवान्, गुणीजन रंजन, रागाचा, 'गुणवन्त केलो दोष जाणायासाठीं, मी माझे पोटी बळकट दूषण' ॥

त्या त्या गुणांनीं, गुणकर्मांनीं–आत्मा व प्रकृतीचे उत्कंठा–विकारवशतेचे केलेले. गुणाच्या ठायीं तत्त्व, प्रस्थापित करण्यानें कर्मे ती चौघांना चार ठायींची करणारी होतात ती वर्णांना आंगचे पाणी चार ठायींचें करून वाटली आहेत. (वर्ण वर्णा–वैवर्ण्य–विवरण, वर्णाटः=नट, रंगारी, चित्रकार, गवई व जार पत्निच्या जिवावर पोट भरणारा, व्यक्तिच रूप रंग डौलानें तेथेंच रमणारी, आपलें सुख त्यांत आहे असें समजून) नौका अथवा गाडी देहयष्टी चोदना चालविणें जें ह्या देहयष्टीस–देह गाडीस, (वर्णासिः=पाणी) (८२६)

(व्यवहार व्यापार, सेवक) बापे भलेपणानें, जोडलेले ते मुलास लेकास बापपण (प्रभुपण तर क्षमिणीवरः दक्षिणः दाक्षिण्य दक्षत्व ते, पेशलपण पण काय स्वामी का धनिपणाचें ते ) वाटले रस्ता मार्ग, चालणाऱ्यांना वाटसरूना जसा (पंथ, रस्ता) तो सूर्यानेंच कां वाटला (होतो चालण्याच्या वहिवाटीचा केला) अथवा धन्याचे कां स्वामीचें व्यापार, व्यवहार कामें ती सेवकांस वांटून दिली. (८२७)

(वेलि, वेल्हावळे, विस्तार करून, वेल्हाळपणानें वृक्षासच बिलगणारी कर्मानीच कीं होणारी ती ती–) प्रकृतीच्या (समूळ केलेल्या मूळधर्मानें, अविद्या विकारादि कां ह्या तीन सत्त्व, रज, तम) गुणांनीच कीं केलेली ती–ह्या चारही वर्णाच्या–ठायीं–कर्माची विस्तृतता (ह्या चहूं वर्णांनीं प्रकृतीच्या गुणाप्रमाणें) वाटणीच केली. (८२८)

तेथें सत्वानें (प्राणी, प्रकृती, स्वभाव बळ, उत्साह, धैर्य, अस्तित्व, प्राण, द्रव्य, आत्मा, चैतन्य, आपल्या आंगामध्यें आवरून धरिलें आंगचें केलें आपल्याठायींचें आपणच ते सत्व त्यानें आपल्या समविषम भागांची अर्ध अर्ध भागानें (वांट्यानें ब्राह्मण सत्व–समविषय–युक्त योगानें अवरिले तेही समीत निमीत समसत्व विषमतत्व असें युक्त आवरिलें योगयुक्त योगाचें केलें युक्त असें आवरिलें–क्षत्रि=१ सत्व) दोन ते ब्राह्मण व क्षत्रिय नियोगी म्हणजे प्रधान केले (सचिव केलें नियोग म्हणजे प्रेरणें, यत्न, निश्चय, देवघटना, आज्ञा, वंश न खुंटावा म्हणून दिराकडून केलेली प्रजोत्पत्ति.) (८२९)

आतां सत्व रज मिश्र रज खरे, पण सात्विकतेचे असे ते मिश्र (सत्व संपन्न म्हणजे समान चित्ताचे, बलवान् असें तसेंच साजीव का सजीव असें सत्वस्थ) तेथें वैश्य लोक ठेविले (मुलगी, मनुष्य, प्रवेश, रंजते लोकान् राजा) व आतां रजोगुण तो तमोगुणाशी मिश्र मेसळलेला तेथें शुद्र (परि परिचर्यात्मक) ते ठेविले.

(तमस=काळोख, मोह, मुर्च्छा, निद्रा अज्ञान, दुःख पाप, तमोगुण, क्रोध, संसार, प्रकृति, नरक, व्याधि,) (तापद=सूर्य चंद्र, अग्नि दिवा इत्यादि.)

हे प्रबुद्धा! जागृत अशा अर्जुना! या एकाच ह्या प्राणि समुदायास वृन्दास मनुष्यजाति वर्णपरत्वें चार प्रकारची चार वर्णाची करून चार भेद कीं तेथें ह्या गुणामध्यें गुणानीच केले आहेत-(येथें वर्ण म्हणजे निरूपण करणें, का स्तुति करणेंच जसें, अथवा विवरण रंगविणेंच जसें असें होत आहे) (८३१)

आतां असें हें ठेविलेलें (१, २ नियोगी ३ सात्त्विक ४ भेषक) तेथें आपला, ठेविलेला ठेवा जसा कां आईताच कीं, दिव्यानें दिसतो, पाहिला होतो. त्याप्रमाणें गुणागुणावर भिन्न, भिन्न जसजसें कर्म तसतसें ते शास्त्रच मुळीं दाखवितें. (८३२)

वर्णविहित असें लक्षण कोणतें कोणतें तें आतां सांगण्याचें करतो. हे भाग्यवंता! श्रवण सौभाग्यनिधि अशा हे अर्जुना, तूं आतां तें ऐकण्याचें करावेंस. (८३३)

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम्॥ ४२॥**

**शम**=शांति, मनोनिग्रह, अंतःकरणाची स्थीरता (शम्=कल्याण, सुख, आरोग्य सुख इत्यादि अर्थी शम्=शांत होणें, सांत्वन करणें, उपशम=शांत करणें, निशम्=ऐकणें) **दम**=शांत करणें शमविणें, आत्मसंयमन शिक्षण, जिंकणें, (दमन=शूर पुरुष शासन करणें, जिंकणें.) तपस=**तपः**=तापणें, सामर्थ्य असणें, तप=उष्णता. **शौचम्**=पवित्रता **क्षांति**=क्षम, सोशिकपणा. **आर्जव**=सरळपणा, खरेपणा. **ज्ञान**=बोध, जाणीव, बुद्धि. **विज्ञान**=(विज्ञ=निपुण, चतुर, ज्ञानी.) विशेष माहिती चातूर्य, विद्या. **आस्तिक्य**=परलोकवाद खरा मानणें तें. **ब्रह्मन्**=ब्रह्मन्=ब्रह्मदेव, ब्राह्मण, वेद, चैतन्य तत्त्व, ईश्वरी ज्ञान. कर्मन्-कर्म=काम, कर्म. स्वभाव (जं)=प्रकृति, सहजकर्म=प्रकृतीचे केलेले ते सहज कर्म.

अन्वय :—शमः। दमः। तपः। शौचं। क्षान्तिः। आर्जवं। च। एव। ज्ञानं। विज्ञानं। आस्तिक्यं। स्वभावजं ब्रह्मकर्म। एव।

स्वभावजं ब्रह्मकर्म शमः। स्वभावजं ब्रह्मकर्म दमः। स्वभावजं ब्रह्मकर्म तपः। स्वभावजं ब्रह्मकर्म शौचं। स्वभावजं ब्रह्मकर्म क्षान्तिः। स्वभावजं ब्रह्मकर्म आर्जवं। स्वभावजं ब्रह्मकर्म ज्ञानं। स्वभावजं ब्रह्मकर्म विज्ञानं। स्वभावजं ब्रह्मकर्म आस्तिक्यं। च। एव॥ ४२॥

अर्थ :—ब्रह्मन् म्हणजे ब्रह्मदेव, ब्राह्मण येथें, वेद, चैतन्यतत्त्व, ईश्वरी ज्ञानाचे ठायीं काम का कर्म तें प्रकृतीचें केलेलें स्वाभाविक सहज कर्म, तें म्हणजे (१) **शम**-मनाचा निग्रह, शांति.

(२) **दम**=इंद्रियांचा निग्रह, आत्मसंयमन, (३) **तप** म्हणजे तपश्चर्येचे तप सामर्थ्य असणें (४) **शौच** म्हणजे अंतर्बाह्य पवित्रता—(५) **शांती**-क्षमा, सोशिकपणा, (६) **आर्जव** सरळपणा व खरेपणा (७) **ज्ञान** म्हणजे जाणीव बुद्धी बोध **विज्ञान** प्रपंचसंबंधीं विशेष माहितीचे चातुर्यय विद्या व **आस्तिक्य** म्हणजे परलोकसंबंधीं खरेपणाची बुद्धि असणें इत्यादि होय असें हे ब्राह्मणाचे स्वभावसिद्ध कर्म जाण.

(श्लोक ४२ वा ओव्या ८३४-८५६)

**तरी सर्वै इंद्रियाच्या वृत्ति। घेवोनि आपुलां हातीं।**
**बुद्धि मिळे आत्मकांती। प्रिया जैसी॥ ८३४॥**
**ऐसा बुद्धिचा उपरमु। तया नाव म्हणिजे शमु।**
**तो गुण गा उपक्रमु। जया कर्माचा॥ ८३५॥**

आणि बाह्येंद्रियाचे धेंडे । पिटुनि विधिचेनि दंडे ।
नेदिजे अधर्माकडे । कहीचि जावो ॥ ८३६ ॥
तो गा शमा विरजा । दमु गुणु जेथ दुजा ।
आणि स्वधर्माचिया वोजा । जिणे जे कां ॥ ८३७ ॥
जेवि सटवियेचे राति । न विसंबिये वाति ।
तैसा ईश्वर निर्णो चित्ति । वाहणे सदा ॥ ८३८ ॥
तया नाव तप । हे तिजया गुणाचे रूप ।
आणि शौच ही निष्पाप । द्विविध जेथें ॥ ८३९ ॥
मन भावशुध्दें भरले । आंग क्रिया अलंकारले ।
ऐसे सबाह्य जियाले । साजिरे जे कां ॥ ८४० ॥
तया नांव शौच पार्था । ते कर्मी गुण जये चौथा ।
आणि पृथ्वीचिया परि सर्वथा । सर्व जे साहणे ॥ ८४१ ॥
ते गा क्षमा पांडवा । गुण जेथे पांचवा ।
स्वरामाजी सुहावा । पंचमु जैसा ॥ ८४२ ॥
आणि वांकुडेनि ओघेसी । गंगा वाहे उजुचि जैसी ।
का पृष्टी वाळिला उसी । गोड जेवी ॥ ८४३ ॥
तैसा विषमाहि जीवा । लागी उजुकारू बरवा ।
ते आर्जव गा सहावा । जेथिचा गुण ॥ ८४४ ॥
आणि पाणि प्रयत्ने माळी । अखंड जचे झाडामुळीं ।
परि ते अवघेचि फळी । जाणे जेवी ॥ ८४५ ॥
तै सशास्त्रे आचारे तेणे । ईश्वरूचि येकु पाहाणें ।
हे फुडे जेका जाणणे । ते येथें ज्ञान ॥ ८४६ ॥
ते गा कर्मी जये । सातवा गुण होये ।
आणि विज्ञान हे पाहे । एवं रूप ॥ ८४७ ॥
तरी सत्त्वशुध्दीचिये वेळे । शास्त्र का ध्यान बळे ।
ईश्वर तत्त्वी मिळे । निष्टंक बुद्धि ॥ ८४८ ॥
हे विज्ञान बरवे । ते गुण रत्न जेथें आठवे ।
आणि आस्तिक्य जाणावे । नववा गुण ॥ ८४९ ॥
पै राजमुद्रा आथिलिया । प्रजा भजे भलतया ।
तेवी शास्त्रे स्वीकारिलया । मार्ग मात्राते ॥ ८५० ॥
आदरे जे का मानणें । ते आस्तिकत्व मी म्हणे ।
तो नववा गुण जेणे । कर्म ते सांच ॥ ८५१ ॥
एवं नवही शमादिक । गुण जेथें निर्दोष ।
ते कर्म जाण स्वभाविक (स्वाभाविक) । ब्राह्मणाचे ॥ ८५२ ॥
तो नवगण रत्नाकरू । या नाव रत्नाचा हारू ।
न फेडितले दीनकरू । प्रकाशु जैसा ॥ ८५३ ॥
ना ना चांपाच्या पौळी पूजिला । चंद्र चंद्रिका धवळला ।
का चंदन निजे चर्चिला । सौरभ्ये जेवि ॥ ८५४ ॥

तेवि नवगुण टिकलग। जेणे ब्राह्मणाचे अव्येग।
कहीचि न संडी आंग। ब्राह्मणाचे ॥ ८५५ ॥
आता उचित जे क्षत्रिया। तेही कर्म धनंजया।
सांगो आइक प्रज्ञेचिया। भरोवरी ॥ ८५६ ॥

सर्व इंद्रियाच्या–सर्वेंद्रियाचिया. मिळे आत्म–कांती–आत्मया मिळे एकांती. (८३४) नांव–नाम. उपरम=शम. उपक्रम=प्रारंभ. तो–तो पै. (८३५) धेंडे=मेळा. रोमारोमाच्या ठायीं अनंत ब्रह्मान्डें ऐसी धेंडे, मोठे आकार (८३६) विरजा=साह्यकर्ता. वोजा=मार्गानें रीतीनें. जिणे=जगणें. विसंभिजे–विसंभिजे. निर्णो–निर्णया=निश्चय चित्ति–चित्तीं. सटवीचिये राती=जन्मल्यापासून सहावे रात्री. वाती=दिवा. (८३८) नाव–नाम. जेथें–जेथ. (८३९) भावशुद्धे–भावशुद्धि=शुद्ध विचारानें, शुद्ध भावानें–आंगक्रिया= सत्कर्माचरणानें अलंकरले–अलंकारिले=भूषित केलें (८४०) जेथे–जेथ. सुहावा–मधुर मधुर (८४२) पृष्टी वळला–पुटीवळा=वांकडी पेरे असलेल्या. ओघेसी–वोघेसी. उजुचि–उजूचि. (८४३) उजुकारू= सरळपणा (८४४) पाणी–पाणिये. (८४५) सशास्त्रे आचरे तेणे–शास्त्राचारे तेणें, आचरतेणें. पाहणे–पावणें. (८४६) जये–जिये. (८४७) निष्टंकबुद्धि=निश्चयात्मिका बुद्धि (८४८) तत्त्वी–तत्वीचि. जेथे–जेथ. (८४९) स्वीकारिलया–स्वीकारिलिया. (८५०) आस्तीकत्व–आस्तिक्य=शास्त्राविषयीं आदर बुद्धि. (८५१) जेथे–जेथ. निर्दोष–निर्दोख (८५२) या–यया. हरू–हारू. न फेडित=नच काढता टाकून. ले=धारण, करून ( सूर्य ब्राह्मण व गुणरूपी रत्नाच्या समुद्रांतील हा नवरत्नाचा हार सतत करतो) अंगावरून न काढता (८६३) चापांच्या पौळी–चांपा चांपौळी=चाफ्याच्या कळ्यांनी चंद्र चंद्रिका धवळला=चंद्र चांदण्यानें शुभ्र केला (८५४) टीकलग=रत्नजडित. लेणे=अलंकार ब्राह्मणाचे– ब्राह्मण्याचे (८५५) क्षत्रिया–क्षेत्रिया. भरोवरी=सामग्रीनें. (८५५).

**कर्माचा उपक्रम प्रारंभ तिथें निर्दोष नऊ गुण ते ब्राह्मणाचे स्वाभाविक कर्म जाण** **शम**=सर्व इंद्रियवृत्ति हाती घेऊन बुद्धि ती आत्मरूपास एकांती मिळते असा बुद्धिचा उपरमः **दम**= बाह्येंद्रिय धेंडे अधर्माकडे जाऊ न देणें जे. **तप**=ईश्वरासंबंधींचा निर्णय चित्तांत वागविणें जें. **शौच**= अंतर्बाह्य जियालेपण साजिरे असें. **क्षांति**=सर्व कांहीं सहन करणें स्वरांमध्यें मधुर पंचम जसा. **आर्जव** =ओघ वांकडा तरी गंगा उजू, ऊंस वाकडा तरी रस गोडी ती गोड. **ज्ञान**=शास्त्राचारानें ईश्वरच एक पावणें का पाहाणें तें. **विज्ञान**=शास्त्रानें अथवा ध्यानाच्या बळानें सत्त्वशुद्धीच्या वेळेस ईश्वराशी मिळून असणें जें. **आस्तिक्य**=राजमुद्रा योग्यतेची तरी पण प्रजा तर अधिकतेनें भलत्यालाच भजते–शास्त्रानें स्वीकारलेले आस्तिक्य बुद्धिच्या आधारानें मानणें ज्यायोगें कर्म साचें असें होतें. (ओव्या ८३४–८५६)

सर्वेच्या सर्व इंद्रियाच्या वृत्ति (स्वभाव, व्यापार, रचना, उपजीविका) आपल्या हातीं घेऊन (प्राज्ञा) बुद्धि ही (बुध्=जाणणें.) प्रियाच जशी कां प्रियकरास (आत्मरूप कांतास) एकांती भेटते. (८३४)

असा बुद्धिचा जो उपरम (म्हणजे पश्चातापेन शुद्धते, विरक्ति, निवृत्ति, वैराग्य,) त्यास नांव तें '**शम**' होय–कर्माचा प्रारंभच एक (अथवा चिकित्सेचा प्रतिकारच एक) असा तो जाणः ज्या शमास 'कर्माचा प्रारंभ' असा एक गुणच लाविला होतो, त्यास बुद्धिचा उपरम म्हणतात व तोच **शम** (शांति मनोनिग्रह, अंतःकरणाची स्थीरता) जाण. (८३५)

बाह्य इंद्रियाचा मेळा (धेंडे) क्रम अनुष्ठानानें (=दैवी उपायानें) पिटून काढून केव्हांहि अधर्माकडे मुळींच (अनाचाराकडे, पापाकडे अनियमाकडे का अकर्तव्याकडे कां अभावाकडे) जाऊ देत नाहीं. [शम्या =(१) ३६ अंगुळीचे परिमाण. (२) झांज (३) काठी. शमिन्=शांतियुक्त जितेंद्रिय (विरजा=विराज= क्षत्रिय, शोभा परमेश्वर.) साह्य असा तो **शमा नांवाचा गुण मोठा साह्यकर्ता कीं.** (८३६)

तेथेंच आतां **दम** नांवाचा दुसरा गुण तो म्हणजे स्वधर्माच्या पद्धतीनें, रीतीनें, मार्गानेंच एक जीवित जगणें जें होत आहे तो दम होय. (८३७)

पाचवीनंतर षष्ठीपूजनाचे वेळेस म्हणजे जन्मल्यापासून सहावे रात्रीं ज्याप्रमाणें दिव्याकडेच सर्व लक्ष दिलें जातें–दिवा मुळींच विसंबिला जात नाहीं विझूं दिला जात नाहीं तसा ज्याचे चित्तामध्यें ईश्वराविषयींचा निर्णयच एक (निवाडा एक, निश्चय एक) वाहाणे होऊन आहे. (८३८)

त्यास **तप** असें नांव आहे. हें तिसऱ्या गुणाचे रूप होयः आतां जेथें निष्पाप अशी शूचिर्भूतता ही दोन तऱ्हाची असते. (८३९)

मन शुध्द भावानें शुद्ध विचारानें भरलेलें, आंगच्या क्रियेनें (तप स्वाध्याय, ईश्वरप्रणिधानानें) सत्कर्माचरणानें अलंकारलेलें असे अंतर्बाहि जियालेपणाचे जीवित तें शोभलें होतें साजिरें असें जें कांहीं. (८४०)

हे पार्था! त्यास **शौच** (असें नांव आहे) म्हणतातः तो कर्माच्याठायी चौथा गुणः यावर आता पृथ्वीप्रमाणें सर्वथैव सर्व कांहीं सहन करणें— (८४१)

—हे पांडवा! तो पांचवा गुण! ती **क्षमा** होय. हा गुण जसा का स्वरामध्यें पंचम आलाप मधुर मधुर असा. (८४२)

ओघ वांकडा तरी गंगेचे वाहाणें तें उजूं म्हणजे सरळपणच उजविलेलें जसें कां, अथवा ऊंस पृष्टी वळिला म्हणिजे पिळिला म्हणजे तो वांकडा जरी तरी रस गोडी ती गोडच जशी. (८४३)

त्याप्रमाणें विषम अशा जीवदशेस, उजविणें, सरळपणाचें करणें हें चांगलेच कीं. जीव जो विजोड, दुर्बोध, दुःसह, दुर्गम, उंचसखल, त्यास जोड द्यावी, बोध करावा, सहनशीलता अंगी बाणवावी, जाणतेपण शिकवावें, सुखदुःखाचे द्वंद्व उंचसखलपण ते जाणवावें असें सरळपणाचे ते **आर्जव** तेथचा तो सहावा गुण होय. (८४४)

आतां माळी तर मोठ्या प्रयत्नानें झाडाच्या मुळीं कां बुडींच कीं दिलेले पाणी तें रहावें असें जपतो, पण तें तर केव्हांही त्या झाडाच्या फळामध्येंच कीं नेलें जातें–, फळें येण्याकडेच योजले जातें जसें. (८४५)

तसें सशास्त्र वर्तणूक रीती, आचरणानें म्हणजेच सशास्त्र आचार करणाऱ्यानें तर एक तो ईश्वरच कीं पावावा, पाहावा, (पहाणें पावणें) होतें नां! असें हें जें कांहीं अगदीं खरेपणानें जाणणें तेंच **ज्ञान** होय. (८४६)

तेंच मुळीं ह्या कर्मामध्यें सातवा गुण होय म्हटलें:: आतां **विज्ञान** तें अशा रूपाचें आहे कीं. (८४७)

अहो! सत्वशुद्धीच्या वेळेस शास्त्रानें अथवा ध्यान बळानें, ईश्वरतत्त्वीच मिळून जाणे होतें ज्या निश्चयात्मिका बुद्धिनें तें— (८४८)

असें हे बरवे विज्ञान होय. ते गुणरत्न येथें आठवे होय–आतां वस्तुसत्यता बुद्धि–श्रुतिस्मृतिविषयी श्रद्धा ते **आस्तिक्य** जाणावे. तो नववा गुण होय. ८४९)

अहो! राजमुद्रा असलेल्याना राजाचा शिक्का पडलेल्या–राजमुद्रांकित मनुष्याला) प्रजा ती वैपुल्यतेनें भलत्यासच, उत्कर्षासच, उत्कृष्टपणास भजते त्याप्रमाणें शास्त्रांनी स्वीकारलेले मार्ग मात्र जरी तरीपण भलत्यासच मार्गास अतिशयतेनें भजणें होतें. (८५०)

अहो, येथें आदरानें जें कांहीं पाहाणें, मानणें तेंच येथें मी 'शास्त्राविषयीं आदर बुद्धि म्हणजे आस्तिक्य' म्हणतो असा तो नववा गुण जाण. ज्या गुणामुळें कर्म तें खरेपणानें सांचपण पहातें. (८५१)

याप्रमाणें शमादिकरून नऊही गुण जाण. जेथें स्वाभाविक असें ब्राह्मणाचे जें कर्म तें निर्दोष असेंच म्हटलें होतें. (८५२)

असा तो नऊ गुणरूपी रत्नाचा सागर–(रत्नांची खाणच एक) हा नवरत्नाचा हारच एक तो ब्राह्मण सतत धारण करून हारानें अलंकृत होऊन असतो कसा तर जसा का दिवसाकर–अहोरात्रकर म्हणजे दिनकर सूर्यानें हाररूपी प्रकाशच एक धारण केलेला.

[ नऊ गुण रत्न, सागर, नवरत्न हारानें अलंकृत असावे असा प्रकाश तो सूर्य, सूर्यपणाने प्रकाशतो चांफा चांफ्याच्या कळ्यांनीं विभूषित होतो. पूजिला होतो. चंद्र आपल्या चांदण्यानें शोभतो. चंदन चंदनाच्या आपल्या सुवासानें चर्चिला जसा– (८५३)

चांपेय=सोनचाफा चापेयचाम्यं=अन्न) चांफा–चांफ्याच्या कळयानी* पूजिला (चंपकमाला=कंठ भूषण विशेष) चंद्र चंद्रिकेने धवळिला, अथवा चंदनच आपल्या चंदन गंधानें चर्चिला, सौरभ्यानें सुवास (सुरसपणानें, सौंदर्य, सुवासानें, परिमळानें) शोभा पावला जसा कां. (८५४)

त्याप्रमाणें नवगुणरत्नांनीं जडित–शोभिवंत असें–ब्राह्मणाचे अलंकार, अव्यंग, निर्दोष असे आहेत; म्हणून केव्हांही, कोठेही, अंग तें ब्राह्मणाचें सोडूं नकोस हो ! (८५५)

आतां हे धनंजया ! यावर जे कांहीं क्षत्रियाना उचित योग्य असें तें कर्महीपण सांगतो ऐक. आपली प्रज्ञा बुद्धि सर्व सामग्रीची करून ऐकणें तें ऐक. (८५६)

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**

शौर्य = पराक्रम, शूरत्व. तेज–तेजस–तेजस्वी, पराक्रमी, तेज तीव्रता. कांती, बल, शोभा, प्रभाव, धृति = धैर्य, सुख, धारण, तृप्ति, उत्साह, उद्धार. दाक्ष्यं = [दक्ष = शहाणा, चतुर, (प्रजापतिपैकीं एक)] चातुर्य. दाक्षिण्य = कौशल्य, दया, अनुकूल वर्तन. अपलायनम् = नच पळून जाणें. युद्धेच अपि= युद्धामध्यें सुद्धां. दानम्=देणे, (देणगी) देण्यास योग्य ते देणे (शिकवणे, दान, औदार्य, विभाग, शुद्धि रक्षण, हत्तीचा मद) ईश्वरभाव=परमेश्वर, महादेव, स्वामी शक्तिमान परमात्म्याचें स्वभावविलास. [ईश=धनी, स्वामी, समर्थ, महादेव, ईश=शक्ति असणें. ईश+वर (वर=प्रार्थना, देवाजवळ मागणें. वरटा=नवरदेव पति, श्रेष्ठ, इच्छित, हंसी, गांधील माशी.)] स्वभावजं=प्रकृति, सहजकर्म, क्षात्रंकर्म=(क्षात्र=क्षत्रियाचें) क्षत्रिय जातिचें, कर्म=काम.

अन्वय :—शौर्यं । तेजः । धृतिः । दाक्ष्यं । अपलायनम् । युध्दे । च । अपि । दानं । ईश्वरभावः । स्वभावजं । क्षात्रं कर्म । च ॥ ४३ ॥

अर्थ :—(१) पराक्रम, शूरत्व, (२) बल प्रभाव, शोभा, (३) धैर्य, उत्साह धारण (४) चातुर्य, कौशल्य, दाक्ष्य (५) एरव्हीं तसेंच युद्धामध्येंही नच पळून जाणें, नच पाठ दाखविणें, (६) देण्यास योग्य तें देणगीच एक देणें (७) समर्थतेच्या सामर्थ्यानें असणें, परमात्म्याचें ईश्वराचें, स्वभाव विलास, शक्ति असणें, असें हे सात गुण क्षत्रिय जातीचे स्वाभाविक कर्म जाण. (श्लोक ४३ वा ओव्या ८५७–८८०)

**तरी भानु हा तेजें । ना पेक्षी जेवी विरजे ।**
**का सिंहे न पाहिजे । जावळिया ॥ ८५७ ॥**

---

* **कळयानी** (१) मरुतकण चांफ्याचे फूल होऊन मिरवूं लागले (अमृतानुभव प्रकरण नऊ ओवी ४) ("मांथेचि चापेपणें बहकताती") (२) अध्याय ७ ओव्या २०६–२१०.

ऐसा स्वयंभु जो जीवेलाटु । सावायेविण उद्भटु ।
ते शौर्य गा जेथें श्रेष्ठु । पहिला गुणु ॥ ८५८ ॥
आणि सूर्याचेनि प्रतापे । कोटीहि नक्षत्र हारपे ।
नातरी तो न लपे । सचंद्री तेही ॥ ८५९ ॥
तैसे आपुलेनि प्रौढिगुणे । जगासी विस्मयो देणे ।
आपण तरी न क्षोभणें । काइसेनही ॥ ८६० ॥
ते प्रागल्भ्य रूप तेजा । जिये कर्मी गुण दुजा ।
आणि धीरू तो तिजा । जेथिचा गुणु ॥ ८६१ ॥
वरि पडिलयाहि आकाश । बुद्धिचे डोळे मानस ।
झांकीना ते परियस । धैर्य येथें ॥ ८६२ ॥
आणि होकां भलति तुके । पाणि जिणोनि पद्म फांके ।
का आकाश उंचिया जिंके । आवडे तया ॥ ८६३ ॥
तेवी विविधा अवस्था । पातलिया जिणौनि पार्था ।
प्रतिज्ञा फळतया अर्था । येश घेणे जे कां ॥ ८६४ ॥
ते दक्षत्व गा चोख । जेथें चौथा गुण देख ।
आणि झुंझ अलौकिक । तो पांचवा गुणु ॥ ८६५ ॥
आदित्याची झाडे । सदा सन्मुख सूर्याकडे ।
तेवी समोर शत्रू पुढें । होणें सदा ॥ ८६६ ॥

विरजे=साह्य; मार्ग, नेय. (शिक्षणार्ह मनुष्य) जावळिया=पाठिराखा. (आवळी जावळी मुलें जसी.) (८५७) लाटु-लाठ=पराक्रमी. उद्भट=वीर, पाणीदार, स्वतः सिद्ध, शूर, पराक्रमी, (८५८) कोटीही=कोट्यावधीही. (८५९) प्रागल्भ्य=प्रौढ. (८६१) वरिपडिलिया=कोसळले तरी (८६२) जीणौनि= खालीं टाकून कमळ वर येतें. आवडे तया-आवड तयाते-आवडे तयाते=(सर्व पदार्थाहून उंच आकाश) भलत्या कोणासही (८६३) येश घेणे-वेंझ देणे=छिद्र उणेपणा, जिंकणे, भोंक पाडणें, प्रज्ञा फळरूप अर्थ, त्याला मार्ग देते-प्रवेश देते, सर्व प्रसंगातून बुद्धि आपला फलार्थ साध्य करून घेते ती **दक्षता.** (८६४)

**क्षत्रियाची स्वाभावीक कर्मे**—छातीचा निधडा, अंगानें जबर जसा सूर्य का सिंह असा दुसऱ्या कोणाच्या साह्यावांचून पराक्रम करणें जें, तें **शौर्य** (१) नक्षत्रें कोटि जरी तरी सूर्याचे येण्यानें वीलोपतात, प्रतापाच्या आंगचे सामर्थ्य दुसऱ्यानां आश्चर्यचकित करून सोडणारें असें जें असणें. तें **तेज** (२) आकाशही कोसळून पडले तरी न डगमगणे. बुद्धिचे डोळे मानस कांहीं झांकत नाहीं-असे नच डगमगणारे. **धृति** (३) चाणाक्षपण, चातुर्य असणे ती दक्षता—**दाक्ष्यं** (४) अलौकिक झुंज, अपरमित भक्ति का शक्ति —**युद्धे अपलायनम्** (५) पुढें आलेल्या याचकाच्या संकल्पाप्रमाणें देणें जें तें. **दानम्** (६) प्रजाजनाचे पालन-स्वतःचे हातीं सर्व शक्ति एकवटून करणें जें-त्यानां संतुष्ट ठेवणें जें, नियामक शक्ति असणें जें त्यास **ईश्वर भाव** म्हणतात. (७)

सूर्य तो सूर्यच (भानूच) कीं, तो सर्व तेजाचा केलेला सर्व तेजच एक असा असल्यानें त्याचें ठायीं कांहीं साह्यतेची अपेक्षा (उणीव ही) केव्हांही नसणारच! अथवा असेंही म्हणूं कीं सिंह जो बलवान् तो कांहीं पाठिराख्याची मदत पाहिजे असा केव्हांही नाहीं. (८५७)

असा जो स्वयंभु आपोआप उत्पन्न होणारा-जसा का ब्रह्मदेव अथवा विष्णू (अथवा माया अथवा काळ) जो जीवपणानें वांचणे ते सर्व एक पराक्रमाचे करून असणारा, तो सावायेविण म्हणजे सोबतीच्या

साह्यांवाचून कीं, पाणीदार असा योद्धाच एक, अथवा स्वतःसिद्ध असा पराक्रमीच एक, असे जेथें 'शौर्य' आहे तो **पहिला गुण** होय. (८५८)

अहो सूर्याच्या प्रतापापुढें, तेज ऐश्वर्यापुढें तर कोटिच्या कोटि नक्षत्रें, हारपतात, (लोपतात, दिसेनाशी होतात) किंवा चंद्रासहित ही नक्षत्रें जरी असली तरी सूर्याचे तेज कांहीं लोपले होत नाहीं, अथवा चंद्रासहित सर्व नक्षत्रानींही कांहीं सूर्य लोपला होत नाहीं. (८५९)

तसें आपल्या प्रागल्भ्यतेच्या गुणानें, ह्या जगास तर थक्क करून सोडणें हा ज्याचा गुणच आहे कीं! आपण मात्र, कशाहि तऱ्हेनें (क्षोभाचे होणें ते तो करीत नाहीं, आपण तो) क्षोभाचा होत नाहीं. (८६०)

प्रौढपणा, उद्भटपणा, उत्कंठा, पूर्ण दशेस आलेला, धीट, पूर्ण, विवाहित अशा तेजास, ऐश्वर्यास, आलेला असा तो **दुसरा गुण** जाण. व धीरानें असणें गंभीरपणें असणें, असा हा जेथला **तिसरा गुण.** (८६१)

अहो आकाशही पण कोसळून वर पडले, तरी सुद्धां त्याचे मानस ते, ते कांहीं त्याच्या बुद्धिचें डोळे झांकीत नाहीं, तेथें बुद्धि डोळस राहाते असें ते ऐक जे येथें **धैर्य** म्हटले. (८६२)

अहो! पाणि हे (पाहिजे तितके खोल जरी असले) पाहिजे ते जिणौनि म्हणजे खालीच टाकून पद्म कमळ ते वर येते किंवा आकाश हे तर सर्वाहिपेक्षां उंच असल्यानें ते वाटेल त्या पदर्थासहीपण उंचीमध्यें जिंकते. (८६३)

त्याप्रमाणें नाना प्रकारच्या विविध स्थिति, अवस्था, दशा जरी पाहिल्या गेल्या पावल्या तरी सुद्धां त्या हे पार्था! जिंकून प्रज्ञा बुद्धि फळरूप जो अर्थ यशवंत, त्याला मार्ग का जसें मोती वेझ देऊन (छिद्र पाडून) हारामध्यें ओंवतात तेथें तंतूस मार्ग दिला होतो, तसें प्रवेश देणें जे तेथें सर्व प्रसंगातून बुद्धि आपला फलार्थ साध्य यशाचा करून घेते अशी जी दक्षता. (८६४)

असे जे तेंच चोख उत्तम असें दक्षत्त्व शहाणपणा चतुर असें जाण. असा हा **चौथा** गुण होय. आतां झुंझ जी लोकोत्तरतेची अद्भुत, अलौकिक अशी, तो **पांचवा** गुण होय. (८६५)

(आदित्याची म्हणजे) सूर्य फुलाची झाडे, केव्हांही तेथची त्यांची फुलें सूर्याकडेच सन्मुख अशी तोंडासमोरची अशी असणारी, तसें शत्रूपुढेंही सदा समोर होणे जें कांहीं. (८६६)

**माहेवणी प्रयत्नेसी। चुकविजे सेजे जैसी।**
**रिपु पाठि नेदिजे तैसी। रणांगणी॥ ८६७॥**
**हा क्षत्रियाचां आचारी। पांचवा गुणेंद्र अवधारी।**
**चहुं पुरूषर्थां सिरी। भक्ति जैसी॥ ८६८॥**
**आणि जालेनि फुले फळें। शाखिया जैसे मोकळे।**
**कीं उदार परिमळे। पद्माकरू॥ ८६९॥**
**नाना आवडीचेनी मापे। चांदणे भलतेणे घेपे।**
**पुढिलांचेनि संकल्पे। तैसे जे देणे॥ ८७०॥**
**ते उमप गा दान। जेथ साहावा गुणरत्न।**
**आणि आज्ञे येकायतन। होणे जे का॥ ८७१॥**
**पोसुनि अवेव आपुले। करविजति मानविले।**
**तेवि पाळणे लोपविले। जगा भोगणें॥ ८७२॥**

तया नाव ईश्वर भावो। जो सर्व सामर्थ्याचा ठावो।
तो गुणामाजी रावो। सातवा जेथे ॥ ८७३ ॥
ऐसे जे शौर्यादिकी। इही साते गुणी (गुण) विशेषी।
अलंकृत (सत्पुरूषी) सप्तऋषी। आकाश जैसे ॥ ८७४ ॥
तैसें सत्व गुणी विचित्र। हे सहज जाण (क्षेत्र) क्षात्र।
कर्म जे जगीं पवित्र। क्षत्रियांचे ॥ ८७५ ॥
नाना क्षत्री नव्हे नरू। तो सत्व सोनयाचा मेरू।
म्हणौनि गुण स्वर्गा आधारू। सातांहि यया ॥ ८७६ ॥
ना तरी सत्व गुणार्णवी। परिवारली बरवी।
हे क्रिया नव्हे पृथ्वी। भोगिताहै तो (हैतो) ॥ ८७७ ॥
का गुणाचा साते वोघी। हे क्रिया ते गंगा जगि।
तया महोदधीच्या आंगी। विलसत जैसी ॥ ८७८ ॥
परि हे बहु असो देख। शौर्यादि गुणात्मक।
कर्म गा नैसर्गिक। क्षत्री जातीसी ॥ ८७९ ॥
आतां वैश्याचिये जाती। उचित जे महामती।
ते आइक निरूती। क्रिया सांगो ॥ ८८० ॥

माहेवणी–माहेवती=जिला कांहीं महिने गेले आहेत अशी गरोदर स्त्री=रजस्वला! स्त्री, रिपुपाटी–रिपूपाठी. रणांगणि–समरांगणी. (८६७) क्षेत्रियाचा–क्षत्रियाचेया. गुर्णेद्र=मुख्य गुण (आचारी=चाकवत) (८६८) शाखिया=(शाखिन्=वृक्ष, वेद, वेद शाखेचा अनुयायी) वृक्ष. पद्माकर=सरोवर, कमळानी भरलेले. पद्मयुक्त तळे. (पद्म=कमल. आकार=समुह.) (८६९) पुढिलाचेनि संकल्पे=(दुसऱ्याच्या) याचकाच्या इच्छेप्रमाणें. देणे–जे देणे. (८७०) सहावा–सहावे. आज्ञे येकायतन=वेदाज्ञेस एकनिष्ट होणे. (८७१) पोसुनि अवेव–पोषुनि अवयव. मानवणे=मान डोलाविणे, मान्य करजें लोपविले–लोभविले. जगा–जग (८७२) नांव–नाम. जेथे–जेथ. (८७३) सातेगुणी–सात गुणे. विशेषी–विशेखी. सत्पुरूषी–सप्तऋखी (षी)=ध्रुवा–भोंवती फिरणारा तारकापुंज.

**सप्तरक्त**=तळहात, तळपाय, नेत्राचे कोंपरे, जीभ, ओठ, पडजीभ व नखे ह्या जागी रक्तवर्ण असा मनुष्य. **सप्तसमुद्र**=क्षार, क्षीर, दधि, घृत, इक्षुरस, मद्य व स्वादुजल यांचे सागर, **सप्तऋषी**= मरीचि, अत्री, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वशिष्ठ व याच नांवाचे ध्रुवाजवळचे सप्त तारे: सप्तधातु= रस, रक्त मांस, मेद, अस्थि, मज्जा, वीर्य. **सप्तमातृ**=ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही इंद्राणी व चामुंडा.] (८७४) सत्वगुणी–सप्तगुणी (दुसरा चरण) हे सहज जाण क्षत्र. क्षत्र–क्षात्र. (८७५) क्षत्री–क्षत्रिय. (८७६) सत्त्वगुणार्णवी–सप्तगुणार्णवी. परिवारली=वेष्टिलेली, आच्छादिलेली. भोगिता है तो भोगितसे तो. (८७७) गुणांचा साते–गुणांचे सातांहि विलसत–विलसे. (८७८) क्षत्र जातीस=क्षत्री जातीस (८७९) आईक ऐके. निरूती=यथार्थ. क्रिया=करणें, अभ्यास, प्रायश्चित्त, अंमलांत आणणे, शिक्षण, साधन, अध्यात्म, विद्या, विचार, पूजा इत्यादि धर्मकृत्य. (८८०)

ज्याप्रमाणें रजस्वला स्त्री, माहेवणी माहेवती म्हणजे जिला काही महिने गेले आहेत अशी गरोदर स्त्री ती तर शेजेस चुकवावीच; घेऊ नये; त्याप्रमाणें, रणांगणामध्यें युद्धस्थानाचें ठायीं–समरामध्यें, रिपूस पाठ देऊ नये–पाठ दाखवूं नयेच. (८६७)

क्षत्रियांच्या (आचारी म्हणजे वर्तणुक रीती व्यापारामध्यें) वर्तनामध्यें मुख्य गुण–अमच जाण; वर्तन नियमानें पांचवा गुण श्रेष्ठ जाण. हा जसा का चहूं पुरूषार्थाच्या–धर्म, अर्थ, काम, मोक्ष मस्तकी–भक्ती जशी पूज्य. (८६८)

फुलांचे कां फळाचें येणें झाल्यावर वृक्ष जसें मोकळे प्रशस्त (स्तुत्य प्रशंसनीय उत्कृष्ट शुभ) अथवा उदार (अशा दानशूर विपुल प्रभुत्व) सुंदर सुगंधानें, संभोगानें जसें का पद्मसमूह, पद्मयुक्त तळें तें कां कमलांनी भरलेलें सरोवर तें. (८६९)

अथवा आवडीच्या मापाने अतिशयतेने भलत्यानेही चांदणे घेणे होते ते म्हणजे दुसऱ्याच्या–पुढिलांच्या–याचकांच्या इच्छेप्रमाणें तसे ते देणे जे. (८७०)

असें तेंच विपुल असें दान समज, जेथें **सहावें गुणरत्न** शोभणारे तें तसेंच आज्ञा म्हणजे वेदाज्ञा जी तिजला एकनिष्ठ (एकायतन) होणें जें की. (८७१)

आपले अवयवच पोषण देऊन (पोसून) आपले केलेले जें कांहीं तें मान्य (मातविले) करवावें. (मानच डोलविणें करवावें (करवितात) मान्य करणें करविलें) जें कांहीं त्याप्रमाणें पाळणें. पाळणें तेंच मुळीं, कीं जगच भोगणें कां जगास भोगणेच एक, तेथें तेंच पालन जें त्यानें तर जगच की लोभविलें तें भोगण्यासाठीं कीं. (८७२)

त्यास ईश्वरभाव हें नांव आहे. असा हा भाव सर्व सामर्थ्याचा ठावच कीं, व तो गुण म्हणावा तर सर्व गुणामध्यें रावच एक असा सातवा जेथें आहे. (८७३)

येणेप्रमाणें असे जे शौर्य आदिकरून सत्पुरूषी–सात महत्त्वाच्या गुणी अलंकृतता–ह्या सात गुण विशेषांनी, सप्तऋषींनीच सप्तऋषीच्या ताऱ्यांनीं ते आकाश अलंकारले की. (८७४)

त्याप्रमाणें सत्वगुणामध्यें सप्तगुणांनीं विचित्र सहज क्षेत्री क्षात्र जाण–ह्या सात गुणामध्यें विचित्र अनेक रंगाचे असें आश्चर्यकारक कर्म जें जगामध्यें पवित्र मानलें आहे असें तें अगदीं सहजतेचें सहज क्षत्रियाचें क्षात्र जाण, क्षत्रिय जात जाण. (८७५)

अथवा चतुर्वर्णांपैकी दुसरा क्षत्री, क्षत्रीय तो कांहीं साधा नुसता नर मनुष्य नव्हे तो तर सत्वरूपी सोन्याचा मेरू पर्वतच एक आणि म्हणूनच ह्या अशा गुणरूपी स्वर्गास तो तर कीं अहो आधारच होय. (८७६)

अथवा सत्त्वगुणरूपी अर्णवासच सागरासच जिनें वेष्टिलें आहे. परिवाराची केली आहे अशी ही नुसतीच बरवी अशी ही योगक्रिया ती म्हणजे तो गुण तर पृथ्वीच भोगित आहे कीं, सात गुणरूपी सागरामध्यें उत्तम प्रकारें वेष्टिलेली गुंडाळलेली अशी ही एक नुसती क्रियाच नव्हें पण क्रियायोग की येथें तो तर सर्व पृथ्वीच कीं भोगित आहे. (८७७)

अथवा गुणाच्या साताही ओघांनी क्रिया हीच ती गंगा ह्या जगीं अहो त्या महान् अशा सागराच्या उदधीच्या आंगी शोभत आहे विलसत आहे. प्रकाशत आहे. ओघरूपी क्रियाच ती गंगा ह्या जगी महान् उदधीच्या आंगी शोभत आहे. (८७८)

पण असें हें बहु काहीं असो पण असें पाहा कीं, शौर्य आदिकरून जे (गुण स्वतःसंबंधीं) गुणात्मक सहज स्वाधीनता जिवंतपण नैसर्गिक का क्षत्री जातीस आहे कीं; क्षत्र जातीस नैसर्गिक कर्म तें शौर्यादि गुणात्मक कीं (८७९)

आतां यावर वैश्याचें जातीस यथार्थ तो उचित जी कांहीं क्रिया ती हे महामती आता ऐकण्याचें कर. (८८०)

**कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥**

कृषि = शेतकाम, नांगरणें. (कृष् = नांगरणे, ओढणें.) कृषीवल = शेतकरी. वाणिज्यं = व्यापार. (वाणी–ज्या = व्यापार. ज्या = धनुष्याची दोरी. ज्यायस् = वडील, स्वामी. वाणी = आवाज, वाचा, सरस्वति. वैश्य = व्यापार व शेती करणारा. परिचर्या = सेवा, उपासनी, आचरण. आत्मक–आत्मकीय–आत्मीय = स्वतःसंबंधी, स्वाधीन, जिवंत.

अन्वय :—स्वभावजं वैश्यकर्म कृषि । स्वभावजं वैश्यकर्म गोरक्ष्यं । स्वभावजं वैश्यकर्म वाणिज्यं । कर्म शूद्रस्य स्वभावजम् । परिचर्यात्मकम् । परिचर्यात्मकीय । परिचर्यात्मीय ॥ ४४ ॥

अर्थ :—स्वभावतः नैसर्गिक असें वैश्याचें कर्म तें शेतकाम (नांगरणें, इत्यादि) होय. स्वभावतः नैसर्गिक असें वैश्याचे कर्म तें पशुपालन जाण. स्वभावतः नैसर्गिक असें वैश्याचें कर्म तें व्यापार जाण. स्वभावतः नैसर्गिक असें शुद्राचें कर्म तें म्हणजे ब्राह्मण क्षत्रिय वैश्य सेवा [सेवा देवद्विज गुरुप्राज्ञ पूजनम्–उपासना–(आराधना) स्वामी सेवक संबंध भक्तियोग. आचरण देहे क्षेत्र शेत–काम, गोरक्षण, व्यापार इत्यादि–साधनानें आचरण वर्तन व्यवहारामध्यें वागविणें जें, व्यापारणें जे, असें हें पर्यायानेच कीं, ( ते तीन ब्राह्म क्षात्र व वैश्य) आले, ज्ञान भक्ति कर्म हे भले कर्म, भक्ति, ज्ञान. ] उपासना, आचरण, तत्संबंधीं तत्स्वाधीन तत्पर जिवंतपण होय. स्वतःसंबंधी । स्वतःचे स्वाधीन । स्वतःचे जिवंतपण । सेवा संबंधीचे उपासना स्वाधीन असें आचरण तत्पर. येथें ब्राह्मण क्षत्रिय वैश्य द्विजसेवा, म्हणण्याचें कारण असें कीं, अक्षर जें कांहीं तें अक्षर असें तें तिन्हीं वर्णाच्या शुश्रुषणानें येणारे म्हणून येथें सेवा वगैरे ते तिन्ही वर्णाचे होय. ' स ईश्वरोऽनिर्वचनीय प्रेमस्वरूपः ' स्व = आपला सजायतीय, आत्मा, ज्ञाति–धन, आपण–धन. ( श्लोक ४४ वा ८८१–८८५)

**तरीं भूमी बीज नांगरू । या भांडवलाचा आधारू ।**
**घेऊनि लाभ अपारू । मेळवणे जे ॥ ८८१ ॥**
**किंबहुना कृषि जिणें । गोधनें राखोनि वर्तणें ।**
**कां समर्घीची विकणें । महर्घी वस्तु ॥ ८८२ ॥**
**येतुलाचि ( येतुलालाचि ) पांडवा । वैश्यातें कर्माचा मेळावा ।**
**हा वैश्यजाति स्वभावा । आंतुल जाण ॥ ८८३ ॥**
**आणि क्षेत्री वैश्य ब्राह्मण । हे द्विजन्में तिन्ही वर्ण ।**
**यांचे जे सुश्रुषण । तें शूद्र कर्म ॥ ८८४ ॥**
**पै द्विज सेवे परौते । धांवणें नाही शूद्राते ।**
**एवं चतुर्वर्णोचिते । दाविली कर्मे ॥ ८८५ ॥**

भूमी–भूमि = या–यया. मेळवणे–मेळ बसविणें, (८८१) कृषिजिणे = शेतीवर निर्वाह करणें. समर्घीची–विकणे महर्घ (महार्घी) वस्तु = स्वस्त दरानें घेतलेली वस्तु महाग विकणें. महर्घ = (अर्घ = मोला; पूजा.) किंमत, सन्मान, (८८२) चतुवर्णाची ते–चतुर्वर्णोचि ते (८८५)

**जमीन, बी, नांगर, भांडवलावर फायदा मिळवून वस्तु स्वस्त दराने घेऊन अधिक किमतींत विकणे—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तिघेहि द्विज ह्यांची सेवा करणे हे शुद्राचे कर्म आहे.** (ओव्या ८८१–८८५)

भूमि म्हणजे बीजप्रसू-(स्थावर मिळकत आसन, विषय, मर्यादा, देशस्थान जागा) जमीन (पृथ्वी) बीज (मूळ कारण, धान्य, सत्य, स्थान, तत्त्व.) व नांगर ह्या तीन भांडवलाचा आधार घेऊन अपार असा लाभ मिळवा. (जमेस घ्यावा मिलाफ ऐक्याचा करावा, समाज, संयोग जमवावा)-मेळवावा असें जे कांहीं काम तें. (८८१)

अहो, बहुत काय पण कृषि, शेतकाम, नांगरणें, (ह्यानींच मुळीं हे जीवित जिणें, जगणें, जिवंत असणें) हेंच स्वतःच्या निर्वाहार्थ आश्रयणें-तसेंच गोधन म्हणजे [जाड्या टोंकाचा बाण, ऋद्धि (व.)] गोसमूह [गो=पशु, बैल, गाय, गो म्हणजे (असाही अर्थ जाणावा.)=आई, दिशा, पृथ्वी, गाय, वरुणपुत्राचा सेनापति, मार्ग, अग्नि, चंद्र, सूर्य, इंद्रिय, केस, डोळा, उदक, बाण, वाचा, वाणी, किरण, आकाश स्वर्ग. **समूहनी**=केरसुणी. समूहाः=यज्ञाग्नि भेद, यज्ञकुंडविशेष. **समूहनं**=(१) गोळा करणें. (२) वैपुल्य. (३) स्वच्छ करणें.] समुदाय, कळप, राखून, सांभाळून, काळजी घेऊन राखावा, जमीनीची मशागत करणारा जो त्यानें ह्याना राबवून जमीन पिकवून उदरनिर्वाह करावा. (वृत्ति, धंदा करणारा, कृषीनें जगणारा, राहाणारा, असणारा, (वर्तनि=पापणी, स्तोत्र, आयुष्य, रस्ता, मार्ग.) वागणारा, नेट धरणारा, शत्रूस तोंड देणारा, तसेंच, मध्यम, योग्य, एका काळी बरोबरीच्या मोलानें, स्वस्त दरानें विकत घेतलेली वस्तू महाग दरानें महत् मोलानें (महत् पूजा किंमत, सन्मान घेऊन) विकणें जें अशा तऱ्हेनें जगणारा, पहाणारा असणारा=कृषिजिणे. (८८२)

हे पांडवा! एवढाच काय तो ह्या वैश्यास कर्माचा संयोग, जमाव, मिलाफ, ऐक्य, जम हा हाच मुळीं, वैश्य जाति आतील स्वभावासच प्रकृतीसच वैश्याच्या सहज कर्मासच काय तो शोभविणारा का भूषविणारा असा जाण. वैश्य जातीच्या स्वभावा आंतील असा हाच वैश्यास कर्माचा मिलाफ जाण. (८८३)

वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मण असे हे तिन्ही वर्ण, द्विजन्मे होत व या तिन्हीं वर्णाचें जें कांहीं शुश्रूषण शुश्रूषणं -हेच तर मुळीं अगोदरचें तें क्षत्र-'क्षतात् त्रायते' असौ सः-असें असल्यानें, तेथें अगोदरच मुळीं एकदां घाव अंगावर यावा, बसण्यावरच तें सेवेचें महत्व असेंच होय पण प्रसंग अनेक व्यवहार करणारी ती "सा ईशते-सरस्वती वाणी" अशी ती सेवा चातुर्याचे अनेक प्रकार पुढें करून ह्या मनुष्य सृष्टीस आपलें उदार भावाचें तें अंग दर्शविते. येथें संचयच कीं, अहो सेवा चातुर्याचा [शुश्रूषणं (णा)=ऐकण्याची इच्छा, सेवा, शुश्रु=आई, शुश्रूषकः=सेवक. शुश्रुषा=श्रवणेच्छा, सेवा, उपासना शुश्रुषु=आज्ञांकित, ऐकूं इच्छिणारा.] तेच मुळीं-मूळ-प्रकृतीवरच मुळीं भूत सृष्टीचें जें कांहीं उभें होणे. मनुष्य धर्म, आदर आतिथ्य, गौरव आदरानें, असणें तेंच मुळीं, सेवा उपासना व आचरण ह्यांनींच योग्य करावें असें असल्यानें तेथें स्वाभाविकपणेंच तें द्विजन्माचें देहामधील का प्रकृतीचे जे अंग तेंच सृष्ट झालें असें एक सहज स्वभावाचे होय. येथें आतां हें पर्यायानेंच आलें कीं ते गुण हे सृष्टीमधील व्यक्ति वाचकाने दाखविले असल्याने असेंच म्हणणें झाले कीं, ही लोकरचना वर्णव्यवस्था ही आपल्या, सुघटनेची ती, तीच मुळीं ही देहधारणाच कीं, मनुष्य देहच कीं एक अशीं असल्यानें तेथें तसें तें सेवा आदि करणें, असें म्हणणें तरी काय कसचें पण आज्ञा हींच मुळीं, कल्याणच पुढें घेऊन आज्ञाधारकपणाची असल्यानें शिकवणच ही एक तेथें शिस्तच एक तेथें प्रगतीच्या आड येणारे जे प्रतिबंध तेंच आवरलें होतात कीं-शूद्र कर्म कीं-शूद्र बुद्धीची शुद्धी (अगोदर सर्व प्रकृतीच विकारली तेथें मग ज्ञानदानाचें बुद्धिदानतेचें दारिद्र्यच एक ते कसें फेडावें! तेथें कठिणपण-दुराग्रह, अभिमान, आग्रह, असे अनेक दोष ते ह्या मनुष्य धर्मासच पुरूष धर्मासचमुळीं, तेथें सर्वथैव प्रकृतीच भजली असें झाल्यानें तेथें विकाराचें तें प्रकृतींचें आंग तेंच मुळीं भलतीकडेसच जातें म्हणून येथें शुद्धतेस येणें, बुध्दीच्या शुद्धीस पाहाणें तेंच की एक महत्व मान्यतेचें तेथें शुद्ध असे परब्रह्मच एक कीं तें

व्यक्तिवाचकतेनें व्यक्ति व्यापकत्वावर कसें मनाच्या का स्वभावाच्या दिलदारीनें उभें होते तेंच अभ्यासिलें होतें, वापरण्याचें होतें. (८८४)

यावर आणखी असें तें आहे की अहो मग सहजच असें म्हणणें झाले की, द्विजसेवेपलीकडे शूद्राची धांव ती कशास ? मनुष्यच सेविला, शोभविला तेथें सेवेशिवाय दुसरें कांहींहीं नसतें, दुसरी ओढ नसावीच कीं, तेथें मग दुसरें कांहींकडे, (नसावी) शूद्राचे धांवणें होत नाहीं. याप्रमाणें चाऱ्ही वर्णांची ती कर्मे दाखविली. (८८५)

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**

स्वे=आपल्या, स्वे स्वे=आपआपल्या. [स्व=स्वतःचे स्वाभाविक, स्वजातीय, आपण, ज्ञाति भाऊबंद नातलग, आत्मा, धन, स्वभाव] अभिरतः=क्रिडा करणें रममाण होणे. सुख-आनंद पावणें संसिद्धिम्=सिद्धि, प्राप्ति, फळ, स्वभावसिद्ध प्राप्ति, परिपक्वता, इष्ट वस्तूची प्राप्ती, स्वभाव, मोक्ष, कर्म पूर्ण होणें, कर्म शेवटास जाणें. स्वकर्मनिरतः=स्वतःच्या सजातीय, आपल्या, कर्मामध्यें आसक्त, कामांत गुंतलेला, व्याप्त. विंदति सिद्धिं यथा=मानणें, अनुभवणें, जाणणें, ज्ञाता, आस्था, ज्याप्रमाणें, दैवीशक्ति अन्वर्थक : तत् श्रृणु=ते ऐक. (श्रु=जाणें, ऐकणें, आज्ञा पाळणें, शिकणें, सेवा करणें, शुश्रुषा करणें.)

अन्वयः—नरः अभिरतः । स्वे स्वे कर्मणि । संसिद्धिं लभते । स्वकर्म निरतः । सिद्धिं यथा । विंदति । श्रृणु । तत् ॥

अर्थः—मनुष्य आपल्या स्वाभाविक, (आपआपल्या,) सजातीय कर्मामध्यें, (अभिरतः) सुख मानणारा, (पावणारा, क्रीडा करणारा, रममाण होणारा) झाल्यानें (संसिद्धि) स्वभावसिद्ध प्राप्तियोगें मोक्ष पावतो. आपल्या कर्मामध्यें रत राहिल्यानें मोक्ष सिद्धि, जशी कां एक प्राप्त होणारी ती कशी, ते त्याबद्दल आतां सांगतो ऐक. (श्लोक ४५ वा ओव्या ८८६–९०६)

**आता येचि गा विचक्षणा । वेगळालिया वर्णा ।**
**उचित जैसे करणा (कर्णा) । शब्दादिक ॥ ८८६ ॥**
**नातरि जलदच्युता । पाणिया उचित सरिता ।**
**सरितेसि पांडुसुता । सिंधु उचित ॥ ८८७ ॥**
**तैसे वर्णाश्रमवशे । जे करणीय आले असे ।**
**गोरया अंगा जैसे । गोरेपण ॥ ८८८ ॥**
**तया स्वभाव विहित कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा ।**
**प्रवर्तावयालागी प्रेमा । अढळ कीजे ॥ ८८९ ॥**
**पै आपुलेचि रत्न थिते । घेपे पारखियाचेनि हाते ।**
**तैसे स्वकर्म आपैते । शास्त्रे करावे ॥ ८९० ॥**
**जैसी दिठी असें आपलां ठाईं । परि दिपेविण भोगु नाही ।**
**मार्गु नव्हता काहि पाई । असता होय ॥ ८९१ ॥**
**म्हणोनि जातिवशे साचारू । सहजे असे जो अधिकारू ।**
**तो आपुलां शास्त्रें गोचरू । आपणया किजे ॥ ८९२ ॥**
**मग घरीचाचि ठेवा । जेवि डोळा दावी दिवा ।**
**तरि घेता काई पाण्डवा । अडळु असे ॥ ८९३ ॥**

तैसे स्वभाव भागा आले। वरी शास्त्रेही खरे केले।
तेवि हित (ते विहित) जे आपुले। आपरे गा ॥ ८९४ ॥
परि आळसु सांडुनि। फळकामु दवडुनि।
आंगे जीवे मांडुनि। तेथेचि भरू ॥ ८९५ ॥
वोघी पडिले पाणि। नेणे अनानी वाहाणि।
तैसा जाय आचरणि। व्यवस्छौनि ॥ ८९६ ॥
अर्जुना जो यापरी। ते विहिते कर्मे स्वये करी।
तो मोक्षाच्या ऐलद्वारी। पैठा होय ॥ ८९७ ॥
जे अकरण आणि निषिध्दा। न वचेचि कहि सबंधा।
म्हणौनि भवा विरूध्दा। मुकला तो ॥ ८९८ ॥
आणि काम्य कर्माकडे। न परतेचि जेथ कोडे।
तेथ चंदनाचे खांडे। न लभेचि तो ॥ ८९९ ॥
येर नित्य कर्म तंव। फळत्यागे वेंचले सर्व।
म्हणौनि मोक्षाची सिंव। ठाकु लाहे ॥ ९०० ॥
ऐसेनि शुभाशुभ संभारि। सांडिला तो अवधारि।
वैराग्य मोक्षद्वारि। उभा ठाके ॥ ९०१ ॥
जे सकल भाग्याची सिमा। मोक्ष लाभाची प्रेमा।
नाना कर्ममार्गश्रमा। शेवटु जेथे ॥ ९०२ ॥
मोक्ष फळे दिधली वोल। जे सुकृत तारूचे फळ।
तये वैरागी ठेवी पाउल। भंवरू जैसा ॥ ९०३ ॥
पाहे आत्मज्ञान सुदिनाचा। वाधावा सांगत अरूणाचा।
उदो तया वैराग्याचा। ठावो पावे ॥ ९०४ ॥
किंबहुना आत्मज्ञान। जेणे हाता ये निधान।
ते वैराग्य दिव्यांजन। जिवे ले तो ॥ ९०५ ॥
ऐसी मोक्षाची योग्यता। सिध्दि जाय तया पांडुसुता।
अनुसरोनि विहिता। कर्मा यया ॥ ९०६ ॥

येचि-इयेचि. कर्णा-करणा = कर्ण आदि इंद्रियांना शब्दादि विषय जसें योग होत. जलदच्युता = मेघापासून सुटलेल्या. (८८६) गोरया-गोरेया. विहित-विहिता. प्रेमा-प्रमा = बुद्धि, सिद्धांत. (८८९) थिते = मूळचे, असलेले-स्थित, अपैते-आपैते = वश, आपलेसे = करावे. आपुला-आपुलिया. (८९०) नव्हता- न लाहता. कहि पाई- कांहि पाय. (८७१) सहजे-सहज. जातिवशे-ज्ञातिवशे, आपुला-आपुलालिया. आपणया-आपण. (८९२) डोळा-डोळया. काई-काय. अडलु-अडळू = आडवणारी, प्रतिबंध? (८९३) जे-जो. तेवि हित-ते विहित. (८९४) भरू = आदर, भर. (८९५) अनानी-आनानी (= भिन्न मार्ग), व्यवस्छौनि = यथाशास्त्र. (८९६) विहिते कर्मे-विहित कर्म. ऐल द्वारी पैठा-ऐल तिरी पैठा = स्वधर्माचरणानें मनुष्याला (भावाच्या भाषेंत म्हणजे) संसिद्धि म्हणजे ज्ञाननिष्ठा, योग्यता प्राप्त होते. प्राप्त होते म्हणजे साक्षात् प्रगटतेनें ज्ञाननिष्ठा किंवा मोक्ष मिळत नाही, मोक्षाचे द्वार जे वैराग्य तेथें हा पोहोचतो. पैठा होय = प्राप्त होतो. (८९७) अकरण-अकरणा. सबंधा-संबंधा. (८९८) चंदनाचे खांडे-चंदनाचेहि खोडे = प्रतिबंध पत्करत नाहीं, आपलासा केला होत नाही. लभे-लेचि. (८९९) वेंचले -वेचिले : सिव-शिंव = ठाकूलाहे = सीमेवर जाऊन पोहोचतो. (९००) संभारि-संसारी. (९०१) प्रेमा-

जे प्रमा=सिद्धांत बुद्धि. जेथें–जेथ. (९०२) भंवरू–भ्रमर तारूचे–तरूचे. (९०३) पाहे–पाही. सांगत–सांगतया. उदो–उदयो. वाधावा=शुभवार्ता. (९०४)

**श्रवणादि निरनिराळ्या इंद्रियांना शद्बादि वेगवेगळे गुण शोभतात. मेघवर्षावाच्या पाण्यास नदी योग्य–नदीस समुद्र योग्य; तद्वत् वर्णांना सजविणारी निरनिराळी कर्मे करितां वर्ण व आश्रम धर्मप्रमाणें जें कर्म प्राप्त होणारें तें तें जसें का गौरवर्ण माणसास गौरवर्ण शोभतो तसें असतें. म्हणून प्रमा–बुद्धि स्थिर ठेवावी–स्वाभाविक कर्मे शास्त्राज्ञेप्रमाणें करण्यास कीं मूळचें आपलेंच तें रत्न तें रत्नपारख्याचे हातून पारखून घ्यावें तसें कर्म आपलें तें शास्त्राकडून ठाम–आपैते करून घ्यावें. दृष्टी जेथच्या तेथेंच आहे पण दिव्याशिवाय तिचा काय उपयोग ? तेथें भोग होत नाहीं–आपला योग्य अधिकार प्रेम जाति वशें करून खरा धर्माज्ञेला अनुसरून असेल तो शास्त्र पाहून ठरवावा मग आपल्या घरांत असलेला अंधारांतील ठेवा दिव्यानें दाखविला तर तो कां घेऊ नये ? तेथें प्रतिबंध तो कसचा तसें स्वाभाविकपणें अंगास वांट्याला आलेले शास्त्रानें निश्चित केलेले आपलें विहित कर्म जो आचरतो.** ओव्या ८८६–९०६

आतां याप्रमाणें वेगवेगळ्या वर्णांच्या, हे विचक्षणा अर्जुना–नैपुण्य, (कुशलत्व विद्वत्तेनें दूरदर्शीपण (विचक्षस्=अध्यापकत्व, गुरुत्व, अध्यापक, गुरु.) प्राप्त होते. ज्याप्रमाणें कर्ण आदिकरून इंद्रियांना त्याचे ते ते विषय–येथें शब्दादिक हें देणें उचित असें योग्यच कीं, जसें. (८८६)

अथवा असेंही म्हणू कीं, पावसाचे मेघापासून सुटलेले जें पाणि तें नदीस मिळावें हेंच योग्य होय. व सरितेनें म्हणजे नदीनें सिंधूस मिळावें हेंच केव्हांहि उचितच (स्वाभाविक स्तुत्य, रम्य, स्वाधीन केलेले असेंच ) योग्य होय नां ! (८८७)

त्याप्रमाणें वर्णांच्या आश्रमवशतेनें जें जें कांहीं करणीय शरीर प्राप्त झालें आहे तेथें धंदा कारण हेतू, (योगासन विशेष हावभाव नानाप्रकार) साधन करणें जें कांहीं आलें असेल तें असेंच म्हटले कीं, जसें कां गोरे आंग आहे ज्याचें त्यास गोरेपणच एक पोहोचतें केलें. (८८८)

अशा त्या प्रकृति मूळधर्म सहज कर्मास विहित योग्य–कर्मानेंच, निर्माण केलेलें, दिलेलें, ठेविलेलें ठरविलेलें, शास्त्रोक्त, दैवच एक, नियमच कीं, ते शास्त्राच्या मुखानें, हे वीरोत्तमा ! अर्जुना !! प्रवर्तण्यासाठीं –पुढेंच आणें, (चालणे, घडणें, चालूं असणें, प्रवृत्त होणे आरंभ, यत्न करणें, वागणें, प्रचारांत आणणें, प्रेरणेस घेणें चालूं ठेवणें) जें तेथें प्रेमा–प्रीती (स्नेह, दया, क्रीडा, आनंद, अथवा) प्रभा म्हणजे (जेथें प्रमाथीनि अशी जी इंद्रिये उच्छृंखल असतात तेथें) बुद्धि ती अढळ स्थिर करावी कीं. (८८९)

अहो, आपलेच मूळचे हजर असलेले स्थित असें रत्न=(सत्यवचनी, सद्गुणी, पूज्य, स्थिर, निश्चितपणें) निश्चयेंकरून पाळणें. तें तर रत्नपारखि जो आहे, रत्नपरीक्षा करणारा जो आहे, त्याच्या हातानें म्हणजे त्याजकडूनच कीं, घेऊन अंगावर घालणें (जसें पेहनणें लेणे) होतें. त्याप्रमाणें स्वकर्म जें तेंच शास्त्राच्या आधारानें, यथाशास्त्र, आपलेसें करावें, तें वश करावें. (८९०)

हें कसें म्हणशील तर जरी दृष्टी ही आपल्याच ठिकाणी आहेच आहे पण दिवा असल्याशिवाय तिचा काय उपयोग? कारण तेथें भोग तो मिळणारा होत नाहीं. अहो ! मार्ग जर नच सांपडला तर पाय असूनही काय उपयोग असें म्हणणें होतें. (८९१)

असें आहे म्हणून ज्ञातिवशेकरून [ (ज्ञाति=बाप, सगोत्र नातलग,) आज्ञाधारकपणा, नम्रपणा,

ताबेदारी] ज्ञातीच्या सेवकपणानें, (ज्ञातीच्या आज्ञेत राहाण्यानेंच खरेपणाचा असा सहज) जो कांही अधिकार येतो तो शास्त्राकडून गोचर असें निश्चित आपण करून घ्यावें. (८९२)

असें केल्यानें तो एक आपल्याच घरचा ठेवा तो जर दिव्यानें दाखविला तर तेथें मग तो ठेवा घेण्यास काय कोणी कांही प्रतिबंध करणारा नाहींच. (८९३)

त्याप्रमाणें सहज स्वभावेंकरूनच जें कांहीं आपल्या भागास वांट्यास का हिश्यास आलें आहे, याहीवर अहो शास्त्रानेंहीपण खरेखुरेच कीं असें जें केलें आहे तें आपलें विहित योग्य-कर्मानेंच निर्माण केलेले ठरविलेले दैवच कीं जो आचरतो-भोगतो-त्यात व्यवहारतो. (८९४)

पण येथें एक मात्र करावें कीं आळसास पाहूं नये. आळस सांडावा-मुळींच आळस करू नये-फळाची इच्छा दडवावी, सोडावी, (पाप, पुण्य, भोगण्याचें स्थान-, जें कांहीं एक फळाची इच्छाच करून असणें नेहमीं भोगरूपी फळच मिळावें असा कामुक स्वभाव सांड. फळच एक मिळावेंच मिळावें एवढेंच नेहमींच्या नेहमीं जे कांहीं इच्छिणें पुढें घेऊन असणें ते मात्र करूं नये. ते सांडावें-सोडावें-पण, तेथेंच कीं, अहो, आपला सर्व भार अंगानें, जीवानें, मनानें, तेथेंच योग्य योग्य होण्याकडेच-त्या योग्यतेमध्येंच कीं, आदराचा असा, भराचा मांडावा, करावा, तेथेंच भर आदर देऊन असावें. (८९५)

अहो, पाणी ओघामध्यें पडलें. प्रवाही लागलें तर तें कांहीं अनेक जरी दुसरे अनेक मार्ग वाहाण्याचें असलें-प्रवाहास लागणारें असलें तरी तें पाणी कांहीं मग त्या दुसऱ्या भिन्न मार्गास पहात नाहीं. त्याप्रमाणें यथाशास्त्र व्यवस्थेचें करून, व्यवस्थेनें असावें व आचरण ते वागणूक व्यवहार वर्तन अशीं यथाशास्त्र वागणीच तीं व्यवस्थित करीत असावींत. (८९६)

हे अर्जुना ! जो याप्रमाणें तें ठरविलेलें योग्य उचित, कर्मानेंच निर्माण केलेलें, ठरविलेलें दैवच कीं, एक तें स्वतः आपण जो करतो, तो तर स्वधर्माचरणानें भाव्य का भाष्य जें त्याच्या भाषेतच मुळीं बोलण्याचें तें कसें म्हणावें तर ज्ञाननिष्ठा योग्यता प्राप्त झाली असें होय. पण **येथें प्रत्यक्ष साक्षात् का प्रगट असा मोक्ष** (किंवा ज्ञाननिष्ठा म्हणजे ज्ञानोत्तर भक्ति) **हा कांहीं मिळत नाहीं. पण वैराग्य जे मोक्षाचे द्वार आहे तेथें मात्र हा पोहोचतो, तेथें प्राप्त होतो.** (८९७)

आतां येथें अकरणा-अकरण म्हणजे स्वाभाविकतेचें जें कांहीं कां परब्रह्मच एक त्यास आणि निषिद्धा (काटे रिंगणी जशी कां) विधीच्या उलट मनाईचे, बंदीचें, नकाराचें असें जें कांहीं तेथें देहसबंधी जी बुद्धि साह्य असलेली, (देह) बुध्दि तेथें मात्र तो मुळींच ती देहबुद्धि पाहाणारा होत नाही, पाठीवर वाहून असत नाहीं आणि म्हणूनच कीं भव म्हणजे संसार जो नेहमीं विरुद्ध चालणारा तो मात्र त्यास केव्हांहीं विरुद्ध न होता तो अधिकार त्या संसारभयापासून मात्र सुटतो. (८९८)

तसेंच काम्य कर्म जे त्याकडेसच मुळीं, कांहीं कोड कौतुकच करावें असा तो मुळींच देहबुद्धिवर परत येत नाहीं, असा जो तेथें तो तर चंदनाच्या (खांड-तुकडा, समुदाय, मोडके, अर्धे) खोडानें जो कांहीं एक अटकाव, बंधन, वेढा, मनोभंग, संबंध, संलग्नता, अथवा प्रतिबंध करण्याचा होतो तो प्रतिबंध तर तो मुळींच पत्करत नाहीं तो प्रतिबंध तो आपल्या अंगावर घेत नाहीं. (८९९)

दुसरें जें कांही नित्यकर्म तें तर फळल्यामुळें सर्व कांहीं योजिलें गेलें, खर्च केलें होतें; आणि म्हणूनच कीं, तो एका मोक्षाचीच कीं शीव पाहूं लागतो-मोक्षाच्या हद्दीवरच सीमेवरच तो जाऊन पोहोचतो कीं. (९००)

अशा तऱ्हेनें शुभ (सुंदर, रास्त, इच्छा, तेजस्वी, कल्याणकारक) म्हणा का अशुभ (अमंगळपणा, पाप, संकट, पीडा) म्हणा अशा या संभारामध्यें (संभारानेंच) संग्रहानेंच, सामुग्रीनें, तयारीनेंच कीं,

सांडला कां सोडला होतो, असें जाण व मग तो तर वैराग्यरूपी मोक्षाच्या दारामध्यें उभा झाला, असें होतें. वैराग्य मोक्षाच्या द्वारीच कीं, तो उभा होतो. (९०१)

असें तें वैराग्यरूपी मोक्षद्वार, जेथेंच मुळीं हा उभा झाला आहे, तें तर वैराग्यरूपी मोक्षद्वारच कीं, सर्व भाग्य, भोग, योग-सीमाच कीं एक. मोक्ष मोक्ष अहो असा जो मोक्ष मार्ग तेथीलची प्रीती, स्नेह, दया क्रीडा आनंद (प्रेमापातनं=प्रेमाश्रुः डोळा: प्रथम दर्शन) लाभ सिद्धांत इंद्रिये ही उच्छृंखल असतात म्हणून, बुध्दी हीच सिद्धांताप्रत आणावी येथें बुध्दि सिद्धांत तोच कीं, अहो, मोक्षास पोहोचण्यासाठीं जे कांहीं अनेक मार्ग म्हटलेले त्याच्या तेथीलच्या कष्टाचा आयासाचा मेहनतीचा आश्रमांचा, येथें शेवटच झाला कीं. [अध्याय २ श्लोक ५९, ६०, ६१-निराहारी पुरूषाचें विषय सुटतात पण त्यातील **आवड म्हणजे रस किंवा वासना** रहातेः ती पर म्हणजे श्रेष्ठ असें जें ब्रह्म त्याचे दर्शन झाले म्हणजे सुटते नाहींशी होते (श्लोक ५९ अ. २) अर्जुना उच्छृंखल करणारी ही बलवान इंद्रियें त्याग करणाऱ्या विद्वानाच्याहि मनाला बलात्कारानें ओढून नेतात (श्लोक ६० अ. २) म्हणून बुद्धियोगानें बुद्धियोगयुक्त होऊन इंद्रिये उत्तम प्रकारें आपल्या ताब्यांत ठेवावींत व मजमध्येंच मन स्थिर करावें (मन बुद्धि मिश्रब्रह्म) ज्याची इंद्रियें वश झाली आहेत त्याचीच बुद्धि स्थिर राहातेः त्यासच स्थित-प्रज्ञ म्हणतात. (श्लोक ६१ अ. २) (९०२)

आतां मोक्षरूपी फळानें जिव्हाळा दिला, ओलावा आला, असा हा जिव्हाळा तर सुकृतरूपी तारूचे नौ-नौका-नाव कां तरूचे-झाडाचे फळच एक, अशा त्या वैराग्यामध्येंच (वैरागिन्=विरक्त) कीं आपले पाऊल तो ठेवतो-तें ठेवावें, जसा कां भ्रमर (भ्रमरास मधु चाखण्यास मिळाला, तेथेंच तो वास करून असतो जसा) मनाचे प्रसन्नपण घेऊन आहे, व आता ह्या फुलावरून त्या फुलावर जाणें हे संपले. विरक्त असा तो तेथेंच वसतो. (९०३)

आत्मज्ञानरूपी-ब्रह्मज्ञानरूपी सुदिन उगवला तो की अहो अरुणोदयाचा (अरुण=गरूड, रथ, घोडा, साप, पक्षी, सोने, विष्णु, रसांजन परब्रह्म) रसांजनाचा उदय झाला आहे, अशी शुभवार्ताच एक सांगणारा होतो-उदो-उदयच कीं त्या वैराग्याचा झाल्यानें, वैराग्य तें ठावाचें झालें-मोक्षच प्राप्त झाला. (९०४)

बहुत काय लिहुं, पण ब्रह्मज्ञान तें हें, ज्या ब्रह्मज्ञानेंकरून हातासच ते मोक्षरूपी निधान येतें असें, वैराग्यच (दिव्यांजन असें अथवा,) देवकोटीतील प्राण्याचें तें स्वर्गीय दिव्य अंजनच, काजळच तें, डोळयामधेंच कीं अगदी जीवेप्राणेंकरून लेऊन असतो. [अंजन=नेत्रात घालण्याचे औषधी द्रव्य, अग्नि, काजळ, सुरमा. अंजनाद्रि=नील पर्वत. अंजनी=उटणी लाविलेली स्त्री.] (९०५)

हे पांडुसुता! अशी मोक्षाची ती योग्यता हुशारी लायकी पवित्रता तीच त्यास सिद्धीची होते, मोक्षसिद्धिची होते-दैवी शक्तीची होते पूर्ण ज्ञानाची होते: असें हें कशामुळें तर ह्या विहित योग्य, शास्त्रोक्त ठरविलेल्या कर्मास अनुसरूनच कीं, पाऊलावर पाऊल ठेवून मागून जाण्यानें, आचरण्यानेंच कीं! अशा रीतीनें विहित कर्मे करणाराला मोक्षप्राप्ति होते. (९०६)

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥**

यतः=ज्या विहित कर्मापासून अनादि प्रवृत्ति (प्रगतिः, प्रवाह, वर्तन, उद्योग) उत्पत्तिरूप परमात्म्यापासून-कर्म ते परमात्मरूप म्हटलें. प्रवृतिः=पुराणा प्रजनन धर्म, पुराणी अशीं जी प्रवृत्ति-स्वाभाविक कर्माचरण, अनन्य, ओलावा जो उत्पत्तीसंबंधी. भूतानाम्=प्राणिमात्राची-भूतमात्राची-मनुष्यमात्राची-चराचर सृष्टीची. इदं सर्वं येन ततम्=ज्या वृत्तीवरच हे जग चाललें आहे-समभावन, ज्यानें हें सर्व जग व्यापलें आहे, यच्चयावत् हें सर्व जग. (तत्=पिता, पुत्र, वायु, तंतुवाद्य, व्याप्त,

विस्तृत, ताणलेले,) स्वकर्मणा = आपल्या सहज स्वाभाविक कर्माच्या योगानें. तम् = । सः । तौ । ते । अशा त्या सहबीजास, सर्वेश्वरास त्या 'स'काररूप शक्ति, बीजास व'ह्'काररूप पुरुषबीजास = सहज प्रकृति पुरुषास. अभ्यर्च्य = पूजिलें, अर्चिलें असतां सत्काराचें केलें असतां, (अभि = सर्व बाजूनीं, स्वतंत्र, श्रेष्ठ, आंत, उद्देशून, प्रत्येकी. ) मानवः सिद्धिं विंदति = मनुष्य सिद्धि मिळवितो. सिद्धी पावतो, मानतो, अनुभवितो, जाणतो.

अन्वय :—भूतानां प्रवृत्ति यतः । इदं सर्वं ततम् येन । तम् अभ्यर्च्य स्वकर्मणा । मानवः सिद्धिं विंदति ॥ ४६ ॥

अर्थ :—(१) प्राणिमात्रांची जेथून कर्म प्रवृत्ति होते, हें सर्व ज्यानें व्यापिलें आहे त्यास आपल्या स्वाभाविक कर्मांनीं अर्चिलें, पूजिलें असतां मनुष्यास सिद्धि पावते.

(२) अनन्यपणाचा जिव्हाळा, ओलावा असें जें, ज्या विहित कर्मापासूनच मुळीं, प्राण्याची प्रवृत्ति उत्पत्ति होते, ज्या विहित कर्मासच प्रजनन उत्पत्ति म्हटलें, अशा त्या अनादि स्वाभाविकच प्रवृत्तीसच मुळी विहित कर्मांनीं विहिताचरणानें अभ्यर्चिलें (पूजिलें अभ्यंगस्नानादिनीं) असतां मनुष्य सिद्धि पावतो.

(३) सर्व भूतांची उत्पत्ति ज्या परमात्मापासून झाली आहे– ज्यानें हे सर्व जग व्यापलें आहे, त्या परमात्म्याची पूजा आपल्या स्वाभाविक कर्माच्या योगानें केली असतां, मनुष्याला सिद्धि मिळते. येथें आतां स्वाभाविक कर्म हेंच कीं परमात्मा म्हटलें. तेथेंच अनन्यपणाचा जिव्हाळा, तोच मुळीं सर्वेश्वर पूजनाचा म्हटला कीं, सेवाच की ती–, परमेश्वरच, तेथें त्या स्वाभाविक कर्मामध्यें वागणारा त्या मनुष्यरूपानें.

(४) ज्या उत्पत्तीवरच, प्रगतीप्रवाहानेंच भूतमात्रानी जीवप्राण्यांनीं चालणें होत आहे, जिनें हें सर्व कांहीं व्यापिलें आहे. ताणलें आहे, जिचा विस्तार फैलावा विशालतेचा विस्तृत आहे. (ततामह = पितामह) तिजला आपल्या स्वाभाविक कर्मांनीं पूजिलें, सत्कारिलें असतां मानव [ म्हणजे मनुचे (प्राणी)] सिद्धि पावतो, मानतो, अनुभवतो, जाणतो. (श्लोक ४६ वा ओव्या ९०७–९१३)

**हे विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य ओलावा ।**
**आणि हेचि परम सेवा । (मज) सर्वात्मकाची ॥ ९०७ ॥**
**पैं आघवाचि भोगेसी । पतिव्रता क्रीडे प्रियासी ।**
**कीं तयाचि नांव जैसी । तपें तिया केली ॥ ९०८ ॥**
**कां बाळका येकी माये । यांचोनि जिणे काहि आहे ।**
**म्हणोनि सेविजे कीं तो होये । पाटाचा धर्मु ॥ ९०९ ॥**
**नाना पाणि म्हणौनि मासा । गंगा न संडिता जैसा ।**
**सर्व तीर्थ सहवासा । वरिपडा जाला ॥ ९१० ॥**
**तैसे आपुलालिया विहिता । उपवो असे न विसं(बि)मिता ।**
**ऐसा कीजे की जगन्नाथा । आभारू पडे ॥ ९११ ॥**
**अगा जया जे विहित । ते ईश्वराचे मनोगत ।**
**म्हणोनि केलया निभ्रांत । सांपडेचि तो ॥ ९१२ ॥**
**पै जीवाच्या कसी उतरली । ते दासी की गोसाविणी आली ।**
**शिसे वेचितया मोविली । वही जेवि ॥ ९१३ ॥**
**तैसे स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हे परम सेवा ।**
**येर ते पांडवा । वणिज (वणिज्य) करणें ॥ ९१४ ॥**

म्हणौनि विहित क्रिया केली । नव्हे तयाची खुण पाळिली ।
जयापासूनि का आली । आकारा भुते ॥ ९१५ ॥
जो अविद्येचिया चिंधिया । गुंडुनि जीव बाहुलिया ।
खेळवितसे तिगुणिया । अहंकार रज्जु ॥ ९१६ ॥
जेणे जग हे समस्त । आंतु बाहेरि पूर्ण भरित ।
जाले आहे दीप जात । तेजे जैसे ॥ ९१७ ॥
तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्म कुसुमांची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषा लागी ॥ ९१८ ॥
म्हणोनि तये पूजे । रिझलेनि आत्मराजे ।
वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥ ९१९ ॥
जये वैराग्य दशे । ईश्वराचेनि वेधावशे ।
हे सर्वहि नावडे तैसे । वांत होय ॥ ९२० ॥
प्राणनाथाचिया आधि । विरहिणी ते जिणेही बाधी ।
तैसे सुखजात त्रिशुद्धि बाधी । दुःखचि लागी (दुःखाच्या लागे) ॥ ९२१ ॥
सम्यक्ज्ञान नुदेजता । वेधेचि तन्मयता ।
उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे ॥ ९२२ ॥
म्हणौनि मोक्ष लाभालागी । जो व्रते वाहातसे आंगी ।
तेणे स्वधर्म आस्था चांगी । अनुष्टावा ॥ ९२३ ॥

वोलावा—ओलावा = जिव्हाळा, एकच, कल्याणाचा, सेवा—सेवा मज. (९०७) नांव—नामे. तपे = यमनियमादि तपे. (९०८) कांहीं—काय. पाटाचा = श्रेष्ठ, मुख्य, (९०९) संडीता—सांडिता. सहवासा = सर्व तीर्थांत राहिल्याचें फळ गंगेतल्या माशास मिळते. वरिपडा—वरपडा. (९१०) आपुलालिया—आपलिया. उपावो—उपाय विसंभिता—विसंबिता (जाणे, जोडणे,) आभार—भार = ओझे, आधिक्य पराकाष्ठा, जोखड श्रम (९११) जया जे—जयाचे. केल्या—केलिया. निभ्रांत = निःसंशय (९१२) जिवाच्या—जिवाचे. गोसाविणी—गोसाविण = धनीण. शिसे (सिसे) वेचितया. (सिसे = मस्तक, शिर. मउली = मौली, मस्तक)— मोविली—तैसी सेवेच्चि तया मवली. मिळाली उभी केली साधली, लाभली.) वही = देवाशीं ऐक्य करण्यांत, देवाशीं लग्न लावण्यास सेवा हीच वही उभी केली. ' लग्नामध्यें बहुल्या भोंवती सुगडाच्या उतरंडी उभारतात' त्यांना वही म्हणतात. सेवेची परमसीमा लाभली असा भाग, (९१३) हे—हेच्चि. ते—ते गा. वणिज—वाणिज्य. (९१४) खूण = मनोगताप्रमाणें वागणें, = खूण पाळणें, (९१५) तिगुणिया = तीन पदरीं. (९१६) आंतु— आंत. (दीप = दिवा, चित्रक) (९१७) अपासा = अमर्याद, पैलतीर नसलेला, मनांत, पृथ्वी, समुद्र, (९१८) पसाय—प्रसाद, कृपादान. (९१९) जये—जिये. वेधावशे-वेधवशे = छंद लागून मनोभावांच्या आविर्भावानें तैसे—जैसे. वात (वायु) होय—वांत (ओकणें) होत = वमन होय. (९२०) आधी = पतीच्या वियोग दुःखानें, सतीला बांचणें ही कष्टप्रद होते. (९२१) आस्था चांगी = चांगल्या कळकळीनें, स्थितीनें, प्रयत्नानें, काळ-जीनें, उत्तम विचारानें, आस्थेनें. (९२३)

पतिव्रतेची सर्व तपश्चर्या पतिसाठींच कीं तशीं ती आपल्या पतीच्या संगती सुख सोहळा भोगते. आईशिवाय बाळाला जीवनात आधार कोणता असतो? त्यानें तिचीच सेवा करणें हेंच त्याचें श्रेष्ठ कर्तव्य. माशानें पाण्यांतच रहाण्यास मिळावें म्हणून गंगेत रहिवास केला तरी सर्व तीर्थवासाचें फळ त्याच्या पदरीं पडतें-तिच्या मार्गानें

**सागरास पोचण्यानें. तसें विहित कर्म आचरल्यावांचून गत्यंतरच नाहीं. अशा बुद्धिनें विहित कर्म केल्यास आपलें आधार ओझें परमेश्वरावर पडतें–ज्यास जें विहित तेंच ईश्वराचें मनोगत समजून केल्यास निःसंशय तो ईश्वरच सांपडला होतो. जीव कसास पुरती झाली दासी जरी तरी ती धनिणच होऊन येतें– मस्तक वेंचल्यास सेवेची परम सीमा लाभली स्वामीच्या उत्कट इच्छेस न चुकणें हीच कीं परम तत्पर-तेची सेवा म्हटली.** **(ओव्या ९०७–९१४)**

हें शास्त्रोक्त योग्य, देवाचें असें विहित* कर्म अगा पांडवा ! आपल्या स्वतःला, स्वतःचाच कीं, आपला आपणासच कीं अनन्य असा जिव्हाळा, आपल्या स्वतःच्या कल्याणाचा असा एकच ओलावा जिवंत असा प्राणाचा जीविताचा, आयुष्याचा होय. व ही कीं अहो सर्वात्मक (सर्व कांहीं स्वाधीन आहे, सर्व कांहीं जिवंत आहे. सर्व कांहीं आत्मीय आहे–सर्व कांहीं स्वतःचें आहे) असा जो परमेश्वर–त्याची प्रथमतेची अशीं श्रेष्ठ सेवा, परम सेवा जाणावी कीं. (९०७)

अहो, सर्वांच्या सर्व भोग, भाग्य, अशा शरीरासहित–ह्या भाग्यच एक दैवच एक भोगण्याचें तेथें शरीराची मालकी, उपभोग, रतिसुख, सुखोपभोगांतच हें शरीर प्रियानें वापरणें जें एक, तेथेंच पतिव्रता ती आपल्या प्रियाबरोबर, पतिबरोबर, कांत जो आवडता त्याजबरोबर, प्रीतीनेंच क्रीडा करते. अहो, येथें आतां

---

*फूटनोट—**मोक्षप्राप्ति हीच की विहित* कर्माचरणाचे फळ जाण**ः चारी वर्णांना चार योग्य अशी भिन्न प्रकारची कर्मे आहेत. शास्त्रानुसार स्वाभाविक विहित कर्में करण्याकडेच बुद्धि अचलपणें लावावी. जातीप्रमाणें योग्य अधिकार असेल तोच शास्त्रावरून नीट समजून घ्यावाः आळस सोडून फलेच्छा नच ठेविता तें कर्म आचरण्यांत दंग असावेंः जो याप्रमाणें करतो तो मोक्षाच्या अलिकडच्या तीराला म्हणजे वैराग्याला प्राप्त होतो. अयोग्य व निषिद्ध कर्माशीं त्याचा संबंधच होत नसल्यामुळें आत्म-प्राप्तीस अपाय करणाऱ्या संसाराचें भय त्याला नसतें. काम्य कर्माकडे तो कौतुकानेही पाहात नसल्यामुळें स्वर्गादि भोगरूपी चंदनाचे खोडेही पायात अडकवून घेत नाहीं (चंदनाचे झाले म्हणून काय झालें अहो खोडा तो खोडाच नां ! ) फलेच्छा सोडून नित्यकर्म करीत राहिल्यामुळें तें कर्म नाहींसें करून मोक्षाची शींव तो गाठू शकतोः अशा रीतीनें विहित कर्में करणारास मोक्ष प्राप्ति होते.

**परधर्माहून श्रेयस्कर असें स्वधर्माचरण आहे :—**

विहित कर्में आचरल्यावांचून आपणांस गत्यंतर नाहीं; अशा बुद्धिचें तें केलें म्हणजे देवावर आपलें ओझें पडतेंः देवांचेही हेच मनोगत आहे. अर्थात त्यांच्या इच्छेप्रमाणें न चुकवितां केलेली सेवा ती खरी उत्कृष्ट सेवाः मालकाच्या इच्छेवेगळी अन्यप्रकारें केलेली सेवा म्हणजे निव्वळ बाजारचा सौदा होयः सर्वात्मक परमेश्वराची अशी स्वधर्मरूपी पुष्पांनीं पूजा केल्यानें तो प्रसन्न होऊन भक्ताला वैराग्यरूपी प्रसाद देतो. वैराग्य प्राप्त झालें म्हणजे परमेश्वराचा छंद लागून संसार वमनप्राय वाटतो. आणि संसारांतली सुखें, दुःखवत भासतातः ईश्वराचें सम्यक्ज्ञान होण्याचें पूर्वीच त्याच्या ध्यासानें तन्मयता प्राप्त होतेः असा या परोक्ष ज्ञानाचा महिमा आहे–म्हणून मोक्ष प्राप्तीसाठीं जो व्रतें वगैरे करीत असेल त्यानें स्वधर्माचें आचरण आस्थेनें करावें. स्वधर्म आचरण्यास कठिण असला तरी त्याचा कंटाळा करूं नये. आपली आई कुबडी तरी ज्या तिच्या प्रेमानें आपण जगतो तें प्रेम कांही वांकडें नाहीं. इतर स्त्रिया रंभेहून सुंदर असल्यातरी त्या मुलाच्या काय कामाच्या ? म्हणून आपल्या विहित कर्मावांचून इतरांच्या दुसऱ्या चांगल्या कर्माचा स्वीकार करूं नये तो स्वीकार करणें म्हणजे पायांनीं चालण्या ऐवजी डोक्यानें चालण्यासारखें आहे.

**(ओव्या ८९९–९१०, १८)**

नवलच की, तसें तें पतिव्रतेनें आपल्या प्रियाबरोबर रमणें हें म्हटलें होतें की, तिनें तर अनेकच्या अनेक तपें की केलीं–आचरिली, पत्करलीं. तप करणें तें व्रतच एक का अनेक अशीं व्रत नियमादि तीच येथें तिनें आदरिली, पाळिली, गौरविली कीं, अवघ्या भोगानें म्हणजे शरीरानें प्रियाशी रमणें तें त्यासच नांव की तिनें तपें केली (असें होय). अवघ्या भोगेशी पतिव्रता प्रियासी क्रीडे तयाचे नांव, तिया तपे केली–सर्व शरारानें पतिव्रतेची प्रियाबरोबर रतिक्रीडा त्यासच नांव तिनें तपें केली. (९०८)

अहो बाळकास एक मायच कीं, सर्वस्व त्या मायेवांचून त्यांस जिणें तें कांहीं गोड असें नाहींच–जगणें तें नाहींच असें म्हणून त्या बाळकानें सेवा करणें इतक्या प्रेमानें की तो तर अहो मुख्य धर्म की मानला–श्रेष्ठ असा तो धर्म होऊन आहे, धर्मासच मुळीं सर्व श्रेष्ठत्व त्याच धर्मावर सेवेनेंच मुळीं पाहिला गेला. की धर्मेच समयास आणला–वेळेचा केला–सदैव केला. (९०९)

अथवा (देह) पाणी असें समजून मासा गंगेस न सांडतां जसा का आहे तेथें सर्व तीर्थेंच त्याजवर येऊन पडली–सर्व तीर्थाचा, सहज सहवासच त्यास झाला की, सर्व तीर्थांचें ते. (९१०)

त्याप्रमाणें आपआपल्या त्या विहीत शास्त्रोक्त अशा, योग्यतेच्या, योग्यतेस आणणाऱ्या योग्यतेच्या करणाऱ्या ज्या दैवच आणणाऱ्या अभावाचे नच केलें तर उपायच तो तेथें पुढें होतो. उपाय उपायास येतो –तेथें औत्सुक्य, निश्चय, व्याप्ति, विविधता, भेदाची बुद्धि नच करणें, भेद न पाहाणें, बदल न करतां–नच विसंबण्यानेंच ते उपायास आले योग्य झाले असेंच अहो जगन्नाथा, करावें कीं, तेथें तर श्रीजगन्नाथच तो जसा की आभाराचा केला, की भाराचा केला की महत्त्वास आणिला, देवपण जागतें केलें. तथीलचें असेंच होय–तेथें तसें करणें तें जगन्नाथास आभार वाटतात.

त्याप्रमाणें आपआपल्या निर्माण केलेल्या अथवा ठरविलेल्या शास्त्रोक्त कां नियमच एक दैव म्हटला जाणारा, तेथें अभावाचें न करितां तेथें बदल न करितां तेथीलची विविधता, व्याप्ति, निश्चय औत्सुक्य न जाऊ देता म्हणजेच की औत्सुक्य इत्यादींनी ते जोडून घ्यावें असाच एक उपाय तेथें हीच पद्धती स्वीकारली व्हावी. उपाय साधन, उद्दीपन, सामग्री जोडणेच एक तेथें असाच तो उपाय करावा व मग की सहजच अहो जगन्नाथ देवा ! असें करावें तेथें मग तो देव जगन्नाथ, जगाचा नाथ तोच मुळीं आभाराचा केला का श्रमाची का आधिक्याची पराकाष्ठाच एक तेथें भार होऊन आहे. (९११)

अगा हे अर्जुना ! ज्यास जें योग्य तें दैवच म्हटलें तें ठरविलेलें असें तेंच मुळीं की ईश्वराचें अंतस्थ मनोगतच एक ईश्वराची इच्छाच एक ईश्वराचा अभिप्राय तो आणि म्हणूनच जर कां तें आदर सन्मान्यतेचें केले तर की अहो तो ईश्वरच मुळीं निःसंशय सांपडला होतो. (९१२)

अहो जीवदशेच्या गोडी संबंधीच्या कसास उतरली; परिक्षेंत उत्तीर्ण झाली, जी कां ! जेथें त्या जीवास काय आवडते ? हा जीव कोठें गोडी पाहातो गोडी ती पढिये ती कशी; तें जसें का भाव पाहुण्यासच विचारून घेऊन तेथेंच त्या गोडींत बसण्याचें केलेंच करावें जें अहो ! जीव हा तर त्या प्रकृतीच्या सर्वथैव केलेल्या अशा विकाराचा असल्यानें तेथें त्या जीवदशेनें आपल्या गोडीस पहाणें का त्या परीक्षेंत उत्तीर्ण होणें हें जसें कां अभिमानाच्या देहबुद्धीचें ओझेंच मुळीं उतरून टाकून त्या गोडीत बसणें अति शूरत्वाचें अंगच की तें. तेथें दास्यपण जें पत्करलेले आजपावेतो त्या वेदांनें, वेद विहिततेचें तेंच आपल्या जीवभावासच मुळीं शून्य घालून प्रेमाच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यानें ती स्वामीनीच जशी कां झाली असें होते. ती त्या प्रेमाच्या गोष्टीची, गोमाविण मालकीण, का धनीनपणाची झाली होते. तिने तर आपले शिर हेंच हातावर घेऊन पराकाष्ठेच्या धैर्यानें त्या गोडीत बसल्यानें ती जशीं का सेवेची सीमाच पाहिली असा भाव सुगडाची उतरंडी रचिली होते वहीच एक उभी केलेली देवाशीं लग्न लावण्याकरितां की. (९१३)

त्याप्रमाणें स्वामीच्या मनोभावास ( मनस्+भव. मनस्=अंतःकरण बुद्धिः+योनि.) [ उत्कट इच्छेस, कामेच्छेस, मदनरतीस ] न चुकणें हीच की अहो परम तत्परतेची अशी सेवा म्हटली होते. याहून इतर तें तर नुसतें एक दुकानदारीचें तें (व्यापारणें तें, वाण्याचा धंदा तो जसा, इतर डाळ तांदूळ मीठ मिरच्या, विकण्याचा धंदा तो एक.) (९१४)

**तो अहंकाररूपी दोर (रज्जु) जीवरूपी बाहुली ती, अविद्येच्या चिंध्याची केलेली ती, तीन गुणांनीं खेळवित आहे. समस्त जग आंत बाहेर पूर्णपणें भरलेल्या दीप जाताच्या तेजाचें तेथें. त्या सर्वात्मक ईश्वराची पूजा स्वकर्म कुसुमांनीं हे वीरा, केल्यास अपार संतोष होतो, पृथ्वीच तोषविली जशी. म्हणून त्या पूजेंत आत्मराजानें रिझल्यास ती पूजा, वैराग्य सिद्धीरूपी प्रसाद देते, ईश्वराचा वेध लागल्यानें वैराग्यदशा उत्पन्न होण्यानें हें सर्व कांहीं नच आवडल्यानें वांतीचें होतें. प्राणनाथाच्या चिंतेनें विरहिणीस हे जीवित तर बाधाच करणारें, सुखजात सर्व त्रिशुद्धि दुःखसरिताच कीं, सम्यक्ज्ञान उगवलें नाहीं, पण वेधानेंच तन्मयता उपजते, अशी बोधाची योग्यता लाभते, मोक्षलाभाकरितां व्रतेंच आंगी वाहून आहे त्यानें तर स्वधर्म हा चांगल्या आस्थेनें अनुष्ठावा, आचरावाः (ओव्या ९१५–९२३)**

आणि एवढ्याचसाठीं कीं, निर्माण केलेलें ठरविलेलें का शास्त्रोक्त दैवच एक नेमिलें नियमिलें अशी कां क्रिया केली (असें तेथें म्हणणेंच कीं मुळीं होत नाहीं पण) दैवाची ती खुणच एक पाळिली की! असें तें तें म्हणजे हे भूतमात्रच कीं अहो! जेथून आकारास आलें जन्म पावलें आहे (अशी ती प्रकृति पुरुष का क्षेत्र क्षेत्रज्ञ संयोगानें कीं, अहो ही सर्व सृष्टी उत्पन्न झालेली) ज्यापासून हीं सर्व भूतें आकारांत आलीं– त्या प्रकृतीची खूणच की पाळिली विहित क्रिया करून कीः (९१५)

अहो, हा त्रिगुण का तीन पदरी अहंकाररूपी दोर (दोरी केसांची वेणी का लगाम) हाच मुळीं अविद्यारूपी ह्या जीवरूपी बाहुल्यांना गुंडाळून घेऊन त्यांना खेळवीत आहे जसा का (अविद्या मायेच्या चिंध्या आवरून धरून भोवती गुंडाळून हा सजीव बाहुल्यानां अहंकार रज्जू तो खेळवीत आहे.) (९१६)

ज्या तेजानें हे समस्त जग आंत बाहेर पूर्णभरित पुष्ट झालें (जग हें ओढलेलें असें भारयुक्त झालें आहें जसें कां) जग जेवढें म्हणून तें सर्वच्या सर्व (दिव्याची जाति जेवढी आहे ती सर्वच्या सर्व की अहो) तेजानें जसें भरलें आहे. तेजामुळें सर्व दीपजातच की एक तेजचि असा हे समस्त जग आंत बाहेर पूर्ण भरलें झाले आहे. (९१७)

(हें काय आहे म्हणावें तर जसें कां) ह्या सर्वात्मक ईश्वरास–आत्माच एक सर्वत्र विलसून आहे, असा ईश्वर जो त्यास–(तर स्वकर्म स्वाभाविकपणें आपण) स्वजातीय, स्वभाव कर्मरूपी कुसुमांनी अपार अशा तोषासाठीं तर एक पूजाच कीं बांधली आहे पृथ्वीच पूजेनें तोषविली जशी सर्वात्मकाचि ईश्वराची ती त्याची आपल्या कर्मरूपी कुसुमानी पूजा केलेली अपार संतोष देते पृथ्वीच संतुष्ट झाली असें होतें. (९१८)

आणि म्हणूनच कीं अहो! आत्मराज (देह) ह्या पूजेनें रिझला व त्याचें पोट भरल्यानें वैराग्यरूपी सिध्दीच एक कीं, कृपादानरूपी प्रसादच कीं, अहो! दिला होतो कीं; आत्मराज तो त्या पूजेनें संतुष्ट झाल्यानें वैराग्यसिद्धिरूपी प्रसाद यावा प्राप्त व्हावा हे केव्हांहि होतेंच. (९१९)

ज्या वैराग्याच्या वयोऽवस्थेनें तारुण्यावस्थेनें स्थितीनें, देवानें, ईश्वराचा वेध कां छंद लागला होऊन (ईश्वराच्या छंदाचें होऊन, ईश्वराच्या छंदास, तोषविण्यास ईश्वर इच्छेस, आज्ञेस, ताबेदारीस स्वैराचारास, लहरीस, तर ) हें सर्व कांहीं आवडतच मुळीं नाहीं–वमनप्राय वाटते–अशीच गोष्ट बोलली जाते वैराग्यरूपी प्रसादादशेनें ईश्वर छंदानें ईश्वराचा छंद लागून सर्व दृश्यजात हे वमन जसे असें होते. (९२०)

पतीच्या वियोगदुःखानें [अधि–(व्याधीने) सतीला जगणे, वांचणें हे, कष्टप्रद होते, बाधते) त्या-प्रमाणें जेवढें म्हणून सर्व सुखजात आहे, तें सर्वच्या सर्व कीं अहो दुःखाकरितांच कीं. प्राणनाथाच्या चिंतेमुळें विरहीणीस तर आपले (जगणें) जीवितही कष्टप्रद होतें तसें–सुखजात सर्व ते ऋद्धिच्या बाधेने दुःखाच्या लागा बांध्याचे होतें. (९२१)

सम्यग् ज्ञान (म्हणजे खरें असे, बरोबर असणारे असें, बिनचूक योग्य, चांगले, प्रिय रम्य ज्ञान) उदय नच पावले तरी पण अहो त्या वेधानेच कीं (अथवा ज्ञानाच्या रम्यपणाच्या उंचीच्या मापानें खोली मुळेंच कीं) तन्मयता (तद्+मय) तल्लीनता तद्रुपता उपजेल अशीं बोधाची योग्यता सांपडवून असते. बोधच मुळीं अशा योग्यतेचा होतो. ज्ञान चांगल्या उदयास आलें नाहीं तरी ध्यासानें तन्मयता उपजते अशी ह्या बोधाची योग्यता आहे. (९२२)

मोक्षाच्या लाभाकरितां, जन्ममरणापासून सुटका व्हावी म्हणून, जो आपल्या आंगीच कीं व्रतें वाहून झेंपून आहे. (वाहात असतो) त्यानें तर स्वधर्म हा उत्तम अशा प्रयत्नानें आचरावा (विचारपूर्वक, काळजीनें आदरानें, आस्थेनें, कीं अनुष्ठानाचा करावा, अनुसरावा, आरंभाचा करावा, संपादावा). म्हणून मोक्ष-लाभासाठीं जो आपल्या आंगीच की व्रतें वाहून आहे त्यानें चांगल्या=आस्थेनें आपला धर्म आचरावा, अनुष्ठावा. (९२३)

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥**

श्रेयान्=(प्रशस्य+ईयस्=प्रशस्येयस्) अधिक चांगलें, उत्तम पुण्य, कल्याणकर, शुभ, पुण्यसाधन, शुभ प्रसंग, मोक्ष. विगुणः स्वधर्मः=गुणहीन, सदोष, निष्फळ स्वजातीय धर्म. परधर्मात्=(दुसरा, निराळा, श्रेष्ठ, परका) आत्म्याहून स्वाभाविक, आपण, स्वतःचा स्वभाव धर्म स्वतःहून निराळा तो इंद्रिय धर्म, प्रकृतीचा, सर्वथैव म्हटलेला, प्राकृतीक धर्म, गुण विकारवशता वगैरे. स्व अनुष्ठितात्=सु=चांगलें, सुंदर, पूर्णपणें, अनायासें, पूज्य योग्य रीतीनें संपादणें जें, आरंभणें जें, अनुसरणें जें, अनुष्ठणें जें, कर्म स्वभाव नियंत कुर्वन्=स्वभावाच्या ताब्यांत ठेवलेलें, स्वभावानें बांधलेलें, स्वभावानें पाळलेलें का स्थिर, स्वभाव-निश्चित, एकाग्र. नेहमीं किल्बिषम् न आप्नोति=कर्म करीत रहाण्यानें पाप लागत नाहीं.

अन्वयः—सु अनुष्ठितात् परधर्मात् । विगुणः स्वधर्मः । श्रेयान् ॥ स्वभाव नियतं कर्म कुर्वन् । किल्बिषम् न आप्नोति ॥ ४७ ॥

अर्थ :—उत्तम तऱ्हेनें (आत्म्याहून, स्वतःहून, निराळा) परधर्म अनुसरण्याचा (का संपादण्याचा) करण्यापेक्षां आपला विगुण (निष्फळ गुणहीन, सदोष) असा स्वधर्मच मुळीं आचरण्यानें श्रेयस्कर होतो. स्वभावानें स्थिर नियत असें कर्म करीत राहिल्यानें कसलेंहि पाप (लागणारे नव्हें) लागत नाही.

(श्लोक ४७ वा ओव्या ९२४–९३५)

**अगा आपुला हा स्वधर्मु । आचरणी जरी विषमु ।**
**तरी पाहावा तो परिणामु । फळेल जेणे ॥ ९२४ ॥**

**जैसा (जै) सुखालागी आपणया (आपणपया) । निंबचि आथि धनंजया ।**
**तै कडुपणा तया । उभगिजे ना ॥ ९२५ ॥**

**फळणया ऐलीकडे । केळी ते पाहाता आस मोडे ।**
**ऐसी त्यजिली तै जोडे । तैसे के गोमटे ॥ ९२६ ॥**

**तेवि स्वधर्म सांकडु । देखोनि जरि केला कडु ।**
**तरी मोक्ष सुखाडु । अंतरला की ॥ ९२७ ॥**
**आणि आपुली माये । कुब्ज जरी आहे ।**
**तऱ्ही जिये ते नव्हे । स्नेह कुब्ज (कुऱ्हे) की ॥ ९२८ ॥**
**येरी जया पिराविया । रंभेहुनि बरविया ।**
**तया काय करविया । बाळके तेणे ॥ ९२९ ॥**
**अगा पाणियाहुनि बहुवे । तुपी गुण कीर आहे ।**
**परि मीना काय होये । असणें तेथे ॥ ९३० ॥**
**पै अघवया जना जे विष । ते विष किडया पियूष ।**
**आणि जगा गुळ (ते) देख । ते मरण (दे) तया ॥ ९३१ ॥**
**म्हणौनि (जे) विहित जया जेणे । फिटे संसाराचे धरणे ।**
**क्रिया कठोर तऱ्ही तेणे । तेचि करावी ॥ ९३२ ॥**
**येरा पराचार बरवया । ऐसे होईल टेंकलया ।**
**पायाचे चालणे डोइया (डाइया, डाविया, डोइया) । केले जैसे ॥ ९३३ ॥**
**यालागी कर्म आपुले । जे जाती स्वभावे असे आले ।**
**ते करी तेणे जिंतिले । कर्म बंधाते ॥ ९३४ ॥**
**आणि स्वधर्मुचि पाळावा । परधर्मु तो गाळावा ।**
**हा नेमु ही पांडवा । न किजेचि मा ॥ ९३५ ॥**

फळैल–फळेल. (९२३) जैसा–जै. आपणया–आपणपया. अथि–आथि. कडुपणा–कडुवटपणा. तया–तयाच्यिा. उभगिजे ना = कंटाळू नये. (९२५) फळणया–फळण्या. अस–आस आसमोडे = आशेची निराशा होते. तै–तरी. तैसे–तैसे के. त्यजिली = तशा स्थितीत ती कापून टाकिली तर मधु फळे कोठून मिळणार ? (९२६) जरी केला–केला जरी मोक्षसुखाडु = मोक्षसुखाला (९२७) जिजे–जिये (ज्या प्रेमामुळे आपण जगतो ते तिचे प्रेम वाकडे नाहीं. तऱ्ही–तरी. नव्हे–नोहे. कुब्ज–कुऱ्हे (वांकडे, कुबडे) (९२८) जया–जिया. (९२९) विष–विख विख किड्या–विष किडीयाचे = विषातल्या किड्याला पियुष–पियूष. गुळ देख ते–गुळ ते. (९३१) विहित–जे विहित. (९३२) पराचार–पराचारा. बरवया–बरविया. टेकलया –टेकलेया = आश्रय केल्यास. डाइया–डोइया (डयनं = उडणे, डोली, पालखी) (९३३) करीतेणे–करी तेणे. (९३४) मा–पै गा. (९३५)

**आचरण्यांत कठिण असा स्वधर्माचा कंटाळा करूं नये: आई आपली कुबडी तरी तिच्या प्रेमानें आपण जगतो तें कांहीं वांकडे नाहीं: रंभेहून सुंदर जरी इतर स्त्रिया तरी त्या मुलास काय उपयोगाच्या ? आपल्या विहित कर्मावांचून दुसऱ्याच्या चांगल्या कर्माचा आश्रय का स्वीकार करूं नये: तसें करणें म्हणजे डोक्यानें चालण्यासारखें आहे–अहो चालणें तें पायानींच व्हावें ना ! (डाविया = इष्ट, मागण्यास योग्य, प्राणी, स्तन, मदन, अतिसुंदर, वक्र, कुटिल, प्रतिकूल, उलटा) (ओव्या ९२४–९३५)**

हे पांडवा ! आपला हा स्वाभाविक (स्वतःचा, आपणच जो स्वभाव, स्वजातीय) धर्म संपादन होण्यास साध्य करण्यास, अनुसरण्यास, आरंभण्यास) जरी विषम (उंच सखल, सम नव्हे असा, अनियमित दुर्गम, विचित्र, चमत्कारिक विपरीत, शोक, दुःख, असा) तरी ज्यामुळे तो परिणाम (फळणारा का) होणारा तोच मुळीं पाहावा–तेंच मुळीं कारण जें परिणामणारें तें निवडावें (परिणाम = बदल, परिणाम, फळ, विकास, वृद्धपणा, अंत, पक्वता. (९२४)

(आपल्या स्वतःच्या अथवा) आपल्या सर्वस्वाच्या सुखाचा असा निंबच एक योग्यता घेऊन आहे. (अमूल्य तेथें किंमत ती केलीच मुळीं जात नाहीं, हे धनंजया! व) असें जर आहे तर निंबाच्या कडूवटपणास तें कंटाळणें तें कां? (तेथीलच्या कडुपणास उबगू नये कीं, कंटाळावें कां बरें! अहो, सुखाकरितांच कीं एक, तेथें सुख म्हणजे काय? सुख तें कशास म्हणावें? सुखालागीं नेहमीं हा जीव तळमळत राहाणारा, असें जें सुख, अति महत्त्व पावून आहे. तेथें निंबाची ती योग्यता ती कुणी जाणावी? कडुपणास त्या कुणीतरी कंटाळेल काय अहो) [**कटु** जे कडू का सुवासिक का दुर्गंधीचे कां उग्र दारुण कठोर) कर्कश असें अथवा दुःखद ते मत्सरी तामसी, तिखट, का कापुराचे ते मार्दव, का दुर्वर्तन कां निंदा का मत्सर म्हटला— **कटुभंग**—दिलीप राजा. **कटुकंद**=शेवगा. **कटुकीट**=चिलट, डांस. **कटुक्काणः**=टिट्टिभ पक्षी. **कटुचातुर्जातं**=वेलदोडे, दालचिनी, तमालपत्र, मिरी. **कटुछंदः**=तगर (व.) **कटुतिक्तक**=ताग. कटुतिक्ता, कटुतुंबी=कडु दुध्या. कटुत्रिकत्रय=सुंठ, मिरी, पिंपळी. **कटु मंजरिका**=आघाडा. **कटुखः**=बेडूक. **कटुस्नेह**=मोहर.] (९२५)

केळ ही फळण्याच्या अगोदर कां विण्याचे पूर्वी जर त्यागून पाहीली का पाडिली तर मधु फळे नाहींत म्हणून कीं, अहो तेथे तर एक आशेची निराशाच होते. अशी ती केळ जर त्यजिली (म्हणजे कापून टाकिली) तर मग मधुफळेंच जशी का मिळाली असें ते काय बरें मग चांगले का गोमटें ते आहे का कांहीं? तेथें मग मधुफळें तीं कशी मिळणार बरें? (९२६)

त्याप्रमाणें स्वधर्म (स्वाभाविक आपणा स्वतःचाच स्वभाव स्वजातीय धर्म) तो तर सांकडेंच एक (संकटच एक, असें देखून) असें पाहून समजून कंटाळून जाऊन जर का कडू (म्हणजे कठोरतेनें, कर्कशपणें का उग्रतेनें वागविला दुर्वर्तनाचा केला का निंदेचा) केला तर मोक्ष सुखाला (जन्ममरणापासून सुटकेच्या सुखाला) तो अंतरलाच कीं अहो! (९२७)

अहो आपुली माय का आई जरी का कुब्ज म्हणजे कुबडी वांकडी आहे तरी, जिजे, जिये ज्या प्रेमामुळें आपण जगतो तें तिचें प्रेम वांकडें (का क्लेश मानणारें कुबड नसतें कीं) नाहीं कीं, (कुब्जकः=कांटे शेवंती, शिंगाडा, दास. कुब्ज=मत्स्यविशेष, कुबडा, वांकडा, पांढरा आघाडा, कळ्यार, कुबड, स्त्री, रानचिमणी. (कुब्ज कंटक=पांढरा खैर.) [माय, आई, मातृ, आदरार्थी—गाय, पृथ्वी, लक्ष्मी, योगिनी, जन्मभूमि, देवमाता, शिवसहचरी भेद—(मातृक=आई संबंधीचे, मामा, आई, आईची आई, दाई, मुळाक्षरे.] (९२८)

इतर (दुसऱ्या निराळ्या) ज्या पराविया [म्हणजे पराधीन, निर्बल, ग्रस्त, क्षुल्लक, परा=परत, उलट, बाजूला, कडे, परत्या, उलट्या, बाजूच्या, परावलंब. (परागत=मृत. पारवर्ग्य=शत्रुपक्षीय.)] त्या रंभेहूनहि जरी बऱ्या उत्तम अशा तरी पण त्या, त्या बाळकास काय बरें उपयोगाच्या? (९२९)

अहो पाण्याहूनहि पुष्कळ पटीनें कीं तुपामध्यें गुण आहे पण माशास तेथें असणें तें काय बरें कसेसें होणारें तें! (९३०)

अहो अवघ्या सर्व (जनाला) जगाला, (लोकाला,) जें विष तें किड्यांना तर पियूषच कीं, आणि जगाला जें गुळाप्रमाणें गोडीचें तें तर त्या किड्यांना मरणच कीं देणारें असें. (९३१)

म्हणून ज्यास जें नेमलेलें आहे, (जें योग्य आहे जें ज्यानें स्वतःच निर्माण केलें असें विहित सर्वथैव योग्य जें) ज्यामुळें संसाराचें धरणें फिटतें, प्रक्रीया ती कठोर जरी तरीपण त्यानें तीच करावी कीं. [तेव्हांच अहो. **क्रिया** जी कृत्य, विद्या, विचार, कृति—कर्मामध्यें का क्रियेमध्यें, कौशल्य योजावें—प्रायश्चित्त, इलाज, साधन सिद्धि, गति, अध्यात्म, आत्म्याबद्दलचे, व्यक्तीचे, मन, देह ब्रह्म, (अध्यात्मन्=वायु, अहंकार) अथवा तप, पाठ करणें, अध्ययन, वेदाभ्यास, ईश्वर ध्यान, लक्ष देणें, काळजी घेणें, भक्तिविशेष, समाधान, कर्मफलत्याग, हे तेव्हां करावेच करावे.] (९३२)

निराळा दुसऱ्याचा, एकाद्याचा, आचार, वर्तन, नियम, शिष्टाचार, वर्तन चालरीत, नियम बरवा तोच केल्यासारखें होईल. जसें कां पायाचें चालणें तें डाइया कां डुईनें (डुइया, डोया, पिढी, पिल्या चालणें पायानें करावें, डोक्यानें करू नये. चल चलितं=चालणें, हालणें, जाणें, नृत्य कांपणें) म्हणजे डोक्यानेंच गणपतिच आटविला जसा एका मनुष्याचें सर्वथैव खपणें का उडविलें होणें तेथें केले जसें का. पिढीच एक आटविली जशी. वन्हाडच तें गाडलें गेलें जेथें असें केलें होईल, गढलें, गाढलें, नाडलें. (९३३)

याजकरितां आपलें कर्म गुणधर्म पूर्वकर्म दैव जे का जातिस्वभावेकरूनच साहित्यामध्यें जाति म्हणजे स्वभावोक्ति जन्मकुळे वर्ण ब्राह्मणादिनी कीं आलें आहे ते करतो जो त्यानें तर कर्म करीत रहाण्यावरच कीं, कर्मबंधच कर्मबंध, कर्मबंधनं=कर्मामुळें पुनर्जन्म होणे तो संसारपाश मुळीं जिंकला होतो कीं. (९३४)

येथें आतां स्वजातीय धर्म (स्वाभाविक आपण स्वतःच जेथें तो आपला सहज स्वभाव) तो पाळावा. सांभाळावा, परधर्म (म्हणजे प्रकृतीचे केलेलें जें हें देह घटनेचें तेथें इंद्रियें मन बुद्धि इत्यादि पदार्थ हे प्रकृतीचे धर्म कार्य) तो वगळावा, गाळावा, (त्यजावा असाही पण कांहीं नित्यधर्म जो तेथें कांहीं) नेम अथवा नियमही पण, हे पांडवा! नच करावा कीं, अहो! अहो! नेम=वेळ, अवधि, मुदत, नृत्य, माया, प्राकार. नियम=आळा घालणें, निग्रह, डाव, निश्चय, व्रत, ऐच्छिक धर्माचरण, स्नान, उपोषण, जागरण, तीर्थयात्रा, इत्यादि, अथवा रहस्य पाळणें, यत्न निर्धार, प्रतिज्ञा, नित्य धर्मकृत्य जें) (९३५)

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत्।**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**

सहजं कर्म=सहज, तेथें अकस्मात प्राप्त झालेलें कर्म. सदोषमपि=दोषाच्या नजिकचें जरी, दोषसहित दोषसदृश, एकाच दोषाचे जरीं न त्यजेत=उद्देश, देश (जवळचे) त्याची पर्वा करावी, वगळू नये, टाकू नये, सोडू नये वर्ज्य करू नये, जेरीस आणू नये, (तें आचरावें) सर्वारंभाहि=सर्व कर्म क्रिया प्रस्तावना, तयारी, उद्योग, प्रयत्न, वेग. दोषेण=दोष, व्यंग, अनिष्ट गुण, अधर्म, पाप, चूक. अग्नि धूमेन इव आवृताः= अग्नि जसा धुरानें व्याप्त असतो तसा.

अन्वय :—कौंतेय। सहजं कर्म। सदोषम् अपि। न त्यजेत्। सर्वे आरंभा हि। अग्निः धूमेन इव। दोषेण आवृताः ॥ ४८ ॥

अर्थ :—हे कौंतेया! सहज प्राप्त झालेले कर्म जरी तें सदोष (अधर्म, पाप, चूक, दोष, अपराध असें वाटलें भासलें,) असलें तरी सुद्धां टाकूं नयें, (त्यजू नये) तें करावेंच करावें कारण असें पाहा कीं, जसा अग्नि हा धुरानें व्याप्त असतो, तसे सर्व प्रकारचे आरंभ ते तर केव्हांही दोषांनीं आवरिलेले (व्यापलेले, झांकलेले, लपविलेले आच्छादिलेले, वेढलेले, भरलेले) असावेतच पण कर्म (सहजपणेच जे प्राप्त झालेलें तें.) तें केल्यानेच कीं अहो ते दोष निवारिलेले होतात कीं. (श्लोक ४८ वा ओव्या ९३६–९५५)

**तरी आत्मा दृष्ट नव्हे। तंव कर्म करणें कां ठाये।**
**आणि करणें तेथ आहे। आयासु आदी ॥ ९३६ ॥**
**म्हणौनि भलते कर्मी। आयासु जरी उपक्रमी।**
**तरि काई स्वधर्मी। दोष सांघे ॥ ९३७ ॥**
**अगा उजु वाटा चालावे। तरि पायचि सिणवावे।**
**ना आडरानें धावावे। तरि तेचि ॥ ९३८ ॥**
**पै शिळा कां सिदोरिया। दाटणे येक धनंजया।**
**परि जे वाहाता विसांविया। मिळिजे ते घेपे ॥ ९३९ ॥**

येऱ्हवी कणा आणि भुसा। कांडिता सोसुसारिखा।
जेचि रंधन श्वान मांसा। तेचि हवि ॥ ९४० ॥
दधि जळाचया घुसळणा। व्यापारू सारिखा विचक्षणा।
वाळुवे तिळा घाणा। गाळणे येकचि ॥ ९४१ ॥
पै नित्य होमु द्यावया। कां सैरा अंगी फुंकावया (आगी सुवावया)।
फुंकिता धूम्न-"धू"-धनंजया। साहाणे तेचि ॥ ९४२ ॥
पै धर्मपत्नि आणि धांगडी। पोशिता जरि येकचि वोढी।
तरि का अपरवडी। आणावी आंगा ॥ ९४३ ॥
हा गा पाठि लागा घाई। मरण न चुके पाही।
तरि समोरील काई। आगळे न कीजे ॥ ९४४ ॥
कुल स्त्री दांडयाचे घाये। परघरी रिगाली तरी साहे।
तरि स्वपतिते वाये। सांडिले की ॥ ९४५ ॥
तैसे आवडे तेही करणें। न निफजे शिणलिया उणे।
तरि विहित बारे कोणे। बोले भारी ॥ ९४६ ॥
वरि थोडेचि अमृत घेता। सर्वस्व वेंचो का पांडुसुता।
जेणे जोडे जीविता। अक्षयत्व ॥ ९४७ ॥
येर का ह्या मोल वेंचोनी। विष विपाये घेउनि।
आत्महत्येसी निमोनी जाईजे जेणे ॥ ९४८ ॥
तैसी जाचुनिया इंद्रियें। वेंचुनि आयुष्याचे (नी) दिये।
सांचले पायी आन आहे। दुःखावांचुनी ॥ ९४९ ॥
म्हणोनि करावा स्वधर्मु। जो करिता हिरोनि घे श्रमु।
उचित देईल परमु। पुरूषार्थ राजु ॥ ९५० ॥
ययाकारणें कीरिटि। स्वकर्माचिये राहाटि।
न विसंभिजे संकटि। सिद्ध मंत्रु जैसा ॥ ९५१ ॥
का नावेसि जैसा उदधि। महारोगी दिव्यौषधि।
न विसंभिजे तिया बुद्धि। स्वकर्म येथे ॥ ९५२ ॥
मग याचिया गा कपिध्वजा। स्वकर्माचिया महापुजा।
तोषला ईशु तम रजा। झाडा करूनि ॥ ९५३ ॥
श्रद्धा (शुद्ध) सत्त्वाचिया वाटा। आणि आपुलिया उत्कंठा।
भवस्वर्ग काळकुटा। ऐसे दावि ॥ ९५४ ॥
जिये वैराग्य येणे बोले। मागा संसिद्धि रूप केले।
किंबहुना ते आपुले। मेळवी खागे ॥ ९५५ ॥

दृष्ट=शास्त्रोक्त, ठरविलेलें, कृत, अनुभवलेलें, (दृष्ट रजस्=ऋतु प्राप्त झालेली कन्या) का ठाये==राहील काय? आदी-आधी (९३६) भलते-भलतिये. उपक्रमी=आरंभी सांघै-सांगे !! (९३७) दाठणे-दाटणे=ओझे, दडपण, विसाविया-विसावया (९३९) सारिखा-सरिसा. रंधन=पाक निष्पत्तीचे श्रम. श्वान-मासा-श्वानमासा. हवि-हवी. (९४०) दधि जळाचया-दधी जळाचिया. तिळा-टिळा. (९४१) होमु द्यावया-होम देयावया. अंगी फुंकावया-आगी सुवावया=दुसऱ्या कामासाठीं विस्तव पेट-

विण्यास. सैर–स्वैर = स्वच्छंद द्युम्न (द्रव्य, शक्ति, तेज) धुम्न, धू–धूम. (९४२) पै–परि. धांगडि = वेश्या, पर अंगना. पोशिता–पोसिता. येकचि–येकी. अपरवढि–अपरवडी = गैरवर्तन, पाप (९४३) पाटि लागा–पाठी लागला. घाई (= घांव जखम) समोरील (–समोरली) अगळे न कीजे–आगळे न कीजे ? = समोरच्या शत्रूशीं दोन (चार) हात केल्यास काय वाईट ? समोरासमोर शत्रशीं लढून मरणाहून अधिक ती स्वर्गप्राप्ती होणारी नव्हे काय ? (९४४) परघरी–परघर. रिगाली तरी–रिगालीहि जरि. स्वपतीते. वाय–वाये. सांडिले की–त्यजिले कि. (९४५) आवडेतेहि–आवडतेहि. निफजे–निपजे. शिणलिया उणे–शिणल्याविणे. बा रे = अरे बाबा ! भारी = कठिण. (९४६) काह्या = कशासाठीं ? मोल वेचोनी–मोले वेंचुनि विपाये–पियावे–घ्यावे वणेजूनि. निमोनि जाइजे–निमोनी जायिजे = मरून जाणे ज्यायोगे (९४८) जाचुनिया–जाचूनिया. वेचुनि–वेचूनि. आयुष्याचेनि दिये = आयुष्यरूप दिवस. पायी–पापी. पुरूषार्थ राजु–पुरूषार्थराज = मोक्ष. (९५०) स्वकर्माचिये–स्वधर्माचिये. राहाटि–राहटि. न विसंमिजे संकटि–न विसंबिजे संकटी. (९५१) नावेसी जैसा–नाव जैसी. दिव्यौषधि–दिव्यौषधी. न विसंभिजे–बुद्धि–बुध्दी. येथे–येथ. (९५२) याचिया–ययाचि. महापुजा–महापूजा. ईशु–इषु–ईश. (९५३) श्रद्धा –शुद्ध. आणि–आणी. आपुलिया–आपुली. (९५४) अपुले–आपुलें. खागे = स्थान. (९५५)

कोणतेंही कर्म करण्यांत आयास होतात, मग ,स्वधर्म आचरण्यांत दोष श्रम होतात या म्हणण्यांत काय अर्थ आहे ? सरळ रस्त्यानें गेलें तरी पाय दुखतात व आडरानानें गेलें तरी पाय दुखतातच. शिदोरी वाहाण्यानें विसावा मिळतो मग तीच का वाहू नये. व्यर्थ दगडाचे ओझे वाहाण्यांत काय अर्थ आहे ! धान्य का भूस कांडण्यांत श्रम सारखेच. यज्ञाकरितां पाक निष्पत्तिचे श्रम तेच हवी होत व चांडाळानें जें मांस पकविणे दोहींतही शिजविण्याची क्रिया एकच. दह्याचे का पाण्याचे घुसळणें तसें, वाळूचा घाणा का तेलाचा घाणा गाळणें, तेथें एक तें गाळणेची क्रियाच कीं. होमहवन करतांना का इतर कामाचें वेळीं आग लावतांना, विस्तव पेटवितांना श्रम सारखेच, तेथें धूर तो सहन करावा लागतोच. धर्मपत्नि का व्यभिचारिणी पोसतांना पैशाचा ओढा तो एकच तर मग अन्यायी वर्तनानें अपकीर्ती ती कां बरें अंगास आणावी ती? शत्रूला पाठ दाखविण्यानें पाठीवर घाव बसतोच आहे मरणच तें तर मग शत्रूच्या समोर होऊन दोन हात करणें काय वाईट ? कुलस्त्री दांडगा नवरा मिळाला म्हणून परघर रिगाली व तेथेही पण तसलीच दांडग्याची घाई तर तिनें स्वपतीस ते व्यर्थच कीं त्याजिले नां ! आवडतें जें मनाला तें शिणल्याशिवाय होत नाहीं. मग विहित जें तें कोणत्या शब्दानें कठिण असें म्हणावें ? अमृत का अमरत्व तें ह्या जीवाला ज्यानें मिळतें तें थोडेसें जरी मिळालें तर त्यासाठी सर्वस्व खर्च झालें तरी बेहत्तर आहे. म्हणजे त्यासाठी सर्वस्व खर्च होण्याची भीति का बाळगावी ? एरव्ही ज्यायोगें आत्महत्याच घडतें असें तें विष वाण्याकडून विकत घेण्यांत काय अर्थ आहे? इंद्रियाचा जाच करून आयुष्याचें दिवस वेचून जें कांहीं पाप सांचलें तेथें दुःखच एक सर्व कीं, म्हणून स्वधर्म आचरण्याचा करावा–जो केल्यानें श्रमच तो हिरून नेतो व योग्य असा पुरुषार्थ राज मोक्षच कीं देतो. या कारणास्तव कीरिटी स्वधर्माच्या राहाटीमध्यें राहाटणें विसरूं नये, संकटाच्या वेळी तो सिद्ध मंत्र जसा तसा स्वधर्म आचरावा. समुद्रीं असतां नावेस विसंबू नये. मोह महारोगामध्यें दिव्यौषधी नामरसायन तें विसरूं नयें, त्याप्रमाणें येथें बुद्धि लावावी. स्वधर्म हा विसंबू नये. मग

**स्वधर्माचरणानें केलेल्या पूजेनें ईश्वर संतुष्ट होऊन चित्तांतल्या रजतमाचा झाडून नाश करतो. आणि त्याला स्वधर्माचरणाच्या शुद्ध सात्त्विक मार्गाला लावतो–उत्कंठाच एक सर्व तेथें त्यामुळें त्याला स्वर्ग व संसार कालकुटाप्रमाणें वाटूं लागतात. वैराग्य उत्पन्न होतें. तें आपलें स्थान मिळवितें. पूर्वी सांगितल्याप्रमाणें संसिद्धीच ती ही भूमिका जिंकल्यावर पुरुषच एक जो सर्वत्र पूर्ण झालेला तो पुरुष प्रकार लाभतो कसा तें आतां सांगतो—** ओव्या ९३६–९५५

अहो, आत्मा पाहिला नाहीं (अनुभविलेला नाहीं शास्त्रोक्त कृत नव्हे, आत्मा ठरविलेला नाहीं) तोंपर्यंत तें कर्म करणें राहील काय ! कर्म करणें, [कर्म करणारे, कृत्य साधन, हेतु, कारण, शरीर, इंद्रिय, ताल, तें राहील काय ? कसें बरें तें राहील, उभे होईल तें कां किंवा कसें ? तसेंच जें करणें म्हणजें हेतु साधन शरीर. (आहे)] तें तेथें तर अहो अगोदर केवढे तरी आयास [(आहेत) श्रम, कष्ट, थकवा, दुःख, शोक, चंचलपणा] आधीं असणार ते ! (९३६)

म्हणून भलत्याहि, आवडेल त्या, वाटेल त्या, कोणत्याहि एकाद्या, कर्मामध्यें, (कर्म करणारा तो कार्यव्यग्र होणारा, उद्योग पाहाणारा यज्ञादि कर्मनिष्ठेचे ते कारागिर ते कारागिरी पाहाणारे) जरी तेथें आरंभी (का उपक्रमी शील परिक्षा, उपाय, आरंभ, आगमन तेथें) आयास (दुःख, शोक, चित्ताचा चंचलपणा, थकवा) श्रम, कष्ट, जरी तरी पण अहो स्वधर्मच कीं तो तेथें [स्वाभाविक आपणच कीं, स्वतःचा स्वभाव कीं एक, स्वजातीचे (प्रेम सर्वस्वच एक ह्या स्वभाव जीविताचे तें) स्वतःचे ते स्वभावास घडणें करणे जीवित गोडीचा स्वभाव तोच स्वतःचा स्वभाव तो आरंभाचा केला तर सांग बरें तेथें कसला तरी का] पाप का दोष असावा कां तो ?

**"आयास श्रम हे कायिक वाचिक मानसिक तसेंच सत्व रज तमात्मक—**
**देव, मनुष्य, गंधर्व (राक्षस) इत्यादि गणांचे—**
**स्वर्ग मृत्यु पाताळ लोकींचे—**
**ब्राह्मण क्षत्रिय वैश्य इत्यादि वर्णाचे—**

असें अनेक तऱ्हांनीं अनेक प्रकारचे झाल्यानें तेथें दैन्य दुःख, शोक, चांचल्य, थकावट, कष्टाचे परिणाम, हे विविधतेने असल्याकारणानें तेथें एका ह्या श्रम, परिश्रम, आस्था, विवंचना, इत्यादींनी प्रकारचें होणारे असल्यानें ह्या श्रम शब्दामध्यें बाकीच्या श्रमाची भेसळ झाल्याकारणानें ते परिणाम करणारे तें पाहाण्याचें केलें तर अवजडपणच ह्या स्वभावाचे ते उचलिले जातच नाहीं. म्हणून आपली स्वतःची किंमत मुळीं ह्या भावानें उपयोजनेस यावीच असें ते आहे व तरच मग स्वभाव हाच उत्तमतेचा असा व्हावाच तो मग देवतुल्यच जसा का आपणच सर्व जगाचा जीव झालेला–का जगच मुळीं ह्या एकाच जीवदशेचें केलेलें तें आपल्या प्रेमाच्या सम पातळीस आल्यानें एक प्रेमच तें पाहू करणारें होतें व ह्या प्रीति प्रेमावरच कीं हा जीविताचा रंग जीवनकलेस हुशारीस आणून दुःख शोक इत्यादींना विसरण्यास लावतो. व एक प्रेमच तें पाहूं करतो. तेथें मग जीवित गोडी हीच जोडीची करावीच असा प्रश्रिमाचा एक उद्योगच पुढें करून त्या त्या कामात रत होण्यास लावतो असें तें आहे.

म्हणून हें जें अनेक शब्दांनीं दर्शविलेलें श्रमाचें होणें तें पाहून गडबडूं नये, गोंधळू नयें घाबरून जाऊ नये तर अहो असें हें प्रारब्ध वैचित्र्याचें रंग व्यक्ति व्यक्तिगणिक निरनिराळेपणानें जीवित जीवन हें अनेक छटांचें झालेलें, तेथें (वैराग्यच एक निरिच्छता, निष्कामता, हींच) हे सर्व प्रकार, एका वैराग्यानेंच

उचलिले होतात, वैराग्य ह्या शब्दाचा अर्थच मुळीं, 'एकांतच' ह्या जीवजोडीचा तो, त्याचे म्हणणें तें पाहावेंच, ऐकावेंच व मगच सुटका, ह्या इतर विपरीततेच्या विपर्यासाचे नाहींसे होण्यानें, पाहविली जाणारी होय. (९३७)

येथें आतां वाटा, मार्ग, (रस्ते, तऱ्हा, रीत, प्रकार) हे उजविले (योग्य केले, उपजविले, जन्मविले, उठावण्याचे) करून चालणे करावे (तर तेथें पाय हे शिणले होतात पायच शिणवावे दमवावे, असें केव्हांहि होणारच, पण ते शिणणें जरी तरी एका सुखाचें असेंच होणारें असल्यानें, स्वभाव सांपडल्याने जीवित प्रेम हें प्रीतीस पाहूं लागतें म्हणून) पाय हे शिणवावे जरी म्हटलें तरी ते मार्ग योग्यतेचे असें होतात–एरव्ही असे ते वाट दुरुस्त करण्याचें नच केले व आडरानामध्यें धांवण्याचें जर कां झालें तरीहीपण तेथेही ते पायाचें शिणणें हें आहेच कीं. (९३८)

अहो दगडासारखें होणें नेहमींच, दगडासारखें होणें, तें तर व्याधिच एक पुढें करते तेथें हेंहीपण एक दडपणच का ओझेंच. ह्या स्वभावावर बसणारे अथवा आपली शिदोरी का प्रवासास लागणारी अन्नसामुग्री घेऊन चालणें हेही ओझेंच जरी वाटले तरी पण तेथें असें चालतां चालतां, ओझें वाहाता वाहाताच कीं एका विसाव्यांतच हे धनंजया मिळून जाणें होतें ना? असें विसाव्यातच ज्यायोगें मिळून जाणें होईल तेवढेंच किंवा तेंच कीं अहो ध्यावेंच ध्यावें, आचरावेंच आचरावें, घेण्यादेण्याचें करावेंच करावें. (९३९)

येव्हवी पाहिले तर काय कण म्हणजे धान्य कांडले अथवा भुसा कांडला तर तेथें सांडी, मांडी करणें म्हणजे घेऊन का नको अशा निवडानिवडीचें करीत बसणें, करणेंचे केलें तर तेथें सोस श्रम हव्यास पहावा तो दोहीकडे सारखाच कीं–पण उदईकपर्यंत नच टिकणारे तें उद्यां पाहातां येईल असे तें–लांबणीवर टाकण्याचे तें ह्या जीव ऊर्मी का विकारांना तेव्हांचे तेव्हांच का जेथल्या तेथेंच तें एक जें उपयोगास घेणें क्रियेचे करणें तेंच मुळीं कीं अहो हविच एक ह्या अग्निरूपी जीवन ज्योतीसच अर्पण केलें असें होय–अहो मन हें पाहावें तें जेथें तेथें पडणारें. ज्या त्यावर जाणारें असें तें कुत्र्यासारखें म्हटलेलें तें तेथें ह्या मांसवसादि विकारांना जे जीवधर्माचे पुरविणें का परिपाक निष्पत्तीची ती खटपट ते श्रम तेचमुळीं त्या विकाररूपी विचित्रतेच्या आगीसच मुळीं शमन करणारे असे ते हवि नव्हेत काय? तेथें हव्य (कव्य) असें म्हटलेलें जें तेच मुळीं ह्या (हव्य तें देवांना व कव्य ते पितरांना दिलें जाणारे अन्न देव पितृधर्म प्रकृति पुरूषाचे आदिकारण जो पितामह हाच मुळीं ही सर्व प्रकृति जगत् जगाची आदी तेथें जो ह्या) जीवदशेचा संघात पिंड ह्या पंचमहा-भूतांच्या सूक्ष्मतेच्या तन्मात्रांचा बनलेला तेथें तें हविचे देणेंच दिलें असें होय. (हविः=हवनीय द्रव्य, तूप, होम, अन्न. हव्यं=(१) आहुति. हविर्द्रव्य. (२) देण्याचे अन्न. (४) तूप. (४) होम. हव्यपाकः, हव्यवाहः, हव्यवानः=अग्नि.) (९४०)

हे विचक्षणा, म्हणजे दूरदर्शी, कुशल अशा विद्वान अर्जुना! दही घुसळणे (आंत पाणि घालून ताकच जसें का करणें) अथवा सर्वैयैव पाण्याचे एक ते घुसळणे तेथें व्यापार, कर्म करणें ते घुसळण्याचें तें कांहीं का फरकाचें असें नसून तें सारखेच कीं घाण्यामध्यें घालून गाळणें ते तेथें ह्या देहाबरोबरच प्रारब्ध असणारे कर्म वाळुचे तिमिराचे त्रितापरूपी वाळूचें का टिळ्याचे अथवा तिळाचें तेल काढणे तें तेथें व्यापारानें असणें गाळणे करणें तें सारखेंच ना! हीं दोन्ही कामें एकच कीं— (९४१)

पण नित्य होम, (तूप, अन्न, हवनींय द्रव्य, हविः देवांना) देण्याकरितां जो कांहीं अग्नि फुंकण्याचें होतें. अथवा दुसऱ्या कामासाठीं जें कांहीं विस्तव पेटविणें होतें, तेथें फुंकताना जें कांहीं हे धनंजया! (वाहाणें, उचलणें धारण करणें होतें–तें दोहीकडे म्हणजे होमासाठीं का दुसऱ्या कामासाठीं–तें तर साहाणेंच तें होय–तेथें द्रव्य, शक्ति तेज, धू.) धूम, सहन करणें, तेंच मुळीं येथें सहन करणें [ह्या सोसण्यास, क्षमा

करण्यास का सहनशीलतेस–तेथें सहर्षे म्हणजे स्पर्धा हीच मुख्यत्वेंकरून परिणाम करणारी जरी तेंच की अहो ! साहाणें म्हटलें–साम्नं म्हणजे डोळयांत पाणि आणून की, तें साहाणें, सोसलें, जिंकले, तेंच खरें सहनशीलतेचें जाण.] (९४२)

येथें आतां धर्मपत्नि जी देवतांना साक्षी ठेवून वरलेली, तिजमध्यें व धांगडी जी वेश्याच एक, पर अंगना म्हटली तेथें ह्या दोहींना पोसतांना, जरि एकसारखाच ओढा तरी पण तेथें आपल्या अंगावर एक अपकीर्ती, पाप, अथवा गैरवर्तन, तें का बरें ओढून घ्यावें ? (तेथें घातकीपण, नीचपण, ब्रह्महत्येचें अशुभ तें का बरें ! बळेंच आपल्या अंगावर ओढून घेण्याचें करावें तें ! !) (९४३)

अहो शत्रूस पाठ दाखविण्यानें घावच एक पाठीवर बसणार, (पाठीस लागलेली घाई जखमच की जशीं कां) तेथें मरण हें केव्हांहि चुकणारें नव्हेंच ! तर मग शत्रूंशीं समोरासमोर होऊन दोन हात केल्यास काय वाईट ? तेथें आपलें आगळेपण का वरचढपण हें दाखवून दिलें व्हावेंच की ती मरणाहून अधिक स्वर्गप्राप्ति व्हावी म्हणून ! ! ! (९४४)

कुलीन स्त्री ही दांडग्याच्या घाये म्हणजे माराच्या भीतीमुळें कीं आपलें घरदार सोडून दुसऱ्याच्या घरांत शिरली, व तेथेंहीपण तिला जर तेच दांडग्याचे घाव पुन्हां सोसावे लागले तर मग तिने की अहो आपल्या नवऱ्यास (म्हणजे स्वपतीस) तर व्यर्थच की सांडिलें, (त्याजिलें, त्यागिलें) असें नव्हे काय ? (९४५)

तसें जें कांहीं आवडतें तेंच करणें आहे. तेथें क्रिया ती स्वतः शिणल्याशिवाय निपजतच नाहीं तर मग विहित जें अहो ! आपणच निर्माण केलेलें, ठरविलेलें, असें योग्य, (असे नियम का दैवच) तें तेथें अरे ! बाबा ! सांग की तें कोणत्या त्या बोलानें भारी म्हणजे कठीण का अवघड अथवा जड म्हटलें जातें तें– (आवडतें क्रीडा, रतता, गानकुशल, कर्णमधूर, मनोहर, सुश्राव्य, अनुरक्तता, आसक्तपण, रमविणें, चित्र काढणें, रंग देणें, खुष करणें, सुखविणें, मनोविकार, उत्तेजन, ते बोलणें, सांगणें, व्यक्त करणें जें) बोलणें संमतीचें तेथें प्रिय इष्ट संमती देणारा का नवरा म्हणा तो तोच होऊन असावें की. (९४६)

[**मिथुन जोडपे**, एकी मैथुनिका, लग्नसंबंध व मैथुनीभाव, संभोग, तेथें मिलाफ, विवाह, जुगणें, रतिसंभोग–तेथें सर्वभूतांना अभय देणेंच जसें. का मैत्रायणं तें, स्नेहमित्र, सख्य, संबंध, एका मित्राप्रमाणें, स्नेहयुक्त, सत्पात्रतेचें होणें जें,–येथें आतां **बुद्धिचें गुण ते** म्हणजे शुश्रुषा, श्रवण, ग्रहण, धारण, चिंतन, ऊहापोह, अर्थविज्ञान व तत्त्वज्ञान हे होत. तसेंच **मैथुनाची आंगे ती**–स्मरण, कीर्तन, खेळणें, पाहणें, गुह्यभाषण, चिंतन, निश्चय, व संभोग–ही होत, येथें **अष्टगुण** म्हणजे आठपट, **ब्राह्मणाचे आठ गुण** ते दया, क्षमा, क्षांति, अनसूया (हेवा न करणें जे) शौच, असायास, मंगल, अकापण्यं, व अस्पृह हे होत. येथें **अष्टमूर्ति** त्या–शंकर, (पृथ्वी, जल, तेज, वायू, आकाश, सूर्य, चंद्र व ऋत्विज) शुभाशुभ फल देणाऱ्या पार्वतीच्या सख्या **अष्ट योगिनी** म्हटल्या त्या मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा व संकटा ह्या होत–(**अष्टमधू**–माक्षिक, भ्रामर, क्षौद्र, पातिक, छात्रक, अर्घ्य, ओदाल, दाल)].

(१) ज्यायोगें कीं, ह्या जीवितास तर अक्षय्यत्वच अविनाशीपणच लाभलें, होते. परमात्म्याचा लाभ झाला असें होतें. अक्षय्यत्व तें अनंत, असंख्य असे, क्षय न पावणारें (अक्षय म्हणजे शाश्वत (प्रत्यक्ष समोर असलेला डोळा, इंद्रिय उत्पन्न करणारा का संबंधीं.) (२) तेथें थोडेही जरी अमृत घेण्याचें करतांनां सर्वस्व जरी हे पांडुसुता वेंचलें खर्च झालें तरी होवो. (९४७)

ह्याशिवाय इतर दुसरे जें कांहीं एक करणें तेथें कशासाठीं बरें (आपलें सर्व कांहीं तें) मोलानेंच कीं, (सर्व मोल वेंचून खर्च करून–आपलें जीवित सर्वस्वाचें मोल तेंच खर्च करून जें कांहीं कदाचित्) विषच

की घेऊन-(का विषय विषच की, मोल देऊन घेतले, व) पिण्याचे केले तर त्यायोगें मरून जाणेंच एक होणारें तें तेथें अहो! आत्महत्याच की एक जी तींतच निमून जाणें केलें जसें-[तेथें अहो! स्वहित न जाणणारा तोंच मुळीं, की, आत्महत्या करणारा म्हटला! अहो तो पुजारीच जसा का एक परलोकी दुःख भोगतो. स्वतः योग्य होणें केल्यानें कां योग्य होण्याचा प्रयत्न न केल्यानें पदरांत येणारे तें असमर्थपण त्या देहधारणेचे म्हणजेच जगाचें म्हटलें. तेथें स्वतःच्या तंत्रानें चालण्यास समर्थता अंगी बाणवून घेतली नसल्यानें तेथें वरीलप्रमाणें स्वहित आणणें तें कसचें होणारें तें तसेंच आत्म्यानें आत्मा स्वाधीन करावा असें जें कांहीं तेथें दीनपणा बाळगल्यानें अनियंत्रितता का अनधिकारीपणा येणारा जो म्हणून दीनपण दीनपणा ते परतंत्र असें नच दैवाचे ते तेथें स्वतंत्रता का सर्व श्रेष्ठ असें म्हणणेच स्वाधीन असें नसल्यानें शोभत नाहीं. म्हणून ज्यायोगें देह हे समर्थ होईल ज्या साधनाच्यायोगेंकरून ते तें साधन सिद्ध असेंच करून असणें तरच बरें! अहो की.] (९४८)

तसें तें स्वहित न जाणणें जें, तेथें इंद्रियें ही आटोपली जाच केली. (फार श्रम सायास करून थकविली थकवाच एक सर्व अशी केली. व्यायामिली ओढाताण केली गेली ताणली गेली आयुष्याचे दिवसच्या दिवस वेंचले खर्च केले, अहो स्वहित न जाणून चाललेले पाय ते सांचलेले, पापच की एक! तेथें एक दुःखावाचून दुसरें तिसरें कांहीं तरी असेल काय? तेथें दुःखच एक सर्व! (९४९)

## मुमुक्षुची साधनसंपन्नता व मुक्तावस्थेचें वर्णन— ओव्या ९५०-११००

ज्या स्वधर्माचे आचरण (करावेंच) केलें असतां तो जन्ममरण दुःख संसारशीण नाहींसा करून योग्य अशा धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांतील श्रेष्ठ पुरुषार्थ की मोक्ष तो देईल.

असें आहे म्हणून करावाच की अहो स्वधर्म जो स्वाभाविक भाषण स्वतःच्या आपल्या स्वभावाचे व्हावें सजातीय तो धर्म आचरावा की जो केला असतां आचरला असतां वागविला का क्रियेचा केला असतां श्रम जे जे म्हणून होणारे ते ते तो सर्व नाहींसे करतो हरून घेतो व सुख देतो.) अहो या नरतनुचे जे उचित योग्य भाग्य दैव तेच की अहो! तो श्रेष्ठ असा पुरुषार्थ तो शोभणारा राजाच की, अहो (ह्या धर्म, अर्थ, काम, मोक्ष ह्या चारी वस्तूच्या चारी पुरुषार्थाच्याठायीं आपलें स्वामित्व पत्करून असलेल्या) तो मोक्षच एक पदरांत टाकील. कीं, अथवा तेथें प्रयत्नच की, एक तो ह्या पुरुषावरच, पुरुषकारावरच उभा होईल की. (९५०)

याजकरितां हे कीरीटी अर्जुना निश्चित वश झालेले, उपदेश विशेषाचें असें बोलणें-देवस्तुति वाक्यच जसें असें तें बोलणें तें म्हणजे स्वधर्माची राहाणी राहाटी ही केव्हांहि विसरूं नये-(नच विसंबावें) असा संकटकाळी सिद्ध मंत्रच की, तो (तो तर केव्हांहि नच विसंबिला का विसरला होतो. त्याप्रमाणें स्वकर्माच्या राहाटीस योग्य क्रिया आपण स्वतःच त्या तेथें राहाटणें-आचरण्यास वागविण्यास केव्हांही (कधींहीं) विसरूं नये, विसंबू नये हो! राहाटीमध्यें गर्दीच की एक नेहमीं असलेली.) (९५१)

स्वकर्म क्रिया कौशल्यानें वागविणारी जी (लिंगरूप) बुद्धि तीच येथें विसंबू नको, आदराची कर विसरूं नको जसा समुद्री असतां कां उदधि तरून जाणें आहे तेथें (नाम कवच) नांव नच विसरली होणारी; का महत् व्याधि तेथें दिव्य अशी जी रामनाम रसायन औषधी ती तर केव्हांही नच विसंबावी जसें, तसें येथें स्वकर्मामध्यें विचार, अंतःकरणशक्ति, बुद्धि ती लावावी, का तितक्या आंचेनें कर्म आचरावें, ते विसंबू नये. (९५२)

मग हे कपिध्वजा ! ह्याच की अहो (पुरुषाच्या पूजेनें ह्या) स्वकर्म क्रियानी महापूजाच केली तेथें ईश, ईश्वर तोच की अहो संतोष पावला होतो. रजोगुण व तमोगुण हे झाडले गेल्यानें की ह्या स्वकर्माच्या महापुजेनें रज व तम (झड) झाडा करून झाडून टाकून ईश तोषला होतो. (९५३)

पवित्र अशा स्वभाव उत्साहानें शुद्ध सत्वाच्या वांटानी आपली उत्कंठा ती वाढवितो तेथें मग भाव कां स्वर्ग हे तर कालकूट विषाप्रमाणेंच कीं वाटतात. (९५४)

वैराग्य अशा बोलानें जें कांहीं संसिद्धिचें रूप करून सांगितलें (बोलले दाखविले) बहुत काय पण तेथें वैराग्यच कीं एक संसिद्ध झालें असें आपलें स्थान मिळविते प्राप्त करून घेते. शुद्धबुद्धि–चित्तशुद्धि योगक्रिया सिद्धि हीच मुळीं, तें वैराग्य होय स्थिर असें तें वैराग्य येथें महत् स्थान पावून असतें. (९५५)

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥**

सिद्धि = (संसिद्धिम्) = स्वभावसिद्धि, साफल्य, मोक्ष, स्वभाव, दैवी शक्ति, उपयुक्तता, पावित्र्य, अदृश्य होणें, सत्यता. असक्त बुद्धिः = (असक्त = विलंब न लावतां, अकुंठित, उदासीन, न गुंतलेला) निःशंकपणें, बेलाशक, आसक्ति न ठेवता, एकसारखी, बुद्धि योजणारा. सर्वत्र = सर्व ठिकाणी : जितात्मा = (जित + आत्मन्, जित + इंद्रिय) = आत्मसंयमी. (जित काशिन् = जयानें शोभणारा, अजिंक्य म्हणून मिरवणारा, जितनेम्रिः = पिंपळाची काठी.) विगतस्पृहः = नाहींशी झालेली इच्छा ज्याची. (अंधुक, निस्तेज, मृत, वांछनीय ते, श्लाघ्य स्तुत्य ते, उत्सुकतेनें इच्छिणे ते.) नैष्कर्म्य = आत्मज्ञान, कर्मयुक्तता. (आळस ? नैष्कृतिक.) सिद्धिं परमां = परमां तत्परतां–उच्च, श्रेष्ठ, मुख्य, श्रेष्ठ ध्येयाची, पराकाष्ठेची सिद्धि, संपादन, फल सिद्धता, पूर्णता, पूर्ण ज्ञान, कर्ज फेडणें तें.संन्यासेन = (संन्यास) = (कर्मफलत्यागानें) काम्यकर्मत्यागानें, त्याग, ठेव, (अकस्मित मृत्यू (संन्यास) ??? अधिगच्छति = मिळवितो, जवळ जातो, शिकतो, समजून घेतो, पति करतो :

अन्वय :—सर्वत्र असक्त बुद्धिः । जितात्मा । विगत स्पृहः । संन्यासेन । परमां नैष्कर्म्य सिद्धिं । अधिगच्छति ॥ ४९ ॥

अर्थ :—सर्वाठायीं अनासक्ति अशा बुद्धिचा, ज्यानें आपला आत्माच जिंकला आहे, आत्मबुद्धीचा जो झाला आहे, आत्माच एक सर्व आहे अशा बुद्धिचा, असा निरिच्छ, संन्यासानें तत्परतेची सर्व एक अशी 'नैष्कर्म्य सिद्धि' मिळवितो सिद्धीच्या योग्य होतो : (श्लोक ४९ वा ओव्या ९५६–९८४)

**मग जिंतल्या हे भोय । पुरुष सर्वत्र जैसा होय ।**
**कां जालाहि जे लाहे । ते आतां सांगो ॥ ९५६ ॥**

**तरी देहादिक हे संसारे । सर्वही मांडिलेसे जे फुकिरे ।**
**तेथ नातुडे ते वागुरे । वारा जैसा ॥ ९५७ ॥**

**पै परिपाकाचिये वेळे । फळे देठ ना देठु फळे ।**
**न धरे तैसे स्नेह खुळे । सर्वत्र होय ॥ ९५८ ॥**

**पुत्र वित्त कलत्र । हे जालयाही स्वतंत्र ।**
**माझें न म्हणे पात्र । विषाचे जैसे ॥ ९५९ ॥**

**हे असो विषयजाति । बुद्धि पाळली पेसी माघोती ।**
**पाऊल घेऊनि एकांती । हृदयाचां रिघे ॥ ९६० ॥**

ऐसलया अंतःकरण । बाह्य येता तयाची आण ।
न मोडी समर्था मेण । दासी जसी ॥ ९६१ ॥
ऐसे ऐक्याचिये मुठि । माजिवडे चित्त किरीटि ।
करूनि वेंघी नेहटी । आत्मयाच्या ॥ ९६२ ॥
म्हणोनी नियमला मानसी । स्पृहा नाशौनि जाय आपैसी ।
किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥ ९६३ ॥
तेव्हां दृष्टादृष्ट स्पृहे । निमणे जालेचि आहे ।
आगी दडपिली धुये । राहिजे जैसे ॥ ९६४ ॥
पै अन्यथा बोधु आघवा । मावळोनि तया पांडवा ।
बोध मात्रीचि जिवा । ठावो होय ॥ ९६५ ॥
धारवणी वेंचे सरे । तैसे भोगे प्राचीन पुरे ।
न वर्ते तंव नुपकरे । कांहीचि करू ॥ ९६६ ॥
ऐसी कर्मसाम्य दशा । होय तेथ वीरेशा ।
(मग) श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ॥ ९६७ ॥
रात्रीचि चौपाहारि । वेंचलिया अवधारि ।
डोळ्या तमारि । मिळे जैसा ॥ ९६८ ॥
कां येऊनि फळाचा घडु । पारूषवी केळीचा वाढु ।
श्रीगुरू भेटोनि करी पाडु । बुभुत्सु (मुमुक्षु) जैसा ॥ ९६९ ॥
मग आलिंगिला पौर्णिमा । (तैसा) उणीव सांडी चंद्रमा ।
तैसे होय वीरोत्तमा । श्रीगुरुकृपा तया ॥ ९७० ॥
तेव्हां अबोध मात्र असे । ते तंव तया कृपा नाशे ।
तेथ रात्री सवे जैसे । अंधारे जाय ॥ ९७१ ॥
तैसी अबोधाचिये कुसी । कर्म कर्ता कार्य ऐसी ।
त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली ॥ ९७२ ॥
तैसे अबोध नाशासवे । नाशे क्रियाजात आघवे ।
ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ॥ ९७३ ॥
येणे मूळ ज्ञान संन्यासे । दृश्याचा ठावो जेथ पुसे ।
तेथ बुझावे ते आपैसे । तोचि आहे ॥ ९७४ ॥
चेईलिया वरि पाहीं । स्वप्नीचे ते डोही ।
आपणियाते काइ । काढू जाइजे ॥ ९७५ ॥
तै मी नेणे आतां जाणेन । हे सरले तया स्वप्न ।
जाला ज्ञातृ ज्ञेय विहीन । चिदाकाश ॥ ९७६ ॥
मुखा भासेसी आरिसा । परौता नेलया वीरेशा ।
पाहातपणे विण जैसा । पाहाते ठाके ॥ ९७७ ॥
तैसे नेणणे जे गेले । तेणे जाणणेही नेले ।
मग निष्क्रीय (निःक्रिय) उरले । चिन्मात्र जे ॥ ९७८ ॥
तेथ स्वभावे धनंजया । नाही कोणहीही क्रिया ।
म्हणोनि प्रवादु तया । नैष्कर्म्य ऐसा ॥ ९७९ ॥

**ते आपुले आपणपे । असतेची होउनि आरोपे (हारपे) ।**
**तरंगु का वायु लोपे । समुद्र जैसा ॥ ९८० ॥**
**तैसे न होणे निफजे । ते नैष्कर्म सिद्धि म्हणिजे ।**
**सर्वाहि सिद्धि साहजे । परम हेची ॥ ९८१ ॥**
**देऊळाचीया कामा कळसु । परम गंगे सिंधुप्रवेशु ।**
**का सुवर्ण शुद्धी कळसु । सोळावा जैसा ॥ ९८२ ॥**
**तैसे आपुले नेणणे । फेडिजे कां जाणणे ।**
**तेहि गिळूनि असणे ऐसी जे दशा ॥ ९८३ ॥**
**येर परते कांहीं । निफजणे येथे नाही ।**
**म्हणौनि म्हणिपे पाही । परम सिद्धी ते ॥ ९८४ ॥**

जिंतलया–जिंतिलिया. भोय–भोये=वैराग्य भूमिका. (९५६) फुकिरे (फुक–पक्षी, कीर=पोपट, मांस)–गुंफिरे (गुंफ=बांधणे, गुंफणे, रचना, बाहूभूषण, कल्ले.)=जाळे. ते तो. वागुरे=जाळ्यामध्यें. संसारे=[सृ+सं=स्थितिला जाणे, जवळ जाणे, एकत्र करणें, शिरकवणें, करविणें, गरगर फिरविणें, आंत घालणें, (मंगलमूर्ती) शब्द संसारांत जे. (९५७) फळे देठ ना देठु फळे–फळ देठे ना देठ फळे. (स्नेह) खुळे=निर्जीव. (९५८) जालयाहि–जालियाही. (९५९) विषय जाति–विषय जाती. पाळली–पोळली. पाउल–पाउले. (९६०) बाह्ये येता–बाह्य येता. अण–आण. (९६१) मुटि–मुठी=मुठीमध्यें, मुठींत. आत्मयाच्या वेधी नेहटी=आत्म्याच्या छंदाला लावते. (९६२) नियमला–नियमिलिया (९६३) दृष्टादृष्टस्पृहे निमणे=इहलोकीच्या व परलोकीच्या भोगाच्या वासनेचा नाश. दडपिली–दडपलिया. धुमे=धुरानें. (९६४) अन्यथा बोध=विपरीत ज्ञान. जिवा–जीवा. (९६५) घारवणी–घरवणी=सांचविलेले पाणी. न वर्ते–नवे. (९६६) कर्म साम्य–कर्मे साम्य. (९६७) चौपाहरि–चौपाहारी, वेंचलया–वेंचलिया. (९६८) पारूषवी=खुंटवितो. पाड=योग्य. बुभुत्सु बुभुषुत्सु (बुभुषु=भरमसाट इच्छिणारा.)–मुमुक्षु=मोक्ष इच्छिणारा. (९६९) आलंगिला पौर्णिमे–आलंगिला पूर्णिमा. (९७०) ते–तो. रात्रीसवे–निशीसवे. अंधारे–आंधारे. (९७१) गामिणी=गर्भार स्त्री. [गर्भ=पोट जोडणें: देवळाचा गाभारा, अंतर्भाग, मध्य, अन्य, विस्तव, (स्त्री=बायको, मादी, पत्नि, स्त्रीलिंग. स्त्री घोष=सकाळ. स्त्रीधर्मिणी=रजस्वला, स्त्रीस्वभाव=खोजा.) गर्भिणी आवेक्षणं=बाल संगोपन, गर्भित=काव्य दोष विशेष=त्रिपुटी [त्रिपुट तिकोनी, बाण, तळहात, तीर, वाटाणा (व.) एलची त्रिपुटिन्=एरंड.] जी कर्म, कर्ता, कार्य अशी अंतर्भागी का पोटामध्यें असलेली कर्म कर्ता कार्यरूपी गर्भारपणाची ती त्रिपुटीची पीडा नाहिंशी केली, जेरीस आणिली पराजयाची केली, हाणून पाडली. (९७२) अबोध नाशासवे=(अबोध=अज्ञान.) अज्ञानाच्या नाशाबरोबर (९७३) मूळ–समूळ. तेचि आहे–तोचि आहे. (९७४) स्वप्निचे ते–स्वप्निचिया तिये–(९७५) स्वप्न–दुःस्वप्न. ज्ञातृज्ञेये विहीन चिदाकाश–ज्ञातृज्ञेया विहीन चिदाकार. (९७६) मुखाभासेसी=प्रतिबिंबासगट. परौता नेलया–परता नेलिया. पाहातपणेवीण. पाहाते ढाके–पाहाता ठाके=उरतो, राहातो. (९७७) निःष्क्रिय. चिन्मात्र जे–चिन्मात्रचि. (९७८) कोण्हीही–कोणीचि. प्रवादु=नांव. (९७९) असतेचि–असतचि. आरोपे–हारपे. (९८०) म्हणिजे–जाणिजे, सर्वाहिसिद्धि साहजे–सर्वसिद्धीत सहजे. (९८१) परम गंगे–उपरम गंगेसी. (कळस) कस. (९८२) येर–तिये. निफजणे–निपजणें–आन. (९८४)

तेथें मग ही जी वैराग्य=पायरी, फळा, रचना, शोभा, भूषविणें, स्थान, आसन, मर्यादा–जमीन, भूई–भोय (भूयस्=समृद्ध, पूर्ण, अतिशय,) भूमिका ती त्यानें जिंकिली असता पुरूषच एक सर्वत्र व्यापून आहे असें होतें अथवा तोच कीं अहो स्वतःच मुळीं, पुरूषच झाल्यानें जें कांहीं एक त्यास सांपडतें लाभतें (लाहाणें, लाभते) तें आता सांगण्याचें करूं. (९४५)

देह आदिकरून हे स्थितीला आणले जातात, त्यांना स्थिति, अवस्था दिली जाते–तेथें जी जें कांहीं एक जाळेंच गुंफलें होतें, तेथें वारा जसा का एक तसा सांपडतच नाहीं. (९५७)

पण परिपाकाचे वेळेस मात्र फळ हे देठ नसलेलेच होते अथवा देठ हाहीपण फळास चिकटून फळाचा केलेला होत नाहीं–त्याप्रमाणें स्नेह हा (निर्जिवाचा असा) खुळा का वेडा नच होता सर्वाठायींचा सर्वत्रतेचा असा केला होतो. (९५८)

काय पुत्र, काय वित्त, काय कलत्र हे जर का स्वतंत्रतेचे झालें–त्याच्या इच्छेप्रमाणें वागूं लागणारें झालें तरी तेथें तो तें माझे असें मुळींच बोलणें करीत नाहीं जसें का विषय विषाचें पात्रच एक कीं. (९५९)

असें हे असो; पण विषयजात म्हणून जेवढे तेथें बुद्धि ही पण पाळणच कीं एक करून आहे की जशी का, अशी ती बुद्धि, माघारी, मागुतीं कळवूनच कीं हृदयाच्या एकांतामध्येंच वावरणारी केली होते. (९६०)

समर्थ जो आहे त्याच्या भीतीमुळें दासीच जशी का शपथ पाळणारी केव्हांही असतेच तसें तेथें शपथहीपण नच मोडली, वर अंतःकरणाच्या एकांतानेंही पण जाऊन आहे. तेथें बाह्य हे जर का कदाचित आले तर तीही पण शपथ अशा रितीनें केव्हांही पाळलेलीच होत आहे. (९६१)

याप्रमाणें ऐक्याच्या मुठीनें–झांकली मूठ सव्वा लाखाची तेथें चित्त हें माजिवडे हा जीवडा सुभरला करून आत्म्याचा वेध हा नेटानेंच कीं घेऊन असतो. (९६२)

याप्रमाणें मानसामध्येंच नियमिलेला तो तेथें स्पृहा, इच्छा ही तर आपोआपच नाहींशी होते, त्रासून जाते, मागेच पडते, मावळते, बहुत काय पण तो अशी ती योग अथवा वैराग्य भूमिकाच घेऊन असतो, पाहून असतो, मिळवितो. (९६३)

तेव्हां दृष्टादृष्ट म्हणजे इहलोकीच्या व परलोकीच्या भोगाच्या वासनांचा नाश अगदीं सहजच झाला असें होऊन आहे; जसें आग दडपिली गेली म्हणजे धुरानें कां उगी राहावें, कां विस्तव दडपिला गेला व आतां तेथें धूरच एक उरला जसा. (९६४)

एवढेंच नव्हे तर विपरीत ज्ञान, [अन्यथा बोध म्हणजे खोटेपणाचा विचार, (चुकीची जाणीव दुसरी बुद्धि, का उपदेश, अन्यथा नांव)] सर्वच्या सर्व मावळून जाऊन बोधमात्रामध्येंच कीं ह्या जीवास ठावाचें केलें होतें. ज्ञानमात्र, बोधमात्र, निखळ, तेथेंच जीव या आपल्या ठावाचा होतो. (९६५)

(घरवणी) सांचविलेले का सांचवणीचे पाणीच मुळीं तेथें वेंचिलें झाल्यानें संपतें, जसें त्याप्रमाणें भोग भोगण्यानें प्राचीन कर्म हें प्रसन्न होते, पूर्वसंचित पुरतेपणास येतें. नवीन कांहीं करावें असें उगवत नाहीं–उत्पन्न होत नाही. [आतां येथें जर का नच वर्तण्याचें का वागविण्याचें का वागण्याचें केलें तर प्रारब्धाचा भोगवटा भूषविला होत नाहीं, कांहींच मुळीं न करण्यानें तें दैव हें उधळलेली फुलेंच पण, तेथें प्राचीन कर्म, जुनें पूर्वकालचे (पूर्वेकडचा प्रदेश,) तें पुरतें, सरतें व्हावेंच म्हणून भोग भाग्यानें भूषवावेच कीं.] (प्राचीनावीती=अपसव्य जानवें. प्राचीन बर्हिरा=इंद्र.) (९६६)

अशी कर्मसाम्य (म्हणजे दैवसमवृत्ति, पूर्वकर्म एकोपा–इंद्रियतुल्यता–कर्म बरोबरीच झाल्यानें तेथें सर्व एकोपाच मुळीं, समवृत्तिचा अशी) दशा स्थिती अवस्था वयोवस्था–दिव्याची वात जशीं–होते येते दैवाची होते. तेथें मग पूज्य स्वामी, पूर्वजच जसें असें ते श्रीगुरू हे तर आपसुखच–(आपोआपच भेटणारे होतात) भेटतातच. (९६७)

रात्रीच्या चार प्रहरामध्येंच जर जीव (वेंचला, आटविला, लाविला,) जागविला, पहाऱ्याचा केला तर असें समज कीं ह्या डोळयांना सूर्यच कीं आपली मिळवणी करून आहे–तेथें लोचन पाहाणें का डोळा तो तर रविच कीं, जसा भेटला. (९६८)

अथवा असें समज कीं केळीला फळाचा घड येऊन त्यानें तर केळीची वाढच मुळीं खुंटविली–(पारुषौनिया–आहे जशीं–स्वतःसच पाहिलें जसें सोंवळेपणच एक कीं तेथें आलेलें जसे ) तसें कीं अहो, श्रीगुरु भेटल्यानें मुमुक्षुची योग्यताच येते. (मुळीं ती योग्य झालीं. भरंवशास आली. जशीं का मोक्षाची इच्छाच मुळीं ती मोक्षाची होऊन आहे. कीं समृद्धीवर अधिकपणा चाहणारा–भरभराट इच्छिणारा–तो बुभुत्सु उद्योग समृद्धीनेंच मुळीं समृद्धीचा केला जाणारा होतो. तेथें भरभराटच एक (बुभुक्षुत्सु) लढविली गेली कीं, भरंवशानें भरभराटच पाहविली गेली. (९६९)

तेथें जसें का पूर्णचंद्र पौर्णिमेनेंच कीं, आलंगिला गेल्यानें (आपली उणीव एकाद्या कलेनें, पूर्णपण तें पाहविलें होण्याचें राहिलें आहे–अहो गरजा त्याचमुळीं पुरत्या केल्या गेल्यानें,) तेथें आतां उणीव ती कशाचीही राहीली नाहीं. पूर्ण चंद्रच उगवून आंहे अशी हे वीरोत्तमा अर्जुना! श्रीगुरुकृपेमुळें त्यास पूर्णचंद्राची सीमा पाहू लागते. (९७०)

तेव्हां अज्ञानमात्र असें जें जें कांहीं (अबोधमात्राचे तें) तें सर्वच्यासर्व त्या कृपादृष्टीच्या प्रकाशानें (बुद्धिच प्रकाशिली झाल्यानें) नाहींसे होतें जसें कां रात्र नाहींशी झाल्यानें रात्रीबरोबरच मुळीं अज्ञान–अंधारें तीं नाहींशी झालीं, मावळली कीं होतात. (९७१)

त्याप्रमाणें अज्ञानाच्या कुसी–पोटी जी कांहीं एक कर्म, कर्ता, कार्य अशी त्रिपुटी (तळहात अथवा बाणच एकतो जी) असते तीच मुळीं जशीं का अज्ञानाच्या पोटीची कुसीची–कर्मसाठण गामीण प्रकृति–ती वारिली–मारिली गेली, निर्जीवतेची केली जशी कां : (९७२)

तसें (अबोध म्हणजे) अज्ञान नाशाबरोबरच कीं, अवघे सर्व क्रियाजात–(कर्मकौशल्य, तप, स्वाध्याय, ईश्वर प्रणिधानादि सर्व कांहीं शिक्षण, विचार, पूजा धर्मकृत्य, प्रायश्चित्तादि सर्व) नाहींसे होतें, नाश पावते, असा समूळ (म्हणजे मुळासकट काम्य) कर्मत्याग, संन्यास, संभवतो. (उत्पन्न होतो, समर्थतेनें असतो, संभोग सेवन केला होतो, उपभोगला होतो, पूजा सत्काराचा होतो, मानला जातो, समजला होतो, जवळच येतो.) (९७३)

अशा त्या (आदिकारण ज्ञानेंद्रिय, मूळ हेतू, बुद्धि, मूळ व्यक्ति प्रत–त्याच्या म्हणजे) मूळ ज्ञानाच्या काम्यकर्म संन्यासानें–त्यागानें–जेथें का दृश्याचा (म्हणजे दिसणारे जे कांहीं त्याचा का सुंदर जें कांहीं त्याचा) ठाव मुळीं–पुसला होतो (नाहींसा होतो,) तेथें समजावें, जाणावें (का बुझावें) जें कांहीं तेच मुळीं तो (आपोआपच कीं) स्वतःच आपण आहेच आहे. (९७४)

जागे झाल्यावर डोहामध्यें पडलेल्या स्वप्नीच्या डोहामधून कसें स्वतःस काढूं जाणें होतें–कसें तें शक्य आहे कां. (९७५)

अहो तेव्हां तर मी नेणताच होतो पण आतां मात्र तेथीलची ती गोष्ट जाणण्याची करीन असे जे दुष्ट स्वप्न एक जे पडत होतें ते संपले व तो जाणणारा व जाणण्याची वस्तु या भेदावांचून चिदाकारच की तो एक झाला आहे. (कारण तो तर ज्ञातृज्ञेयविहीन असें चिदाकाशच कीं एक होऊन आहे,) [ज्ञातृ=विद्वान शहाणा, जामीन, ओळखीचा. ज्ञेय=जाणण्यास योग्य. विहीन=रहित असें एक.] [चित्+आत्मन्=परमात्मा, विचारशक्ति. चिन्मय=परमात्मा. शुद्ध चैतन्य. चित्+आभास=जीवात्मा. चित् स्वरूप=ईश्वर, आकारः=आकृतीचे, चेहरा, स्वरूप, चेहऱ्यावरील विकार मुद्रा, सौदर्य, अभिप्राय, खूण, (सांख्य) ऐक्य, ऐक्यज्ञान.] (९७६)

मुखाच्या आभासासहित (आभास=प्रकाश, प्रतिबिंब, सादृश्य, भ्रम, भास, भ्रामक हेतु) आरसा जर बाजूस केला, हे वीरेशा, देखणाऱ्याच्या तर देखणेपणाशिवायच कीं ते देखणें, देखतें, ठाकतें, अथवा झाकले होतें. (९७७)

त्याप्रमाणें नच जाणणे जें नेलें गेलें त्यानें तर जाणणें जें कांहीं तेहीं नेलेंच की; व मग जें कांहीं उरलें तें तर (निष्क्रिय–विहित कर्म न करणारा, ज्ञानी, संन्यासी, ब्रह्म–असे) ज्ञानस्वरूपच चिन्मात्रच असें एक क्रियारहित असें उरलें होतें. [चित् = विचार बुद्धी, मन, ज्ञान, चैतन्य, ब्रह्म. मात्र = ऱ्हस्वोच्चारण काल इन्द्रियवृत्ति, बुद्धि, रूपांतर विकार, इन्द्रीयाचें विषय पदार्थ, महत्त्व अंश, सूक्ष्म, भाग, प्रमाण मर्यादा.] (९७८)

तेथें मग सहज स्वभावेंकरून, हे धनंजया! कोणतीही क्रिया! (कर्मकौशल्य तप इत्यादि) नाहींच आणि म्हणूनच कीं, त्यास (प्रवाद, मिष, वदंता, म्हणजे) नांव जें कांहीं तेथें येतें तें नैष्कर्म्य, (म्हणजे "कर्ममुक्तता" "आत्मज्ञान") असें होय. (९७९)

तें ज्ञान आपुलें स्वतःनेंच आहे असें होऊन हरपतें. त्यांत ज्ञानाचाहि नाश होऊन तें जाणणें आपल्या स्वरूपांत लय पावतें तें जाणणें आपुलें स्वतःचें तें मिथ्या होऊन हारपतें ते स्वतःचें आपलेपण नेहमीं असणारें आप्त स्वरूपच, तें स्वरूपींच लयानें असतें जसें कां तरंग, वायुलोप झाला असतां, समुद्रच कीं होऊन असतो गंभीर असा. (९८०)

आपलेपण, स्वतःचें स्वरूपच तें, स्वरूपीं रुपानें असणें तें जे कां (निपजतें, उगवतें त्यास नैष्कर्म्य सिद्धि, सर्व सिद्धिमध्यें श्रेष्ठ अशी म्हटली.) तसें आरोपणें ब्रह्मसागरावर विवर्त हें जग तेथें ब्रह्मच होऊन असणें होतें. तेव्हां तर ती एक नैष्कर्म्य सिद्धिच म्हटली, सर्वांही सिद्धिवर जी सिद्धि परम अशी. (९८१)

देउळाच्या कामास कळस तो देवळाची परमसीमा होय–जसा कळस सर्वश्रेष्ठ = उपरम जी परमा गंगा, तिचे सिंधूस मिळणें, (सिंधूत प्रवेश) हेंच कीं परम भाग्य; का सुवर्णाची शुद्धि करतां करतां सोळा नंबरचे सुवर्ण म्हणावें तो सर्व सुवर्णाच्या शुद्धीचा कसच एक जसा. (९८२)

तसें आपलें नेणणें (का नेणतेपण) तें काढून टाकावें, फेडावें, तें समजून असावें तसेंच जाणणें म्हणून जें कांहीं आहे तेंहीपण गिळून असावें अशी जी (का अवस्था) दशा. (९८३)

त्या दशेशिवाय आणखी कांहींही येथें निपजत नाहीं, (निपजणारे होत नाहीं, उगवत नाहीं,) आणि म्हणूनच कीं अहो हीच कीं एक परमश्रेष्ठ अशी (नैष्कर्म्यता) सिद्धीच कीं म्हटली होत आहे. (९८४)

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽऽप्नोति निबोध मे।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

यथा ब्रह्म तथा आप्नोति = जसें असतें तसें ते ब्रह्म, तसे तो पावतो. मे निबोध = माझें कळविणें तें, जाणणें तें, (निबोध = समासांती, सदृश, तेज, प्रभा, मिष.) सिद्धि प्राप्तः = सिद्धी मिळालेला, समासेन इव = एकीकरणानें, समुदायेकरून, पूर्ण सारांशतेनें, सलोख्याने जसें ज्ञानस्य = ज्ञानाची जी परम सीमा निष्ठेची. परानिष्ठा = दृढभक्ति, स्थिरता, पूर्णता, (परा + क्रमः = शौर्य, प्रयत्न, उद्योग. *पराञ्चिखानि व्यतृणत् स्वयंभुः। तस्मात् पराङ् पश्यति नो तरात्मन् ।।।*)

अन्वय :—कौंतेय! सिद्धिम् प्राप्तः। ब्रह्म यथा। तथा ब्रह्म आप्नोति। मे निबोध। समासेन इव। (या पराज्ञानस्य निष्ठा)। या ज्ञानस्य परा निष्ठा ॥ ५० ॥

*अर्थ* :—हे कौंतेया! जाणणें जें आहे तें मी कळवितो कीं, जें ब्रह्म म्हणून खरें असें आहे, तें पावलें सिद्धिप्रत आलें,–तें जसें कांहीं आहे, अगदीं तसेंच संपादन झालें–, का तेंच होणें झालें, त्याबद्दल, एकीकरणानें, समुदायत्वेंकरून पूर्ण सारांशतेनें का सलोख्यानेंच की तीच मुळीं, ज्ञानाची पूर्णता, स्थिरता दृढभक्ति परम सीमेची अशी होय. (श्लोक ५० वा ओव्या ९८५–१०११)

परि हेचि आत्मसिद्धि । जो कोण्ही भाग्यनिधि ।
सद्गुरू कृपालब्धि–। काळिपावे ॥ ९८५ ॥
उदैजताचि दिनकरू । प्रकाशचि अंधारू ।
का दीपासवे कापुरू । दीपुची होये ॥ ९८६ ॥
तया लवणाची कणिका । मिळत खेवो उदका ।
उदकचि होऊनि देखा । ठाके जेवि ॥ ९८७ ॥
का निद्रितु चेंवलिया । स्वप्नेसी निज (नीद्र) वाया ।
जाऊनि आपणपया । मिळे जैसा ॥ ९८८ ॥
तैसी जया कोण्हाचेनि दैवे । श्रीगुरु वाक्य श्रवणाचि सवे ।
द्वैत गिळुनि विसंबे । आपणपया वृत्ति ॥ ९८९ ॥
तयासी मग कर्म करणें । हे बोलिजैलचि कवणें ।
आकाशा येणें जाणें । असें काई ॥ ९९० ॥
म्हणौनि तयासी काहीं । त्रिशुद्धि करणें नाहीं ।
परि ऐसे जरी हे कांहीं । नव्हे जया ॥ ९९१ ॥
काना वचनाचिये भेटी । सरिसाचि पैं कीरिटि ।
वस्तु होऊनि उठी । कव्हणी येक जो ॥ ९९२ ॥
येन्हवि स्वकर्माचेनि वन्हि । काम्य निषिद्धाच्या इंधनि ।
रजतमें कीर दोन्हि । जाळिली आधी ॥ ९९३ ॥
पुत्र वित्त परलोकु । या तिहींचा अभिलाखु ।
घरी होय पाइकु । हेही जाले ॥ ९९४ ॥
इंद्रिये सैंरा पदार्थी । रिघता विटाळिली होती ।
तिये प्रत्याहार तीर्थी । न्हाणिली कीर ॥ ९९५ ॥
आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरी अर्पुनि बळ ।
घेऊनि केले अढळ । वैराग्य पद ॥ ९९६ ॥
ऐसी आत्मसाक्षात्कारी । लाभे जयाची (ज्ञानाची) उजरी ।
ते सामग्री कीर पुरी । मेळविली ॥ ९९७ ॥
आणि तेचि समइं । सद्गुरु भेटलियाही ।
तेवीचि तिही काही । वंचिजेना (राखीजेना) ॥ ९९८ ॥
परी वोखद घेत खेंवो । काइ लाभे आपुला थांवो ।
की उदिजताचि देवो । माध्यान्ह होय ॥ ९९९ ॥
सुक्षेत्री आणि वोलटे । बीजही पेरिले गोमटे ।
तरी अलोट फळ भेटे । परि वेळे कि गा ॥ १००० ॥
जोडला मार्गु प्रांजळु । मिनला सुसंगाचाहि मेळु ।
तरि पाविजे वाचुनि वेळु । लागेचि की ॥ १००१ ॥
तैसा वैराग्य लाभु जाला । वरी सद्गुरुही भेटला ।
जिवि अंकुरही फुटला । विवेकाचा ॥ १००२ ॥
तेणे ब्रह्म येक आथि । येर अवघीची भ्रांति ।
हेही कीर प्रतीती । गाढी केले ॥ १००३ ॥

परि तेचि जे ब्रह्म । सर्वात्मक सर्वोत्तम ।
मोक्षाचेही काम । सरे जेथे ॥ १००४ ॥
या तिही अवस्था पोटी । जिरवि जे गा कीरिटि ।
तया ज्ञानासिही मिठी । दे जे वस्तु ॥ १००५ ॥
ऐक्याचे येकपण सरे । जेथ आनंद कणही विरे ।
काहीचि नुरोनि उरे । जे कांही गा ॥ १००६ ॥
तये ब्रह्मी येकपणे । ब्रह्माचि होऊनि असणे ।
ते कर्मे करूनि तेणे । पाविजे पै ॥ १००७ ॥
भुकेलयापाशी । वोगरिले षड्रसी ।
तो तृप्ति प्रतिग्रासी । लाहे जैसी ॥ १००८ ॥
तैसा वैराग्याचा वोलावा । विचाराचा तो दिवा ।
आंबुथिता आत्म ठेवा । काढिजे तो ॥ १००९ ॥
तरी भोगीजे आत्मरिद्धि । येवढिये योग्यतेची सिद्धि ।
जया अंगी निरवधि । लेणे जाली ॥ १०१० ॥
तो जेणे कर्मे ब्रह्म । होणे करी गा सुगम ।
ते या क्रमाचे । आतां वर्म आईक सांगो ॥ १०११ ॥

श्रीसद्गुरू–श्रीगुरू (९८५). अंधारू–आते अंधारू. दीपासवे–दीपसंगे. कापुर–कर्पुर. (९८६) चेंवलिया–चेंवविलिया. नीज–नींद=निद्रा. (९८८). तैसी–तैसे. कोण्हाचेनि–कोण्हासि. गिळुनि–गिळोनि. आपणपया–आपणया विसंबे आपणया वृत्ति=स्वस्वरूपी स्थिर होते. (९८९). करणें–कर्म करणें, असें–आहे. (९९०). त्रिशुद्धि=खरोखर. जरी–जरी हे. (९९१) काना वचनाचिये भेटी=आपले कान व श्रीगुरूचे वचन याच्या भेटीबरोबर. (९९२) वित–वित्त. या–यया. अभिलाख घरी पाइकु होय=ज्याचे घरी अभिलाष, पाईक म्हणजे घरी राबणारा, सेवक झाला. (९९४). प्रत्यहार–प्रत्याहार=इंद्रियाची अंतर्मुखता. (९९५) बळ–सकळ. (९९६) उजरि–उत्कर्ष दशा. (९९७) भेटलयाहि–भेटले. तेही–तिही. (९९८) कइ–काय. ठावो–ठावो. कि–कां. उदिजताचि–उदयजताचि. देवो–दिवो. (९९९) वोलटे=भीज जमिनीत. अलोट=पुष्कळ. (१०००) गाढी–गाढ. (१००३) ब्रह्म–परब्रह्म. जेथे–जेथ. (१००४) या–यया. पोटि–पोटी. (१००५) काहीच–काहीचि. (१००६) तये–तिये. येकपणें–ऐक्यपणें. कर्मे=कर्मेचि. (१००७) भुकेलयापाशी–भुकेलियापाशी. षड्रसी=षड्रसान्न (वाढले.) जैशी–जेवि. (१००८) विचाराचा विवेकाचा. आंबुथिता=प्रदीप्त होणे, पेटणें (अभ्युत्थितः प्रज्वलित) काढिजे तो–काढीचि तो. (१००९) भोगीजे–भोगिजे रिद्धि–ऋद्धि. येवढिये–येवढी. जया–जयाच्या. (१०१०) तेया–तया. (१०११)

कोणी **भाग्यवान सद्गुरूकृपेच्या लाभाचे वेळीं, आत्मसिद्धी पावतो.** सूर्य प्रकाशला कीं अंधारच प्रकाशाचे रूप झाला, दिव्याच्या संगानें कापूर दिवा झाला. मिठाची कणिका पाण्यास मिळतां-क्षणीच पाणीच होऊन जाते जशीं, झोपेतून जागा केला स्वप्नासहित निद्रा जाऊन **आपणा स्वतःस स्वतःसहित भेटतों.** तसें ज्या कोणास दैवयोगानें श्रीगुरूवाक्य श्रवणाबरोबर द्वैत गिळून विश्रांति भेटते, त्यास आपल्या स्ववृत्तिसहित विसांवते. तेथें मग **आकाशानें होणें जाणें नाहीं** म्हणून **त्यास कांहीं करणे नाहीं.** खरें पाहातां असें जरी कांहीं करणें नाहीं असें जरी तरीसुद्धां त्याचेकडून कर्म होतेंच. **कानावचनाच्या भेटीबरोबर वस्तूच ब्रह्मस्वरूप होऊन येतो** जो असा एक तो. एरव्ही **स्वकर्मरूपी** अग्निमध्यें **काम्य व निषिद्धाच्या** काष्टांनीं इंधनामध्यें व **रजतम ही दोन्ही**

**अगोदर नाहिंशी केली** होतात जाळली होतात. **अभिलाष तो घरी पाइक होऊन आहे.** पुत्र, वित्त, परलोक इत्यादींची **इच्छा ही घरी नोकर होऊन आहे. इंद्रिये** पदार्थमात्री सैरा हिंडण्यानें विटाळिली ती **ब्रह्माकारतारूप तीर्थांत न्हाणिली. स्वधर्माचे सकळ फळ ईश्वरी अर्पून वैराग्य पद तें अढळ केलें.** अशीं ज्ञानाची योग्यता उत्कर्ष दशा, **आत्मसाक्षात्कारामध्यें लागणारी सामुग्री** ती **पुरती मिळवून आहे.** त्याच समयीं असें जाण कीं सद्गुरू भेटले. तसेंच चित्तानेंही कांहीं प्रतारणा केली नाहीं पण तूप साखर खाल्ली की रूप यावें का **औषध घेतल्याबरोबर पूर्वप्रकृति आरोग्य भेटावें** का सूर्य उगवल्याबरोबर मध्यान्ह व्हावी असे नाहीं. तेथें उत्तम क्षेत्रामध्यें आणि ओलसर भूमींत चांगलें बीज पेरलें तरी **अत्यंत फळ प्राप्ति होते पण योग्य वेळीं कीं,** सुलभ मार्ग आपलासा केला. साधु संगतीचा मेळ बसला तरी प्राप्ति होण्यास वेळ लागतोच ना? तसा **वैराग्य लाभ** झाल्यावर **सद्गुरू भेटले** जीवामध्यें विवेकाचा अंकूर उगवला फुटला त्यामुळें **एक ब्रह्मच खरें** व **बाकी सर्व** भ्रांति **अशी प्रतीती बळकट केली.** तेंच सर्वात्मक सर्वोत्तम, परब्रह्म मोक्षही येथें पुरता होतो. **मोक्षाचेही काम येथे पुरते होते.** अशा तिन्ही अवस्था (**वैराग्य, विवेक, सद्गुरूभेटी**) पोटी जिरविल्यावर **ज्ञानासही मिठी देते वस्तूंच होऊन असते तेथें ऐक्याचे एकपण संपतें.** वृत्तिगत आनंदाचा अंशही कांहीं नुरून उरतो असें जे कांहीं **ब्रह्मी ऐक्यानें ब्रह्म होऊन असणें** तें **क्रमेकरूनच** प्राप्त होते. भुकेल्यास षड्रस अन्न वाढलें त्यास प्रत्येक घांसामध्यें तृप्ति भेटते जशीं, तसा **वैराग्याचा ओलावा** (बोलवा) **विवेकाचा दिवा** उजळला असतां तो आत्मठेवा बाहेर काढतांच तेव्हां **आत्मऋद्धि भोगावी** अशा मोठ्या थोरल्या योग्यतेची सिध्दी ज्याच्या **अंगीचा अलंकार** होतो तो **ज्या क्रमानें** सुगमतेनें ब्रह्म होणे होतें **त्या क्रमाचें वर्म आतां सांगतो ऐक.**

(ओव्या ९८५-१०११)

पण असें हें कृतकृत्य होणें जें आत्मसिध्दीच जी एक ती तर अहो जो कोणी भाग्यनिधि [भाग्यवान् असा असतो, श्रीगुरूकृपा (उप) लब्धि, प्राप्ति श्रीगुरुकृपा ज्ञान श्रीगुरूकृपा अनुभव! श्रीगुरूकृपा बुद्धि, श्रीगुरुकृपा मिळणें, श्रीगुरूकृपा (अंदाजाच्या) वेळेसच होणें होतें, अहो श्रीगुरूकृपा हीच मोठी आख्यायिकेची वर संभाव्य खरी अशी प्राप्तीची) त्यासच मुळी झाली होते. (श्रीगुरूकृपा बुद्धिकाळी भाग्य=भागीदार, वाटे करण्यास योग्य, दैव, ऐश्वर्य, निधि, सांठा. लब्धि=प्राप्ति, नफा, (ग.) भागाकर). (९८५)

अहो सूर्य उगवल्याबरोबर अंधार तो प्रकाशच शोभला होतो, जसें का दिव्याच्या संगानें (बरोबर) कापुर तो दीपच होतो कीं. (९८६)

अहो त्या मिठाची एकादी कणि उदकास मिळाल्याबरोबर तर उदकच कीं ती होऊन जाते राहाते जसें. (९८७)

अथवा निद्रिस्त तो जागविला तर स्वप्नासहितही ती निद्रा नाहींशी होऊन स्वस्वरूपी मिळून जातो जसा. (९८८)

त्याप्रमाणें ज्या कोणा एकाद्याच्या दैवानें श्रीगुरु श्रवण झाल्याबरोबर द्वैत गिळीले होऊन स्वस्वरूपी वृत्ति स्थिर होते. (९८९)

त्यास मग (करणें द्वा) कर्म करणें होतें का कर्म करणें आहे असें हें कुणी सुद्धां बोलू शकणार नाहीं, अहो आकाशच जें एक त्यास कसचें तें येणें का कसचे तें जाणें बरे! (९९०)

म्हणून त्यास खरोखरी कांहीं सुद्धां करणें असत नाहीं; परंतु असें जरी जें कांहीं हें (करण= साधन, शरीर, इन्द्रीय, हेतु, कारण, कृत्य आहे) इन्द्रीयाचे करणे ते त्याजबाबत नसतेंच कीं. (९९१)

(कानी पेरिलें डोळा उगवलें) आपले कान व श्रीगुरुचें वचन यांच्या भेटीबरोबर हे कीरिटि जो कोणी एक वस्तूच होऊन उभा होतो, प्रकाशतो, शोभतो. (९९२)

येन्हवी पाहिलें असतां आपल्या स्त:च्या कर्मवन्हिमध्यें-(अग्नि जठराग्नि, पचन, दाहन-) काम्य व निषिद्ध हेंच ईंधन घालून रजोगुण व तमोगुण का रजतमे दोन्ही ही अगोदर जळिलि ज्याने, (अहो स्वकर्मच की मुळीं वन्हिप्रमाणें होत असलेलें तेथें रजतमें का काम्य निषिद्ध ही दोन्ही अगोदर खपविली जाळून नाहीशी केली.) (९९३)

पुत्र, धन, परलोक, या तिहीचा अभिलाष जो तोच मुळीं, घरी राबणारा पाईक झाला सेवक झाला. (९९४)

इंद्रियें ही सैराटपणें पदार्थापदार्थामध्यें शिरलीं तर विटाळिलीं होतात; ती त्यानें ब्रह्माकारतारूप तीर्थात इंद्रियाच्या अंतर्मुख तीर्थामध्येंच कीं प्रक्षाळिलीं न्हाणिली कीं. (९९५)

स्वधर्माचें फळ जें कांहीं, तें सकळ त्यानें ईश्वराच्या ठायीं अर्पण करून अढळ केलें वैराग्य पद तें बळाचे केलें. (९९६)

अशी आत्म्याच्या साक्षात्कारामध्येंच ज्या ज्ञानाची उत्कर्ष दशा, योग्यता लाभते-(जयाची निग्रह वीररस ध्वज विजयाची तऱ्हा प्रकार ज्यास लाभतो) तेथीलची पुरी सामग्री ती मिळविली की एक मेळाव्याची केली, (९९७)

आणि त्याच वेळेस सद्‌गुरू भेटलेवर चित्तानेंहीं कांहीं प्रतारणा केलीं नाहीं (विफल होणें, वगळलें जाणें, फसवणुकीचें होणें, हिंडणें का ओलांडणें होणें-तें नच होतें) म्हणावें!!! (९९८)

पण अहो! औषध घेतल्याबरोबर आपला ठाव तेथें सांपडणारा होतो काय? अहो दिवस उगवल्या-बरोबरीनेंच काय माध्यान्ह होत असतो? (९९९)

उत्तम चांगल्या अशा क्षेत्रांमध्यें, शेतामध्यें की, बीज, जमिनींत गोमटें, चांगलें बीज, पेरिलें तरी पण अलोट फळें (भेटे, मिळे, ते तर पुष्कळ प्रमाणानें फळाचें) येणें तें, तर अहो! वेळेवरच की होतें ना! (१०००)

प्रांजळ मार्ग जोडला, सुसंगाचा मेळ भेटला. तरी प्रसन्नपणा प्राप्तीचें तें पावण्यास वेळ लागतो कीं, (१००१)

वैराग्य लाभ झाला त्यावर सद्‌गुरुची ही भेट झाली. सद्‌गुरुही भेटले. ह्या जीव विवेकाचा अंकुरहि फुटला आहे. (१००२)

त्यायोगेकरून 'ब्रह्म' तेंच काय तें खरें आथि, अशी प्रतीती बळकट केली बाकी इतर अवघे सर्व कांहीं भ्रांतीच एक. (१००३)

पण तेंच जें ब्रह्म-परब्रह्म जें सर्वात्मक व सर्वोत्तम असें जेथें कीं, मोक्षचेंही पण महत्त्व काम संपतें, पुरतें होतें. (१००४)

वैराग्य लाभ झाला, सदगुरु भेटला, विवेकाचा अंकुरही फुटला, एक ब्रह्म खरें बाकी सर्व भ्रांतीच एक अशी प्रतीतीही पण गाढ-दृढ अशी, तरी पण अहो! तेंच कीं ब्रह्म, का परब्रह्म, जें सर्वात्मक असून सर्वोत्तम असें जेथें (मोक्षाचेहि पण असणें तें काय कामाचें तेथें मोक्षाचे कामच नाहीं.) मोक्षाचें कामही पण तेथें पुरतें होऊन असतें. अशा ह्या तिन्ही अवस्था जें पोटीं जिरवी ज्ञान, जें त्या ज्ञानासहितपण जी वस्तु मिठी देते अशी ती वस्तु होऊन असणें होतें. (१००५)

ऐक्याचें एकपण संपतें जेथें, जेथें आनंदकण वृत्तीगत आनंदाचा अंशही पण विरतो, कांहींही पण नच होऊनही जें कांहीं उरतें. (१००६)

अशा त्या ब्रह्मामध्यें ऐक्यपणानें ब्रह्मच होऊन असणें जें तें क्रमें करूनच कीं त्या क्रमानेंच पावण्याचें होतें. (१००७)

अहो भुकेला आहे त्याजला षड्रसान्न वाढलें तर तो प्रत्येक घासाबरोबर तृप्ति लाभतो, लाहातो जसा. (१००८)

त्याप्रमाणें वैराग्याचा ओलावा तोच की विचाराचा अथवा विवेकाचा दिवा होय, असा तो विवेकाचा दिवा प्रदीप्त करून कीं, जे आत्मठेवा तो बाहेर काढतात आपलासा करितात. (१००९)

अहो आत्मऋद्धि जे भोगण्याची होते, तेथीलची ती योग्यता येणें हीच केवढी तरी सिध्दी अशी ज्याच्या अंगचा अलंकार झाला आहे--ज्याच्या अंगी आतां अलंकार होऊन आहे. (१०१०)

ब्रह्म होणें तें सुगम असें तो ज्या क्रमेकरून करून ठेवितो त्या क्रमाचें आतां वर्म तें सांगतों ऐक. (१०११)

**बुद्धया विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥**

विशुद्धया बुद्धया युक्तः = निष्पाप बुद्धिनें युक्त होऊन आत्मानम् धृत्या नियम्य = धैर्यानें आत्म्यास ताब्यांत ठेवून, शब्दादीन् विषयान् = शब्द, स्पर्श, रूप, रस गंध इत्यादि विषय. त्यक्त्वा = टाकून, त्यजून. रागद्वेषौ = रागद्वेष हे दोन्ही. [राग = आसक्ति, मत्सर, क्रोधः द्वेष = नावड, वीट, वैर] व्युदस्य च = नाकारून, वगळून, उदासीन होऊन, त्यागाचें करून.

अन्वयः—विशुद्धया बुद्धया युक्तः । आत्मानम् धृत्या । नियम्य । च । विषयान् । शब्दादीन् त्यक्त्वा । रागद्वेषौ व्यदस्य । च । (ध्यानयोगपरोनित्यं वैराग्यम् समुपाश्रितः शांतः, निर्ममः ब्रह्म भूयाय कल्पते) ॥ ५१ ॥

अर्थः—निर्मळ, निष्पाप, शुद्ध, सद्गुणी अशा बुध्दीनें युक्त होऊन, धारणा शक्तीनें, (धैर्यानें, धृतीनें,) चित्ताचें संयमन करून, आत्मा ताब्यांत ठेवून, (आत्म्यास आळा घालून) शब्द आदिकरून जे विषय ते सोडून, (त्यांचा त्याग करून व) राग (म्हणजे आसक्ति, अनुराग, क्रोध, मत्सर, खादाडपणा,) तसेंच द्वेष (म्हणजे नावड, वीट, वैर,) [इच्छा व द्वेष यांचा विवाह, त्यापासून द्वंद्व मोह हा मुलगा झाला. व अहंकार हाच कोणी एक आजोबा याने तो वाढविला. आशारूपी दुध पिऊन तो गुटगुटित झाला.] असें ते दोन्हीही (उदकरहित कोरडे करून टाकून देऊन नाकारून, वगळून,) औदासिन्यानें त्यागून ध्यानयोगपर, वैराग्याचा, आश्रय केलेला निर्मम शांत अशाने ब्रह्मभूच्या योग्यतेचे होणे होते.

(श्लोक ५१ वा ओव्या १०१२–१०२२)

**तरी श्रीगुरू दाविलिया वाटा । येऊनि विवेक तीर्थतटा ।**
**धुवुनिया मळकटा । बुद्धिचा तेणे ॥ १०१२ ॥**
**मग राहुनि उगळिली । प्रभा चंद्रे आलिंगिली ।**
**तैशी शुद्ध ते जडली । आपणया बुद्धि ॥ १०१३ ॥**
**सांडुनि कुळे दोन्ही । प्रियासी अनु रे (अनुसरे) कामिनी ।**
**द्वंद्व त्यागे स्वचिंतनीं । पडिली तैसी ॥ १०१४ ॥**

आणि ज्ञान ऐसे जिव्हार । नेवो नेवो निरंतर ।
इंद्रिइं केली थोर । शब्दादिक जे ॥ १०१५ ॥
ते रश्मीजाळ काढलया । मृगजळ जाय लया ।
तैसे धृति रोधे तया । पांचाहि केले ॥ १०१६ ॥
नेणता अधमाचे अन्ना । खादलिया कीजे वमना ।
तैसी वोकविली वासना । इंद्रिय विषइं ॥ १०१७ ॥
मग प्रत्यगावृत्ति चोखटे । लाविली गंगेचेनि तटे ।
ऐसी प्रायश्चित्ते धुवटे । केली येणे ॥ १०१८
पाठी सात्त्विके धीरे तेणे । सोय धरिली तिये करणे ।
(मग) मनेसी योग धारणे । मेळविली ॥ १०१९ ॥
तेवीचि प्राचीने इष्टानिष्टे । भोगेसी येऊनी भेटे ।
तेथ देखलयाही वोखटे । द्वेषु न करी ॥ १०२० ॥
ना गोमटेचि विपाये । ते आणुनि पुढा सुये ।
तरी तयाही लागी नव्हे । साभिलाषु ॥ १०२१ ॥
ययापरि इष्टानिष्टी । राग द्वेष किरिटी ।
त्यजुनि गिरी कपाटी । निकुंजी वसे ॥ १०२२ ॥

दाविलया-दाविलिया. (१०१२) राहुनि-राहुने. उगळिली=मुक्त झालेली. आलंगिली-आलिंगिली. शुद्ध ते-शुद्धत्वे. (१०१२). कुळे दोन्हीं=सासर माहेर. अनु रे-अनुसरे. पडिली-पडली. (१०१३) ज्ञान-ज्ञाना. जिव्हार=आवडते, जीवन. इंद्रिइं-इंद्रियी. केली-केले. (१०१५) काढलया-काढलेया=सूर्य किरण नाहीसे होताच. धृति रोधे-निवृत्ति रोधे-वृत्तिरोधे. पांचांही-पंच विषयांना. (१०१६) अधमाचें अन्न-अधमाचिया अन्ना. वासना-सवासना=वासना सगट सर्व विषय इंद्रियाकडून वोकविते. इंद्रियविषयीं -इंद्रिये विषयीं. (१०१७) प्रत्यगावृत्ति=अंतर्मुखतेकडे इंद्रिये लाविली. येणे-जेणें. (१०१८). धिरे-धीरे. सोय धरिली-शोधारली-शुद्ध केली. (१०१९). प्राचीने इष्टानिष्टे भोगेसी=पूर्व संचिताप्रमाणें चांगले वाईट भोग प्राप्त झाले असतां. देखिलयाही-देखिलियाही. (१०२०) तरि तयाही लागी नव्हे-तयालागी न होये. (१०२१) ययापरि-यापरि. त्यजुनि-त्यजूनि. निकुंजी=निर्जन वनांत. (कुंज=लता मंडप, हस्तिदंत, हनुवटी, छिद्र, पोकळी ) (१०२२).

**ब्रह्म होणें तें सोप्या रीतीच्या क्रमानें सांगतो—**

**श्रीगुरुनी दाविलेल्या वाटा, मळकटपणा धुतला, प्रभा चंद्रानें आलिंगिली तशी शुद्ध बुद्धि जडली: सासर माहेर टाकून प्रिया प्रियासच अनुसरते, द्वंद्व त्यागानें स्वचिंतनामध्यें पडली. ज्ञान, इंद्रिये, धृति, वृत्ति, प्रत्यागावृत्ती-रूपी प्रायश्चित्तें, सात्त्विक धीर, सोय, योगधारणा, प्राचिने-इष्टनिष्ट भोग भेटले तर द्वेष करीत नाहीं, गोमटे पुढें झालें तरी साभिलाष होत नाहीं-असा निर्जन वनांतच कीं राहणारा जसा होतो.**

(ओव्या १०१२–१०२२)

अहो त्यानें तर श्रीगुरूंनी दाखविलेल्या वांटानी विवेकरूपी तीर्थ तटास येऊन बुद्धिचा मळकटपणा तो धुवून टाकिला, श्रीगुरू वाट विवेक तीर्थ तेथें त्रिविध ताप त्यानें धुवून टाकिले बुद्धिच्या योगेकरून. (१०१२)

मग राहूपासून मुक्त झालेली प्रभा चंद्रानें धरल्याप्रमाणें (आलिंगिल्याप्रमाणें) आपली बुद्धि आपणच तें लिंगाचें होणें तें, शुद्ध असेंच कीं, विठ्ठल पायीं जडलेलें होतें. शुद्ध बुद्धीच, सर्व तेथें जडते, जोडते,

(राहुरत्न=गोमेद मणि. राहुमूर्धभिद्=विष्णु) मग वास केलेली, अथवा वेळ घालविणारी ती मुक्त प्रभाच मुळीं चंद्रानें आलिंगिली रंगविली जशीं तसा तो आपण एक शुद्ध बुद्धिचा केलेला तेथें मन तें सर्वथैव त्या शुद्ध बुद्धितच (लिंगातच) जडलेलें असें होते कीं, झाले कीं, [लिंगाप्रमाणें रूप बदलणें, रंगविणें, (त्या)] (१०१३)

कामिनी विलासिनी स्त्री, ज्याप्रमाणें, सासर माहेरची दोन्हीं कुळें सांडून, प्रियासच अनुसरते–तेथीलचा तो अनुकूल नच अव्हेरून, अनुसरून असते, सोबतीच एक जसा, सेवकच एक जसा, असें अनुलक्षून वागते, मागे असते मागून जात असते, का मदतनीसच जसा का एक (अनुकूल) तेथें सुखदुःखादि द्वंद्वे त्यागून=स्वतःचा स्वाभाविक स्वभाव, स्व म्हणजे आपले आपण स्वतःच्या चिंतनामध्येंच ध्यान, काळजी, विचार, मननामध्यें पडिली तशीं कीं. (१०१४)

इंद्रियांच्या ठायीं शब्दादिक विषय ते नेहमीं नेऊन, तेथें इंद्रियांना थोर केले होतात; असें जें तेंच अहो ज्ञानच कीं आवडते असें जिव्हारच एक जिवित जिवन कीं, नेहमीं वागविलें जाणारें, त्यास ज्ञानच कीं एक प्रकाशाचें जागतें असें आवडतेपणानें म्हटलें होतें जें कांहीं. (१०१५)

असें तें अहो रश्मिजाळ, सूर्यकिरण नाहींसे होताच, मृगजळ तें नाहींसें होतें, तसें वृत्तिरोधानें, पंचही विषयांना केले, इंद्रीयाची विषयाबद्दलची ती धृति म्हणजे आस्था काढून टाकून (निवृत्ति म्हणजे इंद्रिय विषय भेट घडणे ते) पंचविषय ते त्यांना नच मिळाल्यानें तेथें विषयरूपी मृगजळ तें नाहींसें झाले व ज्ञानच एक प्रकाशू लाभलें, लागलें. (१०१६)

नेणतपणेंच मुळीं जर अधमाचें अन्न खादलें तर वमन कीं एक करावें; त्याप्रमाणें, वासना ती इंद्रीय व त्याचा विषय तो भेटावा अशी जी वासना तीच मुळीं तेथें वोकविली कीं. (१०१७)

व मग चोखटीं अशी ती वृत्ति–अंतर्मुखतेकडे, (इंद्रिये) लाविली त्यायोगेंतर गंगातटावर तर धुवट अशीं निष्पाप करणारी प्रायश्चित्तेंच किं, तीं केली होत. (१०१८)

नंतर धीरतेच्या अशा त्या सात्त्विकांनीं सोयच आपली व्हावी अशीं इंद्रिये ती धरीली (घेतली) व मग मनानेंच कीं, मनच मनास प्रसन्न करून योग (स्मरणशक्ति, शास्त्राचा निश्चय इत्यादि) धारणें (पक्कपणा, धैर्य.) तीच जमविली, मेळविली कीं. (१०१९)

आतां, पूर्व संचिताप्रमाणें, चांगले वाईट भोग प्राप्त झाले असतां, तेथें वोखटें, खोटें, असेंही कांहीं जरी नजरेस आलें, देखिलें, तरी तो द्वेष म्हणजे वीट का वैर का नावड ती तो मुळींच करीत नाहीं, दाखवित नाहीं. (१०२०)

कदाचित् गोमटें, चांगलें, तेंच मुळीं, पुढें आणिलें, (उपन्न केलें, प्रसवलें) तरीसुद्धां त्याजकरितां अगदीं मोठ्या मर्जीचा का प्रेमाचा, अभिलाषाचा का) उत्कट इच्छेचा असा होत नाहीं. (१०२१)

याप्रमाणें इष्ट का अनिष्टामध्यें, हे कीरीटी राग (म्हणजे आसक्ती, अनुराग, क्रोध, मत्सर, खादाड-पणा, इत्यादीं तसेंच) द्वेष (म्हणजे अनावड वैर का वीट इत्यादीं) टाकून तो तर अहो गिरी पर्वत (कपाट वक्षन्=रूंद छातीचा) कपाटामध्येंच कीं निकुंजी म्हणजे निर्जन वनांत बसण्याचें करतो. (१०२२)

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः॥ ५२॥**

विविक्तसेवी=वेगळे केलेले, भिन्न, एकांत स्थल, निर्जन, एकांत, ज्ञात, पवित्र, विवेकी, एकाग्र, गंभीर, शुद्ध. लघ्वाशी=थोडे, अल्प खाणारा, सेवन करणारा, [लघु=तिरस्कारानें, जलदीने, शुद्ध, दुर्बळ,

नीरस, परिवार शून्य, अल्पवयी, रम्य, सुंदर, प्रिय, इष्ट, सौम्य, मंद, सहज पचणारे, लहान शीघ्र, चपळ, नीच क्षुल्लक, संक्षिप्त, हलके, थोडे अल्प. लघुकाय=बोडके. लघुजंगल=लावक पक्षी. लघुप्रयत्न=आळशी उच्चारण्यास सुलभ (वर्ण) लघुमांस=कवडा पक्षी. लघुहस्त=उत्तम तिरंदाज, लघु मूलक=मुळा. लघुलय =वाळा (व.)] (अशनं=खाणे, अन्न क्षुधा व्यापणें, भुक.) वाक्काय मानसः यत (यम यत=स्वाधीन, नियमित करणें, वाणी, शरीर व मन.) ध्यानयोगपर=पर=पराकाष्ठा.) ध्यानयोगानें असणें, पराकाष्ठा. नित्यं=सतत, स्थिर. वैराग्यं समुपाश्रितः=वैराग्य मिळविणे वैराग्य प्राप्त होण्यासाठीं, वैराग्याचा आश्रय करणें.

अन्वय :—विविक्त सेवी । लघुआशी (अशन) । वाक् काय मानसः यतः । नित्यं ध्यानयोगपरः। नित्यं वैराग्यं समुपाश्रितः । (ब्रह्मभूयाय कल्पते) ॥ ५२ ॥

अर्थः —एकांत स्थल सेवन करणारा, थोडे का अल्प खाणारा, वाणी शरीर व मन मर्यादित का नियमित करणारा, स्वाधीन ठेवणारा, नेहमीं ध्यानयोगपर असणेची पराकाष्ठाच एक ज्याची असा नेहमीं सतत स्थिर अशा वैराग्याचा आश्रय करणारा तो ब्रह्म होण्याच्या योग्यतेस पाहातो.

(श्लोक ५२ ओव्या १०२३–१०५०)

गजबजा सांडिलिया । वसवी वनस्थलिया ।
अंगाचिया मांडिया । येकलेया ॥ १०२३ ॥
शमदमादिकीं खेळे । न बोलणेचि चावळे ।
गुरुवाक्याचेनि मेळे । नेणे वेळु ॥ १०२४ ॥
आणि आंगा बळ यावे । नातरी क्षुधा जावे ।
का जिभेचे पोरवावे (पुरावे) । मनोरथ ॥ १०२५ ॥
भोजन करितां विषि । या तिहीते न लेखी ।
आहार मित संतोषी । माप न सुये ॥ १०२६ ॥
अशनाचेनि (अनशनाचेनि) पावके । हरपता प्राण पोखे ।
(इतुकीयाची भाग) याची भोगु मोटके । अशन करी ॥ १०२७ ॥
आणि पर पुरुषे कामिली । कुळवधु अंग न घली ।
निद्रालस्या न मोकली । आसन तैसे ॥ १०२८ ॥
दंडवताचेनि प्रसंगे । भुई हन आंग लागे ।
वांचुनि येर नेघे । राभस्य तेथें ॥ १०२९ ॥
देह निर्वाहापुरते । राहाटवी हातापायाते ।
किंबहुना आपैते । सबाह्य केले ॥ १०३० ॥
आणि मनाचा उंबरा । वृत्तीसी देखोनेदी वीरा ।
तेथें के वाग व्यापारा । अवकाशु असे ॥ १०३१ ॥
ऐसेने देहे वाचा मानस । हे जीणोनि बाह्य देश ।
आकळिले आकाश । ध्यानाचे तेणें ॥ १०३२ ॥
गुरुवाक्ये उठिला (उठविला) । बोधि निश्चयो आपुला (आला) ।
न्याहाळी हाती घेतला । आरिसा जैसा ॥ १०३३ ॥
पै ध्याता आपणचि (आपणपेचि) परि । ध्यानरूपे (रूप) वृत्ति माझारिं ।
ध्येयत्वे ये (घे हे) अवधारि । ध्यान रूढी गा ॥ १०३४ ॥

तेथ ध्यान ध्येय ध्याता । या तिही ऐक्य संपता (एकरूपता) ।
होय तव पांडुसुता । किजे ते गा ॥ १०३५ ॥
म्हणोनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानी जाला दक्षु ।
परि पुढासूनि पक्षु । योगाभ्यासाचा ॥ १०३६ ॥
अपान रंध्र द्वया- । माझारी धनंजया ।
पार्ष्णि पिडूनिया । काऊरू मूळ ॥ १०३७ ॥
अर्को(आकुं)चोनि अध । देऊनि तिन्ही बंध ।
करूनि येकवद । वायुभेदा (दी) ॥ १०३८ ॥
कुंडलिनी जागौनि (जागऊनि) । मध्यमा विकाशुनि ।
आधारादि भेदुनि । आज्ञावरी (अग्नीवरी) ॥ १०३९ ॥
सहस्र दळाचा मेघु । पियूषे वर्षोनि चांगु ।
तो मूळवरि वोघु । आणुनिया ॥ १०४० ॥
नाचतया पुण्यगिरी । चिद्‌भैरवाचा खापरी ।
मन पवनाची खिच पुरी । वाढूनिया ॥ १०४१ ॥
जालया योगाचा गाढा । मेळावा सुनि (हा) पुढा ।
ध्यान मागिली कडा । स्वयंभ केला (केले) ॥ १०४२ ॥
आणि ध्यान योग दोन्ही । ये आत्मतत्त्व ज्ञानि ।
पैठी होआवया निर्विघ्नी । आदिचि तेणे ॥ १०४३ ॥
वीतरागा(रागते)सारिखा । जोडुनि ठेविला सखा ।
तो अघवियाची भूमिका । सवे चाले ॥ १०४४ ॥
पाहवे ते दिसे तंववरी । दिठी ते न संडी दीपु जरि ।
तरि के अवसरि । देखावयाची (देखावया) ॥ १०४५ ॥
तैसी मोक्षी प्रवर्तलया । वृत्ति ब्रह्मी जाय लया ।
तंव वैराग्य आथी तया । भंगु कैचा ॥ १०४६ ॥
म्हणौनि सवैराग्य । ज्ञानाभ्यासु तो सभाग्य ।
करूनि जाला योग्य । आत्मलाभा ॥ १०४७ ॥
ऐसी वैराग्याचां अंगी । बाणुनीया वज्रांगी ।
राजयोग तुरंगी । आरूढला ॥ १०४८ ॥
वरि जे (आड) पडिले दिठी । साने थोर निवटी ।
ते बळि विवेक मुठि । ध्यानाचे खांडे ॥ १०४९ ॥
ऐसेनि संसार रणा आंतु । आंधारी सूर्य तैसा असे जातु ।
मोक्ष विजश्रीये वरैतु । होआवया लागी ॥ १०५० ॥

गजबजा=गलबला: वनस्थळिया वसवी=वनांत वस्ती करतो. अंगाचिया मांदिया एकलया=केवळ आपल्या अवयवाचा मेळा त्यासह. (१०२३) चावले=बोले. (१०२४) क्षुधे-क्षुधा. पोखावे-पुरावे. तिहीते-आंगा बळ यावे, क्षुधा तृप्तीची व्हावी, जिभेचे मनोरथ पुरवावेत. (१०२५) या-यया. आहारमित-आहारी मिती=संतोषपूर्वक मिताहार करतो; माप घालीत नाही. (१०२६) अशनाचेनि-अनशनाचेनि=त्याचे अशन ते एवढ्या पुरतेच की अन्न न खाल्ले तर जठराग्नि पेटून प्राणनाश होईल, तो न व्हावा म्हणून.

(१०२७) अंग-आंग. घली-घाली. मोकली=सोडीत नाहीं. (१०२८) राभस्य (तेथें-तेथें)=अविचार. (१०२९) तेथे-तेथ. वाक् व्यापारा=बोलण्याला. (१०३१) ऐसेने देहे-ऐसेनि देह. देश-प्रदेश. (१०३२) उठिला-उठविला. (१०३३) आपणचि-आपणपेचि. ध्यानरूपे-ध्यानरूप. ये-घे हे. (१०३४) तेथें ध्यान ध्येय-तेथ ध्येय ध्यान. या-यया. ऐक्यरूपता-एकरूपता: पंडुसुता-पांडुसुता. (१०३५) पुढासूनि-पुढें करून. (१०३६) अपान रंध्रद्वयामाझारी=गुद व शिस्न याच्या मध्यभागी. पार्ष्णि=पायाच्या टांचेनें दाबून. कांऊरू-कांवरू=गुद व शिस्नास सांधणाऱ्या शिवणीचे. (१०३७) आकोंचोनि-आकुंचुनि=संकुचित करून तिन्ही बंध=मूळ बंध तो गुदस्थानाचा, उड्डियाण बंध नाभिस्थानाचा व जालंधर बंध कंठस्थानाचा. (१०३८) कुंडलिनी जागौनि-जागउनि, ती नाभिस्थानी असलेली कुंडलिनी नामक शक्ति: मध्यमा विकाशूनि=मध्यमा श्रुतिगोचरा ती विकासाची करून; सुषुम्नामार्ग मोकळा करून. आधारादि भेदनि आज्ञावरी-अग्निवरी=आधारचक्रापासून आज्ञाचक्रापर्यंत-अग्निचक्रापर्यंत, सर्व चक्रांचा भेद करून. (१०३९) सहस्रदळ=मस्तकस्थित ब्रह्मरंध्री असलेले शेवटचे सातवे चक्र: पियुष्ये-पीयूषे. मूळवरी-गुदस्थित मूलाधारचक्रापर्यंत. (१०४०) नाचतया पुण्यगिरी चिद्भैरवाच्या खापरी मन पवनाची खिचपुरी वाढुनिया =अग्निचक्ररूपी कैलास पर्वतावर नाचत असलेल्या चैतन्यरूप चित् भैरवाच्या, भिक्षापात्रात मन व प्राणवायू यांचीं खिचडी वाढून. (१०४१) गाढा=बळकट: हा मेळावापुढासूनि=वरील मेळाव्या (समुदाय) पुढें करून. मागिलीकडा=पश्चिम मार्गानें. केला-केले. (१०४२) ये-इये. पैठी=प्राप्त. आदिचि-आधीचि. (१०४३) वीतरागासारिखा-वीतराग ते सारिखा=वैराग्यासारिखा. भूमिका=अवस्था, क्रम मार्ग. (१०४४) पाहवे-पाहावे, ते -, अवसरी-अवकाश. देखावयाची-देखावया. (१०४५) वज्रागी=वज्रकवच अंगावर घालून. (१०४७) जे-आड. मुठि-मुष्टि. खांडे=खड्गानें. (१०४९) वरैतु=भर्ता, वरयिता. (१०५०)

जन वन सोडून **एकांतात राहातो**: लोभ द्वेष सोडतो: तेथें तो आचरतो त्या गोष्टी म्हणजे शम, दम, मौन, **गुरुपदेशाचे चिंतन** इत्यादि होत, तसें **आलस्यादिकाचा त्याग** करतो,-**अल्प आहारांत संतोष** मानतो, तसेंच **ध्यान** तो करीत काळ कंठतो: त्याचे ध्यान-**ध्येय, ध्यान, ध्याता एक होईपर्यंत** होत असतें-पद्धतशीर **योगाभ्यासही** चाललाच असतो-याप्रमाणें तो **मुमुक्षुत्व** प्राप्त करून घेतो: ते **वैराग्य योग व ध्यान** ह्या साधनानी मुमुक्षुत्व अवस्थेपर्यंत त्याचे वैराग्य टिकून राहिले तर-, त्या **वैराग्याचें कवच** अंगावर असल्यावर मग तो ह्या संसाररूपी समरांगणांत निर्भयपणानें **संसार करून** अखेर **मोक्षरूपी विजयलक्ष्मीच वरतो.**

जो शहराच्या गजबजीनें, जनसहवासानें का गळवल्यानें सांडिला आहे, सोडला आहे. तो वनांत वस्ती करतो व केवळ आपल्या अवयवाच्या (मेळाव्यासह त्या एक) मेळानेच— (१०२३)

शमदमादि षट् संपत्तीमध्यें खेळत राहातो. जे नच बोलावें तेंच बोलतो; गुरूवाक्याशीं सर्वथैव मेळ *असल्यानें त्यास वेळ कोणती व अवेळ कोणती असें कांहीं राहात नाहीं.* (१०२४)

अहो अंगास बळ यावें-आंगी बळ चढावें, तसेंच क्षुधेची शांती व्हावी अथवा जिभेचे ते मनोरथ (पोखावेत पुरते व्हावेत का) पुरवावेत असें तेथें कांहींही नसतें वर— (१०२५)

त्याची भोजन करण्याची तऱ्हा पाहावी तो तेथें आंगी बळ चढावें, क्षुधेची यथासांग तृप्ती व्हावी, कां जिभेचे ते लाड पुरवावेत असें नसून तो तर मित आहार संतोषपूर्वक करतो. तेथें कांहीं तें पोट भरण्याचें *तो माप टाकीत (नसतो) नाहीं.* (१०२६)

अहो कदाचित् जठराग्नि तो *अन्न (न खाण्यानें कां) न खाल्ले तर जठराग्नि तो पेटून प्राणनाश* होईल तो न व्हावा, एवढ्या पुरतेंच थोडेसें तो खातो भोजन करतो. नच कांहीं खाण्यानें कां जठराग्नि

पेटल्यामुळें हरपणारा प्राण रक्षण व्हावा याच भोगू रक्षणासाठीं प्राणभाग रक्षणासाठीं मोटके अशन करीतो. (१०२७)

पर पुरुषानें (कामिलेली) विषय, कामनेची इच्छा दर्शविलेली कुळवधु आपले आंग जसें तेथें घालीत नाहीं. तसें निद्रेवर मोकळे सोडलें का आळसासच देऊ केलें, असें कांहीं तो आसन तेथें करून नसतो. (१०२८)

अहो! दंडवताच्या प्रसंगानें जें कांहीं भुईस अंग लागतें तेवढेच की तेथें इतर अविचाराचे ते तर ती घेतच मुळीं नाहीं. (१०२९)

फक्त देहनिर्वाहास पुरतें होईल एवढेंच काय तें तो हातापायांना राहाटवितो, उपयोगास आणतो, अहो! बहुत काय लिहावें, पण त्यानें तर (अंतर्बाह्य कां) बाह्यासहितही सर्व आवरून घेऊन स्वाधीन केलेलें की. (१०३०)

ह्या आपल्या (वृत्तींना तर) मनोवृत्तीना तर ह्या मनाचा उंबराच मुळीं कीं पाहू देण्याचें करीत नाहीं. (जे का ह्या वृत्तींनी मनाचा उंबरा ओलाडून मनानें वाटेल तसें' कां तें चंचलतेचे होणे तें.) तेथें ह्या वाक व्यापारास म्हणजे बोलण्यास (कसलीही रीघ ती का) तो कसलाही अवकाश मुळी प्रसंग जागा सोय शिरकावच नाहीं. (१०३१)

याप्रमाणें देहानें म्हणजे कायेनें वाचेनें व मनानें हे जे बाह्य देश प्रदेश, प्रांत ते सर्व आकळिले जिरवून जिंकून त्यानें तर ध्यानाचें आकाशच तें आकळिलें कीं, तेथें ध्यान तें सर्व आकाश आवरून आहे. (१०३२)

गुरूवाक्यानें उठविलेला, उठलेला जागा केलेला, बोधामध्येंच स्थिर केलेला-बोधामध्यें निश्चय येऊन आहे बोध म्हणजे पूर्ण ज्ञानामध्यें, शहाणपणामध्यें आपला निश्चय तो न्याहाळून आहे, हाती एक बोधरूपी ज्ञान जागृत करणेंरूपी आरसाच वागवून आहे. (१०३३)

अहो! ध्याता तो परोपरीनें आपणच कीं, ध्यानरूपानें वृत्तीमध्येंच आहे. तेथें ध्येयत्वेच जें येतें तें ब्रह्म जाण, अशी हीच कीं एक ध्यानी आरूढणेंची, ध्यानाची रूढीच, की त्याची ती. (१०३४)

तेथें आतां ध्यान ध्येय व ध्याता का ध्येय ध्यान ध्याता ह्या तिहीचें जें एकरूप होणें व्हावें-(तेथें ऐक्य का एकरूपता व्हावीच व्हावी) तो पावेतो तें ध्यान तर व्हावेंच व्हावें, केलेच करावें कीं— (१०३५)

एवढ्याच करितां, तो मुमुक्षु, मोक्षाची इच्छा करणारा तो आत्मज्ञानाचे ठायीं अति दक्ष झाला आहे, पण तेथें योगाभ्यासाचा प्रकारच एक कां फळीं अनुयायी, मित्र ज्याबद्दल काहीं सिद्ध करावयाचे तेच एक पक्षच एक तो पुढें घेऊन आहे कीं. (१०३६)

हे धनंजया! अपान. रंध्रद्वया मध्यभागीं म्हणजे गुद व शिस्न यांच्या मध्यभागी असलेले (गुद शिस्नास सांधणाऱ्या, शिवणीचे मूळच–, कावरू मूळ तें पायाच्या टांचेनें दाबून धरिलें.— (१०३७)

अध ते आंकुंचित करून, (तेथें तिन्ही बंध देऊन) गुदस्थानीं मूळ बंध नाभिस्थानि उड्डियाणा बंध व कंठस्थानीं जालंधर बंध देऊन, त्यानें तर ह्या वायूचें जे दक्ष भेद ते सर्व येकवद म्हणजे एकाच गतीचे केले. (=दशभेद एकमताचे करून असामान्य अढळ, बोलणाराच एक तो एकवद (वक्ता) बोलणारा का गतीचा एक सर्व प्राणच.) (१०३८)

*नाभिस्थानस्थ कुंडलिनी नामक शक्ति जागवून श्रुतिगोचर अशीं जीं मध्यमा वाणी तीच त्यानें विकासाची केली. (आत्मविकासाची केली) गुदस्थानाच्या आधार चक्रापासून दोन भुंवयामधील आज्ञा-*चक्रापर्यंत किंवा अग्निचक्रापर्यंत सर्व चक्राचा भेद करून चक्रांना भेदून–– (१०३९)

सातवें जे मस्तकस्थित ब्रह्मांध्रीचें सहस्रदळ चक्र तेथीलचा जो मेघ त्यानें आपल्या अमृत वर्षावानें पाऊस शिंपडणें, दिवस, इंद्र, सूर्य, प्रजापति, विष्णु, शंकर, अमृत, ओघ—(तो पियूषाचा–, अमृताचा) ओघ तो तर त्यानें आधारापर्यंत आणिला–– (१०४०)

तेथें अहो! आज्ञाचक्ररूपी (अथवा अग्निचक्ररूपी) कैलास पर्वतावर नाचत असलेल्या चैतन्यरूप चिद् भैरवाच्या भिक्षापात्रांत त्यानें अहो! मन व पवन उदक, स्वच्छपणा, पवनवाहन=अग्नि (पवनपदवी= आकाश)–पवित्र करणारा वायु–(प्राणवायू) यांची खिचडी वाढली. (१०४१)

तेव्हां तो तर अति बळकट अशा एका योगाचा झाल्यानें वरील सर्व मेळावा पुढें करून ध्यान तें पश्चिम मार्गानें मागिली कडा स्वयंभ असेंच तें केलें ? (स्वतः उत्पन्न होणारें स्वयंभ असें–ब्रह्मदेवच तें.) (१०४२)

ध्यान तसेंच योग ही दोन्हीं आत्मतत्त्व–ज्ञानामध्येंच निर्विघ्नपणें पैठी म्हणजे स्थिर व्हावींत म्हणून अगोदरच कीं, त्यानें–– (१०४३)

वीतरागासारखा एक मैत्रच की सखाच तो केला आहे, जोडला आहे, तो तर अहो ह्या सर्व अवघ्या योगभूमिकेसच बरोबर घेऊन (ह्या योगभूमिकेबरोबर) चालत आहे कीं. (१०४४)

जें जें कांहीं पहावें तें तें जोंपर्यंत दिसत आहे तोंपर्यंत कांहीं तो ह्या दृष्टीस सोडीत नाहीं. तेथें दिवा जरी असला तरी ती देखावयाची वेळा का अवसर तो कसचा न् काय ? नेहमीच तें दिसणें पाहाणें होत आहे. (१०४५)

तसें मोक्षाच्या ठायींच कीं प्रवर्तण्याचें होत आहे : तेथें वृत्ती ही ब्रह्मींच लयाची होऊन तेथें वैराग्यच कीं खरेपणानें शोभणारे! तेंच एक महत्त्वाचें असें सर्व महत्त्व पाहून आहे : तेथें त्यांस भंग तो कसलाहि नच होणारा : (१०४६)

आणि म्हणूनच म्हटलें आहे कीं, सवैराग्य ज्ञान अभ्यास तो ऐश्वर्याचा करून सभाग्य नामधारक तो आत्मलाभाच्या योग्यतेस येऊन आहे : (१०४७)

वैराग्याचें वज्र कवच त्यानें अंगावर घालून–वज्रांगींच एक ती अंगी बाणून राजयोग तुरंगावर आरूढलेला झाला–– (१०४८)

आतां याहीवर जे कांहीं दिठीस पडलें तेथें साने का थोर असें काढून टाकले ह्या ध्यानाच्या खड्गानें व बळिया अशा झांकली मूठ सव्वालाखाची अशा विवेकाचा, विवेकाच्या मुष्टीनें– (१०४९)

अशा तऱ्हेनें संसाररण आंधारामध्यें सूर्यच तो जसा मोक्ष विजयश्रीनें वरण्याकरितांच कीं कां जात आहे, असा ( भर्ता करावा त्यास कीं विजयलक्ष्मीनें म्हणून की.) (१०५०)

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥**

अत्यंत शुद्ध बुद्धीनें युक्त होऊन, धैर्यानें आपल्या चित्ताचे संयमन करून शब्दादि विषय सोडून अत्यंत प्रीती आसक्ति आवड का अनावड अथवा द्वेष टाकून देऊन–एकांतवासात राहाणारा, मिताहारी काया वाचा मनाचा नियम करणारा, नित्य ध्यानयुक्त व विरक्त, त्याचप्रमाणें अहंकार बल गर्व काम क्रोध परिग्रह सोडून देऊन ममत्वरहित व शांत झालेला असा पुरुष–(ब्रह्मभूत होण्यास म्हणजे) सच्चिदानंद ब्रह्मांत अभिन्न भावानें स्थिर होण्यास योग्य होतो. (श्लोक ५१, ५२, ५३.)

अहंकारम् = (अहं-अस्मद्-मी.) अहंकार, अहंकृति = मीपणा, अविद्येचा प्रकार, [(वे) अव्यक्ततत्त्व (वे) 'अहं'तत्त्वापासून पंचमहाभूतें होतात.] गर्व बलं = जवरी, कावळा, बलराम, शक्ति, पराक्रम, स्थूलता, देह, अंकूर, वर्णोच्चारार्थ प्रयत्न, हात, पर्ण, पान सत्य, रूप, आकार, शुक्रधातु. दर्पम् = गर्व, ताठा, उत्साह, उष्णता, (दर्पतृण = कसईतृण, सबजा कस्तुरी) कामम् = विषयेच्छा, इच्छितार्थ, कामभोगेच्छा, इच्छा, क्रोध = रागावणें, दुष्ट राग, कोप. परिग्रहम् = परिवार, पत्नि, विवाह, मालमत्ता, शरीर, स्वागत मिळविणें. विमुच्य = वगळणें, मुक्त करणें. निर्मम = ममत्व शून्यता. शांतः = विकाररहित, शांत वृत्तीचा. ब्रह्म भूयाय कल्पते = (कल्प = योग्य, उद्देश, शक्य होणें. ब्रह्मभूत = ईश्वराशीं तादाम्य पावणेसः ब्रह्मभूय = ब्रह्मभाव, ब्रह्मपणा) सच्चिदानंद ब्रह्म होण्यास योग्य होतो.

अन्वय :—[विशुद्धया बुद्धया युक्तः। आत्मानं धृत्या नियम्य। विषयान् शब्दादीन् त्यक्त्वा। व्युदस्य राग द्वेषौ। च। विविक्त सेवी। लध्वाशी। वाक् काय मानसः यतः। नित्यं ध्यानयोग परः। समुपाश्रितः वैराग्यम्॥ ५०, ५१, ५२ श्लोक अध्याय १८ वा॥] विमुच्य अहंकारं। विमुच्य बलं। विमुच्य दर्पं। विमुच्य कामं। विमुच्य क्रोधं। विमुच्य परिग्रहम्। निर्ममः। शांतः। कल्पते। ब्रह्मभूयाय ॥ ५३ ॥

अर्थ :—अहंकार सोडून देऊन, बलाचा अभिमान नच वाहून असणारा, गर्वाचा नच होणारा काम-विषयासक्ति सोडून, क्रोधाचा अंगिकार नच करणारा, तसेंच ममत्वरहित असा व शांत झालेला असा पुरुष ब्रह्मभूत होण्यास योग्य होतो. ब्रह्मभूत म्हणजे सच्चिदानंद ब्रह्मामध्यें अभिन्न भावानें स्थिर होण्यास योग्य होतो. (श्लोक ५३ वा ओव्या १०५१–१०९१)

**आडवारया आले। दोष वैरी जे थोपटिले।**
**तयामाजि पहिले। देहाहंकारू॥ १०५१॥**
**जो न मोकली मारूनी। जिवो नेदी (जिवोनि) उपजवोनि।**
**विचंबवी खोडा घालुनि। हाडाचया॥ १०५२॥**
**तयाचा देह दुर्ग हा थारा। मोडुनि घेतला तो वीरा।**
**आणि बळ हा दुसरा। मारिला वैरी॥ १०५३॥**
**जो विषयाचेनि नांवे। चौगुणेहिवरी थांवे।**
**जेणे मृतावस्था धांवे। सर्वत्र जग॥ १०५४॥**
**तो विषयविषी अथावो। आघवया दोषांचा रावो।**
**परि ध्यान खर्गाचा घावो। साहील कैंचा॥ १०५५॥**
**आणि प्रिय विषय प्राप्ती। करी जया सुखाची व्यक्ती।**
**तेच्नि घालुनि (बुद्धि) बुंथीं। अंगी जो वाजे॥ १०५६॥**
**तो सन्मार्गु भुलवी। मग अधर्माच्या आडवी।**
**सूनि *वाघां सांपडवि। नरकादिका॥ १०५७॥**
**तो विश्वासे मारिता रिपु। निवटुनि घातला दर्पु।**
**जयाचा अहंकम्पु। तापसासी॥ १०५८॥**
**काम (क्रोधा) ऐसा महादोषु। जयाचा देखा परिपाकु।**
**भरिजे तंव अधिकु। रिता होय जो॥ १०५९॥**

* हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरीचे वाघ। याचे व्यामोदिक दबड। जगावरी॥२४२॥ अध्याय ३ रा

तो कामु कोण्हेचि ठाई । नसे ऐसे केले पाही ।
कीं ते ति (तेचि) क्रोधाही । (सहजे आले) साइजे जाले ॥ १०६० ॥
मुळाचे तोडणे जैसे । होय का शाखा दोषे ।
कामे नाशलेनि नाशे । तैसा क्रोध ॥ १०६१ ॥
म्हणौनि कामु वैरी । जाला जेथ खाणौरी ।
तेथ सरली वारी । क्रोधाची ही ॥ १०६२ ॥
आणि समर्थु आपला आखाडा । सिसे वाहवी जैसा होडा ।
तैसा भुंजौनि जो गाढा । परिग्रहो ॥ १०६३ ॥
जो माथाचि पांलाणवी । अंगा अवगुण घालवि ।
जिवे दांडी घेववी । ममत्वाची (महत्वाची) ॥ १०६४ ॥
शिष्य शास्त्रादि विलासे । मठामुद्रेचेनि मिसे ।
घातले आहाती फांसे । निःसंगा जेणे ॥ १०६५ ॥
घरी कुटुंबपणे सरे । तरी वर्मी (वनी) वन्य होऊनि अवतरे ।
नागवियाहि शरीरे । लागला आहे ॥ १०६६ ॥
ऐसा दुर्जयो (जो) परिग्रहो । तयाचा फेडुनि ठावो ।
भव विजयाचा उछावो । भोगित असे तो ॥ १०६७ ॥
तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञान गुणाचें जे मेळावे ।
ते कैवल्य देशीचे आघवे । राये जैसे आले ॥ १०६८ ॥
तेव्हां सम्यक् ज्ञानाचिया । राणिवा उगाणुनि तया ।
परिवार होऊनिया । राहात आंगे ॥ १०६९ ॥
प्रवृत्तिचिये राजबिदी । अवस्था भेद प्रमादि ।
किजत आहे प्रतिपदि । सुखाचे लोण ॥ १०७० ॥

मग आडवावे या–आडवाइया–आडवारयाः थोपटिले–धोपटिले. (१०५१) न मोकली मारूनि=मारूनही सोडीत नाहीं. जीवो नेदी, जीवोनी–, उपजवोनी=जन्म देऊन जगू देत नाहीं. विचंबवी–कष्टवितो. हाडाच्रिया–हाडाचया. (१०५२) नांवे=ऐकतांक्षणीच. थावे=चौपट वाढतो. (१०५४) अथावो–ठावो. (१०५५) बुंथी=खोळ आवरण, बुरखा. वाजे=आदळे. (१०५६) निवटुनि=विभागून टाकिला. (१०५८) कामा ऐसा–क्रोधा ऐसा. परिपाक=अनुभव, विकास, नैपुण्य, पक्कता, परिणाम. (१०५९) ते ति–ते अति–तेच्चि. (१०६०) शाखा दोषे–शाखोद्देशे. (१०६१) खाणौरी=युद्ध हत, मृत, थकवा, उतरती कळा, दुबळेपणा, (ग्लानी). (१०६२) आखाडा=कुस्तीतला पेंच, खोडा, ओझे (आंष्ट्र=आकाश) होडा=पैज. परिग्रह=संग, पत्नि, विवाह, शरीरसंबंध, सेवक, शपथ, द्रव्य. (१०६३) पालाणवी=पल्याण, पल्ययणं, लगाम, खोगीर, खोगीर ठेवणें. घालवी=जडवितो, शिरकवितो. दांडी=काठो. अवंगु–अवगुण. (१०६४) शास्त्रादि–शाखादि. मठा–मठादि. मुद्रेचेनि=लक्षणाच्या निमित्तानें. निःसंगा=विरक्त पुरुषासही. (१०६५) वर्मी–वनीं. वन्य=(रानटी, जंगली) रानांतील पदार्थ, जलसंचय. वन=*अरण्य, पाणी, लांकूड, घर, निवासस्थान समुदाय, ताटवा, (समासान, जंगली, रानटी.)* वर्मन=आश्रय, क्षत्रियाची पदवी जसें प्रहर वर्मा, साल, चिलखत, वर्महर=कवच धारण करण्याओगा, उपयुक्त तयार,) वर्मित्=चिलखत घातलेला. (वर्मिन्, वर्मिक)] (१०६६) दुर्जय–दुर्जयो जो. उछावो–उत्साहो. (उत्साह=प्रयत्न, उल्हास, उत्सुकता, दीर्घोद्योग, निश्चय, धैर्य, हिय्या, तंतु, सुख. उत्सव=उत्कट इच्छा, आनंद,

उल्हास, कर्मारंभ, उंची, क्रोध.) भोगित असें तो-भोगितसे जो. (१०६७) सम्यक=खरें बिनचूक, चोख, चांगले, प्रिय, रम्य, तोच, सहित, बरोबर असणारे उगाणुनि=स्वामित्व देऊन (१०६९) राजबिदी= राजरस्त्यावर. अवस्था भेद प्रमादि=जागृति, स्वप्न, सुषुप्ति, अवस्थारूप तीन क्रियाकडून. प्रमादि- प्रमदि (प्रमा=(न्या.) यथार्थ ज्ञान शुद्धि, जाणीव.) प्रमद=गाफिल, गबाळ, हर्ष, आनंद, प्रीती. प्रमाद= बेसावधपणा, चूक, झिंगणें, संकट, दुर्दैव. (१०७०)

तेथें आडविण्यास आलेले दोष दुष्ट शत्रू ईर्ष्येस चढलेले ते त्यामध्यें **देहाहंकार** हा मुख्य पहीला होय. तो जीवें मारूनही सोडीत नाहीं. जन्मणें उगवल्यावरही ह्या जीवासही जगू देत नाहीं. त्यास हाडाचा खोडा घालून कुचंबत ठेवितो. ह्या देहाहंकाराचा आधार म्हणजे देहदुर्ग–ह्याचा थाराच मोडून तो दुर्ग घेतला होतो.–देहाहंकारास धुळीस मिळवितो.

दुसरा वैरी जो **बळ** त्याचाही प्राण घेतो. त्यालाही मारितो. विषयाचें नांव घेतांच चौपटीहूनही जास्त वाढतो ज्यायोगें सर्व जग मरणावस्थेसच बांधून येतें. हा वैरी म्हणजे विषयाविषी ठावच–सर्व दोषाचा हा रावच. सर्व दोषांवर याचेंच राज्य. पण ध्यानरूपी खड्गाचा घाव यास सहन नच होणारा. प्रिय गोड विषय झाले त्यानी सुखाची व्यक्ति ही–त्या सुखकर भासणाऱ्या विषयाचा बुरखा बुद्धिवर घेऊन हा आंगी वाजतो, जीवी आदळतो, अंगावर झडप घालितो. मन्मार्ग भूलवितो, चुकवितो. जीवाला अधर्माच्या अरण्यामध्यें फूस लावून आणतो. व नरकादिक जे वाघ त्यांच्या तोंडांत टाकितो. विश्वास दाखवून मारणारा तो शत्रू जो **दर्प** तोही निवटून टाकिला. नाहींसा केला. ज्याचा मोठाच दरारा–अहंकम्पु– तपस्व्यानां (तापसानां) वाटतो. क्रोधासारखा महादोष ज्याच्यापासून उत्पन्न होतो–जों जों याचें पोट भरावें तों तों अधिकच कारिकमा रोडका होतो. तो काम कांहींच करीत नाहीं म्हणजे आपला नाश होत आहे असें जेव्हां पाहतो तेव्हां क्रोधाचाही नाश तो होतो–तेथें मूळ तोडणें तें फांद्या तोंडण्यासारखें होतें. शाखादोषासाठीं मूळच तोडावें तसें. काम नसल्यानें आपोआपच क्रोधाचा नाश होतो. जेथें काम शत्रु खाणोरी होतो तेथें क्रोधाची ती फेरी नाहींशी होते संपते. समर्थ सत्ताधारी आपला आखाडा आपलें ओझें दुसऱ्याच्या डोक्यावर लादतो तसा **परिग्रह** तो स्विकारल्यानें जुलमाचा होतो. जो डोक्यावर बसतो (स्वारी करतो) अवगुण अंगास जडवतो, जीवाकडून ममतेची का महत्वाची दांडी धरवितो, कांहीं घेववितो. शिष्य, शास्त्र, विलास, मठ, मुद्रा, निमित्त निसंगानाही, संन्याशानाही पाशांत गुरफटवितो. कुटुंबाच्या रूपानें जो घरीं पाठीस लागतो; वर्मी का वनीं का रानांत दत्त म्हणून पुढें होतो. **नागवें असें जें (त्यालाही) शरीर सुटत नाहीं.** असा अजिंक्य परिग्रह त्याचे ठाणच उडवितो–त्याचा ठावच फेडतो. **संसारावर** विजय संपादिल्याचा उत्सव भोगीत असतो त्यामुळें अमानित्वादि जे ज्ञान गुणाचे जमाव ते मोक्षप्राप्तीचे राजेच त्याच्यासमोर तृप्त होतात. तेव्हां तें **सत्य ज्ञानाचें स्वामित्व त्याला अर्पण करून** आपण, आपल्या अंगांनीं त्याचा परिवार होऊन राहातात. प्रवृत्तिच्या राजरस्त्यावरून हा जाऊं मिरवू लागला म्हणजे जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या क्रिया पावलोपावली त्याच्यावरून सुखानेंच की मीठ मोहऱ्या मिरच्या ओवाळून टाकतात. त्याजवरून लिंबलोण उतरतात.

वारेलग पांखरू जसे (वाऱ्याच्या लाटेवर झुकांडी देऊन उडत राहाते कां तसे आडविण्यास आडव्या वाऱ्यानें आलेले उद्देश) अडविण्यास आलेले दोष, वैरिच ते जसें थोपटिले–धोपटिले होतात; त्या सर्वांहि- मध्यें पहिला म्हटलेला जो तो तर देह अहंकार होय–(देहच मीं आहे असा जो उत्साह प्रत्यय, मी, अहं, अस्मद्, मीपणा, अविद्येचा प्रकार, अथवा गर्व तो जाण.) (१०५१)

असा तो मीपणा कसा आहे म्हणावा तर अहो! जो मारूनही सोडीत नाही, जन्मणें झाल्यास (जिववून का जन्म देऊनही) जगूं देत नाहीं व अस्थीचा एक खोडाच घालून हाडीमासी खिळलेला जो

मीपणा, तेथेंच त्याचाच मुळीं खोडा घालून, मीपणाचाच करून) ह्या देहास कष्टवितो, विचंबवितो (ज्या म्हणून बीजाचा केलेला आईबापांनीं खाल्लेले जे अन्न त्याचाच हा अन्नमय कोश देह घडलेला, तेथें ते बीजच मुळीं सर्व महत्व पाहून असल्यानें तेथें असेंच म्हटलें कीं ह्या हाडाचांच मुळीं कीं एक त्यास खोडाच घातला, त्या अन्नमय कोशामधून बाहेरच मुळीं नच येण्याचें व्हावे ज्यायोगे.) (१०५२)

हे वीरा! अर्जुना! त्या देह अहंकाराचा का मीपणाचा तर हा देहच मुळीं (एक दुर्ग मोठा भक्कम असा, अडचणीचा, कठिण, दुर्वर्तनी, दुःसाध्य, दुर्ज्ञेय, किल्लाच कीं एक थाराच कीं एक असा तो आसराच मुळीं) मोडून घेतला तेथें असेंच म्हटलें झालें कीं अहो अहं तो तर धुळीस मिळविला. तसेंच दुसरा जो (बळ=जबरी, देह, हात, रूप, आकार,) देह बळरूपी वैरी तोहीपण निवटलाच. (१०५३)

वैरी कसा तर जो विषयाचें नांव ऐकताक्षणींच–चौपट वाढतो, (व असें त्याचे ते विषयाचें नांव ऐकतांक्षणीच जो चौपट बळ घेऊन असणें) त्यामुळें तर सर्व जग हें जसें का मृत अवस्थेस येऊन आहे असें, धांवणारे होते–(जी धांव घेरा फेर त्या मरणाच्यामुळीं, देहानें मेल्यासारखेंच, हे 'सर्व जग फिरू लागलें. सर्व जग मरण–अवस्थेची अशीच सर्व अतीशय ओढ घेऊन–जगास विषयाचे नांव ऐकतांक्षणीच मरणांत ओढतें, मरणच येऊन आहे, असें ते देह, बळ, देहच एक, जीवधर्माचा हाडामांसाचा, केलेला तसेंच जे सर्वथैव होऊन असणें तेंच चौपट वाढले व आतां काय एक सर्व मरणच कीं बांधून येत आहे ह्या जगास देहास आहे. (१०५४)

देह बळ हा वैरी कसा तर तो तर विषयरूपी विषाची अतिशयतेची खोलीच सर्व (ती सर्व दोषावर मोठ्या मानाची अशी राणीव साम्राज्यता सर्व आढ्यता घेऊन असलेली ती पण अहो! ती धान्यरूपी खङ्गाचा तो घाव सहन करणारी नव्हेच! (अहो सर्व आढ्यता मानमरातबतेची ती महत्वाकांक्षा ती तर सर्व पापांचा का दोषांचा मोठेपणाच एक तेथें ध्यानरूपी खङ्गाचा घाव सहन होतच नाहीं (ध्यान करावें असें तेथें तें खङ्गाचे नांवच मुळीं सहन होत नाहीं घावच एक बसल्यासारखें झाल्यानें) [ध्यान=विचार, चिंतन, एकाग्रता, देवाचे ध्यान, ध्यानधिष्ण्य=ध्यान योग्य, रूपी खर्ग–खङ्ग.] (१०५५)

(आणि सुखकर का आवडत्या अशा प्रेमाच्या भाषणाकरितां प्रिय अशा पदार्थांची) विषयाची प्राप्ती (लाभ नफा, तर त्यास सुखाची अशींच एक सुखाच्या प्रदर्शनाची, आविष्करणाची एक व्यक्तीच व्यक्त व्हावी सुखकर भासावी असें करतें विषय जातीजातीच्या उलट अशीं वेगळीं वेगळीं अशीं एक एक वस्तूच पृथकपणाच जसा, असें तें विषय गोड लागण्यानें व्यक्ति प्रदर्शनाचें होणें, तेथें आकार स्वरूप लिंग फरक भेदच तेथें होणारा आवरण अथवा) रूपी खोळच एक घेऊन (ह्या बुद्धिस घालून) आंगी जो वाजतो (ह्या कोमल शरीराच्याठायीं अथवा अवयवयुक्त अशा ह्या) (शरीरामध्यें जो वाचतो–वावरतो, बोलतो)–शरीरावर जो आदळतो. (१०५६)

जो सन्मार्ग भुलवितो–सत्पथ चुकवितो व मग प्रवासी जीवाना अधर्माचे रानच एक, शास्त्रविरुद्ध आचरणानें अरण्यच एक, लागलें असें–, (धर्मशून्य अथवा निर्गुण असेंच एक जें रान) तेथेंच फसवून, पाप, नरक, आदींना वाघच कीं ते जसें कां (काम क्रोध म्हटलेले ते–) त्यांना कीं अहो ह्या जीवास सांपडून देतो. (१०५७)

असा तो विश्वास दाखवून मारणारा रिपू जर नाहींसा केला, (नासिला, हाणून पाडला, जेरीस आणला) तर दर्पच कीं तो अहो सर्वथैव निवटिला होय. अद्वैत बोधरूपी घोडेस्वार तो दर्प निवटितोच अहो ह्या दर्पसंबंधी केवढा तरी अहंकम्प म्हणजे दरारा ह्या तापसांना तो! अहं ते तर चळचळा कांपत असलेले ह्या दर्पापुढें कीं, ह्या तापसाचे (अहं) ते!! (१०५८)

क्रोधासारखा (अथवा–काम्य कर्म वासना इच्छा–कामासारखा असा) महादोषच उत्पन्न होतो पदरी येतो ज्याच्या असण्यामुळें कां (परिपक्वते) मुळें; जसें जसें तें क्रोधपण भरलें होतें तो तो अधिकाधिकच पोकळपण का रितेपण तेथें येणारें (रिकामा अभिमान, एक कामना काम कां क्रोधच पदरांत टाकणारी अशी.) (१०५९)

तो (काम्य) काम (कोणीच नाहीं का कसचाहि तो नाहीं असें ज्यानें ज्या दर्पानें केलें) तेथें मग सहजपणेंच की नाहींसा होतो (एका कोपासच येणें, का रागावण्याचें एक होणारें आलें जसें.) (१०६०)

शाखेच्या दोषासाठीं मूळच की तोडलें का मूळ तोडणें तें फांद्या तोडण्यासारखें होतें तसें (काम्य) कामाचा नाश केल्यानें काम नाहींसा झाला तर मग, क्रोध तर केव्हांहीं आपोआपच नाशिलाच होतो कीं, (१०६१)

म्हणून (काम्य कर्मरूपी इच्छा) कामरूपी वैरी जेथें स्तब्ध झाला, बंध पावून अडकून पडला नाहींसा झाला, तेथें मग सहजच कीं क्रोधाचीही पण ती फसवेगिरीच्या धूर्तपणाची वारी का फेरी सरली होते कां संपलीच की. (१०६२)

एकादा जो महान् समर्थ आहे तेथें (तर अहो! जसें का हातावरच शिर घेऊन एका पैजेवरच) आपला तो सत्ताधारीपणाचा आखाडा, आपली ती बेडी, संसार बेडी चालविणारा तसा परिवार, (संग भोगून कीं) गाढपणाचा झालेला,] दुसऱ्याच्या डोक्यावर लादणारा असा तो प्रतिग्रह तो ज्याचा स्वीकार (परिवार, संग–शरीर सेवक, शपथ, विवाह संबंध) केला असता तो जुलमाचा वाढता होणारा. (१०६३)

जो अहो माथ्यावरच कीं (खोगीर ठेवितो, डोक्यावरच) बसतो. (तेथें लगामही पण घालतो–महत्व मी–माझेपणाच्या ममत्वाची दांडी हाती देतो अंगास अवगुण, दोष जडवितो. (कां अंगांत दोष, अवगुण शिरकवितो) व जीवेंभावेंकरून मीपणाची ही महत्वाची देहरूप काठीच घेवविण्याचे करतो, धरावयास लावितो. (१०६४)

शिष्य शाखाच्या विलासानें डौलानें,–शिष्य शास्त्र संप्रदाय पद्धतीनें, मठ करणें, मुद्रा दाखविणें इत्यादिच्या मिसानें निमित्तानें, कां सोंगानें, तर विरक्तासच कीं (विरक्त पुरुषासही) फांसच घातले आहेत. आपल्या पाशांत गुरफटले असें (जे कांहीं) ह्या परिग्रहानें केलें होतें. (१०६५)

घर कुटुंबपणें घरी सरे (स्.) पाठीस लागतो–आणि वनांतल्या पदार्थावर ममत्व घेऊन वन्य म्हणून उभा होतो का अवतरलाच का जसा का! असा तो परिग्रह (संग, परिवार) तर नागव्या उघड्या शरीरासहीपण (शरीरामागेही पण लागलेला आहेच) सुटत नाहीं कीं. (१०६६)

असा अजिंक्य जो परिग्रह नावाचा शत्रू (परिवार संग) त्याचा तर ठाव ठिकाणाही पण बाजूस करून (फेडून टाकून, ठाणेच उडवून–छाननीचा करून कीं,) ह्या भवास म्हणजे संसारास जिंकलें म्हणणारा (दीर्घ प्रयत्नाचा दीर्घोद्योगाचा असा हा उल्हास) तो संसारावर विजय संपादल्याचा आनंद जो भोगीत (उपभोगीत आहे. निर्ममत्वे जो) असतोः (१०६७)

तेथें अमानित्व आदिकरून जे कांहीं ज्ञान गुणाचे मेळावे समुदाय ते तर जसें कां कैवल्यपदीचे, मोक्ष देशीचे राजे असे रावच की त्याच्या समोर प्राप्त होतात. (१०६८)

तेव्हां सम्यक म्हणजे (योग्य, बिनचूक, चांगले, प्रिय रम्य अशा) सत्य ज्ञानाच्या स्वामित्वाच्या जागा त्याच्या हवाली करून, त्यास देऊन त्याला अर्पण करून आपण तर अंगानें स्वतः त्याच्या परिवारातील पाईक होऊन राहातातः (असा तो परिवार, परिग्रह संग जाण.) (१०६९)

प्रवृतीच्या अथवा प्रकृतीच्या राजमार्गावरून हा जाऊं मिरवूं लागला म्हणजे जागृती स्वप्न, सुषुप्ति, अवस्थारूपी स्त्रिया तर त्याच्यावरून पदोपदी सुखाचें असेंच की एक लिंबलोणच उतरतात-करतात आलायबलाय घेतात. (१०७०)

पुढा बोधाचिये कांबीवरी। विवेक द्रस्याची मांदी सारी।
योग भूमिका आरती करी। येती जैसिया ॥ १०७१ ॥
जेथ ऋद्धिसिद्धिची अनेगे। वृंदे मिळत प्रसंगे।
(तिये) तये पुष्प वर्षी (पियूष वरूषी) आंगे। नाहातसे तो ॥ १०७२ ॥
ऐसेनि ब्रह्मैक्यासारिखे। स्वराज्य येता जवळिके।
झळंबित आहे हरिखे। तीन्ही लोक ॥ १०७३ ॥
तेव्हां वैर का मैत्रिया। तयासि माझे म्हणावया।
समानता धनंजया। उरेचि ही ना ॥ १०७४ ॥
हे ना भालतेणे (भलतेन) व्याजे। तो जयाते म्हणे माझे।
ते नोडवेचि कांहि दुजे। अद्वितीयु जाला ॥ १०७५ ॥
पै आपुलिया एकी सत्ता। सर्वेही कवळुनिया पांडुसुता।
केही न लगती ममता। धाडिली तेणे ॥ १०७६ ॥
ऐसा जिंतिलिया रिपुवर्ग। अपुमानिलिया हा जगु।
अपैसा योग तुरंगु। स्थिरू जाला ॥ १०७७ ॥
वैराग्याचे गाढले। अंगी त्राण होते भरले।
तेही नावेक ढिले। तेव्हां करी ॥ १०७८ ॥
आणि निवटी ध्यानाचे खांडे। ते तरी दुजे नाहीचि पुढें।
म्हणौनि हात आसुडे। वृत्तीचाही ॥ १०७९ ॥
जैसे रसौषध खरे। आपुले काज करूनि सरे (पुरे)।
आपणही कां नुरे। तैसे होतसे ॥१०८० ॥
देखोनि ठाकिजता ठावो। धांवता थिरावे पावो।
तैसा ब्रह्मसामीप्ये (सामरस्ये) थांवो। अभ्यासु सांडी ॥ १०८१ ॥
घडता महोदधीसी। गंगा वेगा सांडी जैसी।
का कामिनी कांतापासी। स्थिर होय ॥ १०८२ ॥
नाना फळतिये वेळे। केळीची वाढी मादुळे (मांदुळे)।
का गावापुढे वोळे। मार्गु जैसा ॥ १०८३ ॥
तैसा आत्मसाक्षात्कारू। होईल देखोनि गोचरू।
ऐसा साधन हतियारू (हतियेर)। हळुचि ठेवि ॥ १०८४ ॥
म्हणौनि ब्रह्मेसी तया। ऐक्याचा समो धनंजया।
होतसे ते (तै) उपाया। वोहटु पडिला (पडे) ॥ १०८५ ॥
मग वैराग्याची गोंधळुक। जे ज्ञानाभ्यासाचे वार्धिक्य (वार्धक्य)।
योग फळाचाहि परिपाक। दशा जे का ॥ १०८६ ॥
ते शांती पै गा सुभगा। संपूर्ण ये तयाचिया आंगा।
तैसे ब्रह्म होआवया जोगा। होय तो पुरुषु ॥ १०८७ ॥

**पुनिवेहुनि चतुर्दशीं । जेतुले उणेपण शशि ।**
**का सोळेया उनि जैसी । पंधराची वाणी ॥ १०८८ ॥**
**सागरीही पाणि वेगे । संचरे ते रूप गंगे ।**
**येर निश्चळ जे उमे । ते समुद्र जैसा ॥ १०८९ ॥**
**ब्रह्म आणि ब्रह्म-होतिये । योग्यते तैसा पाडु आहे ।**
**तेचि शांतीचेनि लवलाहे । होय ते गा ॥ १०९० ॥**
**पै तेचि होणेनविण । प्रतिति आले जे ब्रह्मपण ।**
**ते ब्रह्म-होती जाण । योग्यता तेथें (येथ) ॥ १०९१ ॥**

कांबीवरी = धनुष्यानें. सारी = दूर करतो. योगभूमी योग भूमिका. (१०७१) मिळत–मिळती. तये पुष्प वरूषी–तिये पुष्प वर्षी, (पियूष वर्षी) = पुष्पवृष्टीने, नाहत असे–नाहातसें, (१०७२) ब्रह्मवाक्या–ब्रह्मैक्या. झळंबित (इळंबत) हरिखे = आनंदानें उसळत (१०७३) वैर–वैरिया. तयासी–तयासि सामान ना–समानता = साम्यता = अन्न पचविणारा नाभिस्थ वायू. उरे–उरेचि. (१०७४) भलतेच–भलतेणे व्याजे–निमित्तानें. नोडवेचि कां दुजे = दुसरेपणानें प्राप्त होत नाहीं. कांहीं–कां. (१०७५) कवळुनि–कवळुनिया = वेष्टून. कंही–कधी, केही, कांहीं धाडिली = दूर केली. (१०७६) रिपुवर्ग = शत्रुसमुदाय. अपुमानलया हा जगु–अपमानिलिया हे जग. आपैसा योग तुरूंगु = तुरग, तुरंगम तुरूंग = घोडा, मन तुरुष्क = ऊद, धूप, तुर्क) आपोआप योगरूपी घोडा (१०७७) गाढले = चढविलेले आंगी प्राण होते भले = अंगत्राण = कवच, रक्षण, आश्रय. (१०७८) निवटी ध्यानाचे खांडे = ध्यानरूपी खड्गानें, निवटितो (= वधतो, नाहीसे करतो) आसुडे = आवरतो. (१०७९) रस औषध–रसौषध सरे–पुरे. का नुरे–नुरे (१०८०) ठाकिजता ठावो–ठाकिता ठावो = विश्रांतीस्थान गाठतो स्थिर होतो. थिरावे = थांबतो. ब्रह्म सामरस्यें थावो अभ्यासु सांडी–ब्रह्मसामीप्य थावो अभ्यास सांडी = ब्रह्म सामरस्यानें अभ्यासाचा वेग, बळ खुंटते (१०८१) स्थिर होय–मंथर होय [मंथरू = चवरीचा वारा. मंथर = हळू चालणारा, मंद, हरिण, किल्ला, खजीना, जडबुद्धि, मूर्ख स्थूल, वांकडा, शब्दखोल, नीच, हलका, प्रतिबंध, फळ, मंथन रवी. मथ = घुसळणे, विचार करणे, चोळणे, रगडणे मंथानः = रवी. मंथिन् = क्लेशदायक, घुसळणारा, वीर्य, रेत, स्त्रीलिंगी मंथनी] (१०८२) माठुळे–मांदुळे = वाढ खुंटते. वोळे–वळे (१०८३) गोचर = आटोक्यातले, दृश्य, माहीत, सुलभ, विषय, देश, स्थान, टप्पा, मार्ग, तावा, आश्रय, क्षितिज, रूपादि पंचविषय. हतियरू–हतियेरु (साधनरूपी) शस्त्र. समो–समय. वोहटु पडिला–वोहट पडे = तूट पडली होते–तूट पडते. (१०८५) गोंधळुक = भ्रम मावळती वेळ वार्द्धिक्य = वार्द्धक्य, वार्द्धकं (वार्धिः = समुद्र; वार्धिभवं = मीठ)–वार्धिणसः = वृद्ध पांढरा बोकड, गेंडा] = वृद्धपणा. परिपाक = परिणाम विकास, अनुभव, पक्वता नैपुण्य (१०८६) सुभटा–सुभगा–सुबगा = भाग्यवंता. तैसे–ते (१०८७) पुनिवेहुनि, मोळेया उनि–सोळे पाउनि–उनि = उप्पी वानी = कस (१०८८) ब्रह्म–ब्रह्मा. पाड = प्रकार. लवलाहे । होय ते गा–लाहे । हाते तो गा. (१०९०) तेचि होणेन विण = तें ब्रह्म झाल्यावांचून (ब्रह्मपणा जो प्रतीतीस येतो ती ब्रह्म होण्याची योग्यता) प्रतीती = अनुभव. ब्रह्म होती जाण । योग्यता येथ = ब्रह्म होती योग्यता येथ जाण = ब्रह्म होण्याची योग्यता येथें जाण. (१०९१)

यानंतर ब्रह्मबोधरूपी धनुष्याच्या टणत्कारानें विवेक तो तर, सर्व जें हें दृश्य आहे, आटोक्यातलें आहे, त्याची समुदायत्वेंकरून, जी रूपादि पंचविषयांची मांदी, ती नाहीशी करतो. मायिक पसारा दूर सारतो; तेथें मग योग भूमिका योग अवस्था किंवा अनेक तेथे अशी योगावस्था त्याची दृष्ट काढते, त्यास ओवाळते कां त्याची आरती करते.　　(१०७१)

जेथें ऋद्धि सिद्धि म्हणजे बुद्धि वैभवाची (श्रेष्ठत्व संपाद) सामर्थ्यें [जशी का लक्ष्मीच एक का पार्वतीच ती–) अशी अनेक सामर्थ्यें का दैवीशक्तीची सिद्धता पावित्र्य, मोक्ष, उपयुक्तता–जेथें अनेकतेनें सामर्थ्यें] सहज प्रसंगानेंच तीं समूह कोटि येतात (केळीचा घडच जसा का) व त्यांनीं केलेल्या पुष्पवृष्टीनीं जो का नाहात आहे कां ज्या घोडेस्वाराची राजयोग तुरंगी आरुढलेला तो त्याची आंघोळी होते. (१०७२)

असे ते पुष्प वर्षावामध्यें नाहाणें जे तें तर (ब्रह्म वाक्यच जसें का) जीव–ब्रह्म ऐक्याच्या उपमेचें स्वराज्यच कीं जवळ येऊन ठेपलें (स्वयंप्रकाश तो का ब्रह्मदेवच का परमात्मा अथवा इंद्रच कीं स्वतःसिद्ध ज्ञान असलेला तो एक कोटि उत्पन्नाचा राजाच कीं, म्हटला) जवळच येते झाल्यानें तेथें परब्रह्मानें तिन्ही लोक आनंदित होऊन झळकत आहेत नटलेले आहेत, उसळत आहेत, [तिन्ही लोक ते आनंदित होत्साते झळंबितच आहेत कीं–सागराच्या पोटीचा अग्नीच तो, वासुदेवच तो, सागराच्या पोटीचे मुखच तो जशीं का ज्योर्तिमालेमधील अश्विनी म्हटली अथवा ब्राह्मण स्त्रीच ती] ब्रह्मतेजच कीं झळकत आहे, का उसळत आहे, असे त्यास दिसतें. (१०७३)

तेव्हां तर काय अहो वैरामुळें वैरी म्हटला अथवा मैत्रिनें मित्रतेचा असा मैत्रियाच एक म्हणावा जो का, त्यास माझें आपलें स्वतःचें असें आपुलकीच्या भावनेचें बोलणें म्हणणें जें तेथें हे धनंजया! (समानता ती तर का सादृश्यपण तेही पण नच उरून) एका ब्रह्मतेच्या समानतेतच (एका सारखेपणामध्येंच–स्नेहा-मध्येंच स्नेहाच्या बरोबरीमध्यें) बसणें केले कीं; येथें साम्यसिद्धी ही पण उल्लंघिली होऊन ब्रह्मैक्याचें होणें झालें कीं. 'एकजात समावस्था तेथें हा माझा वैरी कां हा माझा मित्र असें म्हणण्यास कांहींच उरत नाहीं'. (१०७४)

अहो! एवढेंच नाहीं तर तो ज्यास भलत्यासहि पण निमित्तानें माझे म्हणतो, तेथें दुजें असें प्राप्त होत नाहीं पण बिनजोड का सर्वश्रेष्ठ असे अद्वितीयतेचे होणे झाले कीं. 'तो–'एकस्वरूप' झाल्यानें त्याच्या-पुढें दुजेपण ठरत नाहीं कधीकाळीं एकायास माझें म्हटलें' तरी. (१०७५)

तसेंच (आपल्या एका सत्तेनेच कीं, आपल्या एकी) ब्रह्मैक्यानेंच एकीभावः म्हणजे एकजीव असें झाल्यानें तेथें (सत्ताच एक तिनें–पुरूषच सर्व, खरेपणा, चांगुलपणा, अस्तित्व (व्या.) व्यापक जातीच एक त्यानें तेथें) पांडुसुता सर्व कांहीं कवळून घेतले व कोठेही पण नच लागून ममत्व का ममताच कीं ती स्वार्थ दृष्टीची ती दूर केली–तेथें (पृथकत्व का गर्व अथवा) अहंकार त्यानें दूर ठेविला कीं,–ममत्वास आदर देऊन त्यानें स्वार्थ दृष्टीचें होणें केलें नाहीं: अथवा असेंही म्हणणें करू कीं त्यानें संकुचित वृत्ति ममतेची केली नाहीं तिचा त्याग केला व विश्व सर्व एकभावानें कवळिलें. (१०७६)

*याप्रमाणें रिपुवर्ग–(म्हणजे शत्रुसमुह (का चोर ओंवा) रिपुजातीय, रिपुसमुह, पशुवर्ग जसा सजातीय* वस्तुसमूह म्हटला) जिंकल्यानें–जिंतिल्यामुळें तेथें सर्व जगानें तर हा आपोआपच कीं मानिला–सन्मानिल्यानें (अष्टवसूतील पहिला तोच) आपला म्हटल्यानें तेथें आपसुकच–अपैसयाच कीं, योगरूपी, घोडा, का योग-रूपी मनच ते ब्रह्म झाल्यानें (ब्रह्मच ते मन झाल्यानें) तेथें योगरूपी तुरंग स्थिर झाला कीं रिपुवर्ग जिंकला, मायिक पसाऱ्याचें निवारण केले, तेथे आपोआप योगरूपी घोडा स्थिर झाला. (१०७७)

वैराग्याचे बळकट चढविलेलें जें अंगी जड कवच होतें, भले असें तें (अंगी भरलेलें तें जाड वैराग्य कवच (जें होतें) तें आतां क्षणभर तो ढिलें करतो कीं. (१०७८)

त्याचें जें ध्यान तेथें खरें पाहिलें असतां दुजें असें मानणेंच नाहीं पण वैराग्य तें ढिलें केल्यानें तेथें तो ध्यानाच्या खड्गानेंच ते दुजेपण नाहींसे करतो. म्हणून आहार, व्यवहार, क्रिया, मनःस्थिति कां वृत्तीचाही पण हात आवरता घेतो. (१०७९)

खरें असें रसऔषध* रसौषधी [धातुरस–प्रीती प्रेम, रूचि गोडी, आनंदसुख–का नऊ रस–सौंदर्य–पाणी प्रेमाचे–असें औषध–फळ पिकल्यावर मरणारी औषधी=वनस्पती–] प्रतिकार औषध खनिजद्रव्य का, चकाकणारी वनस्पती=औषधि, असे ते खरें औषध आपले काम करून सरते, बाजूस होते, नाहीसे होते. व आपणही पण उरतच नाहीं जसें, तसें तेथें होत आहे. (१०८०)

जेथें पोहचण्याचे तो ठावच पाहिला, धांवता पायच मुळी स्थिर झाला, त्याप्रमाणें ब्रह्मीच समरसतेचा झाल्यानें, ब्रह्माचा जवळचा झाल्यानें तेथें मग अभ्यास तो करणें ते सांडिलें होतें–अहो तेथें ब्रह्मच तो एक सर्व झाल्यानें तेथें अभ्यास तो कसचा। (तेथें पुन्हां साधक दशेचें तें अभ्यासणें, तें कशास ? तें तर बंदच होतें.) (१०८१)

अहो गंगा महोदधीचीच सर्वथैव घडली गेली, ती महोदधीच झाली, अथवा कामिनी जशीं आपल्या कांताजवळच कीं स्थिर होणारी (का हलु चालणारी होणारी) केव्हांही. (१०८२)

केळी फळण्याचे वेळेस तर केळीची वाढच मुळीं खुंटते, खुंटली होते. अथवा गांवापुढेंच कीं मार्ग तो गांवातच वळतो, गांवच तो होतो–गांव आलें असतांना मार्ग तो गांवामध्येंच जाण्याचा होतो, गांवातच वळतो. (१०८३)

त्याप्रमाणें आत्मसाक्षात्कार सुलभ का आटोक्यांतला अनुभवाचा झाल्यावर उपाय साधनरूपी हतियार तें तो हळूहळू खालीं ठेवतो, हलुवारपणानेंच (योजतो कां) बाजूस ठेवतो. (१०८४)

म्हणून ब्रह्म जें त्या ब्रह्मांशी ऐक्य होण्याचा समय प्रसंग घडल्यामुळें हे धनंजया, तेथें तर साधन उपायाची तूटच पडली होते तेथें उपाय करण्याचे ते कसचें ! तेथें तर ब्रह्माशीं ऐक्यच एक होऊन आहे. तेथें (साधन) उपाय जो म्हटलेला तो कशास ? साधनरूपी उपायाची आटणी का तूटच तेथें होते साधन उपायच मुळीं तेथें वोहटले म्हणजे आकर्षिले होतातः (१०८५)

तेथें मग गोंधळुक, घोटाळा, का विपरीत ज्ञान भ्रांति अथवा भ्रम जो तेथें वैराग्यानें योग तुरंगावरची ती स्वारी पक्की झाल्यानें ज्ञान अभ्यास तो शेवटास आला वृद्धपणास आलेला अनुभवाचा झालेला तेथें तर योग फळाचाहि परिणाम पाड पक्कता परिपाकच एक सर्वथैव योगच होऊन आहे, अशी ती दशा का ज्ञानावस्था ती— (१०८६)

योग फळ परिपाक सिद्धीच शांतीची ती, हे सुभटा–हे भाग्यवंता अर्जुना ! संपूर्णपणानें त्याच्या आंगीच संचरून असते तसें झाल्यानें ब्रह्मच एक व्हावें, असा ब्रह्म होण्याच्या योग्यतेचा तो पुरुष होतो. (१०८७)

तेथें चतुर्दशीस, पौर्णिमेपेक्षां जी कांहीं त्या शशीच्या म्हणजे चंद्राच्याठायीं चंद्रकलेसंबंधीं उणेपणा असतो किंवा सोळा नंबरच्या उत्तम सोन्याच्या कसापेक्षां पंधरा नंबरच्या सुवर्णाची ती कसाची योग्यता (कस–वानी उणीव) हीन असते. (१०८८)

सागराचे ठायीं अति वेगानें जे गंगानदीचें पाणी संचार करूं लागतें तेंच मुळीं ते गंगेचे चंचल रूप दर्शित होय–दुसरे बाकीचें पाणी जें निश्चळ उभें आहे तें तर समुद्राचे शांत स्वरूप जसे कां. (१०८९)

---

*रस औषध–स्थायीभावो रसः स्मृतः, दिव्यौषधि नाम रसायन, भजन, एका भावानें विश्व कवळिलें, साक्षात्कार—[९९६, १०७५, १०८३ (१८) ओव्या पहा.] (अ. ११ ओवी ६९४ प्रकरण 'रस, भाव, साक्षात्कार')

ब्रह्म जे आहे व ते ब्रह्मस्वरूप होण्यास सिद्ध जो यांच्यामध्यें संबंध तो तसा जाण ब्रह्मरूप होण्याच्या वेळेस जी योग्यता येऊ लागत असते तसा तो प्रकार संबंध जाणावा. शांतीच्या सत्वरतेच्या गुणप्रभावाने लवकरच तो ब्रह्म होऊन येतो, तो केवळ ब्रह्मच होतोः (१०९०)

अहो पण तेंच ब्रह्म होण्याशिवायच मुळीं जे ब्रह्मपण प्रतीतीस आले–अनुभवाचें झालें त्याच अनुभवाला ब्रह्मरूप होण्याची योग्यता कां पात्रता म्हणतात (ब्रह्म होती योग्यता ती जाण.) (१०९१)

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥**

ब्रह्मभूतः=ईश्वराशीं तादाम्य पावलेला. प्रसन्नात्मा=(प्रसन्न=संतुष्ट, स्वच्छ, उघड, बिनचूक आत्मा=स्वभाव, देह, आपण, स्थूल, शरीर, मनबुद्धि, महत्तत्व स्वरूप) संतुष्ट स्वभाव स्वरूप न शोचति =शोक करीत नाहीं, पश्चाताप पावत नाहीं. न कांक्षति=आशा धरीत नाहीं, वाट पहात नाहीं इच्छित नाहीं. समः भूतेषु सर्वेषु=('समत्व चित्ताचे। तेंचि सार जाण योगाचे। जेथ मन आणि बुद्धिचे ऐक्य आथी ॥) (२: ५०: २७३) सर्वभूतीं तुल्यप्रमाण सहृश्य, सरळ, निःपक्षपाती, प्रामाणिक, सद्गुणी, योग्य, संपूर्ण, सह, एकत्र तुल्यतेचा लभते=मिळवतो, साध्य करतो. भक्तिम्=भक्ति, उपासना, सेवा, श्रद्धा, रचना, आकृति, परां=(परस्–अधिकं) पर=श्रेष्ठ, उच्च ध्येय, परमात्मा, मोक्ष, पराकाष्ठा, अत्यंत, ज्यास्त, (केवळ, अत्यंत, ज्यास्त) विष्णु, ब्रह्म.

अन्वय :—ब्रह्मभूतः। प्रसन्न आत्मा । शोचति । न । कांक्षति । न । सर्वेषु भुतेषु समः । मत् पराम् भक्तिम् । लभते ॥ ५४ ॥

*अर्थ* :—ईश्वराशीं तादात्म्य पावलेला, संतुष्ट स्वभाव, स्वरूप आत्मा पश्चात्ताप पावत नाहीं का शोक करीत नाहीं. तसेंच कांहीं आशा धरीत नाहीं कां कशाची वाट पहात नाहीं; तो कांहींही इच्छित नाहीं. तो सर्व भूती तुल्यप्रमाण योग्य व प्रामाणिक संपूर्ण अशी माझी अत्यंत श्रेष्ठ भक्ति (उपासना सेवा, श्रद्धा, रचना, आकृती, इत्यादि) मिळवितो, साध्य करतो. (उच्च ध्येय भक्तीची पराकाष्ठा परमात्माच होणे जे विष्णु, मोक्ष, कां ब्रह्मच होणे जे.)

(२) ब्रह्मभूत प्रसन्नचित्त–, कशाचाही शोक करीत नाहीं, कशाचीही इच्छा करीत नाहीं–, सर्वांभूतीं सम होत्साता, माझी पराभक्ति प्राप्त करून घेतो. हीच ज्ञानोत्तर भक्ति होय.

(श्लोक ५४ वा ओव्या १०९२–११३०)

**ते ब्रह्मभाव योग्यता । पुरुष मग तो पांडुसता ।**
**आत्मबोध प्रसन्नता । पदीं बैसे ॥ १०९२ ॥**
**जेणे निफजे रससोय । तो तापुहि जै जाय ।**
**तैसे (तै ते) का होय । प्रसन्न जैसे (जैसी) ॥ १०९३ ॥**
**नाना भरतिया लगबगा । शरत्काली सांडिजे गंगा ।**
**का गीतु राहाता उपांगा । वोहटु पडे ॥ १०९४ ॥**
**तैसा आत्मबोधी उद्यमु । करिता जो होय श्रमु ।**
**तोही तेथें शमु । होउनि जाय ॥ १०९५ ॥**
**आत्मबोध प्रशस्ति । होतिये दशेची ख्याति ।**
**ते भोगितसे महापत्ति । योग्य तो गा ॥ १०९६ ॥**

तेव्हां अप्राप्तत्वे शोचावे । कांहीं पावावया कामवावे ।
हे सरले समभावे । भरिते तया ॥ १०९७ ॥
उदया येता गभस्ति । नाना नक्षत्र व्यक्ति ।
हरविजति दीप्ति । आंगिका जेवीं ॥ १०९८ ॥
तेवि उठितिया आत्मप्रथा । हे भूतभेद व्यवस्था ।
मोडित मोडित पार्था । वास पाहे जो ॥ १०९९ ॥
पाटवा वरील अक्षरें । जैसी पुसता येती करे ।
तैसी हारपती भेदांतरे । तयाचिया दिठि ॥ ११०० ॥
तैसेनि अन्यथा ज्ञाने । जिये घेपति जागर स्वप्ने ।
तिये दोन्ही केली लीने । अव्यक्तामाजी ॥ ११०१ ॥
मग तेही अव्यक्त । बोध वाढता झिजत ।
पुरता बोधी समस्त । बुडोनि जाये ॥ ११०२ ॥
जैसी भोजनाचिये व्यापारि । क्षुधा जिरति अवधारी ।
(मग) तृप्तीच्या अवसरी । नाहीचि होय ॥ ११०३ ॥
नाना चालीचया वाढि । वाट होत होता थोडी ।
मग पातला ठायी बुडि । देउनि निमे ॥ ११०४ ॥
का जागृति जंव जंव उद्दीपे । तंव तंव नीद हारपे ।
मग जागिनलिया स्वरूपे । नाहीचि होय ॥ ११०५ ॥
हे ना ते आपुले पूर्णत्व भेटे । तेथ चंद्रासी वाढि खुंटे ।
तेथ शुक्लपक्ष आटे । निःशेष जैसा ॥ ११०६ ॥
तैसा बोध्य जाता गिळितु । बोधु बोधे ये मज आंतु ।
मि सगळा (मिसळला) तेथें साद्यंतु । अबोधु गेला ॥ ११०७ ॥
तेव्हां कल्पांताचिये वेळे । नदी सिंधूचे पडवळे (पेंडवळे) ।
मोडुनि भरले जळें । अब्रह्म जैसे ॥ ११०८ ॥
नाना गेलिया घट मठ । आकाश दाटे येक दाट ।
का जाळुनि काष्टे काष्ट । वन्हीचि होय ॥ ११०९ ॥
नातरि (लेणियाचे) लेणयाचे ठसे । आटोनि गेलया मुसे ।
नामरूप भेद जैसे । सांडी सोने ॥ १११० ॥

पुरूष मग तो–तो मग. पदि–पदी. (१०९२) निफजे–निपजे. ते=ते अन्न. ती रससोय. जैसे–जैसी. होय–होये. (१०९३) उपांगा=वीणा मृदंगादि. (१०९४) जो होय–होय जो. तेथे शमु–जेथे शम (सम)=शांतीरूप ज्या ठिकाणीं. (१०९५) प्रशस्ति–प्रशस्ती–प्रसक्ती होती ये–हे तिये. [योग्य=(१) उचित साजेसे, (२) पात्र, समर्थ, चतुर, (३) अनुक्रम (४) उपयुक्त, (५) (ज्यो.) पुष्य (स्त्री.) (१) अभ्यास, शास्त्राभ्यास, (२) वैद्यक्रिया, (३) सूर्य (स्त्री). (१) यान, वाहन, गाडी, (२) चंदन, (३) पुरण पोळि, इत्यादि पक्वान्न, (४) मुरड शेंग (व.)) योग्यता=लायकी, हुशारी, पवित्रता.] (१०९६) अप्राप्तत्वे–आत्मत्वें. कामवावे–कामावे. (१०९७) गभस्ति–गभस्ती. व्यक्ति–व्यक्ती. हरविजति–हारविजती. दिप्ती–दीप्ती. अंगिका=आंगच्या, देहसंबंधीच्या. (१०९८) तेवि–तेवी, उठितिया–उठतिया. आत्मप्रथा=आत्मानुभव. मोडित मोडित–मोडत मोडत–मोडीत मोडीत. (१०९९) पाटवा–पाटिये. तयाचिया दिठि–तयाचिये दृष्टी. (११००) पुरता–पुरला. बोधी समस्त=पूर्ण बोधांत. जाये–जाय.

(११०२) भोजनाचिये–भोजनाच्या. व्यापारि–व्यापारी जिरति अवधारी. तृप्तीच्या–जिरत जाय अवधारी मग. नाहीचि–नाहीच. (११०३) चालीचया–चालीचिया वाढी. होता–जाय. (११०४) जंव जंव–जंव. नीद–निद्रा. जागिनलया–जागिनलिया. नाहीचि–नाहींच. (११०५) आपुले–ते आपुले. वाढि–वाढी. (११०६) बोध्य–जात = जाणण्याचे सर्व विषय, जाणण्या योग्य असें सर्व, बोधु बोधे ये–बोध बोधे ये. मिसगळा [(मिष = स्पर्धा, मत्सर, सबब, निमित्त, सोंग, कपट. गल–गळा (गलानिक. गलाविक = कोळंबी मत्स्य.) कंठ गळा, स्पर्धा, का निमित्त मत्सराचा केलेला तो]–मिसळला अबोध = अज्ञान, अडाणीपणा, अविद्या, माया. (११०७) पडवळे–पेंडवळे = बांध, मर्यादा. अब्रह्म–आब्रह्म = ब्रह्म लोकांपर्यंत (अब्रह्मचर्य = व्यभिचारी, व्यभिचार) (अब्रह्मण्य ब्राह्मणास अपायकारक अब्राह्मण्य = ब्राह्मणाची कर्तव्यें न करणें.) (अब्राह्मण–ब्रह्मणसदृश क्षत्रिय इ. असारखेपणा.) (११०८) गेलया–गेलिया दाटे–ठाके. येकदाट एकवट जाळुनि–जळोनि. वन्हीचि–वन्हीच. (११०९) लेणयाचे–लेणियाचे = अलंकाराचे. गेलया–गेलिया. भेद–भेदे. सांडी–सांडिजे. (१११०)

**आत्मबोध प्रसन्नता त्याच्याठायीं दिसते. सगळे भेद नाहींसे होतात, ज्ञानही नष्ट होते आणि तो माझ्या स्वरूपी येऊन मिळतो. माझ्यावांचून तो दुसरे कांहींही, स्वतःलाही, ओळखीत नाहीं, ही चौथी ज्ञानभक्ती त्याच्या हातून घडते.**

(ओव्या १०९१–११३०)

'ब्रह्म होती' योग्यता प्राप्ततेमुळें तो पुरुष ब्रह्मभावच (आत्म, प्रेम आसक्ति, निष्ठा, भावना, भक्ति, विभुति रूपांतर, स्वभाव) का ब्रह्म बोध चित्त प्रसन्नता म्हटला: असा तो ब्रह्मभावाचा पुरुष हे पांडुसुता! मग आत्मबोध (स्वभावबोध स्वच्छ अशा प्रसन्नतेच्या, संतुष्टतेच्या) प्रसन्नतेच्या आसनावर कां पदींच बसतो कीं. (१०९२)

अहो स्वयंपाक करण्याच्या अगोदर तर तापच कीं एक का त्रासच कीं एक वाटणारा पण जेव्हा का स्वयंपाक हा सिद्ध केला होतो, तेव्हां तर अगोदरच तो त्रास का तापही पण जेव्हां का नाहीसा होतो तेव्हां ते अन्न प्रसन्नपण पाहूं लागते कां ती रससोय–प्रसन्नतेस आली जशीं असें होते. ( पाकनिष्पत्तीत अन्नाची उष्णता असतेः खाण्यास समाधानकारक तें अन्न तेव्हांच जेव्हा का ती उष्णता त्या अन्नामधून जाते.) (१०९३)

अथवा पावसाळ्यांत अगदीं सहजपणें भरले जाणारे, ओढे नदी नाले ते तर शरदऋतुमध्यें गंगेने सांडिले त्यजिले होऊन ती गंगा शांत होते. जसें का गीत गाणें थांबलें म्हणजे वीणा मृदंगादि गीत उपांगाचे तर आपोआपच बंद होतात (बंद पडतात) त्यांचे आकर्षिले जाणें होते नां! (त्या वीणा मृदंगादि वाद्यांची आटणीच होते कीं.) (१०९४)

त्याप्रमाणें आत्मबोध (म्हणजे स्वरूप ज्ञाना) प्राप्ति उपभोगासाठीं केलेला जो उद्यम, यत्न, (अनियंत्रित, अतिशय जोराचा श्रम जो) होतो चालू असतो तो आत्मबोध झाल्याबरोबर शम होतो. (शांतिरूप होऊन जातो शांतिच होऊन असतो.) (१०९५)

स्वरूप ज्ञान (का ब्रह्मज्ञान, उत्कर्ष, प्रशंसा, आशिर्वाद, स्तुति, गुणविशेष, प्रसिद्धी, उपदेश का मार्गदर्शन) होत असतांना त्या शांत प्रसन्न अवस्थेला आत्मबोध प्रशस्ति हे नांव आहे (अहो ती ज्ञानावस्थेची, ज्ञानस्थितीची ती प्रसिद्धि कां कीर्तीच, ज्ञान स्तुति असें बोलणें सांगणें का नांव तेथें अशी ती प्रसन्न दशा ज्ञान अवस्था हे महामती अर्जुना! त्याला लाभतेः तो योग्य–समर्थ–पात्र–चतुर–तो, पवित्रता ती भोगीत असतो, उपभोगीत असतो.) (१०९६)

त्या वेळेस स्वतःस नच मिळालेले कां नच आलेलें [(लग्नाला योग्य न झालेले पण) (अप्राप्तप्रापक =अपूर्व नवीन, नियम, इत्यादी सांगणारा, न माणसाळलेला. अप्राप्त व्यवहार=वयांत न आलेला.)] त्याबाबत त्यानें शोक करणें नाहीं (तो शोक करीत नाहीं. शोकाचा होत नाहीं) व कांहीं (एकादें) मिळावें पावावें भेटावें त्यासाठीं, कामावें, खपावें, राबावें, (संमती देणे करावें, स्वेच्छेनें वागावें चालावें, विषय) सक्त व्हावें. कामायान–कामयमान=इच्छिणारा, विषयासक्त) असें तें भरतें येणें जें तें तर ब्रह्म, भावसमा, समभावे समते करून सदृश स्वरूपतेंमुळें, (सरलें संपलें,) नाहींसें झालें होतें ब्रह्मसाम्य भरतीमुळें त्यास आपले कांहीं हरवलें म्हणून तें हुडकणें नाहीं का एकादें कांहीं प्राप्त व्हावें म्हणून प्रयत्न करणें नाहीं. (१०९७)

गभस्ति जो सूर्य तो उगवल्यावर अनेक नक्षत्रें आपलें वेगवेगळेपण पृथक्पणा का लिंग प्रगट प्रदर्शनें ती आपल्या अंगची ती सौंदर्ये, दीप्ती (दीप्ती=लाख, कांसे, बाणाचे, जोरानें जाणे जसें जें तें) हरवितात, हरविण्यास लाविली होतात हरवून बसतात. आंगिका देहसंबंधींची ती सौंदर्ये, देहयुक्तेची ती, दीप्ती, अवयवांचें तें, अभिनय ते, ती नक्षत्रें, ते तारे, २७ नक्षत्रांपैकीं, प्रत्येक, ते मोती, ते हार, गभस्थि जो सूर्य उगवल्यावर–ती सौंदर्ये–त्या ताऱ्यांनीं टाकण्यास हरविण्यास लाविली होतात. ती अंगची प्रभा नक्षत्रें आपोआपच हारवून बसतात. (१०९८)

त्याप्रमाणें, आत्मप्रथा–आत्मानुभव, ब्रह्मअनुभव का पुरुष ख्याति का कीर्ति, उठती झाली असतां संचारल्याबरोबर जो हे पार्था ! ही भूत भेदाची जी कांहीं एक व्यवस्था (निश्चितपणा, स्थैर्य, स्थिति, करार, सापेक्ष स्थिति) ती मोडीत, मोडीतच तो वेळ घालवितो वास पाहातो–(सुगंधित, सुवासिक स्वादिष्ट करणें का पुटे देणे जे) राहातो, वासस्थान करतो जो कां वास का वाटच आपली पाहातो की (आत्मस्वरूप संचाराचा पुरुष जिकडे पाहातो तिकडे ही भेदभावात्मक भूतसृष्टी बुडूं लागतें.) (१०९९)

पाटवा म्हणजे पाटीवरची (पाटी गणित=अंकगणित) अक्षरें ती हातानें पुसतां येतात त्याप्रमाणें त्याच्या दृष्टीमध्यें भेदभावाची अंतरें ती हारपलेली होतात, हारपतात. [भेद=द्वैत. भेदवादिन्=द्वैतवादिन्) व्यग्रता, फाटाफूट, बदल, अंतर, फरक, विभागणें, फोडणे, गुह्य फोडणें, विकृति. अंतर=पडदा, विघ्न, अंतःकरण, छिद्र, प्रसंग, फरक जन्मांतर, प्रकार, अभाव, मधला मनुष्य, पिढी, चूल इत्यादि जात जामीन, व्यंग, वस्त्र हेतु, उत्कर्ष, मोकळी जागा, कुस्तीचा पवित्रा. पाटव=चातुर्य चलाखी, आरोग्य, कुशल, त्वरा, कोष्ट (व).] (११००)

त्यायोगेंकरून विपरीतज्ञानें जी का, जागरामध्यें, असतां का स्वप्नामध्यें असतां घेतली जातात, घेतली होत असणारी–ती दोन्ही आतां तर अव्यक्तामध्येंच की, लीन केली जशीं (तेथ, दुजी जे जीवदशा तिये नांव वीरेशा । अव्यक्त येथ ऐसा । पर्यायो हा ॥ ९२ ॥ अ. १३ वा.) (११०१)

तें अव्यक्तही पण जेव्हां का बोध पूर्णतेस येतां येतां (वाढतां वाढतां झिजले का) क्षीण होऊन समस्त तें पूर्ण अशा बोधामध्येंच बुडून जातें.) (११०२)

भोजन करीत असतां भोजनाच्या व्यापारामध्यें असेंच जाण की, असेंच होतें नव्हे का, कीं, भूक ती जिरून जाते व नंतर मग जेव्हां तृप्ती होते त्यावेळेस तर ती क्षुधा मुळींच कीं, राहात नाहीं का असत नाहीं. (११०३)

अथवा चाल जेव्हां कां वाढते तेव्हां वाट ही वोसरली होत होत अगदीं थोडीच होते, उरते व मग जेथें कां पोहोचणे झाले तेथेंच कीं सर्वथैव ती बुडी देऊन असते नाहीशी होते जसें. (११०४)

जागृति जसजशी सजीव केली होते रंगाला येते. (उत्तेजनाप्रत येते, जागते, प्रकाशास येते चेतते) तों तों नीद निद्रा तर हारपतेच, नाहींशी होते व मग यावर जर का स्वरूपीच जागणें झालें तर मग अज्ञान निद्रा ती समूळपणेंच नाहींशी होते कीं. (११०५)

असेंही पण कांहीं असतें नसतें कां होतें जातें जें कांहीं तेथें तर आपलें पूर्णत्वच मेटतें–पूर्णपणें स्वरूपीचें होणेंच एक–तेथें तर चंद्राची ती कलांची वाढ खुंटल्यामुळें निःशेषपणें, शुक्लपक्षच मुळीं, आटून गेला संपला कां जसा कां–तेथें दर्शच एक पूर्ण चंद्राच्या मेटीनें होणारे कीं. (११०६)

त्याप्रमाणें जाणण्यायोग्य असें सर्व जें बोध–जात तें गिळिलें होऊन, पोटी भरून घेतले तेथें बोधानें, बोधच मज आंत आला कां येऊन असल्यानें तेथें मी (सगळा कीं,) साद्यंत असा स्पष्ट दिसणारा झाल्यानें जाणणारा जाणण्याबरोबर माझ्या स्वरूपांत समरस होतो तेव्हां अज्ञान ते नाहींसें झालें कीं. (११०७)

तेव्हां प्रळयकाळाचे वेळीं कां कल्पांतसमयीं नदीचे का सिंधूचे मर्यादितपण कां बांध मोडून टाकून जळामें तें अमर्याद असेंच ब्रह्म जें तें ब्रह्म लोकापर्यंत भरलें होतें. कीं, तेथें तेथीलचे ते मर्यादितपण मोडून टाकले होऊन ब्रह्म लोकच जसा कां भरला गेला. सर्व ब्रह्मांडच जलमय होऊन जाते. (११०८)

अथवा घट का मठ गेल्यावर बाजूस केल्यानंतर तर येकवट का येकदाट सर्व आकाशच कीं ठाकते, असतें अथवा काष्ठानेंच मुळीं काष्ट आळून, वन्हीच ब्रह्माग्नीच एक तेथें देहबुद्धीनेच देहबुद्धि आवरून धरून की उरतो असतो की. (११०९)

किंवा अलंकाराचे ठसे मुसेमध्यें आटून टाकले तर मग सोनें तें तर आपलें तें अलंकाराच्या योगेंकरून असणारें जें अलंकार मेदरूपी नामरूप तें तर केव्हांही सांडतेंच कीं तेथें अलंकार (नामरूपानें नसणें) तें सुवर्णाचें तें तेथें सोनेंच एक सर्व की. त्यास अलंकाराचे नामरूप मेदभाव लागू होत नाहींत. (१११०)

हेही असो चेइलया । ते स्वप्न नाही जालया ।
आपणचि का आपणया । उरिजे जैसे ॥ ११११ ॥
तैसा मी येक वांचूनि काहि । तया तयाहीसकट नाही ।
हे चौथी भक्ति पाहि । माझी तो लाहे ॥ १११२ ॥
येर आर्त जिज्ञासु अर्थार्थी । हे भजतीये पंथी ।
ते तिही पाउनि चौथी । म्हणत आहे ॥ १११३ ॥
येऱ्हवी तिजी ना चौथी । हे पहिली सरती ।
पै माझिये सहज स्थिति । भक्ति नांव ॥ १११४ ॥
जे नेणणे माझे प्रकाशुनि । अनन्यत्वे माते दाउनि ।
सर्वेही सर्वी भजउनि । बुझावीत आहे ॥ १११५ ॥
जो जेथ पावो बैसे । तया तेथ तैसाचि असे ।
हे उजिवडे का दिसे । अखंड जेणें ॥ १११६ ॥
स्वप्नाचे दिसणें न दिसणें । जैसे आपुलेनि असलेपणे ।
विश्वीचे आहे नाही तेणे । प्रकाशे तैसे ॥ १११७ ॥
ऐसा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा ।
तो भक्ति या वोजा । बोलिजे गा ॥ १११८ ॥
म्हणौनी आर्तांचां ठाई । हे आर्ती होय पाही ।
अपेक्षणीय जे कांहीं । ते मीचि केला ॥ १११९ ॥
जिज्ञासु पुढे वीरेशा । हेचि होऊनि जिज्ञासा ।
मी की जिज्ञासु ऐसा । दाखविला ॥ ११२० ॥
हेचि होऊनि अर्थना । मीचि माझां अर्थी अर्जुना ।
करूनि अर्थाभिधाना । आणी माते ॥ ११२१ ॥

एवं घेऊनि अज्ञानातें। भक्ति जे हे वर्ते।
ते दावी मज (द्रष्टयाते) दृष्टयाते। दृश्य करूनि ॥ ११२२ ॥
तेथ मुखचि दिसे मुखें। या बोला कांही न चुके।
परि दुजेपण हे लटिके। आरिसा करी ॥ ११२३ ॥
दिठि चंद्रुचि घे सांचे। परि येतुले हे त्रिमिराचे।
जे येकचि असें तयाचे। दोनी दावी ॥ ११२४ ॥
तैसे सर्वत्र मीचि मिया। घेपतसे भक्ति इया।
परि दृश्यत्वे हे वायां। अज्ञान वसे ॥ ११२५ ॥
ते अज्ञान आतां फिटले। माझे द्रष्टृत्व मज भेटले।
निजबिंब येकवटले। प्रतिबिंबी जैसे ॥ ११२६ ॥
पैं जेधवाही असे किडाळ। तेधवाही सोनेचि अढळ।
परि ते किडाळ गेलया केवळ। उरे जैसे ॥११२७ ॥
हा गा पूर्णिमेआधी काई। चंद्र सावधुचि नाही।
परि तीये दीनी भेटे पाही। पूर्णता तया ॥ ११२८ ॥
तैसा मीचि ज्ञानद्वारें। दिसे परी हस्तांतरें।
मग (द्रष्टृत्व) दृष्टत्वे सरे। मियाचि मी लाभे ॥ ११२९ ॥
म्हणौनि दृश्यपंथा। अतीतु माझां ज्ञानी पार्था।
हा भक्तियोगु चौथा। म्हणितला गा ॥ ११३० ॥

जालया–जालया मग (१११ १) चौथी=ज्ञानभक्ति (१११२) भजतीये ही–भजती जिये. तिही पाउनि–तिन्ही पावोनि. म्हणत–म्हणिपत (११०३) सरती–शेवटची. नांव–नाम. (१११४) अनन्यत्वे–अन्यथात्वे=जगद्रुपानें, विपरीत भावानें. भजौनि–भजउनि. (१११५) पावो–पाहो तैसाचि–तैसेचि. उजिवडे–उजियेडे=प्रकाशानें. अखंड–अखंडे. (१११६) विश्वीचे–विश्वाचे. तेणे–जेणे–(१११७) ऐसा–तैसा हा (१११८) होय–होऊनि. अपेक्षणीय=इष्ट. (१११९) पुढे–पुढा. कीं–कां. जिज्ञासु–जिज्ञास्यु=जाणण्यास योग्य. (११२०) अर्थाभिदाना=अर्थ या नांवाला. (अर्थना–अर्थनं=विनंती, याचना, अर्ज इत्यादि) (११२१) दृश्याते–द्रष्टयाते=(द्रष्टृ=पाहणारा, न्यायाधीश दृश्य=दिसणारे सुंदर.) (११२२) अरिसा–आरिसा. (११२३) त्रिमिराचे=नेत्र रोगाचे. (११२४) भक्ति यया–धनंजया दृश्यत्वे–दृश्यत्व. (११२५) दृष्टत्व–द्रष्टत्व=पाहातेपण पाहाणारेपण. निजबिंब–निजबिंबी प्रतिबिंबी–प्रतिबिंब. (११२६) जेधवांहि–जेव्हांहि तेधवाही–तेव्हांहीं ते–ते कीड. (११२७) हं–हां अधी काइं–ठायी कायी–आधी–कायी. सावधुचि–सावयव. दीनी–दिवशीं. (११२८) ज्ञानद्वारे–अज्ञानद्वारे=उपाधीच्या वृत्तीनें, उपाधीच्या द्वारानें. हस्तांतरे =वेगळा. असा, हाताच्या अंतरानें (लघुहस्त=उत्तम तिरंदाज. लघुकाय=बोकड. लघुप्रयत्न=उच्चारण्यास सुलभ वर्ण) दृष्टत्वे–द्रष्टत्व ते–द्रष्टत्वी ते. (११२९) दृश्यपंथा–दृश्यपथा अतीतु माझां ज्ञानी–अतीतु माझां. हा भक्ति योगु–भक्तियोग. म्हणितला–म्हणितला गा. (११३०)

असें हेहीं असोः पण जागे झाल्यावर, कां अहो तें स्वप्नच मुळीं नाहींसें झाल्यावर, आपले आपणच (आपले सर्वस्वपणानें आपणपणानेंच,) कीं उरणें होतें जसें. (११११)

त्याप्रमाणें त्यास स्वतःसकटही मीच एक त्यानें मजशिवाय दुसरें कांहीं ओळखणें नाहीं अशी ही चौथी भक्ति जाणः तो माझी अशी ही चौथी भक्ति लाभतो. (१११२)

आर्त जिज्ञासु–अर्थार्थी यांनीं भजण्याच्या तऱ्हा प्रकाराच्या मार्गानी वेगळे कां निराळेपणानें ते मार्ग पंथ पावूनच कीं अहो ही चौथी तऱ्हा म्हणतली कीं, (आर्त–दुःखत्रस्त जिज्ञासु–ज्ञानइच्छा–अर्थार्थी धनइच्छा हे ज्या मार्गानी जातात त्याच्यावरही हे निराळे असे म्हणून ही भक्ति चौथीच कीं सर्वथैव म्हटली. (१११३)

येऱ्हवी पाहिले तर ती भक्ति तिसरी ही नव्हें, का चौथीहीपण नव्हे ती कांहीं पहिलीही नव्हे, अथवा सरती म्हणजे शेवटचीही नव्हे; पण अहो ! माझ्याठायीं जी सहज स्वाभाविक स्थिति अवस्था तीसच कीं, (ज्ञान–भक्ति), भक्ति चौथी हे नांव आहे. भक्ति सहज आवड असें म्हणणें झाले कीं. (१११४)

जें कांहीं परमात्म्यासंबंधीचें नेणतेपण अथवा ईश्वर तो कसा? कां केव्हढा ! हे जाणणेस येत नाहीं जे तेंच मुळीं ज्यानें प्रकाशास आणलें पाहवूं केलें, प्रत्यक्षत्वें दाखवूं केलें, दिसविलें, मजला अनन्यपणानें माझें देखणें, दाखविले, पाहिले) त्यानें तर जगत् रूपानेंच कीं, मजला प्रत्यक्षास आणिले (विपरीत भावानेही पण मजला स्पष्ट केले, दिसूं दिले तें सर्व कांहीं सर्व कांहींमध्येंच कीं, का सर्व कांहीं, सर्व कांहींनेंच कीं, भजविलें, पूज्य केलें गौरव आदराचे केलें, भक्तीचे केलें) असें भजऊन कीं तो समजवीत आहे, बुझावीत आहे, जाणणें प्रत्यक्षास आलें अनन्यपणाचा सोयराच तो सर्व कांहीं सर्व कांहींनेंच भजिला, पूजिला, समजविला: (१११५)

जो ज्या ठिकाणीं पावण्यास बसला आहे (पावणेंच व्हावें म्हणून धरणें घेऊन आहे) त्यास तर तो श्रद्धेमुळें पावणारा असाच, केव्हांहीं असें स्पष्टपणेंच कीं उमजलें होतें ज्या (ब्रह्म) प्रकाशानें [दिवसाचा प्रकाश आंत आल्यानें अखंड एक ध्यासच कां छंदच लागल्यानें तें ब्रह्म तर–ज्ञान–अखंड असेंच कीं, तेथीलच्या एकाग्रतेच्या धारेस तर केव्हांही खंड म्हणून नाहींच असेंच मुळीं तें अखंड असें ज्ञान का ब्रह्म ते.] (१११६)

अहो आपल्या असलेपणावरच ना मुळीं तें स्वप्राचें दिसणें कां न दिसणें [ते–अहो आपल्या असलेपणामुळेंच कीं, तें ह्या विश्वामधीलचें, देहामधीलचे जे जे कांहीं ते ते आहे (आहे) नाही (नाही) असेंच स्पष्टपणें प्रकाशतें ना ?] प्रत्यक्षत्वें अनुभवास येतें ज्याप्रमाणें विश्वाचा भाव अभाव भासमान होतो ज्या प्रकाशानें. (१११७)

असा सहज जो कांहीं एक (कां अगदीं सहज असा जो) माझा प्रकाश तोच कीं मुळीं हे कपिध्वजा, भक्ति या वोजस् तेजानेंच बोलिला व्हावा कीं ओजस् नावाचें जें तेज तेंच कीं माझा सहज प्रकाश व तीच भक्ति कीं (बोलिली आहे, तीच भक्ति म्हणावी कीं.) (१११८)

म्हणून जो कांहीं एका बुद्धीनें अपेक्षा (अपेक्षणं=अपेक्षा बुद्धि=हें व तें असा भेद, आशा, इच्छा, जरूरी अगत्य, संबंध, उद्देश, विचार, आदर, आर्त=दुःखग्रस्त, अनाथ, विनाशी, (अशा देह भावाचा.) आर्तिः=दुःख पीडा, आजार.] अगत्य, इच्छा, (आदर=हे व ते असा भेद अपेक्षा बुद्धि, करून आहे असा आर्त–त्रस्त त्याचें त्रस्त होणें हें त्या अपेक्षणीय म्हणजे इच्छिलेले प्रिय आदराचे इष्ट (वस्तु करितांच कीं) असें इच्छिलेले तें मिळावेंच उपभोगाचे व्हावेंच असा जो आर्त भार दुःख अथवा आजार भार तोच अथवा त्याजमुळेंच कीं मीच एक त्याजपुढें स्पष्ट असा भाव] इष्ट असा जो कांहीं आर्तीचा–दुःखाचा प्रकार, त्यानेंच म्हणजे इष्टपणानेंच मजला घडविलें, इष्ट असेंच मजला केलें. (१११९)

हे वीरामध्यें श्रेष्ठ अशा अर्जुना ! जाणण्यास इच्छिणारा असा जो जिज्ञासु मुमुक्षु त्याच्यापुढेंही पण मजला जाणणें हेंच इच्छेचें व्हावें व तेंच एक सर्वथैव जाणण्याची इच्छा मुळीं नेहमीं त्याच्याच मुळीं विचारांत जे असणें तें जिज्ञासा तेथें मीच कीं जाणण्यास इच्छिणारा असाच एक दाखविला, देखणें, दाखविला असा. (११२०)

हीच कीं एक विनंति याचना अर्ज येथें मीच माझी इच्छा करून आहे. मीच मजला इच्छिणारा मागणारा, भिकारी, अर्जदार, सेवक, या अर्थीच एक–हे अर्जुना हेतु इच्छा ! (दृश्य ज्ञेय वस्तु=इंद्रिय अर्थ.)

प्राप्य वस्तु गरज कारण उद्देश सांगणें अर्थ असें नांव देणें कां संभाषण करून ( कर्त्याबद्दल विधान दाखवून –नांव देऊन–शब्द बोलून–बंधन–गीत–गाणेंचे करून ) मजला आणतो कीं, मजला उपन्न करतो कीं.
(११२१)

एकंदरीत असें पाहा कीं अज्ञान स्वीकारून हें जें कांहीं वर्तणें तें भक्ति या नांवाखालीं वावरते ते मज पाहाणाऱ्यासच द्रष्टयासच कीं पाहाण्याचे विषय करून दाखविते, मजला दृश्य करून माझें देखणेंपणच दाखवितें.
(११२२)

तेव्हां येथें तर मुखच एक कीं मुखानेंच का मुखाला दिसतें असें जें कांहीं म्हणणें होत आहे, येथें मात्र केव्हांहि चुकु नको. तेथें दुजे असें जें कांहीं लटिकें दुजेपण तेच कीं अहो आरसा करतो नां ? आरशामुळेंच होतो ना ? लटिके दुजेपण दुसरेपणाच भावन.
(११२३)

दृष्टि म्हणजे डोळा (दर्शन, शक्ति, ज्ञान, बुद्धि, मन, पाहाणें, का शास्त्रमत) यांचे म्हणजे खरे-पणानें चंद्रच कीं एक पाहातो, पण तिमिर म्हणजे नेत्ररोगाचें तें पाहाणें जें तें तर एकच मुळीं जें आहे त्यास दोनपणानें दाखवितें [ तिमिर म्हणजें अंधारयुक्त का काळोखाचे करून दाखविते कीं (वै.) कांच-बिंदूनेहीपण तसलेच ते पाहाणें लोखंडाचा गंज म्हणजेही तिमिर होय.]
(११२४)

तसें सर्वत्र सर्वाठायीं भक्त मजला ग्रहण करतात. त्या भक्तींनेंच कीं पण मी दृश्यत्वें दिसणारा असे कल्पितात (ब्रह्म) दृश्यत्वे म्हणजे दृश्यपणाने दिसणारे असें कां सुंदर असे असे जें कांहीं म्हणणें तें तर अज्ञानवशेंकरून (अविद्या माया अडाणीपण का अज्ञानवशेकरून ) वायाच असें बोलणे होय.
(११२५)

असें तें अज्ञान, (अडाणीपण, माया ) आतां नाहींसे झालें फिटलें. माझा मी द्रष्टृ पाहाणारा जो (का न्यायाधीश) तोंच मजला भेटला, तो कसा तर जसा का निजबिंबामध्येंच एक प्रतिबिंब तें येकवटत आहे– उठावलें आहे–उठावदार होऊन आहे जसा का दृश्याचें द्रष्टेपण मद्रूप होऊन जातें. [निज = उपजत, स्वतःचे, स्वकीय, चिरस्थायीं, नित्य (निजबोध = आत्मज्ञान.) बिंब = सूर्यचंद्र इत्यादीचे मंडल प्रतिबिंब, मूर्ति, प्रतिमा, आरसा, मूस. प्रतिबिंब = मूर्ति, चित्र, प्रतिबिंब. प्रतिबिंबन = पडछाया, तुलना.] (११२६)

पण जेव्हां कां अथवा जेधवा कांहीं सोन्याचे हिणकस का किडाळ असें तेथेंहीपण सोनेपणानें अढळ (कायम, निश्चळ) असे सोनेंच एक कीं असते. तेथे पण किडाळ जेव्हां कां नाहींसे झालें ( बाजूस केलें तापवून शुद्ध केलें) वर मग तर एक केवळ सुवर्णच जसे मागें उरतें, राहातें.
(११२७)

अहो असें पाहा कीं पूर्णिमेच्या अगोदर काय चंद्रमा तो आपल्या अंगांनी दक्ष का युक्त नसतो ? (लक्ष देणारा नाहीं, सावधच नाहीं, का सावयवच, अवयवसहित नाही,) तो युक्त असाच म्हटला होतो. पण तेथें त्या पूर्णिमे दिवशींच पूर्णिमा तिथीसच कीं चंद्राचें पूर्णत्व कां त्या चंद्रास ती आपली पूर्णता भेटणारी कीं.
(११२८)

त्याप्रमाणें मीच ज्ञान दरवाजानें-(ज्ञानाच्या साह्यानें) दिसतो पण वेगवेगळ्या बाजूनें दिसतो असा [हस्त म्हणजे कोपरापासून पुढचा ( हात) (हस्त = किरण, समूह, मदत, आश्रय.) हाता हाताच्या अतरानें कीं,] [अंतरानें = मधला मनुष्य, पिढी, चूल इत्यादि, पडदा, विघ्न, अंतःकरण, छिद्र, प्रसंग, फरक, जन्मांतर अभाव, जात, जामीन, व्यंग, वस्त्र, हेतु, उत्कर्ष, मोकळी जागा, कुस्तीचा पवित्रा.] व मग जेव्हां कां असा दिसलों म्हणजे मी मजला लाभाचा होतो–लाभतो–पाहाणाऱ्यासही पाहाणारा जो तो मीच आपणा स्वःसच भेटला असें होय. मीच मजला लाभाचा होतो. तेथें द्रष्ट्याचे द्रष्टेपण मावळते नाहींसे होतें– पाहाणाऱ्याचे पाहातेपण नाहींसे होते.
(११२९)

म्हणून दृश्य पंथाला अतीत नच आकळणारा असाच हा माझ्या ज्ञानासंबंधीचा हे पार्था, हा भक्तियोग चौथा म्हणिला आहे. माझ्या ज्ञानासंबंधीचे ठायीं हे पार्था! हा ज्ञानभक्तियोग तो दृश्यपथाच्या दृश्यमार्गाच्या सर्वथैव अतीत म्हणजे पलीकडील असाच जाण. व अशी ही भक्ती चौथी की एक म्हणितली आहे. (११३०)

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः।**
**ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥**

**भक्त्या**=भक्ति=उपासना, श्रद्धा, सेवा, रचना, आकृति, (विभागणे, चितारी काम.) अभिजानाति माम्=समजणें, माहीत होणें, जाणणें, ओळखणें, अनुभवणें, तोषविणें, वाखाणणें, क्रिया करणें, धार लावणें, [यावत्-जितका, जेवढा, जितका दूर, पर्यंत, मध्यंतरी, तोपर्यंत, नाहीं तोंच, लवकर, जेव्हां, निश्चय-(यावत् अर्थ=जरूर तितकेंच द्रव्य इच्छिणारा यावत् गम=जावेल तितकें] यावान् यःच अस्मि तत्वतः =जितका जेवढा जो मी तत्वदृष्टया आहे. (तत्त्व=सत्य मूलतत्व खरे स्वरूप, ब्रह्म, परमात्मा, वस्तुस्थिति, मन, शरीर, देवता, तात्पर्य मंदमंद नृत्य, ततः मां तत्वतः ज्ञात्वा=अन्यः=विलक्षण वेगळा, निराळा कोणीही=तसा मला तत्वदृष्टया वेगळा जाणून तत् विशते अनंतरम्=अनंतर=प्रत्यक्ष, जवळचे, अखंड सतत, मुख्य, व्यापृत (=कामांत गुंतलेला), सान्निध्य, ब्रह्म, श्रेष्ठ तत्=तद=प्रसिद्ध, ब्रह्म, अनुभविलेले. विशते =शिरतो, जातो=प्रत्यक्ष ब्रह्माचें ठायीं शिरतो, ब्रम्हाच्या ठायीचा होतो.

अन्वय :—यावत्। य । च । तत्वतः अस्मि । माम् भक्त्या अभिजानाति । मां। ततः । तत्वतः ज्ञात्वा । अनंतरम् तद् विशति ॥ ५५ ॥

अर्थ :—(१) भक्तीनें मला जाणतो तो मी जो जसा आहे. केवढा आहे? कशा प्रकारचा आहे? तत्वदृष्टया निराळा आहे. मी कसा ते जाणून, त्यायोगेंकरून मजला तत्त्वदृष्टया जाणून, तत् स्वरूपीचा नंतर होतो, स्वरूपाशीं एक होतो.

(२) मी जितका जेवढ्या केवढ्या प्रभावाचा? असें तत्वतः यथार्थ ज्ञान ह्या भक्तीच्या योगानें होतें. माझी तात्विक ओळख झाल्यावर, मला तत्वतः जाणल्यावर, तो माझ्या ठायींच प्रवेश करतो.

(३) (परा) भक्तीच्या सामर्थ्यानें मी परमात्मा, (जेवढा केवढा आहे) कोणी जो दुसरा विलक्षण आहे. हे यथार्थ रीतीनें (मी व माझें स्वरूप) जाणतो व त्यायोगें (तात्विक दृष्टीनें) माझ्या स्वरूपाशीं, तादात्म्य पावतो (मिळून जातो.) (श्लोक ५५ ओव्या ११३१–१२४६)

अभिमन्युसुतो मुक्तिं गजः श्रवणतो हरेः ।
शुकस्तु कीर्तनादेव प्रल्हादः स्मरणेन च ॥ १ ॥
पादसेवनतो लक्ष्मीः पृथुः पूजन मात्रतः ।
अभिवंदनतोऽक्रूरो दास्येनांजनिकासुतः ॥
सख्यत्वेनार्जुनो राजा बलिस्त्वात्मनिवेदनात् ।

## ज्ञानभक्ति–सहजभक्ति

**[नारद भक्तिसुत्रें बाराव्या अध्यायांत १–४२ व ८३–८४ दिलीं आहेत व बाकीचीं येथें दिलीं आहेत.]**

(६) **दुःसंग त्याग**—दुःसंगः सर्वथैव त्याज्यः ॥ ४३ ॥ कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशसर्वनाशकारणत्वात् ॥ ४४ ॥ तरंगायिता अपिमे संगात्समुद्रायंति ॥ ४५ ॥

(७) **मायेंतून कोण तरतो?** कस्तरति कस्तरति मायां यः संगास्त्यजति यो महानुभावं सेवते निर्ममो भवति ॥ ४६ ॥ यो विवक्तस्थानं सेवते यो लोकबंधमुन्मूलयति निस्त्रैगुण्यो भवति यो योगक्षेमं त्यजति ॥ ४७ ॥ यः कर्मफलं त्यजति कर्माणि संन्यसति ततो निर्द्वंद्वो भवति ॥ ४८ ॥ वेदानपि संन्यसति केवलमविच्छिन्नानुरागं लभते ॥ ४९ ॥

(८) **पराभक्ति व गौण भक्ति**—स तरति स तरति स लोकांस्तारयति ॥ ५० ॥ अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ॥ ५१ ॥ मूकास्वादनवत् ॥ ५२ ॥ प्रकाश्यते क्वाऽपि पात्रे ॥ ५३ ॥ गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानमविच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम् ॥ ५४ ॥ तत्प्राप्य तदेवावलोकयति तदेव शृणोति तदेव चिंतयति ॥ ५५ ॥ गौणी त्रिधा गुणभेदादार्तादि भेदाद्वा ॥ ५६ ॥ उत्तरस्मादुत्तरस्मात्पूर्वपूर्वा श्रेयाय भवति ॥ ५७ ॥

(९) **भक्तिची सुलभता**—अन्यस्मात्सौलभ्यं भक्तौ ॥ ५८ ॥ प्रमाणान्तरस्यानपेक्षत्वात् स्वयंप्रमाणत्वात् ॥ ५९ ॥ शांतिरूपात्परमानंदरूपाच्च ॥ ६० ॥

(१०) **साधकानें काय सोडावें :**—लोकहानौ चिंता न कार्या निवेदितात्म लोकवेदत्वात् ॥ ६१ ॥ न तदसिद्धौ लोकव्यवहारोहेयकिंतु फलत्यागस्तः साधनंच कार्यमेव ॥ ६२ ॥ स्त्रीधननास्तीकचरित्रं न श्रवणीयम् ॥ ६३ ॥ अभिमानदंभादिकं त्याज्यम् ॥ ६४ ॥ तदर्पिता खिलाचारःसन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मीन्नेव करणीयम् ॥ ६५ ॥

(११) **भक्तगौरव :**—त्रिरूपभंग पूर्वकं नित्यदास्यनित्यकांताभजनात्मकं प्रेम कार्यं प्रेमैव कार्यम् ॥ ६६ ॥ भक्ताः एकान्तिनो मुख्याः ॥ ६७ ॥ कंठावरोधरोमांचाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयंति कुलानि पृथिविं च ॥ ६८ ॥ तीर्थी कुर्वंति तीर्थानि सुकर्मी कुर्वंति कर्माणि सच्छास्त्री कुर्वंति शास्त्राणि ॥ ६९ ॥ यतस्तन्मयाः ॥ ७० ॥ मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवताः सनाथा चेयं भूर्भवति ॥ ७१ ॥ नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादिभेदः ॥ ७२ ॥ यतस्तदीयाः ॥ ७३ ॥

(१२) **वाद नको ! :**—वादोनावलम्ब्यः ॥ ७४ ॥ बाहुल्यावकाशत्वादनियतत्वाच्च ॥ ७५ ॥

१३ **भक्ताची राहाणी व भक्तास आश्वासन :**—भक्तिशास्त्राणि मननीयानि तद्बोधककर्माणि करणीयानि ॥ ७६ ॥ सुखदुःखेच्छालाभादित्यक्ते काले प्रतीक्ष्यमाणे क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम् ॥ ७७ ॥ अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादिचारित्र्याणि परिपालनीयानि ॥ ७८ ॥ सर्वदा सर्वभावेन निश्चिंतितैर्भगवानेव भजनीयः ॥ ७९ ॥ स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवत्यनुभावयति भक्तान् ॥ ८० ॥ त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी ॥ ८१ ॥

१४ **भक्तीचे अकरा प्रकार :**—गुणमहात्म्यासक्ति, रूपासक्ति, पूजासक्ति, स्मरणासक्ति, दासासक्ति, सख्यासक्ति, कांतासक्ति, वात्सल्यासक्ति, आत्मनिवेदनासक्ति, तन्मयतासक्ति, परमविरहासक्तिरूपा एकधाप्येकादशधा भवति ॥ ८२ ॥ ]

## नारद-भक्ति-सूत्रें (४३-८२)

( ६ ) **दुःसंगत्याग** (४३) दुःसंगति ही सर्व प्रकारें त्याज्य आहे. नीचांची संगत न करणें तें चतुरतेचे होय. (४४) कारण दुःसंगतीमुळें काम क्रोध मोह उत्पन्न होतात व ते स्मृतिभ्रंश करून बुद्धि नाश करतात व सर्व नाशास कारण होतात. (४५) दुःसंगती ती आरंभी तरंगाप्रमाणें दिसणारी पुढें सागराप्रमाणें विस्तीर्णता पावणारी असते—अशा (४६)

(७) **मायेंतून कोण तरतो?**—दुःसंगतीचा त्याग करून महानुभावाची सेवा करतो व निरहंकार होतो तोच माया तरून जातो. (४७) जो एकान्त सेवन करतो लोकबंध झुगारून देतो व त्रिगुणातीत म्हणजे

कामनारहित व संसारातीत होऊन योगक्षेमाचीही पर्वा करीत नाहीं तोच माया तरूं शकतो. (४८) कर्मफलाची आसक्ति टाकून सर्व काम्य कर्माचा संन्यास करतो तोच निर्द्वंद्व म्हणजे सुखदुःखातीत होतो. (४९) जो वैदिक व्यवहाराचाहि संन्यास करतो व देहबुद्धि सोडून अखंड आत्मानुसंधान ठेवतो त्यासच सर्वकाळ भगवत्प्रेम लाभतें व तोच स्वतः तरून लोकांस तारतो.

८ **परा भक्ति व गौणी भक्ति** :—(५१) जे शब्दानें वर्णन करतां येत नाहीं असें शुद्ध प्रेम स्वरूप भगवत्प्रेम हवें. (५२) तें साखरेच्या गोडीप्रमाणें स्वसंवेद्य आहे त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. (५३) जन्मजन्मांच्या संस्कारानेंच भगवत्प्रेमाची पात्रता येते. (५४) त्रिगुणातीत, वासनारहित व क्षणोक्षणी संतत वर्धमान होणारें सूक्ष्मतर रूपानें अनुभवास येणारें असें तें भगवत् प्रेम आहे. (५५) तें प्राप्त झालें असतां सर्वत्र तेंच दिसतें तेंच ऐकूं येतें व त्याचेंच चिंतन चालतें (५६) तें गुणसंबंधानें उत्पन्न होणारें आर्तादिभेदानें तीन प्रकारचें आहे. (५७) तें जसजसें वाढत जाईल तसतसें गुणानुक्रमानें उत्तरोत्तर श्रेयस्कर ठरतें.

९ **भक्तीची सुलभता**—(५८) इतर कोणत्याहि साधनाहून भक्ति हे सुलभ साधन ठरते (५९) भक्तिचे श्रेष्ठत्व स्वयंप्रमाण आहे त्यास इतर प्रमाणाची अवश्यकता नाही (६०) भक्ति पूर्ण शांतिरूप व परमानंदरूप आहे.

१० **साधकानें काय सोडावें**—(६१) नैतिक हानीची चिंता न करतां आत्मचिंतनांत असणें हें तिचें म्हणजे भक्तिचें लक्षण आहे (६२) मनाविरुद्ध झालेल्या गोष्टीची खंत न करतां कर्तव्य कर्मी (संपवून) लपून बोलणें, कानांत सांगणे जें फळाची आशा न धरितां कर्म करीत राहाणें हेंच भक्तीचें एकमेव साधन आहे (६३) स्त्री, धन व नास्तिक यांच्याशीं संभाषण करूं नये अगर त्याचे ऐकू नये (६४) अभिमान दंभ वगैरेचा त्याग करावा (६५) सर्व व्यवहार ईश्वरार्पण करावेत इतकेंच नव्हे तर काम क्रोध अभिमान वगैरेही ईश्वरासच अर्पण केले पाहिजेत.

११ **भक्तगौरव**—(६६) त्रिपुटीच्या पलीकडे राहून भेद कल्पना सोडून धनी सेवक पति पत्नि नात्यांच्या सर्व भावना परमेश्वराचे ठिकाणीं कल्पून हृदयस्थ परमेश्वराशी रममाण व्हावें (६७) जे सर्वकाळ आत्मरत व आत्मतृप्त असतात तेच एकांतिक भक्त श्रेष्ठ होत. (६८) कंठ दाटून येणें, अंगावर रोमांच उभे राहाणें, नेत्रांतून प्रेमाश्रु येणें या लक्षणांनी युक्त भगवत्प्रेमाचें वर्णन करणारे कुलाना व पृथ्वीला पावन करतात. (६९) तीर्थांना तीर्थपण देणारे कर्माची सत्कर्मे बनविणारे व शास्त्रांनाही पावन करणारे असे ते असतात. (७०) ज्यानी ईश्वरास ओळखलें ते ईश्वरमय झाले (७१) त्यांच्यामुळें पितरांना आनंद होतो, देवता नृत्य करूं लागतात व त्या भूमीस सनाथता येते (७२) अशा भक्तांचे ठायीं जाति विद्या, रूप, कुळ, धन व क्रिया यामुळें होणारे भेद असत नाहींत (७३) ते ईश्वररूप होतात.

१२ **वाद नको**—(७४) वादाचे अवलंबन ते करीत नाहींत (७५) दुसऱ्याचे ऐकून, उणेपणा पाहून, अयोग्य रितीचा वाद करीत नाहीत.

१३ **भक्ताची राहाणी व भक्तास आश्वासन**—भक्ति शास्त्राचेंच मनन करावें व भक्तीचेंच उद्बोधन होईल अशीच कर्मे करावीत (७७) सुख दुःख इच्छा व लाभ यांची पर्वा न करतां ईश्वरी इच्छेनेंच सर्व घडतें असें समजून परमेश्वरावांचून एक क्षणही व्यर्थ दवडूं नये (७८) अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिक्य, यांस अनुसरून सर्व व्यवहारांचे परिपालन करावें (७९) सर्वदा सर्व भावानें निश्चित मनानें भगवंताचें भजन करावें (८०) त्याचेच गुणनाम संकीर्तन केलें असतां ती शीघ्र प्रगट होऊन भक्तास त्याचे अस्तित्वाचा अनुभव घडतो (८१) हें त्रिवार सत्य आहे की भक्ती हीच श्रेष्ठ आहे.

१४ **भक्तीचे अकरा प्रकार**—(८२) ईश्वराशी तन्मयतेचा आनंद या अवस्थेची विरहरूपणा अनुभवणें यामुळें मूळ भक्तीचे अकरा भेद आहेत—" गुणमाहात्म्य, रूप, पूजा, स्मरण, दास, सख्य, कांता, वात्सल्य, आत्मनिवेदन, तन्मयता, परमविरह, एकधा, अपि एका दशधा. "

**इया ज्ञानभक्ति सहज । भक्तु येकवटला मज ।**
**तो मीचि केवळ हे तुज । श्रुतही आहे ॥ ११३१ ॥**
**जे उभउनिया भुजा । ज्ञानिया आत्मा माझा ।**
**हे बोलिलो कपिध्वजा । सप्तमाध्याई ॥ ११३२ ॥**
**ते हे कल्पादि-भक्ति मिया । भागवत मिसे ब्रह्मया ।**
**उत्तम म्हणोनिया धनंजया । उपदेशिली ॥ ११३३ ॥**
**ज्ञानी इयेते स्वसंवित्ति । म्हणती शैव शक्ती ।**
**आम्ही परम भक्ती । आपुली म्हणो ॥ ११३४ ॥**
**हे मज मिळतिये वेळे । तया कर्मयोगिया फळे ।**
**मग समस्तही निखळे । मियाचि ( म्यांचि ) भरे ॥ ११३५ ॥**
**तेथें वैराग्य विवेकेसी । आहे बंध मोक्षेसी ।**
**वृत्ति ते या आवृत्तिसी । बुडोनि जाय ॥ ११३६ ॥**
**घेउनि ऐलपणाते । परतत्व हारपे तेथे ।**
**गिळोनि चारी भुते । आकाश जैसे ॥ ११३७ ॥**
**तयापरी थंडथांद । साध्य साधनातीत शुद्ध ।**
**ते मी होउनी येकवद । भोगितो माते ॥ ११३८ ॥**
**घेउनि सिंधुचया अंगा । सिंधुवरी तळपे गंगा ।**
**तैसा पाडु तया भोगा । अवधारिजो ॥ ११३९ ॥**
**का अरिसयासि आरिसा । उट्ठुनि दाविलया जैसा ।**
**देखणा अतिसो तैसा । भोगणा तिये ॥ ११४० ॥**
**चेइलिया स्वप्न नाशे । आपुले ऐक्यचि दिसे ।**
**ते दुजेनविण जैसे । भोगिजे का ॥ ११४१ ॥**
**हे असो दर्पणु नेलया । तो मुख बोधु गेलया ।**
**देखिलेपण येकलया । आस्वादिजे जेवी ॥ ११४२ ॥**
**तोचि जालया भोगु तयाचा । न घडे हा भावो जयाचा ।**
**तोही बोले केवि बोलांचा । उच्चारू कीजे ॥ ११४३ ॥**
**तयाच्या नेणो गांवि । रवि प्रकाशे हून दावि ।**
**की व्योमालागी मांडवी । उभविली तिही ॥ ११४४ ॥**
**हां गा राजक्षत्व (राजन्यत्व) नव्हता आंगी । रावो रायपण काय भोगी ।**
**कीं अंधारू हून आलिंगी । दिनकराते ॥ ११४५ ॥**

आत्मा—तो आत्मा (११३२) कल्पादि (भक्ति)=कल्पाच्या आरंभी सृष्टीच्या उत्पत्ति काळीं **कल्प** =ब्रह्मदेवाचा दिवस, न्याय्य, दृढ, समर्थ, रचना, शास्त्र नियम, पद्धत, प्रकार, उद्देश, त्रैलोक्य. **आदि**= मुख्य, पहिले, आरंभ, आधीचे.) भागवत—श्रीभागवत. [श्रीभागवत महापुराणें **चतुःश्लोकी भागवत—**

**भगवद् ब्रह्म संवाद :—**

श्रीगणेशायनमः ॥ श्रीभगवानुवाच ॥ ज्ञानं परम गुह्यं मे यद्विज्ञानसमन्वितम् । सरहस्यं तदंगं च । गृहाण गदितं मया ॥१॥ यावानहं यथाभावो यद्रूपगुण कर्मकः । तथैव तत्वविज्ञानमस्तुतेमदनुग्रहात् ॥२॥ अहमेवासमेवाग्रे नान्यद्यत्सदसत्परम् । पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम् ॥ ३ ॥ ऋतेऽर्थं यत्प्रतीयेत न प्रतीयेतचात्मनि । तद्विद्यादात्मनो मायां यथाभासो यथा तमः ॥ ४ ॥ यथा महांति भूतानि भूतेषूच्चावचेष्वनु । प्रविष्टान्यप्रविष्टानितथा तेषु न तेष्वहम् ॥ ५ ॥ एतावदेव जिज्ञास्यं तत्वजिज्ञासुनाऽऽत्मनः अन्वयव्यतिरेकाभ्यां यत्स्यात्सर्वत्र सर्वदा ॥ ६ ॥ एतन्मतं समातिष्ठ परमेण समाधिना । भवान्कल्प-विकल्पेषु न विमुह्यति कर्हिचित् ॥ ७ ॥ इति श्रीमद्भागवत महापुराणे अष्टादशसाहस्र्या संहितायां वैय्यासिक्यां द्वितीयस्कन्धे भगवत् ब्रह्म संवादे **चतुःश्लोकी भागवत समाप्तम्** ॥] (११३१) स्वसंविति=आत्म-ज्ञानकला, चित्कला. (११३४) ते या–तये (११३६) ऐलपणात=अलिकडच्या 'त्वं' पदाला मिळून पलिकडचे 'तत्पदही' जेथें लय पावते. परतत्व–परत्व. (११३७) थड थांद=ताटस्थ्यात्, अलिप्तपणाने. (११३८) अतिसो–अतिशय (११४०) तोही बोले=हे शंकाकार शब्दानेच शब्दाचा उच्चार कसा करितात? (११४३) प्रकाशे=त्याच्या गांवी जणूं काय दिवाच सूर्याला प्रकाशित करीत असेल? अथवा आकाशाला मांडव घालण्याची चाल असल्यास न कळे! उभविली–उभिली. (११४४) अंगी–आंगी= =आंगाचेंच. अळंगी–आलिंगी (११४५)

**ज्ञानभक्तीनें भक्त माझ्याशीं समरसतो, तो केवळ मीच होतो असें हें तूं ऐकिलें आहेसच! ज्ञानी पुरुष माझा केवळ आत्माच होय. असें गंभीरवाणीनें सातव्या अध्यायांत सांगितलें आहे.**

हीच भक्ती कल्पारंभी भागवत भक्ती म्हणून उत्तम भक्ती ब्रह्मदेवाला शिकविली. ज्ञानी हिला 'स्वसंवित्ती' म्हणतात. शैव तिला शक्ति असें नांव देतात. आम्ही आपली 'परमभक्ति' म्हणतो. कर्म योग्यांना माझ्याशीं एकरूप होण्यानें हें फल लाभतें. सर्व विश्व माझ्यायोगें भरून जातें. तेव्हां विवेकासह वैराग्य, मोक्षासह बंध (आवृत्तीसी) निवृत्तिसह वृत्ति ही नाहींशी होतात–सर्व अलिकडचे झाल्यानें पलीकडचें असें कांहींच उरत नाहीं. एकटें आकाश, पृथ्वी, आप, तेज वायूला पचवून, आपण मागें उरतें. साध्य साधना पलीकडील निर्मळ निर्दोष तत्त्व मी होऊन केवळ आत्मानंद अनुभवतो. गंगा समुद्राशीं एकरूप होऊन प्रकाशते तसा हा आत्मानंदाचा प्रकार जाणून ऐस–दोन आरसे एका पुढें एक ठेविले तर जसें त्याच्या रूपाचें एकमेकांत ऐक्य होतें–तसा द्रष्टयाला मजमध्यें समरसून जाऊन आत्मानंदाचा भोग घेता येतो–जागे झाल्यावर स्वप्न नाहींसे होतें–जागेपणांत कुणाच्याहि संगतीवांचून स्वतःच्या एकटेपणाचा उपभोग घेतो–वस्तूशी एकरूप होऊन गेल्यास वस्तुचा उपभोग घडत नाही असें जें म्हणतात त्यांना विचारावें कीं शब्दानेंच शब्दाचा उच्चार कसा होतो? त्या लोकांच्या गांवांत काय सूर्य (दिवा लावून) दिव्याच्या उजेडानें पाहावा लागतो? काय आकाशाला मेढीचा टेका द्यावा लागतो? राजेपण नसतां राज्यपद भोगता येईल काय? सूर्याचा गळां अंधारानें मिठी देणें होईल काय? जे आकाशच नाहीं त्यास आकाशाची जाणीव कोठून येईल? गुंजांचा दागीना काय माणकाचा दागीना म्हणून मिरवता येईल?— (ओव्या ११३१ ते १२४६)

ज्ञान उपासना, ज्ञान सेवा, ज्ञान रचनेनें, मजशीं एकवटला, (एकजीव झालेला, मिळालेला, मीच झालेला तो तर केवळ मीच होय. हें तुजला माहीत आहेच तुवां हें ऐकिले पाहिले आहेसच. (११३१)

इकडे लक्ष वेधावें म्हणून हातच वरती करून सांगितले कीं अहो **ज्ञानिया जो, तो तर** माझा आत्माच कीं मजला ज्ञानिया तर जीव कीं प्राण असें माझें सर्वस्व होय–ज्ञानिया अहं मी व तो मम

प्रिय असा आवडता असा जिवलग जाण. असें हें कपिध्वजा **सातव्या ज्ञानयोग का ज्ञानविज्ञान योगामध्यें सांगितलें.** ॐ नमः असें जें तेथें सिद्ध तत्त्व तेंच मी तो पिऊन आहे. संतसागरीचा जसा नामधारक एक (तेथें प्रिय–प्रियाविण मजसी कांहीं करमत नाहीं का प्रियासी रमवाया जाऊ हें कसें म्हटले होत आहे !) [तर—मी सिद्ध तत्त्व प्यायले व प्रिया, का पियाच जाहलो का जाहले. ॐ ओमू नमः सिद्धम् । ॐ ओ ना मा सी द्धम् । ॐ ओ ना मा सी (पियो) प्रिया प्रिय प्रिया, दास । प्रिय दास ।

धः = १९ ही संख्या, धर्म, कुबेर, धन (१) प्रिय = प्रियांबु (प्रिय + अंबु) = आंबा. प्रिय आधानं = प्रिय गोष्ट करणें. प्रिय एषिन् = कृपाळू. प्रियकरः (प्रियकारकः) = मित्र, हितकर्ता, प्रिय कारणं = संतोषविणें, प्रियतम = पति, कांत (स्त्री) पत्नि, प्रिया. प्रियदर्श, प्रियदर्शन = सुंदर, पोपट, मैना. प्रियदर्शिन् = अशोक राजा, प्रिय प्राय = अति दयाळु, वक्तृत्व प्रियता = प्रेम. प्रियंभविष्णु (प्रियंभावुकः) = प्रिय होण्यासारखा. प्रियालः = चार (व.) खिरणी. प्रियमधु = बळराम. प्रिय वादिन् = (१) मैना, साळुंकी, (२) गोडबोल्या, (३) खुशामत्या. प्रिय शालः = कढिनिंब, काडे चिराईत प्रियश्रवस् = श्रीकृष्ण, परमेश्वर. प्रियसख = खैर. प्रिय संदेश = चंपक. प्रिय स्वप्न = झोपाळू प्रियंवद = (१) गोड बोलणारा (२) विद्याधर, गंधर्व (३) जाई (व.) प्रियकः = (१) कळंब (व.) (२) प्रियाक मृगाचे (३) मऊ लांब व पुष्कळ केसाचा हरीण. प्रियकर = (१) कांही वनस्पतीचें नांव, (२) स्नेही (३) प्रिय करणारा. प्रीण = तृप्त, जुना. प्रीणनं = तृप्ति, संतुष्ट करणें, पौष्टिक (औषध) प्रिणित = संतुष्ट. प्रीत = संतुष्ट, आनंदित, प्रिय, कृपाळू. प्रीतिः = सुख आनंद, कृपा, प्रसन्नता, प्रेम आवड, स्नेह, तृप्ति, संतोष, मदनाची स्त्री. प्रीति भाज् = संतुष्ट, प्रिय होणारा. पितिजुषा = उषा, अनिरूद्ध स्त्री. प्रितिद = विदुषक. प्रितियुज = प्रिय, जिवलग. प्रिति दत्त, प्रितिदाय = सुखाची भेट, देणगी.

(२) प्रिय = आवडता, सुखकर, पति, कांत, चितळ हरिण, जीवक वनस्पति, पति, बातमी, सेवा, हित, इष्ट गोष्ट, प्रिति, प्रेमाचे भाषण, सुखवार्ता सुखआनंद.] (११३२)*

---

*[(सुकृतिनः)—पुण्य कर्म करणाराचें वर्ग अथवा आस्तिक्य बुद्धीनें उपासनाक रणाराचें निरनिराळे प्रकार—

पुण्य कर्म करणारे जे मला भजले त्यांनीं आपलें आत्महित साधलें असे ते चार भक्त—

(१) आर्त—दुःखनिवारण व्हावें म्हणून भजणारा.
(२) जिज्ञासु—जाणावयाच्या इच्छेनें भजणारा.
(३) *अर्थार्थी—अर्थ* सिद्धिकरता भजणारा.
(४) ज्ञानी—कांहींच करणें नाहीं म्हणून तोच एक भक्त जाण.

**ज्ञानिया** :—उपासना करणारामध्यें श्रेष्ठ कोण ते म्हणजे–११२–११८

(वालभ) मीच सर्वोत्तम गति समजून माझा आश्रय केलेला ज्ञानाच्या प्रकाशानें भेदाचे अंधारे संपले व मीच समरसें तो जाला. तसेंच भक्तही पण; स्फटिकच क्षणभर उदक भासतें तसा ज्ञानिया नाहीं. त्याजबद्दल बोलणें तें ज्ञानाच्या कौतुकाचें असें आहे–गगनामध्यें वारा विरून गेला, मग वारेपण वेगळें असत नाहीं जसें. तसें मीच झाला, माझीया ऐक्या आला, तरी भक्त ही पैज कांहीं संपणारी होत नाहीं. शारीरिक कर्मांनीं तो भक्त असाच वाटतो पण अंतर प्रतीतीच्या धर्मांनीं तर मीच तो होय. ज्ञानाच्या प्रकाशानें मी आत्मा आहे असें तो जाणतो आणि प्रेमानें उचंबळला असता मीहीपण तो आत्मा आहे असेंच म्हणतो. अहो! जीवदशेच्या पैलीकडच्या खुणेतें पावून जो वावरू जाणतो तो देहाच्या वेगळेपणामुळें काय वेगळा म्हणावा ?

[ फूटनोट चालू पान २५६ वर

सहज ज्ञानभक्ति, कां ज्ञानिया आत्मा माझा (सृष्टि अथवा त्रैलोक्य रचना, पद्धत प्रकार, न्याय्य, दृढ, समर्थ, ब्रह्मदेवाचा दिवसच जसा–) सृष्टि उत्पत्ति कालीची, आरंभीची भक्ती ही म्यां भागवताच्या विष्णुभक्त, भगवद्‌भक्त पवित्रतेच्या, शुद्धतेच्या, (तूप, मध, जल, पर्जन्य, वृषि वर्षण) यज्ञोपवीत घालणें, निमित्तानें ब्रह्मदेवास, हे धनंजया ! हीच भक्ती उत्तम म्हणून उपदेशिली सांगितली, शिकविली, आद्योच्चारणाची ती निर्देशिली. (११३३)

ज्ञानी जे आहेत ते इजला, आत्मज्ञानाकला–स्वसंविति–चित्कला म्हणतात शैव शिव उपासक शंकराचे–शिव–भक्त, इजला शक्ति म्हणतात. आम्ही तर हीच की अहो आत्मीय स्वाधीन, जिवंत अशी

---

असे हे सर्व भक्त उदार होत–ते श्रेष्ठ, प्रामाणिक कां दानशूर म्हटले, पण ज्ञानी तो तर माझा आत्मा असें मी मानतो. असा तो युक्तामा माझ्या उत्तम गतीसच आस्थेचें करून असलेला होय— ११९–१२८

आपआपल्या हिताच्या लोभानें ज्या भक्तांस मी आवडतो तोहीपण झोंबतो. पण मीच वालभ प्रेम आवड करी असा एक ज्ञानियाच; अहो दुभत्याच्या आशेनें सर्व जगच मुळी धेनूस भाला (पाश, दोरी) घालते पण पाशाशिवायच तसें ते जीविचे गुज जाणणारे वत्सच होणें तें जेथें प्राणच उजविला जाणारा कारण तें तर तन मन धनें तन मन प्राणानें आणखी दुसरें तिसरें कांहींच जाणत नाहीं पण जें जें कांहीं त्यास दिसेल तें तें ही माझी मायच आहे असें म्हणू करणारे म्हणून अनन्यगती ते आणि धेनूसहीपण तशींच प्रीती ! एवढ्याच करितां लक्ष्मीपती जे बोलिले तें सांचे असें केव्हांहि ! बरें हें असो ! पण जे तुला सांगितलेलें तेही भक्त भले आम्हां पढीयंते, आवडते असें होत पण मला जाणून जे पुन्हा मागे पाहातच नाहींत ते मीच जाण. जसें नदीनें सागर होऊन तेथेंच तिनें मुरडणें केलें एक नदीपणच ती विसरली त्याप्रमाणें अंत:करण रूपी (कुहरा) गुहेमध्यें जन्मली ती प्रतीतीगंगा मला मिळालेली ती मी हें काय फार सांगावें ! एऱ्हवीं पाहिलें असतां ज्ञानिया जो म्हणावा तो माझें केवळ चैतन्यच एक असेंही पण बहुततेचें बोलणें तें काय ! पण जें बोलू नये तेंच बोलु आदरिलें.

बहु जन्माच्या शेवटीं ज्ञानवान् होऊन आत्मज्ञानी तो परमात्मा स्वरूपास पोहोचतो, पण अशा योग्यतेचा आत्म्याचे व्यापकत्वच आपलेसें केलेला असा सर्व 'वासुदेव' असा ज्याचा भाव असा परम थोर मनाच्या बुद्धीचा, उदार आत्मा दुर्लभ होय. १२९–१३८

शेंकडोशें जन्म झालेः आस्थेची वाटच सांपडेना, फळहेतूचे होणे लोभ पाहाणारे तेथे ! अशा देहबुद्धीच्या अज्ञान रात्रींमध्यें धांवता धांवता–एकटेपण महत्व घेऊन आहे, तेथें महत्व हें गेईना पण शरीर संभोग नाहींसा झाला, देह पाहाणें बंद झालें व देहबुद्धी संपल्यानें आतां कर्मक्षयाची पहांटच झाली जशीं–दिवसच उगवला–प्रारब्ध कर्मच नाहींसें झालें–तसें गुरूकृपारूपी उषा ही प्रकाशली, ज्याच्या दृष्टीमध्यें ज्ञानाची ज्योत लागली, ज्ञानच आंत ओतलें गेलें–साम्य सिद्धि होऊन आहे–तेव्हां ज्याकडे का जिकडे पाहील तिकडे का तेथें मीच एक ! अथवा निवांत राहिला तरी मीच त्यास भेटणारा एक असाः असें असल्यामुळें त्यास 'मी' वांचून दुसरें कांहींच नाहीं. जसें पाण्यामध्यें बुडविलेल्या घटास सबाह्य सर्व पाणीच एक त्याप्रमाणें तो मज आंतमध्यें व मी त्याला आंत बाहेर असे हे कीरीटी बोलिले तरी तेथें असें हें सांगणें कांहींच महत्वाचें नव्हे ! काय सांगण्याने तेथीची ती अवस्था ती कशी ती होणारी नव्हेंच ! म्हणून हे असो ! पण याप्रमाणें तो ज्ञानच एक स्व–पर–वेद्य–वाचा व ते संसरल्यानें सर्व विश्व तो आपणच झाला ज्याच्या प्रतीतीचा बोलबाला–घरबार हा चराचरास घरबार संसार मुलेंबाळें महात्म्यच एक असा महाशय का महात्मा दुर्लभ होय. हे समस्तही 'श्रीवासुदेव' अशा प्रतीतीचा भावच एक ओतला गेला आणि म्हणूनच तो भक्तामध्यें श्रेष्ठ असा जाण भक्तांचा रावच तो–तसेंच ज्ञानियाही पण तोच–]

आपली परम भक्ती होय, असें म्हणतो [शैव म्हणजे धोत्रा वनस्पति असाही अर्थ आहे. शक्ति = बळ सामर्थ्य, राज सामर्थ्य, प्रभुत्व, मसलत व उत्साह. कवित्व शक्ति, शस्त्र (वि.) (सा.) शब्दाची अर्थ बोधकता. (सां.) मुख्य अर्थ, देवता सामर्थ्य, पार्वती, लक्ष्मी, योनि, भाला, चैतन्य. शक्तीग्रहः = अर्थ जाणणें. ] शैशवं = शिशु, बालपण. (११३४)

असे हे भक्ति–भक्त काय ज्ञानी, काय शक्ति, उपासक का काय आपुली परम भक्तिच ती कीं, आम्ही म्हणावें असें ते मज मिळतांना–(मजशीं जेव्हां का मिळणी व्हावीच–भेटीनें असावेंच) तेव्हां तर कर्मयोगी तो तर सर्व प्रवृत्तीच एक सर्व महत्व घेऊन असणारी केली ज्यानें अशा कर्मयोग्यासच मुळीं, ती भक्ति पावते व मग सर्वाठायीं पाहावें तो तर मीच एक शुद्ध त्यास सर्वत्र भरून आहे असें दिसतें. (११३५)

तेथें वैराग्य म्हणजेच विवेक व बंध म्हणावा, का तर तेथें असें ह्या मानण्यावरच कीं एक मोक्ष उगवला व्हावा हे केव्हांही ! व (वृत्ति–क्रिया, व्यवहार, निर्वाह आहार, सेवा, व्यवसाय म्हणून जी आहे ती वर पुनर्जन्म अभ्यासाचे एक परत येणें जसें कां पलायनतेचा पुनर्जन्माचा मार्गच पुन्हां केला असेंच तें वृत्तिचें तें सर्वथैव अभ्यासाचें परत येणेंच जसें पुनर्जन्मानें असें केले)–तेथें वृत्ति आवृत्ती = पुनर्जन्म–अवृत्ति = निवृत्ति तेथें वृत्ति अवृत्तिसह म्हणजे निवृत्तिसह बुडून जाते–म्हणजे हे अस्तित्वच मुळीं ह्या देहाचें तेंच कीं पुनर्जन्मासहिततेनेंच अभ्यासाचें होत आहे. असें वृत्तिच, अवृत्तिसह बुडून गेली असें म्हटलें आहे. (११३६)

'तत्वमसी'मधील अहो अलिकडच्या 'त्वंपदाला' मिळून पलिकडचे 'त'त्पद ही जेथें लय पावतें तेथें तत् पद परतत्त्वच, परत्व म्हटलें, जसें कां आकाश भुतत्वें (आकाश) ऐलपणाचे तें होऊन आकाशानें ही रूपांतरें करणारी पृथ्वी, आप, तेज, वायु, इत्यादि चारीही भूतेंपण गिळून टाकून आकाशही कीं स्वतः तें हारपतें, नाहींसें होतें कीं. (११३७)

त्याप्रमाणें ताटस्थ्यानें कां अलिप्तपणानें तो, तेथें साध्य साधनाविरहिततेनें शुद्ध असें जें परतत्त्व तेंच ते ते " एकच तत्व आहे असें बोलणारा–मुख्य असें एकच असामान्य अढळ खरें तत्त्व आहे असेंच ते मीच होऊन " तो मजला भोगतो. त्याप्रमाणें अपरंपार शुद्धस्वरूप असंगत्व उदासीन साध्य व साधनातीत असे शुद्ध ते मी होऊन एक स्वरूपच की ते मजला भोगते. (११३८)

सिंधूच्या अंगास घडून गंगा ही तर सिंधूवरच कीं तळपत (धार तळपे आकाशीं तिचे चित्त पिलापाशी) शोभते राहाते तसा त्याच्या या भोगाचा पाड म्हणजे सारखेपणा का प्रकार तो जाण. (११३९)

येथें आतां बोलणें उपमेचें तें कसे म्हणशील तर आरशासच कीं, आरसा तो घांसून पुसून स्वच्छ करून दाखविला जसा का, तेथें देखणेपण तें अतिशयतेचें तसा तो भोग भोगण्याचाही अतिशयपणा केव्हांही असणारच–(देख–देखणा भोग–भोगणा अतिशयो तेथें कीं.) (११४०)

जागे झाले म्हणजे स्वप्न नाहींसें होतें–आपुले एकपणच ऐक्यानें दिसतें जें तें तर केव्हांही दुजें न विण दुसरेपणाशिवायच कीं भोगावे की जसें. (११४१)

असे हे असो पण आरसा बाजूस केला गेला, तेथें मुख बोध जो तोहीपण नाहींसा झाला, तेथें मग एकलें तें–देखलेपणच कीं, आस्वादतेचें व्हावें ना जसें ! (११४२)

आरसा नेला मुखबोध संपला तेथें तुसतेंच एक पाहाणें, एकल्या देखणेपणाचा आस्वादच मुळीं तो –तोंच त्याचा भोग (झाल्यास) झाला तर मग–तेथें घडणें नाहींच असेंच तें भावाचें का रूपाचें तें लक्षण, तो मग बोलानें कसा बोलाचा तो उच्चार होणारा तेथें मग शब्दानेंच मुळीं शब्दाचा तो उच्चार तो कसा

ते करतात. (ही शंकाच एक पुढें झाली जशी.) तेंच तो झाला म्हणजे त्याचा त्याला भोग घडत नाहीं अशी ज्याची शंका आहे त्यानीं शब्दानीच शब्दाचा उच्चार आपण कसा करतो हे लक्षात घ्यावे. (११४३)

त्याच्या गांवीं जणुं काय दिवस तोच का प्रकाशच एक सूर्याला प्रकाशित करीत असेल! अथवा तेथें त्याचें ठायीं आकाशाला मांडव घालण्याची चाल असल्यास न कळे! (११४४)

राजन्यकं म्हणजे क्षत्रिय समूह, (राजन्वत् म्हणजे चांगला राजा असलेला देश.) राजन्य म्हणजे क्षत्रियपण (अथवा अग्निचे अंग) अंगी नसताच मुळीं काय राव तो रावपण भोगण्याचे करतो? अहो अंधारच मुळीं तो सूर्य दिनकर जो त्यास आलिंगित आहे जसा का असें केव्हां तरी शक्य आहे काय? [तात्त्विक ओळख यथार्थज्ञान झाल्यावरच कीं माझ्याठायीं प्रवेश होतो–भक्तीनें मला जाणतो, मजला तत्त्वदृष्ट्या जाणून, तत्स्वरूपी नंतर होतो–, स्वरूपाशी एक होतो.] (११४५)

आणि आकाश जें नव्हें। तया अकाश काइ जाणावे (जाणवे)।
रत्नांच्यारूपी मिरवे। गुंजांचे लेणे ॥ ११४६ ॥
म्हणौनि मी होणे नाही। तया मीची आहे केही।
मज भजले (भजेल) हे काई। बोलो किर ॥ ११४७ ॥
यया लागी तो कर्मयोगी। मी जालाची माते भोगी।
तारूण्य का तरूणांगी। जया परि ॥ ११४८ ॥
तरंगु सर्वांगे तोय चुंबी। प्रभा सर्वत्र विलसे बिंबी।
नाना आकाश (अवकाश) नभी। लुठंतु (लुंठतु) जैसा ॥ ११४९ ॥
तैसा रूप होऊनि माझे। माते (क्रियाविण) क्रियेविण तो भजे।
अलंकारू (घनाकार) का साहजे। सोनयाते जेवी ॥ ११५० ॥
चंदनाची द्रुती जैसी। चंदनी भजे आपैसी।
का अकृत्रिम शशि। चंद्रिकाते ॥ ११५१ ॥
तैसी क्रिया कीर न साहे। तऱ्ही अद्वैती भक्ती आहे।
हे अनुभवाचि जोगे नोहे। बोला ऐसे ॥ ११५२ ॥
तेव्हां पूर्व संस्कार (छंदे) संदे। जे कांहीं तो अनुवादे।
तेणे आळविलेनि विनोदे। बोलता मीचि ॥ ११५३ ॥
बोलतया बोलताचि भेटे। तेथे बोलिले हे न घटे।
ते मौन तंव गोमटे। स्तवन माझे ॥ ११५४ ॥
म्हणोनि तया बोलता। बोलि बोलता मी भेटता।
मौन होय तेणे तत्वता। स्तवि तो माते ॥ ११५५ ॥
तैसेचि बुद्धि का दिठी। जे देखो जाय तो कीरीटी।
ते देखणे दृश्य लोटी। देखतेचि दावी ॥ ११५६ ॥
आरिसया आदि जैसे। देखतेचि मुख दिसे।
तयाचे देखणे तैसे। मेळवी द्रष्टे ॥ ११५७ ॥
दृश्य जाउनिया द्रष्टे (दृष्टे)। द्रष्टयासी जैसे भेटे।
तंव एकलेपण न घटे। दृष्ट (द्रष्टे) पणाही ॥ ११५८ ॥
स्वप्नीचिया प्रिया। चेऊनि झोंबो गेलया।
ठायीचे दोन्ही न होनिया। आपणचि जैसे ॥ ११५९ ॥

का दोन्ही काष्टाचिया घृष्टी । माजी वन्ही येक उठी ।
तो दोन्ही हे भाष आटी । आपणचि होय ॥ ११६० ॥
नाना प्रतिबिंबा हाती । घेवो गेलया गभस्ति ।
बिंबताही असती । जाय जैसी ॥ ११६१ ॥
तैसे मी होऊनि देखते । तो घेवो जाय दृश्याते ।
तेथे दृश्य ते ने थिते । दृष्टूत्वही (द्रष्टत्वेसी) ॥ ११६२ ॥
रवि आंधारू प्रकाशिता । नुरेचि जेवि प्रकाश्यता ।
तेवि दृश्यी नाही दृश्यता (दृष्टत्वता) । मी जालिया ॥ ११६३ ॥
मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निफजे ।
ते ते दर्शन माझे । सांचो कारे ॥ ११६४ ॥
ते भलतयाही कीरीटी । पदार्थाचिया भेटी ।
(द्रष्ट दृश्यातीता) दृश्य दृश्यातीत दिटि । भोगितो सदा ॥ ११६५ ॥

जाणावे–जाणवे. (११४६) भजले–भजेल. काइ–कायी. कर्मयोगी–क्रमयोगी. (११४७) ययालागी –यालागी जयापरि–जियापरि. (११४८) सर्वांगे सर्वांगी नाना आकाश–ना ना अवकाश. लटंतु–लुंठतु. (११४९) क्रियेविण–क्रियाविण. साहजे–सहजे. चंदनाची–का चंदनाची. द्रती–द्रुती चंद्रिकाते–चंद्रिका तं. (११५१) अहे–आहे. नोहे–नव्हे. (११५२) संदे–छंदे. (संदंश = चिमटा, सांडस) विनोदे–वो–दे वादे–वोदे (११५३) दिटि–दिठी. जे–जे ते (११५६) दृष्टे–द्रष्टे. (११५७) दृष्टे–द्रष्टे. दृष्टयासी जैसे–दृष्टयासीच जै. तंव–तै. येकलेपण–एकलेपणे. दृष्टेपणाही–द्रष्टेपणही (११५८) स्वप्नीच्चिया–तेथ स्वप्नीच्चिया. चेउनि–चेवोनि. गेलया–गेलिया. ठाइंचे–ठायी जे. (११५९) काष्टाच्चिया–काष्टाच्चिये. उटि–उठी. (११६०) घेवो–घेऊ (११६१) तैसे–तैसा. घेवो–घेऊ. दृष्टूत्वही–द्रष्टत्वेसी. (११६२) दृष्टत्वता–दृश्यता. (११६३) दृश्य दृश्यातीत द्रष्ट्र दृश्यातीत दिटी–दृष्टी (द्रष्ट्र = पाहाणारा. दृष्टव्य = देखणा, सुंदर. दृष्ट = शास्त्रोक्त, ठरविलेले, कृत, अनुभव, अनुभवलेले पाहाणे (दृष्टअर्थ = सुबोध.) दृष्टि = बुद्धि, दर्शन शक्ति, डोळा, ज्ञान, शास्त्रमत, उजेड. दृष्टिन् = तज्ज्ञ ध्यानस्थ, तन्मय. दृष्टिगुण = लक्ष्य, निशाण. दृष्टिगोचर = दृश्य. दृष्टिविभ्रम = प्रेमकटाक्ष, दृष्टिविष = सर्प विशेष. दृष्टिमिश्र = तरस) (११६५)

अहो आकाशच मुळीं जें नाहीं त्यानें काय आकाश जाणलें होईल ? त्यास काय आकाश जाणवेल ? अहो तेथें तर कसा तो प्रतिबंध कीं रत्नाच्या रूपामध्यें तर गुंजाचे अलंकारहीपण मिरवणारे असतात नां ! मिरवतात नां (तेथें ते अंतर हे पाहावें लागणारच कीं केव्हांहीं असें होय.) (११४६)

म्हणून मी होणें जर नाहीं, तर मग मी तो कुठें कांहीं आहे ! तो कसचा आहे तरी आहे कसा हा विचारचमुळीं कुठचा कोण जाणें–! असें होय ! आतां मज भजेल कां भजले असें बोलणेंही पण येथें ह्या अशा ठायीं जें होणारें तें जसें का वसादि विकारच सर्वथा तेथें मला भजेल का भजले हें म्हणणें तरी काय कसलें तें ! (११४७)

(क्रम म्हणजे उडी मारण्याचा पवित्रा, पद्धत विधि, पाऊल टाकणें, लेखन पद्धति) या कारणास्तव तो क्रमयोगी का कर्मयोगी मीच झाला (का होऊन) व मजलाच भोगतो–तरुण आंगाच्या ठायीं तारुण्य तें जसें तारुण्यच की तरुण अंगास भोगतें असें म्हटलें तरुण अशा अंगास तारुण्य भोगतें म्हटलें जसें. (११४८)

पाण्यावरील तरंग तो तोयच की, सर्वांगी चुंबतो व मग सर्वत्र बिंबीच की विलसून तो तरंग असतो अथवा नभाच्या ठायीं अवकाशच एक लोळत आहे असा म्हटला होतो. (११४९)

तसा माझे रूप होऊन मजला जो क्रियेशिवाय का क्रियेवांचून भजतो, सुवर्णाची लगड तेथें सुवर्ण तें सहजपणेंच, सोन्यास भजणारें जसें. (११५०)

अथवा चंदनाचा सुवास जसा चंदनाच्या ठायींच भजतो नां! अगदीं स्वाभाविकपणेंच का सहजा-सहजीचे अहो! अथवा अकृत्रिम म्हणजे क्रियेनें न झालेली, अशीं अगदीं सहजतेची जशी चंद्रिका (शशीच की म्हटला), चंद्रासच भजत आहे म्हणावी कीं. (११५१)

जसें क्रिया सहन होत नाहीं (तेथें विकारवशतेचें होणें नाहीं) तर मग अहो भक्ती ती अद्वैताच्या ठायींच (बिनजोड एकट, सर्वश्रेष्ठ, ब्रह्म) की, अद्वितीयाच्याठायींच कीं अहो असें हें तर अनुभविण्यासारखें आहे तें कांहीं बोलण्याचें व्हावें बोलण्यासारखें नाहींच तें बोलावें असें नाहीं. (११५२)

तेव्हां तर पूर्वजन्मींच्या संस्कारवशतेंकरून पूर्वसंचिताच्या योगानें तो जें जें कांहीं बोलतो त्यानें तर आळविला गेल्यानें हांक मारतांच मी 'ओ' देतो मीच तो बोलता चालता होतो कीं. (११५३)

बोलते त्यास बोलताच भेटतो बोलण्यासच बोलता भेटतो–त्या बोलांना बोलावेंच बोलावें असे ते बोल बोलणारा भेटतो. मग तेथें तो बोलेल असें केव्हांहि घटतच नाहीं. तेथें मौनच एक चांगलें असें तें माझें स्तवनच कीं (तेथें सांगेल सवरेल, असें घडणें होतच नाहीं.) (११५४)

असें आहे म्हणून त्यास बोलता (बोली, बोलता) मी भेटता, तेथें मौनच कीं एक तत्त्वतः माझें स्तवन करणारें असें–त्या मौनानेंच की मजला तत्त्वदृष्ट्या स्तवण्याचें करतात. (११५५)

त्याचप्रमाणें बुद्धि अथवा दृष्टिनें तो जे जें कांहीं पाहतो–(देखतो–पाहु जातो) हे कीरीटी ते त्यानें देखणें दृश्य पदार्थंच मुळीं दूर करिते व पाहाते जे आहे त्यासच कीं दर्शन दाखविण्याचे करते. (११५६)

अहो आरसा असण्याचें अगोदरचमुळीं देखते असें जें कांहीं तें मुखच कीं एक देखणेंपण देखणें असें पाहातें तसें त्याचें तें देखणेपण तें पाहाणाऱ्यांस आंत मिळवून घेऊन पहात असणारें कीं. (११५७)

दृश्य जाऊन द्रष्ट्रत्वानें जें द्रष्ट्यासच भेटतें असें तें एकलेपणामुळें त्याचें द्रष्टेपणसुद्धां (पहाणेपणसुद्धां) भेटत नाहीं. घडत नाही. एकलेपणानें कसचें तें घटनेचें होणारे ते द्रष्टेपण बरें! (११५८)

तेथें स्वप्नीच्या प्रियास–स्वप्नामध्यें असलेल्या प्रियकरास जागे करून झोंबण्याचें केलें तर (जागवून त्याशीं झोंबी करण्याचें केलें तर) तेथें दोन्हींही होणेंच नाहीं तेथें आपणच एकला एक कीं (प्रियकर आत्माच तो तेथें तो जगतरूपी स्वप्नामध्येंच आहे व आतां त्यास जागे करून त्यांनीं झोंबण्याचें केलें तर आपणच एकलें एक कीं.) (११५९)

अहो असें कां पाहानां की दोन काष्टांच्या घांसण्यानें त्या घर्षणामध्यें एक तो वन्हि कीं उठतो उभा होतो तो वन्हि आतां काय ती दोन लांकडे एकमेकावर घांसली गेली असें म्हणत नसून एक त्या वन्हीचें येणेंच ते एक, दोन्हींपणाची ती भाष बोलणी आटवून टाकून, आपणच एक वन्हि तो होतो असतो कीं. (११६०)

अहो अथवा असें का पाहानां कीं सूर्यानें जर आपलें प्रतिबिंबच हातीं घेण्याचें केलें तर त्याची मूळची ती असती बिंबता तींच कीं नाहींशीं होणारी होते अशीं. (११६१)

त्याप्रमाणें मी होऊन जो देखता होतो, पाहातो, तो दृश्य घेऊ गेला असतां दृश्य तें द्रष्ट्रत्वें सहितही-पण म्हणजे असलेले मूळचे तेंच नेलें होतें, नाहींसे होतें. (११६२)

अहो सूर्य तर अंधारासही प्रकाशित करणारा तेथें प्रकाश्यता मुळीं उरतच नाहीं त्याप्रमाणें दृश्याचें ठायीं द्रष्ट्रता पाहाणेंपणा तो मी झालो असतां असतच मुळीं नाहीं. (११६३)

मग पाहावें पहाणें, अथवा नच पाहाणे पहावे अशी जी कांहीं दशा निपजते तेंच की माझें सांचोकारे दर्शन कीं! देखिजे देखणें कां न देखिजे देखणें अशीं जी कांहीं अवस्था निपजते येऊन असते, उगवते, जन्मते, तेंच खरें असें माझे दर्शन कीं!! (११६४)

ते दर्शन भलत्याहि पदार्थाच्या मेटीनें हे कीरीटी! द्रष्ट्र दश्यातीताच्या दृष्टीनें भोगणारा होतो कीं दृश्य व पाहाणारा शिवायच कीं नुसतीं दृष्टी भोगणारा कीं! (११६५)

आणि आकाश हे आकाशे। दाटले न ढळे जैसे।
मियां आत्मैनी आपणे तैसे। जाले तया॥ ११६६॥
कल्पांती उदक उदके। संधिलिया वाहो ठाके।
तैसा आत्मेनि मिया येके। कोंदला तो॥ ११६७॥
पावो आपणपया वळघे। केवी वन्ही आपणया लागे।
आपणपां पाणी रिघे। स्नानी कैसें॥ ११६८॥
म्हणोनि सर्व मी जालेपणें। ठेले तया येणे जाणे।
हेचि गा यात्रा करणें। अद्वया मज॥ ११६९॥
पै जळावरी तरंगु। जरी धाविन्नला लागवेगु।
तऱ्ही नाहीं भूमि भागु। क्रमिला जैसा॥ ११७०॥
जे सांडावे कीं मांडावे। चे (जे) चालणे जेणें चालावे।
ते तोचि येकु आघवे। म्हणौनिया॥ ११७१॥
गेलयाहि भलते उता। उदकपणे पंडुसुता।
तरंगाची एकात्मता। न मोडे जेवि॥ ११७२॥
तैसा मीपणे हा लोटला। तो आघवयाची मज आला।
यया यात्रा होय भला। कापडी माझा॥ ११७३॥
आणि शरीर स्वभाववशे। कांहीं येक करू जरी बैसे।
तरी मिचि होणे मिसे। भेटे तया॥ ११७४॥
तेथ कर्म आणि कर्ता। होवोनि पंडुसुता।
मिया आत्मेनि मज पाहता। मीचि होय॥ ११७५॥
पै दर्पणाते दर्पणें। पाहिलिया होय न पाहाणें।
सोने झांकलिया सुवर्णे। न झांकिजे जेवी॥ ११७६॥
दीपाते दीपे प्रकाशिजे। ते न प्रकाशणेचि निफजे।
तैसे कर्म मिया की जे। तै करणें कैचे॥ ११७७॥
कर्मही करितचि आहे। जै करावे हे भाष जाये।
तै न करणेचि आहे। तयाचें केले॥ ११७८॥
क्रियाजात जालेपणें। घडो कांहीचि न करणें।
तयाचि नांव पुजणे। खुणेचे माझे॥ ११७९॥
म्हणौनि करितयाही वोजा। न करणें हे कपिध्वजा।
निफजे तया महापूजा। पूजी तो माते॥ ११८०॥
एवं तो बोले ते स्तवन। तो देखे ते दर्शन।
अद्वया मज गमन। तो चाले तेचि॥ ११८१॥

तो करी तेतुली पुजा । तो कल्पी तो जपु माझा ।
तो असें तेचि कपिध्वजा । समाधी माझी ॥ ११८२ ॥
जैसे कनकेसी कांकणे । असि जे अनन्यपणें ।
तो भक्तीयोगे येणे । मजसी तैसा ॥ ११८३ ॥
उदकी कल्लोळु । कर्पुरी परिमळु ।
रत्नी उजाळु । अनन्य जैसा ॥ ११८४ ॥
किंबहुना तंतूसी पटु । का मृत्तिकेसी घटु ।
तैसा तो येकवाटु । मजसी माझा ॥ ११८५ ॥

आत्मेनी आपणे–आत्मेन आपणपे. (११६६) वळघे–वोळगे, वोळघे. अपणया–आपणपया. स्नानी स्नाना. (११६८) हेचि–तेचि. (११६९) जळावरी–जळावरील. लागवेगु–सवेगु. जैसा–तेणे. (११७०) तोयचि–तोयचि. (११७१) न मोडे–न मोडेचि. (११७२) अघवयाचि–अघवेयाचि. आला–आंतु आला यया–या. (११७३) तेणे–तो तेणे. मिसे–मिषे. (११७४) करिता होवोनि–कर्ता ते जाउनी. (११७५) झांकिलया–झांकिलिया. झांकिजे–झांके (११७६) प्रकाशणेच्चि प्रकाशणे तै–ते. (११७७) आहे–होये. (११७८) जालेपणे–मी जालेपणे. घडो–घडे. पुजणें– पूजणें. (११७९) हे–हेचि. तया–तिया. पुंजी–पूजी (११८०) पुजा–पूजा. (११८२) कर्पुरी–कापुरी (११८४) येकवाटु–एकवटु. (११८५)

आकाश हें आकाशानेंच मुळीं कोंदलेलें, दाटलेलें, तें मुळीं सुद्धां हालत डळत चळत नाहीं; असें त्याप्रमाणें त्यां आत्म्यानें आपणच स्वतः आत्म्याचें होणे झालें त्या आत्म्यास कीं ! (११६६)

कल्पांती पाण्यानेंच पाणी रूंधल्याचें आवरल्यानें वाहाण्याचें थांबतें तसें मिया एका आत्म्यानेंच तो आत्मा कीं कोंदला भरला आहे कीं ! (११६७)

आपले सर्वस्व आपलाच आश्रय करू लागलें–(आपलीच सेवा करू लागलें आपले सर्वस्व जे जे पाय तेंच आपल्या सर्वस्वाकडे वळले, पायानें पायासच सर्वस्वासच वेध लाविला वेध दिला ) असें कसें बरें होईल ? अग्नि वन्हि वन्हिसच लागला असें कसें होईल ? पाणी आपले (पाणी पाण्यासच पाणीपणाचे स्नान घालण्यास का ते जसे) स्नान करण्यास निघालें असें कसें होईल तें ? (११६८)

म्हणून सर्व कांहीं मीच झाल्यानें त्याचें येणें का जाणें हें थांबलें कीं, व त्यासच म्हटलें कीं माझी अद्वयाची यात्रा करणें जें तें ! (११६९)

तरंग हा पाण्यावर जर अतिशय वेगानें धांवला तर त्यानें कांहीं भूमि भाग ( भूमि जमिन, अंशावर पाऊल ठेविले का झडप घातली का) क्रमिला असें केव्हांहि नाहींच. (११७०)

जे कांही त्यागावें कां पुढें घ्यावें, जें कांहीं पुढें चालणें–मार्ग आक्रमणें ज्यानें चालावें मार्ग आक्रमावा. तेथें तर सर्व कांहीं तोंच एक कीं आहे ते सांडणें मांडणें चालणें जें तेथें ! (११७१)

देह जल उदक तरंग हा उदकपणानें भलतेवढाहि जरी गेला तरी तरंगाची ती एकात्मता केव्हांही मोडत नाहींच. (११७२)

त्याप्रमाणें मीपण स्वरूप उखर रोशवाई मीपणा वर हा लोटला गेल्यानें तो तर सर्वच्या सर्व कीं मजमध्येंच आलेला असा, अशा त्या यात्रेनें तर तो भला असा माझ्या यात्रेकरू–कापडीच कीं होतो. यात्रेकरू **कापडी** (शिव).

(१) **कापडी**—आम्ही कापडी रे आम्ही कापडी रे । पापे बारा वाटा पळती बापडी रे ॥ १ ॥ पंढरपुरचे आम्ही कापडी रे । उत्तरपंथीचे आम्ही कापडी रे ॥ २ ॥ आजी पाहाळे रे आजी पाहाळे रे ।

संत संगती सुख झाले रे ॥ ३ ॥ समता कावडी रे समता कावडी रे। माजी नामामृत भरले आवडी रे ॥४॥ येणे न घडे रे जाणे न घडे रे। निजसुख कोंदले पाहातां चहूंकडे रे ॥ ५ ॥ न लगे दंडणे रे न लगे मुंडणे रे। नाम म्हणौनि कर्माकर्म खंडणे रे ॥ ६ ॥ दुःख फिटले रे, दुःख फिटले रे। बाप रखुमादेवीवरे विठ्ठले रे ॥ ७ ॥

(२) ॐ नमो शिवा आदी कावडी घेतली खांदी। मिळाली संत मांदी त्यांचें रजरेणु वंदी ॥ ध्रु ॥ शिवनाम शीतळ मुखी सेवी पां कापडिया रे। दड दड दड दड दुड दुड दुड दुड पळ सुटला कळिकाळ बापुडिया रे ॥ १ ॥ गुरुलिंग जंगम। त्याने दाविला आगम। आधि व्याधि झाली सम। तेणें पावलो विश्राम रे ॥ २ ॥ जवळीं असतां जग जीवन। कां धांडोळिसी वन। एकाग्र करी मन। तेथें होईल समाधान रे ॥ ३ ॥ देहभाव जेथें विरे। हे साधन दिधले पुरें। बाप रखुमादेवीवरे विठ्ठल रे विठ्ठल रे विठ्ठल रे ॥ ४ ॥ (११७३)

व शरीर प्रकृति, मूळ धर्म, सहज गुण, शरीररूपी माया प्रकृति स्वभाव, उक्ति हुबेहुब वर्णन, (साहित्य) शरीर स्वभाव–आत्मक सिद्ध मूळचें जातीचें स्वाभाविक असें जें शरीर त्यायोगे जरी तो कांहीं करू लागतो तर मीच की अहो होणें, ईश्वरत्वच सांपडणें असें जें कांहीं तेंच एक मिस त्यायोगेंकरून मीच त्यास भेटतो की. (११७४)

तेथें कर्म आपणच झाला तसेंच कर्ताही पण ! हे पांडुसुता तेव्हां मी आत्मा तो आत्मक का सिद्ध असा मूळ जातीचा स्वाभाविक त्यास पाहातां तोच मी होऊन असणें होतें. (११७५)

पण आरशानें आरशास पाहिलें तर तेथें पाहाणें हें नसतेंच तेथें पाहाणें होतच नाहीं सोनें झांकले तरी पण सुवर्णपण जें तें कांहीं झांकलें जात नाहीं जसें. (११७६)

दिव्यास दिव्यानें प्रकाशावें तेथें नच प्रकाशणेंच एक निपजतें तसें कर्म मी होऊन केलें तर तेथें कर्म करणें हें कसचें तें. (११७७)

कर्मही पण करीतच आहे, जेव्हां का तें कर्म करावें असें बोलणें होत नाहीं, तेव्हां तर कर्म मुळींच की न करणें असेंच त्याचें केलें होतें. (११७८)

क्रियाजात म्हणून जेवढ्या कांहीं त्या आपलेपणास येऊन आहेत आपलेपणाच्या झाल्या तर तेथें कांहीं एक करणें आहे असेंच होतें, व्हावें की, तेव्हांच मुळीं त्यास नांव असें माझें खुणेचें तें पुजणें म्हटलें नां ? (११७९)

म्हणून त्याचा बस जो आहे, वोज जो आहे, तोच मुळीं आपल्या बस बसणेचा जर तर तेथें करणें न करणें हें न करणेंच एक असेंच निपजते अशी एक माझी महापूजाच की, बांधिली त्यानें असें होय. (११८०)

याप्रमाणें अहो ! जर, तर मग, तो जें कांहीं बोलेल तें स्तवन झालें की. तो जें कांहीं पाहील का देखेल तेथें दर्शन की अहो एक घडणारें व मी जो अद्वितीय असा अद्वय त्यास तर त्याचे तें चालणें (जे तेच–तो चाले) तेंच गमन म्हणजे स्रीसंग कां प्राप्ति कां ज्ञान कां गति नां ! (११८१)

तो करी जें जें ती तितकी पूजाच की. तो कल्पतो (कल्प=रचना, प्रकार, पद्धत उद्देश) जें जें कांहीं तो माझा जपच की त्याचें असणें तीच माझी समाधी ! तो असतो का तो आहे तीच हे कपिध्वजा माझी समाधी ना ! (११८२)

जसें कनकास सुवर्णास कंकणानें अनन्यपणेंच असावें; कनक व कंकण हें सर्वथा अभिन्न अनन्य, तसा तो ह्या भक्तियोगें करून मजसी अनन्यच जाणावा की तो मजसी अभिन्नच की ! (११८३)

पाण्यामध्यें कल्लोळ, कापुराचे ठायींचा सुवास, रत्नामधील प्रकाश उजाळा, असा अनन्य एकरूप एकनिष्ठ का एकट असा ! (११८४)

बहुत काय पण पटास तंतु जसा, मृत्तिकेस घट जसा, तसा तो मजसी माझेपणानें एक बाट (फुलाचा ताटवा) असाच एकवटलेला होय. (११८५)

यया अनन्यसिद्ध भक्ति । या अघवया दृश्यजाति ।
मज आपणया सुमति । द्रष्ट्याते जाणे ॥ ११८६ ॥
तिन्ही अवस्थांचेनि द्वारे । उपाध्या उपहिता कारे ।
भावाभावरूप स्फुरे । दृश्य जे हे ॥ ११८७ ॥
ते हे आघवेचि मी द्रष्टा (दृष्टा) । ऐसया बोधाचा माजिवटा ।
अनुभवाचा सुभटा । धेंडा तो नाचे ॥ ११८८ ॥
रज्जु जालया गोचरूं । आभासता तो व्याळाकारू ।
रज्जु ऐसा निर्धारू । होय जेवी ॥ ११८९ ॥
भांगारा परते काही । लेणे गुंजही भरी नाही ।
हे आटुनिया ठाई । किजे जैसें ॥ ११९० ॥
उदका येका परते । तरंगु नाहीं हे निरूते ।
जाणोनि तया (आकाराचे) आकाराते । न घेपे जेवि ॥ ११९१ ॥
नातरी स्वप्नविकारा समस्ता । चेउनिया उमाणे घेता ।
तो आपणया परता । न दिसे जैसा ॥ ११९२ ॥
तैसी जे कांहीं आथि नाथी । येणे होय ज्ञेय स्फूर्ति ।
तो ज्ञाता मी हे प्रतिति । होउनि भोगि ॥ ११९३ ॥
जाणे अजु मी अजरूं । अक्षय मी अक्षरूं ।
अपूर्व मी अपारू । आनंदु मी ॥ ११९४ ॥
अचळु मी अच्युतु । अनंतु मी अद्वैतु ।
अवधुतु (आद्यु) मी अव्यक्तु । व्यक्तु ही मी मीचि ॥ ११९५ ॥
स्वामी मी सदोदितु । सहज मी स्वतंत्रितु (सततु) ।
सर्व मी सर्वगतु । सर्वातीतु मी ॥ ११९६ ॥
ईषु मी ईश्वरू । अनादि मी अमरू ।
अभय मी आधारू । आधेय अध्यय (आध्येय मी) मीचि ॥ ११९७ ॥
नवा मी पुरातनु (पुराणु) । शून्य मी संपूर्णु ।
स्थूल (अणु) अस्थूळ अनणु । जे कांहीं ते मी ॥ ११९८ ॥
अक्रिय मी येकु । असंगु मी अशोकु ।
व्याप्य मी व्यापकु । पुरूषोत्तमु मी ॥ ११९९ ॥
अशब्दु मी अश्रोत्रु । अरूप मी अगोत्रु ।
समु मी स्वतंत्रु । ब्रह्म मी पर ॥ १२०० ॥
ऐसे आत्मत्वे मज येकाते । (इया) या अद्वय भक्ती (जाणो)नि जाणे निरुते ।
आणि याही बोधाते जाणते । तेही मीचि जाणे ॥ १२०१ ॥
पै चेइलिया नंतरे । आपुले येकपण उरे ।
तेही ते वरी (तयावरी-तोवरी) स्फुरे । तयासीची जैसे ॥ १२०२ ॥

का प्रकाशता अर्कु । तोचि होय प्रकाशकु ।
तयाही अभेदा द्योतकु । तोचि जैसा ॥ १२०३ ॥
तैसा वेद्यांच्या विलइं । केवळ वेदकु उरे पाही ।
तेणें जाणावे तया तोही । हेही जो जाणें ॥ १२०४ ॥
तया अद्वयपणा अपुलया । जाणती ज्ञप्ती जे धनंजया ।
तो ईश्वरूचि मी हे तया । बोधासी ये ॥ १२०५ ॥
मग अद्वैतातीत । मीचि आत्मा येक निभ्रांत ।
हे जाणौनि (जाणणे) जेथ । अनुभवी रिघे ॥ १२०६ ॥
तेथ चेइलया येकपण । दिसे जे आपणया आपण ।
तेही जाणता नेणो कोण । होइजे जेवि ॥ १२०७ ॥
का डोळा देखतिये क्षणि । स्वरूपपण सुवर्णी ।
नाटिता होय आटणि । अलंकाराची ही ॥ १२०८ ॥
नाना लवण कणें तोय होये । मग क्षारता तोयत्वे राहे ।
तेही जिरता जेवी जाये । जालेपण ते ॥ १२०९ ॥
तैसा 'मी' 'तो' 'हे' 'जे' असे । ते स्वानंदानुभव समरसे ।
कालउनिया प्रवेशे । मजचि माजि ॥ १२१० ॥
आणि हेही भाष जेथ जाय ! तेथ मी हे कोणासि आहे ।
ऐसा मी ना तो तिये सामाये । माझांचि रूपी ॥ १२११ ॥
जेव्हां कापुर जळो सरे । तयाचि नांव आगी पुरे ।
मग उभयातीत उरे । आकाश जेवि ॥ १२१२ ॥
का धाडिलया येकायेकु । वाढे तो शून्य विशेषु ।
तैसा आहे नाहीचा शोषु । मीचि मग आथि ॥ १२१३ ॥

यया–इया. सिद्ध–सिद्धा. अघवया–अघवाचि. आपणया–आपणपेया. दृष्टयाते–द्रष्टयाते. (११८६) उपाध्य उपहिताकारे–उपाध्युपहिता कारे=व्यक्त अव्यक्त, भाव अभाव, क्षेत्र क्षेत्रज्ञ, उपाधि व उपहित या रूपानें. (११८७) द्दष्टा–द्रष्टा. ऐसया–ऐसिया. माजिवठा=भर, आवेग, आवेश. घेंडा=सोहळा= नवरानवरीस कडेवर घेऊन नाचतो तो माणूस. (११८८) जालया–जालिया. अभासता–आभासता. रज्जु–रज्जुच् (११८९) ठाइं कीजे जैसे=एकवट होतात, ठायींचें होतात. (११९०) नाही–नाहीच. आकाराचे–आकाराते (११९१) परता–परौता. उमाणे=मोजमाप. (११९२) तैसी–तैसे. येणे–तेणे. तो–ते. ज्ञाता–ज्ञाताचि. आथि नाथि=आहे नाहीं. अजरू–अमरू. अक्षय–अक्षयो अपूर्व–अपुर्वु. (११९४) अवधुतु–आयु. (११९५) [स्वतंत्र=वयांत आलेला. (व्या.) कर्ता. दुसऱ्याच्या आधीन नसलेला. स्व–तंत्रितु=(स्व=स्वतःचे स्वाभाविक, स्वजातीय, आपण, आत्मा, धन,) तंत्र=शपथ, दिव्य, कुल, वंश, घर, वस्त्र, प्रयोजन, कर्तव्य, नियमन, राज्य, संपत्ति व्यवहार, मुख्य गोष्ट, कुटुंबपोषण तत्व, शास्त्र सिद्धांत, व्यवहार, जगाची घडामोड, उत्तम औषध इत्यादि धागा] स्वतंत्रितु–सततु. (११९६) इषु–ईश–ईश्वर=स्वाध्य, स्वाधीन, नियम्य, नियामक. आधेय=ठेवणे, आधारावर ठेवण्याजोगा पदार्थ. [(आधानं=ठेवणे, स्वीकारणें, घेणें, स्थापना करणें, अग्निहोत्र ठेवणें, कार्यसंस्कार, नेमून देणे, मैथुन, गर्भादान, जामीन, वास, स्थान, धारण करणें संस्कार (आधाय आधेय)] येकपण–एकपण. ते वरी–तो वरी–तो वरी. तयाचि–तयासीचि. (१२०२) वेद्याचा विलइं–वेद्याच्या विलयीं जाणावे–जाणवे. तोही–तेही. (१२०४) अपुलया–आपुलिया. तो ईश्वरू–ते ईश्वरचि. बोधासि–बोधासि. (१२०५) अद्वैतातीत

—द्वैत द्वैतातीत. येक-एकु. (१२०६) आपणया-आपुलया. जाणता-जाता. (१२०७) स्वरूपपण सुवर्णि नाटिता-सुवर्णपण सुवर्णि आटौनि. (१२०८) लवण कण-लवण. (१२०९) मी-मी तो. (१२१०) हेही-तो हे अहे-आहे. (१२११) नाव-नाम. आगि-अग्नि. उभयातीत-उभयतातीत. जेवि-जेवी. (१२१२) येकायेकु-एकाएक, एकात एक वजा करतां. विशेषु-विशेखु. शोषु-शोखु=शेष बाकी. (१२१३)

अनन्य (एकरूप, एकनिष्ठ, एकट,) असें सिद्ध झालेलें तेथें भक्ति ती अनन्य, सिद्धा म्हटली-भक्ति सिद्धा अनन्यपणें-तेव्हां ती अवघ्या सर्व सुंदर दृश्य जातिची (दृश्=ज्ञान, बुद्धि डोळा, जाणणें, पाहाणें, दिसणें जाणणारा, पाहाणारा.) की ती भक्ति झाली ती आतां मला स्वतःला आपणाला, कां मज सर्वस्वाला हे सुमति ! द्रष्ट्याला जाणते, ओळखते. [दृश्य जगत्-दृश्य जेवढें म्हणून आहे तें सर्वच्या सर्व अनेकतेनें असलेलें तें येथें भक्तीच की अहो म्हटली गेली. जसें कां तें सर्व एक आत्मरूपच नटलेलें हें जगत् (कांहीं दृश्यजाती सुंदर) दिसणारें दृश्य जेवढें म्हणून तेवढें सर्व दर्शन हीच भक्ति दृश्य हें सर्व जगत् (का दृश्य जाति दिसणारें सुंदर सर्व कांहीं तें) व द्रष्टा तो मी अशीं त्रिपुटी सिद्ध झाली तेव्हां ती भक्ति सिद्धा अशी एकरूपतेची ती आत्मरूपावर व्यवहारानें सरस्वतीच नटलेली की ओळखीची अशीं.] (११८६)

मी द्रष्टाच सर्व एक ह्या तिन्ही अवस्थाच्या म्हणजे जागृति, स्वप्न, सुषुप्तिच्या द्वारांनीं की तेथें माया, शरीर इत्यादि उपाधि व त्याचा जो चालक त्याच्या योगानें किंवा व्यक्त अव्यक्त, भाव अभाव, क्षेत्र क्षेत्रज्ञ, उपाधि-उपहित (मिश्रित) या रूपानें जें जें कांहीं भाव अभाव रूप स्फुरतें, जें हें सर्व दृश्य जगत् !— (११८७)

—तें तें सर्व मीच की द्रष्टा-पाहाणारा-न्यायाधीश होय. अशा बोधाचा भर आवेश घेऊन अनुभवाचा सोहळा हे वीरश्रेष्ठा तो भोगतो. (११८८)

रज्जु म्हणजे दोर नजरेपुढें झाला असतां जो कांहीं सर्पाकाराचा भास झालेला, तेथें रज्जुच की एक, असा निर्धारच झाला जसा. (११८९)

सुवर्णाशिवाय दुसरें कांहींहीं लेणें (एक गुंजरभरहीपण) नाहींच नाहीं, असें तें सुवर्ण आटून आटवून खरें आहे असें) म्हणणें तें कां समजूत ती पुरती केली-(करावी जसें) ! (११९०)

(एका उदकाशिवाय दुसरा कांहीं तरंग आहे असें नाहींच) सर्व उदकच एक हें खरेंच की असें जाणून त्या आकाराच्याहि आकारांस कांहीं घेतले, घेणें जाणें होत नाहीं. (११९१)

समस्त अशा स्वप्नविकारांनीं जागें होऊन त्या विकाराचें मोजमाप घेतलें तर तेथें आपणा स्वतः-शिवाय दुसरा परता कां पलिकडचा असा कोणीही दिसत नाहीं. (११९२)

तसें जें कांहीं आहे व नाहीं अशा स्थितीनें तेणेंच मुळीं जाणावयाच्या पदार्थाचें स्फुरण होतें. तेथें तें आहे नाहीं अशा स्थितीचें जाणणें, जाणणारा तो ज्ञाताच की मी आहे अशी प्रतीती होऊन ती प्रतीती तो अनुभवितो. (११९३)

मग म्हणतो की, (अथवा मग असेंच जाणतो की) मीच की अहो अज म्हणजे उत्पन्न न होणारा असा आहे-मी जरारहित आहे-मीच नाशरहित असा आहे-मी अविनाशी असा आहे-ज्याच्यापूर्वी कांहींही नव्हतें असा अनादि मी आहे अहो अपार असा आनंदच की मी आहे. (११९४)

मी अचल म्हणजे चलन न पावणारा आहे; मी पतित न होणारा असा (अच्युत) आहे, अंतररहित असा मी आहे. मी अद्वैत आहे. मीच आद्य म्हणजे पहिला आहे मीच अव्यक्त असा निराकार आहे. [अव्यक्त=अस्पष्ट, अदृश्य, अज्ञात, परब्रह्म (सां.) प्रधान] व्यक्तहीपण मीच आहे. (११९५)

अधिपति मी असा नेहमीचा उदित आहे असा सदोदित आहेचा आहे सहज असा मी सततचा आहे. वयांत आलेला असा मी स्वतंत्र आहे. दुसऱ्याच्या आधीन नसलेला असा कुटुंब पोषक सर्व मी आहे सर्वगत चेतनअचेतनात भरून असणारा मी आहे. सर्वांच्याहि पलिकडचा मी आहे. (११९६)

ईशितव्य, ईशत्व, समष्टिरूप जीवधर्मरहित ईश्वरू, मी नियम्य व नियामक आहे. अनादि असा मी अमर आहे–मीच मजला अभय आहे आधार आहे ज्या आधारावर सर्वकांहीं ठेविलें जातें तें ब्रह्म मी आहे. (११९७)

नवा मी आहें, जुना पुराणा असाही पण मी आहे. शून्य म्हणजे अभावरूप तसेंच संपूर्णही पण मी आहें. अस्थूल (स्थूल = जाडे भरडे) सूक्ष्म अणूहून (अनणु = जाडे भरडे) भिन्न जें कांहीं आहे तें मी. (११९८)

क्रियारहित असा मी, एक संगरहित मी, शोकरहित मी व्याप्त = नित्य, संबद्ध स्थापित, व्यापलेले व्याप्त–व्यापले जाणारे, कमी विस्तृत, (न्या.) हेतु–व्यापक मी पुरुषोत्तम मी. (११९९)

मी अशब्द–निंदा, ब्रह्म, (सां.) प्रधान (अशब्द–आस्य न बोलणारा) अश्रोत्र मी, (अश्रवण, बहिरा असा) [श्रुतेंचि कीं श्रोत्र न कुंडलानें दानेचि की पाणि न कंकणानें साजे तसा देहहि हा न आनें परोपकारेचि न चंदनानें] मी अरूप आकार शून्य, भिन्न, कारणरहित (सां.) प्रधान सम मी, स्वतंत्र मी, पर मी ब्रह्म–ब्रह्म मी पर. (१२००)

असें आत्मत्वेंकरून मज एकाला त्या अद्वय भक्तीनें खरें जाणावें व जाणूनहि पण जाणणारा असा त्या बोधास जाणतो, जाणते असें जें कांहीं तेंहीपण तो मीच जाण. (१२०१)

झोंपेमधुन जागे झाल्यावर आपला आपणच काय तो एकटा तेथें, एकटेपण उरतें जें, तेंही पण त्या एकपणासच का त्या एकपणावरच स्फुरतें एकपणासच कीं. (१२०२)

स्वतः प्रकाशरूप सूर्य असून तोच की स्वतःचा प्रकाशक होतो आणि प्रकाशक व प्रकाश्य त्या दोहोमधल्या अभेदपणास जाणणारा द्योतक प्रकाशक बोधक तेजस्वी तोच असतो. (१२०३)

वेद्यांच्या विलयीं–जाणण्यायोग्य पदार्थांच्या लयानंतर केवळ एक जाणणाराच (वेदक) उरतो कीं तेथें जें कांहीं त्यास जाणवें–जाणवतें तेंहीपण तेंच (ब्रह्म) कीं असें जो जाणतो. (१२०४)

त्या आपल्या अद्वयपणास जाणण्यानें जाणती अशीं शहाणीं जी ज्ञप्ती ज्ञानकला, हे धनंजया! ती ज्ञानकला मी ईश्वरच कीं एक अशा बोधास येते–अशा ईश्वरासच ती जाणती होते. (१२०५)

मग जेथें द्वैतही नाहीं व अद्वैतही नाहीं, द्वैत व अद्वैत याच्या पलिकडे असा द्वैताद्वैतातीत मुक्त मीच कीं आत्मा एक, निभ्रांत अगदीं बिनचूक (इकडे तिकडे भटकणें थांबवून) जाणून जाणणें हेंच मुळीं अनुभवाचें झालें त्या अनुभवातच म्हणजे जाणण्याच्या अनुभवामध्येंच कीं रिगावा करून असतो, जाणणें ज्ञान तेंच अनुभव म्हटलें त्या अनुभवातच मुरून आहे जो. (१२०६)

तेथें चेइले झाल्यावर, जागे झाल्यावर, जे कांहीं एकपण, जें आपल्या आपणच दिसूं लागतें; तेंही पण आतां कोण होईजे हे कांहीं नेणो जेवि. (१२०७)

अथवा असें पाहा कीं डोळ्यांनीं पाहिल्या बरोबर सुवर्णामधील जें स्वरूपपण अलंकाररूपानें कां लेण्यानें असलेलें तें नच आटविल्याशिवायच कीं अलंकाराची ही आटणी होते जशीं–डोळा पाहिला, स्वरूपपण सुवर्णाचें–लेणें नच आटविता आटून आहे जीवदशारूपी सुवर्णामध्यें–स्वरूप वाल्लभ. (१२०८)

अथवा मीठ पाणी होऊन जातें–मिठाचें पाणी होते तेव्हां क्षारता ती (खारटपणा तो) तोयत्वें, पाणी–पणानें, राहातें जें, तेंही तोयत्व जिरलें असतां त्याचें क्षारपण जें तेंही नाहींसें होतें. (१२०९)

तसा मी तो असें हे जें कांहीं आहे ते (स्व+आनंद+अनुभव+समरसें) निजानंदाचें भरात एकत्र होऊन, पूर्णानंद आविर्भावानें सामरस्येंकरून कालविले होऊन मजमध्येंच प्रवेश करते. (१२१०)

मजमध्येंच कालविलें गेल्यावर मग जी कांहीं 'मी' 'तो' अशी बोलण्याची तऱ्हा भाष, बोली, शब्द, (तो, हे भाष जेथें नाहींशीं होते.) ती जेथें संपते नाहींशी होते. तेथें मी असें जें कांहीं तें कुणास बरें असते. तेथें मीपण तें कोणास तें? असा मी नाहीं व तोही नाहीं होऊन माझ्या स्वरूपी मिळतो, सामावला होतो. (१२११)

तेव्हां अथवा अहो जेव्हां कां कापुराचा जाळ उजाळा संपतो; पेटविलेला कापुर विझतो, त्यासच कीं नांव दिले कीं 'अग्नि' हा विझता झाला, नाहींसा झाला व मग दोहोहून अग्नि व कापूर याहून भिन्न असें जें कांहीं तें आकाशच एक उरते. (१२१२)

एकांत एक वजा केला असतां बाकी शून्य विशेष रहातें तसा आहे का नाहीं असा शोध कां शोखु कां अवशेष उरणारा तो मी मग आहेच आहे असा जाण. (१२१३)

तेथ ब्रह्म आत्मा इशु। या बोला मांडे सौरसु।
न बोलण्याहि पैसु। नाही जेथ ॥ १२१४ ॥
न बोलणेहि न बोलोनि। ते बोलिजे तोंड भरून (बोलिजे तो उभरूनि)।
जाणीव नेणीव नेणोनि। जाणिजे ते ॥ १२१५ ॥
तेथें बुझिजे बोध बोधे। आनंदु घेपे आनंदे।
सुखावरि नुसधे। सुखचि भोगिजे ॥ १२१६ ॥
तेथ लाभ जोडला लाभा। प्रभा आळंगिली प्रभा।
विस्मयो बुडाला उभा। विस्मया माजी ॥ १२१७ ॥
समु तेथ समावला। विश्रामु विश्रांती आला
अनुभउ वेडावला। अनुभुतीपणे ॥ १२१८ ॥
किंबहुना ऐसे निखळ। मीपण जोडे तया फळ।
सेउनि वेली वेल्हाळ। कर्मयोगाची ते ॥ १२१९ ॥
पै कर्मयोगा किरिटि। चक्रवर्तीचां मुगुटी।
मी चिद्रत्न ते सांटोवाटि। होय ते माझा ॥ १२२० ॥
कीं कर्मयोग प्र(प्रा)सादाचा। कळसु जो हा मोक्षाचा।
तया वरिला अवकाशाचा। उवावो जाला तो ॥ १२२१ ॥
नाना संसार अटवि। कर्मयोग वाट बरवि।
जोडली ते मदैक्य गांवि। पैठी जालीसे ॥ १२२२ ॥
हे असो कर्मयोग वोघे। तेणे भक्ती चित्त गांगे।
मी स्वानंदोदधि वेगे। ठाकिला कीं गा ॥ १२२३ ॥
हा ठावोवरी सुवर्मा। कर्मयोगी आहे महिमा।
म्हणौनि वेगळ वेगळा तुम्हां। सांगतो आम्ही ॥ १२२४ ॥
पै देशकाळ पदार्थ। साधुनि घेइजे माते।
तैसा नव्हें मी आईते। सर्वांचे सर्वही ॥ १२२५ ॥

म्हणौनि माझां ठाईं । याचा वेग न लगे काही ।
मी लाभे ये उपाईं । सांचचि गा ॥ १२२६ ॥
येक शिष्य येक गुरू । हा रूढला सांच व्यापारू ।
तो मत्प्राप्तीचा प्रकारू । जाणावया ॥ १२२७ ॥
अगा वसुधेच्या पाठि । निधान सिद्धि किरिटि ।
वन्हीं सिद्ध काष्ठी । वोहां दुध ॥ १२२८ ॥
जरी लाभे ते असते । तया कीजे उपायाते ।
येर सिद्ध तैसा येथे । उपाईं मी ॥ १२२९ ॥
हा फळहीवरी उपावो । कां पा प्रस्तावीत असे देवो ।
हे पुसतां तरी अभिप्रावो । येथींचा ऐसा ॥ १२३० ॥
जे गीतार्थाचे चांगावे । मोक्षोपायपर आघवे ।
आणि शास्त्र उपावो कीं नव्हे । प्रमाण सिद्ध ॥ १२३१ ॥
वारा आभाळचि फेडी । वांचुनि सूर्याते न घडी ।
का हातु बाबुळी धाडी । तोय न करी ॥ १२३२ ॥
तैसा आत्मदर्शनी आडळु । असे अविद्येचा जो मळु ।
तो शास्त्र नाशी येरू निर्मळु । मी प्रकाशे स्वये ॥ १२३३ ॥
म्हणौनि आघवेचि शास्त्रे । अविद्या विनाशीत पात्रे ।
वांचुनि नव्हती स्वतंत्र । आत्मबोधी ॥ १२३४ ॥
तया अध्यात्म शास्त्रासी । जै सांचपणाची ये पुसी ।
ते येईजे जया ठायासी । ते हे गीता ॥ १२३५ ॥
भानु भुषिता प्राचिया । सतेजा दिशा आघविया ।
तैसी ईश्वरा गीता इया । सनाथें शास्त्रे ॥ १२३६ ॥
हे असो येणे शास्त्रेश्वरे । मागां उपावो बहुते विस्तारें ।
सांगितला जैसा करे । घेवो ये आत्मा ॥ १२३७ ॥
परी प्रथम श्रवणासवे । अर्जुना हे विपाये फांवे ।
हा भावो सकणवे । धरूनि श्रीहरि ॥ १२३८ ॥
तेचि प्रमेय (प्रथम) येकवेळ । शिष्य हो अवया अढळ ।
सांगतसे सकळ । मुद्रा आतां ॥ १२३९ ॥
आणि प्रसंगे गिता । ठावो ही हा संपता ।
म्हणोनि दावी आद्यंता । येकार्थत्व ॥ १२४० ॥
जे ग्रंथाचां मध्यभागीं । नाना अधिकार प्रसंगी ।
निरोपण अनेगी । सिद्धांती केले ॥ १२४१ ॥
तरी तेतुलेही सिद्धांत । ये शास्त्री प्रस्तुत ।
हे पूर्वापार नेणत । कोण्ही जे मानी ॥ १२४२ ॥
ते महासिद्धांता आवांका । सिद्धांत कक्षा अनेका ।
भिडोनि आरंभे देखा । संपवितसे ॥ १२४३ ॥
येथ अविद्या नाश हे स्थळ । तेणे मोक्षप्रदान हे फळ ।
या दोही केवळ । साधन ज्ञान ॥ १२४४ ॥

**हे येतुलेचि नाना परि । निरोपिले ग्रंथ विस्तारी ।**
**ते आतां दोही अक्षरी । अनुवादावे ॥ १२४५ ॥**
**म्हणोनि उपायाही (उपेयही) हाती । जालया उपाय स्थिति ।**
**देवो प्रवर्तले ते ते पुढति । येणेचि भावो ॥ १२४६ ॥**

ईशु–ईश. या–यया. मांडे–मोडे. सौरसु = प्रेम, गोडी, अभिप्राय न बोलण्याहि–न बोलणें याही. पैसु–पैस = अवकाश. जेथ–तेथ (१२१४) न बोलणेही न बोलोनी ते बोलिजे तोंड भरूनि (बोलिजे तो उभरूनि) (न) बोलणें. (न) बोलून तोंडावर बोलिले जाते तसें जाणीव व नेणिव न जाणून जाणले जाते–बोलणे ते बोलावे कसें तर ते बोलणे बोल (तोंड) उभरून कीं, बोलणे बोल उभरून बोलावे. जाणिव नेणिव = ज्ञान, अज्ञान. (१२१५) बुझिजे = जाणावा. सुखावरी = सुखरूप का सुखमय होऊन. सुखावरी–सुखवरी. नुसुधे-नुसधे. (१२१६) लाभ–लाभु. प्रभा = प्रकाशानें, कांतीनें, प्रभेनें विस्मय = नवल (१२१७) समु–शमु. (शम = मनोनिग्रह, शांति, अंतकरणाची स्थिरता.) समावला–शमावला–सामावला = मापाचा झाला विश्रांतीस आला. वेडावला = संकोचित झाला, गोंधळला, भ्रमला. अनुभुतिपणें = अनुभवाचा होऊन. (१२१८) कर्मयोगाची–क्रमयोगाची, वेल वेल्हाळ = (क्रमयोगाची व कर्मयोगाची ती) वेल्हाळ सुंदर वेली, आधाराची केल्यानें–आश्रयास घेतल्याने मी पण हेंच मी असें फळ त्याला मिळते. क्रम = पद्धति, पर्याय, पाऊल, नियम, अनुक्रमाने. (१२१९) कर्मयोगा–कर्मयोगिया. (कर्म–क्रम) चिद्रत्न = चैतन्य ज्ञानरूपी रत्न. सांटोवाटी = मोबदल्यानें किंवा अदलाबदलीनें, कर्मयोगास अथवा क्रमयोगास तो माझा अदलाबदल कां मोबदला होतो. (१२२०) क्रमयोग–कर्मयोग = कर्मयोगरूपी प्रासादाचा जो हा मोक्षाचा कळस त्यावरीलही जो अवकाश विस्तार त्यालाच की तो विस्ताराचा झाला होतो = तो कर्मयोगी कर्मरूप देवळाचा, प्रासादाचा मोक्षरूप जो कळस त्याहिवरच्या अवकाशाचा (उवावो) विस्तार का प्रसर झाला कीं. (१२२१) अटवि–आडवी = संसाररूप अरण्य. कर्मयोग–क्रमयोग. मदैक्य गांवी पैठी जाली = माझ्याशीं जे ऐक्य तद्रूप गांवात, गांवामध्यें (पैठी) प्रविष्ट झाली स्थिर झाली. (१२२२) कर्मयोग–क्रमयोग. भक्ति चित्त गांगे–भक्ति चिद् गंगे = भक्ति व ज्ञानरूप गंगा संगमानें, ओघानें, स्वानंद उदधि-निजानंद समुद्र जो मी त्या मजला गांठिले, माझ्याशीं मिळणीं केली. (१२२३) ठावोवरी–ठायवरी = येथपर्यंत. सुवर्मा = मर्मज्ञा. कर्मयोगी–क्रमयोगी. (१२२४) देशकाळ–देशेकाळे साधून–सोधूनि = आपलासा करून. आइते–आयते = चिरकाळ (१२२५) याचा वेग–जाचावे = शिणावे. ये–इये–तिये = ह्या कर्म (क्रम) योगाने. (१२२६) व्यापारू (= कार्य व्यवसाय, अभ्यास.)–व्यवहारू (= न्यायातला वादविवाद, चालचलवणुक, देवघेव.) प्रकार = भेद सादृश्य. (१२२७) वसुधेच्या = पृथ्वीच्या. पाठि–पोटी. वोहा = काखेत, कांसेस (वैहायस = आकाशासंबंधी) सिद्धि–सिद्ध. (१२२८) जरी–परी. लाभे–लाभेल. असते = असणारे असते तेंच मिळेल अथवा मिळतें. उपायाते की जे = पण त्याजकरितां उपाय प्रयत्न केला पाहिजे. सिद्ध–सिद्धचि. उपाइ–उपायी. (१२२९) फळहीवरी = फलप्राप्ती पर्यंत. (१२३०) चांगावें = चांगुलपण, उत्तमत्व. मोक्षोपायपर = मोक्षाची प्राप्ति करविणारे. आणि–आन. शास्त्र उपावो–शास्त्रोपाय. नव्हें प्रमाणसिद्ध = इतर शास्त्राचें उपाय अनुभव सिद्ध नव्हेत (नाहींत) प्रमाण–दाखला, मापण्याचें साधन, साक्षी, कारण. (१२३०) फेडी = निवारी. न घडी = तयार करीत नाहीं हत–हात. बाबुळी = हात शेवाळ दूर करतो. तोय न करी = पण कांहीं पाणी तयार करीत नाहीं. वारा अभ्र म्हणजे आलेलें आभाळ तें दूर करतो पण त्याला कांहीं सूर्य उत्पन्न करतां येत नाहीं (१२३२) आडळु–आड येणारा, प्रतिबंधक. (१२३३) आघवेचि–आघवीचि अविद्या विनाशीत–अविद्या विनाशाची = अज्ञाननाशक. वांचूनि आत्मबोधे स्वतंत्रे न होती = पण त्याच्यानें स्वतंत्रपणें स्वतः सिद्धतेनें कांहीं आत्मरूपाचा बोध करवत नाहीं (१२३४) अध्यात्म = परमार्थ संबंधीं,

स्वभाव संबंधी पुसी=माहिती विचारपूस. सांचपणाची=खरेपणाची (सत्यत्वानें विचारले तर.) (१२३५) प्राचिया=पूर्व (दिशा) शास्त्रेश्वरा गीताया सनाथे शास्त्रे=सर्व शास्त्रामध्यें श्रेष्ठ अशा ईश्वरा म्हणजे (श्रेष्ठ अशा) गीतेनें सर्व शास्त्रें (समर्थ) सनाथ–कृतार्थ होतात. ईश्वरा–शास्त्रेश्वरा. ईश्वरा गीता=भगवद् गुणवर्णन-पर काव्य–गाइलेलें असें श्रेष्ठ, शक्तिमान अशी गीता ही स्वामिनी, लक्ष्मी कीं. (१२३६) शास्त्र ईश्वर, (समर्थ), सत्ता चालविणारा, श्रीमंत, श्रेष्ठ, स्वामी, पति, परमेश्वर, इंद्र, ब्रह्मा, शंकर, मदन, दक्षिणाग्नि.) सर्व शास्त्रांत श्रेष्ठ. उपावो बहुते–उपाय बहुवे. करे=हातानें. (१२३७) प्रथम श्रवणासवे अर्जुना हे विपाये फांवे=एकवारच ऐकल्यानें अर्जुनाला हे कदाचित् कळेल कीं नाहीं असें समजून. सकणवे भाव=सदयतेचा भाव, अभिप्राय. (१२३८) प्रमेय=तात्पर्य, सार सकळ–मुकुल (=कमल कंद, हाड, संबंध, सर्व, संपूर्ण)= संक्षेप रूपानेः मुद्रा अता (आता)–मुद्रे आंत. (१२३९) प्रसंगे–प्रसंग. ठावोही–ठावही–हा ठायही. आद्यंता एकार्थता=एकार्थता आरंभापासून तो शेवटपर्यंत (अघहंता?) (१२४०) जे–कीं, निरोपण–तेचि निरूपण अनेगी सिद्धांती=अनेक सिद्धांतानी (१२४१) तेतुलेही–तेवढेही सर्व. पूर्वापार–पूर्वापार संगतीने. जे–जै. (१२४२) आवांका=तात्पर्य. महा सिद्धांताच्या प्रकार कक्षेमध्यें दुसऱ्या अनेक सिद्धांताच्या कक्षा मिळवून अथवा मिडवून आरंभ म्हणजे सुरवात, प्रस्तावना, तयारी, क्रिया, उद्योग, प्रयत्न, मुख्य रहस्य ते सांगून संपवितो संपवितसे–संपवीत असे. **गीतेतील रहस्य ते म्हणजे अगोदर अज्ञान अविद्या नाहींशीं करून मोक्षप्राप्ती रूप फळ देणारें आत्मज्ञान हेच एकटे साधन आहे. गीता ही अध्यात्मज्ञान प्रधान आहे.** (१२४३) मोक्षप्रदान (दान करजें, लग्न करणें, देणगी)– मोक्षापादन=मोक्ष संपादन, मोक्ष घडविणें, का अमुक स्थितीला नेणें. (१२४४) येतुलेचि–इतुलेचि. निरोपिले–निरूपिले. दोही–दो संक्षेपाने पुन्हः सांगतो. अनुवादावें=पुनः सांगावें=म्हणणें संमती देणें खुलासा अथवा जोर देण्यास्तव पुन्हां सांगणें, स्पष्ट बोलण्यांत अनुकरण करणें (१२४५) म्हणोनि=म्हणौनि उपायही–उपेयही=उपायानें साध्य होणारें प्राप्तव्य वस्तु. हती–हाती. जालया उपाय स्थिति=उपाय साध्य वस्तु हाती आल्यावरही उपायानें प्राप्त झाली असतां पुढती=पुनः देवो–देव. (१२४६)

तेथें ब्रह्म आत्मा ईश अशा ह्या बोलांचा अभिप्राय [(प्रेम गोडी) ती मांडली मांडणीची केली कां] मोडला होतो; म्हणून येथें न बोलणें असें जें कांहीं त्यासही पण (फुरसत पात्र, स्थान,) जेथें आकाश अवकाश दिलेला नाहीं. न बोलणें जें कां त्यास येथें मुळींच कांहीं मोकळी जागा का अवकाश दिलेला नाहीं. (१२१४)

बोलणें बोलावें तें तोंड भरून बोलावें, जाणणें (ज्ञान) नेणणें (अज्ञान) नेणून तें जाणावें असें आहे. बोलण्यांस येत नाहीं. (बोलणेहिन असे) जें तें बोलावें कसें तर ते तोंड भरून बोलावें–तें बोलावें–तें बोलणें उभारास आणून (सबराभरित असें करून) बोलावें व आतां असें तें बोलिलेलें तें जाणावें कसें तर जाणीव का शहाणपणाची घमेंड टाकून (नेणिव म्हणजे अज्ञान) नेणून तें जाणावें असें आहे. (१२१५)

जाणतेपण जागेपणानें जाणावें, ज्ञान तें ज्ञानरूप होऊन समजावें; बोधच तेथें बोधानें, बुझावा, समजावा, आनंद, आनंदानें घेतला जावा, नुसतें एका सुखाचें होऊन सुख भोगावें. (१२१६)

बरकत का लाभ जो त्यासच मुळीं हा लाभ जोडला होतो–मिळणीचा होतो–(प्रकाशानें, प्रभेनें, कांतीनें) प्रकाशानें प्रभा अथवा कांति अलिंगीली होते. अहो सूर्यकांता जी प्रभा तिनें तर प्रभाच ती आलिंगीली होते. विस्मय तो उभा सर्व एका नवलामध्येंच कीं खोलीचा होऊन आहे, बुडाला आहे (१२१७)

मनोनिग्रह, शांति अथवा अंतःकरणाची स्थीरता म्हणजे साम, मापाचा झाला, विश्रांतीस आला, *विश्राम तो विश्रांतीस आला आहे. अनुभव तो अनुभूतिपणें म्हणजे अनुभवाचा होऊन* (संकोचित झाला, वेडावला, गोंधळला भ्रमला कीं.) एक मानाचा झाला. (१२१८)

बहुत काय पण असें निखळ शुद्ध असें मीपण रूप फळ त्यास मिळतें, कशानें तर ती वेल्हाळा सुंदर अशीं कर्मयोगाची (क्रमयोगाची पद्धती, पर्यायाची) वेली सेवन केल्यानें. (१२१९)

कर्मयोगास अथवा कर्मयोगियास, हे कीरीटी, मी चैतन्य ज्ञानरूपी रत्न माझिया मोबदल्यानें का अदलाबदलीनें, चक्रवर्तीच्या मुगुटीचें होय. (१२२०)

तें असेंच होय कीं क्रमयोग का कर्मयोगरूपी देवळाचा कळस हा जो मोक्षाचा असा त्याहीवरीलच्या अवकाशाचा तो विस्तारच कां प्रसरच झाला जसा कां. (१२२१)

किंवा संसाररूपी अरण्यामध्यें कर्मयोगाची म्हणा किंवा क्रमयोगाची ती वाट बरवी सुंदर अशीं जोडल्यानें तीच कीं माझ्याशीं ऐक्य माझें एकपण जोडलें जें तेंच कीं अहो ती वाटच उत्तम अशीं. माझे एकत्व गावामध्यें (पैठी) बुद्धि स्थिर झालेली अशी आहे का होते. (१२२२)

असें हें असो ! पण कर्मयोग का क्रमयोगरूपी ओघानें भक्ति व ज्ञानरूपी गंगा संगमानें निजानंद का स्वानंदरूपी समुद्र जो मी त्यासच गांठलें माझ्याशीं मिळणी केली. (१२२३)

एथपर्यंत असा हा, हे मर्मज्ञा ! कर्मयोगाचे ठायीं (क्रमयोगाचे ठाईचा) असा महिमा आहे म्हणूनच कीं तो वेगवेगळ्या अशा बुद्धि ज्ञानानें आपआपल्या प्रकृतिप्रमाणेंच कीं, ती बुद्धि कल्पना रंगविली झाल्यानें तेथें बुद्धि वेगळे वेगळे असेंच कीं तुम्हीं—त्या तुम्हांला आम्ही भगवान ज्ञानचक्रवर्ती ते सांगत आहेत. (१२२४)

पण देशकाळ, पदार्थानें मला आपलासा करावा का साधून मला घ्यावें, मला पावावें, मला साधावा असें नसून मी तर चिरकाळ आईते असा, सर्वाचें जें कांही सर्व कांहीं तें सर्वस्व होय. (१२२५)

म्हणून माझ्याठायीं याचा वेग, माझ्या लाभाकरितां जे कांहीं शिणावें लागणारें त्याचा वेग मुळींच परिणाम करीत नाहीं मी ह्या कर्मयोगानें का क्रमयोगाच्या उपायानें लाभतो हें केव्हां खरेंच होय. (१२२६)

अहो ! एक शिष्य, एक गुरु असा हा कार्यरूप व्यवसाय अभ्यासाचा झाला आहे जो, तो माझ्या प्राप्तीचा भेद, सादृश्य प्रकार, तो जाणण्यास यावा म्हणूनच. (१२२७)

हे पार्था ! कीरीटी ! ! पृथ्वीच्या पोटी अथवा पाठीवर निधान रूप रत्नें का ठेवा सिद्धि, त्या कशा म्हणशील तर जसा का काष्ठामध्यें वन्हि असतो अथवा कासेंत दूध तें जसें. पृथ्वीवर रत्नें कां पृथ्वीच्या पोटी संपत्ति—काष्टाच्या गर्भात अग्नि, गाईच्या कांसेत दूध हें सिद्धच असतें. (१२२८)

जरी लाभणारें का सिद्ध असें तें असतें तरी तें मिळणारें व्हावें कां लाभाचें असें व्हावें असे उपाय करावेत व मग सिद्ध का लाभच एक झाला तसा येथें मी उपायामध्येंच आहे. उपायानीं सांपडणारा आहे. (१२२९)

उपाय हा फळप्राप्तीपर्यंत करावाच करावा असें देव कां सांगत आहेत (प्रस्तावित, आरंभारानें सांगत आहेत) असें विचारशील तर येथीलचा तो अभिप्राय प्रियपण तें कसें तें सांगतो. (१२३०)

अहो गीताशास्त्राच्या अर्थाचें चांगुलपण कां उत्तमत्व ते मोक्षप्राप्ती करविणारें, प्राप्तीच्या उपायाचे सर्व असें आहे परंतु शास्त्रानें सांगितलेले उपाय ते कांहीं अनुभवसिद्ध, (आत्म्यासंबंधी त्वरित दाखला देणारे, व्यक्ति, प्रकृति मापण्याचें साधन, कारण, प्रमाण सिद्ध) नव्हत. (१२३१)

वारा फार झालें तर आभाळ नाहींसें करील पण त्यास कांहीं सूर्य घडविता येणार नाहीं, हाताला शेवाळे बाजूस करतां येईल पण तो हात कांहीं पाणी (तोय) करणारा नव्हे. (१२३२)

त्याप्रमाणें आत्मदर्शनाच्या आड येणारा का आत्मदर्शनास प्रतिबंध करणारा असा जो अविद्या अज्ञानाचा मळ का मलीनपणा तेवढा मात्र शास्त्र नाहिंसा करील, पण मी निर्मळ असा जो तो तर स्वयं-प्रकाशाचा असा आपण स्वतःच प्रकाशमान होणारा कीं. (१२३३)

म्हणून सर्वेही शास्त्रें जीं आहेत तीं अविद्या म्हणजे अज्ञान नाहींशीं करणारी भांडीच कीं पात्रेंच कीं होत, पण त्यांच्यानें स्वतःसिद्धपणें आत्मज्ञनाचा बोध देणारीं अशी स्वतंत्र नव्हत. (१२३४)

अहो ! ह्या परमार्थसंबंधीं का ह्या स्वभावासंबंधीं सत्यत्वानें विचारलें तर हीं शास्त्रें कांहीं माहिती का विचारपुसी देणारी नव्हत पण तो विचार अथवा ती स्वभावाची माहिती ज्या आपल्या ठावाची सीमेची अशी होऊन येत आहे ती ही गीता जाण. (१२३५)

सूर्यास विभूषित करणारी पूर्व जी दिशा तेथें सूर्य उगवला कीं पूर्व दिशेनें अवघ्या सर्व दिशा सतेज होतात, त्याप्रमाणें ही गीता सर्व शक्तिमान ईश्वराची लक्ष्मी का स्वामिनी आहे, म्हणूनच कीं सर्व शास्त्रें इच्याचमुळें समर्थ होतात. सनाथ होतात, कृतार्थ होतात, असें हें भगवद्गुणवर्णनपर काव्य गाईलेलें असें सर्व श्रेष्ठ, असें सर्व शास्त्राची ईश्वरी म्हणजे स्वामिनी आहे. (१२३६)

असें हें असो पण ह्या शास्त्राच्या ईश्वरानें स्वाधीनतेच्या सर्व शक्तिमानपणानें, मागें पुष्कळशा विस्तारानें उपाय तो सांगितला आहे, जसा कां सहज हातानेंच कीं आत्मा तो घेतां येईल असा. (१२३७)

पण एकदांच श्रवण केल्यानें अथवा पहिल्याच प्रसंगाचें ऐकणें जें होतें त्यानें हे अर्जुना एकवार ऐकण्यानें हे कदाचितच कळणारे असें आहे नाहीं आणि म्हणूनच कीं असा तो सदयतेचा भाव अभिप्राय पुढें घेऊन श्रीहरीनी सागणें केलें कीं. (१२३८)

तेथीलचें तात्पर्य कां सार एक वेळ तरी शिष्य अर्जुनाच्याठायीं अढळ व्हावें म्हणून आतां सकळ कांहीं संक्षेपरूपानें छंद लिंग मुद्रेमध्यें आणून सांगत आहेत. सकळ तो विषय कमलकंद, हाडाचे खरेपण, सबंधच्या सबंध संपूर्णपणें ह्या आत्ममुद्रेविषयीं तें सांगण्याचें करीत आहे. येथें मुकुल मुद्रा म्हणजे आत्मा, देह का किंचित् उमललेली जी फुलाची कळी का त्यासंबंधी मुद्रा ती स्तब्धता, चिन्ह, नाणें, मोहरा खुण (बोटाची निरनिराळी रचना, 'धेनु, शंख, चक्र' इत्यादि अथवा वैष्णवाचे शंख, चक्रादि छाप) जी ती संबंधी सांगण्याचें करीत आहे, (तसेंच अध्याय ६ मधील [ मुद्रेची प्रौढि ऐसी । तेचि सांगिजेल परियेसी । तरी ऊरू या जघनासी । जोडूनि घाली ॥ १९२ ॥ बाहिर युक्तीची मुद्रा पडे । तव आंत आतु सुख वाढे । तेथ सहज तो योगु घडे । नाभ्यासिता ॥ ३५३ ॥ (१२३९)

आणि सहज प्रसंगानेच कीं गीतेचा ठावच आपल्या ठावाचा होऊन येत आहे आणि म्हणूनच आरंभापासून तो शेवटपर्यंतचें त्यास एकार्थत्वच आणून ते दाखवीत आहे. (१२४०)

असें तें एकार्थतेचे बोलणें या ग्रंथाच्या आरम व अंत यांच्या मध्यभागामध्यें अधिकार प्रसंगानें– अधिकार योग्यतेकरितां ते निरूपण अनेक सिद्धातांनीं सांगण्याचें केलें आहे. (१२४१)

तेवढेंही सर्व सिद्धांत पूर्वापार संगतीनें प्रस्तुत ह्या शास्त्रामध्यें ती पूर्वापर संगत नच जाणून जे कोणी मानतात. (१२४२)

त्यांच्यासाठींही, तात्पर्य ते महासिद्धांताच्या प्रकार कक्षेमध्यें दुसऱ्या अनेक सिद्धांताच्या कक्षा मिळवून अथवा त्या कक्षाशीं भिडवून आरंभ म्हणजे सुरवात, प्रस्तावना, तयारी क्रिया, उद्योग प्रयत्न तो अथवा मुख्य रहस्य तें सांगून संपवीत आहे. (१२४३)

अशी ही गीता अविद्येचा कां अज्ञानाचा नाश करणारें स्थळ आहे. आणि म्हणूनच कीं मोक्ष

घडविणारें दान करणारे असेंच एक फळ हातीं येणारें अशा ह्या दोहोंनीं साध्य तें केवळ ज्ञान हेंच साधन म्हटलें. (१२४४)

असें हें इतके अनेक प्रकारानी ग्रंथ विस्तारामध्यें, निरूपिलें आहे तें आतां दोन अक्षरांनीं म्हणजे संक्षेपाने पुन्हां अनुवादावें, सांगण्याचें करावे असें होत आहे स्पष्टपणें बोलण्याचें अनुकरणाचे करणें होत आहे. (१२४५)

अहो प्राप्तव्य वस्तु उपाय स्थितीनें उपायाच्या हातीची झाली व्हावी. म्हणूनच कीं देवांनीं तो पुन्हां तेथीलचा अभिप्राय भाव सांगण्याचें मनावर घेतलें आहे. (१२४६)

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥**

अपि=जरी, देखील, तथापि सर्व कर्माणि कुर्वाणः सदा=सर्व कर्मे निरंतर नेहमी कुर्वाणः म्हणजे करणारा. मद्व्यपाश्रयः=माझें अवलंबन का आश्रय केल्यानें, माझ्या मार्गप्रतीक्षेनें अवाप्नोति मत्प्रसादात्= माझ्या (कल्याणप्रद असा मी त्यावर स्पष्टार्थतेवर, स्वच्छतेवर) प्रसन्नतेनें, प्रसादानें, पद, पदवी, प्राप्तीचा होतो. अव्ययम् शाश्वतं पदम्=अक्षय्य नाशरहित असें, नित्य कायमचें स्थान, पदवी, चरण.

अन्वय :—अपि। सर्वाणि कर्माणि। सदा कुर्वाणः। मद्व्यपाश्रयः। अव्ययम्। शाश्वतम्। पदम्। मत् प्रसादात्। अवाप्नोति ॥ ५६ ॥

*अर्थ :—(१) नेहमीची सर्व कर्मे, माझ्या मार्गप्रतीक्षतेनें परायणतेनें करणारा असा असूनही माझ्या* प्रसादानें अव्यय असें शाश्वत पद निरंतर पावतो.

(२) सर्व कर्म, सर्व कामें, निरंतर करीत असला तरी हरकत नाहीं पण जर कां तो माझ्या परायण-तेनें अथवा मार्गप्रतीक्षतेनें असला तरच माझ्या कल्याणप्रदतेवरच मुळीं माझ्या प्रसन्नतेनें का प्रसादानें तो अक्षय असें नाशरहित व नित्य असें कायमचें पद स्थान पदवी पावणारा होतो.

(३) मत् परायणतेनें सर्व कर्मे सदा करणारा तथापि तो माझ्या प्रसादानें अव्यय असें शाश्वत पद पावतो. (श्लोक ५६ वा ओव्या १२४७–१२६१)

**मग म्हणे गा सुभटा। तो कर्मयोगिया निष्ठा।**
**मी होऊनि हो पैठा। माझां रूपी ॥ १२४७ ॥**
**स्वकर्माच्या चोखाळी। मज पुजा करूनि भलि।**
**तेणें प्रसादे आकळी। ज्ञान निष्ठेते ॥ १२४८ ॥**
**ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे। तेथ भक्ति माझी उल्हासे।**
**तया मजसी (भजन) समरसे। सुखिया होय ॥ १२४९ ॥**
**आणि विश्व प्रकाशितया। आत्मया मज आपुलया।**
**अनुसरे जो करूनिया। सर्वत्रता हे ॥ १२५० ॥**
**सांडुनि आपुला अडळ। लवण आश्राये जळ।**
**कां हिंडोनि राहे निश्चळ। वायो व्योमी ॥ १२५१ ॥**
**तैसा बुद्धि वाचा काये। जो माते आ ाउनि ठाये।**
**तो निषिद्धेहि विपाये। कर्मे करूं ॥ १२५२ ॥**
**परी गंगेच्या संबंधीं। बिदी आणि महानदी।**
**येक तेवी माझ्या बोधी। शुभाशुभासी ॥ १२५३ ॥**

कां बावने आणि धुरे । हा निवाडु तंवचि सरे ।
जव न घेपती वैश्वानरे । कवळुनि दोन्ही ॥ १२५४ ॥
नाना पांचिके आणि सोळे । हे सोनया तंवचि आहळे ।
जंव परिसु आंगमेळे । येकवटिना ॥ १२५५ ॥
तैसे शुभाशुभ असे । हे तंवचि वरि आभासे ।
जव येक न प्रकाशे । सर्वत्र मी ॥ १२५६ ॥
अगा रात्री आणि देवो । हे तवचि द्वैत भावो ।
जव न रिघे गांवो । गभस्तीचा ॥ १२५७ ॥
म्हणौनि माझिया भेटी । तयाची सर्व कर्मे कीरीटी ।
जाउनि बैसे तो पाठि । सायुज्याच्या ॥ १२५८ ॥
देश काळे स्वभावे । वेचु जया न संभवे ।
ते पद माझे पावे । अविनाश तो ॥ १२५९ ॥
किंबहुना पांडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता ।
लाहे तेणें न पविजता । लाभु कवणु असे ॥ १२६० ॥
या कारणें गा तु या । सर्व कर्मा आपुल्या ।
माझां स्वरूपी धनंजया । सन्यासविजे ॥ १२६१ ॥

निष्ठा = भावनेने श्रद्धेने पैठा = प्रविष्ट. ( १२४६ ) चोखालि–चोखौलि. लाखौलि = सुंदर अशा उत्तम पुष्पानीं (१२४८) हातवसे = हस्तगत होते. तया–तिया = भक्तीनें मजसी ऐक्य भोगून ऐक्य पावतो. (१२४९) आत्मया मज–मज आत्मया. सर्वत्रता = सर्व भावे करून पांचही कोशात (१२५०) आश्रये–आश्रयी. वायो–वायु. आडळ = प्रतिबंध. व्योमी = आकाशांत. (१२५१) बुद्धिवाचा काये = कायावाचामनेकरून. आश्राउनि–आश्रउनि. विपाये = क्वचित् (१२५२) बिदी = ओहोळ, गटारातले घाण पाणी. बोधि = ज्ञाता, शहाणा. (१२५३) बावने = उत्तम मैलागिरी (मलय पर्वतावरील) चंदन धुरे = सामान्य लाकूड फांटा, काष्ट. (१२५४) पांचिके = हीन मिश्रित सुवर्ण हिणकस सोने. सोळे = सोळा नंबरचे. आहळे–आळे = आळ, अपवाद. ( १२५५) असे–ऐसे. (१२५६) देवो–दिवो = दिवस. रिघे–रिगिजे. (१२५७) सायुज्याच्या पाठी = ब्रह्मस्वरूपाच्या पदावर स्वानंद साम्राज्याच्या तख्तावर, सायुज्यपदावर. आभासे = वाटते, भासते. (१२५८) देश–देशे वेंच = नाश. (१२५९) न पविजता = न पावण्या जोगा. आत्मलाभ झाल्यावर मग अप्राप्य असा दुसरा कोणता लाभ आहे ? (१२६०) तु या–तुवा इया. सन्यासुविजे–सन्यासु (त्याग) कीजे. = चौथ्या अध्यायातील कर्म ब्रह्मार्पण योग. ( १२६१)

**माझ्या मत्परायणतेनें सर्व कर्मे करणारा झाल्यानें तूं माझा प्रसाद पावून शाश्वत असें अव्यय पद पावशील, द्वैतभाव नाहींसा होऊन सायुज्यपद पावशील.**

( ओव्या १२४७–१२६१ )

यावर श्रीभगवान म्हणूं लागले कीं, हे वीरश्रेष्ठा ! तो कर्मयोगिया–(कर्मयोगामध्येंच ज्याची भावना का श्रद्धा स्थिर झालेली आहे असा) एकनिष्ठेचा तो मी होऊन माझ्यारूपाचेठायीं–माझ्यारूपामध्येंच कीं, स्थिर होतो–माझ्याच रूपाचा होतो. (१२४७)

स्वकर्माच्या उत्तम अशा सुंदर फुलांनीं मजला पूजाच एक बांधतो. माझे ठायींची भली उत्तम अशी आदरसत्कार गौरवाची ती पूज्यता भली महत्वाची अशी करून, त्या प्रसन्नतेच्यायोगें कल्याणप्रदच की ती ज्ञाननिष्ठा ती आकळितो आपलीशी करतो. [भक्ती आकळिला । दयाघन भक्ति आकळिला !] (१२४८)

अशी ती ज्ञाननिष्ठा जेव्हां कां भावनेनें श्रद्धेची होऊन हस्तगत होते, जेथे तेथें, माझी भक्ति, उपासना आदर, आकृति, रचना, उपचार, आवड, आनंदास येते, उल्हासते, प्रकाशाची होते व तिजमुळेंच कीं, मजसी ऐक्य पावून सुखी होतो. (असेंही होतें कीं) भजनामध्यें समरस कां तल्लीन होऊन सुखिया होतो. (१२४९)

व हें सर्व विश्व प्रकाशित आहे असा आत्मा मी (अशा त्या मज आत्म्यास) त्या मजला जेथें आपले-पणाच एक त्या आपलेपणासच कीं तो अनुसरतो, कसा तर सर्वभावें करून पांचही कोशात कीं तो, सर्व जागी सर्व काळ, आहेच आहे असा मज करून मूळ स्वभाव पद्धतीस अनुसरण्याचें करतो. (१२५०)

आपल्याच आड येणारी ती बाधा (बाधा=विघ्न, अटकाव, प्रतिबंध) नाहींशी करून मीठ तें पाण्यासच मुळीं आश्रयण्याचें करतें (म्हणजे गृहाचे अथवा आधाराचें करते) किंवा असेंही का म्हणाना कीं वायू हिंडहिंडून (व्योमामध्येंच म्हणजे आकाशाचे ठायींच का) आकाशरूपी जलाचे ठायीं निश्चळ स्थिर होतो, राहातो. (१२५१)

त्याप्रमाणें कायावाचामनें करून वाचा ही तसेंच काया ही (अहो काया हीच कीं काशी म्हटली) ती बुद्धि, ज्ञान, विचार, अंतःकरणशक्तीची करून जो मला गृहाचें का आधाराचें करून असतो असा जो तो कदाचित्-क्वचित् निषिद्ध (वर्ज्य केलेली का दूषित अशी) जरी कर्मे करू सरला क्वचित तरी— (१२५२)

तेथें उपमा ती कशी नटली कीं, गंगेच्या संबंधानें, संपर्कानें का संयोगानें विदी म्हणजे ओहोळ (विद् =ज्ञाता, आत्मा.) व समुद्रास मिळालेली जी महानदी म्हटलेली ती एकच होत त्याप्रमाणें शहाणा जो का ज्ञानी जो त्यास शुभ (म्हणजे शोभणें तें मंगल अथवा सुख) अथवा अशुभ (अमंगल, अकल्याण) तें त्यास एकच होय. (दिवसाचे कां रात्रीचे-शुभ का अशुभ ते पर्यायानें चित्त कां आकाश म्हटलेलें: पहा अध्याय १८ वा ओवी ३०७) (१२५३)

अहो मलय पर्वतावरील बावन म्हणजे उत्तम असा चंदन आहे का सामान्य लाकूड फाटा आहे या संबंधीचा निवाडा तेव्हांच होतो जेव्हां का वैश्वानर अग्निनें, दोन्हीही कवळून घेतली जात नाहींत. (१२५४)

किंवा हिणकस का उत्तम सोळा नंबरचें सोनें या दोहो तऱ्हाचे (सोन्यास) सुवर्णास तो पर्यंतच कीं आहळणें देणारे का आळ अपवादाचे करणारे होतें जोपर्यंत परिसानें आपल्या अंगमेळानें तें सर्व एकवटून सर्व सुवर्णाचें असेंच केलें होत नाहीं. (१२५५)

तसें शुभ का अशुभ असें म्हणणें तोपर्यंतच कीं आभासतें वाटतें, भासतें, जोपर्यंत एकच मी सर्वत्र सर्व जागी सर्व काळी ब्रह्म ते नच प्रकाशतें जोपर्यंत कीं! (१२५६)

हे अर्जुना! रात्री का दिवसा, रात्र किंवा दिवस (दिव देवो का अज्ञान) हे तोपर्यंतच कीं (द्वैत म्हणजे भिन्नपणाच्या कां) भेद बुद्धिच्या मनोविकाराचे का भावनेचें जोपर्यंत सूर्याच्या गांवी त्यांचा प्रवेश होत नाहीं. (द्वैतवादिन्=जीवात्मा व परमात्मा यास भिन्न मानणारा) (१२५७)

म्हणून माझी भेटी झाली असतां हे कीरीटी! त्याची सर्व कर्मे नाहींशीं होऊन तो सायुज्यतेच्या पीठावर स्वानंद साम्राज्याच्या सिंहासनावर बसणारा होतो व शोभतो. (१२५८)

काय देश, काय काळ, अथवा काय स्वभाव का काय देशकाळ स्वभाव ज्यांस मुळीं नाशच संभवत नाहीं. तो माझे अविनाश नित्य ब्रह्म असें पद पावतो. (१२५९)

हे पंडुसुता, बहुत काय सांगावें पण मज आत्म्याची प्रसन्नता (जीव ब्रह्म, मूल स्वभाव, मन बुद्धि, स्वतः निर्मळ, संतुष्ट का कृपाळु) स्वतःचे कृपाळुपण तेंच लाभाचें व्हावें व जर का तें नच पावलें तर मग

कसचा बरे तो लाभ म्हणावा कीं ! अहो आत्मलाभ झाल्यावर मग अप्राप्य असा दुसरा कोणता लाभ आहे ? (१२६०)

या कारणास्तव अगा हे अर्जुना ! तुवां ह्या आपल्या सर्व कर्मांना माझ्या स्वरूपीच हे धनंजया, सन्यासविजे की, माझ्या स्वरूपामध्येंच की त्यागाचे करावेंस–सोडण्याचें करावेंस माझ्या स्वरूपी दान करावेंस विसर्जन करावेंस की. (१२६१)

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥**

चेतसा = चेतस् = मन, ज्ञान, सजीवता, मयि संन्यस्य = माझ्याठायीं दान करून, विसर्जून ठेवून, मत्परः = माझ्या आसक्तीनें, माझ्या गांवचा जो मोक्ष त्याकरितां. बुद्धियोगम् उपाश्रित्य = बुद्धियोगामध्यें स्थित होऊन. मच्चित्तः सततं भव = मन अंतःकरण, विचार माझे विषयींच सर्वैथैव नेहमीं करणारा हो.

अन्वय :—मत्परः । सर्व कर्माणि । चेतसा । मयि संन्यस्य । बुद्धियोगम् उपाश्रित्य । सततं मच्चित्तः भव ॥ ५७ ॥

अर्थ :—माझ्या आसक्तीनें, मन, ज्ञान, सजीवतेनें सर्व कर्मे माझेठायीं ठेवून, संन्यसवून, बुद्धियोगामध्यें स्थिर होऊन, मन अंतःकरण विचार माझे विषयींच सर्वैथैव नेहमीं करणारा हो !

(श्लोक ५७ वा ओव्या १२६२–१२६९)

**परि तोचि संन्यासु वीरा । करणियेचा झणि फरा ।**
**आत्मविवेकी धरा । चित्त वृत्ति हे ॥ १२६२ ॥**
**मग तेणे विवेक बळे । आपणपे कर्मा वेगळे ।**
**माझां स्वरूपी निर्मळे । देखिजैल ॥ १२६३ ॥**
**आणि कर्माची जन्म भोये । प्रकृति जे का आहे ।**
**ते आपणया होवोनि बौहे । देखसी दुरी ॥ १२६४ ॥**
**तेथ प्रकृति आपणया । वेगळीं नुरे धनंजया ।**
**रूपेविण का छाया । जया परि ॥ १२६५ ॥**
**ऐसेनि प्रकृति नाशु । जालया कर्म संन्यासु ।**
**निफजैल अनयासु । सकारणु ॥ १२६६ ॥**
**मग कर्मजात गेलया । मी आत्मा उरे आपणया ।**
**तेथ बुद्धि घांपे करूनिया । पतिव्रता ॥ १२६७ ॥**
**बुद्धि अनन्यपणें योगे । मजमाजी जै रिगे ।**
**तैं चित्तचेत्य त्यागे । मातेचि भजे ॥ १२६८ ॥**
**ऐसे चेत जात सांडिले । चित्त माझ्याठायी जडले ।**
**ठाके तैसे वहिले । सर्वदा करी ॥ १२६९ ॥**

करणे याचा झणि करा = स्वधर्म कर्माचा त्याग करूं नको. धरा = ठेवा. (१२६२) देखिजेल–देखिजेल सर्व. (१२६३) जन्मभोये–जन्मभूमि. आपणया होवोनि–आपणियाहुनि = स्व स्वरूपाहून आपल्याहून. बौहे–बहुवे (बहुधाकार = जग) (१२६४) आपणया वेगळीं = आत्मस्वरूपाहून वेगळीं अशीं. (१२६५) सकारण = समूळ कारणासहित. (१२६६) कर्मजात = सर्व कर्मसमुदाय. घांपे = घालावी ठेवावी, घातले जाते. (१२६७) अनन्य, द्वैतरहित, एकनिष्ठ. चैत्यत्यागे = विषयत्यागे. जे विषय चिंतन करणारे त्याचा

त्याग केल्यानें, चित्ताने जें चंचलत्वादि धर्म गुण त्या त्यागानें (१२६८) चेतजात–चैत्यजाते=विषयजात. वहिले=(तत्पर) सत्वर. (१२६९)

**म्हणून सर्व कर्मे मला अर्पण कर, कर्म संन्यास कर तो कसा तर कर्मे करतांना चित्तवृत्ति आत्मविचाराकडे लाव म्हणजे त्या विचाराच्या बळानें तूं स्वतःला सर्व कर्माहून निराळा असा माझ्या निर्मळ स्वरूपांत देखशील आणि त्यायोगें जन्मभूमी कर्माची जी प्रकृती ती आपणाहून फार दूर आहे असे तुला दिसून येईल. मग प्रकृती तुझ्याहून वेगळी उरणार नाहीं. अशा तऱ्हेनें प्रकृतीचा निरास झाला म्हणजे कर्मत्याग घडलाच समज. कर्म नाहींसे झाल्यावर मी आत्मा तेवढा उरेल बुद्धि मजमध्यें समरले राहिल्यानें चित्तही माझ्या ठिकाणीं राहील.**

पण हे वीरा! तोच तो ठेवा, त्याग काम्य कर्मत्याग (रूपी ठेव) तेथें (इंद्रियाचें लेखन लिहिणें करू नये.) स्वधर्म कर्माचा त्याग करू नये व चित्तवृत्ति ही आत्मविवेकाचेठायीं आत्मानात्म भेदरूपी एकांतानें सारासार विचारानें ठेवावी. (१२६२)

मग त्या विवेकाच्या बळानेंच कीं आपणा संपूर्ण अशा स्वताःला, कर्माहून निराळे, असें माझ्या निर्मळ स्वरूपामध्यें स्वतःस देखशील. (१२६३)

तेथें कर्माची जन्मभूमी यज्ञाग्नि, जमिन, स्थूल, आकृतिचा पाया–जी प्रकृति आहे ती तर आपण होऊनच कीं, बहुवी होऊन दूर झालेली अशींच पाहाशील, देखता, पाहाता होशील. (१२६४)

आतां येथें अथवा तेव्हां तेथें प्रकृति जी आहे ती हे धनंजया! आत्मस्वरूपाहून वेगळीं अशी उरतच नाहीं. जशी का छाया ती रूपावांचून निराळीच एक असणारी असें नाहीं. (रूप तें डोळसपणाचें असेंच केव्हांही असणारा डोळसपण नाहीं तेथें रूप नाहीं. व रूप नाहीं तेथें बुद्धिचे सडोळसपण नाहीं.) (१२६५)

याप्रमाणें प्रकृतीचा ध्वंस झाल्यानें प्रकृति अदृश्य नच देखणी दिसणारी कां नच सुंदर अशीं झाल्यानें (कां दूर होण्यानें पळून गेल्यानें) (अंधार जसा सूर्य उगवल्यावर पळून जातो म्हटले तसें.) आत्मकारण अनायासे करूनच मूळ कारणासहित कीं, काम्य कर्म त्याग उपजेल, निपजेल, उगवेल, जन्म घेईल व वध होण्याचें थांबून समर्पण येईल. (१२६६)

तेव्हां मग कर्मजात म्हणजे सर्व कर्मसमुदाय नाहींसा झाल्यावर, बाजूस झाल्यावर मी आत्मा आपण स्वतः आपलेपणानें उरतो जेव्हां का तेव्हां तर अहो बुद्धि ती पतिव्रताच कीं एक अशीं करून (ठेविली जाते घातली होते–ठेवावी कीं), घालावी कीं. (१२६७)

मग जेव्हां कां बुद्धि–(विवेक, विचार, मति, जाणणें, ज्ञानशक्ति, प्रकृति, हेतु, उपाय–) निश्चयरूप अंतःकरणवृत्ति, अनन्यपणानें, एकनिष्ठपणानें योगाची होऊन एक जीवात्मा परमात्म्याचे ऐक्य जोडणें स्पर्श एकाग्रता निष्ठा–योग तोच तिनें अनन्य असा करून जेव्हां मजमध्यें प्रवेशते, मीच होते तेव्हां चित्त हें चैत्य त्यागें म्हणजे विषय त्यागानें मजलाच कीं उपासतें, (भजतें, अनुसरतें, अवलंबतें, स्वीकारतें, संभोगाचें करतें, मजवरच प्रेम करतें, माझीच सेवा, पूजा करतें. मजला कृपेचें करतें, मजशीं मिळतें.) (१२६८)

अशाप्रकारे विषय जात, सर्व विषय समुदाय सांडिलें बाजूस केलें तें नच घेण्याचें केल्यानें चित्त हें माझ्याच ठायीचें उभें झालें ठायी जडलें, होते आहे असें निराळे सत्वर नेहमीं करावेस [वहिले=वह=विवाह करणें, भोगणें, धारण करणें, उचलून धरणें, वाहून नेणे.] (१२६९)

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥**

मच्चित्तः = चित्त = लक्ष देणें, जाणणें, विचार, हेतु, मन, मनाची स्मृतिरूप वृत्ति, ज्ञान बुद्धि, काळीज विश्व जो, मी, त्याचे ठायीं मनाची स्मृतिरूप वृत्ति ठेवणें जे. चित्तवत् = विचारी, दयाळू. सर्व दुर्गाणी = सर्व अडचणीचा मार्ग. मत् प्रसादात् तरिष्यसि = माझ्या प्रसादानें तरून जाशील तरशील, पारंगत होशील, मुक्त होशील, पैल नेला जाशील. अथ चेत् = ( अथ = आतां येथून ( ग्रंथारंभी ) जर, तर, पूर्णपणें, आणि किंवा–चेत् = तथापि, जर, ) आतां येथून जर. न श्रोष्यसि = न ऐकशील तर, न शिकशील तर, नच आज्ञा पाळशील ( श्रु = शिकणें, आज्ञा पाळणें, ऐकणें, सेवा शुश्रुषा करणें ) अनुश्रु = परंपरेने ऐकणें. आश्रु = वचन देणें, ऐकवणें, सांगणें, आकर्षून घेणे. प्रतिश्रु = वचन देणें. विश्रु = प्रसिद्ध करणें. संश्रु = अंगिकारणें, वचन देणें. अहंकारात् = अहंकार, अहंकृति = मीपणा, अविद्येचा प्रकार ( वे. ) अव्यक्त तत्त्व, ( वे. ) अहंतत्वापासून भूतें होतात, गर्व, विनंक्ष्यसि = ( नश् = ) अदृश्य होणें, पळून जाणें, नाश पावणें.

अन्वय :—मत् चित्तः । मत् प्रसादात् । सर्व दुर्गाणि । तरिष्यसि । अथ चेत् । न श्रोष्यसि अहंकारात् । विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥

अर्थ :—विश्व जो मी त्याचे ठायीं मनाची स्मृतिरूप वृत्ति ठेवणें. लक्ष देण्यानें सर्व अडचणीच्या मार्गांतून तूं माझ्या प्रसादाने–सादप्रदतेनें तरून जाशीलः पण आतां येथून जर का मीपणाच्या, अविद्येच्या प्रकारानें न ऐकशील, न शिकशील, न आज्ञा पाळशील नच सेवा, शुश्रुषा करशील तर नाहींसा होशील, (ध्वंस पावशील) जसा का सूर्य उगवल्यावर, अंधःकार पळून जातो, नाहींसा होतो तसा अदृश्य होशील अविद्येंत फसल्यामुळें नाश पावशील. (श्लोक ५८ वा ओव्या १२७०–१२७४)

**मग अभिन्ना या सेवा । चित्त मियाची भरेल जेव्हां ।**
**माझा प्रसादु जाण तेव्हां । संपूर्ण जाला ॥ १२७० ॥**
**तेथ सकळ दुःख धामे । भुंजीजाति जये मृत्युजन्मे ।**
**तिये दुर्गमेची सुगमे । होती तुज ॥ १२७१ ॥**
**सूर्याचेनि सावाये । डोळा सावाइला होये ।**
**तै अंधाराचा आहे । पाडु तया ॥ १२७२ ॥**
**तैसा माझेनि प्रसादे । जिवकण जया उमर्दे ।**
**तो संसाराचेनि बाधे । बागुले केवि ॥ १२७३ ॥**
**म्हणौनि धनंजया । तु संसार दुर्गती यया ।**
**तरसील माझेया । प्रसादास्तव ॥ १२७४ ॥**

मच्चित्तः = अनन्यचेता–अक्षरयोग–अ. आठवा या–इया. जेव्हां–जेधवा. जाला–जाहला. (१२७०) दुखधामे–दुःखधामे = दुःखाची स्थानें, भुंजीजति = भोगिली जातात. दुर्गमेचि = अवघड ठिकाण, जाण्यास कठिण, दुर्बोध डोंगर. सु = अनायासे, योग्य रीतीनें गम = पावणें. सुगम = सोपे, बाळबोध. ( १२७१ ) सावाये = साह्यानें. सावाइला = साह्यभूत होतो, सांभाळिला जातो. पाडु = विशाद, योग्यता. जया–जयाचा. जीवकण जया उमर्दे–जीवकण जयाचा उपमर्दे = जीवांश नष्ट होतो, ज्याचा जीवकण नासतो. [उम् = प्रश्न, सांत्वन संमति, स्वीकार, क्रोध उम = शहर, बंदरावरील धक्का अर्दन, अर्दना = पीडा, हिंसा, याचना गमन. उपमर्द = घर्षण, नाश, अपमान, आरोप, खंडन, घुसळणें, शेवट नाश उपमर्दक = नाशक. जीवकण = (जीव = जिवंत प्राण, लिंग शरीर, जीवित, आयुष्य, कर्ण, पुष्प, व्यवसाय, पृथ्वी, बृहस्पति, धनुष्याची दोरी खणखण शब्द, निर्वाह, साधन कण = ठिणगी, कणीस, थेंब, दाणा, कण्या, सूक्ष्म अंश, अल्पसंख्या,

हिरकणी, धान्यनेत्र–जेथून अंकूर फुटतो; कुंभारीण माशी. सुसर कण+अद=कणाद्=वैशेषिक मतप्रवर्तक. कर्णप्रिय=चिमणी. कणलाभः=पाण्याचा भोंवरा; ) जीवित लिंगशरीर, ठिणगी सूक्ष्म अंश.] बागुले केवि बाधे=बागुलास भिईल काय ? बागुलाच्या बुजगावण्यानें पीडा पावेल काय ? (१२७३) यया–इया. माझेया–माझिया. (१२७४)

**मजमध्यें लक्ष देण्यानें, माझा प्रसाद होईल व त्यायोगे तू तरुन जाशील, पण मीपणाच्या अविद्येनें न ऐकशील तर नाहींसा होशील, अदृश्य होशील.**

(ओव्या १२७०–१२७४)

मग सेवेहून कांहीं निराळें नव्हे असें चित्त मीच होऊन असेल–माझ्या प्रेमानें ते भरेल तेव्हां माझा संपूर्ण प्रसाद (कृपा प्रसन्नता) संपूर्णपणें झाला असें जाण. (१२७०)

तेथें सर्व जी कांहीं दुःखाची धामे का स्थानें ज्याच्यामुळें हे जन्ममृत्यु भोगिले जातात, अशी ती अवघड ठिकाणें जाण्यास दुर्बोध असे डोंगरच ते अशी ती तुजला सोपी बालबोधु अशी होतील. (१२७१)

सूर्याच्या साह्यानें मदतीनें जेव्हां डोळा सांभाळिला जातो, (डोळ्यास सूर्य साह्यभूत होतो) तेथें तेव्हां अंधाराची ती (प्रकार) उपमा (का पाड तो) आहे. पण अंधाराची तेथें बिशाद ती काय कां योग्य ती ती कसची ! (१२७२)

त्याप्रमाणें माझ्या प्रसादानें का माझ्याच्यानि कृपेकरून प्रसन्नतेनें जीवकण म्हणजे जीवित लिंग, शरीर, ठिणगी, सूक्ष्म अंश, सांत्वनाचा का स्वीकाराचा होतो तो संसाररूपी बागुलाच्या बुजगावण्याने, पीडा पावेल काय ? त्या बागुलास तो भिणार नाहीं. (१२७३)

या करितां हे धनंजया ! तूं ह्या संसाररूप दुर्गतीस (संकटास कां वाईट गतीस) माझ्या प्रसादास्तव तरशील कीं, माझ्या कृपाप्रसाद प्रशंसा का स्तुतिस्तव संसाराच्या पैलतीरास जाशील, संसार जिंकशील, संसारातून मुक्त होशील. (१२७४)

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥**

यत् अहंकारं आश्रित्य=अविद्येच्या प्रकारानें, मीपणाचा अवलंब करशील अविद्येच्या प्रकाराचे सर्वैथैव होण्यानें असशील. न योत्स्ये इति मन्यसे=मानत असशील कीं मी युद्ध करणार नाहीं, झुंजणार नाहीं. एषते व्यवसायः मिथ्या=देहच आत्मा मानणें असें तुझें निश्चय करणें तें मिथ्या आहे. त्वां प्रकृतिः नियोक्ष्यति=योजील तुला प्रकृतीच मुळीं ती ती प्रकृतीच मुळीं तुझी योजना करील.

अन्वय :—यत् । इति मन्यसे अहंकारं आश्रित्य योत्स्ये न । ते एष । व्यवसायः मिथ्या । त्वां प्रकृतिः नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

अर्थ :—जें कांहीं तुझें म्हणणें ह्या अहंकार म्हणजे अविद्येच्या प्रकारानें होत आहे कीं मी लढणार भिडणार का भांडणार नाहीं पण असें तें तुझें हे देह व्यवसाय चातूर्य बढाई मिथ्या जाण येथें प्रकृतीच मुळीं तुजला त्या भिडण्यास योजील कीं. (श्लोक ५९ वा ओव्या १२७५–१२८६)

**अथवा हन अहंभावे । माझे बोलणे हे आघवे ।**
**कानामनाचिये सिंवे । नेदिसी टेको ॥ १२७५ ॥**
**तरी नित्य मुक्त अव्ययो । तु आहासी ते होउनि वावो ।**
**देह संबंधाचा घावो । बाजैल अंगी ॥ १२७६ ॥**

जया देह समधा आंतु । प्रतिपदी आत्मघातु ।
भुंजता उसंतु । कहींचि नाही ॥ १२७७ ॥
येव्हडेनि दारूणें । निमणें निविण निमणे ।
पडैल जरी बोलणें । नेघसी माझे ॥ १२७८ ॥
पथ्य द्वेषिया पोषी ज्वरू । का दिप द्वेषिया अंधारू ।
विवेक द्वेषिया अहंकारू । पोसुनि तैसा ॥ १२७९ ॥
स्वदेहा नांव अर्जुनु । परदेहा नांव स्वजनु ।
संग्रामा नाम मळिनु । पापाचारू ॥ १२८० ॥
यया मति आपुलिया । तया तिन्ही नांवे या ।
ठेउनि धनंजया । न जुंझे ऐसा ॥ १२८१ ॥
जिवामाजी निष्टंकु । करिसी जो अत्यंतिकु ।
तो वांया धाडी नैसर्गिकु । स्वभावेचि तुझा ॥ १२८२ ॥
मी अर्जुन हे आत्मक । या वध करणें हे पातक ।
हे माया वांचुनि तात्विक । कांहीं आहे ? ॥ १२८३ ॥
आधी जुंझारू तुवां हो आवे । मग जुंझावया शस्त्र घेयावे ।
का न जुंझावया करावे । दिवांगण ॥ १२८४ ॥
म्हणौनि न जुंझणे । म्हणसी ते वायाणे ।
न माणु लोकपणें । लोकदृष्टी ही ॥ १२८५ ॥
तरी न जुंझणे ऐसे । निष्टंकिति जे मानसे ।
(ते) प्रकृति अनारिसे । करविलचि ॥ १२८६ ॥

शिवे-समे = हद्दीवर (१२७५) अव्ययो-अव्यय. वावो-वाय. समधाचा-संबंधाचा. (समधिगमनं = वरचढ होणे, आक्रमणें, समधिगम = पूर्णज्ञान.) घावो-घाय. वाजेल आदळेल. (१२७६) देहसमधा आंतु देहसंबंधाआतु. प्रतिपदी = पदोपदी. उसंत = विसांवा. कहीचि-काहीचि. (१२७७) दारूणे = दुःसह, निर्दय, कठिण, भयंकर, तीव्र, भयानक रस (मृग, पुष्य, ज्येष्टा व मूळ ही दारूण नक्षत्रें) निमणे निविण निमणे = तू मरणारा नसूनही तुला मृत्यू भोगावा लागेल. (१२७८) अंधारू-अंधकार. विवेक द्वेषे पोसुनि = पोषुनि (१२७९) नांव-नाम. नांव-नाम. नांव-नाम मलिनु-मलिन. (१२८०) यया इया तिन्ही-तीन. नांवे या-नामे यया. ठेऊनि-ठेऊनिया. (१२८१) निष्टंकु = निश्चय विचार. अत्यंतिक = अतिशय दृढ. धाडी-धाडील. स्वभावचि तुझा = तुझा क्षात्र स्वभाव. (१२८२) आत्मक (आत्मकीय = स्वतःचे संबंधी, स्वाधीन.)-आत्मीक = माझे आप्त, माझे कुटुंबी, आपले असें. या वध-यया वधु. तात्त्विक = खरे, तत्वसंबंधी, तत्व दृष्टीनें पाहाता. (१२८३) जुंझारू-जुंझार = लढवय्या, युद्धकर्ता दिवांगण-देवांगण = शपथ, किंवा मिथ्या कल्पना. देवांगना, देवयोषा = अप्सरा (१२८४) वायाणे = व्यर्थ (वायणें = वाहाणे, दाखविणें,) न माणु (परिमाण ?)-ना मानु लोकदृष्टीही-लोकतंत्र = सार्वजनिक कृत्य, लोकयात्रा चालविणारा (१२८५) जुंझणें-जुंझें निष्टकिसी = निर्धासचे करतोस. अनारिसे = अन्यथा. (१२८६)

**अविद्येच्या प्रकारानें अहंकारानें तुझें म्हणणें तें मी लढणार नाहीं असें, पण तुझें असे तें करामतीचें बोलणें व्यर्थ जाण. प्रकृतीच तुजला भिडण्यास योजील कीं.**
**(ओव्या १२७५–१२८६)**

**अथवा कदाचित् अहंभावानें (अहंमतिनें म्हणजे गर्वानें कां (वे०) अज्ञानानें) हें माझें अवघें सर्व**

बोलणें कानावर का मनाच्या सीमेवरहीपण टेकू देत नाहींस ऐकत नाहींस (का मनावर घेत नाहींस, मनावर नच घेशील का ऐकूनही त्याबद्दल विचार करणार नाहींस) तर— (१२७५)

तर मग नित्य मुक्त म्हणजे ब्रह्मच एक अथवा मोक्षच एक असा नाशरहित, अक्षय, विष्णू लिंग विभक्ती व वचन यामुळें ज्याला विकृति प्राप्त होत नाहीं असा शब्द) असलेला असा जो तो तूं त्या तुझे तें ब्रह्त्व अथवा मोक्षपद ते नाहींसें होऊन (व्यर्थच कीं जन्मले असें) मी देहच कीं एक असा घाव अंगी आदळेल. (१२७६)

अहो! अशा त्या देहसंबंधामध्यें क्षणोक्षणी आत्मघातच कीं एक (ये पचंति आत्मकारणात्) तसा स्वतःला हिंसक का क्रूर असाच होऊन लंपटपणाचें तेंच हिंसारूप भोगीत राहाणें का उपभोगणें तें, तेथें कांहीहीं उसंत का विसावाच मुळीं कोठेंही सांपडणार नाहीं कीं ['उसंतिल्या कर्मवाटा बहुमोठा आघात। शीघ्र यावे शीघ्र यावे न्यावे हाती धरूनी।] (१२७७)

अशा ह्या एवढ्या दुःसहतेच्या कर्मवाट्यामुळेंच कीं अहो! तूं जो मरणारा नसूनही तुला मृत्यूच एक कीं भोगावा लागेल–तुझ्या अंगी मृत्यूचाच कीं एक जोजार पडेलः जर का हे माझे म्हणणें नच ऐकशील का नच मनावर घेशील तर— (१२७८)

पथ्य का हितकर जे त्याचा द्वेष करणारा तो तर, ताप, दुःख ज्वरच कीं वाढवितो, पोसतो, तापाचा आश्रित होतो. (जेणे विठ्ठल मात्रा घ्यावी तेणे पथ्य सांभाळावी) प्रकाशणें का चेतन जें का दीप जो दिवा तेथीलची काजळी काढून तेथीलचे तेज नेहमी तेजस्वी नच करणारा असा जो तो तर ज्ञानरूपी दिव्याचा द्वेषच का शत्रुत्व करून का ईर्ष्या धरून अज्ञान अंधारच कीं पोसतो, वाढवितो, आत्मानात्मविवेक, सारासार विचार उपरति, वैराग्य, प्रपंचाविषयीं उदासीनतेचा द्वेष करणारा का शत्रुत्व धरणारा, वैर, करणारा, वैर करणाराचा वैरी होणारा शत्रूताच एक असें पाहाणारा तो, तो तर मीपणाच एक, अहंमन्यता, अभिमान, गर्व जेथें ज्ञान, प्रेम नाशच कीं अहो! तो पोसून कां वाढवून असतो तसा होशील. (१२७९)

ह्या हाडामांसाच्या केलेल्या देहासच कीं अहो स्वदेह अर्जुन कीं तेथें देहाएवढेपणामुळें प्रकृती परतंत्रतेमुळें तो पूर्वापार चालत आलेला कुलाचार, तो पापच कीं, देहानें मनुज धर्म धारण करणें जें–तो तर पापाचारच कीं, एक म्हटला होतो–पर म्हणजे इंद्रियाचे जे विषय त्यांचाच सर्वथैव केलेला प्रकृतीचा असा हा देह असें मानणें एक तेथें जे तो स्वजन म्हणजे भाऊबंद की अहो! संग्राम–लढणें, युद्ध, सोबत, (सांधा, भेट, स्पर्श संचय कीं,) मिसळलेली तेथें प्रसंगोचित असा कलहच एक भांडणच करणें अथवा मनामध्यें कपट बाळगणें असे तो तर कीं अहो पापाचारच सर्व! पातक, अधर्म, रीती, वर्तन, चाल वर्तणूक ती मलिन म्हणजे दुर्जनाची कीं, तेथें कलंकच एक का पापच ते मलिन असें मळकटतेचे. (१२८०)

अशा ह्या आपल्याच मति आपण होऊनच कीं, त्या तिहींना म्हणजे पथ्य, दीप व विवेक ह्यांना अथवा अर्जुन, स्वजन, संग्राम (संभ्रांत=आदर, आतिथ्य, गौरव, पाहुणचार) ह्यांना नावें ठेऊन–नांवे ठेवणें जे तेथें मग केव्हांहि युद्ध करणार नाहीं झुंजणार नाहींस अशाच बाण्याचा आशयाचा होऊन आहेस वीर का योद्धा युद्ध करणारा, पराक्रमी का शूर असा शौर्याचा शक्तीचा का प्रयत्नाचा नच होऊन आहेस हे केव्हांही पण हें बरें नाहीं, कारण— (१२८१)

ह्या जीवाभावाचे ठायीं जो अतिशयतेचा असा अत्यंतिकतेचा निष्टंक–म्हणजे अभिष्वंग असा पराभव शपथ, आळ, तिरस्कार भूत बाधा, आलिंगन–निश्चय विचार जो तूं करीत आहेस त्यास तुझीच मुळी जी स्वभावसिद्ध का नैसर्गिक सहज कर्म प्रकृति कीं, मुळीं तुझा हा निर्धार, निश्चय, विचार व्यर्थतेचा करून बाजूस करील, बाहेर धाडील, बाहेर धाडीत आहे कीं. (१२८२)

मी देह अर्जुन, अर्जुन नांवाचा हा देह माझा आप्त आहे, माझें कुटुंबच की आहे माझे आपलें असें आहे व आत्मकाचा ह्याचा वध करणें हें पातक आहे असें जें कांहीं तुझ्या मनानें घेतलें आहे तेथें सांग बरें की, कांहीं ह्या मोहमायेशिवाय दुसरें कांहीं तत्त्वदृष्ट्या मुख्यत्वेंकरून तथ्य आहे काय. ही मायाच एक अविद्या, ममताच एक, तू आपलीशी करीत आहेस–तेथें सात्त्विकतेचें यथार्थतेचें खरें पाहाता तत्त्व संबंधीचें असें कांहीं तरी आहे का तत्त्व (स्वरूप, प्रकृति, अवस्था, ब्रह्म, पदार्थ, चित्त) जे खरें त्यासंबंधीं कांहीं तरी विचारास घेत आहेस कां ? (१२८३)

म्हणून अगोदर तुवा शूर व्हावे हितकर असा प्रयत्न करणारा व्हावेस व मगच मुळीं झुंज करण्यांस (माया ही जिंकण्यास) शस्त्र हातीं घ्यावेस (ज्ञानरूपी हतियार घ्यावेस) असें नच करितां उगीचच्या उगीचच् कीं प्रयत्न करणें नच मनावर घेता नुसते नच झुंजण्याबाबत शपथच घेत आहेस–देवांगणच शिणवीत आहेस मिथ्या कल्पना कीं वाढवीत आहेस–चिदाकाशच मुळीं मिथ्या कल्पनांनीं शिणवीत आहेस. (१२८४)

म्हणून नच प्रयत्न करणें झुंजेसाठी–प्रयत्न करणार का नच झुंजणार मी असे जें कांहीं तूं म्हणत आहेस ते व्यर्थतेचे होय. ते तुझे म्हणणे लोकपणानें तसेंच लोकदृष्टीनेंही पण आम्ही मानीत नाहीं. (जीव हा परमाणूच एक जीवचैतन्य तरी तो लोकपणाचा असाच पाहिजे तसेंच लोक दृष्टीचाही तो पाहिजेच.) (१२८५)

तरी तुझ्या मनानें, मनावर घेतलेलें जें अगदीं निर्धाराने नच झुंजणें असें तेथें तुझी प्रकृतीच मुळीं तुजकडून अन्यथा करवील कीं. (१२८६)

**स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥**

स्वभाव = प्रकृति, सहज कर्म, (स्वभावोक्ति = यथातथ्य वर्णन,) निबद्धः = रचलेला, बांधलेला, खिळून टाकलेला. स्वेन कर्मणा = (स्वन् = शब्द करणें, सुशोभित करणें) आपण, धन, सजातीय, आत्मा, आपला ज्ञाति, कामानें, कर्मानें, प्रयत्नानें, सहकारित्वानें. न इच्छसि = मर्जी लागत नाहीं, खुषीस घेत नाहींस, इच्छित नाहींस. मोह = अज्ञान, दुःख, भ्रांति, चूक, अविद्या, मूर्च्छा. अवशः = स्वतंत्र, निभ्रांत, स्वच्छंदी स्वैर, ताब्यांत न जाणारा. परतंत्र, दुबळा, अपरिहार्य = न टाळता येणारे.

अन्वय :—कौंतेय । स्वभावजेन कर्मणा निबद्धः । कर्मणास्वेन निबद्धः । त्वम् । न इच्छसि कर्तुम् यत् । तत् । अवशः अपि । त्वम् मोहात् करिष्यसि ॥ ६० ॥

अर्थ :— हे कौंतेया ! तू आपल्या सहज प्रकृति कर्मानें रचलेला कां बांधलेला असल्यामुळें तसेंच सजातीय ज्ञाति कामानें का कर्मानें का सहकारित्वानें खिळून टाकलेला असल्यामुळें जें कांहीं करण्यास तुझी मर्जी लागत नाहीं कां तू इच्छित नाहींस ते तू जरी स्वतंत्र असा तरी मोहास वश होऊन तसेंच परतंत्र होऊन तें करशीलच. ( श्लोक ६० वा ओव्या १२८७–१२९९ )

**पै पूर्वे वाहाता पाणि । पव्हिजे पश्चिमेचिया वाहाणि ।**
**तरी आग्रहोचि उरे ते आणि । आपुल्या लेखा ॥ १२८७ ॥**
**का साळीचा कणु म्हणे । मी नुगवे साळीपणे ।**
**तरी आहे गा आन करणें । स्वभावासी ? ॥ १२८८ ॥**
**तैसा क्षात्र संस्कार सिद्धा । प्रकृति घडिलासि प्रबुद्धा ।**
**आतां नुठी म्हणसी हा धांदा । उठवीसीची ॥ १२८९ ॥**

शौर्य तेज दक्षता। एवमादिक पांडुसुता।
गुण दिधलेनि आतां। प्रकृति तुज ॥ १२९० ॥
तरी तयाचि समवाया। अनुरूप धनंजया।
न करितां उगलया। न येल असो ॥ १२९१ ॥
म्हणौनि या तिही गुणी। बांधलासि तूं कोदंडपाणि।
त्रिशुद्धि निघसी वाहाणि। क्षात्रांचिया ॥ १२९२ ॥
ना हे आपुले जन्म मुळ। न विचारितचि केवळ।
न झुंझे ऐसे अढळ। व्रत जरी घेसी ॥ १२९३ ॥
तरी बांधोनि हातपाय। जो रथी घातला होय।
तो न चले तऱ्ही जाय। दिगांता जेवी ॥ १२९४ ॥
तैसा तूं आपुलिया कडुनि। मी काहीचि न करी म्हणौनि।
ठासी परी भरंवसेनी। तेची करिसी ॥ १२९५ ॥
उत्तर वैराटचा राजा। पळता तूं का रिघालासि झुझा।
हा क्षत्रिय स्वभाव तुझा। झुंझवील ॥ १२९६ ॥
महावीर अकरा क्षोणि। तुवां येके नागविले रणांगणि।
तो स्वभावे कोदंडपाणि। झुझवील तुते ॥ १२९७ ॥
हां गा रोगु काई रोगिया। आवडे दरिद्र दरिद्रया।
परि भोगविजे बळिया। अदृष्टे जेणें ॥ १२९८ ॥
ते अदृष्ट अनारिसे। न करील ईश्वरवसे।
तो ईश्वरूही असे। हृदयीं तुझ्या ॥ १२९९ ॥

पव्हिजे=पोहावे. वाहाणी=मार्गानें, मार्गास, दिशेस. उरे ते आणी–उरे परी ते आणी. आपुलया–आपुलिया. लेखा=ओघाबरोबरच, मार्गास का दिशोबास. (१२८७) कण=दाणाकण. नुगवे=उगवणार नाहीं. स्वभावासी=प्रकृति सहज धर्म कर्म, प्रकृति धर्म. शाली:=साळ (भात) शालगोपी=साळीचे शेत, राखणारी स्त्री. शालिपिष्ट=स्फटिक. शालिभवन=साळीचे शेत. शालीहोत्र=घोडा. शालिज्ञ=अश्ववैद्य. शालीक=शिल्पशाळा, कोष्टी, करपट्टी. अन–आन. (१२८८) अता नुटी–आता नुठी. धांदा=व्यवहार, निष्कळ, बोलणें. उठवीसीचि–परि उठविजसीचि तू (१२८९) शौर्य–पै शौर्य. दिधलेनि आतां–दिधले जन्मता. एवम् आदिक=इत्यादिक. [ आदिक=आदिकार आदिकर्तृ, आदिकृत्, आदिक (क=ब्रह्मदेव=दक्ष, प्रजापति, कश्यप, वायू, सूर्य, मस्तक, सुख, पाणी.= मूळ उत्पत्ति, कर्ता.] (१२९०) तयाचि–तयाचिया. उगलया–उगलिया. अनुरूप–आनरूप. उगलिया= स्वस्थ, स्तब्ध, साहजिक. समवाया=गुण समुदायानुरूप गुणाच्या एकवट धर्माप्रमाणें. (१२९१) म्हणौनिया–म्हणोनिया. त्रिशुद्धि=खरोखर. वाहाणि=मार्गाने. क्षात्रांचिया=क्षत्रिय स्वभावाच्या. (१२९२) न चले=चालत नसला तरी. दिगांता–दिगंता (दिगंतर=आकाश, प्रदेश.) (१२९४) ठासी–ठासी=स्तब्ध राहासी. तेचि–तूंचि (१२९५) उत्तर वैराटाचा (वैराटिचा) राजा तो पळतां तूं कां निघालासि झुंझा=गोग्रहणाचें वेळेस तूं उत्तराचा सारथी झालास तेव्हां तो युद्धांतून पळत असतांही तुवां मुद्दाम त्यास आपला सारथी करून युद्ध केलेंस तसा तुझा हा क्षात्रधर्म तुजकडून युद्ध करवील. क्षत्रिय–क्षात्र. (१२९६) क्षोणि (=पृथ्वी)–अक्षौहिणी=पायदळ १०९३५०, घोडेस्वार ६५६१०, रथ २१८७०, व तितकेंच हत्ती मिळून होणारे सैन्य. नागविले=लुटविले, पराभूत केलें. (१२९७) हं–हा. काइं–कायी. दरिद्रता–दरिद्रिया. अदृष्टे=प्रारब्धाने, प्राक्तनाने. (१२९८) अनारिसे=वेगळे, अन्यथा, विरुद्ध (१२९९)

**पाणि पूर्वेस वाहात असतांना पश्चिमेकडे पोहून जाणारा जो त्याला तें पाणि आपल्याच कह्यांत आणील. साळीच्या बीज कणानें म्हणावें भाताप्रमाणें मी वाढणार नाहीं त्याला आपल्या स्वभावाचें केलेलें तें उल्लंघन करीतां येईल ? तशी तुझी क्षात्र धर्म संस्कारानें बनलेली स्वभाव प्रकृति घडलेली आहे म्हणून तू जरी न झुंजण्याचा आग्रह करून आहेस तरी तुझी प्रकृतीच तुला उठण्यास लावील तुझा क्षात्र स्वभाव तुझ्या इच्छेविरूद्ध, युद्धकर्म करवीलच प्रकृती तुला स्वस्थ बसूं देणार नाहीं.**

( ओव्या १२८७–१२९९ )

अहो पाणि पूर्वेस वाहात आहे तेथें त्या पाण्यांत पोहावें तें पश्चिमेच्या मार्गास का दिशेस पोहून जाणे तें, तेथें जो आग्रहच एक उरून असतो, तोंच मुळीं त्या पोहोणाऱ्यास आपल्याच हिशोबांत कह्यांत आणतो कीं. (१२८७)

अथवा साळीचा दाणा म्हणतो कीं मी तर केव्हांही अहो साळीपणानें उगवणारच नाहीं तसें ह्या प्रकृति धर्मास तर कांहीं आनच एक का निराळेंच एक करणें आहे कां होते. तेथें तो धर्म उल्लंघन करणें होत नाहीं. (१२८८)

त्याप्रमाणें हे प्रबुद्धा म्हणजे जागृत विकसित आहे बुद्धि ज्याची अशा हें अर्जुना ! तूं तर कीं, क्षात्र म्हणजे क्षत्रियाचे जे जन्मसिद्ध हक्क संस्कार–सिद्ध देवयोनि एक–त्याच अहो प्रकृतीचा घडविलेला असा असल्यानें आतां जें कांहीं तू म्हणत आहेस की मी तर केव्हांही मुळींच हे युद्ध करण्यास उठणार नाहीं असा हा तुझा व्यवहार (का निष्फळ बोलणे जरी जे पण) तोंच कीं मुळीं त्या बोलण्यानेंच मुळीं तू उठविला जाशील. तें तुझें बोलणेंच मुळीं उभें होईल. नुठी म्हणसी असा हा धांदा व्यवहारचें निष्फळ बोलणें बोलण्याकरितांच मुळीं–व्यवहाराकरितां व्यवहारच उठविसी असें होईल. (१२८९)

खरेंच ना हे कीं शौर्य पराक्रम, शूरत्व तेज, कांति, बलवीर्य, दक्षता, चतुरपणा, याप्रकारें हे पांडुसुता ब्रह्मदेवाचे का मूळ उत्पत्ति कर्ता जो त्याचे हे गुण जन्मतःच मुळीं तुझ्या ह्या क्षत्रिय जन्माबरोबरच तुजला प्रकृतिनें आदिमायेनें दिले आहेत. (१२९०)

करितां त्या गुण समुदायानुरूप तसेंच त्या कारणानुरूप हे धनंजया ! कांहींहीं नच करितां उगाच स्वस्थ (स्तब्ध, साहजतेनेंच) तुझे असणें तें तसेंच असोः हे केव्हांही नच होईल कीं समवाय, संयोग संबंध, (समागम, एकोपा, साहाय्य, समूह, (न्या.) नित्यसंबंध, द्रव्य व किंवा इत्यादिकांचा समवायि कारण= घटकद्रव्य, त्या द्रव्यानुरूपच कीं, शूरत्व बल, चतुरपणा) नच दाखविता, उगीचच स्तब्ध असावें असें नच स्तब्धतेस येईल कीं. (१२९१)

आणि म्हणूनच कीं ह्या शौर्य, तेज, दक्षता, गुणांनीं तूं हे कोदंडपाणी रचलेला, घडलेला, का बांधलेला असा केव्हांहि क्षत्रियाच्याच मार्गास अनुसरशील, रिघशील. (१२९२)

अथवा तूं असें हे जन्ममूळ विचार केलेले नच असे केवळपणानें झुंजणार नाहीं. असें जरी अढळ व्रत, नियम घेत आहेस— (१२९३)

तरी असें पाहा कीं जो मुळीं हात पाय बांधून, रथामध्यें घातला होतो तो चालत नसला तरीहीपण दिशेच्याहि अंतास–सीमेस खरेपणास पाहातो दिशेच्या जवळचा होतो दिगंतासही जातो. (१२९४)

त्याप्रमाणें तू आपल्याकडून तर असेंच म्हणत आहेस कीं मी तर कांहींही नच करणार कीं, म्हणून स्वस्थ राहात आहेस. पण भरंवशाचेच असें बोलणें बोलतो कीं, 'कांहींचि न करी जे तेथें सर्व कांहीं तें करी' असेंच तू करणारा होशील. (१२९५)

गोग्रहणाचें वेळीं वैराटचा राजा उत्तर त्याचा तूं सारथी झालास, पण तो पळत असतां तुवां मुद्दाम त्यास आपला सारथी करून युद्ध केलेंस तसें तुझा हा क्षत्रिय धर्मच मुळीं तुजकडून युद्ध करवील. (१२९६)

अकरा अक्षौहिणी महावीर तुवां एकट्यानेंच कीं, रणांगणामध्यें लुटविलेस, पराभूत केलेस असा तो जो तुझा स्वभाव कोदंडपाणी तोच मुळीं तुजला झुंजवील, लढवील, तुजकडून युद्ध करवील कीं. (१२९७)

असें पाहा की रोग (रोगियास, दुखणें व्याधि ही–) आजारी माणसास काय आवडते? पण व्याधि दुखणें रोगिया कडून भोगविलें जातें ना? ह्या प्राक्तनानें काय दरिद्र म्हणजे दीनपण कां गरीबपण हे दीन जो आहे त्यास नच आवडतें तरीपण तें त्याजकडून भोगविलें अनुभविलें सोसिलें सोसविलें वापरविलें जातें ना ह्या प्राक्तनानें कीं! (१२९८)

असें ते प्रारब्ध का प्राक्तन तें अन्यथा विरूद्ध कां वेगळें असें ज्या ईश्वराच्या आधीनतेमुळें ते अदृष्ट तर ईश्वरासच कीं मोहून गेलें आहे ज्या तो ईश्वर तर तुझ्या हृदयाचे ठायीं आहे कीं, तो ईश्वर तर तुझ्या हृदयाचे (प्रीती, मन, इच्छा, हेतू, जीवित, तत्व, भूतादीम्) प्रांती ठायीं आहे कीं. (१२९९)

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।**
**भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया॥ ६१॥**

ईश्वर=(ईश=शक्ति असणें. ईश=धनी, स्वामी, समर्थ) श्रेष्ठ, स्वामी, समर्थ, धनी. (ईश=जाणे दुखविणें. ईषणा=स्त्री, पुत्र, इत्यादिकाविषयीं आसक्ति.) सर्व भूतानां हृद्देशे=सर्व भूताच्या हृदयप्रांती. अंतःकरण=अंतरींद्रिय, मन. (अंतर=मन, छिद्र, आच्छादन सीमा, अवकाश इंद्रिय=ज्ञानाचें किंवा कर्माचे साधन, इंद्रिय ग्राम, इंद्रिय वर्ग.) तिष्ठति=(स्था–स्थावर, मनुष्य देह) मनुष्य धर्मानें आहे. मनुष्यत्वानें आहे. भ्रामयन्=(भ्रम=फिरणें, भोंवरा, अयथार्थ ज्ञान, भटकणें) फिरवीत असलेला असा. सर्व भूतानि=(सर्व=सगळा, प्रत्येक, भूतानीं=भूत, गतकाळ, पिशाच, पुत्र, पंचमहाभूतापैकीं प्रत्येक, झालेला, सारखा, योग्य, सत्य) प्राणीमात्र. भूतात्मा=शरीर. भूतभावन=सृष्टीकर्ता. भूतधात्री=पृथ्वी. भूति=ऐश्वर्य, भस्म, संपत्ति, उत्पत्ति. यंत्रारूढ–योगारूढ [आरूढ=वर चढलेला. रूढ=उत्पन्न, प्रसिद्ध, प्रज्वलित रूढि=चाल, प्रघात.] यंत्र=मंत्र, यंत्र, तंत्र=साधन, अटकाव. यंतृ=अडविणारा, सारथि माया=अविद्या, ममता, इंद्रजाल, कपट (मायाविन्=मोह घालणारा.)

*अन्वय :—अर्जुन सर्व भूतांनि। यंत्रारूढानि। शरीर यंत्र आरूढानि। मायया भ्रामयन्। ईश्वरः। सर्वभूतानाम् हृत्देशे। तिष्ठति॥ ६१॥*

अर्थ :—हे अर्जुना! सर्वापेक्षांही जास्त शक्ति असलेला (असा, समर्थ, धनी किंवा स्वामि.) ईश, श्रेष्ठ, ईश्वर सर्वभूताना माया अविद्या, ममता इत्यादीनी भ्रमवीत फिरवीत आहे: भूतें कशीं तर साधनांनी वरचढ केलेली (अथवा अटकाव कां प्रतिबंधच नेहमीं केलेले, उत्पन्न होणारे, ज्याच्या ठायीं) अशीं ती भूतें, त्या सर्व भूतांच्या हृदयदेशामध्यें ईश्वर आहे. (श्लोक ६१ वा ओव्या १३००–१३१९)

**सर्व भूतांच्या अंतरी। हृदय महा अंबरी।**
**चिद्गतिच्या सहस्रकरी। उदेला जो॥ १३००॥**
**अवस्थात्रये तिन्हीं लोक। प्रकाशुनि अशेष।**
**अन्यथा दृष्टी पांथिक। चेवविला॥ १३०१॥**
**वेद्योदकांच्या सरोवरी। फांकता विषय काल्हारी।**
**इंद्रिय षट्पदाचारी। जीव भ्रमराते॥ १३०२॥**

असो रूपक हे तो। ईश्वरू सकळ भूतांचा अहंकारू।
पांघरूनि निरंतरू। उल्हासतसे ॥ १३०३ ॥
स्वमायेचे आडवस्त्र। लावोनि येकला खेळवी सूत्र।
बाहेरि नटी छाया चित्र। चौऱ्यायसी लक्ष ॥ १३०४ ॥
तया ब्रह्मादि कीटांता ; अशेषाहि भूत जाता।
देहाकार योग्यता। पावोनि दावि ॥ १३०५ ॥
तेथ जे देहे जयापुढे। अनुरूपपणे मांडे।
तो भूततिये आरूढे। हे मी म्हणौनि ॥ १३०६ ॥
सुत सुते गुंतले। तृण तृणेंचि बांधले।
का आत्मबिंबा घेतले। बाळके जेळि ॥ १३०७ ॥
तयापरी देहाकारे। आपणपेंचि दुसरे।
देखोनि जीव आविष्करे। आत्म बुद्धि ॥ १३०८ ॥
ऐसेनि शरीराकारी। यंत्री भूते अवधारी।
वाऊनी हालवी दोरी। प्राचिनाची ॥ १३०९ ॥
तेथें जया जे कर्म सुत्र। मांडुनि ठेले स्वतंत्र।
ते तये गती पात्र। होचि लागे ॥ १३१० ॥
किंबहुना धनुर्धरा। भुतातें स्वर्ग संसारा।
माजी भवंडी तृणे वारा। आकाशीं जैसा ॥ १३११ ॥
भ्रामकाचेनि संगे। जैसे लोहो वेढा रिघे।
तैसे ईश्वर सत्ता योगे। चेष्टती भुते ॥ १३१२ ॥
जैसे चेष्टा आपुलालिया। समुद्रादिक धनंजया।
चेष्टति चंद्राचिया। सन्निधीये की ॥ १३१३ ॥
तया सिंधु भरिते दाटे। सोमकांत पाझरू सुटे।
कुमुदा चकोरा फिटे। संकोचु तो ॥ १३१४ ॥
तैसा बीज प्रकृतिवसे। अनेकें भूते येक इशे।
चेष्टविजती तो असे। तुझांचि हृदयीं ॥ १३१५ ॥
अर्जुनपण नेघता। मी ऐसे जे पांडुसुता।
उटितसे ते तत्वतां। तयाचे रूप ॥ १३१६ ॥
यालागी तो प्रकृतीते। प्रवर्तील हे निरूते।
आणि ते झुंझवील तुते। न झुंझसील तरी ॥ १३१७ ॥
म्हणोनि ईश्वरू गोसावि। तेणे प्रकृति हे नेमावी।
तया सुखे राबवावी। इंद्रिये आपुली ॥ १३१८ ॥
तू करणें न करणें दोन्ही। लावुनी प्रकृतीच्या मानी।
प्रकृति का आधिनी। हृदयस्थाच्या ॥ १३१९ ॥

भूताच्या-भूतांच्या. महा अंबरी=महदाकाशांत. चिद्गतीच्या-चिद्वृत्तीच्या=ज्ञानवृत्ति रूप (हजारों किरणासह) उदेला जो-उदयला असें जो. (१३००) अवस्थात्रये-अवस्थात्रय. अशेष-अशेख. अन्यथा दृष्टि, पाथिक चेवविला (चेवविले)=विपरीत ज्ञानानें भुललेले जीव जागवितो. (१३०१) वेद्योदकांच्या इत्यादि=दृश्याच्या जलाशयात विषय कमले विकसिली असतां पंचज्ञानेंद्रिये व मन मिळून जे

षट्पद अशा सहा पायाच्या जीव भ्रमाला जो त्या कमळाचें सेवन करवितो. (१३०२) उल्हासतसे-उल्हासत असे. (१३०३) आडवस्त्र=पडदा. नटी=नाचवितो. चौऱ्याऐंशी (८४) लक्ष=४ लक्ष मनुष्य, ११ लक्ष कृमी कीटक, १० लक्ष खेचर म्हणजे पक्षी इत्यादि. ३० लक्ष पशु, २० लक्ष वृक्षादि स्थावर, ९ लक्ष जलचर मिळून ८४ लक्ष योनि अथवा जारदादि ४ प्राणी कोटी, प्रत्येकाचे त्रिगुणाचे म्हणून बारा लक्ष या सप्त लोकांत म्हणून ८४ व प्रत्येकांत लक्ष मिळून ८४ [ ४प्राणकोटी × ३ त्रिगुणत्व × ७ सप्तलोक=८४] (१३०४) ब्रह्मांदि कीटांता=ब्रह्मदेवापासून कीटकापर्यंत (१३०५) अनुरूपपणें मांडे=योग्यतेप्रमाणें पुढें होते. (१३०६) आत्मबिंबा=आपल्या प्रतिबिंबाला. जेळी-जळी. (१३०७) आविष्करे=ते मीच म्हणून प्रगटतो (१३०८) वाऊनि-वाहुनि. प्राचिन्नाची-प्राचीनाची. (१३०९) ठेले-ठेविले. तये-तिये. (१३१०) भवंडी-भोवंडी. (१३११) भ्रामक=लोहचुंबक. वेढा रिगे=फिरते. (१३१२) सन्निधियेकी-सान्निधि येकी (=सान्निध्ये कीं.) (१३१३) फुटे-फुटे. कुमुदा चकोराचा=चंद्रविकासी कमलांचा व चकोर पक्ष्याचा (१३१४) तैसी-तैसा. येक-येके. तुझ्या-तुझ्याचि (१३१५) नेघता-न घेता. उटितसे-उठतसे (१३१६) प्रवर्तील-प्रवर्तवील. झुंझसील-झुंझसी. तरी-जन्हि. (१३१७) म्हणोनि-म्हणौनि. तया तिया. राबवावी= त्या नेमिलेल्या प्रकृतीप्रमाणें, सर्व इंद्रिये आपापली कर्मे करितात. (१३१८) मानी=गळ्याला गुंतवून आधिनी-अधीनी=स्वाधीन. हृदयाच्या-हृदयस्थ जया. (१३१९).

**सर्व भूतांच्या हृदयांमध्यें, अहंकाराचें पांघरूण घेऊन ईश्वर वास करीत आहे. मायेच्या पडद्याआड राहून तो सर्व सूत्रें हलवित असतो. देहरूप यंत्रावर बसून प्रारब्धाची सूत्रें चालवित असतो. तोच ईश्वर तुझ्याही हृदयांत आहे. मी अर्जुन असा जो तुझा अहंकार तोच त्या ईश्वराचें रूप आहे. एकंदरित ईश्वर सर्वाधिकारी प्रकृति-वर हुकुमत चालविणारा, व ती प्रकृति इंद्रियाकडून आपोआपच कर्मे करून घेईल. युद्ध करावें कीं नाहीं हें प्रकृतीकडे सोपीव व ईश्वराला शरण जा म्हणजे त्याच्या कृपेनें तुला शांति मिळेल.** (ओव्या १३००-१३१९)

सर्व भूतांच्या आंत, जवळ बाहेर, पलिकडे, अंतःकरणामध्यें (मधला मनुष्य-परब्रह्म, प्रकार, अभाव) हृदयरूप महदाकाशांत चिद्गति (विचार बुद्धि, मन, ज्ञान, चैतन्य ब्रह्म, स्थिति का अवस्थासह) का ज्ञानवृत्तिरूप हजारो किरणासह सूर्यरूपानें (सहस्रांशु, सहस्रकर, सहस्रकिरण, सहस्रधामन्=सूर्य.) जो उदय पावला आहे. (१३००)

स्वर्ग, मृत्यु, पाताळ हे अवस्था चतुष्टयानी, बाल्य, कौमार, यौवन व वार्धक्य, अवस्थात्रय, जागृति, स्वप्न व सुषुप्ति अवस्थाद्वय सुख व दुःख अवस्था षट्क-वस्तुची उत्पत्ति अस्तित्व वृद्धि, बदल, क्षय, व नाश अवस्था=हजर रहाणें, स्वरूप, प्रमाण वयमान, स्थिरता, परिस्थिति, स्थिति दशा इंद्रिय ह्यांनी तिन्ही लोक =भुवन विश्वाचा भाग, सत्यलोक स्वर्ग लोक, पृथ्वी विश्व, जन, प्रजा, व्यवहार, निजस्वरूप प्रकाश, फल, भोगवस्तु चक्षुरींद्रिय विषय-निःशेषपणें प्रकाशित करून विपरीत ज्ञानानें प्रवासी जीव अन्यथादृष्टि पांथिक जागवितो. (१३०१)

दृश्याच्या जलाशयांत-जाणण्यास योग्य वेद्य हेंच उदक देह तेथीलच्या प्रेम सरोवरांत विषय कमले विकाशिली असतां-पंचज्ञानेंद्रियें व मन अशा ह्या षट्पदांनीं, (मनःषष्टाणींद्रियाणि) ह्या जीव भ्रमरास उल्हासवितो व त्या विषयरूप कमलाचे सेवन करवितो (भोग्यवस्तु, प्रपंचसुख विषय कल्हार कल=अस्पष्ट-मधुर शब्द, मंजुळ वाजणारें अशक्त, अपक्व. हार=घेऊन जाणें, दूर करणें, मोत्याची माळ, युद्ध करणें) विषयरूपी अस्पष्ट मधुर शब्दांनी घेऊन जाणें जें तेथें बोलणें इत्यादींचा विषय संबंध ह्या विषयासक्तीनें का मदनानें दर्शविला व ह्या मनुष्यधर्मासच आल्यानें जीवभ्रमर तेथें उल्हासविला होतो व विषयरूप कमळाचें सेवन करवितो जो तो ईश्वर. (१३०२)

असें हें रूपकानें सांगणें असो, मूर्ति, रूपया, आकार अलंकार विशेष असें दृष्टांतानें बोलणें असो, पण तो ईश्वर दक्षिणाग्नि, मदन, ब्रह्मा, शंकर सर्व भूतांच्या निरंतरचा अहंकार–भूतआदीमू–नेहमींच्या नेहमींच स्वतः पांघरून उल्हासास येत आहे कीं, कां असतो कीं. (१३०३)

आपल्या स्वतःच्या अविद्येचे–मायेचे वस्त्र आड घालून एकला परमात्मा, ईश्वर तें मायेचें सूत्र चालवित आहे व बाहेर त्यानें तर एक छाया चित्र नटविलें की जेथें चौऱ्यांयशीं लक्ष असें विचित्रच एक नटणें केलें. नटच कीं तो, एक जसा नाचत आहे. ह्या वीस लक्ष वृक्ष, अकरा लक्ष कीटक, तीस लक्ष पशु, नऊ लक्ष चराचर, दहा लक्ष पक्षीं, चार लक्ष मनुष्ययोनी. एकंदर चौऱ्याऐंशि लक्ष योनीनी. (१३०४)

त्या ब्रह्मदेवापासून तो किडामुंगीपर्यंत सर्वच्या सर्व भूतजातांना देहाच्या आकारानें असण्याची योग्यताच कीं पावली आहे असें दाखवित आहे–दाखवितो. (१३०५)

तेथें जसें कां यंत्रच एक असा ह्या देह ज्यापुढें आहे, तें त्या त्या भूताच्या योग्यतेनुरूप कीं मांडत आहे ते भूत असें होऊन मग तेथें त्या देहावर आरूढ होऊन हे मी आहे म्हणून म्हणणें करते. (१३०६)

सुत तर सुतानेंच कीं गुंतलें आहे–तृण धान्य तृण धान्यानेंच कीं बांधलें आहे. का आत्मबिंबासच घेतले आहे–पाहाणे होत आहे एका ह्या बाळकानें ह्या देह जलामध्यें कीं (बालक हे अंगाची सीमा पाहाणारे ते अज्ञ मूल.) (१३०७)

त्याप्रमाणें ह्या देहाच्या आकारानें आपणा स्वतःसच कीं दुसरे एक जीवत्वेंकरून (पाहून) प्रगटतो. तेथें आत्मबुद्धिचें केले वस्तुतः ते मी नसूनही ते मीच अशा बुद्धिनें प्रगटतो. (१३०८)

या प्रकारें करून ह्या शरीराच्या आकार यंत्रामध्यें भूतें ती वाहून असें जाण कीं प्राक्तनाची का प्राचीनाची म्हणजे पूर्वकर्माची दोरी तो हालवीत असतो राहातो. (१३०९)

तेथें ज्यांस जें कांहीं कर्मसूत्र स्वतंत्र असेंच मांडून ठेविलें आहे तेंच त्यास गतीच्या योग्यतेचें कर्मगतीचें भांडेच की एक असतें, होऊं लागतें कीं. (१३१०)

बहुत काय लिहिणें पण हे धनुर्धरा, ह्या भूतांना ते प्राचीन कर्म स्वर्गीचें इहलोकीचें का परलोकीचें करून स्वर्ग का संसारामध्येंच भवंडण्याचें करतें जसें का तृण तें वाऱ्यानें आकाशीं भवंडिलें होतें तसें. (१३११)

लोहचुंबकाच्या सान्निध्यानें का संगानें जसें लोखंड वाटोळें फिरतें, एक वेढाच अंगाभोंवती घेऊ लागतें, तसें ईश्वर सत्तेच्या योगानें भूतें ही चेष्टतात, नाचतात, नटतात. ईश्वर सत्ता भूतांना नटवितें, चेष्टवितें. (१३१२)

असें आपल्याच चेष्टांनीं व्यवहारांनीं हालचालीनीं समुद्र आदीकरून ते चेष्टतात व्यवहार करतात हालतात एका ह्या चंद्राच्या सान्निध्यानेंच कीं. (१३१३)

अहो ह्या चंद्राच्या सान्निध्यानें ना सिंधूस दाट भरती येते–चंद्रकांत जो सोममणी त्यास पाझर फुटतो –सुटतो व चंद्रविकासिनी कमळाचा व चकोराचा मूकत्वाचा, मिटलेपणाचा–ऱ्हास आंकुचितपणा–बंधन, (आकर्षण भय) तें नाहींसें होतें कीं. (१३१४)

त्याप्रमाणें ह्या बीज प्रकृतिवशेकरून ह्या बीजामधीलच्या प्रकृतीनुरूपच कीं जरी अनेक अशी ही भूतें ती एकच ह्या ज्या ईशानें परमेश्वरानें परमात्म्यानेंच कीं जी चेष्टविजिली होतात; व्यवहारास आणिली जातात.–तो ईश्वर तर तुझ्याच हृदयामध्यें अंतःकरण पंचकत्वेंकरून आहे कीं. (१३१५)

हे अर्जुना! येथें तूं आपलें अर्जुनपण नच घेतां तेथें मी असें जें कांहीं आहे हे पांडुसुता! तें उठण्यानेंच कीं तें उटिलेपणाचें का आरशाचे असेंच होऊन की तें जें मी असें तेंच कीं तत्वदृष्टया त्याचें रूप होय. (१३१६)

आणि म्हणूनच की तो ईश्वर प्रकृतीस प्रवर्तण्याचें करील—व्यवहारास आणील—वर्तन असणेंच एक तें करील हे केव्हांहि खरेंच व तेंच की तुजला झुंजवील जरी तू न झुंजशील तरीहीपण— (१३१७)

आणि एवढ्याच करितां तो ईश्वर तोंच की स्वामी गोसावी होय—व त्यानें प्रकृती ही नेमावी शासनाची करावी व तिजकडूनच की सहज सुखानेंच की आपुली ती प्रकृतीची इंद्रियें कष्टवावीत का चेष्टवावींत राबवावींत नेमावीत हे केव्हांही. (१३१८)

तुवां करणें का न करणें म्हणजे त्या इंद्रियाचें कष्टणें का राबणें हें दोन्हीही प्रकृतीच्या धोरणानेंच की मानणें कर; कारण ही प्रकृतीच की मुळीं त्या: हृदयस्थाच्या-हृदयस्थ ईश्वराचाच ज्या की मुळीं स्वाधीनतेची अशीं आहेच आहे म्हणून (१३१९)

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥**

सर्व भावेन = आपल्या सर्व जीवभावासहित. परां = श्रेष्ठ अशा. प्राप्स्यसि = पावशील. शाश्वत = अविनाशी अशा.

अन्वय :—भारत ! तम् ईश्वरम् एव सर्व भावेन शरणं गच्छ । तस्य ईश्वरस्य प्रसादात् परां शांतिं प्राप्स्यसि । परां शांतिं प्राप्स्यसि । परं स्थानं प्राप्स्यसि । परं शाश्वतं स्थानं प्राप्स्यसि ॥ ६२ ॥

अर्थ :—हे भारता ! त्या ईश्वरालाच कीं तूं आपल्या सर्व जीवभावाने शरण जा, त्यास आपल्या आश्रयाचा कर सोबतीच जसा का एक असा. त्याचा आश्रय घे त्या ईश्वराच्या प्रसादानें की परा म्हणजे श्रेष्ठ अशी शांति तुजला प्राप्त होईल. तसेंच शाश्वत असें जें स्थान तें तुजला प्राप्त होईल.

(श्लोक ६२ वा ओव्या १३२०–१३२३)

**तया अहं वाचा चित्त आंग । देऊनिया शरण रिघ ।**
**महोदधी कां गांग । रिघाले जैसे ॥ १३२० ॥**
**मग तयाचेनि प्रसादे । सर्वोपशांत प्रमदे ।**
**कांतु होऊनि स्वानंदे । स्वरूपीचि रमसी ॥ १३२१ ॥**
**संभूती जेणे संभवे । विश्रांती जेथ विसंवे ।**
**अनुभूतीही अनुभवे । अनुभवा जया ॥ १३२२ ॥**
**तयें निजात्मपदीचा रावो । होऊनी ठासी अव्ययो ।**
**म्हणे लक्ष्मी नाहो । पार्था गा तु । ॥ १३२३ ॥**

तया अहं आंग = मी हें स्फुरण, वाचा मन व शरीर. गांग = गंगेचे उदक. (१३२०) सर्वोपशांत प्रमदेकांत = सर्व कांहींचा लय ज्या स्थितीत आहे अशा शांत स्थितिरूपी प्रमदेचा कांत का प्रियपति होऊन. स्वरूपीच—विरूपीच = विविधतेत (विरूपाय = होकर) (१३२१) संभूतीं = उत्पत्ति. विसंवे—विसवे (१३२२) तये—तिये. ठाकसी = राहासील. लक्ष्मीनाहो = लक्ष्मीपति. गा तू तू गा. (१३२३)

**तू आपलेपण—आपलें आंग—कायावाचामनें त्या ईश्वरास दे म्हणजे त्यास शरण जा त्याचा आश्रय कर. मग त्या ईश्वराच्या प्रसादानें सर्व शांतीचा कांत होऊन स्वरूपींच रमशील. उत्पत्ती संभवतो, अनुभव अनुभवास अनुभवितो, विश्रांति विरामास येते असे अविनाशी पद तू पावशील.** (ओव्या–१३२०–१३२३.)

त्या ईश्वरास अहं म्हणजे मी हे स्फुरण तसेंच वाचा, मन चित्त, अंग शरीर, हे देऊन त्याचा आश्रय कर–त्याच्या आश्रयानें तूं आपले अंग वागीत्र–शरण जा म्हणजे त्यामच आपला (सुहृद, जिवलग, मित्र, सोबती) रक्षणकर्ता कर. त्यासच आपल्या गृहाचे कर. जसें कां गंगोदक हें महोदधीस मिळाल्यावर मग सर्वथैव त्याचेंच झालें होतें जसें. (१३२०)

व मगच कीं त्या ईश्वराच्या प्रसादानेंच–प्रसन्नतेनेंच की सर्व कांहींचा लय ज्या स्थितींत आहे अशा शांत स्थितिरूपी प्रमदेचा स्त्रीचा प्रियपति कां कांतच एक होऊन स्वानंदानेंच कीं स्वरूपाच्याठायींच क्रीडा करूं लागशील (विरूपाक्ष जो महादेव त्याच्या ठायींचा होऊन तेथेंच तूं रमूं लागशील.) स्वन् शब्द नाद अशा स्वभावसिद्ध आनंदच एक तेथें होऊन तूं स्वरूप म्हणजे मूळस्वभाव, आकार प्रकार इत्यादींचा ठायींचा होऊन रमूं लागशील. (१३२१)

सामर्थ्य संयोग उत्पत्ति म्हणजेच संभूती जेथें संभवते, म्हणजेच उत्पन्न होते–कां सख्य होण्याच्या योग्यतेस येते–विश्रांती ही कां जिसांवा हा जेथें विसाव्याचा होतो निश्चल होतो. अनुभूती–साक्षात् अनुभव उपभोग हा प्रगट स्पष्ट का साक्षात् अशा अनुभवाचा उपभोगासच अनुभवतो, अनुभवानें जाणतो असतो–रमतो उपभोगतो, प्रगटतो. (१३२२)

अशा त्या नित्य ब्रह्माच्या आत्मपदीचा जीव ब्रह्मैक्याचा–ईश्वरचरणीचा अव्यय असा अक्षय नाश-रहित रावच एक होऊन राहाशील कीं तूं असें लक्ष्मीपति हे पार्थास म्हणत आहेत. (१३२३)

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥**

ज्ञान = बोध, जाणीव, बुद्धि, आख्यातम् = प्रसिद्धपणें, सांगितले, क्रियापद यथेच्छसि = तुझ्या मर्जीस येईल तसें तूं राजी खुषीचा होऊन मर्जीस येईल तसें.

अन्वय :—इति गुह्यात् गुह्यतरं ज्ञानं । (सर्वं ज्ञानं) । ते मया आख्यातं । (क्रियायोगपदं ते । कथितं । निवेदितं) । एतद् अशेषेण (समग्रतः) विमृश्य । (कुरु यथा इच्छसि तथा) । यथा इच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

अर्थ :—असें हें गुह्यांतले विशेष गूढ असें सर्वज्ञान बोधाचें जाणीवेचें का बुद्धीचें तें मी (तुजपुढें क्रियापदच एक ठेविलें) तुजला प्रसिद्धपणें सांगितलें, हें समग्रपणें विचारास घेऊन मगच जें काहीं तुला करणें असेल तें कर ! हें विचारास घे व मग तुझ्या मर्जीस येईल तसें कर.

श्लोक ६३ ओव्या १३२४–१३३३

**हे गीतानामे विख्यात । सर्व वाङ्मयाचे मथित ।**
**आत्मा जेणे हस्तगत । रत्न होय ॥ १३२४ ॥**
**ज्ञान पेसेया रूढि । वेदा जयाची प्रौढी ।**
**वानिता कीर्ति चोखडि । पातली जगी ॥ १३२५ ॥**
**बुद्धयादिके डोळसे । हे जगाचे का कडवसे ।**
**मी सर्व द्रष्टाही दिसे । पाहला जये ॥ १३२६ ॥**
**ते हे गा आत्मज्ञान । मज गौप्याचेहि गुप्त धन ।**
**परि तू म्हणौनि अन (आन) । केवि करूं ॥ १३२७ ॥**
**या कारणें गा पांडवा । आम्ही आपुला गुह्य ठेवा ।**
**तुज दिधला निजकणवा । जाकळिलेपणे ॥ १३२८ ॥**

**परी भुलली चोरसे । माय बोले बाळोद्देशे ।**
**प्रीतीहि परी तैसे । न करूचि हो ॥ १३२९ ॥**
**येथ आकाश आणि गाळिजे । आमृताहि सालीं फेडिजे ।**
**का दिव्याकरवि करविजे । दिव्य जैसे ॥ १३३० ॥**
**जयाचेनि अंग प्रकाशे । पातळीचा परमाणु दिसें ।**
**तया सूर्याही का जैसे । अंजन सुदले ॥ १३३१ ॥**
**तैसे सर्वज्ञेही मिया । सर्वही निर्धारूनिया ।**
**निके होय ते धनंजया । सांघितले तुज ॥ १३३२ ॥**
**आतां तू यावरी । निकेनिही निर्धारी ।**
**निर्धारूनि करी । आवडे तैसे ॥ १३३३ ॥**

*गीता नामे*–गीता नाम. विख्यात=प्रसिद्ध, [विख्यातात्म बुद्धि (सां)] वाङ्मय=वेद, अलंकारयुक्त काव्य भाषेतला ग्रंथ समुच्चय (वाक्=भाषण वेदभाग, वाणी) मथित=माथणी, सर्व, विचार रूप, सार (१३२४) ऐसया–ऐसिया. रूढि=प्रसिद्धि, प्रघात, चाल, रीत. प्रौढि=साहस, प्रौढपणा उत्कंठा, धीटपणा संलग्नता, विवाहितपणा. वानिता–वाखाणिता, वर्णिता. कीर्ती=यश, लौकिक, प्रख्यातपण चोखडि= उत्तम, उत्कृष्ट. (१३२५) कडवसे=प्रतिबिंब, परिवर्तित प्रकाश, आभासरूप. पाहला जये (जया)= ज्याच्यायोगेकरून, उदय पावलेला. (१३२६) आत्मज्ञान=जीवब्रह्मैक्यज्ञान. गौप्याचेहि=मज लपविलेल्याचेहि, सांभाळलेल्याचेहि, राखलेल्याचेहि. अन–आन=भिन्नपणा, दुसरेपणा (१३२८) आपुला– आपुला हा. निजकृणवा–कणवा=कृपेने जाकळिलेपणे=व्याप्त झाल्याने (१३२८) परी–जैसी. चोरसे= प्रेमानें पान्ह्यानें. बाळोद्देशे–बाळादोषे=बालकाच्या उद्देशाने, बालकाचा हेतू पुढे करून, प्रेमानें भाषण करू लागते. प्रीति=अनुराग, आनंद, आवड, (प्री=संतुष्ट करणें, तृप्ति होणे.) (१३२९) आकाश गाळून सार काढावें (ब्रह्म गाळून घ्यावें) अमृताच्या सालीं काढाव्यात (रत्नाच्या प्रकाशाच्या घड्या वेगळ्या कराव्यात) दिव्यच एक करणें जें शपथेवरच मुळीं उभें होणारें दिव्य असें कां शपथेनेंच शपथ घ्यावी तसें हें माझ्यासारख्या ज्ञात्यानें खरें व उत्तम म्हणून जें ठरविलें तें हें तुला सांगितलें हा भाव. (१३३०) अंजन सुदले=काजळ घातलें (१३३१) निके=खरे, हितकर. निर्धारूनिया=निश्चितकरून निश्चय, व्यवस्था भरंवसा ठेवून (१३३२) यावरी–ययावरी. निकेनिही–निके हे=खरें, हितकर, असें निर्धारी निर्धारूनि=निश्चयाने भरंवशाचे करून (१३३३)

**आकाश गाळून सार काढावें, ब्रह्म गाळून घ्यावें, अमृताच्या साली काढाव्यात, रत्नाच्या प्रकाशाच्या घड्या वेगवेगळ्या कराव्यात, दिव्य करणें तें दिव्य असें शपथेवरच उभे व्हावें शपथेनेच मुळीं शपथ घ्यावी, सूर्य जो सर्व देखणा त्याच्या डोळ्यांत अंजन घालावें तसें हें माझ्यासारख्या ज्ञात्यानें खरें व उत्तम म्हणून जें ठरविलें तें तुजला सांगितलें.** (ओव्या १३२४–१३३३.)

ही गीता खरोखरी विख्यात अशी–भगवद् गुणवर्णनपर गाइलेलें असें हें (–संभावना, वितर्क, निश्चय, स्मरण, क्रोध, इत्यादि अर्थांचें नांव लौकिकाचें असें प्रसिद्ध कबुल केलेलें हें) सर्व वेद-याचें तें सारच असून त्यानें तर आत्मा तो (स्वभाव–स्व–उत्कंठा, आपलेपण) आत्मरूप तें, हस्तगत स्वाधीनतेचें असें रत्नच एक, कीं आपलेंसें झालें असें होतें. (१३२४)

ज्ञान म्हणजे बोध जाणीव बुद्धि, अशा ह्या (प्रघात चाल) रीतीनेंच मुळीं, वेदांना तर ह्या ज्ञाना· संबंधी संलग्नता (साहस, विवाहितपणाची) वाखाणणीच एक अशी ही प्रौढि (धीटपणा,) वर्णिता वर्णिता तर,

उत्कृष्ट अशीं कीर्तीच कीं नांव, यश लौकीक, असें प्रख्यातपणच कीं ह्या जगीं पोहोचलें, येऊन थडकलें आहे. (१३२५)

बुद्धि आदिकरून जी चतुष्टयें ती तर डोळस अशीं ती ह्या गीताज्ञानाचें प्रतिबिंब (का परावर्तित *आभासरूप) असून सर्वद्रष्टा मीहीपण उदय पावलेला ह्याजमुळेंच (ह्याच्याच योगानें) कीं दिसतो.* (१३२६)

असें तें हें इंद्रियास अगोचर असें आत्मज्ञान, (ब्रह्मज्ञान) मज लपविलेल्याचेंहि (मज राखलेल्याचेंहि मज सांभाळिलेंल्याचेंहि गुप्त रक्षिलेलें धन द्रव्य स्नेह प्रियवस्तु, प्रियवस्तुची मिळकत असलेले ते 'तूं' म्हणून कांहीं का दुसरेपणानें भेदभावाचें असें कसें बरें करावें कीं. (१३२७)

या कारणास्तव हे पांडवा ! आम्हीं आपला गुह्य का गूढ असा हा ठेवा (निधि, खजिना, आधार) *निलतेच्या कृपेनेंच कीं (व्याप्त झाल्यानें, आवरलो गेल्यानें) तुजला दिला आहे.* (१३२८)

पण जशी कां आई अथवा माय ही प्रेम पान्ह्यानें भुलली होऊन बाळकाच्या उद्देशानें पोटीच्या प्रेमानें भाषण करूं लागते तसें प्रीती (कां संतोष कां अनुराग, आनंद, आवडहीपण नच भाषण करणारी कीं अहो) हीपण तसें भाषण करणारी असत नाहीं. (१३२९)

येथें अहो ! कसल्या त्या भावाचे का स्वभावाचें अभिप्रायाचें आत्म्याच्या विलासाचे तें कसें तर *ब्रह्मच गाळून घ्यावें आकाशच एक तें तें गाळून घ्यावें. कां रत्नच तें एक तेथें त्या रत्नाच्या सौंदर्याच्या* (कां प्रकाशाचे ते घड्या घातलेले ते तेथीलच्या) घडया वेगळ्या कराव्यात घडया काढून घ्याव्यात का, अमृत तें *साली काढून घ्यावें अमृताच्या साली काढाव्यात,* दिव्यच एक करणें तेंच मुळीं शपथेवरच उमे होण्याने दिव्य असें झालेलें का शपथेनेंच मुळीं शपथ घ्यावी असें हे भगवान् श्रीकृष्ण जे ज्ञानियामध्यें ज्ञानी असे त्यांच्यासारख्या ज्ञात्यानें जें कांहीं खरें व उत्तम म्हणून ठरविलेलें तें तुजला सांगितलें ( असा हा येथीलचा आत्म्याचा विलासच कीं.) (१३३०)

(ज्याच्या आंगच्या प्रकाशानें–उपायाच्या उजेडानें आंगिक देहसंबंधी खुलाशानें कीर्तीनें ज्याच्या अंगासारखा प्रकाश पाताळिचाहि परमाणु दाखवितो.)

पुरूष उपस्थ–याच्यामुळें अंगच (अवयव शरीर.) प्रकाशले होऊन पाताळिचाही अति सूक्ष्म अंश का कण दिसतो (दिसूं लागतो) अशा त्या सूर्यासही ज्ञान सूर्यग्रहासहिपण जसें कां नेत्रांत घालण्याचें औषधि द्रव्यच का काजळ अथवा अंजनच घातलें (प्रिय केलें, संमतीचे केलें.)

सूर्य नारायण अग्नि नारायण–अग्नि (का शाई) पुरुषाच्या ज्याच्या अंग इंद्रिय (अवयव शरीर) प्रकाशानें पाताळीचा अति सूक्ष्म अंशही दिसतो अशा त्या सूर्य नारायणासही कीं जसें कां (उदासीनाचा देह ब्रह्मरूप–वैराग्याग्नि–मनुष्यधर्म.) अग्निनारायण प्रिय केलें, संमतीनें केलें. (पाताळ=(१) अधोलोक (२) वडवानळ (३) सप्तपाताळापैकीं सातवें (४) (ज्यो.) लग्नापासून चौथें स्थान.) (१३३१)

तसें मी जो सर्वज्ञ, परमेश्वर, सर्व जाणणारा त्या मीहीपण सर्व कांहीं (निवडून ठरवून), निश्चितार्थाचे करून हे धनंजया ! जें कांहीं हितकारक होईल तेंच तुजला सांगितलें आहे. (१३३२)

आतां यावर तू जो निका म्हणजे लहान आहेस त्याहि तुवा (मेहनती व्हावें, निश्चयी असावें) निर्धारेच एक करून जें कांहीं करावयाचे आहे तें करावें" (१३३३)

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥**

गुह्यतम = सर्वांत गुह्य, अतिशय गूढ. भूयः = वारंवार, पुष्कळ. परमम् = श्रेष्ठ, मोठें प्रथमतेचें वच = बोलणे (वचः = पोपट, मैना) वचस् = आज्ञा, उपदेश, भाषण. इष्टः = इच्छित, सन्मानित, प्रिय (इष्ट = यज्ञ. इष्टिका = वीट.) दृढम् = अतिशयित (वक्ष = रागावणें, गोळा करणें.) वच = दर्शविणें, सांगणें, वर्णणें बोलणें, वचन देणें. हितम् = कल्याण, फायदा, (वै.) पथ्यकर. इति = मागें दिल्याप्रमाणें, कारण कीं.

अन्वय :—इति । मे । परमं वचः । सर्वं गुह्यतमम् । भूयः शृणु । मे इष्टः असि । मे दृढम् इष्टः असि । (इति) ततः । ते हितम् वक्ष्यामि ॥ ६४ ॥

अर्थ :—मागें सांगितल्याप्रमाणें (उद्देश तो हा कीं, कारण तें असें कीं) माझे श्रेष्ठ असें (प्रथमतेचे) भाषण उपदेश आज्ञा जे सर्व गुह्यातही अतिशय गूढ गुह्य असें आहे तें वारंवार ऐक, श्रवण कर [तूं (स्थितप्रज्ञ, स्थिरमति) दृढमति आहेस] तूं मजला प्रिय आहेस सर्वप्रकारें अतिशयतेनें मजला सन्मानित का प्रिय आहेस, इच्छित असा आहेस. वाक्यसमाप्ति–आणि म्हणूनच कीं तुजला तुझें हित का कल्याण ते मी दर्शवित आहे, सांगत आहे. (श्लोक ६४ वा ओव्या १३३४–१३५५)

या देवाचया बोला । अर्जुन उगाचि ठेला ।
तेथें देवो म्हणें भला । वंचकु होसी ॥ १३३४ ॥
वाढितया पुढें भुकेला । उपरोधें म्हणे मी धाला ।
तै तोची पडे आपुला । दोषु ही जया ॥ १३३५ ॥
तैसा सर्वज्ञ श्रीगुरू । भेटलिया आत्म निर्धारू ।
न पुसिजे जै आभारू । धरूनिया ॥ १३३६ ॥
तै आपणपेंचि वंचे । आणि पापही वंचनाचे ।
आपणयाचि सांचे । चुकविले तेणें ॥ १३३७ ॥
पै उगेपणा तुझिया । हा अभिप्रावो कीं धनंजया ।
जे येक वेळ आवांकुनिया । सांगावे ज्ञान ॥ १३३८ ॥
येथ पार्थ म्हणे दातारा । भले जाणसी माझया अंतरा ।
हे म्हणो तरी दुसरा । जाणता असे काई ॥ १३३९ ॥
येर ज्ञेय जी हे आघवे । तु ज्ञाता येकु स्वभावे ।
मा सूर्य म्हणो तरी वाणावे । सूर्याते काई ॥ १३४० ॥
या बोला श्रीकृष्णे । म्हणितले काइं येणे ।
हेचि थोडे गा वानणे । जे बुझतासी तूं ॥ १३४१ ॥
तरी अवधान पघळ । करूनिया येक वेळ ।
वाक्य माझे निर्मळ । अवधारी पां ॥ १३४२ ॥
हे वाच्य म्हणोनि बोलिजे । का श्राव्य मग ऐकिजे ।
तैसे नव्हे परि तुझे । भाग्य बरवे ॥ १३४३ ॥
कूर्मीचया पिलया । दिटी पान्हां ये धनंजया ।
का आकाश वाहे बापया । घरिंचे पाणी ॥ १३४४ ॥
जो व्यवहारू जेथ घडे । तयाचे फळ तेथचि जोडे ।
परिसु काइ दैवे न सांपडे । सानुकुळे ॥ १३४५ ॥
येन्हवी द्वैताची वारी । सारूनि ऐक्याचि परिवरि ।
भोगिजे ते अवधारि । रहस्य हे ॥ १३४६ ॥

आणि निरूपचारा प्रेमा। विषो होय जे वीरोत्तमा।
ते दुजे नव्हे की आत्मा। ऐसेचि जाणावे ॥ १३४७ ॥
अरिसाचया देखिलया। गोमटे कीजे धनंजया।
ते तया नव्हे आपणया। लागी जैसी ॥ १३४८ ॥
तैसे पार्था तुझेनि मिसे। मी बोले आपणयाचि दोषे।
माझां ठाई असे। मी तु पण गा ॥ १३४९ ॥
म्हणौनि जिव्हारिंचे गुज। सांगतसे जीवासी तुज।
हे अनन्यगतिचे मज। आथी व्यसन ॥ १३५० ॥
पै जळा आपणपे देखता। लवण भुलले पांडुसुता।
का आघवे तयाचे होता। न लजेचि ते ॥ १३५१ ॥
तैसा तूं माझे ठाई। राखो नेणसीचि काही।
तरी आता तु काई। गौप्य मी करी ॥ १३५२ ॥
म्हणोनि आघवेचि गुढे। जे पाउनि अति उघडे।
ते गौप्य माझे चोखडे। वाक्य आईक ॥ १३५३ ॥

मन्मना भव—

तरी बाह्य आणि अंतरा। आपुलया सर्व व्यापारा।
मज व्यापकाते वीरा। विषो करि ॥ १३५४ ॥
आघवा आंगी जैसा। वायु मिळोनि आहे आकाशा।
तूं सर्व कर्मी तैसा। मजसीचि अस ॥ १३५५ ॥

देवाचया–देवाचिया. तेथे–तेथ. म्हणे–म्हणती वंचकु–अवंचकु=फसणारा, न फसणारा, स्वतःस न ठकविणारा कां ठकविणारा, वंचना करणारा, न करणारा (१३३४) उपरोधे=लाजून, खजिल होऊन, (मी तृप्त झालो म्हणेल तर) पडे–पीडे (क्षुधेने पीडिला होतो.) आपला–आपुला, आणी. दोषही= वंचकपणाचा, भिडस्तपणाचा, संकोच करणारा दोष, जया–तया. (१३३५) आभारू=भीड, संकोच. आत्मनिर्धार=आत्म्याविषयीं निश्चय निवडिलेला, निवाड्याचा केलेला. (१३३६) आपणपाचि सांचे= खरोखर, आपले सर्वस्वच त्यानें चुकविले कीं. (१३३७) आवांकुनिया=सार काढून, पूर्णपणें आटोक्यांत आणून आटोपशीर करून. (१३३८) येथ तेथ. माझेया–माझिया. अंतरा=अंतर=मन, अवकाश, सीमा, आच्छादन (अंतरात्मा=जीव, अंतःकरण) (१३३९) जी हे–हे जी. ज्ञेय=जाणण्यांस योग्य असे. येकु– एकचि. म्हणो तरी–म्हणोनि. वाणावे–वानावे. (१३४०) वाणने–वानणें. बुझतासि–बुझतासि तू=समजतोस. (१३४१) पघळ=विस्तृत मोठे, विस्ताराचे, अघळ पघळ. (१३४२) [श्लोक ६४, ६५, ६६ ह्या मध्यें] **नवव्यातील राजगुह्ययोग आला आहे.]** वाच्य=बोलण्यासारखें. श्राव्य=ऐकण्यास योग्य. ऐकिजे= आयकिजे. (१३४३) पिलया–पिलिया. दिडि–दिठी=दृष्टीनेच. बापया–बापिया=चातकाला. (१३४४) घडे–न घडे. फळ तेथचि–फळचि तेथ. परिस काई–काई. सानुकुल=(सा=लक्ष्मी, पार्वती. नु=शक्यता, संशययुक्त प्रश्न. कुल=शरीर, समुदाय, घराणें, चांगले कुल.) उपकारक, हितयुक्त. (१३४५) वारी सारूनि भ्रमण टाकून, येरझार सारून, रहदारी टाकून. परिवरी=घरी (खुणेचा शब्द) रहस्य=गूढतत्व (१३४६) निरूपचारा=निष्काम, निर्हेतुक आदरयुक्त प्रेमानें. (१३४७) अरिसाचया–आरिसाचिया–दर्पणाचिये. (पा. भे.) गोमटे स्वच्छ. नव्हे नोहे. (१३४८) मिस निमित्त. आपणयाचि=आपल्याच करितां–आपल्या उद्देशानें. दोषे–उद्देशे. माझां–माझ्यां तुझ्या. मी तुं पण–मी तूं पण गा (१३४९) जिव्हारीचे=अंतर्गत

अनन्यगतीचें व्यसन, एकनिष्ठतेची चटक. (१३५०) माझां माझ्या. तू माझा ठाई राखो नेणसी=भेद (गुप्तपण) तू माझ्या ठिकाणीं जाणत नाहींस, राखीत नाहींस, लवणाप्रमाणें तू माझें माझें नच करितां सर्व कांहीं मजला आपले आपलेपण देत आहेस म्हणून, तू कांहीं भेदभावना करीत नाहींस म्हणून. करि–करू. गौप्य=लपवालपव. (१३५२) गुढे उघडे पाउनि गौप्य (गोप्य) ते=सर्व गुह्यें ज्यापुढें उघडी पडतात सर्व गुह्यें ज्याच्या प्राप्तीनंतर उकलतात. वाक्य=यस्य वाक्यं स ऋषिः संपूर्ण अर्थवाहक पदसमूह (१३५३) विषो=विषय. आपुलया–आपुलिया (१३५४) अस–असें. (१३५५).

**तुज मजमध्यें भेद तूं जाणत नाहींस लवणाप्रमाणें तूं माझें माझें नच करितां सर्व कांहीं आपलेपण तूं मजला देत आहेस. तेथें तूं कांहीं भेदभावना धरीत नाहींस—**

(ओव्या १३३४–१३५५)

देवाच्या अशा ह्या बोलण्यावर अर्जुन उगाच राहिला त्याच्या त्या उगे असण्यावर देवांनीं म्हटलें कीं हे अर्जुना! तूं तर भला भला आहेस कीं! कारण ह्या तुझ्या गप्प असण्यानें स्वतःस फसवित आहेस कां उगे असण्यानें स्वतःस तूं नच फसविण्याचें करीत आहेस कीं (ठकविणेंच एक का प्रतारणाच ती स्वतःशी करीत आहेस नाहीस कीं, मायिकवाद तो फसविणारा तेथे तूं ठकविला जात आहेस नाहींस असा आहेस) कीं. . (१३३४)

जेवण वाढणारापुढें, भुकेला जो आहे त्यानें लाजून जाऊन, मी तृप्त आहें, मी धालो आहे माझें पोट भरलें आहे असें म्हणणें केलें तर (अंतर्गृह यात्रा तीच मुळीं पीडक होईल नां!) उपाशी राहून असणेंच होईल नां, तेथें त्याचें तें जेवण वाढण्यास प्रतिबंधाचें होणें तें तर आपला स्वाभाविक दोषच अंगावर घेतला असें होईल–तेथें दोषच कीं अंगी येऊन आदळेल व भुकेले राहाण्याची पीडाच एक सोसावी लागेल नां! स्वजीवितच मुळीं दोषाचें केलें असें होईल कीं—संकोच करण्यानें, मिडस्तपणामुळें. (१३३५)

त्याप्रमाणें सर्व जाणणारा, परमेश्वर, असा श्रीगुरू भेटल्यास आत्म्याविषयी निश्चय का निवाडा जो कांहीं एक तो न विचारण्याचें करणें तें तर मीड का संकोचच एक करणें होय आपले मोठे आभार आहेत. ह्या आपल्या सांगण्याबद्दल असें तें शब्दसमूहाचे ओझेंच स्मरणच–कीं आपल्या जीवी दडपण पडलेलें तेथें लाजून जाऊन मीड संकोच करूं नये. (१३३६)

तसें तें लाजणें केलें शब्दसमूहाचें सांगणें तें आपणा स्वतःवर ओढून घेतलें तर मनुष्य आपल्या स्वतःसच कीं फसवितो ठकवितो, स्वतःस हरवितो व यावर त्या स्वतःस हरविण्याचें, ठकविण्याचें एक पापहीपण लागल्यानें त्या पापानें तर आपण स्वतः जो (आपण जो) त्यासच कीं, चुकविलें–त्यासच चुकविण्याचें केलें आपणासच त्यानें वगळिलें, तेथें नऊ मोजून दहावा हरवला असें एक स्वतःच्या भ्रमांत पडणें होतें नां! (१३३७)

येथें आतां तुझा उगेपणा तो कसा आहे म्हणशील तर हे धनंजया! (तेथें एकच एक–अहाहा! प्रिय आहे असा) अभिप्राय (लागू पडतो तो हा कीं सर्व ज्ञान वाक्सृष्टी–वाणी सरस्वति शब्द) सर्व एक वेळ आवाक्यांत आटोक्यांत आणून हे ज्ञान सांगण्याचें करावें, सांगावें असें आहे. (१३३८)

तेव्हां पार्थानें म्हटलें कीं अहो जी स्वामी! दातारा! समर्था! माझे मन तुम्हीं जाणता! मी जें कांहीं हें सर्व मनांत आणून धारण करावें, आवरावें, कर्ज लागलेलें तें (ताब्यांत ठेवून) फेडावें व जगावें, असें हें माझ्या मनीचे भाव माझ्या अंतःकरणीचे गुज तुम्हीं जाणितले अहो तुम्हांवांचून दुसरा एकादा कोणी जाणता आहे काय? अहो तुमच्याच करण्यानें हें होणारें नां? येथें दुसरा कोणी तरी एक जाणता आहे म्हणावें तरीसुद्धां तोहीपण तुमच्या व्यापक स्वरूपत्वेंकरून तुम्हींच कीं अहो–(जीव जो परमात्माच पण

दुसराच एक एक असा म्हटलेला तरी तुम्हींच कीं तेथीलचे ते दैव आपणच आपल्या यज्ञ पुरुषाच्या महत्वावर वागविणारे आहांत कीं ?) (१३३९)

दुसरे ते जे जाणण्यास योग्य असें ज्ञेय म्हटलेले त्यासहितहीपण तुम्हींच कीं ज्ञाते असें सहज स्वभावे-करूनच असलेले ते ज्ञाते बुद्धिमान असें ओळखीचे जामीन असून शहाणें आहांत विद्वान् आहात अहो ! आपणांस सूर्य म्हणावें तर ज्ञानसूर्यच जो त्या सूर्याचे अंगी कांहीं सूर्यपण बाणावें लागतें काय ? तेथें तर सर्व कांहीं ज्ञान अगोदरचें असें स्वयं आहेच आहे ना ! तेथें वाखाणणी का स्तुतीच एक करावी सूर्याने सूर्याचीच वर्णन सीमा करावी तें काय ? (१३४०)

अशा ह्या अर्जुनाच्या बोलण्यावर भगवान श्रीकृष्णानीं म्हटलें कीं जें कांहीं जगणें येणें आहे तें तर हेंच बाणणें का वानणें; असें थोडेसें जरी तरी जीवच तेथें थोडा थोडा होऊन असल्यानें तूं हें समजतच आहेस (थोडे तरीपण वानणेंच एक तें सर्व महत्वाचें होऊन असल्यानें तूं तेथें समजूतीस येऊन आहेसच आहेस असें आहे.) (१३४१)

तरी तूं लक्ष विस्तृत असें (अघळपघळ म्हणा कां विस्ताराचें असें) करून एक वेळ माझें हें बोलणें ब्रह्मवाक्य ज्ञानतत्त्व (स्वरूप–आज्ञा, नियम, वार्तिक विचारास घे) निश्चिततेचें करून ऐस. (१३४२)

हें बोलण्यास कां सांगण्यास योग्य का प्रतिपादनाचा विषय (म्हणून का शब्दाचा मूळचा अर्थ) म्हणून बोलावें अथवा ऐकण्याचें म्हणून (का ऐकू येण्याजोगें म्हणून) ऐकावेंच ऐकावें असें नाहीं, पण तुझें भाग्य, सुदैवी अशा ऐश्वर्याचें गुणश्रेष्ठ असें चांगलें आहे. (१३४३)

कारण कासवीला आपल्या पीलाकडे नुसत्या पाहाण्यानेंच कीं पान्हा फुटतो. हे धनंजया ! अथवा असेंही म्हणावें कीं बापया चातकासाठीं तर आकाशानेंच आकाश हें ब्रह्मीचें असें कीं घरचेंच पाणी देवरूपी मेघाचें तें मेघच कीं (परमात्मा, प्रकाश, चौथे, शून्य वैकुंठ) वाहून आहे. (१३४४)

तो व्यवहार म्हणजे देवघेव (चालचलणुक जेथें होते) जेथें घडते तेथेंच कीं तिचें फळ हें जोडलें होतें मिळतें पैजेनें प्रतिज्ञेवरच निश्चितपणानें जडलें होतें सांधलें जातें. अहो, लक्ष्मी (का पार्वती घराणें देशाचे ठायीं संशययुक्त प्रश्नांचे न होता कीं) जेथें अनुकुल तेथें परिसच कीं दैवानें अहो सांपडला म्हणावा नां ? चित्तरूपी लोखंड ज्या चित्‌शक्तीनें जिवित सुवर्णाचें केलें होतें, तेथें परिसच कीं एक जोडला म्हणावा कां न बरें ! (१३४५)

येन्हवी पाहिलें असतां दुजेपण तें ऐक्याच्या शब्दानें बाजूस करून, निवारून, जें कांहीं ऐक्याचें रहस्य तें भोगावें विचारात घ्यावें, निश्चित करावें असें हें रहस्याचें (तत्वाचे) गूढ जाण. (१३४६)

जे निष्काम (निर्हेतुक प्रेमास विषय, आश्रय, लक्ष्य करावयाचे) कर्म होतें हे वीरोत्तमा ! तें काय दुजें म्हणावें असें केव्हांही नव्हेंच. अहो ! तें तर (ब्रह्मच) आत्माच एक कीं असेंच जाणावें, समजावें कीं. (१३४७)

दर्पणामधीलच्या देखलेल्यास गोमटें कीं असेंच जें म्हणणें हे धनंजया ! तें कांहीं त्या आरशास कां आरशामध्यें पाहिलेल्यास नव्हे तर ते आपणासच कीं अहो ! (आपणच कीं तेणें चांगलें का गोमटें असें जें कांहीं आरशामध्यें आपणांस देखिलें होतें, हे धनंजया ! तें कांहीं त्या आरशासच तसें गोमटें म्हणणें तें कसचें.) (१३४८)

तसें हे पार्था ! तुझ्या निमित्तानें मी (आपल्याच कीं उद्देशानें का दोसाने दोषाने) हें बोलत आहे काय ! माझ्या ठाई मी तूं तर असें कांहींहीं नाहीं. (१३४९)

म्हणून जिव्हारीचें का जिव्हाळयाचें अंतर्गत असेंच हें हितगुज तुज जीवास (प्राणास, प्राण्यास, आत्मयास) मी सांगत आहें. अशींच ही एकनिष्ठेची चटक कां अनन्य जो आहे त्याच्या (मार्गाचे शोधणें, अवस्थेचे, गमनाचे, रस्त्याचे, स्थितीस आणणें, पुरते करणें, त्या) गांवीचे होणे असें. मजला हेंच की व्यसन आहे. आसक्तपणाची सीमाच की ती आहे. (१३५०)

अहो पाणी ते आपणच स्वतः पाणी आहोत असें मिठानें पाहता पाहाताच मुळीं तें मीठ स्वतःसच भुललें ! हे पांडुसुता ! म्हणून तें पाणीच सर्व की तें मिठ आपण आहे असें म्हणण्यास तें मिठ केव्हांही लाजत नाहीं. (१३५१)

त्याप्रमाणें तूं माझ्यासंबंधीं (मजमध्यें मजविषयीं,) कसलाहि संकोच जाणत नाहींस, म्हणून आतां तुझ्यापासून मी कांहींहीं चोरून ठेवणार नाहीं. (का गुह्य असें आहे म्हणून तुजला सांगणार नाहीं असें कांहींहीं गुह्य ठेवणार नाहीं) सर्व गुह्य उघड करून तुजला सांगणार आहे. (१३५२)

करितां सर्व गुह्यें जी गुह्यपण पावून आतां अगदीं उघडीच झालेलीं स्पष्ट अशीं तीं–असें तें माझें (चोखट चांगलें असें गुज माझें तें) वाक्य (म्हणजे संपूर्ण अर्थवाहक पदसमूहाचें तें) आईक. (१३५३)

आपल्या बाह्य अशा, अथवा अंतरामधील, (अंत:करणीच्या अशा) सर्व व्यापारांनां (कार्यांनां व्यवसायांनां अभ्यासामध्यें) हे वीरा पार्था ! मी जो व्यापक विस्तीर्ण असा आहे तोच हेतूचा कर, आश्रयाचा कर, लक्ष्याचा कर, व्यवहाराचा कर. (१३५४)

अवघ्या सर्व (आंगी) आंगाच्याठायीं जसा वायु असणारा तो तर आकाशासही मिळून असतो–राहातो तसा तूं सर्व कर्मामध्यें मजशींच लिगटून ऐस, मजला चिकटून ऐस. (१३५५)

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥**

मत् + मना + भव = माझ्याशीं मन लाव, (मत् अनादिमत परब्रह्म) मत् + भक्ताः भव = अनादि मत् परब्रह्म–मत् मतिमान्–बुद्धिमान् मी जो सर्वव्यापक आहे त्याचा भक्त हो. मद्याजी भव = मत् याजी–बुद्धी आपली तूं माझ्या यजनाची–याजनाची कर. (याजिन = पूजा करणारा, यज्ञ करणारा.) मां नमस्कुरु (देवो भव) = मला व्यापकाला, (अहंची द्वितीया) एष्यसि माम् एव = मजलाच पोहोचशील. (एष = जाणे, जवळ येणे.) सत्यं = तुजला हे मी सत्य सांगत आहे, खरोखर (व्रत = परायण) प्रतिज्ञा, शपथ, ते प्रतिजाने = ते जाणून घे, निश्चयानें जाण, वचन अंगीकार. मे प्रियः असि = माझा आवडता असा मजला प्रिय असा (हिंमतीचा, धडधाकड, धडा) तूं आहेस.

अन्वय :—मत् मना भव । मत् भक्तः भव । मत् याजी भव । मां नमस्कुरु । माम् एव एष्यसि । ते प्रतिजाने सत्यं । मे प्रियः असि ॥ ६५ ॥

अर्थ :—माझ्या मनाशीं मन मिळवून ऐस, माझा भक्त हो ! माझ्या भक्तीस लाग. माझें यजन याजन करणारा हो सर्व कांहीं मीच समजून नमस्कार कर पुज पुजिकु हो–मजला नमस्कार करणारा हो. या योगानें तूं मजशीं मिळून असशील हे खरें जाण ! हें तुजला प्रतिज्ञेवर सांगतो तूं माझा प्रिय भक्त आहेस आणि म्हणून कीं. (श्लोक ६५ वा ओव्या १३५६–१३८३)

**किंबहुना आपुले मन । करी माझे येकायतन ।**
**माझेनि श्रवणें कान । भरूनि घाली ॥ १३५६ ॥**
**आत्मज्ञाने चोखडी । संत जे माझी रूपडी ।**
**ते दृष्टी पडो आवडी । कामिनी जैसी ॥ १३५७ ॥**

मी सर्व वस्तीचे वसौटे । माझी नामे जिये चोखटे ।
तिये जियावया वाटे । वाचेचिया लावी ॥ १३५८ ॥
हाताचें करणें । का पायाचें चालणें ।
ते होय मज कारणे । तैसे करी ॥ १३५९ ॥
आपुला अथवा परावा । ठायी उपकरसी पांडवा ।
तेणें यज्ञे होय बरवा । याज्ञिकु माझा ॥ १३६० ॥
हे येकैक सिकऊ काइं । पैं सेवके आपुलां ठाइं ।
उरोनि येर सर्वही । मी सेव्युचि करी ॥ १३६१ ॥
तेथ जाऊनि भूतद्वेषु । सर्वत्र नमवै मी येकु ।
ऐसेनि आश्रो आत्यंतिकु । लाहासी तूं माझा ॥ १३६२ ॥
मग भरलया जगा आंतु । जाउनि तिजयाची मातु ।
होउनि ठाईल येकांतु । आम्हां तुम्हां ॥ १३६३ ॥
तेव्हां भलतिये अवस्थे । मी तूं ते तू माते ।
भोगिसी ऐसे आईते । वाढेल सुख ॥ १३६४ ॥
आणि तिजे अडळु करिते । तिमाले अर्जुन तेथें ।
ते मी तूंचि म्हणोनि माते । पावसी सेखी ॥ १३६५ ॥
जळीची प्रतिभा । जळनाशी प्रतिबिंबा ।
येता गाभा गोभा । कांही आहे ॥ १३६६ ॥
पैं पवनु अंबरा । का कल्लोळु सागरा ।
मिळता आडवारा । कोण्हाचा गा ? ॥ १३६७ ॥
म्हणौनि तू आणि आम्ही । हे दिसता देहधर्मी ।
मग ययाच्या विरामी । मीचि होसि ॥ १३६८ ॥
या बोला माझारि । होय न होय झणें करि ।
येथ आन आथी तरी । तुझीचि आण ॥ १३६९ ॥
पैं तुझी आण वाहाणे । हे आत्मलिंगाते शिवणे ।
प्रातीची जाती लाजणें । आठवो नेदी ॥ १३७० ॥
येऱ्हवी वेदु ( वेद्यु ) नि प्रपंचु । जेणे विश्वाभासु हा सांचु ।
आज्ञेचा नट नाचु । काळाते जिणे ॥ १३७१ ॥
तो देवो मी सत्य संकल्पु । आणि जगाचाहि बापु ।
मा आणेचा आक्षेपु । का करावा ॥ १३७२ ॥
परी अर्जुना तुझेनि वेधे । मिया देवपणाची भिदे ।
सांडिली गा मी हे आधे । सगळेनि तु ॥ १३७३ ॥
पैं काजा आपुलिया । रावो आपुली आपणया ।
आण वाहे धनंजया । तैसे हे की ॥ १३७४ ॥
येथ अर्जुन म्हणे देवे । अचाट हे न बोलावे ।
जी आमचे काज नांवे । तुझेनि येके ॥ १३७५ ॥
यावरि सांगो बैससि । कां सांगता भाष्य ही देसी ।
या तुझिया विनोदासी । पार आहे जी ? ॥ १३७६ ॥

कमळवना विकासु । करी रविचा येकु अंशु ।
की तेथ अघवाची प्रकाशु । निच (नित्य) दे तो ॥ १३७७ ॥
पृथ्वी निवडूनि सागर । भरिजति जेवढे थोर ।
वर्षे तेथ तृषातुर । चातकु की ॥ १३७८ ॥
म्हणौनि औदार्या तुझया । मज निमित्त ना म्हणावया ।
प्राप्ती असो दानी राया । कृपानिधि ॥ १३७९ ॥
तंव देव म्हणती राहे । यया बोलाचा प्रस्तावो नव्हे ।
पै माते पावसी उपाये । सांचचि येणे ॥ १३८० ॥
सैंधवा सिंधु मिनलिया । जो क्षणु धनंजया ।
तेणे नुरेचि की उरावया । कारण काई ॥ १३८१ ॥
तैसा सर्वत्र माते भजता । सर्व मी होता ।
अहंता निःशेष जाउनि तत्त्वता । मीचि होसी ॥ १३८२ ॥
एवं माझि (माझिये) प्राप्ती वरी । कर्मा लागोनि अवधारी ।
दाविली तुज उजरि । उपायांची ॥ १३८३ ॥

येकायतन=एकस्थानीचें कर, एकत्रित, एक स्थानीचें, एका स्थानाचे कर एकटे, मुख्य (१३५६) ते–तेथ. (१३५७) जियावया–जिव्हा यावया, जिवा यावया. वाचेच्चिया–वाचेच्चिये. वसौटे=वसतिस्थान. (१३५८) ठाइं–ठायी. होय–होयी. उपकरसी=उपयुक्त होसी. (१३६०) सेवकै=सेवकपणा तेवढा आपल्याठायीं ठेव, बाकी सर्व मद्रुपी उरवून मद्रूप पावून त्याची सेवा कर. (१३६१) नमवै–नमवेन–नमन कर, नमवै–नमवै नम – नमवेनः ( वै=खरोखर इत्यादि अर्थी पादपूरण. नमू=वांकणे नमस्कार करणें ) नमन=नम्र होणे. नमस्कार=नम्रतेचे नमन. नमस्य=पूज्य. नमस्या=पूजा. ( १३६२ ) भरलया – भरलेया. तिजयाची – दुजयाची. जगा आंतु – जगा आंत. ठाईल – ठाकेल ( १३६३ ) तेथे–जेथे. मी – मीचि. ( १३६५ ) प्रतिभा = शक्ति, तेज, असाधारण बुद्धि. जळीचि–जैसी जळीची. गाभागोभा=अडथळा गुणत्व गण प्रतिभेनें तें हरकत करणें जें. काहि–केहि. (१३६६) आडवारा =अडथळा, प्रतिबंध. (१३६७) हे दिसता–हे दिसताहे. देहधर्मी–देहमेदामुळें, देह मानल्यामुळें. विरामी=अभावी. (१३६८) या–यया. न होय–नव्हे. झने–झणे. (१३६९) आत्मलिंगाते= आत्मस्वरूपाला आत्माच चितारला जसा. विश्वाभास=दृश्य जग. लाजणे=लज्जा संकोच (१३७०) वेदु–वेधु. निःप्रपंचु–वेढुनि प्रपंच, निष्प्रपंच. आज्ञेचा नटनाच=सत्तेचा प्रताप, हुकुमाचा विलास (१३७१) जगाचाहि (कल्याण कर्ता)–जगाच्या हिती. आक्षेप=अपवाद, स्थापन, निंदा, दूषण. (१३७२) भिदे–विरूदे=चिन्हे. (भिद्=फोडणे) मी हे आर्धे सगळेनि तुवा=मी अर्धा व तुझ्यासकट पूर्ण. (१३७३) येथ–तेथ. जी–जे. (१३७५) भाष्यही (व्याख्या, विवरण)–भाषही=बोलणें, आश्रय. विनोद=खेळ, हौस स्वार्थ, दृष्टि, सुख, देशी–देसी. (१३७६) मी तृषांतुर–मिषांतर=निमित्त सीमा, अंतर (१३७८) तुझया–तुझेया. दानीराया=धर्मात्मा, दात्यामध्यें, श्रेष्ठ, असा देणगी देण्यात राव (आवाजाचा श्रेष्ठ) (१३७९) प्रस्तावो नव्हे–प्रस्ताव नोहे=प्रसंग न–आरंभ न, (आडंबर=प्रारंभ, भपका) (१३८०) सैंधवा–सैंधव= मीठ. मिनलिया–पडलिया. नुरेचि=विरेचि. (१३८१) तैसा=तैसे. निःशेष=पूर्ण. अहंता=अहंकृति अभिमान. तादाम्य=विष्णु, शिव, ब्रह्मा, वायु, वैश्वानर, वाक्यारंभाचे ते आनंद, खेद, दया, अनुमतीचे ते. (१३८२) माझि–माझिये. प्राप्तीवरी=प्राप्तीपर्यंत. उजरी=उत्कर्ष, महत्व, उत्कृष्टपणा. (१३८३)

**आत्मज्ञानानें पवित्र–चांगले असे संत ते माझी परमात्म्याची रूपें होत, संतांचें दर्शन प्रेमानें व्हावें, संतांवर अत्यंत प्रेम असू दे; स्त्रीवर जसें का तसें–मी सर्व जगाचें (प्राण्याचें) वसतिस्थान माझी जी पवित्र नांवें आहेत ती शाश्वत सुखानें जगण्या-करितां वाचेनें उच्चारीत जा कोणतीही मानसिक चिंता मनांत आणू नको, मज एकालाच जाणून शरण ये. तूं सेवक सारे जग माझे रूप तेच सेवेला योग्य समजून सेविलेस म्हणजे प्राण्याविषयीं द्वेष बुद्धि नाहींसी होईल व सर्वत्र मीच आहे ही आत्मभावना दृढ होईल व तू नम्र होशील एवढ्यानेंच तुझा माझा एकांत घडून येईल.**

(ओंव्या १३५६–१३८३)

बहुत काय सांगावें पण तूं आपलें मन हें माझें मोहरणेच एक असें माहेरचें कर, अग्रतः मीच एक असें एकाग्र एकाच ह्या वस्तूंचे स्थानी, ठायीचें कर. तसेंच मीच ऐकिला मजसंबंधीच सर्व कांहीं ऐकण्याचे केलें अशा त्या श्रवणानेंच कीं तूं आपले कान हे भरून घे–श्रवण, मनन, निदिध्यासना पैकीं त्या श्रवणाचे बोलिलेली जी तिनेंच कीं तूं आपले कान भरून घे. नेहमीं परमेश्वराची कीर्ति ऐकिली असे ते कानी भरलेले व्हावे. अहो परमेश्वराची कीर्ती जी तीच कीं ऐकण्यास योग्य आहे. करितां त्या कीर्ती महात्म्याचें नेहमीं ऐकणें कर, व नवविधापैकीं जी श्रवणभक्ति तिनें आपले कान भरून घे जे का मग सहजच **भक्ति जाती** त्याच तेथें ईश्वरत्वच एक सगुणतेचे ते पाहिले ऐकिले जाणारे [श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्–नवविधा भक्ति.] (१३५६)

अहो संत ते तर ह्या ज्ञानासंबंधीं चोखडी चोखाळिलेली अशी ता रूपडी माझी संतच कीं होत. आवडीची अशी–तीच मुळीं, नेहमीं ह्या दृष्टीस पडोत. जशी का कामिनी–सुंदर स्त्री जी ह्या कामासच उत्ते-जित करणारी देह हाच मुळीं उत्तमतेच्या सौंदर्यास आणिला जाणारा ज्या कामुक अशा आवडत्या स्त्रीच्या अथवा सौंदर्य प्राप्तीसाठीं केलेलें कर्म–कामिनी कटाक्षानें तेथें जीवित गोडी आनंदास आणिली जाणारी होते केव्हांहि जीवित गोडीचे गुज तेच भाव पढियंते ते असें देवच तो पंढरिराव भेटला जसा का पाहुणा होऊन आला असें तें अति आवडीचें जीवप्रेम गोडीचें तें मजला नेहमीं आवडावें असें केव्हांहि. तेथें देह वैराग्य अग्निच जसा ब्रह्मत्वावर उभा केला जाणारा. (१३५७)

*सर्वांच्या सर्व वस्तीचें घराचें, राहाण्याच्या जागेचें (अज्ञान रात्रीचे) आश्रयस्थान* ( **औटपीठ** का ओटी पोटच) अशीं जीं माझी चोखट, निर्मळ नांवें रामकृष्ण वासुदेवादि आहेत–तींच कीं आपलें जीवित तें जागतेपणास जीवंतपणास आणण्याकरितां–ह्या वाचेच्या वाटेस, मार्गास वाचा ज्यायोगे शोधिली होते असें तें मार्गितव्यच एक ह्या वाचेस दिलें. वाचेनें उच्चारण्याचें केलें असें होय (जिया–जीव ललचावलेला तो आपल्या जीवित सौंदर्यास यावा, जिव्हा का शब्ददेव वाणीच कीती अग्निदेवतेची ती, ती ब्रह्माग्नि सावयवच त्यावरच उभारली गेली, ह्या जीवदशेस ते शब्द देवनाम दिल्यानें देवपणच कीं उजविले आपले-पणास आणिले गेले जसें.) (१३५८)

येथें आतां कर्मेंद्रियें जीं तींच कीं मुख्यत्वेंकरून सावयव देवपणावर नटली. हातानें कांहीं एक काम काज करण्यानें का पायाच्या चालण्यानें जें कां वाचे विठ्ठल उच्चारावें मग पाउल टाकावें असें (जे कांहीं–) तें तें सर्व मजकरिताच केले असें मग केव्हांही होय. म्हणून असें जें जें कांहीं हातानें करणें केले कां पायानीं चालणें चालले तें मज करिताच कीं केलें. असें कर मीच तेथें मग आहेच आहे असा होय. (१३५९)

हे पांडवा आपल्या स्वतःच्याठायीं अथवा परावा जो प्रकृति–परतंत्र (परवत्=परतंत्र. पिशुन= दुष्ट, नीच, निर्दय, चहाडखोर, गुह्य हरण करणारी सर्वथैव इंद्रियांचे लाड पुरविणारी पिशुने ती.) त्यावरच कीं उपकार करणें, ह्या भवारण्यापासून बाजूस होण्यासाठीं त्रिविध तापापासून सुटण्यासाठीं, तेथें उपयुक्त

होणें, उपयोगाचें होणें, कामास येणें, योग्य करणें जें कांहीं एक) त्यानें तर अहो, त्या यज्ञानेंच कीं, आरजूं तो, इच्छा पुरविली गेली–पूजा आदरानें पूजा करणारा ब्राह्मणच एक कीं झालाच, यजमानत्व संपादिलें, ह्या यज्ञकर्म करण्यानें (असा तूं बरवा योग्य त्या पूज्यतेमुळें पूजा आदर गौरवाचा असा केव्हांहि मग.) (१३६०)

असें हें एक एक जें कांहीं वागणें (करणें उपयुक्त होणें, भाव देवतेस उजविणें) तें किती बरें शिकविण्याचें करूं! पण एवढें एक जाणून निश्चितपणाचें कर कीं, सेवकपण तेवढें आपल्याठायीं ठेव, (सेवकपणच एक वागविलें असा हो! सेवकपणच एक करावें तेवढेंच तूं होऊन ऐस) व मग बाकी सर्व कांहीं मद्रूपी (राहिलें उरविलें माझ्या रूपाचें केलें असें माझे रूपच एक) मानून त्याची सेवा कर (कै म्हणजे शब्द करणें जे तेंच आपल्याठायीं आपुल्याठायींच्या अशाच कीं, शब्द करण्यानें मग दुसरे सर्व कांहीं बाजूंस झाल्यानें मी सेव्य म्हणजे सेवा करण्यांस योग्य असाच करावास कीं. (१३६१)

असें करण्यानें भूत द्वेष तो नाहींसा होऊन मीच एक खरोखर सर्व हें आहे असें समजून नम-, (नम्र हो, नमस्कार कर, नम्रतेनें नमन कर, तेथें नमस्या म्हणजे पूजाच केली, नमस्कारास पात्रता आली. नमलेला, विनीत, वांकलेला, विनय तोच कीं सन्मानिला, आदर गौरवाचा केला होईल) व याजवरच कीं तूं अतिशयतेचा असा माझा आश्रय आधार (माझे गृहपणच एक ते) तूं लाभशील अगदीं जवळचा असा, (स्तुति, पूजा, इत्यादींनी अतिशय असा) माझा आश्रय, आधार तुला लाभेल (तूं त्या लाभाचा होशील.) नच आवडणें जें तेंच द्वेष म्हटलेलें–तेथें आतां त्या भूताचें ठायीं कीं ह्या अशा पूजा यज्ञादींनी पात्रताच आल्यानें ब्रह्मस्थानीचे प्रस्थानच कीं एक दिलें झाल्यानें हाच मी एक जो आहे त्यास सहजपणेंच की अनावड –पण ते विसरून गेलें व पूजा योग्य अशीच ती भूतें केली गेली झाली होतात [यज्ञ भूतांचा पाळणा × × × तुका होऊनि निराळा। क्षरा अक्षरा वेगळा। पाहे निगम कळा। बोले विठ्ठल प्रसादे॥] (१३६२)

व मग सर्व हें जें जग तें भूतमात्रांनीं भरलेलें असें, त्यामध्यें किंवा तेथें मग दुसऱ्या तिसऱ्याची गोष्टच नाहीं. आपणच एकला एक असाच तेथें भाव आम्हास तसेंच तुम्हांस कीं एकांताचा असा होईल, (एकच एक, एकलेच, एकटे असा अमर्यादतेचा अंतच कीं, एकनिष्ठ असा आपलें पसंतपणाचा तो साधुसंताना नेहमीं प्रिय असणारा असा तो एकांतच कीं आपल्या ठायींचा होईल तेथें आपणच एकटे दुसरे का तिसरे असें कोणीही नाहीं. असा ठायींचा तो एकात आम्हां तुम्हां ठाकेल.) (१३६३)

तेव्हां मग अहो! भलतीही जरी स्थिति, दशा, तरीपण मी तो तुजला, तू तो मजला, अगदीं सहजपणेच कीं भोगी भोगिसी–सुखदुःखाचा अनुभव, खाण्यापिण्याचा तो, भोग देणे, चढविणें, देह द्रव्य ते भोगवटयानें सेवनास योग्य केलें असें दैवच एक आई तें असें! दिव्यतेचे असें! तेथें सुख वाढेल–सुख देणारे असें पुण्यच पदरी येईल (पदरी पडेल. पुण्यवान् कीं अहो! असेंच तेथें संबोधणे होईल) आनंदच कीं एक सहज असा सुख देणारा होईल! सर्व जग आनंदमय होईल. हर्ष होईल. आत्म्याचें स्थानच तें आनंदमय कोशाचे तें आनंददायक असें पाहाशील, लाभशील. (१३६४)

मग तिसरेपण जे प्रतिबंध करणारे (अडथळा आणणारें, आडलेपणानें तें बुजणे करणारें तें आडविणारें असें आडलें, थांबलें, नडलें, नच पुरतें झालें असें जें कांहीं तिजेपणाचें तें तृतीय प्रकृतीचें तें नपुंसकतेचें) तें तिसरेपण नाहींसें झालें, निमालें हे अर्जुना तेथें (तर चौथ्या चतुर्थांशानेंच कीं, ब्रह्मत्वेंकरून कीं तुरीय असें जें त्यानेंच चौथी अवस्था जी तिनेंच मग) मी तो तूंच होऊन शेवटी मजला पावशील, मजप्रत येशील, मीच होशील. (१३६५)

देहजळामधील शक्ति तेज का असाधारण अशीं बुद्धि ती देहजळाच्या हालण्यानें (विध्वंसानें, मरणानें, ध्वंसित झाल्यानें) बिंबास येतांना कांहीं अडथळा (गुणत्व, गण प्रतिमेचे ते हरकत करणारे ते, ते मग कांहीं का आहेचे असें होणार नाहीं) होतच नाहीं की. (१३६६)

अहो वारा तो अंबरास (आकाशास) मिळतांना, (अंबर=आकाश, कापड, मेघाचा समुदाय, कापुस) किंवा पाण्यावरील कल्लोळ म्हणजे तरंग तो सागरास मिळतांनां, कोणाचा कांहीं प्रतिबंध त्या मिळतासंबंधी तो कां असणार ? केव्हांहि नसणारच ! (१३६७)

याजकरितां तूं व आम्ही असें तूं तो तूं व आम्ही ते आम्ही) दोनपणाचे ते देहधर्म भेदामुळेंच की दिसत असणारे ते ह्या देहधर्माच्या विरामाने (विसांव्यानें, भेदाचा शेवट झाला असता) तू व आम्हीं असें मीच होत–तेथें तूं तो मीच एक व आम्ही ते केव्हांहि (मीच कां) आम्हीच कीं. (१३६८)

अशा ह्या बोलण्यामध्यें (कांहीं का एकादी शंका घेऊं नको–हे खरेंच कीं असें कशावरून तें असें कांहीं मनांत आणू नको–असेंच आहे कीं नाहीं असें मनशंकित करूं नको.) तुम्हीं ते मी कसा असे वाटू देऊं नको 'तूं व आम्हीं देह धर्म बुद्धि भेद गेल्यावर मीच होत.' अशा ह्या बोलण्यांत कांहीं खरेपणाशिवाय दुसरा कांहीं एक भाव आहे असें नाहीं–देहधर्म गेल्यावर तूं व आम्ही एक मीच अशीं तुझी शपथच कीं एक घेऊन मी सांगतो कीं. (१३६९)

पण तुझी शपथ घेणे जे तें तर आत्मस्वरूपालाच कीं स्पर्श करणें आहे नां ? तेथें आत्माच कीं तो चितारला गेला जसा कांः तेथें **प्रीतीची जाती ती तर लज्जेची** देहाएवढेपणानें असणें जें कांहीं एक तेथें लाजच आली, अशा देहधर्मबुद्धिच्या भेदाच्या आठवणीचे करीत नाहींः प्रीतीची जात ती तर देह भेद विसरून प्रेमच एक ती होते. प्री म्हणजे संतुष्ट करणें का तृप्ति होणे हेंच एक ती प्रीती अनुराग, आनंद आवड ती असल्यानें तेथें देहभाव सांडावा योगभाव सेवावा असे देहभेद विसरणेंच होतें. (१३७०)

येरव्ही पाहिलें असतां हा देहप्रपंचच कीं, अंगी वेढून घेतल्यामुळें, ह्या जगताचा दृश्य आभास तो खरा मानला होतो; पण आज्ञेचा नटनाच (का हुकुमाचा विलास का सत्तेचा प्रताप) तोच कीं ह्या काळासच एक जिंकणारा असा होय. ह्या जगताचा सूत्रधार कलावंत असा तोच ह्या जगाचें सूत्र हातीं धरून (ह्या जगास प्रकाशित करणारा असा तेथें मनुष्यच कीं अभिनय करणारा का प्रकाशित केला जाणारा होतो. तेथें काळ का वेळ का) राहाटी तीच मुळीं आपलीशीं करतो, आवरतो, जिंकतो. (कालांतर तेंच समजविलें होतें ) (१३७१)

असा तो देवच कीं अहो ! सत्यच कीं एक वागविणें हाच त्याचा संकल्प (निश्चय, उद्देश, याहिवर तो तर ह्या सर्व जगाचाहि बापच कीं, ! पिता का पितरच कीं,) असल्यानें ह्या शपथेची फेंक (अपवाद तो कां निंदाच ती टपका, दोष का बलात्कार स्थापना) ती कशास करावी ती असें म्हणशील तर तें असें आहे कीं. (१३७२)

हे अर्जुना ! मी अर्धा व तुझ्यासकट पूर्ण असा तुझ्या छंदानेंच कीं मी आपल्या देवपणाची ती चिन्हें (विरुद्ध अशीं भिडणारी ती कां फोडणारी ती का फोडणारी अशी ती) सोडून दिली, सांडिली कीं, अगा हे अर्जुना माझे तें ब्रीद लक्षण तें तुझ्या सकटच कीं पूर्ण असें व यावरच कीं मी आतां देवच एक होय नां ! (१३७३)

हे धनंजया ! येथें हें असें आहे कीं आपल्या कामकाजासाठींच मदन (इच्छा, भोग्य वस्तुं, पोटीचें घालेपण तें इच्छिण्यास योग्य असें) कां सुंदर अशा वस्तूंच्या इच्छित प्राप्तीसाठीं केलेलें जें कांहीं कर्म–राव जो (का शब्द जो शब्दपणाच्या आवाजास येणारा, रवाचा होणारा.) तो तर आपणच स्वतः आपल्या स्वतःसच कीं, आण शपथ घालतो. स्वतःस शपथेवरच कीं वाहातो, वाहुन नेतो, वाहानाचे करतो, रस्ताच दाखवितो, तसें हें आहे. (१३७४)

आतां यावर अर्जुनानें म्हणू केलें कीं अहो देवा! आपलें बोलणें तें तर अचाट असें आहे असें तें तुमचें बोलणें तें कशास! पण एवढें मात्र खरें कीं आमचें जें कांहीं एक काम्यकाज तें म्हणजे समुद्दत्वें सुंदर असें (जें कांहीं आहे त्याच्या प्राप्तीसाठींच- केलेलें तें) कर्म व्हावें तें तुमच्याच कीं एका नामस्मरणानें कां तुमच्याचमुळें आमची सर्व कामें कर्में होत आहेत कीं, (चाटु=लाडी गोडी. अ=ब्रह्मा, विष्णु, शिव, वायू व वैश्वानर.) (१३७५)

आतां यावर जें कांहीं (सांगत बसशील का) सांगतां सांगतां व्याख्या विवरण, बोलणें आश्रय, विनोद खेळ, हौस स्वार्थ दृष्टि का सुख जें कांहीं देत आहांत तेथें तर तुमच्या ह्या विनोदास तर सीमाच नाहीं असें झालें असें होत आहे. (१३७६)

सूर्य विकासिनी कमळीणीच्याठाई उदक मागणेंच एक असा [कमल उदक, (कमलोद्भव=ब्रह्मदेव.) वन=मागणें, उदक, अरण्य, रान, (वनिता, स्त्री.)] जो कांहीं विकास तो तेथें प्रफुल्लितपण (उमलणे) तें तर सूर्याच्या (रवीच्या) एकाच अंशानें (म्हणजे किरणानें अथवा अणुरेणुनें) होतें. (एकच किरण ने सूर्याचे तेज कीं कमल वनास प्रफुल्लित करते पण ते कसें म्हणावें तर) तेथें नित्य असा प्रकाशच एक अवघा सर्व (प्रकाशच कीं एक नित्य असा, ते किरण देते तो रविचा अंशु, तो देतो, पोहोचवितो.) (१३७७)

सर्व पृथ्वी निववून सागर ते भरले होतात; असें जेवढें कांहीं थोर असें वर्षणें त्या मेघाचें तेथें, मी तर अहो! निमित्तमात्रच की तृषेनें पीडीत असा चातकच एक आहे! (१३७८)

म्हणून तुमच्या औदर्यास मी कांहीं एक निमित्तच आहे (असें म्हणता येत नाहीं-किंवा) तुमचें औदार्य तें कसें आहे तेंच मुळी बोलून दाखविलें माझ्या निमित्तामुळेंच कीं, पण देणगी देण्यांत श्रेष्ठ असें तुम्ही ते तुम्ही मला (शब्द देवाची) प्राप्तीचे (एक मिळकतच एक अथवा समुदायच कीं तुम्हीं होऊन) असावेत असे हे कृपानिधे! आपल्याजवळ मागणें आहे जी. (१३७९)

तेव्हां देव भगवान श्रीकृष्ण म्हणाले कीं असें हें तुझें मागणें तें असोः येथें तूं उगा रहा. येथें तुझें मागणें तें कांहीं तुझी प्रस्तावना नव्हे का प्रसंग वेळ नव्हे (तुझ्या बोलण्याचा आरंभ का प्रसंग नव्हे) पण ह्या अशा उपायानें तूं मजला पोहोचशीलच पावशीलच कीं. (१३८०)

सैंधव जें मीठ त्यास सिंधूच भेटला. मिठास सिंधूच मिळून गेल्यावरच जो कांहीं एक क्षण (दुखविण्याचें करणारा, मरण देणारा) तो कांहीं एका कारणाचा होऊन उरत आहे. (शिलकीनें बाकी उरला आहे) असें होत नाहीं. विश्रांतीच्या (का पर्वाच्या) निश्चयाचें असणें तेथें मग कांहीं एक कारण आत्मवधतेचें असें होऊन निश्चयानें विश्रांति पावणें तें (कां बाकी असावें) असें होत नाहीं.

[सैंधव जें मीठ त्यास सिंधूच भेटला. मीठ तें सिंधूस मिळून गेल्यावर जो कांहीं एक क्षण उत्साह आनंद निश्चय (दुखविण्याचे करणारा मरण देणारा) तो कांहीं एका कारणाचा होऊन उरत आहे, शिलकीनें बाकी उरला आहे असें होत नाहीं. विश्रांति पर्व निश्चयाचें झाल्यानें तेथें मग कांहीं एक कारण आत्मवधतेचें असें होऊन तें उरावें बाकी असावें—बाकी रहावें असें उरतच नाहीं.] (१३८१)

त्याप्रमाणें सर्वत्र सर्वाठायीं मीच कीं भजला, (भजता भजता सर्व कांहीं हे जें आहे तें सर्व मीच कीं परमात्मरूपच एक असें) आपणच तेथें ते सत्तेचे होणे केलें, होणें झालें, तर मग अहंता ती (अ-हंता-विष्णु, शिव, ब्रह्मा, वायु, वैश्वानर वाक्यारंभाचे ते आनंद खेद, दया, अनुमतीचें ते.) निःशेष (म्हणजे पूर्णपणेच कीं तत्त्वतः मुख्यत्वेंकरून, खरें पाहातां,) नाहींशी होऊन मीच तो परमात्माच की असा होशील. (१३८२)

एकंदरित माझ्या प्राप्तीवेरी–प्राप्तीपर्यंत कर्मासच जें कांहीं लागणें तें तेथिलच्या निश्चितपणाची का विचाराची ती उत्कृष्टता महत्व उत्कर्ष मोठेपणा का थोरपणा तो अथवा श्रेष्ठपणावर ओढलेली ती उत्तमतेस आणलेली उपायाची महती अशी ती तुजला दाखविली. (१३८३)

**सर्वं धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥**

धर्म=गुण, स्वभाव, विशिष्ट गुण, चाल, संप्रदाय, प्राविण्य शास्त्रोक्त कर्तव्य कायदा न्याय, अहिंसा, सत्संग जीव. परित्यज्य=सोडून. एकंमाम्=मी जो कोणी एक मुख्य एकटा. शरणंव्रज=गृह रक्षणकर्ता होऊन असावें, असे गृहाचें एका करणें मजला ते. मोक्षयिष्यामि=सोडवीन मुक्त करीन. मा शुचः=दुःख शोक करूं नकोस, अश्रु गाळू नकोस.

अन्वय :—परित्यज्य सर्व धर्मान्। एकं माम्। शरणं व्रज। अहं। सर्व पापेभ्यो त्वां मोक्षयिष्यामि। मा शुचः ॥ ६६ ॥

अर्थ :—सर्व शास्त्रोक्त आचारांना (सर्व मार्गांना कर्तव्य एक तें, मानणे जें धर्मशाळा, धर्मयुक्तता देऊन टाकून) वगळून (पर्वा नच करून वर्ज्य करून सोडून) एक जो कोणी मी मुख्य एकटा तोच असामान्य निश्चळ, अढळ, त्या मलाच रक्षणाकर्ता का घराचें होणें जाणेचें करावें असें केल्यानें मी सर्व पापापासून, [अनिष्टापासून, अधर्मापासून, पातकापासून, दुष्कर्मापासून, दुष्टपणापासून, अपायापासून, नीचपणापासून नष्ट (शिवी) पणापासून तुजला मुक्त करीन, सोडवीन. (मुच=सोडणें, मुक्त करणें, त्याग करणें बाहेर टाकणें, अश्रु गाळणें, बाण फेंकणें, मुक्त होणे, निसटून जाणे.) दुःख, शोक करू नको, अश्रु गाळू नकोस. (श्लोक ६६ वा ओव्या १३८४–१४८६)

**जे आदितं व पांडुसुता। सर्व कर्मे मज अर्पिता।**
**सर्वत्र प्रसन्नता। लाहिजे माझी ॥ १३८४ ॥**
**पाठि माझां तिये प्रसादि। माझे ज्ञान जया सिद्धि।**
**तेणे मिसळिजे त्रिशुद्धि। स्वरूपी माझां ॥ १३८५ ॥**
**मग पार्था तिये ठाई। साध्य साधन होय नाही।**
**किंबहुना तुज कांही। उरेचिनां ॥ १३८६ ॥**
**तरी सर्व कर्मे आपुली। तुवा सर्वदा मज अर्पिली।**
**ते प्रसन्नता लाधली। आजि हे माझी ॥ १३८७ ॥**
**म्हणौनि येणें प्रसाद बळे। नव्हें जुंझाचेनिही आडळे।**
**न टकेचि येकवेळे। भाळलो तुज ॥ १३८८ ॥**
**जैसा (-जे सप्रपंच-) प्रपंच–अज्ञान जाये। तेणे मी येकु गोचरू होये।**
**ते उपपत्तिचेनि उपाये। गीतारूप हे ॥ १३८९ ॥**
**मिया ज्ञान तुज आपुले। नानापरि उपदेशिले।**
**येणे अज्ञान सांडविले। धर्माधर्म जे ॥ १३९० ॥**
**आशा जैशी दुःखाते। वियाली निंदा दुरिते।**
**हे असो जैसे दैन्याते। दुर्भगत्व ॥ १३९१ ॥**
**तैसे स्वर्ग नर्क सूचक। अज्ञान व्याले धर्मादिक।**
**ते सांडुनि घाली अशेष। ज्ञानें येणें ॥ १३९२ ॥**

हाती घेवोनि तो दोरू । सांडिजे जैसा सर्पाकारू ।
का निद्रात्यागे घराचारू । स्वप्नीचा जैसा ॥ १३९३ ॥
नाना सांडिलेनि कवळे । चंद्रीये धुये पिंवळे ।
व्याधी त्यागे कडुवाळे । पण मुखाचे ॥ १३९४ ॥
आगा दिवसा पाठि देउनि । मृगजळ घापे त्यजुनि ।
का काष्ट त्यागे वन्हि । त्यजि जे जैसा ॥ १३९५ ॥
तैसें धर्माधर्माचे टवाळ । दावी अज्ञान जे का मुळ ।
ते त्यजुनि त्यजिजे सकळ । धर्म जात ॥ १३९६ ॥
मग अज्ञान निमालिया । मीच्चि येकु असें अपैसया ।
सनिद्रा स्वप्न गेलया । आपणपे जैसे ॥ १३९७ ॥
तैसा मी येकु वांचुनि काहि । मग भिन्नाभिन्न आन नाहीं ।
सोऽहं बोधे तयांच्या ठाई । अनन्यु होय ॥ १३९८ ॥
पै आपुलेनि भेदेविण । माझे जाणिजे जे येकपण ।
तयाचि नाव शरण । मज येणे गा ॥ १३९९ ॥
म्हणौनि घटाचेनि नाशे । गगनीं गगन प्रवेशे ।
मज शरण येणे तैसे । ऐक्य करी ॥ १४०० ॥
सुवर्ण मणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया ।
तैसा मज धनंजया । श ण ये तूं ॥ १४०१ ॥
वांचुनि सागराच्या पोटि । वडवानळु शरण आला कीरीटी ।
जाळु न टके तया गोठी । वाळुनि दे पां ॥ १४०२ ॥
मजही शरण रिघिजे । आणि जिवत्वेचि असिजे ।
धिग् यया बोला न लजे । प्रज्ञा केवि ? ॥ १४०३ ॥
मग प्राकृतही यया । आंगी पडे जे धनंजया ।
ते दासिरूही की तया— । मान होय ॥ १४०४ ॥
मा मी विश्वेश्वरू भेटे । आणि जिवग्रंथि न सुटे ।
हे बोल नको वोखटे । कानी लाऊ ॥ १४०५ ॥
म्हणौनि मी होऊनि माते । सेवणे आहे आइते ।
ते करी हाता येते । ज्ञानेपणें (ज्ञाने येणे) ॥ १४०६ ॥
मग ताकौनिया काढिले । लोणी मागुते ताकी घातले ।
परी न घेपे कांहीं केले । तेणे जेवि ॥ १४०७ ॥
लोह उभे खाय माती । ते परिसाचिया संगति ।
सोने जालया पुढति । न शेविजे (शिविजे) मळे ॥ १४०८ ॥
हे असो काष्टापासुनि । मथुनि घेतलया वन्हि ।
मग काष्टेहि कोंडौनि । न टके जैसा ॥ १४०९ ॥
तैसे अद्वयत्वें मज । शरण रिघालिया तुज ।
धर्माधर्म हे सहज । लागतील नां ॥ १४१० ॥
अर्जुना काइ दिनकरू । देखत आहे अंधारू ।
कि प्रबोधि होय गोचरू । स्वप्न भ्रमु ? ॥ १४११ ॥

तैसे मजसी एकवटलिया। मी सर्वरूप वांघुनिया।
आन काही उरावया। कारण असें ॥ १४१२ ॥
म्हणोनि तयाचे कांही। चिंती ना आपुला ठाई।
तुझे पुण्य पाप (पापपुण्य) पाही। मीचि होईन ॥ १४१३ ॥
जळी पडलिया लवणा। सर्वही जळ होय विचक्षणा।
तुज मी अनन्य शरणा। होईन तेसा ॥ १४१४ ॥
ते सर्व बंध-लक्षणें। पापें उरावे दुजेपणें।
ते माझे बोधी वायाणे। होऊनि जाईल ॥ १४१५ ॥
येतुलेनि अपसया। सुटलाचि आहासी धनंजया।
घेई मज प्रकाशुनिया। सोडवीन तुज ॥ १४१६ ॥
या कारणें पुढति। हे आधी न वाहे चित्ति।
मज येकासि ये सुमति। जाणौनि शरण ॥ १४१७ ॥
ऐसे सर्वरूपसे। सर्व दृष्टी डोळसे।
सर्व देश निवासे। बोलिले श्रीकृष्णे ॥ १४१८ ॥
तो मग सांवळा सकंकणु। बाहु पसरूनि दक्षणु।
आळंगिला स्वशरणु। भक्तराजु तो ॥ १४१९ ॥

आदि–आधी. (१३८४) तिये–इये. जया–जाय. (१३८५) ते–तेथे. (१३८७) नव्हे–नोहे. टकेचि–ठाकेचि. भाळला–भाळलो जुझांचेनि आडळे भाळलो तुज=युद्धाचा समयाचा प्रतिबंध न जुमानता तुला वश झालो. (१३८८) जैसा प्रपंच–जेणे सप्रपंच. तेणे–येणे. मी येकु–येक मी. उपपत्तीचेनि=युक्तीचेनी. गिता–गीता. (१३८९) अज्ञान–अज्ञानजात. सांडविले–सांदी वियाले–सांडवलें. (१३९०) अशा–आशा. दुखाते–दुःखाते. वियाली–व्याली=प्रसवली. दुर्भगत्व–दुर्दैवत्व. (१३९१) नर्क–नरक. अशेष–अशेख. सांडुनि घाली अशेष=समूळ टाकून दे. (१३९२) दारू–दोरू. घराचारू=प्रपंच (१३९३) कथळे=काविळ, रोगाने. धुये–धुपे=नाहीसे होते. कडु=कडवटपण. त्यागी–त्यागे. (१३९४) आगा–अगा. पाटि–पाटी. (१३९५) टवाळ=अज्ञान. त्यजिजे–त्यजी. (१३९६) सनिद्रा–सनिद्र (१३९७) येकु–एक. सोहं–सोऽहं. (१३९८) म्हणौनि–जैसे. (१४००) जाळुन–जाळुनि. तया गोठी वाळुनि दे पां=ती गोष्ट सोडून दे. (१४०२) यय बोला–बोला इया. न लजे=लाजत नाहीं. (१४०३) प्राकृतही राया–प्राकृताहि राया=सामान्य राजाच्या. दासिरूहि (दासीरू × हातीरू)=दासी बटकुर. मान–समान. (१४०४) जीवग्रंथि–जीवत्वदशा. हे बोल वोखटे कानी लाउं नको=हे वोखटे शब्द कानांनीं सुद्धां ऐकुं नको. (१४०५) येते–ये ते. ज्ञानेपणे–ज्ञानेयेणे. (१४०६) ताकौनिया ताक घुसळल्यावर त्यातून. मागुते माघौते=पुन्हां. घेपेचि=मिळत नाही. (१४०७) परिसाचिया–परिसाचिये. शेविजे–सेविजे. (१४०८) न टके–न ठके=राहात नाहीं. (१४०९) काइ–कांय. स्वप्ना भ्रमु–स्वप्नभ्रम. (१४११) चिंती ना–चिंतीना. (१४१३) पडलिया–पडिलिया. (१४१४) ते–तेथ. सर्व बंध लक्षणे=सर्व बंधाला कारण जे पाप. वायाणे=व्यर्थ. माझे–माझ्या. (१४१५) येतुलेनि–तु येतुलेनि. अपसया–अपैसया. अहसि–आहसि प्रकाशुनिया–प्रकाशोनिया=जाणुन. तुज–तुते. (१४१६) पुढति–पुढति. आधीन–आधी न. (१४१७) सर्वरूपसे–सर्वरूपरूपसे=सर्व रूपाचे रूप, सर्व दृष्टीची दृष्टी, सर्व देशांचे निवास स्थान. (१४१८) तो मग–मग. सांवळा=शामसुंदर. दक्षण–दक्षिण. आळंगिला–आलिंगिला. (१४१९)

**सर्व शास्त्रोक्त आचारांना टाकून असामान्य असा जो मी एक त्याला रक्षणकर्ता करून अस. असें केल्यानें मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन, सोडवीन शोक करूं नको, दुःख करूं नको, अश्रु गाळूं नको.** (१३८४–१४८६)

हे पांडुसुता ! (आदि म्हणजे पहिली मुख्य व आधि म्हणजे मानसिक दुःख कां गहाण जे, तेथे) अगोदरच मुळीं, मजला सर्व कर्में अर्पण केल्यानें सर्व जगीं, सर्व काळ, माझी प्रसन्नताच की कृपाळु अशी संतुष्ट अशीं निर्मळ तूं लाभशील, लाभाचा होशील. (१३८४)

नंतर त्या माझ्या प्रसादतेमध्यें–प्रसन्नतेमध्यें स्पष्टार्थानें कल्याणच एक पुढें येणारें होईल (प्रसाद= देव गुरू इत्यादीकास समर्पण करून शेष राहिलेला पदार्थ.) माझे ज्ञान हें ज्यास सिद्धीचें असें (कल्याणाचें शेवटच्या मुक्तीचे फलोत्पत्तीचें, दैवी शक्तीचें) होईल, त्यानें तर केव्हांहि माझ्या स्वरूपाचेठायीं मिसळावेच (मिसळून असावें, मिसळून जावें स्वरूपाचें होण्यासाठीं अहंता ती सळ दिलेली करावीच.) (१३८५)

तेव्हां मग हे पार्था ! त्या ठिकाणीं–साध्य (साध्य, साधण्यास योग्य, दैव, कल्याण, का शेवटील मुक्ति, फलोत्पत्ति अथवा कार्याची पूर्णता, कार्य सिद्धी) साधनानें (साधन–कार्य घटनेस साह्य करणारे देह बुद्धीचे होणे का देहसाधन वागविणें जे, देह उपकरण, देह आराधन, देह संपादन करणें, देह उपायास घेणे. साधना=पूजा, आराधना, संपादना.) आपल्या ठायीचें होणें व्हावेंच ! कां बरें ! तसें ते होत नाहीं ! असें विचारास पाहात नाहीं. बहुत काय पण तुजला तुझे माझे देहबुद्धिचे तें असें कांहींहीं तेथें उरणार नाहीं (असणार नाहीं). (१३८६)

तुझे आपल्या देहबुद्धिचे होणें कां देहभेदानें असणें तें आतां संपल्यानें–आज ही माझी प्रसन्नता तुजला लाभाची झाली आहे; याचें कारण काय तर तुवा आपली सर्व कर्में सदासर्वदा मजला अर्पण केली असल्यानें ही माझी प्रसन्नता तुजला लाभली आहे. (१३८७)

म्हणून ह्या माझ्या प्रसादाच्या, प्रसन्नतेच्या बळानें (सामर्थ्यानें, सारसर्वस्वानेंच) की, युद्ध समयाचा प्रतिबंध अडथळा न जुमानता तुला वश झालो आहे जें, ते कांहीं ह्या युद्ध प्रसंगामुळें नव्हे तर प्रसादाच्या बळावरच की ! एका वेळेसच की येऊन समुद्रास भरती येते त्याप्रमाणें मी वेळेस म्हणजे प्रसन्नतेस आलों आहें, तुजला वश झालों आहें. (१३८८)

देह प्रपंचरूपी अज्ञान नाहींसें झाल्यावर मीच एक तेथें गोचर होतो सुलभ इंद्रियज्ञानाच्या आटोक्यांत येणाऱ्या दृश्याचा होतो, जसा, तसें हे गीतारूप (गीतेचे ते स्वभाव शरीर आकृति, प्रकार, सौंदर्य वर्ण) ते उपपत्तीच्या म्हणजे युक्तीच्या उपायाचेच असें आहे–मूळ कारण संगतिनें संयुक्तिक सिद्धता येणारी ती मजला सर्व कर्में अर्पण करण्याच्या उपायानें साधनानेंच इलाजानेंच होय की. (१३८९)

तुजला मी आपलें हें ज्ञान अनेक तऱ्हांनी सांगितलें पढविलें, उपदेशिलें, तुजला मी आपल्या जवळचे केलें, व त्यायोगेंकरून अज्ञान ते धर्म संबंधीचे व अधर्म संबंधीचे, (पुण्य का पाप संबंधीचें, कर्तव्य अकर्तव्या संबंधीचे मार्ग अमार्ग संबंधीचे, गुण दोषासंबंधीचे, आचार व्यवहार प्रायश्चित्त संबंधीचे करावें काय न करावें काय ह्या संबंधीचें ) अज्ञानजात समाचरण–समाचार ते तुजकडून टाकविले, सांडविले. (१३९०)

नेहमी आशा धरून असणें, (नेहमीच आशेत फसणें,) ते तर दुःखातें वितें (दुखणेंच एक घेऊन असतें) तेथें निंदा, कुटाळकी तिरस्कार कां दुरित भेद दैन्य पातक संकटेंच की ! असें हें असो. पण दैन्यच एक दुर्भगत्वानें, (दुःखीपणामुळें, दुर्दैवीपणामुळें) तें पाहिलें होतें की, (दैनिक, रोजचें दैन्य हलकेपण, विचित्रच एक.) (१३९१)

तसलेच की हे, अथवा त्याप्रमाणें हें अज्ञान जें आहे तें स्वर्ग नरक इत्यादींना सुचविणारें असें तें (जें कांहीं धर्मादिक म्हणजे पुण्य–पाप, कर्तव्य–अकर्तव्य, मार्ग–अमार्ग, गुण–दोष, व्यापलेलें तें) ह्या ज्ञानानें सर्वथैव पूर्णपणें सांडून टाक, सोडून दे. (१३९२)

दोर (दोरक, दोरिका = दोरी) हाती घेऊन (दारू, लाकुड, पितळ, लाकडाची बाहुली.) जसा सर्पाचा तो आकार (आकृति, चिन्ह, तोंडाचे भाव) सांडावा अथवा झोंप ती त्यजावी, त्यागावी व जसा कां स्वप्नीचा खेळ, सर्वथैव हा घराचार प्रपंच आहे देहबुद्धिचा तो असें समजून त्यागावा (गृह–घर, नाव, संसार, शिकणें. आचार = चालरीत, वर्तणूक, रीती व्यापार.) (१३९३)

किंवा कामिण रोगाचे पाहाणें, सोडल्याने चंद्राच्या ठायींचें पिवळेपण नाहींसें होतें जसें; कां मनाला लागलेली ती क्षयव्यथेची व्याधि नाहींशी केल्यावर तोंडाचें कडुवटपणही नाहींसे होतें. (१३९४)

दिवसास पाठ देऊन (देह दिवसाकडे पाठ करून) मृगजळ तें त्यजिलें करावें: देहबुद्धि त्यागानें, अज्ञान ताप चित्त दोष तो त्यागिला होतो. उन्हास पाठ देऊन मृगजळ तें नच पाहाणें होतें जसा कां लाकुड नच पाहाण्यानें वन्हि तोच त्यागिला कां नच पाहिला होतो: (१३९५)

तसें गुणदोषासंबंधी कां धर्म–अधर्म संबंधीचें जें कांहीं अज्ञान तेंच मुळीं तें मूळ अज्ञान होय, असें दाखवितें: तें अज्ञान मूळ त्यजावें, व सकळही जे गुण–धर्मजात म्हणून आहेत (पदार्थ मात्रांचे मूळ धर्म प्रकार, समुदाय जे आहेत ते) तेहीपण त्यजावेत, देऊन टाकावेत, दान करावेत: (१३९६)

तेथें मग अज्ञान (अविद्या, अजाणपण) नाहींसें झाल्यावर, निमाल्यावर, आपसुकच की मग मीच एकटा तेथें मुख्य असा असणार केव्हांहीं ! अहो झोपेसहीत ही जर स्वप्न नाहींसें झालें (लपलें) तर, मग तेथें आपल्या सर्वस्वानें असणारा आपण स्वतःच कीं एकटा नां ! (१३९७)

तसें मी एकच एक, एकलाच एकटा, जसा, त्या मज एकावांचून कांहींहीं मग दुसरें भिन्न अथवा अभिन्न असें नाहींच, तेथें जो मी एक त्याचे ठायींच कीं, 'तोच मी परमात्मा' अशा भावानें अनन्य हो. (१३९८)

आपलेपणाच्या भेदाशिवाय जें कांहीं होणें आपलें स्वतःचें भिन्नपण न ठेवतां माझें येकपण जाणणें जें तेंच की मज शरण येणें असें होय. त्याचेंच नांव शरणगृह आश्रय आधारानें मजला पोहोंचणें होय. (१३९९)

असें आहे म्हणून घट नाहींसा झाल्यावर कां फुटल्यावर गगन ते गगनींच प्रवेशतें की तसें मजला शरण येणें गृहाचें करणें अंतःकरणीच्या आवकाशाचें करणें जें तेथें ऐक्यच एक करून ऐस. (१४००)

सुवर्णाचा केलेला मणि तेथें मणि तो सर्वथा सुवर्णास शरण आला, त्या सुवर्णावरच मुळीं तें त्याचें मणिपणाचें होणें जसें का तरंग तो पाण्यामुळेंच की तेथें पाणीच एक त्या तरंगास आश्रय, म्हणून तरंग तो पाण्यास केव्हांही शरणच (तें पाणी आश्रय देणारें म्हणून) तसा मला हे धनंजया ! तू शरण ये (माझा आश्रय घे) माझा आश्रय सर्वथा तोच एक तुझें आहे पण तुजला पोहोचविणारा ना ! म्हणून तसा मला आश्रयाचा कर, शरण, संरक्षण, रक्षण, घराचा रक्षण कर्ता कर. मी तुला सर्व पापासूनच, (कलंका पासून घाणेरडेपणापासून) मुक्त करीन. (१४०१)

असा सागराच्या पोटी असणारा वडवाग्नि, सागराच्या आश्रयाचा, सागराच्या पोटींचा सर्वथैव झाला, सागरपणच तें त्याच्या रक्षणास आलें, म्हणून तो वडवानळ अग्नि जाळू शकत नाहीं, अशी ती गोष्ट आहे. (१४०२)

मलाही शरण रिघावें कर मग तुवां तें आमल्या जीवितानें असावें (जीव = वांचणें जगणें. जीव = प्राणी, शरीर, आत्मा, बृहस्पति, प्राण. जीवित = जिवंत केलेला जीवन जीविन् = वाचणारा) प्राणीपणानें (जीवत्वानें प्राणपणानें, आत्मपणानें) (मोठा विपुल असा प्रकाश, बोल, वीणा वाणी) असावें असे हें बोलणें येथें धिक् (म्हणजे निंदा निर्भत्सना अवज्ञा इत्यादि अर्थी) होय की ! तेथें प्रज्ञा जी बुद्धि ती लाजत नाहीं काय ? (प्राज्ञ = बुद्धिमान्, ज्ञाता. प्राज्ञा = बुद्धि बुद्धिमान स्त्री.) (१४०३)

तेथें मग त्या लाजलेल्या अशा प्रज्ञेच्या आंगी—जेव्हां कां (मजलाच शरण कर जीवित बाणा बाळगणें) प्राकृत म्हणजे मूळचे हलके ग्राम्य तें घडतें (पडतें, येतें, आंगीचें होतें, असतें, आहे असें होतें) जें, हें धनंजया ! तें दासिरू (दासी बटकुरही कां बटीक) तरीपण तें प्रज्ञेसमान बुद्धिसारखेपणाचें (नाभिस्थानी रहाणारा वायू) असें होतें नां ! त्यास परिमाण, इयत्ता, पूज्यता, सत्कार, अभिमान, गौरव मानवला होतो कीं, (मानीपणा रागीटपणा, गर्विष्टपणाच एक तेथें येतो कीं.) (१४०४)

'मा' मापणे, लक्ष्मी, माता (अथवा निषेध, विकल्प निंदा इत्यादि अर्थी) मी अहो ! मी विश्वेश्वर शिव-मेटत आहे व जीव ग्रंथि ती सुटत नाहीं असें हे शब्द कानांनी सुद्धां ऐकू नकोस. कानीं सुद्धां लावून घेऊ नको. (विश्व = जग, ब्रह्मांड, सगळा ईश्वर = स्वामी परमेश्वर, महादेव, श्रेष्ठ, शक्तिमान) (१४०५)

याजकरितां मीच होऊनि मजला आइते असे सेवणेच एक आहे. असें तें सेवणें त्या ज्ञानानें हातास येत आहे, असें कर, आचर, ज्ञान (बोध बुद्धि, जाणीव, किंमत, गृह, उद्योग, वेतन द्रव्य पैसा) (स्तुति, प्रशंसा, स्तवानें ज्ञान होऊन तें करावें ज्ञान ) होऊन तें करावें. ज्ञानच एक तें परिसमाप्यते असें कर. (ज्ञानेंद्रिय ज्याच्या द्वारें ज्ञान होतें असें इंद्रिय ) (१४०६)

मग ताक घुसळून त्यामधून काढलेलें लोणी तें पुन्हां माघारी ताकामध्यें घातलें असतां जसें ताकांत मिळून जात नाहीं; तें कांहीं त्या ताकानें कांहीं केल्या आपल्यांत मिळवून घेतलें जात नाहीं जसें, त्याप्रमाणें (१४०७)

लोखंड—चित्त स्वभाव—तें उभ्या उभ्याच कीं मातीचें होतें पण तें जीवित सुवर्ण, अक्षर, बुद्धि परिसाच्या संगतीनें सोनें झाल्यास पुन्हां मातीनें (पाप कलंक घाणेरडेपणानें) शिवलें जात नाहीं स्पर्श केलें होत नाहीं. (१४०८)

असें हें असो पण काष्टापासून (लाकडापासून) वन्हि तो शास्त्रोक्तरीत्या अरणीनी मथुन (रगडून, विध्वंस जर्जर करून) जबरीनें नेला तर मग लाकडामध्येंहीपण तो कोंडून रहात नाहीं. (शास्त्रोक्त अग्नि ठेवून होम करणें जे आहुती, अग्निकुंड.) (१४०९)

माझ्या अद्वयपणावर मजला शरण आले तर मग तुजला तेथें गुणधर्म का अधर्म रूपी पापे ती लागणार नाहींत. (१४१०)

हे अर्जुना ! दिन दिवस अहोरात्र सूर्य तो कधीं काळीं अंधार पाहातो ? अहो तो तर सर्व दिवसच (किंवा, प्रबोधा, प्रबोध, प्रबोधी म्हणजे ) जागृतीमध्यें काय स्वप्न भ्रम तो प्रत्यक्ष होतो. (१४११)

तसें मजला एकवटून मेल्यास, मजसी एकरूप झाल्यास, मी सर्व रूप जसा तेथें आन, दुसरें कांहीं एक उरण्यास कारण तें कसलेंही नाहींच. (१४१२)

म्हणून दुसऱ्या कांहीं एका कारणासंबंधी (जेथें कारणच मुळीं उरलेलें नाहीं तेथें त्यासंबंधी) कांहीही चिंतू नको, ( विचार करू नको, दुसरी भावना, स्मरण, चिंतन, विचार ती चिंताच एक, काळजीच एक, आपल्या ठायीं वाहू नको.) असा जेव्हां मजशीं एकरूप, सर्वरूप होशील तेव्हां तुझें पाप पुण्य मीच होईन जाण. (१४१३)

पाण्यांत (सागरांत) पडलेल्या मिठास सर्व कांहीं पाणीच तें एक सागरच झालें; तसें हे चतुरा पंडिता, तुला अनन्यशरण आलेल्यास सर्वरूप, मी तसा एकरूप होईन. (१४१४)

असें सर्व बंधाला कारण पाप जें दुजेपणामुळें उरतेंच असें तें माझ्या बोधानें ज्ञान जागृतीनें व्यर्थ असेंच होऊन जाईलः (१४१५)

एवढ्यानेंच कीं अगदीं सहजासहजी (आपोआपच, आपसुखच, अपसयाच) हे धनंजया! (त पापापासून सुटलाच आहेस. मजला जाणून घे, मला स्पष्ट करून घे) मला प्रकाशून घे मी तुला सोडवीन. (१४१६)

या कारणास्तव पुन्हां पुन्हां हे आधीचे असे मानसिक दुःख (गहाण मनोव्यथा असें) तें आपल्या अंगीं चित्तीं वाहूं नको (त्याचें ओझें वाहाण्यास आपल्या चित्तास लावूं नको.) मज एकासच मुख्य जो कोणी एक आहे त्यास जाणून घे. हे सुमती मजला शरण ये मजला आश्रयाचे कर. (१४१७)

याप्रमाणें (स्वानुभवउक्तयः) सर्व रूपें ज्याच्या योगानें रूपवान होतात, सर्व अवलोकन शक्तीची शक्ती, सर्व नेत्रांचेहि नेत्र, सर्व बुद्धीचीही बुद्धि, सर्वांठायीं घर रहाण्याचें ठिकाण का आधार आहे असें भगवान त्या श्रीकृष्णांनी असें म्हणितलें. (१४१८)

अहो तो सांवळा श्यामसुंदर ज्याच्या हातांत यज्ञकंकण आहे असा, त्यांनीं आपला दक्षिण उजवा, दक्षिणेचा उदार चतुर, (दक्षणु=दक्ष प्रजापतिपैकीं एक दक्ष, चतुर, शहाणा) बाहु पसरून त्या शरण आलेल्या भक्तराज अर्जुनास आलिंगिलें. (१४१९)

न पवता जयाते । काखेसूनि बुद्धिते ।
बोलणे माघौते । वोसरले ॥ १४२० ॥
ऐसे जे कांहीं येक । बोला बुद्धीसी अटक ।
ते देयावे या मिस । खेवाचे केले ॥ १४२१ ॥
हृदयीं हृदय येक जाले । ये हृदयींचे ते हृदयी घातले ।
द्वैत न मोडता केले । आपणा ऐसे अर्जुना ॥ १४२२ ॥
दीपे दीपु लाविला । तैसा प्रसंगु तो जाला ।
असता द्वैताऽद्वैत केला । श्रीकृष्णे पार्थु ॥ १४२३ ॥
तेव्हां सुखाचा मग तया । पुरू आला धनंजया ।
तेथ वाड तरी बुडौनिया । ठेला देवो ॥ १४२४ ॥
सिंधु सिंधूते पावो जाये । तेथ पावणे ठाके दुणा होये ।
वरी रिगे पुरवणिये । आकाशही ॥ १४२५ ॥
तैसे दोघाचे (तया) मिळणे । दोघी नावरे जाणावे कवणे ।
किंबहुना श्रीनारायणे । विश्व कोंदले ॥ १४२६ ॥
एवं देवाचे (वेदाचे) मूळसूत्र । सर्वाधिकारैकपवित्र ।
श्रीकृष्णे गीता शास्त्र । प्रकट केले ॥ १४२७ ॥
येथ गीता मुळ वेदा । ऐसे केवी पा आले बोधा ।
हे म्हणो तरी प्रसिद्धा । उपपत्ती सांगो ॥ १४२८ ।
तरी जयाचां विश्वासि । जन्म जाले वेद राशीसी ।
तो सत्य प्रतिज्ञ पैजेसी । बोलिला स्वमुखे ॥ १४२९ ॥

म्हणौनि वेदा मूळभूत । गिता म्हणो हे होय उचित ।
आणीकही येकी येथ । उपपत्ति असें ॥ १४३० ॥
जे न (नशत) न ता (नासता) स्वरूपे । जयाचा विस्तारू जेथ लपे ।
ते तयाचें म्हणिपे । बीज जगी ॥ १४३१ ॥
तरी कांडत्रयात्मकु । जो शब्दराशी अशेखु ।
गीते माजी असे रूखु । बीजी जैसा ॥ १४३२ ॥
म्हणौनि वेदाचे बीज । श्रीगीता होय हे मज ।
गमे आणि सहज । दिसत आहे ॥ १४३३ ॥
जे वेदाचे तिन्ही भाग । गिते उमटले असती चांग ।
भूषण रत्नी सर्वांग । आपुले जैसे ॥ १४३४ ॥
तियेची कर्मादिके तिन्ही । कांडे कांड कोणेस्थानी ।
गिते आहाती ते नयनी । दाखऊ ऐक ॥ १४३५ ॥
तरी पहिला अध्यावो । तो शास्त्र प्रवृत्ति प्रस्तावो ।
द्वितीया सांख्य शास्त्र सद्भावो । प्रकाशिला ॥ १४३६ ॥
मोक्षदानी स्वतंत्र । ज्ञान प्रधान हे शास्त्र ।
येतुलाले जे दुजा सूत्र । उभारिले ॥ १४३७ ॥
मग अज्ञाने बांधिलिया । मोक्षपदी बैसावया ।
साधना रूप तो तृतिया— । अध्याय बोलिला ॥ १४३८ ॥
जे देहाभिमान बद्ध । सांडुनि काम्ये निषिद्धें ।
विहित परी अप्रमादे । अनुष्ठावे ॥ १४३९ ॥
ऐसेनि मद्भावे कर्म करावे । हा तिजा अध्यावो जो देवे ।
निर्णय केला ते जाणावे । कर्म कांड येथे ॥ १४४० ॥
आणि तोची नित्यादिक । अज्ञानाचे अवश्यक ।
आचरता मोचक । केवी होय पां ॥ १४४१ ॥
ऐसी अपेक्षा जालया । बद्ध मुमुक्ष ते आलया ।
देवे ब्रह्मार्पणत्वे क्रिया । सांधितली ॥ १४४२ ॥
जे देह वाचा मानसे । विहित निफजे जे जैसे ।
ते येका ईश्वरोद्देशे । किजे म्हणितले ॥ १४४३ ॥
हेचि ईश्वरी कर्मयोगे । भजन कथनाचे खागे ।
आदरिलेसे संभोगे । चतुर्थाचेनि ॥ १४४४ ॥
ते विश्वरूप अकरावा । अध्यावो सांपडे जंव आघवा ।
कर्मे ईशु भजावा । हे बोलिले ॥ १४४५ ॥
हे अष्टाध्यायी उघड । जाण येथें देवताकांड ।
शास्त्र सांगतसे आड । मोडुनि बोले ॥ १४४६ ॥
आणि तेचि ईशप्रसादे । श्रीगुरू संप्रदायलब्धे ।
सांच ज्ञान उद्बोधे । कोवळे जे ॥ १४४७ ॥
ते अद्वेष्टादि प्रभृति की । अथवा अमानित्वादिकी ।
वाढविजे म्हणौनि लेखी । बारावा गणु (गुण) ॥ १४४८ ॥

तो बारावा अध्यावो आदी । आणि पंधरावा अवधि ।
ज्ञान फळ पाक सिद्धि । निरोपणासी ॥ १४४९ ॥
म्हणौनि चौहि इही । ऊर्ध्वे मूळांती अध्यायी ।
ज्ञान कांड ये ठाई । निरोपिजे ॥ १४५० ॥
एवं ज्ञान कांडत्रया निरोपणी । श्रुतीचि हे कोडिसवाणी ।
गिता पद्यरत्नांची लेणि । लेइली आहे ॥ १४५१ ॥
हे असो कांडत्रयात्मक । श्रुती मोक्षरूप फळ येक ।
बोभाये जे अवश्यक । ठाकावे म्हणे ॥ १४५२ ॥
तयाचेनी साधने ज्ञानेसी । वैर करी जो प्रतिदिवशीं ।
तो अज्ञान वर्गु षोडशी । प्रतिपादिजे ॥ १४५३ ॥
तोचि शास्त्राचा बोलावा । घेऊनि वैरी जिणावा ।
हा निरोपु तो सतरावा । अध्यावो येथ ॥ १४५४ ॥
ऐसे प्रथमा लागौनि । सतरावा लाणि करूनि ।
आत्मविश्वासु विवरोनि । दाविला देवे ॥ १४५५ ॥
तया अर्थजाता अशेषा । केला तात्पर्याचा आवांका ।
तो अठरावा हा देखा । कळसाध्यावो ॥ १४५६ ॥
एवं सकळ संख्या सिंधु । श्रीभगवद्गीता प्रबंधु ।
हा औदार्ये आगळा वेदु । मुर्तु जाला ॥ १४५७ ॥
वेद संपन्न होय ठाई । परि कृपणु ऐसा आनु नाही ।
जे कानी लागला तिही । वर्णाचियाचि ॥ १४५८ ॥
येरा भवव्यथा ठेलया । स्त्रीशूद्रादि प्राणिया ।
अनवसरू मांडूनिया । राहिला आहे ॥ १४५९ ॥
तरी मज पाहाता ते मागील उणे । फेडावया गीतापणे ।
वेदु ठेला (वेठला) भलतेणे । सेव्य होआवया ॥ १४६० ॥
नाहे अर्थी रिगौनि मनी । श्रवणे लागौनि कानि ।
जप मिसी वदनी । वसौनिया ॥ १४६१ ॥
गीतेचा पाठु जाणे । तयाचेनी संगतीपणे ।
गीता लिहुनि वाहाणे । पुस्तक मिसे ॥ १४६२ ॥
ऐसिया मिसकटा । संसाराचा चोहटा ।
गवांदी घालित चोखडा । मोक्ष सुखाची ॥ १४६३ ॥
परी अकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया ।
रविदीप्ति राहटावया । आवारू नभ ॥ १४६४ ॥
तेवी-उत्तम अधम ऐसे । सेविता कोण्हाहि न पुसे ।
कैवल्यदाने सरिसे । निववीत जगा ॥ १४६५ ॥
यालागी मागिली कुटी । भ्याला वेद गितेच्या पोटि ।
रिगाला आता गोमटि । कीर्ती पावला ॥ १४६६ ॥
म्हणौनि वेदांची सुसेव्यता । ते हे मूर्ति जाणे श्रीगिता ।
श्रीकृष्णे पांडुसुता । उपदेशिली ॥ १४६७ ॥

परि वच्छाचेनि वोरसे । दुभते होय घरोद्देशे ।
आले पांडवाचे मिसे । जगदोद्धरणा ॥ १४६८ ॥
चातकाचे कणवे । मेघ पाणियेसी धांवे ।
तेथ चराचर अवघे । निवाले जेवी ॥ १४६९ ॥
का अनन्यगति कमळा— । लागी सूर्य ये वेळोवेळा ।
कि सुखिया होइजे डोळा । त्रिभुवनीचा ॥ १४७० ॥
तैसे अर्जुनाचेनि व्याजे । गिता प्रकाशु श्रीराजे ।
संसारा येवढे थोर वोझे । फेडिले जगाचे ॥ १४७१ ॥
सर्वशास्त्र रत्नदीप्ती । उजळिताही त्रिजगति ।
सूर्यु नव्हे लक्ष्मीपति । वक्त्राकाशीचा ॥ १४७२ ॥
बाप कुळ ते पवित्र । जेथिचा पार्थु या ज्ञानाचे पात्र ।
जेणे गिता केले स्वतंत्र । आवारू जगा ॥ १४७३ ॥
हे असो मग तेणे । सद्‌गुरू श्रीकृष्णे ।
पार्थाचे मिसळणे । आणिले द्वैता ॥ १४७४ ॥
पाठी म्हणतसे पांडवा । शास्त्र हे मानले कीं जिवा ।
तेथ येरू म्हणे देवा । अपुलिया कृपा ॥ १४७५ ॥
तरी निधान जोडावया । भाग्य घडे गा धनंजया ।
परी जोडले भोगावया । विपाये होय ॥ १४७६ ॥
पै क्षीरसागरा येवढे । अवरिजे दुधाचे भांडे ।
सुरा असुरा केवढे । मथिता जाले ॥ १४७७ ॥
तै सायासहि फळा आले । जे अमृतही डोळा देखिले ।
परि वरील चुकले । जतनेते ॥ १४७८ ॥
येथ अमरावा वोगरिले । ते मरणाचि लागी जाले ।
भोगु नेणता जोडले । ऐसे आहे ॥ १४७९ ॥
नहुष स्वर्गाधिपति जाला । परी राहाटीसी भांबावला ।
तो भुजंगत्व पातला । नेणसी काई ॥ १४८० ॥
म्हणौनि बहुता पुण्ण्या या । तुवां केले धनंजया ।
आजि शास्त्र राजा यया । जालासि विषो ॥ १४८१ ॥
तरी याचि शास्त्राचेनि । संप्रदाये पांघुरौनि ।
शास्त्रार्थ हा निकेनि । अनुष्टी हो ॥ १४८२ ॥
येऱ्हवी अमृत मथना— । सारिखे होईल अर्जुना ।
जरी रिघसी अनुष्टाना । संप्रदायेवीण ॥ १४८३ ॥
गाय धड जोडे गोमटी । ते तैचि (पय दे) पियो ये कीरीटी ।
जरि जाणिजे हातवटि । सांजवणेची ॥ १४८४ ॥
तसा श्रीगुरू प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे ।
परी ते फळ संप्रदाये । उपासिलेनि ॥ १४८५ ॥
म्हणौनि शास्त्री जो ईये । उचित संप्रदाय आहे ।
तो आईक आता बौहे । आदरेसी ॥ १४८६ ॥

बुद्धिसह शब्दमार्गे हटतो. ज्या ब्रह्म वस्तु स्वरूपाला प्राप्त होतांच बुद्धि ती काखेंत मारिली होऊन यतोवाचानिवर्तन्ते. (१४२०) अटक=बोल व बुद्धीला नच आकळणारें. देयावया–द्यावया. खेवाचें मिस= आलिंगनाचे निमित्त. (१४२१) द्वैत=देवभक्तपण. (१४२२) प्रसंगु–परिष्वंग=आलिंगन प्रसंग. असता द्वैताद्वैत–द्वैत न मोडतां. श्रीकृष्णे–आपणपे. (१४२३) वाढ मोठा पूर. (१४२४) दोघांचे तया–तया दोघाचे दोघी–दोघा. (१४२६) देवाचे–वेदाचे. सर्वाधिकारैक–पवित्र=सर्वांना जेथें अधिकार आहे असें एक अतिशय पवित्र. (१४२७) म्हणो–म्हणाल. उपपत्ति=कारणाचें सयुक्तिकपण. (१४२८) वेदराशीसी–वेदराशी. पैजासी–(पैजांशी)–पैजेसी. (१४२९) नसता–नशत=नाश पावत नाहीं. (१४३१) कांडत्रयात्मक=कर्म उपासना ज्ञानरूप. शब्दराशी=वेद. (१४३२) तिन्ही वेदांचें=ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद. आपुले=शोभले. (१४३४) काडे कांड कोणे–कांडे कोण कोणे. स्छानि–स्थानि. (१४३५) द्वितयी–द्वितीय=दुहेरी, दोन, जोडी द्वितीयी=तिथी, पत्नि, द्वितिया विभक्ति द्वितीय=दुसरा, पुत्र, मित्र, सहाय, शास्त्र–साख्य. सद्भाव=ज्ञान विचार (१४३६) दुजा–दुजी. येतुलाले=अशा प्रकारे. (१४३७) बाधिलया–बांधलेया. साधनारूप–साधनारंभ. अध्याय–ध्यायी अध्यायी. (१४३८) बध्दे–बंधे. काम्ये–काम्य. (१४३९) मद्भावे. सद्भावे अध्यायो जो–अध्यायी. (१४४०) मुमुक्षुते–मुमुक्षते. (१४४२) निफजे–निपजे. येका–एक. किजो–किजे (१४४३) खागे=स्थान. आदरिलेसे संभोगे–आदरिले शेषभागे. (१४४४) अध्यावो सापडे–अध्याय संपे. कर्म–कर्मे. हे–हे जे. (१४४५) अष्टाध्याई–चौथ्यापासून अकराव्या अखेर. शास्त्र सांगतसे आडमोडोनि बोले=सर्व प्रतिबंध निवारून गीताशास्त्र सांगत आहे. (शास्त्रीचे प्रतिबंध निवारून सांगत आहे.) (१४४६) तोचि–तेणेचि. इष–ईश. सांच ज्ञान उद्‌बोधे= सत्य–ज्ञान उत्पन्न होते. (१४४७) अमनित्वा दिके=निरभिमानादीच्या हिशोबात. लेखि–लेखी. गुण–गणूं. (१४४८) अध्यावो–अध्याय. निरोपणासी निरुपणासी (१४४९) चौही–चहूंही. ऊर्ध्वमूळांती=पंधराव्या अध्यायाच्या शेवटपर्यंत. निरोपिजे–निरूपिजे. (१४५०) एवं ज्ञान–एवं. काडत्रया निरोपणि–कांडत्रय निरूपिणी. श्रुतीची–श्रुतीच. कोडिसवाणी=लहानगी, गोजिरवाणी. (१४५१) बोभाये–बोभावे=गर्जुन सांगते. म्हणे–म्हणौनि. (१४५२) साधने–साधन. (१४५३) बोलावा–बोळावा=साह्य, सहकार सोबती करावा. सत्रावा–सतरावा. (१४५४) ऐसे–ऐसा. सत्रावा–सतरावा. लाणी=सीमा, शेवट. आत्मविश्वासु–आत्मविश्वासु =देवाचा आपला निश्वास, जो वेद (१४५५) अवांका–आवांका=विचार. कळसाध्यायो–कलशाध्याय= कळसाचा अध्याय, शिखर (१४५६) संख्या सिंधु (सिध्दु)–सांख्य सिंधु. (१४५७) संपन्न होय ठाई= =मोक्षदानी समर्थ. अनु–आन. (१४५८) स्त्रीशूद्रादि–स्त्रीशूद्रादिका. अनवसर=प्रतिबंध, अटकाव, अप्रासंगिकपण. (१४५९) ठेला–वेठला=(वेद) अवतरला, आकारास आला, गीतारूपाने. भलतेणे= पाहिजे त्याने, वाटेल त्याने. (१४६०) जपमिसी–जपमिषे. (१४६१) गीतेचा–ये गीतेचा. जाणे–जो जाणे. संगतीपणें–सांगातीपणें. लिहुनि–लिहोनि. मिसे–मिषे. (१४६२) मिसकटा=प्रकारांनी, रूपांनी. चोहटा =चव्हाट्यावर. गवांदी=अन्नसत्र, सदावर्त. चोखडा–चोखटा. (१४६३) अवारू–आवार=अवकाश. (१४६४) शेविता–सेविता. कोण्हाहि–कवणानेहि. (१४६५) मागिली कुटी ध्याला वेद=मागच्या निंदेला भ्यायलेला वेद. (१४६६) मूर्ती–मूर्त. जाणे–जाण. (१४६७) वच्छाचेनि–वत्साचेनि वोरसे=प्रेमानें घरोद्देशे–घरा उद्देशे. आले–जाले. पाडवाचे–पांडवाचेनि. मिसे–मिषे. जगदोध्दारण–जगदुद्धरण. (१४६८) पाणियेसि=पाण्यासहित. अघवे–आघवे. (१४६९) अनन्यगति कमळा=एकनिष्ट कमळासाठीं (१४७०) प्रकाशु–प्रकाशुनि. (१४७१) उजळिताही–उजळिता हा. वक्ताकाशीचा–वक्त्राकाशीचा. सर्वशास्त्ररूप रत्नाचे तेज त्रैलोक्यांत प्रगट करणारा, हा भगवान श्रीकृष्णमुखरूपी आकाशातील सूर्यच होय. नव्हे काय? (१४७२) बाप=मोठे श्रेष्ठ. ज्ञानाचे–ज्ञान. अवारू–आवार (१४७३) पाटि–पाठी. आपुलिया कृपा= आपल्या कृपेने हे समजले. (१४७५) निधान=ठेवा, गुप्तधन, ऐश्वर्य. विपाये=कदाचितच (१४७६)

अवरिजे-अविरजी=नच घातले आहे विरजण ज्या दुधाच्या भांड्यांत. विरजा=साय. (१४७७) ते सायासाही-ते साहसही. वरील-वरचिली. जतनेते=रक्षण करण्याची हतोटी. (१४७८) वोगरिले अमरत्वा =अमरत्व मिळावे म्हणून पानी वोगरिले म्हणजे ताटामध्ये वाढले. भोगु-भोगो. (१४७९) राहटीसी-राहटी=अनुभव, वर्तन, राहाटीत चुकला. पातला-पावला. (१४८०) बहुता-बहुत पुण्या या तुवा-पुण्य तुवा. आजि-आणि. इया-यया. विषो-विषयो. (१४८१) याचि-ययाचि. पांघुरौनि=अंगी धारण करून. निकेनि=उत्तम प्रकारे करून. (१४८२) पीवो-पय. ये-दे. पय पीवो ये-पय पीवो दे. जरी-जै. सांजवणेयी-सांजवणीची=दूध काढण्याची हातवटी, हतोटी. (१४८४) फळ-फळे. उपासिलेनि-उपासिलिया. (१४८५) शास्त्रे ज्या इये-(ज्याचे=वडीलपण.)-शास्त्री जो इये. आइक-ऐक. बौहे-बहुवे. [इज्यः (यज)=ऐक्य शोभणें. इज्यः (यज्)=देणगी, ऐक्य, पूजा, यज्ञ, गुरु, परमेश्वर, बृहस्पति. ईजान =यज्ञ करणारा यजमान] (१४८६)

(ज्या ब्रह्मवस्तूला) जी ब्रह्मवस्तू प्राप्त न होतांच, मुळीं बुद्धी ती कांखेंत का बगलेंत-मारिली होऊन शब्द तो बुद्धीसह मागें हटतो, तेथें बोलणें तें मागेंच पडतें, बोलास येत नाहीं. (१४२०)

असें जें कांहीं एक आहे तें बोलास तसेंच बुद्धिसही नच आकळणारें तें देण्याकरितां आलिंगनाचें (आलिंगाचें) एक निमित्त केलें-मिस तें आलिंग-आलिंगनच एक कीं जें कां ही ब्रह्म वस्तु द्यावीच द्यावी म्हणून तेथें आलिंगन आलिंग झालें. (१४२१)

तेव्हां हृदयाचे ठायीं हृदय तें एक झालें. या हृदयीचें त्या हृदयीं घातलें; तेथें देव व भक्तपण असे द्वैत नच मोडतां, आपणा स्वतःसारखेंच कीं देवांनीं अर्जुनास केलें. (१४२२)

दिव्यानें दिवा (लाविला) लावावा तसा तो आलिंगन आलिंग प्रसंग (समारंभ) झाला. द्वैत नच मोडतां-दोघांचे देह तसेंच असतां (द्वैत असतांना अद्वैत) श्रीकृष्णानीं स्वत: आपणच ते जसें, असा पार्थ केला. (१४२३)

तेव्हां अतिशय सुखाचा असा पूरच एक त्यास धनंजयास आला कीं, तेथें तो सुखाचा पूर, मोठा जरी तरीपण त्यांत देव बुडून गेले. (१४२४)

सिंधू सिंधूस भेटू गेला, तेथें भेटणें तें स्थिर होऊन दुपटीचें दुणें असें होतें. तेथें तर त्या भेटीच्या पुरवणी साह्यासाठीं आकाशही त्या (आलिंगनास) भेटीसच पुरतें करीत आहे जसें. (१४२५)

तसें त्या दोघांचे मिळणें, भेटणें आलिंगनाचें होणें, तें दोघांनाही आवरेना. हें कुणीं तें जाणावें! बहुत काय पण श्रीनारायणांनीं विश्वच तें कोंदले भरलें आहे असें झालें. (१४२६)

## गीताअर्थी तीन कांडांची उत्पत्ती :—

या प्रमाणें गीता अर्थामध्यें तीन कांडांची उत्पत्ति प्रगट करीत आहे-(स्पष्ट करीत आहे, सांगत आहे) वेदाचे-(वेद=श्रुति, ज्ञान,) [देवाचे-देव=खेळणे. देव=ईश्वर, देवता, राजा. देवता=देव, देवपणा, देवाची मूर्ति. देवत्र=देवसेवेसाठीं दिलेली भूमि. देवद्रोणी=देवाचा छबिना. देवन=स्तुति, व्यवहार. देवयान=मोक्ष मार्ग. देवयोनि=यक्ष, गंधर्व इत्यादि उपदेवता. देवर=दीर. देवर्षि=देवता असून ऋषि. देवल=पुजारी. देवानांप्रियः=मूर्ख, बोकड. देविक=देवसंबंधीं. देवी=देवता, दुर्गा, ब्राह्मणी, पट्टराणी. देवृ=दीर.]-तें मूळसूत्र-वेद जी अपौरूषेय ईश्वरकृतवाणी तिचें अलौकिक सामर्थ्याचें मूळ कारण भांडवलाचें जें शास्त्रांतील संक्षिप्त वाक्य (धागा, दोरा) तें अतिशुद्ध, असून सर्वांना येथें अधिकार आहे; असें पवित्र गीताशास्त्र श्रीकृष्णांनी प्रगट केलें. (१४२७)

येथें गीता तीच मुळीं ह्या वेदांना मूळ असावी असें कसें बरें? बोधास आले (शहाणे झाले, अंतःकरण शक्तीस आले, ज्ञानास आले जागृत केलें गेलें) पाहा! पाहा! व असें म्हणावें तर तेथीलची ती उपपत्ति (हे संयुक्तिक ते कारण) प्रसिद्ध आहे तें सांगण्याचें करतों. ती उपपत्ती, संगति, संयुक्तिक सिद्धता, मूळ कारण संबंध तो, प्रसिद्धीचा असा ख्यातीचा शोभा अलंकार तो कसा तें सांगतों. (१४२८)

सत्यप्रतिज्ञ भगवान् श्रीकृष्णच आपल्या स्वमुखानें पैजेवरच बोलिले, ज्यांच्या निश्वासाचें ठायी, श्वासोच्छ्वासापासून जन्म झाले, कीं वेदराशींनां! (जन्म, उत्पत्ती प्राणी आचरण, अस्तित्व, प्रकाशले, होणें झालें.) असें ज्ञानाचे ढीगच्या ढीग समुदाय, अस्तित्वास आले, विद्यमान झाले, विद्यमानता पाहाते झाले. (१४२९)

या कारणास्तव वेदांना, (ईश्वरकृत वाणीस, अलौकिक सामर्थ्यास, म्हणजे ज्ञानास मूलभूत अशीं) मूळ कारणासारखी योग्य व सत्य झालेली अशी ही गीता म्हणावी व असें हें म्हणणें अगदि उचित असेंच आहे, (ग्राह्य आहे, अभ्यस्त स्वराचें आहे) यावर आणिकही कांहीं एकादी, येथें मूळ कारण संगती ती उद्भवाची का संबंधाची ती कशी तेही सांगतों ऐक. (१४३०)

जें आपल्या रूपानें नाश न होतां, ज्याचा विस्तार जेथें लपतो, तेंच कीं तयाचें ह्या जगीं बीज म्हणावें कीं (१४३१)

तें कसें तर 'कर्म उपासना व ज्ञान' ह्या तीन कांडांनीं स्वतःचें (संबंधी, स्वतःचे स्वाधीन, स्वतःचे) जिवंतपण असें (अशेष सर्व) शब्द ब्रह्म (राशी का वेद ते गीतेमध्यें आहे, वृक्षच जसा का एक बीजामध्यें असलेला. (१४३२)

*म्हणून वेदाचे शब्दराशीचे, शब्द ब्रह्माचे भगवद् गुणवर्णनपर काव्याचे,* [ *काव्य=सरस वाक्य,* कवित्व, भविष्यवादी, शुक्राचार्य. *कव्य*=पितरांस अर्पण केलेलें अन्न, कव्यवाह, कव्यवाहन=अग्नि.] बीज श्रीगीता होत आहे असें मजला वाटतेंअगदीं सहजपणेंच तसें दिसत सुद्धां आहे. भक्तिसुत्रे– 'भक्तिरेव एकरूप असून ११ प्रकारची होते भक्ति सूत्र (८२) भक्त गौरव.

मोदन्ते पितरो, नृत्यन्ति देवतः सनाथाचेयं भूर्भवति ॥ ७१ ॥ तीर्थी कुर्वंति तीर्थाणि, सुकर्मी कुर्वन्ति कर्माणि, सच्छास्त्री कुर्वन्ति शास्त्राणि ॥ ६९ ॥ यतस्तन्मयाः ॥ ७० ॥ कंठावरोध रोमांचाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवींच ॥ ६८ ॥ नास्तितेषु जातिविद्यारूप कुलधन क्रियादिभेदः गरीयसी भक्ति' ॥ ७२ ॥ यतस्तदीया ॥ ७३ ॥ भक्ताएकान्तिनो मुख्याः ॥ ६७ ॥

त्रिरूपभंग पूर्वकं नित्य दास्य, नित्यकांता भजनात्मकं प्रेम कार्यम् प्रेमैव कार्यम् ॥ ६६ ॥

अर्थ :—भज्य देव, भक्त व भक्ति, ह्या त्रिपुटीचा लय करून नित्य दास्य भक्तीनें (मारुती) अथवा नित्य कांता भक्तीनें (लक्ष्मी, गोपी) प्रेम करावें, आणि प्रेमच करावें. (प्रेमावांचून इतर कशानेंही नारायण प्रसन्न होणार नाहीं, सर्व भक्तांत मुख्य भक्त म्हणजे जे एकनिष्ट एकविध भक्त आहेत तेच होत. असे भक्त प्रेमानें कंठ दाटून येत आहेत शरीरावर रोमांचादि अष्ट सात्विक भाव उत्पन्न होत आहेत. निरंतर प्रेमाश्रूंचे स्नान घडत आहे अशा तऱ्हेनें नारायणाच्या दिव्य कथा परस्परांस सांगत ऐकत आहेत. ते दोहीकडची कुळें पावन करतात. इतकेंच काय पण सारी पृथ्वी पावन करतात. ते तीर्थांना, तीर्थपण देतात, कर्मावर सत्कर्माचा छाप मारतात, शास्त्रांना सच्छास्त्रें करतात. कारण ते स्वतः तीर्थरूप असतात. सत्कर्म व सच्छास्त्र यांचें मूर्तिमंत पुतळे असतात. त्यांचें चरित्र पाहून पितृलोकी पितर संतुष्ट होतात, देवता आनंदित होऊन नृत्य करू लागतात, नाचतात. पृथ्वी सनाथ होते. त्यांच्यांत मग जाति विद्या, रूप, कुल, धन क्रिया इत्यादिकांचें भेद रहात नाहींत कारण सर्वांतर्यामी जो हरी त्याशीं ते तद्रूप झालेले असतात. कवि=वाल्मिकी ब्रह्मदेव, काव्य करणारा, सूर्य, शुक्राचार्य, विद्वान्.] (१४३३)

जें कांहीं ह्या वेदाचे (शब्दराशीचे) तीन भाग, (दैव, अंश, प्रदेश) जे गीतेमध्यें चांगले असे (उमटलेच) उमटत आहेत ते कसें म्हणावें तर, अलंकार भूषण रत्नांमधील तेज (रत्नामध्यें सर्वच्या सर्व अंग तेंज शोभत आहे, शोभलें आहे.) सौंदर्यास आलें आहे तेजाच्या कांतीचें होऊन आहे. (१४३४)

त्याच कीं कर्म उपासना, ज्ञान इत्यादी तिन्हीची ती कांडे ती (कांड = दांडा, बाण, वर्ग, वेळ, ग्रंथाचा भाग, पाठीचा कणा व्यापारः) (ग्रंथाचा भाग कोणत्या) कोणत्या ठिकाणीं आहेत ह्या गीतेमध्यें ते डोळ्यास दाखविण्याचे करूं; ऐकत ऐस. (१४३५)

## गीताशास्त्र उत्पत्तीची आदि म्हणजे प्रस्तावना :—

येथें पहिला जो अध्याय आहे, तो शास्त्र, प्रवृत्ति प्रवाह (प्रघात, मनाचा कल प्रयत्न आरंभ) प्रसंग असून दुसऱ्या अध्यायामध्यें सांख्य (असें तर्कज्ञ) जे तेथीलचा तो सद्भाव म्हणजे विद्यमानता का भलाई ती प्रकाशिली आहे, (स्पष्ट झाली आहे, खुलाश्याची अशी केलेली ती आहे.) (१४३६)

मोक्षरूप देणगी देण्यांत स्वतंत्र असे (मुखत्यारपणाचें स्वाधीनतेचें असें ज्ञान बोध, जाणीव बुद्धिच्या प्रधानतेचे त्रिगुणात्मिका प्रकृति जी परमात्माच एक, असें श्रेष्ट) हें शास्त्र असून तें पाळलेलें व्हावें (आचरावें, अनुभवावें, उपभोगावें शोभेस यावें. मधुरतेचें असें व्हावें.) असें–जोडी, पत्नि, मित्र, सहाय–दुसऱ्यामध्यें ह्या शास्त्राचें सूत्र (एक धागा दोरा जसा तसा उभारिला आहे.) उपस्थित केलें आहे (निश्चित केलें आहे, स्थिरतेचा, अवस्थेचा, मर्यादेचा केला आहे) (१४३७)

## कर्मकाण्ड—

यावर अज्ञानानें बद्ध झालेल्यास, (बांधलेल्यास) मोक्षाच्या पदावर बसण्यासाठीं साधनाचा आरंभ तो तिसऱ्या अध्यायामध्यें बोलून दाखविला आहे. (१४३८)

जें कांहीं, देहाच्या अभिमानानें, बांधलें होणे, तेथें काम्य असें तें निषिद्ध सोडून देऊन योग्य असें जें कांहीं तेंच (सावधपणानें नच अपराध करितां निटलसपणें करावें) अनुष्ठानाचें करावें आचरावें. (१४३९)

अशा तऱ्हेनें भलाईनें विद्यमानतेनें कर्म करावें, असा हा तिसऱ्या अध्यायामध्यें देवांनीं निर्णय निवाडा केला जो, ते येथें कर्मकांड जाणावें. (१४४०)

## उपासना कांड—

तसेंच तें जें नित्यनैमित्तिक जें (अज्ञानाचें का) अज्ञानास अति आवश्यक आहे असें तें आचरतां आचरतां तें कसें बरें (कर्मापासून) सोडविणारें होईल कीं, अहो !—, (१४४१)

अशी इच्छा झाल्यास, अशीं जरूरी भासल्यास, तेथें बद्ध असें जें, तेंच कीं मोक्षेच्छु स्थितीला आलेलें तेथें, देवांनीं कांहीं एक ब्रह्मार्पणत्वें करून क्रिया (तप स्वाध्याय ईश्वर, प्राणिधानरूपी) सांगितली—, (१४४२)

जें कांहीं देहानें, वाचेनें व मनानें करावें (लागणारें असें, विहित जें, जसें कांहीं निपजेलच पुढें येईल, उत्पन्न होईल, उपजेल) तें एका ईश्वराच्या उद्देशानेंच सर्वथैव करावे असें म्हटले. (१४४३)

हेंच तें ईश्वराचें ठिकाण, कर्मयोगें करून भजन कथन आदीनी, ब्रह्म व्हावें कां ईश्वराठायींचें व्हावें, असें तें चौथ्या–अध्यायाच्या शेवटीं–अति गौरव करून आदरानें सांगितलें. (१४४४)

विश्वरूप तें, अकरावा अध्याय तो, सर्व जो, त्याच्या अखेरी पावतो, कर्में करून ईश परमात्मा भजावा, (पूजावा, सेवावा, उपभोगावा, प्रकाशावा) असें जे कांहीं बोलिले आहे तें— (१४४५)

चौथ्या कर्मब्रह्मार्पणापासून तों अकराव्या 'विश्वरूप दर्शन' अखेरपर्यंत अगदी उघड असें स्पष्ट सांगितलेलें तें येथें देवताकांड जाणावें येथें गीताशास्त्र हें प्रतिबंध का मार्गामध्यें येणारा अडथळा तो निवारण करून, तो निवारून, बोलत आहे, सांगत आहे. (१४४६)

**ज्ञान कांड :—**

तेच ईश (शक्ति असणें जें त्या) प्रसादानें तसेंच श्रीगुरु (परंपरा, चालरीत, पंथ,) संप्रदायानें मिळालेलें, द्रव्य इत्यादि जसें असें सांच म्हणजे ओतीव खरें असें ज्ञान, स्मरणानें आठविलें होऊन कां आठवण दिले जाऊन कोवळें कोमल रम्य प्रिय, उत्कृष्ट नाजूक असेंच कीं समजतें कळतें ते. (१४४७)

ज्ञान 'अद्वेष्टा सर्व भूतानां मैत्रः करुण एवच' अमानित्वदिनी वाढवावे पोसावें, गौरव, अभिनंदन, जयजय काराचें करावें आणि म्हणूनच कीं, हा बारावा बोलावणे, उपदेश करणे गुण बुद्धि तो लेखी गणावा देवत्व स्पर्शणारा असा (लेख = देव लेखिन् = स्पर्शणारा)– (१४४८)

असा तो बारावा अध्याय आदी म्हणजे आरंभ असून पंधरावा तो अवधि म्हणजे अंत, समाप्ति, (मुदत, आधार–लक्ष, करार, प्रमाण, मर्यादा, हद्दच) होय. ज्ञान फळाची पक्वता (सिद्धता, स्वयंपाक सिद्धता सिद्धिची ती) आकारास आली (पाहिली गेली व्याख्येची झाली.) आत्मनात्म विचारच तो विचारास आला (पक्वदशानी निदर्शन म्हणजे पुराव्याची झाली) (१४४९)

म्हणून १२, १३, १४, १५, ह्या चारानी (म्हणजे अद्वेष्टादि प्रभृति–अमानित्वादिकी बाराव्या अध्यायात कोणत्याहि भूताचा द्वेष न करणारा ह्या पासून अथवा तेराव्यातील अभिमानाचा अभाव ह्यानी तेथें बारावी बुद्धि तो गुण देवत्व स्पर्शणारा, नंतर 'ऊर्ध्वमूल' जो पंधरावा त्याच्या अखेर ज्ञानकांड हें आपल्या ठावाचें झालें आहे. (ठायीचें असे होऊन आहे) असें ते चौकशीनें निरोपित आहेत, निरखून पाहून नेमित आहेत. (१४५०)

याप्रमाणें तीन कांडांनी विचारास घेतलेलें असें ज्ञान हें, वेदश्रुति, ब्रह्म प्रति संपादक वाक्यच वेदच कीं तें त्यांनीं ही विद्याश्रुतीच गोजिरवाणी अशी, लहानगी कोडकौतुकाची अशी श्रीगीता (भगवत् गुणवर्णनपर काव्य जें, त्या पदसंबंधीचें मूळ म्हणा का स्तुति म्हणा, रस्ता म्हणा का श्लोक म्हणा, अथवा विश्वास उत्पन्न करणारे पाऊल स्वरूप रक्षण) रत्नरूपी अलंकार चित्ताकर्षक शब्द रचना धारण केली आहे. (१४५१)

हे तीन कांडात्मक का विभागास असे तरी श्रुति ती अर्जुन सांगत आहे की येथें एकमोक्षरूप फळ लागले आहे ते अवश्यमेव स्वतंत्र प्राप्त करून घ्यावे. (१४५२)

**आतां यावर म्हणजे ज्ञानकांडानंतर सोळावा अध्याय जो त्याचे होण्यास कारणे तीन सांगत आहेत—**

त्या मोक्षफळासाठीं साधन करणारा हा देह–स्नेह धन, उपाय–तप त्या संबंधीच्या ज्ञानाबरोबर जो रोजच्या रोज वैर करून असतो तो अज्ञान (माया, अविद्या, अडाणीपणा–सजातीय वस्तूं समूह, अज्ञान) पक्ष, तो सोळाव्यामध्यें दिलेला आहे (स्पष्ट केला आहे, स्पष्ट मांडला आहे, अंगिकारला आहे,) अज्ञान वर्ग सोळाव्या अध्यायांत प्रतिपादिला आहे. (१४५३)

तेंथें तोच कीं शास्त्राचां (धर्म, नियम, ग्रंथाचा, शास्त्र ज्ञानाचा, शास्त्र आज्ञेचें शासन सहकार साह्य) सोबती घेऊन विरोध तो का शत्रुत्व तें (वैरी तो कामरूप–अनावर जिंकावा) जिणावें, असा हा जो निरोप तोच येथें **सतरावा** अध्याय होय. (१४५४)

असें प्रथमपासून तो सतरावा सीमेचा करून आत्मनिश्वासरूपी वेद तो विवरण करून देवांनीं दाखविला. (१४५५)

**अठरावा कलशाध्याय :—**

अशा त्या अशेष सर्व अर्थजातासा तात्पर्याचा असा विचार केलेला जो तोच येथें कळसाचा असा अठरावा अध्याय पाहावा कीं. (१४५६)

याप्रमाणें सकळ जो सांख्य समुद्र आहे त्या (सिंधु हत्तीचा मद त्या मोजमाप) गणनेचा, स्पष्टीकरणाचा, विचाराचा चर्चेचा, परीक्षणाचा बुद्धीचा बुद्धीरूप नदीचा–अथवा नांवाचा तो हा श्रीभगवत् गीता प्रबंध (रचना, अखंड भाषण, कथन, चर्चा) असा हा औदार्यासंबंधी तर आगळा असा वेदच कीं मूर्त असा. दृश्य आकाराच्या मूर्तिमंततेस, सत्यच कीं एक असा आला आहे, झाला आहे. (१४५७)

वेद तो श्रीमान् असा संपत्तिमान समृद्ध, वैभवशाली असा मोक्षदानी समर्थ, मूळचाच का मूळच तो, पण त्याच्या सारखा दुसरा अनाथ, दुबळा, लोभी, कंजूष, कृपण असा कोणीही नाहीं. कारण कीं तो तर, तिन्ही वर्णांच्याचमुळीं कानीं लागल्यानें कानींचा झाला आहे, कानींच लागला आहे. (१४५८)

आतां इतरांना स्त्री की शूद्र इत्यादीकांना प्राणि गणांना भवव्यथाच कीं एक, ती भवरोगच झालेला आहे; जसा कां तेथें तर तो अप्रासंगिकपणच एक अथवा प्रतिबंध का अटकावच एक तो मांडून उगाच राहिला आहे. (१४५९)

आतां मजला पाहातां पाहातां मागचें तें उणें का उट्टें फेडण्याकरितां वेदच की एक गीतापणानें वेष्टिला आहे. (पांघरला आहे आकारास आला आहे, अवतरला आहे, गीतारूपानें) येथें आतां भलत्यानेंही कीं (वाटेल त्यानेही कीं, पाहिजे त्यानेंही) तो सेव्य व्हावा–कळाकुसरी ती धनीपणाची, ती सेव्यपणानें व्हावी, म्हणून हा वेदच एक कीं गीता प्रबंधरूपानें आला आहे. (१४६०)

तो कसा आला आहे तर अहो मनाच्याठायीं तेथीलच्या अर्थानें (सत्यपणा धर्मादिपुरूषार्थानें) रिघ करून असावें कानाचेठायीं लागून श्रवण कीर्ति, ऐकणें, अभ्यासरूपानें ते असावे, तसेंच वदनामध्यें तर जप निमित्तानें वस्ती करून जप रूपानें (पठण व तपन) कीं, त्याचें होत असावें. (१४६१)

व गीतेचा पाठ जाणून तेथीलच्या सुसंगतपणानें गीता पुस्तक निमित्तानें, लिहून वाहाणें करावें. (१४६२)

अशा त्या प्रकारांनीं, संसाररूपी चव्हाटा, तो माझ्यासहितही उत्तम अशा मोक्षसुखाच्या सदावर्ताचा केला. (१४६३)

आकाशी वसण्यास, (वस्ती करण्यास) पृथ्वीवर बसण्यास रवि दीप्तीमध्यें राहाटण्यांस तर अहो आवार जे ते (अवकाश तो) नभच कीं एक होय. (१४६४)

तसें त्याप्रमाणें कां तेथें मग उत्तम का अधम असे सेविता सेविता कोणालाही पुसणें नच होता–मोक्षरूपी उत्तम दानानें जगास निववीत आहे. (१४६५)

(कुटि=शरीर, वृक्ष, कुक्कुट कुभा, झोंपडी.)–पूर्वीं निंदिलेला–मागल्या निंदेला वक्रतेला भ्यायलेला वेद तो आतां गीतेच्या पोटीचा झाला. गीतेच्या पोटी जन्माला आला व आतां गोमटी सुंदर, अशी कीर्तीच कीं, (कृपा, यश, विस्तार, ख्यातीच कीं, तेज राजवाडा) पावला आहे. (१४६६)

या करितां वेदाचे सेवन हे चांगल्या रितीनें व्हावें. (धनीपणाचें तें सेवणें तेथें कलाकुसरीची ती सेवा, धनीपणच एक असें उत्तम असें असें तें जें जें कांहीं वेदाचें सुसेवन–पूज्य, योग–अनायासे) सुसेव्यता वेदाची तीच ही मूर्तिमान श्रीगीता समज जी श्रीकृष्णांनी पंडुराजाच्या कुमारास, अर्जुनास उपदेशिलेली. (१४६७)

वत्साच्या प्रेमानें दुभतें तें घरास उद्देशाचें होतें तसें पांडवाच्या निमित्तानें हें अहो श्रीविठ्ठलरूपी (जगदोद्धरण) जगदोद्धार कीं आला. (१४६८)

चातकाची तहान भागवावी म्हणून कणव कृपा आली मेघ तो आपणामध्येंच पाणी भरून घेऊन धावत आहे. तेथे सर्व चराचर ते अहो जसें निवाले निवालेच की ! (१४६९)

अनन्यगति जी कमला म्हणा का कमल म्हणा तिजसाठीं सूर्य तर वेळच्या वेळीं नेहमींच्या नेहमीच येणारा प्रकाशणारा तेथें आतां अहो त्रिभुवनीचा तो डोळा सुखी व्हावच रूपास यावा, कीं ! (१४७०)

तसें अर्जुनाच्या निमित्तानें ह्या गीतारूप प्रकाशानें **श्रीराजे**—

काय करिसी सकळ देवांचे वैभव विलास । माझिया स्वामिविण तें अवघे उद्वसरया ॥ १ ॥ तपन त्या कमळा कमळी विकासु सुकवी मयंकु काय करिसी अरे बा सुधा अंशु ॥ धृ० ॥ साताही वारांचे दिवसु एकियाचि सुरिजे । तैसे सर्वीं सर्वपण माजीये न श्रीराजे ॥ २ ॥ सर्वज्ञ सुंदर देव हो तुका भलतैसे । परि जडाते चेष्टविते आणि कां पै नसें ॥ ३ ॥ जया नांव नाहीं रूप चिन्ह कांहीं । नामरूप चिन्ह स्वयेंचि पाहीं ॥ ४ ॥ बाप रखुमादेवीवरू आहे तैसाचि पुरे । काय करिसी आणि का देवांची गोवारें रया ॥ ५ ॥*

श्रीराजांनी तर सौभाग्य सुंदर लक्ष्मीच जेथें विराजमान झालेली तेथीलच्या त्या ज्ञानसूर्य प्रकाशानें तर ह्या जगाचे ते संसारा एवढें थोर ओझें नाहीसें केलें. (१४७१)

सर्व शास्त्ररूप रत्नाचें तेज त्रैलोक्यांत प्रगट करणारे लक्ष्मीपति भगवान् श्रीकृष्ण तर मुखरूपी आकाशांतील सूर्यच होत ! नव्हत काय ? (१४७२)

श्रेष्ठ असें तें कुळ ! अहो बाप ! पवित्र ते त्या पावित्र्याचा केलेला हा पार्थ तर ह्या येथीलच्या ज्ञानास पात्र असा ह्यानें तर ही गीता म्हणजे ह्या जगास एक स्वतंत्र असें आवारच अवकाशाचें तें केलें आहे.

जगरूपी अवकाश तो, स्वतंत्र असा हा गीता ग्रंथ, केला आहे; ज्ञानाचे पात्र ( गौळण ती विद्यापात्र म्हटली.) अर्जुन हा ! पवित्र व मोठ्या कुळाचा बाप ! ! ! (१४७३)

असें हे असो, यानंतर मग तेणें, सद्गुरू श्रीकृष्णांनीं पार्थाचे तें मिसळणें, अद्वैतपण, श्रीकृष्णाशी एकरूप झालेलं तें आतां द्वैतास आणलें. (१४७४)

नंतर ते म्हणू लागले की हे पांडवा ! असें हें गीताशास्त्र तें तर जीवास मानलें (मानावले) आहेच की, असें आहे. यावर अर्जुनानं उत्तर केलें की जी अहो देवा ! शास्त्र मानवणें ही तर आपली कृपाच एक ! दयाच एक ! (१४७५)

---

* **फूटनोट** :—अर्थ—परमात्म्या व्यतिरिक्त इतर इंद्रादिक देवांचें वैभव मोठें असलें तरी त्याला घेऊन काय करावयाचें ? माझा स्वामी जो परमात्मा त्याच्या वांचून हे सगळे देव व्यर्थ आहेत–सूर्य विकासिनी कमलाला तप्त करणारा सूर्योदय झाला तरच त्याचा विकास होतोः चंद्रोदय झाला तर ती मिटतात मग तो चंद्र अमृतांश जरी असला तरी त्याचा काय उपयोग ? वारांचे दिवस सात असले तरी त्या सर्वामध्ये सूर्य जसा एक तेजस्वी असतो, बाकीचे 'सोम, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि', यांचे वार असूनहि प्रकाशामध्यें त्यांचा कांहीं उपयोग नाहीं आदितवाराच्या पुढे ते निस्तेज आहेत. त्याप्रमाणें सर्व पदार्थामध्यें, सर्व पदार्थरूप होऊन, असणारा परमात्माच मुख्य आहेः बाकीच्या देवता त्याच्यापुढें तुच्छ आहेत. परमात्मव्यतिरिक्त बाकीचे देव कितीही सुंदर असोत किंवा सर्वज्ञ असोत पण जगाला चेष्टविण्याचें सामर्थ्य परमात्म्याव्यतिरिक्त दुसऱ्याजवळ नाहीं–परमात्म्याला नांव नाहीं, रूप, चिन्ह, कांहीं नाहीं,–परंतु नामरूप चिन्ह स्वरूपांत सर्व प्रकारें त्याचीच व्याप्ति आहे रखुमादेवीवर जो बाप श्रीविठ्ठल तो जसा आहे तसाच आम्हाला पुरे बाकीच्या देवांची गोवारें म्हणजे समुदाय गुरांची भरति आम्हांला काय करावयाची !!! (ज्ञा. गा. आळंदी देवाची प्रत.)

हे धनंजया ठेवा सांपडावा तर तेथें भाग्यच असावें लागतें. दैवानेंच तें धन ऐश्वर्य सांपडतें तरीपण अहो जें कांहीं जोडलेलें (सांपडलेलें कां मिळविलेलें–मेळविलेलें) तें भोगावयासहीपण एकाद्यासच मिळतें. तेथें कदाचित् एकादाच भोग पावतो संपत्ति शरीर, ऐश्वर्य, भोग भोगतो (क्वचितच तेथें भोग शरीर उपभोग योग भाग्य तें जोडलेलें तें उपभोगणें, अनुभविणें होतें.) (१४७६)

क्षीरसागराएवढें दुधाचें भांडे अपायकारक असें जें नच विरजलेलें तें तर काय सुरांना का काय असुरांना (घुसळणारे, घुसळणें करणें, चोळणें झालें कीं), [मथिन्=घुसळण्याची रवि, रवीचें होणें झालें, वायू, वज्र, इंद्रिय, धनुष्य तें.] (१४७७)

तें तर मोठ्या सायासानेंच कीं फळास आलें (जे कांहीं कां अमृतही ह्या डोळयांनी प्रत्यक्ष पाहिलें.) पण त्या वरीलच्या–(वरचिलच्या त्या नंतरच्या त्या) जनतेस, (रक्षणास, सांभाळास) तें चुकलें कीं (तेथें ती रक्षण करण्याची कां सप्रेमळालागी जतन ठेविलें, जपून ठेविलें अशा त्या जतनेची जतनतेची ती हतोटी ती चुकली झाली की त्यांच्याकडून ) (१४७८)

येथें पात्रीं अमरत्व वाढलेलें तें तर मरणासाठींच कीं असें झालें. तें अमरपण कां अमृत तें कसें भोगावें तें नच जाणूनच कीं तें संपादिलें गेलें असें होऊन आहे. (१४७९)

'नहुष' तो स्वर्गाचा अधिपति राजा, यजमान (डोक्याचा नाजूक भाग.) झाला पण अनुभवाची ती जी राहाणी राहाटी तेथें भांबावल्यामुळें भुजंगत्वच तें–लंपटपणच तें, त्यास पातलें हें तूं जाणत नाहींस काय ? (१४८०)

म्हणून बहुत अशाच ह्या पुण्यास (पुण्यास) तुवां हे धनंजया केलें आहेस आणि म्हणून ह्या गीतेस गीतारूपी शास्त्र राजासच कीं एक विषय तो म्हणजे आश्रय, व्यवहार, लक्ष्य होऊन आहेस. (१४८१)

करितां ह्याच शास्त्रानें का शास्त्राचे परंपरेची चालरीत पंथ संप्रदाय तो पांघरून अंगीं धारण करून, अनुष्ठावा, कार्यारंभ, सिद्धता जप होम इत्यादि कर्में करून की अहो. (१४८२)

येऱ्हवीं पाहिलें असतां तें, हे अर्जुना ! अमृत मंथना सारखें होईल, जरी कां तूं संप्रदायाशिवायच तेथीलच्या अनुष्ठानामध्यें रिगशील तर. (१४८३)

गाय धडधाकट चांगली अशी मिळाली ती तर तेव्हांच की दूध तें पीवो देईल, तिचें दूध तेव्हांच की पिण्यास मिळेल, जरी का सांजवणेची ती (पान्हवण्याची ती) दूध काढण्याची हातवटी जाणली असेल माहित असेल तर— (१४८४)

तसें श्रीगुरु प्रसन्न झाले, शिष्य तो विद्याही लाभला पण, परिणाम लाभ फळ, तर अहो तेथीलचें मी परंपरेची चालरीत संप्रदाय जो तोच कीं मुळीं उपासिला गेला उपासनेचा सेवेचा पूजेचा झाला तरच कीं तें फळ मिळणारें होय. (१४८५)

म्हणून शास्त्ररूपी देणगी वडीलपणाची का स्वामीपणाची जी, ही तेथें ऐक्य, पूजा, गुरुपरंपरेची, चालरीत संप्रदाय जो तेथें एक तऱ्हेचा उचित असा, संप्रदाय तोच कीं योग्यता (स्वामीपण का वडिलपण) देणारा असा आहे म्हणून त्याबद्दलचे आतां अति आदरानें ऐकण्याचें कर. (१४८६)

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं नच मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥**

अतपस्क=कसलीही तपश्चर्या का जप न करणारा, व्रत न पाळणारा, अधार्मिक. अभक्त=चित्त श्रद्धामय नाहीं व ईश्वरभक्ति नाहीं असा जो त्याला, न भक्तः [अभक्त छंदस्–अभक्तरूच्=भूक नसणें, शुश्रु=आई. शुश्रूषकः=सेवक. शुश्रुषमा=सेवा, ऐकण्याची इच्छा. शुश्रुषा=उपासना, सेवा, श्रवणेच्छा. अशुश्रुषवे=गीता श्रवण करण्याची इच्छा, नसेल त्याला (शुश्रूषु=आज्ञांकित, ऐकु इच्छिणारा.) वाच्यं=बोलण्यास योग्य, शब्दाचा मूळ अर्थ, नीच, निंदक, निंदा. यो अभ्यसूयति=जो निंदतो, माझा द्वेष का मत्सर करतो दोष वाढतो हेवा करतो त्याला कदाचन=केव्हांहि (असूय=तिरस्कार, व तिरस्कार करणें.)

अन्वय :—ते इदं । न वाच्यं । अतपस्काय । कदाचन । न वाच्यं । अभक्ताय । नच वाच्यं । अशुश्रुषवे । न च वाच्यं । यः अभ्यसूयति माम् ॥ ६७ ॥

अर्थ :—तुवां हें, कां तुझ्याकडून हें, तुझ्या कल्याणार्थ सांगितलें जें हेंच एक बोलण्यास योग्य असें समजून ते जो अतपस्क आहे, म्हणजे तप नाहीं जप नाहीं अशास, जो अभक्त आहे श्रद्धा नाहीं, ईश्वर भक्ति नाहीं अशांस, जो अशुश्रुषु आहे, गीताशास्त्र श्रवण करण्याची इच्छा नाहीं त्याला, उपासना सेवा नाहीं त्यास, जो मजला निंदण्याचें करतो का माझा तिरस्कार, द्वेष मत्सर करतो, त्यास, माझे दोष काढतो त्यास, माझा हेवा करतो त्यास सांगू बोलू नये. (श्लोक ६७ वा ओव्या–१४८७–१५०९)

तरी हे जे तुवां पार्था । गीताशास्त्र लाधले आस्था ।
ते तपोहिना सर्वथा । सांघावे ना हो ॥ १४८७ ॥
अथवा तापसुही जाला । परि गुरूभक्ति जो ढिला ।
तो वेदु अंत्यजु वाळिला । तैसा वाळि ॥ १४८८ ॥
ना तरी पुरोडांशु जैसा । न घापे वृद्ध तरी वायसा ।
गीता नेदी तैसी तापसा । गुरूभक्तिहीना ॥ १४८९ ॥
का तपही जोडे देही । भजे गुरूदेवाच्याठाईं ।
परि आकर्णनी नाही । चाड जरी ॥ १४९० ॥
तरी तो मागिले दोन्ही आंगी । उत्तमु होय कीर जगी ।
परि या श्रवणालागी । योग्य नव्हे ॥ १४९१ ॥
मुक्ताफळ भलतैसे । होय परि मुख नसे ।
तंव गुण प्रवेशे । तेथें काई ॥ १४९२ ॥
सागरू गंभीर होये । हे कोण ना म्हणत आहे ।
परि वृष्टी वायां जाये । जाली तेथे ॥ १४९३ ॥
धालया दिव्यान्न सुआवे । मग जे वाया धाडावे ।
ते आर्ती का न करावे । उदारपण ॥ १४९४ ॥
म्हणौनि योग्य भलतैसे । होतु का परिचाड नसे ।
तरी झणें वानवसे । देसी हे तया ॥ १४९५ ॥
रूपाचा सुजाणु डोळा । वोडऊ ये काई परिमळा ।
जेथ जे माने ते फळा । तेथचि योग्य (ये गा) ॥ १४९६ ॥
म्हणौनि तपि आणि भक्ति । पावे ते सुभद्रापति ।
(परि) शास्त्र श्रवणि अनासक्ति । वाळावेचि ते ॥ १४९७ ॥
नांतरी तप भक्ति । होऊनि श्रवणी आर्ती ।
आणी ऐसी ही आइती । देखसी जन्ही ॥ १४९८ ॥

तऱ्ही गीताशास्त्र निर्मिता। जो मी सकळ लोक शास्ता।
तया माते सामान्यता। बोलेल जो ॥ १४९९ ॥
माझ्या सज्जनेसी माते। पैशून्याचेनि आव्हाते।
येक आह्याती तयाते। योग्य न म्हणें ॥ १५०० ॥
तयाची येरी आघवी। सामग्री ऐसी जाणावी।
दिपेविण ठावि (ठाण दिवि)। रात्रिची जैसी ॥ १५०१ ॥
आंग गोरे आणि तरूणे। जरी लेइले आहे लेणे।
परि येकलेनि प्राणे। सांडिजे जेवी ॥ १५०२ ॥
सोनयाचे सुंदर। निर्वाळले होय घर।
परि सर्पांगणि (सर्पांगना) द्वार। रूंधले होय ॥ १५०३ ॥
निपजे दिव्यान्न चोखट। परी माजी असे कालकूट।
हे असो मैत्री कपट। गर्भिणी जैसी ॥ १५०४ ॥
तैसी तप भक्ति मेधा। तयाची जाण प्रबुद्धा।
जो माझयाचि कां निंदा। माझीचि करी ॥ १५०५ ॥
या कारणें धनंजया। तो भक्त मेधावी तपिया।
तरी नको बापा या शास्त्रा। आतळो देवो ॥ १५०६ ॥
काई बहु बोलो निंदका। योग्य स्रष्टयाहि (सृष्टयाहि) सारिखा।
गीता हे कवतिका। लागीही नेदी ॥ १५०७ ॥
म्हणौनि तयाचा धनुर्धरा। तळी दाटौनि गाडौरा।
वरी गुरू भक्तीचा पुरा। प्रसादु (प्रासादु) जो जाला ॥ १५०८ ॥
आणि श्रवणेच्छेचां पुढा। दारवंटा सदा उघडा।
वरी कळसु चोखडा। अनिंदा रत्नाचा ॥ १५०९ ॥

जे तुवा–तुवा हे जे. अस्छा–आस्था=कळकळ, आधार, स्थिति. सांघावे–सांगावें. तपोहीन–तपराहित्य=अनुष्ठानादि रहिताला, ईशभक्ति विहिनाला. (तपोधन म्हणजे तप करण्याची जागा. तपस्व्याच्या उलट तपोहिन.) [तप=तापणे, तपणें, सामर्थ्य असणें, प्रकाशणें, तपश्चर्या करणें. तप=उष्णता, सूर्य, ग्रीष्मऋतु. तपती=छाया. तपस्=माघ महिना, ग्रीष्मऋतु, तपश्चर्या. तपस्या–तपस्य=तपाचरण. तपस्विन=योगी, गोसावी, तप करणारा. तापस=तपस्वी, तप करणारा. (१४८७) ढिला=कच्चा, उदासीन. वाळिला=दूर केला. (वाळ=टाकून दे, सोडून टाक.) (१४८८) पुरोडाशु=यज्ञाचा अवशेष–चरू म्हणजे होमाकरितां शिजविलेला भात. भाताचें भांडें. (१४८९) आकर्णनी चाड=श्रवणी इच्छा तरी–जरी. (१४९०) मागील दोन्ही=तप व भक्ति अशा दोन्ही अंगांनी कर्मानुष्टनात. नव्हे–नोहे. (१४९१) मुख=छिद्र, तोंड, द्वार. गुण=दोरा, दोरी. (१४९२) वृष्टी=पाऊस (सागरामध्यें पाऊस पडला तर, तो वायाच जसा तसे गंभीरपण सागराचें पाऊसामुळें वायां जातें–नष्ट होतें) (१४९३) धालिया=तृप्त, झालेल्यास. सुआवे=वाढावें. धाडावे=दडवावें. आर्ती=क्षुधिताला, भुकेलेल्यास. (१४९४) होतु का–होत. झने–झणे. वानवसे–वानिवसे देसी हे तया=कौतुकानेहि हें त्यास देऊ नको. (१४९५) वोडवू ये काई=पुढें करूं येईल काय योग्य–येगा. (१४९६) पावे–पाहावे. श्रवणी अनासक्ति वाळावेचि=श्रवणी आवड नसलेलें, त्यागावें, टाकावें, वाळावें. (१४९७) आइती–आयती=सामुग्री. (१४९८) सकळ लोक शास्ता=सकळ लोकांना शासन करणारा. (१४९९)

पै शून्याचेनि आव्हाते–जे सदा करिते आघाते=दुष्टपणानें, निंदेने बोलणारे. एक=ते कोणी. (१५००) येरा–येर. ठाणि–ठाणदिवि. (१५०१) निर्वाळिले=सुंदर रीतीनें बांधलेले सर्पांगणि–(सर्प शरीरानें, मोकळी जागा, द्वार ?) सर्पांगना=नागिणीने. (अंगनं=आंगण, खुली, जगा, जाळे, वाहन, स्त्री, सुंदर स्त्री, कन्यारास रूंधले–कोंडले. (१५०३) चोखडे–चोखट. कपट गर्भिणी=कपट आहे जिच्या पोटांत कां गर्भात अशी कापट्यरूप. (१५०४) तपभक्तिमेधा=तप, गुरु भक्ति व सुबुद्धि. (१५०५) मेधावी=बुद्धीमान या–इया. आतळो=स्पर्श करू देऊ. (१५०६) स्रष्ट्याहि सारिखा=ब्रह्मदेवासारखा. (१५०७) गाडोरा–डांगोरा=तपश्चर्यारूपी तपाचा गडगा पाया. प्रसादु–प्रासादु=देवालय. (१५०८) दारवंटा=दरवाजा. कळसु–कळशु=कळस. (१५०९)

**तुझ्या हितार्थ तुला सांगितलेलें हें गीता शास्त्र तें तपोहीन, गुरू भक्तीचा ढिला श्रवण इच्छा नसलेला जो त्यास नच बोलावें तसेंच तप करणारा जरी का गुरूसेवा करणारा जरी, तरी पण त्यास आकर्णनी म्हणजे श्रवण करण्याची इच्छा नाहीं त्यास हें बोलू नये. सर्व शास्त्र जाणणारा असा विद्वान आहे, पूर्ण ज्ञानी आहे, जसा समुद्र गंभीर पण त्यावर होणारी वृष्टी ती वायांच म्हटली होते तसें हें शास्त्र अशा अफाट मनुष्याला सांगू नये. आर्ताच्या ठायीं तें कां न अर्पावें उदारपणाने ? तृप्त झालेल्यास दिव्यान्न वाढून वाया दवडण्यापेक्षां. सर्व तऱ्हेनें योग्य तरी पण त्यास जर ह्या शास्त्राची आवड नाहीं तर त्यास ते परिसवूं नये. ब्रह्मदेवाच्या योग्यतेचा, बुद्धिमान् तपी बुद्धिच्याठायी भक्तीचा पण निंदक आहे त्याला सहज कौतुकानेंसुद्धां हें शास्त्र ऐकवूं नये.**

**या कारणास्तव तपश्चर्यारूपी तपाचा गडगा पाया घालून वर गुरूभक्तीचा पुरा असा भक्त हा प्रसादच झाला आहे येथे 'श्रवणाची इच्छा' हाच की एक दरवाजा नेहमीं उघडा आहे, वर अनिंदकाचा उत्तम असा (भक्त) रत्नरूपी कळसच एक बसविला आहे.** (ओव्या १४८७–१५०९)

तुला हे पार्था ! हे गीताशास्त्र मोठ्या आस्थेनें कळकळिनें लाभलें आहे. असे अनुष्टानादिरहिताला, ईश्वर भक्ति विहिनाला केव्हांही सांगावें न–, सांगू नये असें तुसा बजावीत आहे. (१४८७)

अथवा तापसही जरी असला तरीपण, गुरूभक्तीस जो कच्चेपणामुळें ढिलाई करितो तो वेदांनी अंत्यज तो दूर केला होतो जसा का, तसा तो तू दूर कर. (१४८८)

अथवा असे समज कीं यज्ञाचा अवशेष 'चरू' तो वृद्ध अशा कावळयास तर नच सांपडणारा, नच मिळणारा, तशी ही गीता गुरूभक्तीहीन तापसासही देऊं नको. (१४८९)

अथवा असेंही हो कीं, देहानें तप जोडीत आहे, आचरीत आहे, गुरू व देवाच्या ठाई ही भजत आहे पण श्रवणीं, (आकर्णनी) जर इच्छा नाहीं, तरी— (१४९०)

*तरी मार्गे सांगितलेल्या दोन्हींही अंगांनीं तप व गुरूभक्तीनें, कर्मानुष्ठानांत ह्या जगीं उत्तम असा* जरी असला, तरीपण, श्रवणालागी योग्य नव्हें कीं. (१४९१)

मोतीं तें भलतेसें असें, उत्तम पण, जर का त्यास मुख का छिद्र, तोंड नाहीं तर त्यांत दोरा तो ओविला जाईल काय ? (१४९२)

सागर गंभीर आहे असें हें सर्वांनांही मान्य आहे पण पाऊस तेथें पडलेला तो वायाच की ! तो कांहीं कशाच्याहि उपयोगास येत नाहीं. (१४९३)

तृप्त झालेल्यास दिव्य असें अन्न वाढावें व मग तें जसें व्यर्थ दवडावें तेथें कां बरें तें क्षुधितास वाढून उदारपण तें करावें नच की. (१४९४)

म्हणून योग्य असें मोठेही असोत पण तेथें, कांहीं जर इच्छा आवड, कौतुक नाहीं तर कौतुकानेंहीपण हें देऊं नको. (१४९५)

सुजाण असा रूपाचा डोळा आहे, पण तो सुवासा करितां काय पुढें करितां येईल? म्हणून जेथें जें कांहीं मानलें होतें. तेथेंच तें योग्य असें होतें. (१४९६)

या करितां तपी, तसेंच भक्त ते पाहावेत पण हे सुभद्रापति, ते जर शास्त्र श्रवणाची आवड नसलेले तर ते त्यजावेतच, वाळावेतच, त्यागावेतच. (१४९७)

अथवा तपभक्ती असें होऊन श्रवणासाठीं भुकेले आहेत अशी सामग्री जर पाहाशील— (१४९८)

तरी गीताशास्त्र निर्माता, निर्माण करणारा, उत्पन्न करणारा, कृतीचा जो मी, सर्व लोकांना शासन करणारा अशा, असा मला जो सामान्यतेनें बोलेल तुच्छतेनें लेखील काय अहो साधारणच एक, का मध्यम असें करून बोलेल जो— (१४९९)

माझ्या सज्जनांना मजला दुष्टपणानें का निंदेनें बोलणारे जे कोणी, आहेत, त्यांना ह्या शास्त्राकरितां योग्य असें म्हणू नको. ते योग्य नव्हत. (१५००)

ह्या संबंधी दुसरी जी उपकरणें सामग्री ती अशी जाणावी की रात्रीच्या वेळीं मार्ग दाखविणारा दिवा आंत नाहीं अशी ती रात्रीची ठाणदिवि दीपस्तंभ जसा— (१५०१)

अंग गोरे आहे, तरणं आहे अंगावर अलंकारही घातले आहेत, पण आंत एक प्राण तो नाहीं—कां ज्यास प्राणानें सांडिलें आहे प्रेतच जसें तें— (१५०२)

सोन्याचे सुंदर असें बांधलेलें (सुंदर बांध्याचे असें) घर आहे, पण द्वार तें तर नागिणीनें कोंडलें आहे (सर्प शरीर तसें द्वार तें मोकळी जागा. ती कोंडले गेलें आहे) तसें तें (१५०३)

दिव्य असें उत्तम अन्न निपजलें आहे तयार आहे पण त्यामध्यें कालकूट भरलें आहे असें ते पण कपट आहे जिच्या गर्भात कां पोटांत अशीं कापट्यरूप ती तेथीलची मैत्री जाण. (१५०४)

तशी तपभक्ति व सुबुद्धि भक्ति ती तपाकडे सुबुद्धिकडे एवढेच काय ते जेथें तेथें ती त्याची सामग्री ती माझ्यांची निंदा करण्याकडेच योजिली झाली होते जेथें. (१५०५)

त्या कारणास्तव हे धनंजया! तो भक्त बुद्धिमान तप आजरणारा [(तपी ऐश्वर्य देखिले ६२१ (११)] तरी त्यास सुद्धां बाप्पा ह्या शास्त्रास स्पर्श करू देऊं नको. (१५०६)

बाबा आणिक यापेक्षां जास्त ह्या निंदकासंबंधी ते काय सांगावें. अहो ब्रह्मदेवासारखा योग्य जरी तरी सुद्धां त्यांस हें गीताशास्त्र एक कौतुकच कां कौतुकाचे करावें अशासाठीही पण देऊ नको. (१५०७)

म्हणून का या करितां हे धनुर्धरा! तळामध्यें तपश्चर्यारूपी तपाचा गडगा पाया घालूनच की व वर गुरुभक्तीचा पुरा असा हा प्रासादच एक जो झाला आहे. (१५०८)

वर श्रवणाची इच्छा सर्व जी तिजपुढीलचा तो दरवाजा सदा उघडा असा असून वर उत्तम असा नच कुटाळी, नच तिरस्कार अशा अनिंदा रत्नाचा कळसच * एक कीं बसविला आहे. (१५०९)

**फूटनोट**—ओवी १५०९ **कळस***

अर्जुना तुवा हे शास्त्र मोठ्या भक्तिनें मिळविले तें तपोहीनांला मुळींच सांगू नको तपस्वी पण गुरु-

(फूटनोट पान ३२७ वर)

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

भक्तेषु अभिधास्यति=भक्तास सांगतो, बोलतो, दर्शवितो प्रमाण मानतो, धारण करतो. परांभक्ति मयिकृत्वा=श्रेष्ठ अशी भक्ती माझेठायीची करून, मला प्रेमाचे करून. माम् एव एष्यसि=मीच होतो, मजला मिळतो, मजला पोहोचतो.

अन्वय :—यो मयि परांभक्तिंकृत्वा । इदं परमं गुह्मं मत् भक्तेषु अभिधास्यसि । स माम् एव एष्यति ॥ ६८ ॥

अर्थ :—जो मला अत्यंत प्रेमाचे (भक्तीनें) करून हे श्रेष्ठ असें गुह्यज्ञान माझ्या भक्तांना सांगतो. (बोलतो, दर्शवितो, धारण करतो.) तो निःसंशय मलाच पावतो (पावेल.)

( श्लोक ६८ वा ओव्या १५१०-१५१६ )

**ऐसा भक्तालयी चोखटी । गीता रत्नेश्वरू हे प्रतिष्ठी ।**
**मग माझिया संसाटि । तुकसी जगी ॥ १५१० ॥**

---

भक्तीचा ठामपणा नसेल तर अत्यंज जसा वेद टाळतात तसा तूं त्याला टाळ. म्हातारा कावळा जो त्याला यज्ञाहुतीचे शेष घालूं नये: गुरुभक्तिहीन तपोवृद्धाला सुद्धां गीता देऊ नकोस तप जोडले वर गुरुदेवाच्या ठिकाणी भक्तीही आहे पण ज्ञान श्रवण करण्याची आवड नाहीं असा जो कोणी तो पहिल्या दोन गुणानी (तप व भक्ति) लोकांत पूज्य होईल हे खरे पण गीता श्रवणाला तो पात्र होणार नाही. मोती कितीही पाणीदार आहेत पण त्याला मुख (भोंक) नसेल तर त्यात दोरा कधी तरी शिरेल काय? सागर गंभीर आहे हे सर्व जग कबूल करते, पण त्यात पावसाची वृष्टि झालेली व्यर्थ जाते! नाही का? भूक धाली आहे त्याला उत्तम पक्कानें आणि आग्रहानें वाढावीत व फुकट दवडावीत् त्यापेक्षां भुकेलेल्यासच ती उदारपणाने का देऊ नयेत? मनुष्य कितीही योग्यतेचा असला तरी त्याला श्रवण करण्यांची आवड नसेल तर कौतुकानेही हे शास्त्र त्यास देण्याचे मनांत आदर आणू नको! बरे का डोळा, रूप सौंदर्य पारखी त्याला सुवासाचे ते काय कळणार? जेथें जे मानवते तेथेंच ते फळाला येते. म्हणून तपस्वी भक्तिमान् पुरुष आदरावेत परंतु ते जर शास्त्रश्रवणाबद्दल आदर दाखविणार नाहीत तर तसल्याना टाळाच द्यावा. तप आहे भक्ति आहे श्रवणाची ही आवड आहे अशी सर्व सामग्री जुळली तरी गीताशास्त्र निर्माण करणारा सकळ लोकांचा प्रभु तो मी त्या माझ्या विषयी जर तुच्छतेचे शब्द काढील त्याला माझे भक्त व मी यांच्याविषयी जे कित्येक निंदेने बोलत असतात त्यानाही तूं गीताशास्त्र ऐकण्याला योग्य मानू नको. अरे! त्याची इतर गुणसामग्री म्हणजे दीपज्योति वाचून असलेली रात्रीची दिवाटणी समजावी. अंग गोरे तरूण अलंकारानी थाटलेले असावे पण त्यात प्राण नसावा. चोख सोन्याचे बांधलेले मंदीर असावे पण त्याचे दार मात्र जसे नागिणीने आडवावे चांगले दिव्य अन्न शिजवून तयार व्हावे पण त्यात जसे काळकूट विष मिसळावे किंवा मैत्रीत जसे कपट गुप्त रहावे त्याप्रमाणे जो माझ्या भक्ताची किंवा माझी निंदा करतो त्याचे तप भक्ति व बुद्धि ही अशीच दुष्ट असतात तरी त्याला या शास्त्राला स्पर्श करू देऊ नको! आणखी काय सांगू पण अर्जुना निंदक तो प्रत्यक्ष ब्रह्मदेवासारखा प्रज्ञावान असला तरीही त्याला ही गीता नुसती कौतुकाने सुद्धां देऊ नको.

अर्जुना तळाला भरपूर पुरणी ठासून त्या पायावर गुरुभक्तीचे भक्कम मंदीर झाला आहे. ज्याच्या ज्ञान श्रवणाला पुढचा दरवाजा निरंतर सताड उघडा आहे निंदेच्या अभावाच्या रत्नानीं ह्याचा सुंदर कळस बनला आहे. (अशा निकोप भक्तरूपी मंदीरास या गीतारूपी ईश्वराची प्रतिष्ठापना कर. असे केलेस म्हणजे तू माझ्याच योग्यतेला जगात चढशील.)

**का जे एकाक्षर पणेसी । त्रिमातृकेचिये कुसि ।**
**प्रणव होता गर्भवासी । सांकडला ॥ १५११ ॥**
**तो गीतेचिया बाहाळि । वेदबीज गेले पाहाळि ।**
**की गायत्री (फळी) फुली फळी । श्लोकांच्या आली ॥ १५१२ ॥**
**ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी माझ्या जो भक्ता ।**
**अनन्य जीवना माता । बाळका जेवी ॥ १५१३ ॥**
**तैसी भक्ता गीतेसी । भेटी करी जो आदरेसी ।**
**तो देहापाठी मजसी । येकचि होय ॥ १५१४ ॥**
**आणि देहाचेहि लेणे । लेउनि वेगळेपणे ।**
**असें तंव जीवे प्राणे । तोचि पढिये ॥ १५१५ ॥**
**ज्ञानिया कर्मठा तापसा । या खुणेचिया माणुसा ।**
**माजी तो येकु गा ऐसा । पढिये मज ॥ १५१६ ॥**

ऐसा–ऐशा. भक्तालयी = भक्तरूपी देऊळामध्यें. हे–हा. प्रतिष्ठी = स्थापन कर. संसाटि–संवसाटि = साम्यतेस, बरोबरीस तुकसी = योग्य होशील. (१५१०) एकाक्षरपणेसी = ॐ या अक्षराने. त्रिमातृकेचिये = अ उ म या तीन मात्रांच्या. प्रणव = ओंकार. सांकडला = अडकला, संकुचित होऊन राहिला. (१५११) बाहाळि–बहळि = शाखांच्या विस्तारामध्यें. वेदबीज = ओंकार. पाहाळी गेले = वृक्षरूपानें उंच विस्ताराले गेले. (१५१२) अनन्य जीवना = मातेच्या स्तन्यावांचून जीविकेला अन्य साधन नाहीं. अशा बालकाला (१५१३) पढिये = अत्यंत प्रिय. (१५१६)

**निंदेच्या प्रभावाच्या भक्तरूपी रत्नानें ज्याचा कळस बनला आहे. अशा निर्दोष भक्तरूपी मंदिरांत ह्या गीतेश्वराची गीतारूपी ईश्वराची स्थापना कर. असें करण्यानें माझ्याच की योग्यतेस तू चढशील. अ उ म या तीन मात्राच्या गर्भात अडकून पडला होता तो प्रणव जो वेदांचें मूळ बीज या गीतेच्या फांद्यानी विस्तार पावला आहे. गायत्रीच की ती अवतरली आहे. जशी कां ह्या श्लोकाच्या फुलाफळाची की. बालकाशिवाय ज्या आईला अन्यत्रपात्र गमत नाहीं. ज्या बालकाला तिच्याशिवाय अन्यत्र गति नाहीं अशा बालकाची व आईची गाठ घालून द्यावी. अहो महामंत्रानें भरलेल्या गीतेची माझ्या भक्ताबरोबर मोठ्या साक्षेपाने गाठ घालून देईल. तो देह-पातानंतर मजशी एकरूप होईल देह आलंकाराचें लेणें लेऊन जो वेगळेपणानें राहात आहे तो मजला जीवेप्राणें अत्यंत प्रिय होईल. ज्ञानी कर्मठ व तापसी ह्या खुणेच्या माणसामध्यें तोच एकटा जसा मला आवडता होतो.** ( ओव्या १५१०–१५१६ )

अशा उत्तम भक्तालयी भक्तरूपी मंदिरांत ह्या गीतारत्नेश्वराची गीतारूपी अत्युत्तम अशा रत्नाची, ईश्वराचीच की–प्राणप्रतिष्ठा–स्थापना कर ज्यायोगें तूं जगीं माझ्या बरोबरीची योग्यता, पावशील–माझ्या साम्यतेस येशील . (१५१०)

येथें मग ॐ ह्या एका अक्षरानें अ उ म या तीन मातृकांच्या कुशीमध्यें पोटी ॐ जो का गर्भवासा-मध्येंच कीं अडकला होता. संकुचित होऊन राहिला होता. (१५११)

तो आतां गीतेच्या शाखाच्या विस्तारामध्यें वेदबीज जो ओंकार तो वृक्षरूपानें उंच विस्तारला आहे. तेथें गायत्री वेदमाता ती श्लोकरूपानें अवतरली फुलांफळांनीं कीं, फुलाफळाची झाली आहे. (१५१२)

अशी ही मंत्ररहस्यबीज महामंत्रांनी भरलेली गीता जो माझ्या भक्तानां मेळवून देतो–जो हिची व माझ्या भक्ताची भेट करवितो. गांठ घालून देतो. त्यानें तर अनन्य अशा–म्हणजे मातेच्या स्तन्या-वांचून जीविकेला अन्य साधन नाहीं, अशा बालकांस की, जिला बालकाशिवाय इतरत्र गमत नाहीं अशा मातेची भेट करून दिली–गांठ घालून दिली–असें होय. (१५१३)

तशी भक्ताची व गीतेची आदरानें भेट करवितो तो तर देहाच्या शेवटीं मजशींच ऐक्यास येतो. (१५१४)

वर देहाचे हे लेणे अलंकार वेगळेपणानें लेवून जो पर्यंत असतो तेथें तोंच की जीवेप्राणेंकरून जीवा भावानें अत्यंत प्रिय असा होऊन असतो. (१५१५)

ज्ञानि, कर्मठ, तापसी यामध्यें का खुणेच्या माणसामध्यें तोंच एक की अहो मजला अत्यंत प्रिय होय. (१५१६)

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

प्रियकृत्तमः = अतिशय आवडता, अति प्रिय भविता = होणारा. अन्यतर = दुसरा कोणीही विशेष आवडता.

अन्वय :—मनुष्येषु मे प्रियकृत्तमः । न च कश्चित् तस्मात् । न अन्यः मे प्रियतरः भुवि । न भविता । च । ॥ ६९ ॥

अर्थ :—मनुष्यलोकी, मनुष्यामध्यें माझे याहून अधिक, प्रिय करणारा असा मला अतिशय आवडता असा दुसरा कोणीही नाहीं, तसेंच त्याच्याहून दुसरा कोणीही अधिक आवडता असा ही पण कोणी होणारा नाहीं. (श्लो. ६९ ओ. १५१७–१५२५)

**तैसा भूतळी आघवा । आनु न देखे पांडवा ।**
**जो गीता सांगे मेळावा । भक्तजनाचां ॥ १५१७ ॥**
**मज ईश्वराचेनिलोभे । हे गीता पढता अक्षोभे ।**
**तो मंडण होय ते सभे । संताचिये ॥ १५१८ ॥**
**नव पल्लवी रोमांचितु । मंदानिळे कांपवितु ।**
**आमोदजळे वोल्हवितु । फुलाचे डोळे ॥ १५१९ ॥**
**कोकिळा कलरवाचेनि मिसे । सद्गदे बोलविजत जैसे ।**
**वसंतु का प्रवेशे । मद्भक्त आरामी ॥ १५२० ॥**
**का जन्माचे फळ चकोरा । होऊनि चंद्र ये अंबरा ।**
**नाना नवघन मयुरा । वो देत पावो ॥ १५२१ ॥**
**तैसा सज्जनाचां मेळवि । गीता पद्यरत्ने उमपि ।**
**वर्षे जो माझ्या रूपी । हेतु ठेवुनि ॥ १५२२ ॥**
**मग तयाचेनि पाडे । पढियंते मज फुडे ।**
**नाहीच गा मागे पुढें । न्याहाळिता ॥ १५२३ ॥**
**अर्जुना हा ठावोवरि । मी तयाते सुये जिव्हारी ।**
**जो गीतार्थाचे करी । परगुणे संता ॥ १५२४ ॥**
**पै माझिया तुझिया मेळणी । वाढिनली जे काहाणी ।**
**मोक्ष धर्मु का जिणी । आलासे जेथ ॥ १५२५ ॥**

अनु–आन. मेळावा=समुदायाला. (१५१७) अक्षोमे=स्थिर चित्ताने. मंडण–मांडन=भूषणरूप (१५१८) आमोद–जळे वोल्हावितु=सुगंधोदकाने वर्षतात. (१५१९) कलरवे मिसे=मधुर स्वरनिमित्ताने. मद्भक्त आरामी–मद्भक्त आरामामाजी=माझ्या भक्तीरूपी बगीच्यांत (१५२०) होऊनि–होत जै. नवघन=नूतन नवे मेघ. (१५२१) मेळावी=समुदायात, मिलाफात. रत्ने......रत्नि. उमपि=पुष्कळपणानें (१५२२) पढियंते=आवडते. (१५२३) जिव्हांरी=हृदयांत. परगुणे=पाहुणेर, मेजवानी. (१५२४) मेळणी–मिळणी=समागमांत. जिनी–जिणी–जीवनी=जन्म साफल्यास. (१५२५)

**अर्जुना मजला तितका आवडता ह्या भूतलावर दुसरा कोणीहि नाहीं. जो का गीता ही भक्त मंडळीमध्यें कथितो मजऐश्वर्य संपन्न अशा ईश्वराची प्रेम भक्ति मनांत वागवून संतांच्या सभेमध्यें गीता पाठ शांतपणें चालवितो. तो कसा तर (उपमा ऐश्वर्य) वसंता सारखा वसंतच जसा वर्षाकाळी नव सजल मेघ मयूराच्या टाहोला ओ देत नवीन पालवीनें रोमांचित होऊन वाऱ्याच्या मंद झुळुकीनीं त्या वृक्षानां डोलवित प्रसन्न करीत फुलाच्या सुवासिक रसानें भूकरूपी वृक्षाना ओलें करित कोकिळेच्या पंचम स्वरानें हाका देत देत जो (वसंता सारखा) माझ्या भक्तजन मंडळी रूपी बगीच्यामध्यें का बागेमध्यें प्रवेश करतो, येऊन थडकतो कसा तर जसा आकाशांत उगवलेला चंद्र चकोराला जन्म साफल्य देतो तसा जो केवळ माझ्या स्वरूपावर हेतू कटाक्ष ठेऊन सातुसंतांच्या सभेमध्यें ही गीतारूपी रत्नें उदारपणें उधळतो, त्या पुरुषा इतकें मजला दुसरें कांहींही प्रिय नाहीं–मागेही नव्हते व पुढेंही पण सापडणारें नाहीं–जो का मेजवानीच गीतार्थाची ही संत सज्जनाना देतो; तशास तर आतांपर्यंत मी आपल्या अंतःकरणीच्या जिव्हाळ्यामध्येंच की ठेवित आलों आहे–येथे आता माझ्या व तुझ्या भेटीने समागमाने जसा का मोक्ष धर्मच तो आपल्या जीवनास जन्मसाफल्यास आलेला की.**

तसा दुसरा कोणीही तितका आवडता ह्या सर्व पृथ्वीचे पाठीवर हे पांडवा! दिसत नाहीं, सांपडत नाहीं. जो का भक्तजनाच्या मेळाव्यास समुदायास गीता सांगतो, कथन करतो असा. (१५१७)

मज ऐश्वर्यसंपन्न अशा ईश्वराच्या लोभामुळें गीता ही (आवडती करून) मजविषयीं प्रेम भक्ति मनांत बागवून स्थिर चित्तानें (आवडती करून आहे) जो संतांच्या सभेमध्यें गीतेचा पाठ चालवितो तो संताच्या सभेस भूषणरूप होय. (१५१८)

नवपल्लवांनीं अंगावर रोमांच उभे करवीत मंद मंद वायूनें डोलवीत कंप पाववीत, सुगंधित जलांतें, वर्षत (स्रवत) फुलांचे डोळे ते–आनंदानें नयन ते ओले प्रफुल्लित केले होत आहेत. (१५१९)

जशीं कोकिळा ही मधुर स्वराच्या निमित्तानें सद्‌गत बोलावीत आहे पंचमस्वरानें हांका मारीत वसंतच की जसा माझ्या भक्तमंडळीरूपी बगीच्यामध्यें बागेमध्ये प्रवेश करतो प्रवेशत आहे. (१५२०)

अथवा असेंही होय कीं जन्मल्याचें फळ चकोरास देऊन चंद्र हा आकाशांत उगवत आहे, अथवा चंद्र आकाशांत उगवला म्हणजे चकोरास जन्म सफळ वाटतो. का नवनूतन मेघ मयूराच्या टाहोनां 'ओ' देत देत येत आहे प्रसन्न होऊन वर्षाकाळींचा तो येऊन थडकतो कां येत आहे जसा. (१५२१)

तसा माझ्या स्वरूपाच्याठायीं हेतु ठेवून सज्जनांच्या समुदायामध्येंही गीता पद्य रत्नें ती पुष्कळपणें वर्षत आहे, उधळत आहे! (१५२२)

मग त्याच्या बरोबरीचा असा दुसरा तितका मज पढियंता आवडता असा मागें केव्हांहि झालेला नाहीं व पुढेही पण होणारा कोणीच नाहींच कीं. (१५२३)

हे अर्जुना जो का ह्या संतांना गीतार्थाची मेजवानी करतो. असा हा ठाव ज्याचा त्यास मी तर आपल्या जिव्हाळयाच्या अंतःकरणीचे करीत असतों. (१५२४)

माझ्या तुझ्या मिळणी (मेलनी–संयोग–मिश्रण.) मध्यें जी ही काहाणी वाढीची होऊन आहे, येथें तर मोक्षधर्मच कीं, जन्मसाफल्यास (जगण्यांस का) आला आहे. (१५२५)

**अध्येष्यते च यइमं धर्म्यं संवादमावयो:।**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टस्यामितिमे मति: ॥ ७० ॥**

अध्येष्यते=अभ्यासील. धर्म्यम्=धर्ममय. इष्टःस्याम्=पूजिला होय.

अन्वय :—येन। अध्येष्यते आवयोः संवादम्। धर्म्यम् इमम्। च। तेन। अहं ज्ञानयज्ञेन इष्टःस्याम्। इति। मे मतिः। च। ॥ ७० ॥

अर्थ :—ज्यानें हा आम्हां दोघांच्या धर्ममय संवादाचे, अध्ययन केलें होईल त्यानें तर मजला ज्ञानयज्ञानें, पूजिलें असें मी मानीन. (श्लोक ७० वा ओव्या १५२६–१५२९)

**तो हा सकळार्थप्रदु। आम्हां दोघांचा संवादु।**
**न करिता पदभेदु। पाठेचि तो पढे ॥ १५२६ ॥**
**तेणे ज्ञानानल प्रदीप्ती। मूळ अविद्येचिया आहुति।**
**तोषविला होय सुमति। परमात्मा मी ॥ १५२७ ॥**
**घेउनि गीतार्थु उगाणा। ज्ञानिया जो विचक्षणा।**
**ठाकी तो गाणावणा। गीतेचा तो लाहे ॥ १५२८ ॥**
**गीता पाठकासी ऐसे। फळार्थ ज्ञा (न) चि सरसे।**
**गीता माउली की नसे। जाणे तान्हे ॥ १५२९ ॥**

अर्थप्रदु–अर्थ प्रबोधु=पुरूषार्थ मिळवून देणारा. पदभेद=पदच्छेदादिक, एक पद सुद्धां न सोडतां (१५२६) ज्ञानानळी प्रदीप्ती=प्रज्वलित ज्ञानाग्नीत. अविद्येचिया=अज्ञानाच्या (१५२७) उगाणा= अनुभव. गाणावणा–गाणावाणा=गाणारा व वर्णन करणारा, (गीतेचा अर्थ अनुभवून जे फळ ज्ञानियास प्राप्त होते नेच गीतेच्या गायनाने प्राप्त होते.) (१५२८) ऐसे–असे. फळार्थ ज्ञानचि सरसे–फळ अर्थज्ञाचि सरिसे, जाणे तान्हे=जाणते व नेणते. (१५२९)

**आम्हा दोघाचा संवाद जो पाठानें पढतो त्यानें ज्ञानाग्नीत अज्ञानाची आहुती देऊन मी परमात्मा तोषविला. गीतार्थाचा अनुभव घेऊन जो जो अनुभव चतुर दक्ष ज्ञानी वर्णन करणारा लाभतो–तोच तसाच गायन करणारा जो, तोही ह्या गीतेचा अनुभव लाभतो–श्रीगीता पाठकास (अर्थज्ञा)–शब्दाचा भाव शब्दाचा अभिप्राय जाणणारा सारखे फळ मिळते. गीता माउलीस जाणता नेणता असा भेद नाहीं.**
**(ओव्या १५२६–१५२९)**

तो हा सकळ भाव देणारा, का ज्ञान जागृतावस्थेचा भाव देणारा असा हा आम्हां दोघांचा कृष्णार्जुनाचा–संवाद पदाचा अर्थ विचार न करितां पाठानेंच कीं, जो पढतो, पाठ (करतो) करील. (१५२६)

त्यानें तर प्रज्वलित ज्ञानाग्नित अज्ञानाची आहुती देऊन, परमात्मा मी तो संतोषविला होय. (१५२७)

त्या गीतार्थाचा (ज्ञाता कां) अनुभव घेऊन जो चतुर असा दक्ष ज्ञानी बारीक चौकशी करणारे तो होऊन गीतेचे गायन गान करणारा तसेंच पठण व गीता वर्णन करणारा असा होतो तें गीता गायन व गीता वर्णन करणें तें त्यास लाभतें. (१५२८)

असें फल गीता पाठकास (अर्थज्ञ शब्दाचा भाव, अभिप्राय जाणणारा सारखें फळ) मिळत असतें. अहो गीता माऊलीयेस तर जाणता नेणता हा का जाणते व नेणते असा भेद नाहीं. (१५२९)

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**
**सोऽपिमुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥**

अनसूयः=हेवा न करणारा.

अन्वय :—यो नरः । श्रद्धावान् अन् असूयः । च । अपि शृणुयात् । सः अपि मुक्तः । स्यात् । पुण्यकर्मणा शुभान् लोकान् प्राप्नयात् ॥ ७१ ॥

अर्थ :—श्रद्धावंततेने श्रद्धेचा तसेंच दोषदृष्टीरहिततेचा (हेवा न करणारा) असा होऊन जो नुसतें हें श्रवण करील, तो पापापासून मुक्त होऊन शुभलोकांना पुण्यवानांच्या उत्तम लोकांनां प्राप्त होईल.

श्लोक ७१ वा ओव्या १५३१-१५४०

**आणि मार्गी निंदा । सांडुनि आस्था पै शुद्धा ।**
**गीता श्रवणीं श्रद्धा । उभारी जो ॥ १५३० ॥**
**तयाचा श्रवणपुरी । गीतेची अक्षरे पैंठी ।**
**होतीना तंव उठाउठी । पळेचि पाप ॥ १५३१ ॥**
**अटवीयेमाजी जैसा । वन्हि रिघता सरिसा ।**
**लंघिती का दिशा । वनौके तिये ॥ १५३२ ॥**
**कां उदयाचलकुळि । झळकता अंशुमाळी ।**
**तिमिरे अंतराळी । हारपती ॥ १५३३ ॥**
**तैसा कानाच्या महाद्वारी । गीता गजरू जेथ करि ।**
**तेणे सृष्टीची आदिवरी । जायेचि पाप ॥ १५३४ ॥**
**ऐसे जन्मवेली धुवट । होय पुण्यरूप चोखट ।**
**याहीवरी अचाट । लाहे फळ ॥ १५३५ ॥**
**जे ये गीतेची अक्षरे । जेतुली का कर्णद्वारे ।**
**रिघती तेतुली होती पुरे । अश्वमेध की ॥ १५३६ ॥**
**म्हणुनि श्रवणे पापे जाती । आणि धर्म करी उन्नती ।**
**तेणे स्वर्गराज्य संपत्ती । लाहेचि शेषी ॥ १५३७ ॥**
**तो पै मज यावयालागी । पहिलेपेणे करी गा स्वर्गी ।**
**मग आवडे तंव भोगी । पाठि मजचि मिळे ॥ १५३८ ॥**
**ऐसी गीता धनंजया । ऐकतया पढतया ।**
**फळे महानंदे मिया । बहु काय बोलो ॥ १५३९ ॥**
**या कारणें हे असो । परि जयालागी शास्त्र अतिशो ।**
**केला ते तंव तुते पुसो । काज तुझे ॥ १४४० ॥**

सरिसा–सहसा. वनौके=वनांत रहाणारे पशुपक्ष्यादि. (१५३२) अंशुमाळी=सूर्य. (१५३३) आदीवरी=आरंभापासूनचे. (१५३४) ऐसे–ऐसी. जन्मवेली–जन्मवल्ली=जन्माची वेली. (१५३५) ये–इये.

(१५३६) म्हणुनि–म्हणौनि. करी–धरी. शेषी–शेखी. (१५३७) पहिलेपणे–पहिलेपेणे = पहिला मुक्काम. (१५३८) पढतया–आणि पढतया. (१५३९) शास्त्रा अतिशो = गीता शास्त्राचा विस्तार. तूंते–तुज. (१५४०)

**निंदा करण्याचें सोडून ज्यानें शुद्ध आस्थेनें गीता श्रवण करण्याचें घेतलें. त्याच्या श्रवण पुटामध्यें गीतेचीं अक्षरें प्रविष्ट होतात न होतात तोंच की पाप तें पळूं लागतें पुण्य घडतें.** दाट अरण्यास वणवा लागला असतां पशुपक्ष्यादि वनचरें ते अरण्य सोडून पळून जाऊं लागतात सूर्य उगवला तेथें अंधकार तो अंतराळींच कीं नाहींसा होतो–त्याप्रमाणें कानाच्या महाद्वारामध्यें गीता जेथें गर्जू लागून नाम गजर करते तेथें तर सृष्टीच्या प्रारंभापर्यंतचे पाप तें जातेंच नाहींसे होतें–ह्या जन्माची परंपरेची वेळ ती उजळली होऊन शुद्ध अशी पुण्यरूप होऊन जाते. येवढेंच काय पण तेथें फळ तें बहु मोठें असें मिळतें–जीतकी अक्षरें ह्या गीतेची कर्णद्वाराच्या आत रिघावा करतात तितके पुरे इंद्राचे ऐश्वर्य तें अश्वमेध झाले समजावेत का गीता श्रवणें–श्रवणानें पापें जातात धर्माचा उत्कर्ष होतो व त्यायोगे शेवटीं स्वर्ग संपत्तीचा लाभ होतोः—असा तो स्वर्गीचा मुक्काम तो मजकडे येण्याचा पहिला मुक्काम आहे तेथें यथेच्छ भोग भोगल्यावर मजलाच येऊन मिळतो अशी गीता पढणाऱ्याला तसेंच ऐकणाऱ्याला मी जो महानंद तो महानंदरूपी फळच एक देणारा कीं, बहुत काय पण—असे हे असो पण ज्या कारणास्तव शास्त्रविस्तार केला आहे त्याचे कारण ते मला सांगावे. धनंजया शास्त्रसिद्धांत तुजला समजून आला काय? (ओव्या १५३०–१५४०)

सर्व मार्गामध्यें निंदा सांडून व शुद्ध आस्थेवर उभे होऊन जो गीता श्रवणीं श्रद्धा उभारून आहे. (१५३०)

त्याच्या श्रवण पुटामध्यें गीतेची अक्षरें, स्थिर होती न होती तोंच उठाउठी पाप तें पळू लागतें. (१५३१)

अटवीमध्यें जसा दावाग्नी लागला असतां पशु पक्ष्यादि वनांत राहाणारे ते एकदम दिशा उल्लंघितात. (१५३२)

किंवा उदयाचलाच्या देशी सूर्य झळकूं लागतो तेव्हां तिमिरे कां अंधारे ती आकाशांत अंतराळी नाहींशीं होतात. (१५३३)

त्याप्रमाणें कानाच्या महाद्वारामध्यें (मह = (१) पूजा करणें, प्रकाशणें, बोलणें, (२) पूजनीय, तेज, उत्सव महत् = श्रेष्ठ, मोठा. महत्व = थोरपणा.) कर्ण म्हणजे टोचणें, भोंक पाडणें जें आज्ञा ऐकण्यानें मनावर घेतलें जाणारें जें द्वार म्हणजे उपाय, साधन, गीता ही गजर करिते, व त्यामुळें कीं सृष्टीच्या आरंभापासूनचें पाप तें नाहींसें होतेंच. (१५३४)

ऐसे प्रकारे जन्मवल्ली का जन्मवेली ती धुवट होऊन येते. पुण्यरूप अशी चोखट होते व ती धुवट होऊन येते, पुण्यरूप अशीं चोखट होते. व याहीवर अचाट असे फळ ते लाभले होते. (१५३५)

ते असे कीं जी ही गीतेची अक्षरे जी कां म्हणून कानाच्या द्वारे आंत रिगतात न शिरतात तोंच तितके कीं, अश्वमेध यज्ञ होतात. (१५३६)

या करितां श्रवणानें पापे जातात व धर्म उन्नती उत्कर्ष धरूं करतो. त्यायोगे तर स्वर्गीची राज्य संपत्तीही पण शेवटी लाभली होते. (१५३७)

असा तो मज पावण्याकरितां पहिला मुक्काम तो स्वर्गीच करतो व मग आवडेपर्यंत तेथीचे भोग भोगीत रहातो व शेवटीं मजला मिळून जातो. (१५३८)

अशी हे धनंजया गीता ऐकणाऱ्यास व पढणाऱ्यासही-(मह=पूजा करणें, प्रकाशणें, बोलणें, आनंद, हर्ष, अशा-महानंदास येऊन) फल देणारी होते. येथें मी याहून अधिक तें काय बोलावें बरें ! (१५३९)

याकरितां हे असो पण ज्याकरितां हा शास्त्र उत्कर्ष आधिक्य का शास्त्राचा विस्तार केला आहे. तें अगोदर तुजला विचारावें जें कां काजकाम तुझें जें त्याबाबत. (१५४०)

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**
**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥**

कच्चित्=प्रश्न विकल्प इत्यादी अर्थी. चेतसा एकाग्रेण=एकाग्र चित्तानें. तें अज्ञान संमोहः प्रनष्टः [प्रनष्टः=पळून गेला, अदृश्य झाला, नाश पावला. ] तुझी ती अज्ञान भ्रांति, भुरळ ती नाहींशी झाली नां ?

अन्वय :—पार्थ । एतद्त्वयाचेतसा एकाग्रेण श्रुतम् । कच्चित् । कच्चित् हे धनंजय । ते अज्ञान संमोहः प्रनष्टः ।

अर्थ :—हे पार्था ! तूं हें चित्ताच्या एकाग्रतेनें ऐकलेंस कीं नाहीं तें ? तुझें हे धनंजया ! अज्ञान भ्रांति भुरळ ती दूर झाली नां ! नाहींशी झाली कीं नाहीं ? (श्लोक ७२ वा ओव्या १५४१–१५५८)

**तरी सांग पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांत आघवा ।**
**तुज एकचित्ते फावा । गेला आहे ? ॥ १५४१ ॥**
**आम्ही जैसे जया हे रीती । उगाणिले कानाच्या हाती ।**
**येई तैसेचि तुझ्या चित्ती । (पंयठे) पैठे केले कीं ? ॥ १५४२ ॥**
**अथवा माझारी । गेले सांडिविखुरी ।**
**किंवा उपेक्षेवाहिवरि । वाळुनि सांडिले ? ॥ १५४३ ॥**
**जैसे आहीं सांगितले । तैसेचि हृदयीं फावले ? ।**
**तरी सांग पा वहिले । पुसेन ते मी ॥ १५४४ ॥**
**हा गा स्वज्ञानजनिते । मागिले (मोहि) मोहे तूंते ।**
**भुलविले तो येथें । आहे कीं नाहीं ? ॥ १५४५ ॥**
**हे बहु असो काइं । सांगै तु आपला ठाइं ।**
**कर्माकर्म काही । देखतासी ? ॥ १५४६ ॥**
**पार्थु स्वानंदैकरसे । विरेल ऐसा मेदु दिसे ।**
**आणिला येणे मिसे । प्रश्नाचेनि ॥ १५४७ ॥**
**पूर्णब्रह्म जाला पार्थ । तरी पुढिल साधावया कार्यार्थ ।**
**मर्यादा श्री श्रीकृष्णनाथ । उलंघुनेदि ॥ १५४८ ॥**
**येऱ्हवी आपुले करणे (कर्णे) । सर्वज्ञ तो काय नेणे ।**
**परि केले ते पुसणें । याचिलागी ॥ १५४९ ॥**
**येवं करूनिया (पृच्छा) प्रश्ना । नसतेचि अर्जुनपणा ।**
**आणुनिया आपणा । ते बोलवील स्वये ॥ १५५० ॥**
**मग क्षीराब्धीते सांडितु । गगनी पुज्य मांडितु ।**
**निवडे जैसा नवनीतु । पूर्णचंद्र ॥ १५५१ ॥**
**तैसा ब्रह्म मी हे विसरे । तेथ जगचि ब्रह्म (त्वे) भरे ।**
**हे ही सांडी तरी वीरे । ब्रह्मपणाही ॥ १५५२ ॥**

ऐसा मोडितु मांडितु (ब्रह्मी) ब्रह्मे। तो देखे देहाचिये सीमे।
मी अर्जुन येणे नामे। उभा ठेला॥ १५५३॥
मग कांपता करतळी। दडपुनि रोमावळी।
पुलक स्वेदजळी। जिरूनिया॥ १५५४॥
प्राणक्षोभे डोलतया। आंगा आंगचि टेकया।
सुनी स्तंभु चालतया। भुलौनिया॥ १५५५॥
नेत्रयुगुलाचेनि वाते। आनंदअमृताचे भरिते।
वोसंडत ते मागुते। काढुनिया॥ १५५६॥
विविधौत्सुक्यांची दाटी। चीप आत ती होती कंठी।
ते करूनिया पैठी। हृदयामाजी॥ १५५७॥
वाचेचे वितुळणें। सांवरूनि प्राणे।
आक्रमाचे (अक्रमाचे) श्वसणे। ठेऊनि ठाई॥ १५५८॥

फावा गेला = मनांत भरला, प्रकाशला, प्राप्तीचा झाला, आहे नां? (१५४१) उगाणिले = स्वाधीन केले येई–येरी = त्या कानांनी (१५४२) सांडी विखुरी = सांडून गेले काय? का इकडे तिकडे विखरून व्यर्थ गेले काय? (१५४३) स्वज्ञान......स्वाज्ञान. मोहि–मोहे. आहे–असे. (१५४५) मेदुदिसे–मेददशे. (१५४६) उल्लंघु–उल्लंघो (१५४८) करणे–कर्णे. तो काय–काय तो. ते... (१५४९) पृच्छा–प्रश्ना–प्रश्न. अर्जुनपणा–अर्जुनपण आपणा–जाले पूर्णपण. बोलविले–बोलती (१५५०) पुज्य मांडितु–पुज मंडित = तेजाचा गोळा. नवनीतु–न निवडित. (१५५१) ब्रह्म भरे–ब्रह्मत्वे भरे. (१५५२) अष्ट सात्त्विक भाव अर्जुनाच्या देही उमटलेले ते = कंप, रोमांच, स्फुरण, स्वेद, प्रेमाश्रु, हास्य, लास्य, आणि गायन [किंवा "स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः वैवर्ण्यमश्रुप्रलयः इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः॥] मोडितु– मोडतु. ब्रह्मी–ब्रह्मे. देहाचिये–देहाजिये. (१५५३) मग कांपता करतळी = तळहाताला कंप सुटलेला. रोमावली–रोमांच. पुलक–पुलकु. स्वेदजळी = घामाचे बिंदू. जिरूनिया–जिरऊनिया (१५५४) प्राणक्षोभे डोलतया = प्राण वायूच्या प्रसाराने. टेकया–टेका. स्तंभु चालतया (चालया) = स्तिमित होऊन. भुलौनिया = चलन वलन विसरून. (१५५५) वाते–वोते = ज्यातून पाणी वाहाते ते (नदीचे) पात्र. [ओत, प्रोत– वोत–ओतणे हें सहज ज्या मधून होईल असें असणारे जें मुखाचें एक पुंजाळणें, भरणें, तेजोमय होणें. असें भरून येणें, दाटणें, प्रफुल्लिततेनें तेजवान झालेलें डोळ्याचें द्वय—

कांठ असलेले असें जेथून वोतणें हें न सांडतां होतें–स्थान, ठिकाण, पात्र, स्थळ, गवळण, विद्यापात्र विद्यत्व, जेथें स्थिर होतें, तें स्थळ–म्हणजे येथें विद्यापात्र, नयन मनोहारि असें जें पात्र विद्यत्व (पात्र, रमणीयत्व, मनोरम्य, असें विद्यत्व, विद्यापात्र, आभरणे)] वोसंडत भरून वाहात. (१५५६) विविधौत्सु- क्याची–विविधा–औत्सुक्याची. दाटी = उत्कंठा भरानें. चीप = कडा, तुकडा, त्यासारखी वस्तु. (१५५७) अक्रमाचें = अव्यवस्थित रीतीनें. आक्रम–आक्रमणें = मर्यादा उल्लंघणें. अक्रम = अपराध, आचाराचें उल्लंघन आक्रम = जवळ येणें, धरणें, मिळविणें, ताण करणें, पराक्रम, ओझें लादणें, पराक्रम, विद्वत्ता, वर जाण्याचा आधार. (१५५८).

**आम्ही ज्या रितीनें कानाच्या हातानी पदरांत बोधले (तेंच तुझ्या चित्ती स्थिर झालें केलें) मध्यें जें कांहीं सांडण्यालवंडण्यावर का चाल ढकलीवर झुगारून दिलेलें तेंच कीं तुझ्या चित्तीं स्थिर केलें.** आम्ही जसें सांगितलें तसेंच हृदयीं अंतःकरणामध्यें मनाच्याठायीं प्रविष्ट झालें, समजू आले यावर आता देव म्हणतात कीं मी जें कांहीं पुसेन तें सांग सत्वरतेनें कीं स्वकीय अज्ञानापासून उत्पन्न

झालेलें पूर्वीचें जें कांहीं ज्याने तुजला भुलविलें चकविलें होतें. तो येथें (मोह) आहे किंवा नाहीं तो! तू आपल्याच आपणास सांग कीं. करावें काय व न करावें काय तें तू आपल्या ठायीं डोखत पाहात समजत आहेस काय? अशा ह्या देवाच्या प्रश्नाच्या निमित्तानें कीं निजानंदरूप सामरस्यानें पार्थ तो विरून मुरून जाईल अशा भेदाच्या निराळेपणाच्या अवस्थेस आणिला गेला. पार्थ पूर्ण ब्रह्म झालेला तरी पण पुढील कामकाज अर्थ म्हणजे कार्यार्थ साधण्यासाठीं मर्यादा ती कांहीं श्रीकृष्णनाथ ते ओलांडू देईनात. एरव्ही पूर्ण ब्रह्म भगवान जे सर्वज्ञ ते कांहीं आपलें असें हें करणें तें काय जाणत नाहींत? पण एवढ्याचसाठीं कीं त्यानीं त्याजला प्रश्न विचारले याप्रमाणे प्रश्न करून नसतेंच उसनेंच अर्जुनपण आणून ब्रह्म जालेपणाचे तें आपणच की तें परब्रह्माचें पूर्णपण तें स्वयेंकरूनच त्यास त्याजकडून बोलवीत आहे व आतां, क्षीराब्धीस सोडून गगनामध्यें तारकापुंज शोभवीत चंद्र तो वेगळा न होतां तो वेगळा वाटतो कारण चंद्राची व क्षीराब्धीची–क्षीरसागराची कांती एकच आहे म्हणून तो क्षीराब्धीपासून वेगळा नाहीं: त्याप्रमाणें मी 'ब्रह्म' आहे हे पार्थ विसरण्यावर तर सर्व जगच की ब्रह्मपणानें भरून येत आहे व असेही जरी त्यानें सोडले विसरले तरी ब्रह्मपणही तें विरून आहे, तो ब्रह्मपणांत मुरून आहे. त्याप्रमाणें ब्रह्म जे त्यानेंच की तो मोडला ब्रह्मपणानें वळला मांडला देहा एवढेपणाच्या दुःख सीमेवरच की मी कोण तर नावे अर्जुन असा मी देहानें उभा जरी तरी पण कांपऱ्या कांपऱ्या तळ हातानें रोमांच आंगी आलेले ते दाबून धरून दडपून घामाचे बिंदू जिरवून प्राण वायूच्या क्षोभ म्हणजे वाढीनें डोलत राहणाऱ्या आंगाला आंगाचाच टेका देत स्तब्ध राहून हालचाल करण्याचें विसरून भुलून दोन्ही नेत्राच्या वाटेनें वाहाणणे अश्रु प्रवाहानें (वोते) आनंदामृताचे भरतें तें येत होतें तें वरचेवर पुन्हः पुन्हः उसळत उसळत होतें तें काढून उत्सुकता ती विविधतेची ती गर्दी दाटी आलेली कंठी स्वरभंगानें दाटत होती ती अंतःकरणाचे ठायी प्रविष्ट करून आहे. प्राणानें वाचेचे वितुळणें सावरून धरून श्वासोच्छ्वासाची अनियमित गती स्थिर केली. या नंतर अर्जुन म्हणाला की काय देव पुसतात मोह आवडतो तो तर आपुल्या कुटुंबासहितही तो आपला ठाव घेऊन निघून गेला कीं नां? (ओव्या १५४१–१५५८)

तरी आतां हे पांडवा सांग बरें कीं, तुजला एकाग्रमनानें, एकांततेनें, एकचित्तेंकरून, हा शास्त्र धर्म नियम, सिद्धांत, समजून आला आहे काय? तुझ्या मनांत भरला आहे काय? तुजला प्राप्तीचा झाला आहे काय? तुझ्या बुद्धीला तो प्रकाशाचा झाला आहे काय? तें सांग. (१५४१)

आम्हीं जसें ज्या रीतीनें कानाच्या हाती यावें असें तुझ्या पदरांत टाकिलें आहे. तुझ्या पदरी बांधिलें आहे. त्या तुझ्या कानांनीं अगदीं तसेंच्या तसेंच तुझ्या चित्तामध्यें स्थिर केलेलें झालें आहे काय सांग पाहू? (१५४२)

किंवा आधीमधीच तें सांडण्या लवंडण्यावर गेलें आहे कीं, काय? का उपेक्षाच एक ह्या चाली-रीतीची, रीतीभातीची ती अशा त्या चालढकलीवरच मुळीं तें गेलें त्यामुळें तें त्यागिलें झालें, व्यर्थ झालें, झुगारूनच दिलें जसें कां वाळिलें जाऊन सांडलें आहे तें, सांग पाहूं. (१५४३)

जसें आम्ही सांगितलें अगदीं तसेंच जर तुझ्या हृदयीं प्रवेशलें आहे, प्राप्तीचे झालें, बुद्धि प्रकाशाचें झालें आहे; तर जें कांहीं मी पुसेन संवरेन त्याबाबत सत्वर सांगण्याचें कर. (१५४४)

तें असें कीं आपल्या स्वतःच्या अज्ञानापासून जन्मलेल्या त्या पूर्वीच्या मोह भ्रांतीनें जें तुला भुलविलें होतें, तसा तो मोह आतां येथें आहे कीं नाहीं? तो–तो मोह आतां असताच आहे कीं, नाहींसा झाला आहे तें सांग. (१५४५)

असें हें बहुत काय विचारावें पण तुझें तूंच मुळीं आपल्या मनामध्यें विचार करून तें ठरीव, सांग की कर्म का अकर्म असें जें कांहीं तें देखणें देऊन आहे नां? (१५४६)

पार्थ हा निजानंद । ब्रह्मानंद, " निजानंद हेचि पै ब्रह्म । हिम योगी जाणती वर्म ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल स्मरे मग । पुढील संसार दर्शना ॥ १ ॥ बापरखुमादेवीवरवांचून काम सांगे जीवीची खुण ॥ विठ्ठल विठ्ठल विठ्ठल मना ॥ २ ॥ निजानंदाच्या सामरस्यानें तो आपल्या ठायीच विरेल-विरला व्हावा, असाच कीं, ह्या प्रश्नाच्या निमित्तानें भेददशेस आणिला-तोच आपला आपण असा द्वैत बुद्धिचा केला गेला. तेथें तें आपलेपणानेंच मुळीं निजानंदात समरसणें होत आहे असें. (१५४७)

पार्थ पूर्णब्रह्म झाला तरीपण पुढील कार्यार्थ साधण्यासाठीं कीं त्यास द्वैत बुद्धिची मर्यादा श्रीकृष्णनाथ जे त्यांनीं उल्लंघु दिली नाही उल्लंघु देईनात. (१५४८)

एरव्हीं पाहिलें असतां आपलें जें कांहीं एक कामकाज करणें का 'कृ' [ कृ=करणें जें कांहीं एक कर्म आरंभ करणें, (अनुबंध, क्षय, हिंसा, मज पेक्ष्यच पौरुषम् दारभ्यते कर्म तत्तामसमुदाहृतम्) करणें हिंसा करणें डुकृञ=रचणें, बनवणें, अमलांत आणणें, स्थापणें, ठेवणें, स्वीकारणे, घेणें, मानणें कल्पणें, मनांत आणणें, साधणें परिणाम करणें वेळ घालविणे, शिकणे. मनसिकृ=मनांत आणणे. उदक कृ=तर्पण करणे. काल कृ=मरणे. नखानि कृ=नखे साफ करणें. विना कृ=वियोग करणें सत् कृ=मान देणें. पुरस् कृ=मान देणें, हजर करणें, पाळणें. बहिस् कृ=वाळविणे, हाकून देणे, वाळीत टाकणें. अधि कृ=अधिकार देणे, नेमणे ] करणें जें तें सर्वज्ञ भगवान काय जाणत नाहींत, तरीपण जें कांहीं केलें भोगिलें, उपयोजिलें, उपभोगासाठी तेंच पुसण्याचें केलें तें याच कारणाकरिता कीं. (१५४९)

अशा तऱ्हेनें प्रश्न करून अर्जुनाच्याठायीं नसतेंच कीं, अर्जुनपण आणून आपणच तें तेथीलचें तें पूर्णपण झालेलें जें तेंच कीं झालेलें पूर्णपण स्वतः आपल्या मुखानें बोलवीत आहे. (१५५०)

यावर मग क्षीरसागरी रहाणारे भगवान् ते त्यांनीं दुधाचा अब्धि, सागर सोडून गगनामधील तारका पुंजास शोभवीत वेगळे न होता, वेगळे वाटत आहे, वेगळा वाटतो आहे, पूर्णचंद्र ते भगवान जसें का नवनीतच ते. (१५५१)

तसें मी ब्रह्म ह विसरले नव्हे. तर सर्वजगच कीं ब्रह्मत्वें भरलें आहे हेही कीं सोडून दिलें तरी ब्रह्मपणही तेथें विरतें विरून असलेलें असतेंच. (१५५२)

अशा तऱ्हेनें ब्रह्मपणानें घडत, मोडत तो देहपणाच्या दुःख सीमेवरच कीं मी नांवानें अर्जुन आहे असा ठाका आहे. उभा झालेला असा. (१५५३)

## सात्त्विक भाव दर्शन :—

यावर मग कांपऱ्या तळहातानें (रोमावलि, रोमराजि, रोमलता पोटापासून बेंबीपर्यंतचे केंस. रोमकांत=लोहविशेष ) स्थिर करून घामाचें बिंदु पुलिका त्या जिरवून आहे. (१५५४)

प्राण वायूच्या क्षोभानें डोल आलेला, तो अंगास अंगाचा टेका देऊन, अंगावर अंग टेकण्यास का टेकल्यामुळें स्तब्ध राहून हालचाल करण्याचे चाळे विसरला-स्तंभित होऊन हालणें, चालणें विसरला. (१५५५)

नेत्रद्वयापासून ओतप्रोत आनंद अमृताचे भरतें दाटून आलें आहे, पण तें अश्रुंनीं ओतप्रोत भरून जाऊन उसळत आहे व वाहूं लागेल म्हणून तें भरतें पुन्हां काढून घेतलें गेलें जसें कां असें होत आहे. (१५५६)

*उत्कंठा भार तो विविध औत्सुक्याचा तेथें कंठाचेठायीं* चीपच एक जशीं कां दाटत होती (स्वरभंग कंप) ती हृदयामध्यें ती स्वरगति स्थिर करून कीं मग. (१५५७)

तें वाचेचें वितुळणें प्राणानें सांवरून धरून मार्गापराधानें तें श्वसन कां श्वासोच्छ्वासाची ती अक्रम म्हणजे अनियमित गति अव्यवस्थित गति ती स्थिर केली. (१५५८)

अर्जुन उवाच—

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

त्वत्प्रसादात आत्मया = (अहंची तृतिया) तुमच्या आत्मप्रसन्नतेमुळें, मोहः = अज्ञान, दुःख भ्रांति, अविद्या, चूक नष्टः = मोह नाहींसा झालेला आहे. स्मृतिः = धर्मशास्त्र, आठवण, स्मरणशक्ति. लब्धा = प्राप्तीची झाली आहे, मिळाली आहे. अच्युत = अविनाशी दृढ, विष्णू, कृष्ण, विराम, १२ सर्गाचे काव्य, वि. अच्युत वासः = पिंपळ. स्थितः गतसंदेहः = संशय भीती नाहींशी झाली आहे, अढळ निश्चित उभा आहे. तव वचनं करिष्ये = तुमचे वाक्य (नियम बोलणें, भाषण ) मानून, अंमलांत आणीन, शिकेन.

अन्वय :—अच्युत । त्वत्प्रसादात् । मया । मोहः नष्टः । लब्धा स्मृतिः । अहं गत संदेहः स्थितः अस्मि । तव वचनं करिष्ये ॥ ७३ ॥

अर्थ :—आपल्या आत्मप्रसादानें माझें स्वतः संबंधीचें जिवंतपण जागतें असें मजला प्राप्त झाल्यानें आपला प्रसादच कीं झाला आहे. त्यायोगेंकरून माझा मोह नाहींसा झाला.

हे अच्युत ! तुम्हा आत्म्याच्या प्रसाद प्रसन्नतेच्या योगानें, तुमच्या प्रसादानें, तुमच्या प्रसन्नतेमुळें, माझा मोह नाहींसा झाला आहे. आठवण स्मरणशक्ति मला लाभली आहे आतां मी संशय भीतीरहित असा निश्चित होऊन आहे, तुमचें वाक्य मानून तें अंमलात आणीन, शिकेन.

श्लोक ७३ वा ओव्या १५५९–१५७९

**मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडे मोहो ? वो ।**
**तरी तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपला ॥ १५५९ ॥**
**पासी येऊनि दिनकरे । डोळयाते अंधारे ।**
**पुसिजे हे काई सरे । कोण्हे गांवी ? ॥ १५६० ॥**
**तैसा तूं श्रीकृष्णराया । आमुच्या डोळया ।**
**गोचरू हे काइसया । न पुरे तंव ? ॥ १५६१ ॥**
**वरि लोमे मायेपासूनि । ते सांगसी तोंड भरूनि ।**
**जे काइसेनिही करूनि । जाणु न ये ॥ १५६२ ॥**
**आतां मोहो असें कीं नाही । हे असें पुससी काई ।**
**कृतकृत्य झाला पाही । तुझेपणे ॥ १५६३ ॥**
**गुंतला होता अर्जुनगुणे । तो मुक्त झाला तुझेपणे ।**
**आतां पुसणे सांगणे । दोन्ही नाही ॥ १५६४ ॥**
**मी तुझेनि जी प्रसादे । लाधलेनि आत्मबोधे ।**
**मोहाचे ( दे ) तया कांदे । नेदी उरो ॥ १५६५ ॥**
**आतां करणे न करणें । हे जी उठे दुजेपणे ।**
**ते तुजवांचुनि नेणे । सर्व गोत्रा (सर्वत्र गा) ॥ १५६६ ॥**
**ये विशी माझां ठाई । संदेहाचे नुरेची काही ।**
**त्रिशुद्धि जेथें कर्म नाही । ते मी झालो (जालो) ॥ १५६७ ॥**
**तुझेनि मज की पाउनि ( पावोनि )। कर्तव्य गेलेचि निपटोनि ।**
**परि ‘आज्ञा तुझे’ वाचुनि । आन नाही प्रभु ॥ १५६८ ॥**

कां जे दृश्य दृश्याते नाशी । जे दुजे द्वैत ते ग्राशी ।
जे येक परी सर्वं देसी । वसवी सदा ॥ १५६९ ॥
जयाचेनि शब्दे (संबंधे) बंधु फिटे । जयाचेया आशा आस तुटे ।
जे भेटलिया सर्वं भेटे । आपणपांचि ॥ १५७० ॥
ते तु गुरूलिंगु माझे । जे येकलेपणेचे वाराजे ।
जयालागी वोलांडिजे । अद्वैत बोधु ॥ १५७१ ॥
आपणचि होउनि ब्रह्म । सारीजे कृत्याकृत्याचे काम ।
मग कीजे कां निःस्सीम । सेवा जयाची ॥ १५७२ ॥
गंगा सिंधु (सेवु) गेली । पावताच समुद्र झाली ।
तेवी भक्तां शेल दिधली । निजपदाची ॥ १५७३ ॥
तो तूं माझा निरोपचारू । श्रीकृष्ण सव्य सद्गुरू ।
मा ब्रह्मतेचा उपकारू । हाचि का मानी ॥ १५७४ ॥
जी मज तुम्हा आड । होते भेदाचे कवाड ।
ते फेडुनि केले गोड । सेवासुख ॥ १५७५ ॥
तरी तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा ।
करीन देई अनुज्ञा । भुलतिये (भलतिये) विशी ॥ १५७६ ॥
यया अर्जुनाचिया बोला । (देवो) नाचे सुखे भुलला ।
म्हणे विश्वफळा झाला । फळ हा मज ॥ १५७७ ॥
उणेनि उमचला सुधाकरू । देखुनि आपुला कुमरू ।
मर्यादा क्षीरसागरू । विसरेचिना ॥ १५७८ ॥
ऐसे संवादाचां बोला (बहुला) । लग्न दोघांचया आंतुला ।
लागले देखोनि झाला । निर्भरू संजयो ॥ १५७९ ॥

'आवड मोहो!' (१५५९) सरे=योग्य आहे कां? पुशिजे–पुसिजे. काई–कायि. (१५६०) आमुच्या–आमुचिया गोचर हेचि=तुझ्या रूपाचें साक्षात् दर्शन हेंच काय पुरें नाहीं? मोह निवृत्ति करण्यास तुझें दर्शन पुरे आहे. (१५६१) मायेपासुनि वरि लोमे=लोभ तो आईपेक्षांहि अधिक तेथें तुम्हीं मायेच्या कळवळयानें, ममतेनें सांगत आहांत. कायिसेनिही=दुसऱ्या कसल्याहि साधनानें, जाणु–जाणो. (१५६२) ऐसे–ऐसे जी कृत्यं कृत्य–कृतकृत्य. झाला–झालो, जाहलो. (१५६३) गुंतला होता–गुंतलों होतों. झाला–झालो. (१५६४) मोहांदे–मोहाचें, नेदी–नेदीच. (१५६५) न–कां न. जी उठे–जेणे उठी. तुज वाचुनि–तूं वांचूनि. सर्व गोप्त्रा–सर्वत्र गा. (१५६६) ये विशी–ये विषयीं. जेथें कर्म–कर्म जेथ. ते मी झाला–ते मी झालो=ती ब्रह्म स्थिती पावलो. (१५६७) पाऊनि–पावोनि 'आज्ञा तुझे'–आज्ञा तुझी. प्रभु–प्रभो. (१५६८) शब्दे–संबंधे बंधु–बंद. जयाचेया–जयाचिया. भेटलिया–भेटलया. (१५७०) गुरूलिंग–गुरूमुर्ति. माझे–जी माझे. एकलेपणेचे–एकलेपणीचे. वाराजे–विरजे. (१५७१) शेवा–सेवा. (१५७२) शिऊं सेवू. झाली–जाली. शेल–सेल=पदवी, वांटा. (१५७३) माझा–माझा जी. निरोपचारू–निरूपचारू. सव्य–सेव्य. हाचि–हाचि कां. (१५७४) जी–जे. फेडुनि–फेडोनि. शेवा सुख–सेवा सुख. (१५७५) तरी–तरी आतां. देई–देयी. भुलतिये–भलतिये. विशी–विषयीं. (१५७६) झाला–जाला. फळ (ला) हा मज–सफळा फळ. (१५७७) उणेनि उमचला=कमीपणा गेला, पूर्ण झाला. (उमचणे=फेडणे, चुकवणे.) कुमर=क्षीरसागराचा पुत्र चंद्र. चंद्र हा १४ (लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्र, कामधेनु, ऐरावत, अप्सरा, उच्चैःश्रवस्,

हालाहाल, शार्ङ्गधनु, शंख व अमृत.) रत्नापैकीं पांचवे सागरामधून निघालेले रत्न होय. मर्यादा विसरेचिना =भरतीस येईना, उचंबळून वर येईना, (१५७८) बोला–बहुला=बहुल्यावर, आंतुला–बोल शोभले, लग्न लागले, हृदय, खुणेने, खुणेला खुण पटून. झाला–जाला. निर्भरू=आनंदित, तन्मय. संजयो–संजय. (१५७९)

**सूर्याने समीपचे होऊन डोळ्यास येऊन अंधारे नाहीसे करावे असे हे बोलणे शोभेल काय? ते कोणत्या गावीचे ते–(आहो जेथे सूर्य तेथे सर्व प्रकाशच अंधाराचे नांव गांव तेथे कसचे ते)** त्याप्रमाणें तुम्ही अहो श्रीकृष्णराय आमच्या डोळ्याना स्पष्ट झाले आहात एवढ्यानेंच की सर्व गोष्टीना ते तुमचे स्पष्ट होणे पुरते होईलच! लोभाच्या कळवळ्यानें ममतापूर्वक ते ज्ञान पुष्कळसे सांगत आहेस जे कशाही प्रयासाने जाणताच मुळी न येणारें. आता येथें 'मोह' आहे किंवा नाहीं हे म्हणणे तरी कसचे. पण मी तर तुमचेच रूप होऊन कृतकृत्य झालो आहे. अर्जुन गुणामुळें अर्जुनपणातच गुंतलो होतो तो आतां तुमचे रूप होऊन मुक्त झालो आहे व आता पुसणें विचारणें व सांगणें अशी ही दोन्ही ही येथें नाहींत. तुमचा प्रसाद आत्मबोधरूपी प्राप्त झालेल्यानें मोहाचे ते गड्डे कां कांडे मुळींच उरू देण्याचे मी करीत नाहीं, व आतां येथें मोह उरू देणें का नच उरू देणें हे का करणें का न करणे हे ज्या दुजेपणामुळें भासते तेथें तर तुम्हां वांचून दुसरे कोणीही मी जाणतच नाहीं ह्या बाबत् माझे ठायी संशय कसलाही उरत नाहीं खरोखरीच की जेथें कर्मकार मुळीं नाहीं. तें ब्रह्मच की मी झालो आहे. तुमच्या योगानें मी माझ्या स्वरूपी मिळून अमल्यानें कर्तव्य ते तर पार निपटून नाहींसे झाले आहे. पण आज्ञा का एक येथें तुमची सर्वथैव–वागत आह. तेथें दुसरे काहीं नाहीं, हे प्रभो! जे दृश्य दृश्याम नाहींसे करते–जी **दृश्य गुरुमूर्ति**, दृश्य जे दुसरे दिसवते त्यास उरू देत नाहीं–जे **दुजे–गुरुरूप** द्वैतास पार गिळून टाकते जे एकच पण सर्व देशी की सदा वेसविते–ज्याच्या संबंधामुळें–सबंधतेवर–देहबंध (ब्रह्मबंध, बुद्धिबंध, देहबंध) तो नाहींसा होतो–ज्याच्या आशमुळें सर्व आशाच की ती मावळते जे भेटल्यानें आपणा स्वतःमध्येंच की सर्व काहीं भेटू लागते–ते तुम्हीं माझे 'गुरुमूर्ति' लिंग' जी, जे येकलेपणीच की असणे तेथें साह्यकारी असे ज्यासाठी की अद्वैत बोध तो ओलांडिला होतो–आदर दिला होत नाहीं–आपणच ब्रह्म होऊन कार्य काय अकार्य काय ह्या बाबत सर्व कांहीं कामकाज ते सारिले होते व मगच की निस्सीम अशी ज्याची सेवा होते–गंगा सिंधूची सेवा करण्यास निघाली ती तेथें पोहोचताच का पावताच की समुद्र झाली. त्याप्रमाणें भक्ताना निजपदाचीच की ती शेलकी अशी वाटणी दिली ब्रह्मपदाचा शेलका असा हिस्सा भाग दिला. तो तुम्हीं माझे जी अहो निरूपाधिक (ओवी ४४५ अ. १५) असे श्रीकृष्ण भगवान सद्गुरुच की सेवा करण्यास योग्य अनुरूप समर्थ साजेसे असे अहो अहो मग तेथे ब्रह्मतेचा तो उपकारच की आपला असे मी मानतो. तुमच्या व माझ्या मध्यें जो कांहीं निराळेपणाचा प्रतिबंध होता तो काढून टाकून आपण की सेवा सुख ते गोड असे केले आहे. तरी आता अहो सकळ देवाचीहि अधिदेवताच एक असे राजणारे ते तुम्हीं अहो (राजन्=चंद्र, श्रेष्ठ पक्ष, स्वामी, मालक, इंद्र,) स्वामी तुमची आज्ञाच की आतां येथें मी तुमच्या आज्ञेप्रमाणें करीन मजला भलत्याही विषया करावयाचे कर्म का व्यवहारा बद्दल अनुज्ञापन द्या हुकुम करा अर्जुनाच्या ह्या अशा बोलण्याच्या देव तर नाचू लागले सुखाने सहजच की ते भुलले व म्हणू लागले कीं अहो हा पार्थ तर मजला ह्या विश्वरूपी फळावरच की एका फळाच्या लाभाचा फळे देणारा वृक्ष, देणगी, संतती झाला आहे (फळकिन्=उत्तमचंदन) (फलक=फळा, फळी, पट, काष्टासन, पाट) सुधाकर हा क्षीणतेतून सुटलेला चंद्र पूर्णचाभला तीथें अतां क्षीरसागराने आपला मुलगाच की पाहिल्यानें तो सागर कांहीं आपली मर्यादा राखण्याचे विसरेना तो पुत्र प्रेमामुळें आपली बापपणाची सीमा सोडीत नाहीं अमर्यादतेने उचंबळून येते तरी तो आपली बापपणाची मर्यादा विनय आदर नियम सोडीत नाहीं शिष्टाचार का न्याय वर्तन सोडीत नाहीं

(ओव्या १५५९–१५७९)

यावर अर्जुन म्हणाला कीं काय अहो देव ते मजला विचारित आहेत की तुला मोह आवडतो रागाचा का अनुरागाचा असा होऊन येतो आहे काय ? अहो देवा ! येथें तर तो मोह आपल्या ठावा-सर्वस्वासहित, कुटुंबासहित, बायकोपोरासहित बाजूस झाला, निघून गेला, गेला की. (१५५९)

पासी म्हणजे समीप, हृदयींच कीं सूर्यानें येऊन डोळ्यांना विचारावें कीं अज्ञानें-आंधारे ती कसली बरें ! असें विचारणें तें शोभेल काय ? असें हें बोलणें कोणत्या गांवीं (उदेबुद्धि) पुरें होणारे ते सूर्य सर्व प्रकाश, तेथें अंधार केव्हाहि नसणारच का अधार तो प्रकाश होणारा सूर्याच्या येण्यानें. (१५६०)

तसें तुम्ही हे श्रीकृष्णराया तुम्ही आपल्या डोळ्यांना गोचर असे स्पष्ट दिसणारे असें हे ते कोणत्या गोष्टीला कसल्या देखण्यानें पाहिले तर नच पुरणारे असें ते (ज्ञान सूर्यच डोळ्यास आला आहे. तेथें कासवीचें तें प्रेमाचें पान्हवणें तें तेथें पोटीचें तें प्रेम तरच पुरणारें होतें, लोभच कीं, तेथें पुढे होतो.)

(१५६१)

वर मायेपेक्षांहि-आईपेक्षांहि ज्यास्त लोभानें तें तोंड भरून की सांगत आहांत असें हें कशाही प्रयासानें जाणण्यातच-जाणण्यासच-मुळीं येत नाहीं, समजणारें असें नाहीं, (कशाही प्रयासानें तें जाणूंच कीं मुळीं नये.) (१५६२)

आता अज्ञान दुःख, मोह असें की नसें-मोह आहे का नाहीं असें हें कशास तें विचारतां असें तें काय विचारणें तें कसचें न् काय. कारण याहीवर जें काहीं आहे तें म्हणजे तुझेपणें म्हणजे तुझें स्वरूप कां रूपाचा होऊन मी कृतकृत्य जी अहो झालों आहे कीं. (१५६३)

अर्जुन देहाएवढेपणाच्या (देहबुद्धि) गुणदोषामध्यें ( गुंतलों होतों ), तो आता तुमचें रूपाचा असा झाल्यानें देहधारी अर्जुन गुणापासून मुक्त झाला व आतां पुसते तें कसचें व सांगणें तें तरी कसचें येथें दोन्ही तें पुसणें सांगणें नाहींच. (१५६४)

जी अहो तुमच्या प्रसाद प्रसन्नतेमुळेंच कीं आत्मबोध मला प्राप्त झाल्यानें मोहातें तें कां बरें आपलें असणें तें देऊन टाकीन ! येथें आतां मोहाचें ते गड्डे, कादे, अथवा मुळ्या त्या मुळींच उरूं देणार नाहीं कीं, (१५६५)

आतां येथें करणें तें का न करणें तें ज्या दुजेपणाच्या भावावर उभें होतें; परिणाम करू लागतें. पण आतां सर्वत्र तुम्हावांचून मी दुसरें कांहींच जाणत नाहीं. दुजेपण तें आतां तर तुम्हींच सर्वत्र अहो असल्यानें मी तुम्हासच जाणत आहे. तुमच्या स्वरूपाचा झालो आहे. म्हणून सर्वाठायीं तुम्हींच एक रूपाचे असें होऊन आहांत- (१५६६)

याबाबत माझ्या ठिकाणीं मुळींच संदेह उरला नाहीं. खरोखरीच की अहो जेथें कर्मच मुळीं नाहीं तेंच मी झालों आहे तेंच मी होऊन आहे. (१५६७)

अहो तुम्हांमुळेंच कीं मी माझ्या स्वरूपास मिळून आहे. येथें आतां कर्तव्य ते सर्वथैव नाहींसें झाले आहे पण येथें ' आज्ञाच ' एक जशीं ती वांचून हे प्रभो ! दुसरें कांहींहीं नाहीं. (१५६८)

अहो जें आपलें गुरुमूर्तीचें दृश्य स्वरूप तें स्थूल दृष्टीचें पाहाणेंच मुळीं (स्वरूपच एक झाल्यानें ) नाहींसें करतें असें जें दुजें दुसरें गुरुमूर्तीरूप तेथें स्वरूपामुळें द्वैतच कीं नाहींसें होत आहे, असें तें दृश्य स्वरूप एकच जरी, तरीपण तें सर्व देशी कीं सदा सर्वकाळ त्या रूपासच वसवीत आहे. (१५६९)

ज्या स्वरूपाच्या संबंधेंकरून देहबंधच कीं फिटून गेला, नाहींसा झाला आहे, होत आहे ज्या स्वरूपाच्या आशेनें, आसक्तीनें, आशा नाहीशीं होते व जें भेटल्यानें आपलें सर्वस्वच एक कीं, भेटलें असें होतें. जें भेटल्यानें आपलें सर्वस्व भेटत आहे. (१५७०)

असें तें कीं अहो तुम्हीं माझे गुरुलिंग जी जें एकलेपणीचें साह्यकारी असें असल्यानें तेथें अद्वैत बोध तो तर ओलांडिला कीं. (१५७१)

अहो आपण ब्रह्म होऊन कृत्य (अकृत्याचें) का अकृत्य असें जें कांहीं त्याचें कामच आतां येथें नाहीं. असें झाल्यानें मग कीं, त्याची निस्सीम अशी सेवाच करावी, व्हावी हें केव्हांहीं. (१५७२)

गंगा सिंधूची सेवा करण्यास निघाली, गेली ती सिंधूस पावतांक्षणींच कीं समुद्र झाली, त्याप्रमाणें, भक्तास निजपदाचा शेलका वाटा दिला गेला. (१५७३)

असें तें तुम्हीं माझे निरूपाधिक–निरूपचार अहो जी श्रीकृष्णा ! सेव्य म्हणजे सेवण्यास योग्य असे सद्गुरुच कीं व आतां ब्रह्मपणाचा तो उपकार हाच कीं, मानवला–मानला–सन्मानाचा झाला. (१५७४)

जें कांहीं माझ्या व तुमच्यामध्यें एक भेदाचें असें कवाड (प्रतिबंध) होतें तें फेडून टाकून, बाजूस करून सेवा सुख तेंच कीं अहो गोड असें प्रेमळपणाचें केलें. (१५७५)

करितां अहो जी सकळ देवाधिदेवराया आतां तुमची आज्ञा ती कीं भलतेहीविषयीं, रायपणाची का राजण्याची करीन अनुज्ञा देई–आज्ञाच एक परिणमणारी असें तें आज्ञेचें देणे द्यावें कीं. (१५७६)

अशा ह्या अर्जुनाच्या बोलण्यानें देव तर सुखास भुलून गेल्यानें नाचूं लागले व त्यांनीं म्हणूं केलें कीं, विश्वफळा हें चित्त जें त्यास हा तर मजला एक सकळ फळच कीं होऊन आहे. (१५७७)

सुधाकर चंद्र क्षीणतेतून सुटल्यानें पूर्ण झाला असा तो आपला कुमार देखुन क्षीरसागर कांहीं आपली मर्यादा विसरत नाहीं, विसरून जात नाहीं, भरतीस येत नाहीं. उचंबळून वर येत नाहीं. (१५७८)

असें ते संवादाच्या बहुल्यावर दोघांच्या त्या हृद्गत खुणेनें त्या दोघांचें लग्नच लागलेलें पाहून संजय गहिंवरून आला सद्गदित होऊन आहे. (१५७९)

**संजय उवाच :—**

> **इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।**
> **संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥**

महात्मनः = महात्म्या पार्थाचा ( व वासुदेवाचा ) संवादम् = परस्परांचें भाषण. अश्रौषम् = मी ऐकलें, मी ऐकता झालो. रोमहर्षणम् (रोम हर्ष) = हर्षानें अंगावरचे केस ताठ उभे राहात आहेत. अद्भूतम् = आश्चर्यकारक, चमत्कारिक.

अन्वय :—इति इमम् महात्मा पार्थस्य । वासुदेवस्य च । संवादम् । रोमहर्षणम् अद्भुतम् अश्रौषम् ॥ ७४ ॥

अर्थ :—असा हा महात्म्या पार्थाचा व श्रीवासुदेवाच्या अंगावर शहारे उत्पन्न करणारा अद्भुत असा संवाद मी ऐकला. ( श्लोक ७४ वा ओव्या १५७९–१६०८)

**तेणें म्हणतसे संजयो । बाप कृपानिधि सवो ।**
**तो आपुला मनोभावो । अर्जुनेसी केला ॥ १५७९ ॥**
**तेणे उचंबळलेनिपणे । मग धृतराष्ट्राते संजयो म्हणें ।**
**जी कैसे बादरायणें । रक्षिलो दोघे ॥ १५८० ॥**
**आजी तुमते अवधारा । नाही चर्मचक्षूहीं संसारा ।**
**कीं ज्ञानदृष्टि वेव्हारा । आणिलेती (ति) ॥ १५८१ ॥**

आणि रथीचिये राहाटी । घेई (जो) जे घोड्यासाठीं ।
तया आम्हां इया गोष्टी । गोचरा होती ॥ १५८२ ॥
वरि जुंझाचे निर्वाण । मांडले आहे दारूण ।
दोही हारी आपण । हारपिजे जैसे ॥ १५८३ ॥
येवढा जिये सांकडा । कैसा अनुग्रह पै गाढा ।
जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीत असें ॥ १५८४ ॥
ऐसे संजयो बोलिला । परी न द्रवे येरु उगला ।
चंद्र किरणे शिवोंतला (शिवंतला) । पाषाणु जैसा ॥ १५८५ ॥
हे देखोनि तयाची दशा । मग करीचिना सरिसा ।
परि सुखे जाला पिसा । बोलत असें ॥ १५८६ ॥
भुलविला हर्षवेगे । म्हणुनि धृतराष्ट्रा सांगे ।
येन्हवी नव्हें तयाजोगे । हे कीर (जाणे) ॥ १५८७ ॥
मग म्हणे पैं कुरुराजा । ऐसा भ्रातृपुत्र तो तुझा ।
बोलिला ते अधोक्षजा । गोड झाले ॥ १५८८ ॥
अगा पूर्वापार सागर । या नावासीचि सिन्हार ।
येर अवघे ते नीर । येक जैसे ॥ १५८९ ॥
तैसे श्रीकृष्णु पार्थु असे (ऐसे) । हे आंगचिपासी (अंगचि पाहि) दिसे ।
मग संवादे नसे । कांहीच्चि भेदु ॥ १५९० ॥
पैं दर्पणाहोऊनि (दर्पणाहुनि) चोखे । दोन्ही हाती सन्मुखे ।
तेथ येरी येर देखे । आपणापे जैसे ॥ १५९१ ॥
तैसा देवेशीं पांडुसुतु । आपणपे देवी देखतु ।
पांडवेशी देखे अनंतु । आपणपे पार्थे (पार्थी) ॥ १५९२ ॥
देवो देवाभक्तालागी । जये (जिये) विवरू देखे आंगी ।
येरूही तियेचि भागी । दोन्ही देख (देखे) ॥ १५९३ ॥
आणीक काहीचि नाही । म्हणोनि करिती काई ।
दोघे येकपणे पाही । नांदता ते (नांदताते) ॥ १५९४ ॥
आतां भेदु जरी मोडे । तरी पृच्छांतर (प्रश्नोत्तर) का उघडे ? (घडे) ।
ना भेदुचि तरि जोडे । संवादसुख कां ? ॥ १५९५ ॥
ऐसे बोलता दुजेनपणे । (संवादी द्वैत) संवाद द्वैता गिळणे ।
ते ऐकिले बोलणे । दोघांचें म्यां ॥ १५९६ ॥
उटुनि दोन्ही आरिसे । जै वोढविल (लि) या सरिसे ।
कोण कोणा पाहात असे । हे कल्पावे पां ? ॥ १५९७ ॥
का दीपासन्मुखु । ठेविलिया दीपकु ।
कोण कोणा अर्थिकु । कोण जाणें ॥ १५९८ ॥
नाना अर्का पूर्ण अर्कु । उदयल (लि) या आणिकु ।
कोण म्हणे प्रकाशकु । प्रकाश्य कोण ॥ १५९९ ॥
हे निधारू जाता पुढे (फुडे) । निर्धारासी ठक पडे ।
ते दोघे झाले येवढे । संवादे सरिसे ॥ १६०० ॥

जी मिळता दोन्ही उदके— । माजी लवण-वारू ठाके ।
की तयासीही निमिष्ये । तेचि होय ॥१६०१ ॥
तैसे श्रीकृष्णार्जुने (श्रीष्णार्जुन) दोन्ही । संवादिले ते मनी ।
धरिता मजही वाणी (वानी) । तेचि होतसे ॥ १६०२ ॥
ऐसे म्हणे ना मोटके । तंव हिरोनि सात्विके ।
आठवो नेला नेणो के (आठ आठवनेणे नेला के) । संजयोपणाचा ॥ १६०३ ॥
रोमांच जंघ फरके । तंव तंव अंग सुरूके ।
स्तब्ध स्वेदाते जिंके । येकला कंपु ॥ १६०४ ॥
अद्वयानंद परिसे । दिठी रसमय जाली असे ।
ते अश्रु नव्हती जैसे । द्रवत्वचि ॥ १६०५ ॥
नेणो काय न माय पोटी । काईचि नेणो गुंपे कंठी ।
वागर्थां पडे मिठी । उससाचिया ॥ १६०६ ॥
किंबहुना सात्विका आठां । चांचरू मांडता उमेठा ।
संजयो जालासे चोहटा । संवाद सुखाचा ॥ १६०७ ॥
तया सुखाची ऐसी जाती । जे आपणचि धरी शांती ।
मग पुढती देहे स्मृती । लाधली तेणे ॥ १६०८ ॥

उचंबळलेनिपणे-उचंबळलेपणे मग-संजय. बादरायणे=श्रीव्यासांनी (१५८०) वेव्हारा-व्यवहारा (१५८१) रतीचियें-रथीचियें. घेई जे-घेई जो, घोडया-घोडेया, इया-या. (१५८२) निर्वाण (जुंझाचे) आणिबाणीच्या दारूणप्रसंगी दोन्हीबाजूमधील कुणाचाही जरी पराजय झाला तरी आपलीच हारी आहे-जसें कां. मांडले-मांडिले. हरपिजे-हारपिजे. (१५८३) अनुग्रह-अनुग्रहा. जीये-जिये. सांकडा=संकटकाळीं (१५८४) संजयो-संजय. येरू=धृतराष्ट (१५८५) सरिसा=जवळ, बोलत असे-बोलतसे. (१५८६) म्हणूनि-म्हणौनि, (१५८७) पूर्वापार-पूर्वापर=पूर्व पश्चिम. या-यया. नांवाशीचि-नामसिचि. सिन्हार-सिनार=भिन्नत्व. अवघे-आघवे येक-एक. (१५८९) तैसी-तैसा. श्रीकृष्णु-श्रीकृष्ण. आशे-ऐसे. हे आंगचि पाशी-आंगाचि पासी=देहाच्या दृष्टीनें संवादे-संवादी जी (१५९०) दर्पणा होऊनि-दर्पणाहुनि हाती=होती (१५९१) पार्थे-पार्थी (१५९५) देवो देवा-देव देवा, जये विवरू (विवरण=स्पष्टीकरण, व्याख्या.)-जिये विवर ज्या बिळ मर्म-छिद्र स्थानी. तियेचि-तियेचेही. देख-देखे. (१५९३) करती-करिती नादताते-नांदताती. (१५९४) पृच्छांतर-प्रश्नोत्तर. उघडे-घडे. (१५९५) दुजेनपणे-दुजेपणे. संवाद द्वैता-संवादी द्वैता. म्या-मिया. (१५९६) उटुनि-स्वच्छ करून. आरिसे-आरसे. वोढविलया-वोढविलिया=समोरासमोर ठेविले असतां. कोण कोण-कोण कोणा. पाहात असे-पाहातसे (१५९७) आर्थिकु-आर्थिक=प्रकाशाचा. (१५९८) आर्कापर्णे अर्क-अर्कापुढे अर्कु. उदयलया-उदयलिया. कोणा म्हणे-कोण म्हणे. कोण-कवण. (१५९९) पुढे-फुडे. ठक=मौन, स्तब्धता. निर्धाराशी-निधारू जाता-निर्धारासी. झाले-जाले. (१६००) वारू=बाजूस सारण्यांस. निमिष्ये-निमिखे. होय-होतसे. (१६०१) श्रीकृष्णार्जुन-श्रीकृष्ण अर्जुन. वाणी-वानी-प्रकार. (१६०२) ऐसे म्हणे ना मोटके-ऐसे कुठे थोडे बोलले तोंच. आटणेन नेला-आठव नेला नेणो-आटौ नेला नेणौ के-आट (आठव) नेणे नेला के. संजयोपणाचा-संजयपणाचा (१६०३) फटके=उठे. सुरूके-सुरके=संकोचे. स्तब्ध-स्तंभ. परिसे-स्पर्शे. रसमय=अश्रुपूर्ण. द्रवत्वचि=पाझर. (१६०५) काइचि-काय. वागर्था-वाग्पथ=शब्द व अर्थ याना. पडे-पडत. उससाचिया=स्तब्धतेची, सुखाची. (१६०६) चाचरू मांडता-परस्पर होत=बोबडी वळली असतां शब्द व अर्थ यांचे परस्पर वैपुल्य उमेठा=पुष्कळ, अतिशय आधिक्य वैपुल्य संजयो-संजय. देहेस्मृती-देहस्मृति (१६०८).

संजय तल्लीन झाल्यानें म्हणूं लागला कीं, देव ते अर्जुनास तर आपला मदन विलास करून आहेत, त्यायोगे सद्गदित होऊन संजय धृतराष्ट्रास म्हणूं लागला की, (शारीर सूत्र कर्ता) श्रीव्यासानीं आम्हां दोघांचें रक्षण केले (केलक=नट. केलास=स्फटिक, बिलोर. केलि=विलास.) तुम्हांस आज चर्मचक्षूची दृष्टी नाहीं पण ज्ञानदृष्टीनेंच व्यवहारास आणिले आहांतः त्यांनीं तर घोड्याची बलाहक विष्णूचा घोडा श्वेताश्वाची, श्वेतवाहाची, त्या अर्जुनाची सोबत केली आहे. (हे का निजसार विजयाचे। कीं ते भांडार महातेजाचे। तेथ गरुडान्चिये जावळिके। कांतले चार्‍ही॥ की पांरवाचा मेरू जैसा। रहंवर मिरवतसे तैसा। तेणे कोंदाटलिया दिशा। जयाचेनि॥ जेथ अश्ववाहक आपण। वैकुंठीचा राणा जाण। तया रथाचे गुण। काय वानूं॥) ज्यानें कशास तर, तर अर्जुनाच्या रथाची ती वहिवाट राहाटणी चालावी म्हणून, त्याच्या गोष्टी आम्हांस स्पष्ट गोचर होत आहेत–युद्धाच्या आणीबाणीचा प्रसंग दारुण असा मांडला आहे. उभयपक्षांत हार खाणें, जे तेथें आपणच कीं हारपणें का हार खाणें जसें, अशा तर्‍हेच्या सांकडलेपणानें असणें, हे राया! वर येथें कसा तो अनुग्रह कीं, उघडा एक ब्रह्मनंदच कीं भोगविला होत आहे! असें संजय म्हणाला. पण धृतराष्ट्र तो (पाषाण हृदयी तो) द्रवेचना, तो उगाच राहिला–स्वस्थच आहे. जशीं का चंद्राची किरणें ती पाषाणावरच पडावीत अशीं त्याची ती दशा अवस्था पाहून संजयानें त्यांशीं बोलणेंच टाकले (तो त्याजशीं उपक्रम, संबंध, प्राप्ती, अर्थ, स्नेह, जवळिकपण करीचना पण आनंदाच्या भरात त्याच्यानें बोलल्यावांचून राहावेंच नां! म्हणून राजाची पात्रता नाहीं हे संजयास कळत असूनही तो बोलूं लागला) त्या सुखानें संजय वेडापिसा होऊन, तो हर्षाच्या वेगाने भुलविला गेल्यानें, धृतराष्ट्रास सांगत आहे कीं तुझिया भावाचा मुलगा अर्जुन जे बोलला ते अधोक्षज भगवान जे श्रीकृष्ण त्यांना ते गोड झाले. पूर्व, पश्चिम सागर येथें फक्त नांवाचेंच कीं एक वेगळेपण पाणी ते एकच. श्रीकृष्णार्जुनाचे–दोघांचे–एकपणें असणें श्रीकृष्ण ते पार्थच कीं:, जरी देहभिन्नतेच्या दृष्टीनें तसें दोनपण दिसतें तरीपण संवाद कुसरी. (१५९१) तेथें भेद तो कसलाहि नाहीं. तेथें एकच एक काय तो पार्थच कीं श्रीकृष्ण! कां श्रीकृष्ण तोच कीं पार्थ! आरशें दोन समोरासमोर सन्मुख झाले म्हणजे एकानें दुसऱ्यामध्यें स्वतःस पाहावे का दुसऱ्याने एकामध्यें स्वतःस पाहाणें जसें कां! त्याप्रमाणें पार्थ तो देवासहित आपणा स्वतःस देवामध्यें पाहात आहे व पांडवासहित श्री अनंत ते स्वतःस पार्थामध्यें पाहात आहेत. देव, देवाभक्तीसाठीं जे विवर छिद्र (एकांत अवकाश, विवरनलिका पावा) देह आंगीं पहात आहेत, तेथें संजयही त्याच भागामध्यें देह विवरामध्यें एकांत, (अवकाश–मधली जागा–विवरनलिका, पावा अलगूज, संधि एकांतामध्यें,) दोन्हीही, पाहात आहे. तेथें आणीक दुसरें कांहींच नाहीं म्हणून दोघे एकपणेंच कीं नांदत आहेत तेथे एकपणानें नांदण्याशिवाय दुसरें गत्यंतरच नाहीं कीं, आतां येथें भेदच कीं मोडत आहे! तेथें मग प्रश्न करणारा व उत्तर देणारा असें दोनपण उरतच नाहीं. भेद म्हणावा तर मग संवादसुख कसें मिळेल ते? तेथें संवाद सुख कसचे! म्हणून तेथें संवादात द्वैत नष्ट झाले, (दुजेपणानें बोलावे तर मग–बोलणें ते समोरासमोर ठेविले असतां तेथें द्वैत उरत नाहीं) असें ते दोघांचे बोलणें मी ऐकिले. (१५९६) घांसून पुसून दोन आरसे समोरासमोर ठेविले असतां कोण कुणास पाहातो आहे असें कल्पण्याचें करावें तें? दिव्यासमोर दिवा ठेविला असतां अमुक दिवा प्रकाशक व अमुक दिवा प्रकाश्य असें कोण म्हणेल? अथवा सूर्यापुढेंच एक सूर्य उगवला तेथें कोणता सूर्य प्रकाश करणारा होऊन कोणत्या सूर्यास प्रकाशित आहे (कोणता सूर्य प्रकाश्य आहे) हें कसें जाणवेल ते! असें हे जें कांहीं विधान ते आतां निर्धाराच्या निश्चयास (व्यवस्थेस निश्चिततेस) आणून सांगू! पण येथें निर्धारासच स्तब्धता येत आहे, एवढे मोठे ते दोघे, संवादामुळें सारखेच कीं (दोघेही) एकमेकांसारखे कीं, होऊन आहेत. पाण्याचे दोन प्रवाह मिसळले असतां कोणता तो प्रवाह बाजूस सरण्यास का दुसऱ्या प्रवाहाचे (लवन=कापणी, विळा) निवारण करण्यास तयार होतो कां पुढें होतो तो, जो प्रवाह पुढें होईल. तोहीपण निमिषार्धातच कीं, एकाच प्रवाहाचा होऊन मिसळतो, स्तब्ध होतो कीं. त्याप्रमाणें श्रीकृष्ण व

अर्जुन हे दोन्हीं जें कांहीं बोलिले संवादले ते मनीं धरिले असतां माझीही तीच तन्हा होते–तेथें स्तब्धताच येत आहेः असें थोडेसें कांहीं बोलिले न बोलिले तोंच **अष्टसात्विक भावांनीं** त्याच्या कुठच्या संजय-पणाच्या देह बुद्धिचे कां शरीराची तीं आठवण स्मृतीचमुळीं हिरून नेलीं. अंगावर रोमांच उभे राहिले, डोळे पाण्यानें भरले. आंग संकोच पावत आहे. एकटा कंपच की देह जिंकून कंठ दाटून येण्यानें स्तब्धता व शम देत आहे. अद्वयानंदाच्या स्पर्शानें दृष्टी रसमय (द्रवरूप) झालीं आहे. अहो ते अश्रु नव्हत तर सर्व शरीराचें पाझरणें ते एक द्रवत्वच कीं पोटी सर्व कांहीं मावून आहे, बोलणें बंद झाले (बोबडी वळली म्हणावी काय?) कंठ दाटल्यामुळें शब्दार्थाला श्वासोच्छ्वासामुळें अष्टसात्विक भावानी संजयपणाची स्मृति कृष्णार्जुन संवाद स्मृति, ही परस्पर वर येणें व नष्ट होणे हे होत होते—

त्या दोघांचें लग्न लागलेले पाहून संजय तल्लीन झाला व म्हणूं लागला कीं, बाप बाप! भगवान श्रीकृष्ण जे राव! कृपानिधी! असें, त्यांनीं आपला मनोभाव–मनाचा विलास (तो, मनाचा स्वभाव) तो अर्जुना बरोबरच कीं, केला. सहजकर्म प्रकृती ती अर्जुनाशींच कीं करून आहे. (१५७९)

अशा त्या संजयाच्या उचंबळलेल्या प्रेमानें संजय धृतराष्ट्रास म्हणत आहे कीं जी अहो कसें कीं श्रीव्यासांनीं दोघेही रक्षिलो गेलो! (१५८०)

आज विचारास घ्या कीं तुम्हास कांहीं (व्यवहारिक) चर्म दृष्टीचा संसार प्रवाह नाहीं तरी आज ज्ञानदृष्टीनेंच मुळीं व्यवहारास देवघेवीस, चालचलणुकीस आणिले गेले आहांत. (१५८१)

(१) अर्जुनाच्या रथाची राहाटी चालली पाहिजे म्हणून घोड्याची संगती ज्यानें केली त्याच्या गोष्टी आम्हांस गोचरा म्हणजे प्रत्यक्ष होतात.

२) घोड्यासाठींच कीं रथाच्या गोष्टी रहाटीच्या त्या घेतल्या होतात. अशा त्या आम्हांस ह्या गोष्टी गोचर दृश्य होतात. सुलभ अशा सहज पाहाण्यांस मिळतात. (१५८२)

वर युद्धाचा असा आणिबाणीचा प्रसंग महादारूण असा मांडलेला आहे; येथें उभय पक्षांत हारी आली तर आपणच तेथें हारपतो कीं जसें! (१५८३)

एवढ्या मोठ्या संकटात (का संकटकाळीचा सांकडलेपणानें) असतां तेथें अनुग्रह तो कितीतरीं (गाढ) दृढ असा कीं जे कां अगदीं उघडा असाच कीं, ब्रह्मानंद भोगवित आहे. (१५८४)

असें संजय बोलला पण धृतराष्ट्र तो तर मुळींच द्रवला नाहीं! तो उगाच होता! चंद्रकिरणांनीं पाषाणच एक शिवंतला जसा! (१५८५)

अशी ती त्याची दशा पाहून (संबंध तो का उपक्रम चिकित्सा का प्रारंभ) त्याजशी बोलणें तें तो मुळींच कांहीं करीना, पण सुखामुळें वेडा पिसा झाला व म्हणण्यावाचून राहवेना म्हणून म्हणत आहे कीं. (१५८६)

कीं हर्षाच्या वेगानें भुलविला गेल्यानेंच कीं धृतराष्ट्रास सांगत आहे येन्हवी हे कांहीं त्याच्याजोगें हे त्यास समजण्यासारखें नाहीं हे तो जाणून आहे. (१५८७)

मग म्हणू लागला कीं, हे कुरूराजा असा तो तुझिया भावाचा मुलगा अर्जुन तो म्हणाला, ते *अधोक्षज विष्णूं जें भगवान् श्रीकृष्ण त्यांना मानलें, आवडलें, गोड झालें.* (१५८८)

*अहो! पूर्वसागर कां पश्चिम सागर असा ह्या नांवाशीच कीं वेगळेपणा; तेथें इतर सर्व कांहीं तें* नीरच एक जसें. (१५८९)

त्याप्रमाणें श्रीकृष्ण व पार्थ असें हे आंगाच्याच देहाच्याच कीं जवळ पास दिसतें पण, मग संवादी कां संवादानें परस्परांचें भाषणानें-सादृश्यानें तर कांहींही भेद तो नाहींच जसा. (संवादी भ्रम !!!)

(१५९०)

पण आरशा पेक्षांही स्वच्छ सुंदर असे ते दोघेजण सन्मुख झाले म्हणजे तेथें एक तो दुसऱ्यामध्यें पाहात आहे व दुसरा तो पहिल्यामध्यें पाहात आहे जसें- (१५९१)

तसा (देवासहित का) समोर अर्जुन तो आपलें सर्वस्व तें देवामध्येंच कीं देखत पाहात आहे व पांडवासहित अनंत तें आपलें सर्वस्वच कीं पार्थामध्यें पाहात आहेत. (१५९२)

देव तो, देवाभक्ताकरितां जें कांहीं विवर छिद्र विवर नलिका पावा अलगुज आपल्या आंगीं देखतो तेथें दुसरा भक्त देव (संजय) तोही कीं त्याच विवर नलिका पावा अलगुज-आपल्या आंगीं देखतो, तेथें दुसरा भक्त देव (संजय) तोही कीं त्याच विवर नलिका, पावा, अलगुज भागांनीं (छिद्रांनीं, अंशानी, प्रदेशांनीं कां व्याख्येनें का स्पष्टीकरणानें) दोनींही पाहातो. (१५९३)

आणिक दुसरे तिसरें कांहींच नाहीं म्हणून (काय करतात की) ते दोघेही येकपणेंच कीं नांदत आहेत असे. (१५९४)

असे नांदण्याशिवाय दुसरें गत्यंतरच नाहीं. आतां येथें भेदच की मोडत आहे तिथें मग प्रश्न करणारा व उत्तर देणारा असे दोनपण उरतच नाहीं. भेद म्हणावा तर मग संवाद सुख कसचें मिळणारें तें-म्हणून दुसरें संवादात दैव नष्ट झालें. (१५९५)

असें दुजेपणे बोलता, संवादरूपी द्वैतास गिळणेच एक होत आहे असें तें दोघांचें बोलणें म्यां ऐकिलें.

(१५९६)

अहो दोन्ही आरसे स्वच्छ करून (जेव्हां कां) समोरासमोर ठेविले तेथें कोण कुणास पाहात आहे तें कसें कल्पावें, अनुमानावें, रूचावें कीं. (१५९७)

अथवा दिव्यासमोर, दिवा ठेविला तेथें कोणता तो कोणास आर्थिक म्हणजे अमका तो प्रकाशक व अमका तो प्रकाश्य असें कोण म्हणेल कोण जाणेल तें. (१५९८)

अथवा अर्कापुढें अर्क (सूर्य, इंद्र, पंडित, रूईचे झाड,) सूर्यापुढें आणीक एक सूर्य उगवल्यास कोणता तो प्रकाशक, उजेड देणारा व कोणता तो प्रकाश्य (प्रकाश्यता=उघडपणा) म्हणावा! (१५९९)

असे हे विधान निर्धारास आणून सांगू, पण येथें निर्धारास स्तब्धता येत आहे एवढे मोठे दोघे ते संवादामुळें सारखेच कीं. !!! (१६००)

अहो दोन्हीही उदकेंच ती प्रवाहानें मिळाली मध्यें लवण तें मिळालेपण वारण्यास-निवारण करण्यास (कां तें बाजूंस करण्यास) आलें पण तेंही की निमिषांतच तेंच म्हणजे उदकच होऊन गेलें. (निमिषातच डोळे मिटले न मिटले तोंच, क्षणातच एका लवण ते उदकच होणे होते जसे) (१६०१)

तसें श्रीकृष्ण व अर्जुन हे दोन्ही जे कांहीं संवादले, परस्पर संभाषण करिते झाले, ते मी मनी धरल्यास माझी ही तीच तन्द्दा होत आहे. (१६०२)

असें थोडेबहुत बोलतो न बोलतो तोंच अष्टसात्विक भावांनी-सात्विकानें सत्वगुणयुक्तानें सर्व कांहीं आटणेचें होऊन तेथें कसला तो देहधारीपणाच्या संजयपणाचा तो संजयपणा बरें! असा आठवणच मुळीं तो नेला ते नेणो कुठें तो! (१६०३)

जसजसें रोमांच उभारले-(हर्षानें अंगावरचे केंस ताठ उभे राहात आहेत) तों तों अंग तें (सुरखणेच असें) संकोचित होत आहे (तेव्हां खांबासारखे क्रीयाहीनत्व) स्तब्धता व स्वेद यांना एकला तो कंपच मुळीं आवरतो, जिंकतो. (१६०४)

(दोन नाहीं, जोडी नाहीं दोघेपण नाहीं. दोन प्रकाराचें नाहीं) अद्वयानंदाच्या स्पर्शानें दृष्टी ही द्रवरूप झाली आहे अहो अश्रुं नव्हत पण जसें कां देहास पाझरच एक, येऊन आहे. (१६०५)

तेथें आहो त्या पोटी नच मावेल असें, मावेल कांहींच (कांहीं जाणवत) नाहीं. जें कां कंठामध्यें (गुंतलें आहे. दाटलें आहे, गुंपलें आहे.) श्वासोच्छ्वासामुळें शब्दार्थाला मिठीच एक पडत आहे. (१६०६)

बहुत काय पण अष्टसात्त्विक भावांनीं परस्पर चांचरत बोलणें होत आहे-बोबडीच वळली गेल्यामुळें, (पडल्यामुळें तर) संजय तो चव्हाटाच एक ह्या संवादसुखाचा झाला आहे. (१६०७)

त्या सुखाची अशीं जाती कीं, जें तें सुख आपण स्वतःच शांति पांघरतें धारण करतें, व मग पुन्हां देहस्मृति ती त्यानें लाधली होते पुन्हः पुन्हः संवाद स्मृती व पुन्हः पुन्हः भानावर येणें होत होतें. (१६०८)

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद् गुह्यमहं परम् ।**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥**

अहंश्रुतवान् = मी ऐकता झालो. एतद् परंगुह्यम् = हे परम गुह्य गूढ. योगेश्वरात्कृष्णात्साक्षात् = साक्षात्, प्रत्यक्ष, योगेश्वर भगवान श्रीकृष्णांनीं स्वतः स्वयं योगम् कथयतः = आपणा स्वतःचा आत्मयोग तो सांगितलेला ( स्वयं = आपण स्वतः )

अन्वय :—अहम् । एतद् परं गुह्यम् । योगम् । व्यास प्रसादात् श्रुतवान् । स्वयम् योगेश्वरात् कृष्णात् साक्षात् कथयतः एतद् परं गुह्यं योगम् व्यास प्रसादात अहं श्रुतवान् । स्वयम् योगेश्वरात्कृष्णात् साक्षात् कथयतः ॥ ७५ ॥

अर्थ :—(स्वयं योगं–आपण स्वतः योगरूप तो आत्मयोग) योगेश्वर श्रीकृष्णानी प्रत्यक्ष साक्षात् स्वतः सांगितलेला गुह्य असा हा परम योग मी श्रीव्यासांच्या कृपा प्रसादानें ऐकला

(श्लोक ७५ वा ओव्या १६०९–१६१३)

**तेव्हां बैसतीनी आनंदे । म्हणे जी (जे) उपनिषदे ।**
**नेणती ते व्यास प्रसादे । आइकिली म्यां ॥ १६०९ ॥**
**आयकताचि ते गोठी । ब्रह्मत्वाची पडली मिठी ।**
**मी तूं पणेसी दृष्टी । विरूनि गेली ॥ १६१० ॥**
**हे अवघेची का योग । जया ठावा ये ते मार्ग ।**
**तयाचे वाक्य सवेग । केले मज व्यासे ॥ १६११ ॥**
**अहो अर्जुनाचेनि मिषे । आपणपेचि दुजे ऐसे ।**
**नटुनिया आपणया दोषे । बोलिले जे देवे ॥ १६१२ ॥**
**तेथ कीं माझे श्रोत्र । पाटाचे जी झाले पात्र ।**
**काइ वाणुं स्वतंत्र । सामर्थ्य श्रीगुरूचे ॥ १६१३ ॥**

बैसतीनि–बैसतेनि. जी–जी जे. (१६०९) गोठी-संभाषण, उपनिषत्सार संवाद. दृष्टी–दिठी. विरूनि–विरोनि = हारपून. (१६१०) येते–येती. सवेग–सवंग. (१६११) नटुनिया–नटोनि–नटोनि. दोषे–उद्देशे. देवे-देव. (१६१२) पाटाचे = योग्यतेचे, अधिकाराचे. काइ वाणु–काय वानु. (१६१३)

**आनंद स्थिर झाला, उपनिषदेही जाणत नाहींत ते मी व्यासप्रसादानें ऐकिले ते संभाषण उपनिषद्सार संवाद् ऐकल्याबरोबर ब्रह्मत्वाची मिठी पडत आहे. मी तूं पणाची दृष्टी ती हारपली होत आहे. ऋषीचे ते वाक्य मजला सवंग झाले. तेथे सर्व योगमार्ग आपल्याठायीचे झाले. असें व्यासानी मजला केलें, अर्जुनाच्या निमित्तानें आपण स्वतःच एक दुजें असे नटून आपल्याच उद्देशानें देव तें कांहीं बोलिले तीथें माझे कान तर योग्यतेच्या अधिकाराचे होऊन आहेत-अहो स्वतंत्र असे श्री गुरूचे सामर्थ्य ते मी कोठवर बरे वानूं! वारंवार.** (ओव्या १६०९-१६१३)

(देहस्मृती ती त्यास लागली तेव्हां जसा कां) आनंदच तो बैसकारानें आनंदास आला व म्हणूं लागला कीं जी अहो जे उपनिषदें जाणत नाहींत तें तर मियां श्रीव्यासांच्या प्रसन्नतेच्या कृपा प्रसादानें मी ऐकिलें. (१६०९)

अहो ती उपनिषदांतील गोष्टी सार संवाद तो मी ऐकल्याबरोबर ब्रह्मत्वाची, ईश्वरत्वाची मिठीच एक पडली आहे व मी तूं पणाची ती दृष्टी दिठी विरून गेली आहे हारपती झाली आहे. (१६१०)

हे अवघेचि अहो ('योगश्चि वृत्तिविरोधः'=जीवात्मा व परमात्मा यांचा संयोग) जेथें सर्व मार्ग ते आपल्या ठावास येतात-ठायीचें होतात. त्या मार्गाचें एकत्रित्र करणें झालेलें असें वाक्य तें मजला श्रीव्यासांनीं सवंग केलें आहे. (संवेग=जोर धाई, गडबड. सवन=यज्ञ, स्नान. सवंग=स्वस्त, सोपे.) (१६११)

अहो अर्जुनाच्या निमित्तानें आपण स्वतःच कीं दुजे असे एक नटून आपल्या उद्देशानें-आपणच तेथें हेतू होऊन कां दोषानें जें कांहीं देवांनी बोलिले. (१६१२)

तेथें अहो माझे कान तर एका योग्यतेचे असेंच योग्य होऊन आले आहेत. अहो स्वतंत्र असें श्रीगुरुचें सामर्थ्य तें काय बरे वानण्याचें करूं, वानावें तेवढें थोडेच. (१६१३)

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥**

राजन्=राजा, स्वामी, मालक. संस्मृत्य-स्मृ=शब्द करणें अतिशय आदरानें उच्चारणें (संस्मृ=पीडा देणें (अति+अभि+सं) पुण्यम्=सत्कृत्यः सद्गुण (तुळस, गंगा) हृष्यामि=मी संतुष्ट होत आहे, उल्हास पावत आहे (हृष्=अंगावर रोमांच उभें होणें जें) मुहुर्मुहुः=वारंवार, पुनः पुनः

अन्वय :—राजन् । इदं अद्भुतं संवादम् । संस्मृत्य संस्मृत्य । पुण्यं । केशवअर्जुनयोः । मुहुर्मुहुः हृष्यामि । च ॥ ७६ ॥

अर्थ :—हे राजन् असा हा अद्भुत संवाद, वारंवार वरचेवर, पुन्हः पुन्हः आठवण करून, केशवाचे व अर्जुनाचें पुण्य सुकृत मला अति हर्ष देत आहे-हर्षाचे करीत आहे. श्लोक ७६ वा ओव्या १६१४-१६१६

**(राया) हे बोलतां विस्मितु होये । तेणेचि मोडाघला ठाये ।**
**रत्नी का रत्नकीळ आहे । झांकुळित जैसे ॥ १६१४ ॥**
**हिमवंतीची सरोवरे । चंद्रोदयीं होती काश्मीरे ।**
**मग सूर्यागमी माघारे । द्रवत्व ये ॥ १६१५ ॥**
**तैसा शरिराचिया स्मृति । तो संवादु संजयो चित्ती ।**
**धरी आणि पुढती । तेचि होय ॥ १६१६ ॥**

मोडावला ठाये=लीन होऊ लागे. रत्नकिळा=रत्नकांति, रत्नदीप्ती. झांकुळित जैसे–झाकोळित जैसी. (१६१४) काश्मीरे=स्फटिकाप्रमाणें घट्ट. (१६१५) संजयो–संजय. (१६१६)

**असें हें बोलतांनां सामर्थ प्रेम आहे ! त्या योगें संजय पण ते लीन होऊन आहे रत्नाचे ठायीं कां ती जशी बर्फाचीं सरोवरें चंद्रोदय झाला म्हणजे गोठून जाऊन स्फटिकासारखी होतात–सूर्योदयामुळें द्रवपण तें पुनश्च माघारी येतें–तसें शरिराच्या स्मृतीनें संवाद तो पुन्हः पुन्हः चित्ती येत आहे, पुन्हः पुन्हः ते द्रवपण होत आहे की !**

(ओव्या १६१४–१६१६)

असें हें बोलतांना साश्चर्य होत आहे–विस्मित होऊन आहे व त्यायोगें लीन होऊ लागत आहे, त्याचा तो संजयपणा लीन झाला आहे. रत्नाचेठायीं रत्नाची कांती ती रत्नदीप्ती ती संयोगानें एकत्र केलेली होऊन येते जशी (१६१४)

हिमवान जो हिमालय तेथीलची ती बर्फाची सरोवरें (तळें) जलाशय, (पाणी) चंद्राचा उदय झाला म्हणजे (गोठून जाऊन) स्फटिकासारखी होतात. व मग सूर्याचा उदय झाला म्हणजे–सूर्याच्या येण्यानें, सूर्याच्या दृग्गोचर होण्यानें पुन्हः त्यास माघारी तें पातळपण द्रवत्व येतें. (१६१५)

त्याप्रमाणें शरीराच्या स्मृतीनें (आठवणीनें) तो संवाद संजय आपल्या चित्तीं धरून आहे व पुन्हः संवादाची तद्रुपपण जें तोच कीं तो होत आहे तेथें तद्रुपताच कीं येऊन आहे. (१६१६)

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**
**विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥**

रूपं अत्यद्भुतं=अतिचमत्कारिक, आश्चर्यकारक, (अद्भुतरसाचें असें) रूप, (सौंदर्य, वर्ण, आकृति, प्रकार, शरीर, स्वभाव ) विस्मयः=नवल, कौतुक, अद्भुतरसः=(विस्मयं गम=अचंबा करणे जे) महान् राजन्=महत्=मोठा श्रेष्ठ. राजन्=राजा, स्वामी चंद्र.

अन्वय :—तत् हरेः अति अद्भुतं रूपं संस्मृत्य संस्मृत्य । च । महान् राजन् । मे मह्यम् विस्मयो । च । पुन्हः पुन्हः हृष्यामि अहम् ॥ ७७ ॥

अर्थ :—हे राजा !! अति अद्भुत् असें श्रीहरीचें रूप तें आठवणीचें होऊन मला तें अति महान् विस्मयाचें आश्चर्याचें असें वाटत आहे–मी पुन्हः पुन्हः हर्षयुक्त होऊन तें पाहात आहें.

(श्लोक ७७ वा ओव्या १६१७–१६३१

**मग उठुनि म्हणे नृपा । श्रीहरीचिया विश्वरूपा ।**
**देखिलिया उगा कां पां । असो लाहासी ॥ १६१७ ॥**
**न देखणेना जे दिसे । नाहीपणेंचि जे असे ।**
**विसरे आठवे ते कैसे । चुकऊं आतां ? ॥ १६१८ ॥**
**देखुनि चमत्कारू । कीजे तो नाही पैसारू ।**
**मजही सकट हा महापुरू । नेतो आहे ॥ १६१९ ॥**
**ऐसा श्रीकृष्णार्जुन— । संवाद संगमी ज्ञान (स्नान) ।**
**करूनि देतसे तिळदान । अहंतेचे ॥ १६२० ॥**
**तेथे अवसरे आनंदे । अलौलिकही स्पंदे ।**
**'श्रीकृष्ण !' म्हणे सद्गदे । वेळोवेळा ॥ १६२१ ॥**

यया अवस्थाची काई। कौरवाते परी नाही।
म्हणुनि रायाते कांहीं। कल्पावे जंव ॥ १६२२ ॥
तंव झाला सुखलाभु। आपणपां करूनि स्वयंभु।
बुजाविला अवष्टंभु। संजये तेणे ॥ १६२३ ॥
तेथे कोण्हे येके अवसरी। होआवी ते करूनि दुरी।
रावो म्हणे संजया परी। कैशी तुझी गा ॥ १६२४ ॥
तेणें तूंते येथ व्यासे। बैसविले कासया दोषे।
अप्रसंगामाजि ऐसे। बोलसी काई ?। ॥ १६२५ ॥
रानीचे राऊळा नेलिया। दाही दीशा मानी सुनिया।
का रात्री होय पाहालया। निशाचरां ॥ १६२६ ॥
जो येथिचे गौरव नेणे। तयाते भिंगुळवाणे।
म्हणौ ये अप्रसंगु तेणे। म्हणावा की तो ॥ १६२७ ॥
म्हणें सांचे प्रस्तुत। उदैलेसे जे उत्कळित।
ते कोणासी बा रे जैत। देईल शेखि ? ॥ १६२८ ॥
ये-हवी विशेषे बहुतेक। आमचे ऐसे मानसिक।
जे दुर्योधनाचे अधिक। प्रताप सदा ॥ १६२९ ॥
आणि येराचेनि पाडे। दळही यांते देव्हडे।
म्हणौनि जैत फुडे। आणिल या ना ते ॥ १६३० ॥
आम्हांतंव गमे जैसे। मा तुझे ज्योतिष्य कैसे।
ते नेणो संजया असे। तैसे सांघ पा ॥ १६३१ ॥

उठुनि–उठोनि. श्रीहरीचया–श्रीहरीच्चिया. देखिलिया–देखलिया. लाहासी–लाहसी (१६१७) देखणेन–देखणेनि. विसरे आठवे=विसरूं म्हटले तरी आठवतेच. (१६१८) पैसार=अवकाश. मजही सकट सकंट सकट महापूर–मजही सकट महापूर. नेतो अहे–नेत आहे. (१६१९) ज्ञान–स्नान. (१६२०) अलौकिकाही–अलौकिक, अलौलिक अवसर=वेळ, प्रसंग, प्रदेश फुरसत, पाऊस, योग्यकाळ प्रस्तावना स्पंदे (डोळा लवणे, हालचाल करणें, कंप पावणें. अलौल=स्थिर, निश्चल, शांत स्फुंदे (कंठ भरून येऊन जे आंतच सद्गदित बोलणें) (स्फुन्द–स्फुत्=अग्नीचा फुरफुराट. स्फुत्करः=अग्नि) (१६२१) यया–या. काइ–कांहीं. रायाते–राये ते. (१६२२) झाला–जाला. आपणा पां–आपणपा. बुजाविला–बुझाविला अवष्टंभु=आरंभ, अवरोध, गर्व, आनंदातिरेक–जिरविला. (१६२३) कोण्हे येके–कोण्ही येकी. (१६२४) येथ–येथे. दोषे–उद्देशे=हेतु, संकेत. अप्रसंगामाजि=प्रसंग नसतां, रानीचे–राणीचे. पाहलया=उजाडले म्हणजे. (१६२६) तयाते–तयासी. ते भिंगुळवाणे=विचित्र, विपरीत, विरुद्ध, उलट. म्हणौ ये–म्हणौनि. अप्रसंगु–अप्रसंग=नच समय, वेळेचे, उचित, असंयोग. (१६२७) म्हण सांघे–मग म्हणे सांगे. उदैलेसे–उदयलेसे. उत्कळित=युद्ध, निमटलेले, वृद्धिंगत, प्रफुल्ल, उत्कंठा, (उत्कलिका=काम चेष्टा, लाट, पाणी, काळी, दुःखपूर्वक स्मरण,) (१६२८) विशषे–विशेषे. (१६२९) पाडे=पांडवाच्या मानानें. देव्हडे=दीडपट. याते–यांचे. आणिलया–आणिल. (१६३०) जैसे–ऐसे. जोतिष्य–जोतिष=भाकित. (१६३१)

**(संजय देहभानावर येऊन संवाद सुख मनांत आणतो तोंच की सुखरूप होत आहे) उठून मग म्हणतो कीं हे राजा श्रीहरीच्या विश्वरूपास पाहून उगाचि कां बरे आहेस ते** न पाहाताहि जें दिसतें–कांहीं नसून जें आहे–विसरानेंही ज्याचें स्मरण ढळत नाहीं तें आतां

कसें चुकवितां येईल ? (नाहींपणे असून जें आहे ! न देखणें तरी दिसते विसरणेंच तेच आठवणें होत आहे असें तें आतां कसें बरें चुकवावें तें !) असें पाहून चमत्कारच एक वाटावा असा अवकाशच उरला नाहीं. येथें तर मजहिसुद्धां महापुरच एक अवकाशास येऊन आहे. याप्रमाणें श्रीकृष्णार्जुन संवादामध्यें स्नान करून अहंतेस तिलांजली देत आहेः नच सावरला जाणारा अशा आनंदानें असामान्य असा हुंदका येत आहे, उसासा टाकिला होत आहे ! सद्गत होऊन 'श्रीकृष्ण' श्रीकृष्ण भगवान असे वरचेवर पुन्हः पुन्हः म्हणत आहे ह्या अवस्थेची कौरवास मुळींच ओळख नाहीं. राजा धृतराष्ट्रास यातला गंध सुद्धां नाहीं–तो आश्चर्यचकित झाला काय ती अवस्था कल्पना करण्यानें आपलीशी करतां येईल ? तो तो संजयानें सात्विक अहंकार जिरविला. तेथें सुखाचा लाभ झाला. स्वतःच आपण तो आपोआप उत्पन्न होणारा ब्रह्मदेव का विष्णु झालाः कांहीं एक विचार करावा तो दूर झाला. राजा संजयास म्हणतो की तुझी ती अवस्था कशी आहे तें सांग–व्यासानीं तुजला येथें कोणत्या उद्देशानें बसविलें आहे. जें कां तूं प्रसंग नसतांही बोलत आहेस तें–रानातलें तें राउळास नेलें तर मागें दहाहि दिशा सुन्या होतात कसें तर पहाटेंच उजडले असतां ती रात्रच की निशाचराना जशी. जो जेथचा गौरव जाणत नाहीं तें त्यास भयंकरच की असें करितां तो त्यास अप्रसंगच की होतो–वर म्हणत आहे की प्रस्तृतचें तें सांगणें वां युद्ध कलह उत्पन्न झालें आहे तेथें शेवटी कुणास तो विजय होईल तो ! एरव्ही आम्हांस वाटतें की दुर्योधनाचें प्रताप ते अधिक असें आहेत–शिवाय पांडवाच्या सैन्याच्या मानानें त्याचे सैन्यही दीडपट आहे म्हणून जैत त्यास आणील की ! आम्हांस असें वाटतें तुझे तें भाकित तें कळत नाहीं म्हणून तें सांग की ! ओव्या १६१७–१६३१

यावर मग संजय तो उठून उभा राहिला व म्हणूं लागला की हे राजा ! नृपा ! श्रीहरीच्या विश्वरूपास देखिलें आहेस तर आतां उगेंच स्वस्थ मुकाट्यानें तें काय म्हणून असण्याचें करीत आहांत बरें ? (१६१७)

नच देखण्यानें जें दिसतें, जें कां नाहींपणावरच आहे असें असतें, विसरूं म्हटलें तरी आठवतेंच जें, तें आतां कसें बरें चुकवूं की ? (१६१८)

चमत्कार पाहून (देखणे देखून) चमत्कार तो करावा असा अवकाश, ( फुरसत, पात्र, स्थान, मोकळी जागा आकाशाचा पैसार विस्तार, वेला तो ) नाहीं, अहो मजहीसकट महापूर तो नेत आहे. (१६१९)

असा श्रीकृष्णार्जुन संवाद–संगमाचे ठायीं स्नान (जाणीव, बोध, ज्ञान) करून अहंतेचे [अहं+ता (तान=आलाप, सूर, फैलाव)] तिळदान देत आहे. (१६२०)

सावरितां नच येणारा असा आनंद होऊन अलौकिक ( का अलौकिक असें असामान्य का विलक्षण असें प्रचारांत नसणारे) शब्द कंठ भरून येऊन बोलूं लागला ते कोणते तर अहो वेळोवेळीं 'भगवान श्रीकृष्ण !!! श्रीकृष्ण !!!' असें सद्गदिततेनें म्हणत आहे. (१६२१)

अशा ह्या अवस्थेची, स्थितीची, दशेची, कौरवास राजा धृतराष्ट्रस परी (परीष्ट=इष्ट, उत्कृष्ट. परीष्टिः=हौस, स्वेच्छा, सेवा, सत्वान्वेषण, श्राद्धांत ब्राह्मणाची मनःपूर्वक सेवा, परीक्षा) नसल्यानें कां नाहीं म्हणून रायास ती अवस्था कल्पावी अशीं योग्यतेची शक्यता (केव्हांही नाहींच का धर्मविधि सांगणारे वेदांग ते ) आहे असें म्हणावें तरी कसें ? (१६२२)

तो तों त्यास–संजयास–सुखलाभ झाला व आपल्या स्वतःच्याठायीं (का आपणासच ते स्वतःसच की आपण स्वतः स्वयं) स्वयंभू ब्रह्मदेव, विष्णु असें हे आपोआप उत्पन्न झालेले ते स्वतःच्या ठायीचें करून आनंदातिरेक तो संजयानें जिरविला की. (१६२३)

ती एकादी वेळ योग्यकालाची व्हावी (प्रस्तावनेस यावी का आली असें जें कांहीं) तें दूर करून (विसरून, सोडून देऊन) राव तो धृतराष्ट्र म्हणत आहे कीं, हे संजया ! कशी तुझी प्रकार सेवा ती का हौस ती ह्या भाकितासंबंधीची ती !!! (१६२४)

तुजला श्रीव्यासांनीं येथें जें कांहीं बसविलें आहे, तें कोणत्या उद्देशानें बरें ! व येथें तूं तर ह्या प्रसंगास योग्य नाहीं असें अप्रासंगिक असेंच कांहीं तरी बोलत आहेस. (१६२५)

असें तें तूं बोलत आहेस तरी काय ? रानांमधील (वन=लाकूड. राव:=आवाज) जें कांहीं एक (देव देऊळ, राव राऊळ) तें देवळाच्या आवारामध्यें नेलें तर दाही दिशा अगदीं सुण्या, ( मोकळ्या, रिकाम्या अशाच कीं), होतात. (दाही दिशा सुण्या अशाच) त्या महत्व घेऊन येतात, अथवा निशाचरांना उजाडलें ती रात्रच झाली जसें का दिवस जो तो त्यांची रात्र होय. (१६२६)

जो इथले का जेथील गौरव जाणत नाहीं त्यास ते विपरीत असें (विचित्र कां विरूद्ध कीं उलट असे) म्हणो येतें, व त्यामुळेंच कीं मग (तो संग, संयोग, का योग्यकाळ तो) अप्रसंग कोण प्रसंग !!! का अयोग्य-काळ, इत्यादि मोठ्या जीवावरच आले आहे, अशा आलस्यास त्या संकट नव्हे ? असें मानणें होतें कीं. (१६२७)

मग त्यानें म्हणूं केलें कीं हे संजया प्रस्तुत सर्व युद्ध चालू आहे त्या युद्धांत कोणास तो जय मिळेल बरें ? (१६२८)

येऱ्हवी पाहिलें असतां (येऱ्हवी पाहाता) बहुत करून विशेष असेंच तें आमच्या मनामध्यें येत आहे, कीं जें कांहीं नेहमीं दुर्योधनाचेच अधिकतेचे असें प्रताप ! (१६२९)

व पांडवाच्या तुलनेनें पाहिलें असतां त्याजला दुर्योधनाला दळहीपण दीडपट असें आहे, म्हणून जैत म्हणजे जय–जिंकले पण तें खरें असें यांना दुर्योधनासच की मिळणार ना !! आम्हांस तर असें वाटत आहे यावर तुझें जोतिष भाकित तें करें तें आम्हीं नेणों पण ते जसें कांहीं असेल तसें तें हे संजया सांग पाहू ? (१६३१)

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥**

इति श्रीमद् भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायांयोगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे मोक्षसंन्यासयोगोनाम अष्टादशोऽध्यायः ।

योगेश्वर=भगवान, योग स्वामी योग ईश्वर ! धनुर्धर धनुर्धारिन्, धनुर्भृत्, धनुष्मत्=धनुष्यानें लढणारा तिरंदाज, श्रीः=लक्ष्मी, शोभा, संपत्ति, कांती, मोठेपणा, कीर्तीः विजयः=जय, अर्जुन. भूतिः= उत्पत्ति, संपत्ति, ऐश्वर्य, (भस=प्रकाशणारा.) ध्रुवा=स्थिर, अविनाशी, अखंड, प्रसृत. नीतिः=रीत, न्याय, वर्तन, सदाचार, शास्त्रयोजना, मम मतिः=माझे मतें, माझ्या बुद्धिनें, (इछा, सन्मान, अभिप्राय, उपदेश.)

अन्वयः—योगेश्वरः कृष्णः यत्र । पार्थः धनुर्धरः यत्र । श्रीः । विजयः । भूति । ध्रुवा नीतिः । तत्र । ममभतिः ॥ ७८ ॥

अर्थ :—जेथें योगेश्वर भगवान श्रीकृष्ण, जेथें धनुष्यानें लढणारा पार्थ, तेथेंच, लक्ष्मी, जय, उत्पत्ति, संपत्ति, ऐश्वर्य, व स्थिर असा सदाचार केव्हांहि असणारच असें माझें मत आहे !

(श्लोक ७८ ओव्या १६३२–१८११)

(यत्र योगेश्वरः कृष्णः)
या बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचे मी नेणे ।
परी आयुष्य तेथ जीणे । हे फुडे कीं गा ॥ १६३२ ॥
चंद्र तेथ चंद्रिका । शंभु तेथ अंबिका ।
संत तेथ विवेका । असणें कीं जी ॥ १६३३ ॥
रावो तेथे कटक । सौजन्य तेथे सोयरिक ।
वन्हि तेथ दाहक । सामर्थ्य कीं ॥ १६३४ ॥
दया तेथ धमु । धर्मु तेथ समागमु ।
सुखी पुरुषोत्तमु । असे जैसा ॥ १६३५ ॥
वसंतु तरी वने । वने तेथ सुमने ।
सुमने पाळांगणे । सारंगाची ॥ १६३६ ॥
गुरु तेथ ज्ञान । ज्ञानी आत्मदर्शन ।
दर्शनी समाधान । आथी जैसे ॥ १६३७ ॥
भाग्य तेथ विलासु । सुख तेथ उल्हासु ।
हे असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथे ॥ १६३८ ॥
तैसे सकळ पुरुषार्थ । जेणे स्वामी का सनाथ ।
(तत्र श्रीः) तो श्रीकृष्णनाथ जेथ । तेथचि लक्ष्मी ॥ १६३९ ॥

भूतिः

आणि आपुलेनि कांतेशी । जे जगदंबा जयापासी ।
आणिमादिका कांहीं आणिमादिकी काय दासी । नव्हती कां तयाते ॥ १६४० ॥

(विजय)

कृष्ण विजय स्वरूप निजांगे । तो राहिला असे जेणे भागे ।
तैं जयो लागवेगे । तेथचि आहे ॥ १६४१ ॥
विजय नावें अर्जुन विख्यातु । विजय स्वरूप श्रीकृष्णनाथु ।
श्रियेसि विजय समस्तु (निश्चितु) । जाण तेथ असे ॥ १६४२ ॥
तयाचि देशाच्या झाडि । कल्पतरूते होडी ।
निजि नवे काय वाढी । माय बापू असता ॥ १६४३ ॥
ते पाषाणही आघवे । चिंतामणि कां न व्हावे ।
तये भूमिके न यावे । सवर्णत्व ॥ १६४४ ॥
रायाचिये गावीचिया । नदी अमृते वाहाविया ।
नवल काइ राया । विचारी पां ॥ १६४५ ॥
तयाचे बिसाट शब्द । सुखे म्हणो येती वेद ।
संदेह (सदेह) सच्चिदानंद । का न व्हावे ते ॥ १६४६ ॥

या–यया. तेथ–तेथें. जीणे–जिणे. (१६३२) आसणे–असणें (१६३३) सखागमु–सुखागमु. (१६३५) तरी–तेथे. वने–वन. पाळांगणे सारंगाची–पालिंगने सारंगाची = भ्रमरांचे = चित्रविचित्र, काळवीट, हरीण, हत्ती, भक्त, चातक, वाद्य विजय समुदाय (१६३६) उल्हासु–उल्लासु = आनंद तेज (१६३८) स्वामी = ज्या पुरुषार्थाचा स्वामी असल्यामुळें ते धर्म अर्थ काम मोक्षरूपी पुण्यकर्म सनाथ झाले आहेत ज्या स्वामीमुळें सकळ पुरुषार्थ सनाथ होतो असे भगवान श्रीकृष्ण श्रीकृष्णनाथ–श्रीकृष्णराय.

(१६३९) आपुलेनि–आपलेनि. आणिमादिका काही–आणिमादिकी काय=अष्टमहासिद्धि. (१६४०) श्रियेसि=लक्ष्मीसह. समस्त–निश्चित. तेथे–तेथेचि. जाण तेथे असे–तेथेचि असे. (१६४२) तयाचि देशाच्या–तयाचिये देशीच्या मायबापु–मायबापे. निजी नवे काय वाढि–न जिणवे कां एव्हढी (जिणवे= जिंकावे) होडी=पैज. (१६४३) चिंतामणी–चिंतारत्ने. न व्हावे–नोहावे. तये–तिये. न–कां न. सवर्णत्व ( सारखा, समान जातीचा एका वर्णाचा )–सुवर्णत्व (तेजस्विता, सौंदर्य, सोनेपण, द्रव्यत्व.) (१६४४) तयाचिये=तयाचिया. काई–कायि. (१६४५) बिसाट=भलते. (बिस–विश=कमळाचा देठ किंवा तंतु.) संदेह (संशय, भीती)–सदेहः न व्हावे–नोहावे–संदेह मूर्तिमंत ते सच्चिदानंद रूप का न व्हावे! होणारच! (१६४६)

**संजयानें म्हटले त्या एकाएकांचें भाकित मी जाणत नाहीं, पण जेथें आयुष्य तेथें जगणेंच एक खरेपणास येतें. चंद्र तेथें चंद्रिका, शंभू तेथें अंबिका, संत तेथें विवेक हा असणारच!** राजा तेथें सैन्य, सौजन्य ( मैत्री भलेपणा ) तेथें सोयरिक, वन्हि तेथें दाहकपणाचें सामर्थ्य असणारच! जेथें दया (कारूण्य, कृपा) तेथें धर्म, धर्म तेथें सुखागम (म्हणजे उत्तम असें बोलणे, आदर सत्काराचें तें, भावरूपी पाहूणचाराचें) व सुखानंदावरच की पुरूषोत्तम नांदत आहे. वसंत तेथें वनें, वन तेथें सुमनें (पुष्पे कुसुमें, विद्वान् देव साधु. फुले) सुमनसावरच (की देवपणावरच की ते पुष्पागमावरच की बोलण्याचालण्याचे तें तंत्र शास्त्र तेथें बापपण, वडिलपणाची श्रेष्ठता) भ्रमराचें ते समुदाय गुंजारव करण्यास येणारे जेथें गुरूजन (वडिल माणसें अथवा श्रीगुरू) तेथेंच ज्ञान–, ज्ञान तेथें आत्मदर्शन व दर्शनामध्यें केवढें तरी समाधान (दैवच, ऐश्वर्यच तेथें व्यक्तीत्वास आलेले की, नांदणारे) वाटणारे!! भाग्य तेथें शृंगार, विलास, सुखोपभोग–सुख (पुण्य, आनंद) तेथेंच उल्लास असें हें असो! पण जेथें सूर्य तेथेंच आनंद प्रकाश की त्याप्रमाणें जेथें श्रीकृष्णनाथ हेच भगवान स्वामी असे तेथेंच सकळ पुरूषार्थरूपी संपत्ती सनाथ अशी, जेथें ते श्रीकृष्ण राव तेथेंच लक्ष्मीं की! आपल्या पतिसह जगदंबा ज्याच्याजवळ, तेथें अणिमादिक महा-सिद्धि त्या त्याच्या दासी नव्हत काय? भगवान श्रीकृष्ण स्वतः आपल्या अंगानेंच की विजय स्वरूप व तेथेंच की लगबगीनें तो जयच की असणार केव्हांही!!! विजयी नांवानें अर्जुन ख्यातीचा, श्रीकृष्णनाथ विजयस्वरूप व तेथेंच की लक्ष्मीसह विजय तो केव्हांही आहेच! त्याच्या देशीच्या झाडांनीं कल्पतरू बरोबर पैज करून कल्पतरू होऊन जिंकावेंच हें काय एवढी थोरली मायबापें असतांना तें नच घडणारे? अहो ते पाषाणही चिंतामणीपणानें इच्छिलेले देणारें असें (रत्न गणपती की) अहो! त्या भूमीला सुवर्णत्व तें का न देणारें होतील ते? त्याच्या गांवच्या त्या नद्यांनीं अमृतच एक वाहावें तेथें नवलच तें अहो! राया काय कसचें! तें विचारास घ्या!! तेथचे ते (बिसाट म्हणजे भलते का) अव्यवस्थित शब्द ते तर सहज (सायास शिवाय सुखानंदानेंच की पुण्यवंत असें) वेदच ते, असें म्हटले होत आहेत ते शब्द लोक मूर्तिमंत सच्चिदानंदरूप कां न व्हावेत! होणारच हा भाव! शब्द तो तेथचा मूर्तिमंत सच्चिदानंद की!!!

अशा धृतराष्ट्राच्या बोलण्यावर संजय म्हणाला की, ते एकमेकाशीं लढत आहेत त्या एकएकाचे का एकमेकाचे जे काही होईल त्या संबंधीं मी कांही जाणत नाहीं पण येवढे मात्र खरें की, आयुष्य आहे तेथें जगणे का जिवित जिणें असते व असणार हे खरें की अहो! (१६३२)

चंद्र तेथें चांदणें (चंद्रिका) शंभु तेथें अंबिका (अंबा, आई) संत तेथें विवेक (सारासार विचार समंजसपणानें, असणें) असतोच की, (१६३३)

(रावा का) राजा तेथे सैन्य (कमरपट्टा का हातातले कडे) असणारच केव्हांहीं. जेथें सौजन्य (सुजनता, भलेपणा मैत्री,) तेथे संयोग (सोयरीक इच्छिली होतेच) जेथें वन्हि तेथे दाहक (म्हणजे जाळण्याचे) सामर्थ्य असणारच! (१६३४)

जेथें दया तेथें धर्म जेथें धर्म तेथें सुख आगम [(तंत्र शास्त्र) सखा किंवा सुखाचा असा आगम वेद, उत्पत्ति, उपस्थित होणें, व्यवहार, रीति-रिवाज बोलणें चालणें व्यवहारणें, इ.] जेथें सुख तेथें पुरुषोत्तम असतोच असतो ! (१६३५)

जेथे वसंत (कुसुमाकर, ऋतुश्री-तरच वनश्री, माधवी,) तेथ श्रीवन यौवन, वन तेथे (पुष्पें शब्दरूपी) सुमने, जेथें (पुष्पें शब्दरूपी) सुमनें तेथें भ्रमरांचें रसिकांचे समुदाय हे असणारच !!! (सुमनस्=देव, फूल.) (१६३६)

जेथें गुरू ! (बाप !) तेथें ज्ञान (जाणीव बुद्धि बोध,) ज्ञानामध्यें आत्मदर्शन [(आत्मदर्शः=आरसा,) स्वतःचे जिवंतपण स्वतःस हितकर असें ज्ञान नेत्राचें दर्शन पाहाणें रूप अवलोकन ] व दर्शनानें रूपाचे पाहाण्यानें समाधान (योग्यतेचे का लायकीचे, ते चतूर पूज्य, असें) असते. (१६३७)

(सुदैवी असें) दैव तेथें प्रेमविलास (काम चेष्टा, क्रीडा मंदिर,) जेथें सुख (म्हणजे पुण्यवान असें आनंद सुख देणारे) तेथें उल्लास, प्रकाश तेज, असें हे असो पण तेथेंच की प्रकाश जेथें सूर्य की ! (१६३८)

त्याप्रमाणें भगवान श्रीकृष्ण हेच सकळ पुरूषार्थांना स्वामी असल्यानें आतां ते पुरूषार्थ सनाथ असेंच होऊन आहेत. जेथें भगवान श्रीकृष्ण हें स्वामी तेथेंच की लक्ष्मी, (शोभायमान ऊर्जितकाळ,) असणार !! (१६३९)

आपल्या पतिसह, कांत-वल्लभासह, जगदंबा ज्याच्याजवळ आहे, तेथें अहो ! अणिमा गरिमा लघिमा इत्यादि-अष्टमहासिद्धि दासीपणाच्या अष्टकें-वर्णत असतात की ! (अष्टकर्ण=ब्रह्मदेव) (१६४०)

श्रीकृष्ण (निजांगाने) आपल्या नित्य ब्रह्म अंगानें विजय स्वरूप होत-ते ज्या भागानें राहिले आहेत. तेथेंच की जय, आपल्या लगबगीनें आहेच आहे ! (१६४१)

विजयी नांवानें, अर्जुन विख्यात, विजयी-स्वरूप श्रीकृष्णनाथ म्हणून लक्ष्मीसह विजय निश्चितपणे तेथे असणारच ! आहेच आहे ! (१६४२)

तयाच्या देशीच्या-( प्रांताच्या, ठिकाणाच्या भागीच्या) झाडांनीं कल्पतरू बरोबर पैजच एक केलेली त्या झाडांनी मोह व विषयरूपी विषामुळें भीम असे भवारण्य ज्यावर परिणाम करणारी अशी माणसे एवढी मायबापे श्रीकृष्ण बाप व लक्ष्मीदेवी माता असतांना जिंकावेच हे केव्हाहि ! (१६४३)

तेथीलच्चे ते सर्व पाषाणहीपण चिंतामणिच की कां न व्हावेंत तें ? अहो त्या भूमीला सुवर्णत्व कां बरे न यावे ते ? ती सुवर्णभूमी असेंच कीं पावणे व्हावे कीं ! (१६४४)

तयाच्या त्या गांवच्या नद्यांनीं अमृतच कीं एक प्रवाह, ओघानें, (वाहाणें तें) वाहविण्याचें करावे केव्हांहि येथें नवल तें, हे राया काय कसचें ! हे तर केव्हांहीं असेंच असणार ! तुम्हीं ही आपल्या मनांत विचारून पाहा कीं ! (१६४५)

तयांचे बिसाट असें (भलते का अव्यवस्थित असें जरी) शब्द ते तर अगदीं सहजसुख (सुखेकरूनच कीं) असे वेद होत ! असें म्हणणें होऊन येत आहे. अहो ! ते सदेह, मूर्तिमंत सच्चिदानंद रूप कां न व्हावेत ? होणारच कीं !!! (१६४६)

**पै स्वर्गापवर्ग दोन्ही । ये पदे तया आधिनी ।**
**श्रीकृष्ण बापु जननी । कमळा जया ॥ १६४७ ॥**
**म्हणौनि जे बाह्य उभा । तो लक्ष्मियेचा वल्लभा ।**
**तेथे सर्व सिद्धि स्वयंभा । येर नेणो ॥ १६४८ ॥**

आणि समुद्राचा मेघु । उपेगे तयाहुनि चांगु ।
तैसा पार्थी आजि लागु । आहे तये ॥ १६४९ ॥
कनकत्व दिक्षा–गुरू । लोहापरिस होय किरू ।
परि जगा पोसिता व्यवहारू । तोचि जाणे ॥ १६५० ॥
येथ गुरूत्वा येतसे उणे । ऐसे ज्ञने कोण्ही म्हणे ।
वन्हि प्रकाश दीपपणे । प्रकाशी आपुला ॥ १६५१ ॥
तैसा देवाचिया शक्ति । पार्थु देवासीचि बहुती ।
परि माने ये स्तुति— । गौरव असे ॥ १६५२ ॥
आणि पुत्र मी सर्वगुणे गुणी । जिणावा हे बापा सिराणी ।
करी ते सारंगपाणी । फळा आली ॥ १६५३ ॥
किंबहुना ऐसा नृपा । पार्थु झालासे कृष्णकृपा ।
तो जयाकडे साक्षेपा । रीति आहे ॥ १६५४ ॥
तोचि पां विजयासि ठावो । येथ कोण तुजा संदेहो ।
जेथ न ये तरी वावो । विजयोचि होये ॥ १६५५ ॥
म्हणौनि जेथ श्री तेथें श्रीमंतु । जेथ तो पांडुचा सुतु ।
तेथ विजयो समस्तु । अभ्युदयेसी ॥ १६५६ ॥
(ध्रुवा) जरी व्यासाचेनि सांचे । धीरे मन तुमचे ।
तरी या बोलाचे । ध्रुवचि माना ॥ १६५७ ॥

(नीतिः)—

जेथ तो श्रीवल्लभु । जेथ भक्त कदंबु ।
तेथ सुखे सुखलाभु । मंगळाचा ॥ १६५८ ॥

(मतिमम)—

या बोला आन होये । तरी व्यासाचा अन वाहे ।
ऐसे गाजौनि बाहे । उभारिली तेणे ॥ १६५९ ॥

(श्लोक महात्म्य)—

तंव भारताचा आवांका । आणुनि श्लोकाएका ।
संजय कुरुनायका । दिधला हाती ॥ १६६० ॥
जैसा नेणो केव्हडा वन्हि । परी गुणाग्री ठेउनी ।
आणीजे सूर्याचि हानी (हाणी) । निस्तरावया ॥ १६६१ ॥
तैसे शब्द ब्रह्म अनंत । झाले सवालक्ष भारत ।
भारताचे शते सांत । सर्वस्व गीता ॥ १६६२ ॥
तयाही सातां शतांचा । इत्यर्थ हा श्लोक शोषिचा ।
व्यास शिष्या (शिष्याचा) संजयाचा । पुर्णोद्गारू जो ॥ १६६३ ॥
येणे एके श्लोके । राहे तेणे आसके ।
विद्याजाताचे निके । जिंतले होये ॥ १६६४ ॥
ऐसया श्लोका शते सांत । गीतेची पदे आंगे वाहात ।
पद्ये म्हणो कीं परमामृता । गीताकाशेचे ॥ १६६५ ॥

**की आत्मराजाचे सभे। गीते वोडविले हे खांबे।**
**मज श्लोके प्रतिभे। असे येत॥ १६६६॥**
**की गीता हे सप्तशति। मंत्र प्रतिपाद्यभगवति।**
**मोहोमहेशा (मोहोमदिषा) मुक्ति। आनंदलीसे॥ १६६७॥**

स्वर्गापवर्ग=स्वर्ग, मोक्ष. ये–इये. आधीनी–अधीनी (अधीन=ताब्यातला, वश.) कमळा=लक्ष्मी (१६४७) जे बाह्य–जिया बाही=ज्या पक्षाकडे, ज्या भागी. नेणो–मी नेणे. वल्लभा–पति (संबोधन) (१६४८) उपेगे–उपयोगे. लागु=संबंध. (१६४९) कनकत्व दीक्षा गुरू=गुरू तो म्हणजे सुवर्णपण येण्याची दीक्षा देणारा. लोहा–लोखंडास. तेचि–सुवर्णच. (१६५०) झणे–कदाचित्. (१६५१) परि माने ये स्तुति=पार्थाच्या स्तुतीनें देवाला विशेष गौरविले आहे. (१६५२) शिराणी=आवड, इच्छा. (१६५३) तो जयाकडे साक्षेपा=विशेष प्रेमानें जाणून बुजून रीती, प्रघात पद्धतीनें, पाहातो. (आक्षेप=चित्तक्षोभ, हालणे, चित्त वेधणें, ओढा, पक्षपात, कठोर वाक्य.) (१६५४) वावो विजयोचि=विजयाचे विजयत्व जाईल. (वावो वाव=वाहून वाहून.) (१६५५) अभ्युदय=भरभराट. (१६५६) सांचे=खरेपणानें. धीरे=विश्वासे. ध्रुवचि=अढळत्व, वज्रलेप. या बोला–हे माझे बोलणें. (१६५७) भक्त कदंब=भक्त समुदाय. मंगळाचा=कल्याणाचा (१६५८) अ–अंकु=अंकितपणा, शिष्यत्व खूण चिन्हः बाहे उभिली=बाही उभारिली–हात उभा केला. (१६५९) आवांका=मतलब, सार. येका श्लोका="यत्र योगेश्वर" इत्या. (१६६०) गुणाग्री=वातीच्या अग्रभागी, अग्रावर. हानी=तोटा भरून काढण्यास, फेड करण्यास, अंधारातून मुक्त होण्यास, सुटण्यास, अंधार दूर करण्याला उपाय, सिद्धि. निस्तरावया=संपूर्ण करण्यास. (१६६१) शेषीचा=शेवटचा–"यत्र योगेश्वर" इ० (१६६३) आसके–असके=संपूर्ण, सर्व (आसेक=अभिषेक, शिंपडणे, ओतणें, आसेचन) एके–एकेचि. विद्याजाताचे–अविद्याजाताचें. जिंतले–जितिले. (१६६४) ऐसया श्लोका–ऐसे श्लोक. वाहात–वाहत. पदे–पदे गीताकाशेचे–गीताकाशीचे. (१६६५) वोडविले–वोडवले=उभारले. प्रतिभे=बुद्धिला. येत=दिसतात. (१६६६) मा हो महेशा–मोह महिषा=मोहरूपी महिषासुराला, मुक्ति देऊन. (१६६७).

**श्रीकृष्ण बाप व लक्ष्मी ही जननी ज्यांस त्यांच्या अधीनच स्वर्ग कां मोक्ष अशी ती दोन्हीं पदे (१६४७) म्हणून तो ज्या पक्षाकडे तो लक्ष्मिपति वल्लभ तेथेंच कीं, सर्व** स्वयंभ मूर्तिमंत सिद्धी! ह्याशिवाय दुसरें मी कांहीं जाणत नाहीं. (१६४८) अहो समुद्रामधील पाणी वाफ रूपानें शोषून मेघ जो मेघ होऊन आला आहे तो तर त्याहिपेक्षां चांगला उत्तम असा तसा ह्या पार्थामध्यें आज लागाबांधा संबंध आहे. (१६४९) कनकत्व दीक्षा गुरू–लोखंडाला तर तो परीसाचा स्पर्शच तरीसुद्धां जगास पोसणारा, तो व्यवहार तें सुवर्णच कीं, जाणतें! (१६५०) येथें गुरुत्वास उणें येत आहे असें जर कोणी म्हणेल तर असें समजा कीं, वन्ही दीपपणानें आपला प्रकाश तो प्रकाशित करतो नां! (१६५१) त्याप्रमाणें पार्थ तो देवाच्याच शक्तिनें देवाहून विशेष आहे परंतु अशा ह्या पार्थाच्या स्तुतीनें तर देवाचांच की विशेष गौरव होतो. (१६५२) बापाचें सर्वगुण म्यां पुत्रानें अंगी उतरून घ्यावेत अशीं बापाची इच्छा, ती शार्ङ्गपाणीच एक असें फळच रूपास आलें ह्या पार्थाच्या रूपानें कीं (१६५३) हे राजा पार्थ तर कीं एक कृष्णकृपाच झाला आहे, होऊन आहे! तो तर रीतीचा असा जयाकडेसच कीं उघड उघड जाणूनबुजून आहे. (१६५४) विजयास तोच ठाव येथें तुज संदेह संशय तो (कोणता कसचा का) काय म्हणून! तेथें जर जय नच आला तर विजयाचें विजयत्व व्यर्थ होईल कीं, (१६५५) असें आहे म्हणून जेथें (लक्ष्मी तेथेंच श्रीमंतता) श्री तेथे श्रीमंत–जेथें तो पंडूचा सुत (विजय पार्थ) तेथेंच समस्त विजय, तेथेंच अधिक उत्कर्ष, भरभराट (१६५६) व्यासाचेंच आम्हीं खरेंपणानें खरें असें, अशा

विश्वासानें तुमचें मन आहे जर तर ह्या अशा म्हणण्याचें तें अढळत्वच माना कीं. (१६५७) जेथें श्रीवल्लभ तो, तेथेंच भक्त समुदाय तेथेंच कल्याणाचा लाभ, सुखाचा, आनंदाचा कीं. (१६५८) ह्या म्हणण्यात जरी उणें झालें तर ह्या म्हणण्याहून दुसरें तिसरें घडले तर-तरी मी व्यासाच्या अंकितपणाचें शिष्यपणाचें चिन्ह नच वाहीन कीं असें मोठ्यानें बोलून त्यानें आपला हात उभारला. (१६५९)

आतां येथें श्लोक माहात्म्य तें कसें तर कीं याप्रमाणें भरत ग्रंथाचा मतलब अर्थ ह्या एकाच श्लोकास आणला तो संजयानें कुरूनायक तो धृतराष्ट्र त्याच्या हाती दिधला, त्यास सांगितला. (१६६०) अहो वन्हि तो तरी केंव्हडा! हें कांहीं जाणणें नाहीं जरी तरी "यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः तत्र श्रीर्विजयोभूति र्ध्रुवानीतिर्मतिर्मम" ह्या शेवटच्या श्लोकाच्या गुणाग्रामामध्येंच म्हणजे वातीच्या अग्रभागी कीं ठेऊन सूर्यासंबंधी तो उणेपणा-तोटा भरून काढण्यास लावावा कीं, (१६६१) त्याप्रमाणें वेद अनंत तेथें ते सव्वालक्ष भारत झाले त्या भारताचे सात शत श्लोक त्याचे सर्वस्व तीच ही गीता कीं, (१६६२) त्याही सातशतांचा इत्यर्थ तो हा शेवटचा म्हणजे शेषीचा श्लोक तो तर व्यासांचा शिष्य जो संजय त्याचा हा पूर्ण उद्‌गार जाणावा. (१६६३) ह्या एकाच "यत्र योगेश्वरः कृष्ण" ह्या श्लोकानें तेथें संपूर्णपणें राहणें केल्यानें निके लघुत्व अविद्याजाताचे तें जिंकिलें होईल कीं, (१६६४) असे हे सात शत श्लोक गीतेची स्थान पदवी चरण पदे आपल्या अंगीं वाहून आहेत, अशी ती स्थान पदवी पदें म्हणावीत का गीतारूपी स्वर्गातील का गीताप्रकाशाचें, गीता कीर्तीचें ते गीताख्यातीनें, प्रभुगुण-भगवद्‌गुणवर्णनपर काव्याचे तें प्रभूच्या वाङ्मय मूर्तीरूपी परमामृत म्हणावें कीं, (१६६५) देहराज आत्मा जो त्याच्या सभेचें गीता ही प्रभुगुण-भगवद्‌गुणवर्णनपर काव्य अहो! वाङमयमूर्तीच प्रभूची ती की तिचे बसविलेले हे खांबच कीं असें श्लोकाच्या असाधारण बुद्धि शक्तीच्या तेजाचे त्या प्रतिभेवरून माझ्या अंतःकरणाला वाटत आहे. तिजला आच्छादणारे ह्याच रूपानें राहाणारी ती गीता. (१६६६) अथवा असें म्हणूं कीं, भगवद्‌गुणवर्णनपर काव्य तें गीता ही प्रभुची वाङमयमूर्ति ही सप्तशतीच कीं मंत्ररूपानें प्रतिपादलेली भगवती देवी पार्वती ऐश्वर्यवान् देवी परमेश्वरी श्रीमती परम पूज्य, पूज्य अशीं ती भगवती देवी ती तर मोहरूपी महिषासुराची मुक्तता केल्यामुळें आनंदास आलेली, आनंददायक झालेली, हर्षोत्सुकतेची ती कीं. (१६६७)

स्वर्ग व मोक्ष अशीं जी दोन्हीं पदे स्थळें ही त्याच्या स्वाधीनतेची सर्वथैव अशीच तेथें श्रीकृष्ण तो बापच कीं व कमळा लक्ष्मी ती जननी आई कीं ज्यांना, त्यांच्या स्वाधीनतेची सर्वथैव अशीच स्वर्ग व मोक्ष जी दोन्ही पदें का स्थळें तीं. (१६४७)

म्हणून ज्या पक्षाकडे का ज्या भागी तो लक्ष्मीयेचा वल्लभपति तेथें सर्वसिद्धि स्वयंभ अशाच कीं होत! दुसरें कांहींही मी जाणत नाहीं. (१६४८)

समुद्राचे पाणी वाफ रूपाने शोषून झालेला मेघ तो तर त्याहूनही उपयोगामुळें चांगला असा त्याप्रमाणें पार्थाचे ठायींच मेघाचा आज लाग संबंध लागत आहे. समुद्राचा मेघ म्हणावा तर पार्थ तर त्याहूनहि सरस असा उपयोगाचा. (१६४९)

सुवर्णपणाची दीक्षा देणारे श्रीगुरू-लोखंडास परिस तोच कीं, कीर अशा वाणीचा, असें जरीं तरीपण (ह्या जगाचा पोशिंदा) व्यवहार तें सुवर्णच कीं जाणतें असें जाण. (१६५०)

येथें आतां गुरूत्वासच [ "भाव भजनाते निपजवी। भक्त देवाते उपजवी ॥ १ ॥ आतां भजनी देव केला। भक्त वडिल देव धाकुला ॥ २ ॥ सेवा करणें हा संकल्प। भक्त देवाचाही बाप (=माप?) ॥ ३ ॥ भक्ता कळवळा देवाचा। देव झाला त्या भक्ताचा ॥ ४ ॥ देव भक्ताचें पोटी। झाला म्हणोनी आवडी मोठी ॥ ५ ॥ एकाजनार्दनी नवलाव। कैसा भक्तचि झाला देव ॥ ६ ॥ "] उणें येत

आहे, असें जर कोण्ही म्हणेल, तर असें पाहा कीं, वन्हिचा प्रकाश दीपत्वें करून आपलाच तो, वन्हि प्रकाश प्रकाशतो नां ! (१६५१)

तसा देवाच्या शक्तीनें पार्थ तर देवाहूनही बहुत (विशेष) असा जरी, तरीपण ह्या पार्थाच्या स्तुतीनें देवाला विशेष गौरव [" नमू जाय जव गुरूत्वा । तंव त्रैलोक्य आले गुरूत्वा । ते आतां नमना नुरेचि गुरू । गुरूत्वा आला संसारू ॥ १ ॥ वंद्यत्वें नमू गुरूभेदे । तंव त्रैलोक्य गुरूत्वें नांदे ॥ २ ॥ गुरू वांचुनि न दिसे कांही । तंव सान थोर अवयवें गुरू पाही ॥ ४ ॥ थोर गुरूत्वा आले गौरव । तरी गुरू नामे नेघे अहंभाव ॥ ५ ॥ एका जनार्दनाच्या पायी । नमू गेलो तो गुरूशिष्य नाहीं ॥ ६ ॥ " ] आहे असें वाटते देवाला विशेष गौरव येतो असें आहे. (१६५२)

(१) आणि मिया पुत्रानें सर्व गुणांनीं जिंकावा जियावा जिणि, जिणे, जिणावा ही बापाची इच्छा, अशी ती इच्छाच मुळीं, शार्ङ्गपाणी जे भगवान त्यांना अर्जुनरूपानें फळास आली आहे अर्जुनच तो शार्ङ्गपाणी होऊन आहे.

(२) मी सर्वगुणी जिणे जिणावा पुत्रानें बापसे बेटा सवाई, मुलाने त्रैलोक्य हालवून सोडावें, त्याच्याशिवाय पानही हालूं नये, जगच आपलेंसें करावें, अशी बापाची इच्छा ती, जे शार्ङ्गपाणी जे भगवान त्यांनाच कीं फलोत्पत्तीनें अर्जुन रूपानें फळास आली आहे. (१६५३)

बहुत काय पण हे राजा ! कृष्ण कृपेनें आज पार्थ असा झाला आहे. तो ज्याकडे उघडपणें का जाणून बुजून आहे. (१६५४)

विजयाचा तोंच ठाव ! तेथें (तुला कोण तो) संदेह ! [" आशा ते करविते बुद्धिचा तो लोप । संदेह पाप ते कैसे नव्हे ? ॥ १ ॥ आपुला आपण करावा विचार । प्रसन्न ते सार मन ग्वाही ॥ २ ॥ नावे रूपें अंगीं लाविला विटाळ । होते निर्मळ शुद्ध बुद्ध ॥ ३ ॥ आंधळ्यासी न ये देखण्याची चाली । चाले ऐसी बोली तुका बोले ॥ ४ ॥"

संदेह बाधक आपआपणाते । रज्जू सर्पवत् भासतसे । येऊनिया काय देखिले येणे । मारे घायेविण लोळतसे ॥ १ ॥ आपणचि तारी आपणचि मारी । आपण उद्धरी आपणया । शुकनलिके न्याये गुंतलासी काय । विचारूची पाहे मोकळिया ॥ २ ॥ पाप पुण्य कैसे भाजिले अंक । दशकाचा एक उरविला । जाणोनिया काय होतोसी नेणता । शून्या ठाव रिता नाही नाही ॥ ३ ॥ दूर दृष्टी पाहे न्याहाळुनी । मृगजळ पाणी न म्हणे चाडा । धांवताचि फुटे नव्हे समाधान । तुका म्हणे जाण पावे पीडा ॥ ४ ॥

साहोनिया टोले उरवावे सार । मग अंगिकार खऱ्या मोले ॥ १ ॥ भोगाचे सांभाळी द्यावे कलेवरा । संचिताची थार मोडूनिया ॥ २ ॥ महत्वाचे ठायी भोगावी अप्रतिष्ठा । विटवावे नष्टा पंचभूता ॥ ३ ॥ तुका म्हणे मग कैचा संवसार । जयाचा आदर तोचि व्हावे ॥ ४ ॥

संदेह तो तेथें व्यर्थच जाईल व नच संशय का संदेह आला तरी विजयच एक होईल. संशय न येईल असें जें कांहीं नि:संशयाचें होणें तें तेथें विजयच एक संपादील ! (१६५५)

आणि म्हणूनच कीं जेथें श्री तेथेंच श्रीमंत (तो सुंदर ऐश्वर्यशाली कीर्तिमान असा (परमात्मा) जेथें पंडुचा सुत तेथें समस्त विजय, तेथेंच कीं उत्कर्ष भरभराट. (१६५६)

जर श्रीव्यासांच्या सांचे (विश्व विश्वासे, सान्निध्य मित्रभाव, विश्वासे) विश्वास तें तुमचें मन तरी हें बोलणें वज्रलेप असें मानावें कीं (ह्या बोलाचें अशा ह्या म्हणण्याचें अढळपणच माना कीं.) (१६५७)

जो तो श्रीवल्लभ तेथेंच भक्तांचा समुदाय (कळंबाचे झाड) व तेथेंच की कल्याणाचा सुखलाभ होय. (१६५८)

( श्रीव्यासांचा शिष्यच तो एक खराखुरा असाच की असा ) जर येथें ह्या अशा बोलण्याहून आन म्हणजे भलतेंच झालें तर श्रीव्यासांचा शिष्यच नव्हे–व्यासांचें अंकितपण शिष्यत्व परकरून आहे जें तें सोडीन–असें मोठ्यानें बोलून त्यानें हात उभारला. (अ = पंचदेव, " विष्णु, शिव, ब्रह्मा, वायु, वैश्वानर.) (१६५९)

**श्लोक माहात्म्य :—**

एकंदरीत भारताचा मतलब–, भारताचे सार तें एकाच श्लोकांत आणलेलें, तें संजयानें कुरूनायकाच्या हातीं दिधलें. (मंत्रात्मक वेदभाग, भाषण, वाणी, स्मरण, एकाच राहाण्याचें ठिकाणास आणून)–तो तथ्यांश कुरूनायकाचे हातीं दिला. (१६६०)

वन्हि जसा केव्हढा तो, ( ते नेणो, ते नेणून ) वातीच्या अग्रभागी ठेविला, सूर्याची ती हानी झालेली ती कां तोटा तो भरून काढण्यासाठी कीं, ! (१६६१)

त्याप्रमाणें शब्दब्रह्म अनंत असें, ते, भारत सवालक्ष असे झाले व त्या सवालक्ष भारताचे सात सर्वस्वच की तें ही गीता जाण. (१६६२)

त्याहि सात शतांचा इत्यर्थ तो हा (शेवटचा श्लोक) शेषिचा श्लोक " यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम । " तो श्रीव्यासांचा शिष्य जो संजय त्याचा तो एक पूर्णोद्गार जाणावा कीं, (सगळा सफल भरलेला असा–प्रवाह मोठी लाट, बोलणें प्रतिध्वनि, बाहेर पडणारा स्राव जाण.) (१६६३)

ह्या एकाच श्लोकाचे त्या आपल्या संपूर्णतेनें राहाण्यानें अविद्याजात म्हणून जेवढे, तेवढे सर्व, लहान झाल्याने जिंकले होत आहे कीं, (१६६४)

अशा शत सात श्लोकांनीं गीतेची ती पदे व आंगे वाहाणारी गीताकाशीची–गीतारूपी स्वर्गातील–गीतारूपी परमात्म पदें म्हणावीत का परम अमृत म्हणावें कीं. (परम = श्रेष्ट, मोठे, अत्यंततेचे, प्रथमतेचे. अमृत = (१) न मागता मिळालेली वस्तुं, सुधा, उदक, पारा, तूप, (२) देव, धन्वंतरी, (३) प्रिय, तेजस्वी. प्रकाश्येचे जे = प्रकाशणें जे.) (१६६५)

अथवा असें म्हणूं कीं, आत्मराजाची–सभारूपी गीतेस–गीतारूपी समेस हे खांबेच होत असें मजला तर ह्या श्लोकाच्या असाधारण, असामान्य बुद्धि, शक्ति तेजावरून प्रतिमेवरून असें मनास येत आहेत असें अंतःकरणाला वाटत आहेत. (१६६६)

अथवा असेंही कीं गीता ही सप्तशती ती मंत्रप्रतिपाद्य भगवती देवी ती मोहरूपी मतिभ्रम आश्चर्याचे दुःख प्रेमाचें वेड,–अज्ञान रूपी महिषाला मुक्ति देऊन त्याला निरास केल्यानें–त्याचें निवारण केल्यानें–आनंदास आली अशी होय. (१६६७)

**म्हणौनि मने काने (कार्य) वाचा । जो सेवकु होईल इयेचा ।**
**तो स्वानंद सामराजीचा (साम्राज्याचा) । चक्रवर्ती करील की (करी) ॥ १६६८ ॥**
**की अविद्या तिमिर रोखे । श्लोक सूर्याते पैजा जिंके ।**
**ऐसे प्रकाशिले गीता मिसे । राये श्रीकृष्णे ॥ १६६९ ॥**
**की श्लोकाक्षर द्राक्षलता । मांडव जाली आहे गीता ।**
**संसार पंथ श्रांता । विसांवया ॥ १६७० ॥**
**की सभाग्य संत भ्रमरी । केलि ते श्लोक कल्हारी ।**
**श्रीकृष्णार्थ आख्य सरोवरी । सासीनली हे ॥ १६७१ ॥**

की श्लोक नव्हती आन । गमे गीतेचे महिमान ।
वाखाणिते बंदीजन । उदंड जैसे ॥ १६७२ ॥
की श्लोकाच्या आवारा । सात शते करूनि सुंदरा ।
सर्वागम गीता पुरा । वसु आले ॥ १६७३ ॥
की निजकांता आत्मया । आवडि गीता मिळावया ।
श्लोक नव्हती बाह्या । पसरू का जो ॥ १६७४ ॥
की गीता कमळीचे भृंग । की हे गीता सागर तरंग ।
की हरीचे हे तुरंग । गीता रथीचे ॥ १६७५ ॥
की श्लोक सर्व तीर्थ सांघातु । आला श्रीगीते गंगे आंतु ।
जे अर्जुनु सिंहस्थु । जाला म्हणौनि ॥ १६७६ ॥
की नव्हे हे श्लोक श्रेणी । अचिंत्य चित्त चिंतामणी ।
का निर्विकल्पा लावणी । कल्पतरूंची ॥ १६७७ ॥

काने–काये. सामराजीचा–साम्राज्यीचा. करील–करी. (१६६८) अविद्या तिमिर रोखे=अविद्यारूप अज्ञानावर रोख धरून त्याला नाहीसें करून. (१६६९) मांडव–मंडप. पंथ–पथ. विसांवया–विसंबावया. (१६७०) संत–सती. केली–सेविली. श्लोक कल्हारी=श्लोकरूप कमलांनींयुक्त. श्रीकृष्णार्थ अख्य–श्रीकृष्णाख्य. सासीनली–सासिन्नली=प्रेमपुष्करिणी झाली. (१६७१) बंदीजन=भाट. (१६७२) सर्वागम –सर्वागम=सर्व शास्त्रे. वसु–वसो. (१६७३) पसरू–पसर. सांघातु–संघात. श्रीगीता–श्रीगीते. अर्जुनु सिंहस्थ–अर्जुन नर नृसिंहस्थ. (१६७४) अचिंत चित्त चिंतामणि=निरीच्छ चित्ताला, चिंतामणि. (१६७७)

मनानें कायेनें–कानानें–वाचेनें हिचा सेवक होईल तो स्वानंद साम्राज्याचे, चक्रवर्तीच की एक ती करते. (१६६८) अविद्यारूपी अंधाराला रोखून,–अज्ञान, अंधःकाराला आडवून, श्लोक म्हणजे यश, (कीर्ती, पद्य, स्तुति, स्तोत्र म्हण, इष्टमित्र) श्लोक ते प्रकाशाचे, असे ते प्रकाशित केले आहेत. (१६६९) अथवा श्लोकांतील अक्षरें त्या द्राक्षलताच कीं त्यांना तर, गीता ही, मांडवच एक झाली आहे. कशास तर संसाराच्या मार्गानें चालून भागलेल्यांना, विसांवा देण्याकरितां कीं. (१६७०) भाग्यवंत संतांनीं भ्रमरांनीं सेविलेली ही कमळेंच श्रीकृष्ण प्रेम आख्येच्या सरोवरातील कमळेंच सिद्ध होऊन यावींत अशीं (१६७१) दुसरें तिसरें कांहींहीं नसून सर्वच ते श्लोक तर ह्या गीतेचे महिमान उदंडपणें, वाखाणणारे असें बंदीजन, भाट, स्तुतिपाठक आहेत. ते दुसरें तिसरें कांहींहीं बोलत नाहींत. (१६७२) श्लोकांच्या आवारासाठीं सातशें सुंदरा करून सेवारूपी वेदच कीं, (सर्व वेदशास्त्राचें ह्या गीतारूपी प्रत्येक शास्त्र, तंत्र, उत्पत्ति वेद, ह्या शहरामध्यें वस्तीस आल्या आहेत. सर्व वेदच) त्या सेवा आच्छादण्यास आलेल्या वेदरूपी सेवाच कीं. (१६७३) हे श्लोक नव्हत पण देवीगीतारूपी ती आपले बाहुच पसरून आली आहेत मोठ्या आवडीनें प्रेमानें, आपला जो निजकांत आत्मा त्यास, भेटण्याकरितां कीं, (१६७४) अहो गीतारूपी कमळावर गुंजारव करणारे हे श्लोक ते भृंगच, भ्रमरच अथवा, असें म्हणूं कीं, गीतारूपी सागरावरील हे तरंग अथवा श्रीगीतारूपी योध्याचे, रथावर आरूढ झालेल्या, रथीचे म्हणजे श्रीहरीचे हे तुरंग, घोडेच कीं, (१६७५) श्लोक हे सर्व तीर्थांचा संघात, समूह, ओघच ह्या श्रीगीतारूपी गंगेमध्यें आला, अर्जुन हा सिंहस्थ पर्वणीच झाला म्हणून कीं. (१६७६) ही कांहीं, लोकांची ओळ का रांग नव्हे अहो ती तर अचिंत म्हणजे विरक्ताच्या चित्ताला, चिंतामणीचा स्पर्श कीं अथवा ज्ञानियास, भेदशून्यांना, निर्विकल्पतरूची कल्पतरू, कल्पद्रुम, कल्पवृक्ष, कल्पद्र. कल्प=वेदाचे एक अंग, प्रतिज्ञा, ब्रह्मदेवाचा एक दिवस, प्रळय, सारखा, गहन, कलाकुशल इच्छिलेले फळ देणारे स्वर्गातील वृक्षाची लावणीच रांगच कीं. (१६७७)

याजकरितां मनानें, कानाने, कायेने व वाचेने काया वाचा मने–काना,–काया,–वाचा,–मने,–करून, जो हिचा सेवक होईल तो तर स्वानंदरूपी साम्राज्याचा चक्रवर्तीच की एक असें ती करील कीं! (१६६८)

अहो अज्ञान अंधःकाराला अडवून, रोखून, धरून श्लोक हे तर पैजेनेंच कीं सूर्यासही जिंकणारें असें आहेत. असें गीतेच्या निमित्तानें तर श्रीकृष्णरायांनीं–प्रसिद्धीस आणलें आहे; सर्व प्रकाशाचे असेंच की, प्रकाशित (उघड जाहीर, दृश्य, व्यक्त, प्रख्यात) केलें आहे. (१६६९)

अथवा श्लोकामधील अक्षर जे ती द्राक्षलता, द्राक्षवेली म्हणावी तर त्यास तर ही गीता मांडव झाली आहे–कीं, संसाररूपी मार्ग आक्रमण करिता करितां श्रमले,–भागलेल्यांना, विसांवाच कीं एक देण्याकरितां! (१६७०)

अहो सभाग्य भाग्यवान असें संत जे भ्रमर कीं अहो त्यांनीं सेविलेली अशी ती (श्लोकरूपी कमळिणी, की, कमळाचा समुदायच कीं अहो!) श्रीकृष्णांनीं सांगितलेल्या ह्या गीतारूपी सरोवरामध्यें श्लोकरूपी कमळिणीच (जशीं यां कमळवनें–कमळांचें समुदाय–कमळी–) सासिनली सिद्ध अशी उपदेवताच कीं एक प्रसन्न झालेली! (१६७१)

अहो! येथें गीतेचें महिमान व श्लोक तें कांहीं वेगळे नव्हत. जे श्लोक तेंच कीं, गीतेचा महिमा, तेंच गीतेचें महिमान माहात्म्य उत्कर्ष–असें श्लोक स्तुति पाठकांनीं तर उदंड कीं वाखाणिलेले होत आहे (श्लोक पाठक असे वाखाणित आहेत) (१६७२)

देवळाच्या आवाराप्रमाणें, अथवा राव जो त्याच्या राउळामधीलच्या–श्लोकरूपी आवारास शोभिवंत अशा सात–शतांनीं केलेल्या सुंदराच कीं त्या! जेथें कां सर्व वेदशास्त्रें जी तींच मुळीं ह्या गीतारूपी–नगरी, गृह, शरीर, पुरी–अथवा पुराचे ठायीं वस्तीस आले आहेत–त्या सुंदराच्याठायींच कीं श्लोक आवार तसेंच गीतासर्वागम कीं, वस्ती करून आहे. (१६७३)

अहो! आत्मयास अवघी ही निजकांतारूपी गीता भेटावी मिळावी, म्हणून, आलिंगनास यावी कीं! येथें श्लोक ते नुसतें श्लोकच नव्हत पण तो तर बाह्याचा पसरच ह्या गीतादेवीचा कीं, एक आत्मआलिंगना-करितां पुढें झालेला. (१६७४)

अहो श्लोक हे गीतारूपी कमळीणीचें (देहराज आत्मारूपी भृंग) भ्रमर म्हणावेत! कां गीता (ज्ञान सूर्य का ज्ञान) सागराचे किरण तरंग म्हणावेत कीं! अहो! हे गीतारूपी (रथावर आरूढलेल्या) रथीचें श्रीहरीचें हे तुरंच्च म्हणावेत कीं! (१६७५)

अहो! श्लोक तर सर्व तीर्थाचा संघाट समूह ओंव, ती ह्या श्रीगीतारूपी गंगेच्या आंत आली आहे. (श्रीगीतेशी संगम करून आहे) जे कां अर्जुन सिंहस्थ पर्वणीचा झाला म्हणून कीं! (१६७६)

अहो ही कांहीं श्लोकांची नुसतीच एक श्रेणी (ओळ मंडळी, समुदाय, रांग) नव्हे तर कीं अहो! विरक्त कां निरिच्छ जे आहेत त्यांच्या [भेद नच पाहाणाऱ्यास कां ज्ञान जे त्यास–भेदशून्य ज्ञानास–भेदभाव नच मानणाऱ्या अशा भेद रहितांना, ज्ञान, ज्ञेय इत्यादि भेदशून्य ज्ञानाचे ठायीं का ज्ञान भेद (सविकल्प व निर्विकल्प समाधि जशी)] चित्ताला चिंतामणीच कीं जडलेले (भेद शून्यास कां ज्ञानास कां) निर्विकल्पाकरितां का कल्पतरूची लावणी केलेली असे ते होत. (१६७७)

**ऐसेया शते सात श्लोका। परि आगळा येकायेका।**
**आतां कोण वेगळिका। वाणावा पां॥ १६७८॥**
**दीपा आदिलु मागिलु। सूर्य धाकुटा वडिलु।**
**अमृत सिंधु खोलु। उथळ काइसा?॥ १६७९॥**

तान्ही आणि पारठी । यया कामधेनूते दिठी ।
सूनि जैसिया गोठि । कीजेचि ना ॥ १६८० ॥
तैसे पहिले आणि सरते । श्लोक न म्हणावे गीते ।
जुनी नवी पारिजाते । आहाती काई ? ॥ १६८१ ॥
आणि श्लोका पाडु नाही । हे कीर समर्थु काई ।
येथ वाच्य वाचकुही । भाग न धरी ॥ १६८२ ॥

(पाठ महात्म्य):—

जये शास्त्री येकु । श्रीकृष्णचि वाच्य वाचकु ।
हे प्रसिद्धचि जाणे लोकु । भलताही ॥ १६८३ ॥
येथे अर्थे तोचि पाठे । जोडे येवढेनि घटे ।
वाच्य वाचके एकवटे । साधीत शास्त्र ॥ १६८४ ॥
म्हणौनि मज काही । समर्थनी आता विषोनाही ।
गीता जाणे हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ॥ १६८५ ॥
शास्त्र वाच्ये अर्थ कळे । मग आपण मावळे ।
तैसे नव्हे हे सगळे । परब्रह्मचि ॥ १६८६ ॥
कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंदु सोपा ।
अर्जुन व्याजे रूपा । आणिला देवे ॥ १६८७ ॥
चकोराचेनि निमित्य (त्ते) । तिन्ही भुवने संतते ।
निवविली कलावंते । चंद्रे जेवी ॥ १६८८ ॥
तैसे गीतेचे दुभते । वच्छ करूनिया पार्थाते ।
दुभिन्नली जगापुरते । श्रीकृष्ण गाये (गाय) ॥ १६८९ ॥
का गौतमाचेनि विषे । कळिकाळज्वरितोद्देशे ।
पाणि ढाळु गिरीशे । गंगेचा केला ॥ १६९० ॥
येथें जीवे जरि नाहाल । तरी हेचि कीर होआल ।
नातरि पाठमिषे तिंबाल । जिभचि जरी ॥ १६९१ ॥
तऱ्ही लोह येके अंशे । झगटल्या परिसे ।
येरीकडे आपैसे । सुवर्ण होय ॥ १६९२ ॥
तैशी पाठाची ते वाटी । श्लोक लावा ना जंव ओठी ।
तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल अंगा ॥ १६९३ ॥
ना येणेशी तोंड वांकुडे । करूनि ठाकाल कानवडे ।
तरी कानेही घेता पडे । तेचि लेख ॥ १६९४ ॥
जे श्रवणे पाठे अर्थे । गीता नेदी मोक्षाआरुते ।
जैसा समर्थु दाता कोण्हाते । नास्ति न म्हणे ॥ १६९५ ॥
म्हणोनि जाणतिया सवा । गीताचि एकी सेवा ।
काइ कराल आघविया । शास्त्रा येरी ॥ १६९६ ॥
आणि कृष्णार्जुनी मोकळी । गोठी चावळिली जे निराळी ।
ते श्रीव्यासे केली । करतळी घेवो ये ऐसी ॥ १६९७ ॥

बाळकाते वोरसे । माय जै जेवऊ बैसे ।
तै तया ठाकती तैसे । घांस करी ॥ १६९८ ॥
का अफाट समीरणा । आपैतेपण शहाणा ।
केले जैसे विंजणा । निर्मूनिया ॥ १६९९ ॥
तैसे शब्दे जे न लभे । ते घडुनि अनुष्टुभे ।
स्त्रीशूद्रादि प्रतिभे । सामाविले ॥ १७०० ॥
स्वातिचेनि पाणिये । न होती जरी मोतीये ।
तरी आंगीं सुंदराचिये । का शोभती ते ? ॥ १७०१ ॥
नादु वाद्या न येता । तरी का गोचरू होता ।
फुले न होता (पुष्प नव्हता) घेपता । आमोदु केवि ? ॥ १७०२ ॥
गोडी न होता पक्वान्ने । तरी का फावविती रसने ।
दर्पणेविण नयने । नयन का दिसे ? ॥ १७०३ ॥
द्रष्टा श्रीगुरूमूर्ति । जरी न रिघता दृश्यपंथि ।
तरि काह्या उपास्ति । आकळतां तो ? ॥ १७०४ ॥
तैशी वस्तु जे असंख्यात । तया संख्या शते सात ।
न होती तरी कोण्ह येथ । फांवो शकते ॥ १७०५ ॥

---

* फूटनोट (भजन)

**सर्वकाळ तेचि वाटे । रूप पाहावे गोमटे** ॥ १ ॥ जे का पुंडलिकाचे द्वारी । उमे ठेले विटेवरी ॥ २ ॥ पितांबराचें परिधान । मुगुट कुंडले विराजमान ॥ ३ ॥ **निळा म्हणे कौस्तुभ गळा । नाना पुष्पें तुळसीमाळा** ॥ ४ ॥

**वर्णिता चरित्र न पुरे धणी । वाचा लांचावली हरीच्या गुणी** । स्वानंदाची उघडली खाणी । नामस्मरणी माजली ॥ १ ॥ अधिक अधिक स्फूर्तीचा प्रसर । आगळी अक्षरे चालती फार । नेणो फुटले हे चिदंबर । मेघवृष्टि न्याये होतसे ॥ २ ॥ आवरताहि नीवरे मती । लिहिता न पुरे हे दिवसराती । न कळे काय केले संती । देऊनि प्रसाद आपुला ॥ ३ ॥ अवघेचि उघडुनिया भांडार । दृष्टी दाविले सारासार । लेववूनिया ते ते अलंकार । केले समोर बोलावया ॥ ४ ॥ अक्षरे वाचे येती । ते ते प्रमेयेसीचि उठती ॥ ५ ॥ नाही वाचेसी गुंतागोंवा । तात्पर्यार्थेचि हा अथवा । ऐसा योजूनिया बरवा । मुहुर्ते दिधला समर्थी ॥ ६ ॥ **निळा आईत्या पिठावरी । रेघा ओढीत बैसला घरी । देव मोडोनि आले वरी । होते संचिती म्हणुनि** ॥ ७ ॥

**सदांचा हा धाला सदांचा हा भुकेला । सदांचा निजला, जागा सदा** ॥ १ ॥ ऐसिया परीचा अंबुला साजणी । वरिला सुवासिणी सदांचि मी ॥ २ ॥ सदांचा बोलिला सदांचा मुका । सदांचा हा लटिका खरा सदां ॥ ३ ॥ सदांचा हा वेडा सदांचा हा कुडा । सदांचा हा निर्भिडा भीडा सदा ॥ ४ ॥ सदांचा हा दाता सदांचा मागता । सदांचा हा रिता भरला सदां ॥ ५ ॥ निळा म्हणे जवळी ना हा दुरी । सदां सर्वांतरी नसोनि वसे ॥ ६ ॥

**होते बहुत दिवस आर्त वागविले । आजी अकस्मात ते फळ देऊं आले** । दृष्टी श्रीहरीची देखिली पाऊले । घेतलें जन्म मागें सार्थक त्यांचे झाले वो ॥ १ ॥ **धन्य हे आनंदाची सांपडली वेळ** । तेणे संत सज्जन भेटले कृपाळ । त्यांनीं फेडियला बुद्धिचा वो मळ । दृष्टी देखियली यशोदेचा बाळ वो ॥ २ ॥ नाना साधनांच्या केलिया खटपटा । परि त्या त्या न पावतीचि वो याच्या

शते साता–शते सात. येका येका–येक येका. बाणाबा–बानावा. (१६७८) तान्ही आणि पारठी= लहान मोठी. यया–इया. कीजेतिना–कीजतीना. (१६७९) वाच्य वाचक=अर्थ आणि शब्द (१६८२) जये–जे इये. (१६८३) घटे=निश्चयाने, वाचके एकवटे–वाचके एकवाटे साधित–साधिते. (१६८४) जाण–जाणा. विषो–विषय. (१६८५) अर्थ–अर्थे (१६८६) चकोराचेनि–चकोराचे. (१६८८) गाये–गाय. (१६८९) ज्वरितोद्देशे=तापानें पीडलेल्या जीवाच्या उद्धारार्थ. पाणि ढालु=पाय उतारा. (१६९०) तिंबाल= मऊ कराल, मिजवाल. (१६९१) येणेशी–येणेसी. तोंड=मुख. कानवडे=एका अंगावर पडणे जे. कानेही– कानीही. तेचि लेख=तोच लाभ होईल. (१६९४) आरूते–आरौते=मोक्षाहून खालच्या प्रतीचे, कमी दर्जाचें. म्हणो–म्हणे. (१६९५) जाणतया सवा=जाणत्याचें संगतीत. आघविया–आघवा. (१६९६) मोकळी=मोकळया मनानें• चावळिली=बोलिली. निराळी=आकाशांत, सूक्ष्मात: केली करतळी घेवो ये ऐशी=त्याला करतलामलकवत् घेता येईल अशी केली. (१६९७) तेया–तया (ठाकती तैसे)=त्याला घेता येतील असें. (१६९८) समीरणा आपैतेपण=वाऱ्याला स्वाधीनतेचे. शहाणा–शाहाणा. विंजणा–पंखा (१६९९) घडुनि–घडुनिया–घडौनि. प्रतिमे सामाविले=बुद्धीला आकळलेसे केले. (१७००) ते–तिये. (१७०१) होता–होती. तरी–तै. फावविती–फावती. दर्पणेविण–दर्पणाविण (१७०३) काह्या (ॐ नमो भगवते वासुदेवाया । द्वादशाक्षरी मंत्र न जपसि काह्या ॥ ) उपास्ती=कसल्या उपासनेला. दृश्यपंथी= दृश्य, प्रत्यक्ष झाला नसता. आकळता–आकळती. (१७०४) तैशी–तैसे. कोण्ह–कोणा. (१७०५)

अशा एका एका श्लोकास आगळेपण आलेले आतां सातशें श्लोकांना तो वेगळेपणा तो कसा वर्णावा बरे (१६७८) कामधेनुच एक तेथें, (दृष्टी देऊन असें म्हणणें केले कीं) काय तान्ही गाय व पारठी– (पाडशी म्हणजे) दूध कमी झालेली अशी म्हणावी अशा कसच्या गोष्टी त्या ? (१६७९) दिवा तो दिवाच एक प्रकाश देणारा तेथे त्या दिव्याच्या अगोदरचा व पाठीमागचा (अगोदरचा दिवा व त्यावर लाविलेला तो नंतरचा दिवा) तो कसचा ! का सूर्याला धाकटे व वडिल असें कसचे तें ! अहो अमृत सिंधूच ! एक तेथें खोल अथवा उथळ असें बोलणें काय कामाचे ? (१६८०) त्याप्रमाणें गीतेचे श्लोक हे पहिले का शेवटले असें

---

[फूटनोट पान ३६५वरून चालू

दारवंटा । जाणो जाता जाणिव घाली आडफांटा । योगाभ्यासें सिद्धी रोधिताती वाटा वो ॥ ३ ॥ यज्ञ यागे स्वर्ग भोग आड येती । करितां तपें काम क्रोध खवळती । नित्यानित्य ज्ञानें अभिमान वाढती । करितां तिर्थाटनें अहंकाराची प्राप्ती वो ॥ ४ ॥ जपता मंत्र बीजे चळण्वि घाली घाला । करिता दान धर्म पुढें भोगविती फळा । सांवळे मिरविता विधिनिषेध आगळा । आता हेचि बरवे धणी पाहो याला वो ॥ ५ ॥ ऐसे शोधियले मार्ग नानापरी । न येती प्रतीती मग सांडियले दुरी । आतां गाऊनि गीती नाचों हा मुरारी । **निळा म्हणें करूं संसारा बाहेरी वो** ॥ ६ ॥

सैंघें दाटली अक्षरें । माप नव्हें पुरे । केलि माझिया दातारें । अतिवृष्टी कृपेची ॥ १ ॥ लिहिता न पुरे दिवसराती । वाढविला विस्तार तो मती । जैसे क्षीराब्धीवरी येती । तरंग मिरवीती असंख्य ॥२॥ नाना प्रमेय नाना कथा । नाना पदांचिया चळथा । निघती त्या पंढरिनाथा । आवडती प्रियवादे ॥ ३ ॥ संत चरित्रे हरिचे गुण । केले पवाडे ते विंदान । नाना पतितांचे उद्धरण । केलें संरक्षण दासांचे ॥ ४ ॥ ऐशिया स्तवनीं लाविली वाचा । बहीवार हरीचिया नामाचा । केला प्रतिपाळ तो दासाचा । वारंवार आठविलो ॥ ५ ॥ नाना नामे नाना चरित्रें । कल्याणरूपें अती पवित्रे । श्रवणें पठणें गातां वक्त्रें । हरिच्या पदांतें पावविती ॥ ६ ॥ आइती जोडूनियां ठेविलीं । होतीं ठायीचि गुंफली । निळा म्हणे तेचि वोपिली । माझिये वदनीं वरदाने ॥ ७ ॥

कसचे म्हणणें तें ! पारिजाताच्या परिमळामध्यें जुना परिमळ का नवा परिमळ असा भेद (असतो काय ?) तो कायसा तरी. (१६८१) श्लोकामध्यें योग्यतेसंबंधी अंतर नाहीं; श्लोक श्लोकासारखाच असें म्हणणें येथें कसचें तें ! अहो येथें (वाचले जाणारे जे व वाचणारा जो) वाच्य व वाचकपण ही कांही भागाचे आहे असें नाहीं. त्या वाच्य वाचकामध्यें कांहीं भेद नाहीं. (१६८२) पाठमहात्म्य–जे ह्या शास्त्रीं एक श्रीकृष्णच कीं दोन्हीं वाच्य व वाचक प्रसिद्धतेनें ऐक्य आहे असें भलतेही लोक जाणतात की. (१६८३) जे अर्थ जाणल्यानें लाभाचें होते, जोडते, (एवढें निधड्या छातीच्या पराक्रमाचें तें.) तेच पाठानें लाभते. वाच्य व वाचक दोन्हीं एकच कीं असें हे शास्त्र साधीत उपासीत, सिद्ध करीत आहे. (१६८४) म्हणून प्रतिपादनास येथें कांहीहीं विषय नाहीं जे कां ! (वाच्य व वाचकासंबंधी कांहीं बोलावें असें.) अहो गीता ही श्रीप्रभूची वाणीरूप वाङ्मय मूर्तीच कीं जाणा अहो ! (१६८५) शास्त्र (वाच्ये) अर्थे अर्थानें फळते–फळ देऊन मग आपण मावळते अदृश्य होते तसे हें नव्हें अहो हें तर सगळें एक परब्रह्मच कीं ! ब्रह्म तेजच की पर म्हणजे केवळ असें (१६८६) त्याप्रमाणें जगाच्या कृपेसाठीं जगावर कृपा व्हावी म्हणून विश्वावर कृपाकरून महान् आनंद अगदी सहज सोपा असा करून अर्जुनाच्या निमित्तानें देवांनीं प्रत्यक्षतेस आणिला रूपाचा केला आहे. (१६८७) चकोराच्या निमित्तानें तिन्ही भुवनें दुःख चिंता इत्यादींनीं पीडिल्यामुळें संतप्त झालेली ती कलावंत जो चंद्र त्यानें निववली. (१६८८) गौतमाच्या मिसानें कळिकाळरूपी ज्वराच्या दोषानें पीडीत झाल्यामुळें गीरीश शंकर त्यांनीं गंगेचा प्रवाहच कीं एक पृथ्वीवर उतरणारा केला. (१६८९) तसें गीतेचें हें दुभतें पार्थास वत्स करून श्रीकृष्णरूपी गाय ती जगापुरतें असें दुभिली (१६९०) येथें जीवेंकरून नाहाला का न्याहळाल तर हेंच कीं होऊन याल, किंवा पाठाच्या निमित्तानें त्रिमाळि, त्रिमाळिका, धवळारे, जिव्हेस जर श्रम द्याल, जीभ जरी, पूर्णपणें, ह्यांत भिजवाल तरी हेंच होऊन याल. (१६९१) परिसानें आपल्या एका अंगानें लोहास झगटलें तर दुसरीकडे ते लोह तरीपण आपोआपच कीं सुवर्ण होऊन जातें. (१६९२) तशी पाठाची ती वाटी लावाल (तरी जोपर्यंत) श्लोक पाद ओठास लावल्या, लावल्याच कीं अंगी ब्रह्मपणाची ती पुष्टी येईल ["गीताशास्त्र वेद माता च मंत्रो । विप्र पूज्येस्तव चरित्रेऽभिलाषः । कृष्णे भक्तिः सर्वभुतानुकम्पा । सद्‌भिःसंगो यस्य तस्याकृतं किम् ॥" या श्लोकात गीतेचे महत्व प्रामुख्यानें वर्णिले आहे.] (१६९३) पण येथें मुख वांकडे म्हणजे दासपणाचे करून जर का (कानवडे कानाडोळा कां) दुर्लक्ष कराल तर, जेव्हां कां ते ऐकण्याचें लक्षाचें कराल तेव्हां तरी तोंच प्रकार होईलः मुख्य एका अंगावर करून कान पुढें कराल तरीसुद्धां जेव्हां का हें श्रवणानें होईल (कराल) तेव्हांही तोच प्रकार होईल. (१६९४) हें श्रवणानें, पाठानें, अर्थानें, (दुसरें तिसरें कांहींही नच करतां) मोक्षच एक गीते जवळचा करील. जसा का दाता समर्थ असा, तो कोणासही नास्ति म्हणजें नाहीं असें केव्हांही म्हणणार नाहीं. (१६९५) म्हणून जाणत्या समवेत, जाणतेपणासहित, गीताच एक सेवा, भजा, ओठी लावा, अहो ! इतर दुसरी अनेक शास्त्रें ती काय करायची आहेत (१६९६) श्रीकृष्णार्जुनांनी स्पष्ट अशा संभाषण रूपानें, जी गोष्ट चिदाकाशात बोलिली ती तर श्रीव्यासांनी सहज हातांतलीच आवळाच अशी स्पष्ट घेवो ये, पढो येईल अशीच करून ठेवली, आहे. (१६९७) मायेनें, आईनें, अतिममतेचा पान्हा दाटून आल्यानें, जेव्हां का ती जेवूं बसूं करते, तेव्हां तर बाळाच्या त्याच्या सोयीस येतील असेंच घांस ती करते. (१६९८) अफाट अशा वाऱ्याला शहाण्यांनीं तर आधीनपणाचा वश्यतेचा केला, जे कां एक पंखा निर्माण करून कीं, (१६९९) तसें शब्दानें जें लाभत नाहीं तें अनुष्टुभ छंदानें घडणेचें करून स्त्री शुद्र इत्यादिकांच्या अंतःकरणांत मनांत (सामाविलें) समान अधिकाराचें केलें, एकें जागीं स्थितीचें केलें, समान धर्माचें केलें. (१७००) स्वाती नक्षत्राच्या पावसानें जर मोती नच घडतील तर सुंदराच्या आंगी ते शोभतील तरी कसें ? (अहो कालव प्राणी हा तर सगळाच आपला जीव तेथें लावून सुंदर असें एक मोतींच तो बनतो कां बनला म्हणून जेथें जीव लावून पढणें सिकणें संवरणें, केलें तर समान अधिकाराचे तें सुंदर

असें देखणें कां मनोरम स्थळ, तुम्हींच कीं, होऊन याल नां! व तसें झाला म्हणजें देखणेंपणानें अंगी शोभाल, मनोरम असेंच तुम्हीं व्हाल कीं.) (१७०१) अहो वाद्य आहे पण तेथें जर नाद नाहीं तर तें वाद्य इंद्रिय ज्ञानाच्या आटोक्यांत दृश्य होणारें असें सुलभ होत नाहीं. पुष्प नव्हता सुवास घेणें तें कसचें! फुलें उत्पन्न झालीं नसतीं तर सुगंध घेतां आला असता काय? (१७०२) पक्वानें गोड झालीं नसतीं तर जिमेला का गोड लागती? पक्वान्नाच्याठायीं गोडी नसती तर ती रसनेस मिळूं ठाकली असती काय? अहो आरसा नाहीं तर डोळ्यास डोळा दिसणारा तो कसचा? (१७०३) तसें पाहाणारे साक्षी ते श्रीगुरुमूर्ती ते जर साकारतेनें [साकार=आकार=आकृति, स्वरूप, चेहरा, चेहऱ्यावरील विकार, मुद्रा, सौंदर्य, अभिप्राय, प्रकार, सूचना, खूण (सा०) ऐक्य, ऐक्यज्ञान. (आकार असलेला, आकृति, चिन्ह, तोंडाचें भाव असलेले)] दृश्य झाले नसतें तर ते ह्या उपास्तींनां उपासनेला, कसें आकळणारे झाले असते? (१७०४) तसें असंख्यात अशी जी वस्तू तिला जर संख्येनें शतें-सांत अशीं संख्यतेची केली नसती तर मग ती येथें कोणास बरें मिळूं शकली असती. (१७०५)

अशा शते सात श्लोकांना-एक एकास तर आगळेपणच कीं, पाहात आहे. आतां येथें कोण तो वेगळिकपणाचा (उकळी) प्रवाह, वर्णावा कीं! येथें तर सर्व आगळेपणच एक त्या श्लोकाना येऊन आहे. (१६७८)

अहो ह्या कामधेनुसच कीं तान्ही का पारठी दूध कमी झालेली दृष्टी ठेवून जशा गोष्टी बोलाव्यांत तसें एक एकास (श्लोकास) वेगळिकपणानें पाहू करूं नये. (१६७९)

दिव्याच्या दीपाच्या अगोदर व पाठीमागून लाविलेल्या नंतर लाविलेला दिवा अगोदरचा का नंतरचा आधि लाविलेला दिवा व पाठीमागून लाविलेला तो कां सूर्यास तो वडिल का धाकटा (कालचा का आजचा का उद्याचा) असें म्हणणें तें तसेंच अमृत सिंधूच एक सर्व तेथें कसचें अति खोल का उथळ असें म्हणणें म्हणावें तें पुरतें होणारें ते नव्हें. (१६८०)

त्याप्रमाणें हा पहिला का शेवटचा असें यश कीर्तीरूप श्लोकांना गीतेच्या ह्या नुसतें साधे पद्य म्हणूं नयें. अहो पुष्पांचा सुगंध तो सारखाच कीं स्वर्गीय वृक्ष जो पारिजातक, तेथें नविन का पुराणा असें म्हणणें कसचें. त्या वृक्षाच्या पुष्प सुगंधासंबंधी ते, स्वर्गीय वृक्षांच्या पुष्पांचा सुगंध तो एकच पारजाते ती काय नवी का जुनी असें म्हणणें होते? (पारिजात-पारिजातकः=प्राजक्त पागारा, कडुनिंब.) (१६८१)

वर ह्या श्लोकांमा सीमा कां पाड नाहीं असें ते समर्थ हितकर, उपयुक्त का बलवान् म्हणावे तरी काय! अहो येथें अर्थ आणि शब्द पण उरत नाहीं. भाग दैव अंश कांहीं ते धरून ठेवीत नाहीं. (१६८२)

**पाठ माहात्म्य—**

अहो जें कांहीं एक सिद्ध असें ह्या शास्त्रामधीलचे तें म्हणजे एक श्रीकृष्णच कीं, अर्थ व शब्द होय; असें हे प्रसिद्ध असून लोक तो भलताही तरी नां हे जाणून आहे कीं! (१६८३)

येथें अर्थानें जें तेंच पाठानें जोडतें लाभतें, (मिळतें, साधतें, पराक्रमानें मिळण्याजोगें असें तें नाहीं.) अर्थ व शब्द एकवटल्यानेंच साधित (संपादिलेलें, कर्ज फेडलेलें,) झालें आहे. असें शास्त्र तें (होय) असतें कीं, कां शास्त्रें ती असतात— (१६८४)

या करितां मला आतां प्रतिपादनास कांहींहीं विषय नाहीं.! अहो गीता ही प्रभूची वाङ्मयी मूर्ति जाणा. (१६८५)

शास्त्र (वाच्ये) अर्थे-अर्थानें फळते-फळ देऊन मग आपण अदृश्य होतें, तसें हे ब्रह्मच ते तेजच कीं! पर म्हणजें केवळ असें.! (१६८६)

तसा विश्वाचिया कृपा, विश्वावर कृपा करून महानंद हा तर अगदीं सोपा असा, अर्जुनाच्या निमित्तानें, देवांनीं रूपास म्हणजें प्रत्यक्षतेस आणिला आहे. (अर्जुन रूपाने की.) (१६८७)

तिन्ही भुवनें संतप्त अशी ती, ती तर ह्या कलावंत अशा चंद्रानें चकोराच्या निमित्तानें निववि‍ली कीं ! (१६८८)

अथवा गौतमाच्या मिषानें (निमित्ताने गौतमी कृपी, द्रोण पत्नि. गौतम=शतानंद पिता अहिल्या पति, न्यायशास्त्र प्रवर्तक, ऋषि विशेष, अंगिरस वंशीय ऋषि विशेष.) कळिकाळरूपी दोष ज्वरानें पीडिता लोकाकरितां गीरीश जो भगवान शंकर त्यांनीं तर हा गंगेच्या पाण्याचा प्रवाहच की, गीता रूपानें पृथ्वीवर आणिला आहे. (१६८९)

तसें हे गीतेचें दुभतें पार्थास वत्स करून श्रीकृष्ण ती जगास पुरेल असें तें ज्ञानरूपी दुग्ध दुभिनली आहे. (१६९०)

येथें जीवें प्राणें करून जर इजला नेण्याचें कराल, आपलेसें कराल, शिरी वाहाल, जर ह्या ज्ञानगंगेमध्यें नाहाल, तर हें ज्ञानच एक कीं व्हाल अथवा जर पाठाच्या निमित्तानें जीभ, जिव्हा, वाणी, जी तिजला श्रम द्याल–(मळाल) तर मग— (१६९१)

चित्त (स्वभाव) रूपी लोखंड जसें एका अंशानें परिसाशी झगटलें तर तें (पाठाचें निमित्त न करणारामध्येंच कीं) दुसरीकडेच दुसऱ्या बाजूला कीं आपोआपच सुवर्ण असें होईल. (१६९२)

तशी ती पाठाची वाटी (तीच श्लोकपाद मूळ चरण किरण रूपी) ती ओठास लावली नच लाविली तोंच ब्रह्मपणाची कां ब्रह्मतेची ती पुष्टी आंगास येईल [ येथें **गीतेचे तें महत्त्व** कसें आहे ते सांगतात– गीताशास्त्र वेदमाताच “**मंत्रे विप्रः पूज्यस्तच्चरित्रेऽभिलाषः । कृष्णे भक्ति सर्वभूतानुकम्पा सद्भिः संयोगस्य तस्याकृतं किम्‌ ?** ] अकृतम्‌ म्हणजे योग्य रीतीनें न केलेलें असें कांहींच उरणार नाहीं, तयार न केलेलें अन्न असें कांहीं उरणार नाहीं. (पाद=मूळ चरण. किरण.) (१६९३)

किंवा त्यावर मुख तें वांकडें करून (जर का मुख बाजूस होऊन कान पुढें येईल तर) एका अंगावर का कानवडे झाल्यानें कानींही जरी तें घेतलें तरी तोच प्रकार होईल. (अक्षर रचना का चिन्ह प्रकार तो तोंच कीं.) (१६९४)

जें हें गीता श्रवणानें, पाठानें, अर्थानें मोक्षाशिवाय दुसरें कांहीं देणारी नव्हे जसा कां समर्थ असा तो कुणालाही 'नाहीं' असें म्हणत नाहीं. (१६९५)

म्हणून जे ही गीता जाणत्या समवेत (जाणतात त्यांना ही एक) गीताच कीं सेवा करण्याची अशीं अहो ! दुसऱ्या सर्व शास्त्राचें घेणें मग तें कशासही नकोच असें होय ! (१६९६)

अहो हीच कीं ती श्रीकृष्णार्जुनानी स्पष्ट संभाषणरूपी गोष्टी जी बोलिली जी कां निराळाचें ठायीं का आकाशामध्यें का सूक्ष्मामध्यें ती तर श्रीव्यासांनीं (करतला मलकवत्‌) करतळीं घेतां येईल अशीं स्पष्ट केली आहे. (१६९७)

बाळकास कृपेनेंच की पान्हा दाटून आल्यानें का अति नम्रतेनें जेव्हां माय ती जेऊ घालण्याचे करतें तेव्हां (त्यास पोहोचतील) त्याच्या सोयीस येतील असेंच ती घांस करते. (१६९८)

अथवा अफाट अशा वाऱ्याचे (समीरणाचे) आधीनपणा साधले तें शहाणपणानें असेंच कीं एक (विंझणा) पंखा निर्माण करून कीं ! (१६९९)

तसें शब्दानें वाचकत्वें करून जे लाभत नाहीं, तें अनुष्टुभादि छंदानें घडून स्त्री शूद्रादिकांच्या (प्रतिमे) अंतकरणात उतरविलें आहे, सामाविलें आहे ! (१७००)

आरम्याचा पाहुणचार तो सुंदरा अंगी कसा शोभणारा होईल? जर कां स्वाती नक्षत्राच्या पाण्यानें मोती नच होतील बनतील तर! (१७०१)

नाद तो वाद्यास नच येता तरी मग तो कसा गोचर, होणारा! वाद्यास नाद आल्यानेंच की तो गोचर इंद्रियानां आकळणारा असा स्पष्ट होतो! पुष्पच जर (आले झाले) नाहीं तर सुगंध तो कसा घेतां येईल? पुष्पेंच जर उत्पन्न झाली नाहींत तर आनंदरूपी पुण्य सुगंध कसा घेता येईल? (१७०२)

(गौल्य) पक्वान्नें गोडपणाची ती जर नच होतील तरी कां बरें ती जिव्हेस आवडली (फावली) व्हावीत! अहो! दर्पणाशिवाय डोळ्यानें डोळा दिसतो काय? कसा दिसेल बरें!!! पक्वानें गोड झाली नसतीं तर जिभेला त्याची गोडी लागली असती कां? (१७०३)

त्याप्रमाणें साक्षी श्रीगुमूर्ति जर साकार असें दृश्य झाले नसते तर ह्या उपास्ती उपासना कशा बरें!! आकळल्या (होणाऱ्या त्या) झाल्या असत्या! (१७०४)

त्याप्रमाणें वस्तूं जी अगणित अशी असंख्यात तिजला मुळीं ही शते-सात-संख्या नच होती तरी मग येथें कसे ते बरें वस्तूंस आकळणे होणेचे झाले असते मिळूं शकले असते. (१७०५)

**मेघ सिंधूचे पाणी वाहे। तरी जग (तयातेचि) तेयातेचि पाहे।**
**का जे उपमे ते (उमप) नोहे। ठाकते कोण्हा ॥ १७०६ ॥**
**आणि वाचा जे न पवे। ते हे श्लोक न होते बरवे।**
**तरी काने मुखें फांवे। ऐसे कां होते? ॥ १७०७ ॥**
**म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरू। विश्रांति जाला उपकारू।**
**जो श्रीकृष्ण उक्ति आकारू। ग्रंथाचा केला ॥ १७०८ ॥**
**आंणि तोचि हा मी आतां। श्रीव्यासांची पदे पाहाता पाहाता।**
**आणिला श्रवण पथा। मऱ्हाठिया ॥ १७०९ ॥**

तेयातेचि-तयातेचि, रायातेचि. कां जे उपमे ते-उमप ते. नोहे ठाकते कोण्हा=जे अमर्याद आहे ते प्राप्त होणारे नव्हे. (१७०६) न होते-होते न. (१७०७) विश्रांती-विश्वासी. जो-जे. पाहाता पाहाता -पाहाता. पंथ-पथ. (१७०९)

**मेघ सिंधूचें पाणी वाहातो जग तर त्या मेघालाच कीं पाहातें कारण जे (उमप-ज्याचे माप केलें जात नाहीं) अमर्यादतेचें समुद्रासारखें तें तर कोणालाहि आकळता येत नाहीं.** (१७०६) तसेंच जें वाचेला पावत नाही. तें जर कां ह्या श्लोकाचें झालें नसतें कां जें वाचेला अगम्य तेंच वर्णन करणारे हे सुंदर श्लोक झाले नसते तर मग कानाला व मुखाला सहज सुखानेंच ते कशानें प्राप्त होणारे झाले असतें कां! मिळूं शकणारे होते. (१७०७) म्हणून श्रीव्यासांचा हा तर सर्व विश्वावर मोठाच की, उपकारच होऊन आहे, जे कां श्रीकृष्ण उक्ति, (श्रीकृष्णांनीं सांगितलेली जी उक्ति म्हणजे संभाषण) तिला ग्रंथ रूपानें साकार बनविलें (१७०८) तोंच आकार की मी हा आतां श्रीव्यासांची पदें पाहातां पाहातां मऱ्हाटिच्या श्रवणपथ-अभ्यास, कीर्ति, वेद, श्रवण भक्तीच्या-टप्प्यामध्यें (कानी) आणिला (मऱ्हाटिच्या पाझरण्यास आणिली-मऱ्हाटीने पाझरणें केले व्हावे जसें कां.) (१७०९)

ओव्या १६३२-१७०९

मेघ तो सिंधूचें पाणी वाहातो आहे तरी जग तर मेघालाच कीं पाहाते अथवा जे अमर्याद समुद्रासारखें का समुद्रच एक ते, ते (वस्तु, ब्रह्म) मग कोणालाच आकळिता येत नाहीं असेंच म्हणावे लागेल कीं. (१७०६)

तसें (वाचा) वाणीस जे पावत नाहीं तेथें हे श्लोक मग बरवे उत्तम असें नच झाले असते. करितां कानें ऐकून तें मुखास फांवतें, उत्तमतेचें करतें, उत्तमतेचें होतें असें झालें असतें काय? जें वाचेला अगोदर अगम्य देदीप्यमान, वस्तु, ब्रह्म, सत्तात्मक, तेंच वर्णन करणारे हें सुंदर श्लोक जर झाले नसते तर कानांना व मुखाला सुंदरता कशानें प्राप्त होणारी तीं? (१७०७)

श्रीव्यासांचा ह्या विश्वावर थोर असा (उपयुक्त–मदत) उपकार झाला आहे. जे कां त्यानी भगवान श्रीकृष्णाची उक्ति आकारास आणून ग्रथित करून त्यास ग्रंथाचा एक आकार कीं दिला. (श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलेली जी वचनें–उक्ति (भाषण–वाक्य–संभाषण) तिला ग्रंथरूपानें साकार बनविले) (१७०८)

व तोच आकार की मी हा आतां ती श्रीव्यासांची पदे पाहातां पाहातां कीं मऱ्हाटीच्या श्रवण ऐकणें अभ्यास कीर्ती पथास येईल असा महतीस आणिला आहे, उत्पन्न केला आहे, घडला आहे, उत्कर्षास आणला आहे. (१७०९)

व्यासादिकांचे उन्मेख राहाटती जेथ साशंक।
तेथ मीही रंक एक। वाचाळी करी॥ १७१०॥
परि गीता ईश्वरू भोळा। ले व्यासोक्ति कुसुममाळा।
तरी माझिया दुर्वादळा। ना न म्हणें की॥ १७११॥
आणि क्षीर सिंधूचिया तटा। पाणिया येती गजघंटा।
तेथ काई मुग्कुटा। वारिजत असें?॥ १७१२॥
पांख फुटे पांखिरू। नुडे तरी नभीच स्थिरू।
गगन आक्रमी सत्वरू। तो गरूडही तेथ॥ १७१३॥
राजहंसाचें चालणे। भूतळी जालिया शाहाणे।
आणिकें काइ कोणे। चालावेचि नां?॥ १७१४॥
जी आपुलेनि अवकाशे। अगाधजळ घेपे कळशे।
चुळी चूळपण ऐसे। भरूनि न निगे?॥ १७१५॥
जी दिवियेच्या आंगी थोरी। तरी ते बहु तेज धरी।
वाती आपुलीयाचि परी। आणीचि की नां?॥ १७१६॥
जी समुद्राचेनि पैसे। समुद्री आकाश आभासे।
थिलुरी थिलुरा ऐसे। बिंबेचि पै॥ १७१७॥
तेवि व्यासादि महामति। बावरो येती इये ग्रंथी।
मा आम्ही ठाकों हे युक्ति। न मिळे किर॥ १७१८॥
जये सागरी जलचरे। संचरती मंदराकारें।
तेथ देखौनि शफरे येरे। पोहो न लाहाती?॥ १७१९॥
अरूण आंगा जवळिके। म्हणौ सूर्याते देखे।
मा भूतळीची न देखे। मुंगी काई?॥ १७२०॥
यालागी आम्हां प्राकृता। देशिकारे बंधें गीता।
म्हणणे हे अनुचिता। कारण नोहे॥ १७२१॥
आणि बाप पुढा जाये। ते घेता पाउलाची सोये।
बाळ ये तरी न लाहे। पावो काई?॥ १७२२॥

तैसा व्यासाचा मागोवा घेतु। भाष्यकाराते वाट पुसतु।
अयोग्य ही मी न पवतु। के जाईन ॥ १७२३ ॥
आणि पृथ्वी जया क्षमा। न भंगे स्थावरजंगमा।
जयाचेनि अमृते चंद्रमा। वी निववी जग ॥ १७२४ ॥
जयाचे आंगिक असिके। तेज लाहोनि अर्के।
आंधाराचे सवाईके। लोटिजत आहे ॥ १७२५ ॥
समुद्रा जयाचे तोय। तोया जयाचे माधूर्य।
माधूर्या सौंदर्य। जयाचेनि ॥ १७२६ ॥
पवना जयाचें बळ। आकाशीं (श) जेणे पघळ।
ज्ञान जेणे उजाळ। चक्रवर्ती ॥ १७२७ ॥
वेद जेथें सुनास। सुख जेणे सोल्लास।
हे असो रूपस। विश्व जेणे ॥ १७२८ ॥
जो सर्वोपकारी समर्थु। सद्‌गुरू श्रीनिवृत्तिनाथु।
राहाटतु असे मजही आंतु। रिघौनिया ॥ १७२९ ॥
आता आईती गीता जगी। मी सांगेन मऱ्हाठिया भंगी (भागी)।
येथ के विस्मयालागी। ठावो आहे? ॥ १७३० ॥
श्रीगुरूचेनि नांवे माती। डोंगरी जयापासी होती।
तेणे कोळिये त्रिजगती। येकवट केली ॥ १७३१ ॥
चंदणे वेधली झाडे। जाली चंदनाचेनि पाडे।
वसिष्टे मानिली की भांडे। भानूसि शाटी ॥ १७३२ ॥
मा मी तंव चित्ताथिला। आणि श्रीगुरू ऐसा दादुला।
जो दिठिवेनि आपुलां। बैसवी पदी ॥ १७३३ ॥
आधीचि देखणी दिठी। वरी सूर्य पुरवी पाठी।
ते न दिसे ऐसी गोठी। केहि आहे ॥ १७३४ ॥
म्हणौनि नित्यनवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे।
श्रीगुरूकृपा काई येक नोहे। ज्ञानदेवो म्हणें ॥ १७३५ ॥
या कारणे मिया। श्रीगीतार्थ मऱ्हाटिया।
केला लोका यया। दिठीचा विषो ॥ १७३६ ॥
परि मऱ्हाटे (मऱ्हाठी) बोल रंगे। कवळिता पै गीतांगे।
पै गातयाचेनि पांगे। एकाढयता नोहे (हेकाडता नव्हे) ॥ १७३७ ॥
म्हणौनि गीता (गा) गावो म्हणे। तँ गाणिवे होती (होय) लेणे।
ना मोकळे तरी उणे। गीता ही आणीत (आणीती) ॥ १७३८ ॥
सुंदरा अंगी लेणे न सूये। तँ तो मोकळा श्रृंगार होये।
ना लेईले तरी आहे। तैसे के उचित? ॥ १७३९ ॥
कां मोतियाची जैशी जाती। सोनयाही मान देती।
नातरी मानविती। आंगेचि सडी ॥ १७४० ॥
नाना गुंफिली (गुंथिली) का मोकळी। उणी न होती परिमळी।
वसंतागमीची वाटोळी। मोगरी जैसी ॥ १७४१ ॥

तैसी गाणिवेते मिरवी । गीतेविण ही रंगु दावी ।
तो लोभाचा प्रबंधु ओवी । केला मिया ॥ १७४२ ॥
तेणे आबाळ सुबोधे । वोवियाचेनि प्रबंधे ।
ब्रह्मरस सुस्वादे । आक्षरे गुंथिली ॥ १७४३ ॥
आतां चंदनाचां तरूवरी । परिमळालागी फुलवरी ।
पारूखणे जियापरी । लागेना की ॥ १७४४ ॥
तैसा प्रबंधु हा श्रवणी । लागत खेंवो समाधी आणी ।
ऐकिलियाही व्याख्यानी । काई व्यसन (लावी) न लवी ? ॥ १७४५ ॥
पाठ करिता (पाकु करिती) व्याजे । पांडित्या येती वेषजे ।
तै अमृताते नेणिजे । फांवलिया ॥ १७४६ ॥
तैसेनि आइतेपणे । कवित्व जाले ते उपेणे ।
मनन निदिध्यास श्रवणे । जिंतिले आतां ॥ १७४७ ॥
हे स्वानंदभोगाची सेल । भलतियासीच देईल ।
सर्वेंद्रिया पोषवील । श्रवणाकरवी ॥ १७४८ ॥
चंद्राते आंगवणे । भोगुनि चकोर शहाणे ।
परि फांवे तैसे चांदिणे । भलतयाही ॥ १७४९ ॥
तैसे अध्यात्मशास्त्री इये । अंतरंगचि अधिकारिये ।
परि लोक वाक्चातूर्ये । होईल सुखिया ॥ १७५० ॥
ऐसे श्रीनिवृत्तिनाथाचे । गौरव आहे जी सांचे ।
ग्रंथ नोहे हे कृपेचे । वैभवतिये ॥ १७५१ ॥
क्षीरसिंधूचे परिसरि । शक्तीचां कर्णकुहरी ।
नेणो के श्रीत्रिपुरारी । सांगितले जे ॥ १७५२ ॥
ते क्षीरकल्लोळा आंतु । मकरोदरी गुप्तु ।
होता तेयाचा हातु । पैठे जाले ॥ १७५३ ॥
तो मत्स्येंद्र सप्तश्रृंगी । भग्नावयव चौरंगी ।
भेटला की तो सर्वांगी । संपूर्ण जाला ॥ १७५४ ॥
मग समाधि अव्यया । भोगावी वासना यया ।
ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनी ॥ १७५५ ॥
तेणे योगाब्जिनी सरोवरू । विषय विध्वंसैकवीरू ।
तिये पदी का सर्वेश्वरू । अभिषेकिले ॥ १७५६ ॥
मग तिही हे शांभव । अद्वयानंद वैभव ।
संपादिले सप्रभव । श्रीगैणी (गैनी गयनी गहिनी) नाथा ॥ १७५७ ॥
तेणे कळिकळित (कळिकाळ) भूता । श्रीवन आला देखोनि निरूता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी (मीनी) ॥ १७५८ ॥
ना आदिगुरू शंकर— । लागौनि शिष्य परंपरा ।
बोधाचा हा संसारा । जाला जो आमुते ॥ १७५९ ॥
तो हातु घेऊनि आघवा । कळी गिळिवेया जीवा ।
सर्व प्रकरी धांवा । करी पां वेगी ॥ १७६० ॥

आधीचि तंव तो कृपाळु। वरी गुरूआज्ञेचा बोलु।
जाला ऐसा वर्षाकाळु। खवळणे मेघा ॥ १७६१ ॥
मग आर्ताचेनि वोरसे। गीतार्थग्रथनमिसे।
वर्षला शांत रसे। तो हा ग्रंथु ॥ १७६२ ॥
तेथ पुढा मी चापिया। मांडिला आर्ति आपुलिया।
का यासाठी येवढिया। आणिलो जया ॥ १७६३ ॥
एवं गुरूक्रमे लाधले। समाधिधन जे आपुले।
ते ग्रंथे बांधोनि दिधले। गोसावी मज ॥ १७६४ ॥
वाचनी (वांचूनि) पढे ना वाची। ना सेवा हो जाणे स्वामीची।
ऐसिया मज ग्रंथाची। योग्यता के असे ॥ १७६५ ॥
परि सांचचि श्रीगुरूनाथे। निमित्त करूनि माते।
प्रबंध व्याजे जगातें। रक्षिले जाणा ॥ १७६६ ॥
तरी पुरोहित गुणे। मी बोलिलो पुरे उणे।
ते तुम्ही माउलीपणे। उपसाहिजो जी ॥ १७६७ ॥
शब्द कैसा घडिजे। प्रमेयी कैसे पांचढिजे।
अलंकारू म्हणिजे। काई ते नेणे ॥ १७६८ ॥
सायिखेडियाचे बाहुले। चालविता सूत्राचेनि चाले।
तैसा मातें दावित तो बोले। स्वामी तो माझा ॥ १७६९ ॥
यालागी मी गुणदोष—। विषी क्षमाविना विशेष।
जे मी संजात ग्रंथलो देख। आचार्यें की ॥ १७७० ॥
आणि तुम्हां संताचिये सभे। जे उणियेसी ठाके उभे।
ते पूर्ण नोहे तै लोभे। तुम्हासीच कोपे ॥ १७७१ ॥
सिवंतलेयाही परिसे। लोहात्वाचिये अवदशे।
न मुकिजे आयसे। ते कवणा बोल ॥ १७७२ ॥
वोहळे हेचि करावे। जै गंगेचे आंग ठाकावे।
मगही गंगा नोहावे। तै तो काइ करी ? ॥ १७७३ ॥
म्हणौनि भाग्ययोगे बहुवे (पां हे)। तुम्हां संताचें मी पाये।
पातलो आता के लाहे। उणे जगी ? ॥ १७७४ ॥
अहो जी माझेनि स्वामी। मज संत जोडुनि तुम्ही।
दिधलेति तेणे सर्वकामी। परिपूर्ण जालो ॥ १७७५ ॥
पाहा पां माते तुम्हां सांगडे। मोहेरतेणे सुरवाडे।
ग्रंथाचे आळियाडे। सिद्धि नेले ॥ १७७६ ॥
जी कनकाचे निखळ। वोतूं येईल भूतळ।
चिंतारत्नी कुळाचळ। निर्मूं येती ॥ १७७७ ॥
साताही वो सागराते। सोपे भरिता अमृते।
दुवाड नोहे तारांते। चंद्र करिता ॥ १७७८ ॥
कल्पतरूचे आराम। लाविता नाही विषम।
परी गीतार्थाचे वर्म। निवडूं न ये ॥ १७७९ ॥

तो मी एक सर्व मुका। बोलौनि मऱ्हाठिया भाषा।
करी डोळेवरी लोका। घेवों ये ऐसे॥ १७८०॥
हा ग्रंथ सागरू येवढा। उतरोनि पैलीकडा।
कीर्ति विजयाचा धेंडा। नाचे जो का॥ १७८१॥
गीतार्थाचा आवारू। कलशेसी महामेरू।
रचूनि माजी श्रीगुरू। लिंग जे पूजी॥ १७८२॥
गीता निष्कपट माय। चुकौनि तान्हे हिंडे जे वाय।
तै मायपूता भेटि होय। हा धर्म तुमचा॥ १७८३॥
तुम्हां सज्जनांचे केले। आकळुनि जो मी बोले।
ज्ञान देव म्हणे थेकुले। तैसे नोहे॥ १७८४॥
काइ बहु बोलो सकळा। मेळविलो जन्मफळा।
ग्रंथ सिद्धीचा सोहळा। दाविला जो हा॥ १७८५॥
मिया जैशा जैशिया आशा। केला तुमचा भरंवसा।
ते पुरवुनि जी बहुवसा। आणिलो सुखा॥ १७८६॥
मजलागी ग्रंथाचा स्वामी। दुजी सृष्टी जे हे केली तुम्ही।
ते पाहोनि हांसो आम्ही। विश्वमित्रातेही॥ १७८७॥
जे असौनि त्रिशंकु दोषे (उद्देशे)। धातेयाही आणावे वोसे।
ते नासते कीजे की ऐसे। निर्माविे नाही॥ १७८८॥
शंभु उपमान्याचेनि मोहे। क्षीरसागरही केला आहे।
येथ तोही उपमेसरी नोहे। जे विषगर्भ की॥ १७८९॥
अंधकारू निशाचरा। गिळिता सूर्ये चराचरा।
धांवा केला तरी खरा। ताऊनि की तो॥ १७९०॥
तांतलेया जगा कारणे। चंद्रे वेंचिले चांदिणे।
तेया सदोषा केवि म्हणे। सारिखे हे ?॥ १७९१॥
म्हणौनि तुम्हीं मज संती। ग्रंथरूप जो हा त्रिजगती।
उपेगु केला तो पुढती। निरूपम जी॥ १७९२॥
किंबहुना तुमचे केले। धर्म कीर्तन हे सिद्धि नेले (गेले)।
येघ माझे जी उरले। पाईक पण॥ १७९३॥
आतां विश्वात्मके देवे। येणे वाग्यज्ञे तोषावे।
तोषोनि मज द्यावे। पसायदान हे॥ १७९४॥
जे खळाची व्यंकटी सांडो। तेया सत्कर्मी रती वाढो।
भूतां परस्पर पडो (जडो)। मैत्र जीवाचे॥ १७९५॥
दुरितांचे तिमिर जावो। विश्व स्वधर्म सूर्ये पाहो।
जो जे वांच्छील तो ते लाहो। प्राणिजात॥ १७९६॥
वर्षते सकळ मंगळी। ईश्वर निष्टांची मांदीयाळी।
आनवरत भूतळी। भेटतु भूतां॥ १७९७॥
चळा कल्पतरूचे आराव। चेतना चिंतामणीचे गांव।
बोलते जे अर्णव। पियूषाचे॥ १७९८॥

चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन।
ते सर्वाही सदा सज्जन। सोयरे होतु ॥ १७९९ ॥
किंबहुना सर्व सुखी। पूर्ण होऊनि तिही लोकी।
भजिजो आदिपुरूषी। अखंडित ॥ १८०० ॥
आणि ग्रंथोपजीविये। विशेषी लोकी इये।
दृष्टादृष्टीविजये। होआवे जी ॥ १८०१ ॥
येथ म्हणे श्रीविश्वेशुरावो। हे होईल दानपसावो।
येणे वरे श्रीज्ञानदेवो। सुखिया जाला ॥ १८०२ ॥
ऐसे युगी परी कळी। महाराष्ट्रभूमंडळी।
श्रीगोदावरीच्या कुळी। दक्षिण लिंगी ॥ १८०३ ॥
त्रिभुवनैक पवित्र। अनादि पंचकोशक्षेत्र।
जेथ जगाचे जीवन सूत्र। श्रीमहालया असे ॥ १८०४ ॥
तेथ यदुवंशुविलासु। जो सकळकळानिवासु।
न्यायाते पोषी सीतीशु। श्रीरामचंद्र ॥ १८०५ ॥
तेथ महेशान्वयसंभूते। श्रीनिवृत्तिनाथसुते।
केले श्रीज्ञानदेवे गीतेते। देशीकार लेणे ॥ १८०६ ॥
एवं भारताच्या गांवी। भीष्मनाम प्रसिद्धपर्वी।
श्रीकृष्णार्जुनी बरवी। गोठी जे केली ॥ १८०७ ॥
जे उपनिषदाचे सार। सर्व शास्त्राचे माहेर।
परमहंसी सरोवर। सेविले जे ॥ १८०८ ॥
तिये गीतेचा कलशु। संपूर्ण हा अष्टादशु।
म्हणे श्रीनिवृत्तिदासु। श्रीज्ञानदेव ॥ १८०९ ॥
पुढती पुढती पुढती। इया ग्रंथ पुण्य संपत्ति।
सर्व सुखी सर्व भूती। संपूर्ण होईजे ॥ १८१० ॥
शके बाराशें बारोत्तरी। तैं टीका केली श्रीज्ञानेश्वरे।
सच्चिदानंदबाबा आदरे। लेखकु जाला ॥ १८११ ॥

---

इति श्रीगीताभावार्थ दीपिकायां ज्ञानदेव विरचितायां मोक्षसंन्यासयोगोनाम अष्टादशोध्यायः।

भावार्थ दीपिकायां गीता टीका समाप्त—

— श्रीकृष्णार्पणमस्तु —

---

श्रीशके पंधराशे साहोत्तरी। तारणनाम संवत्सरी। एका जनार्दने अत्यादरी। गीता ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध। परि पाठांतरे शुद्ध अबद्ध। ते शोधूनिया एवंविध। प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका। जयाची गीतेची वाचिता टीका। गीताज्ञान होय लोका अतिभाविका। ग्रंथार्थिया ॥ ३ ॥ बहुकाळ पर्वणी गोमटी। भाद्रपद मास कपिलाषष्टि, प्रतिष्ठानी गोदातटी। लेखन कामाठी। संपूर्ण जाली ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरी पाठी। जो ओवी करील मऱ्हाटी। तेणे अमृताचे ताटी। जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥ भावार्थ दीपिकायां—

"ज्ञानेश्वरी × ज्ञानदेवी" प्रकरण पाहा—

शके सोळाशे तेरोत्तरे । तै पद पद्धति केली ज्ञानेश्वरे । गोविंद बरवा मुखांतरे । जगज्जीवन लेखक ॥
नमो ज्ञानदेवा । नमोज्ञान सिंधु । नमो ज्ञानदेवा । नमो पूर्ण बोधु ।
तुझा दास मी ज्ञानदेवा उदारा । कृपापूर्ण माते करी जी अपारा ॥ १ ॥

श्रीरुक्मिणी विठ्ठलायनमः । श्रीगुरुज्ञानदेवायनमः ।

ज्ञानदेव ! ज्ञानदेव ! ज्ञानदेव ! ज्ञानदेव ! ज्ञानदेव !

साशंक=भ्रांति उत्पन्न करणारे शंकिततेने (शंकिता व्रताः) जे कांहीं तेथें संदेहात्मक दुजेपणाचे असे निर्धारित शंक–शंस. शं=महादेव सुख. एक–येक. बचाळी–चावळी. उन्मेख=ज्ञानाचे उद्गार. (१७१०) जे–ले=धारण करून आहे (१७११) काई–काय. वारिजत असे–वारिजतसे गजघटा=हत्तीचे कळप. मुरकुटा=चिलटाला (१७१२) रिछरू–रिथरू. आक्रमी–क्रमी. तेथ–तेथें. (१७१३) शाहाणे–सिंहाणें. (शाहाणे=सुंदर) काइ–काय. चालावेचिना–चालवेचि नां ? (१७१४) दिवियेच्या–दिवटीच्या. आपुलियाची–आपुलिया आणिचि–आणीच. (१७१६) थिल्लरी–थिल्लिरी (१७१७) व्यासादि–व्यासादिक. येती–ये. हे–ये. (१७१८) जये–जिये. देखौनि–देखोनि, देखेः पोहो–पव्हो लाहाती–लाहती. (१७१९) जवळिके–जवळिक. म्हणो–म्हणौनि. (१७२०) देशिकारे=देशी भाषेत, म्हणजे मराठीत गीतेचा अर्थ आणण्यास. बंध म्हणजे प्रतिबंध आहे. असें म्हणणे ते युक्त आहे काय ? युक्त नाहीं. देशिकारे–देशिकार. नोहे–नव्हे. (१७२१) पाउलाची सोये=पाउलाचाभाग येत. बाळ–बाळक. लाहे–ल्हाये काई–कायी. (१७२२) भाष्यकाराते=श्रीमत् शंकराचार्यांना मार्ग विचारीत. अयोग्य ही मी न पवतु के जाईन ?=अयोग्य असा मी, असलो तरी व्यास जेथें गेले तेथें न पवता पोहचता–दुसऱ्या कोठें जाईन ? (१७२३) जया–जयाचिया. ( क्षमा=ज्याच्या क्षमाशीलपणानें ) नुभंगे–नुबगे=कंटाळत नाहीं. वी निववी=निववी. (१७२४) आगिक आसिके=आंगचे सर्व, पूर्ण. अर्के=सूर्यानें. सवाइके=सर्व ऐहिक, परिणाम, सर्व कारभार. लोटिजत आहे=दूर करितो. (१७२५) पघळ=व्यापक, ऐस पैस, अघळ पघळ. उजाळ–उज्वल. (१७२७) देव जेथें सुनास–वेद जेणे सुभाष सुभास=ज्ञान देणारा प्रकाश, सोल्लास–सोल्हास (१७२८) राहाटतु असे–राहाटत असे. रिघौनिया –रिघोनिया–रिगौनिया. (१७२९) आईती–आयती सागेन–सांगे. मऱ्हाठिया भंगी=मराठी भाषेच्या (भागानें) प्रकाराने रीतीने. (१७३०) कोळिये=एकलव्य कोळयानें द्रोणाचार्याची मातीची मूर्ति करून तिची गुरुबुद्धिनें सेवा केली. येकवट–एकवद (केली)=त्रैलोक्याकडून वाहवा मिळविली. (१७३१) वेधली= सुगंधित केली. जाळी–जाली. मानिली–मांडली. शाटी–काठी=छाटी ती वसिष्टानी मांडलेली ती आपल्या तेजानें सूर्याबरोबर भांडू लागली. (१७३२) चित्तायिला=सचेतन चित्त असलेला. दादुला=स्वामी. दीठीवेनि=कृपा कटाक्षानें (१७३३) केहि–केही. (१७३४) नित्य–निच. प्रबंध=काव्य, ग्रंथ. काइ एक नोहे–काय नोहे. (१७३५) गातयाचेनि पागे एकाव्यता (हेकाडता, येकाडता.) नोहे (नव्हे)=गाता गवई गाणारा नसला व नुसत्या ओव्या वाचल्या तरी पूर्ण लाभच होईल. येथें गात्याच्या आधीनपणानें ओव्या त्या एकदेशी होत नाहींत असा भाव. (१७३७) गाणिवे=गाणाऱ्याच्या भाषणाला. ही आणित–न आणिती. (१७३८) सुंदरा–सुंदर. लेइले–लेइला. (१७३९) मानविती–मानवती. रुढी=एवटी, साची. (१७४०) तैसी–तैसा. गाणिवेले–गाणिवेतेः गीतेवीण–गीतेविणः रंगु–रंगः लोभाचा–लाभाचा ओवी–वोवी. (१७४२) आबाळ सुबोधे–आबाल वृद्धास सुगम. वोवियेचेनि प्रबंधे–वोविचेनि बंधे. आक्षरे–अक्षरे (१७४३) फुलवरी–फुलवारी=फूल येईपर्यंत. पारूखणें–पारखणें–पाउखणे=वाट पाहाणे. जियापरी–जयापरी. (१७४४) व्याख्यानी–वाखाणी. श्रवणी लागत खेंवो=श्रवण करितां क्षणीच, ऐकल्या बरोबर, ऐकतां क्षणीच काइ–काय. (१७४५) वेधजे=स्पष्ट. फावलिया–पावलिया. पाठ भेद–पाकु करिती व्याजे । पाडीत येती वेसजे वेधजे=

तळमळ, चटका ते अमृताने नेणिजे पावलिया (१७४६) कवित्व-कवित्वा. ते-हे. उपेणे=विश्रांति स्थान. निदिध्यास-निजध्यास, निदिध्यासन=निदिध्यास=एकाग्रतेने अविश्रांत केलेला विचार( निज=आपला, स्वाभाविक ) जिंतिले-जिंकले (१७४७)

सेल=शेलका वाटा, उत्तम भाग. (१७४८) आंगवणे=आपल्या शक्तीने. तैसे-जैसे फांवे=प्राप्त होते. (१७४९) अंतरंगचि=मनांतले, आंतले, अंतरंग पुरूषच, अंतर्मुख तेच. (१९५०) ऐसे-तैसे. आहे-असें. नोहे-नव्हे. ग्रंथ-ग्रंथु वैभवतिये-वैभवतये, वैभव तिये. (१७५१) क्षीरसिंधूचे-क्षीरसिंधू. परिसरी=जवळ (परिसर=प्रदेश, नदी, पर्वता जवळची भूमी विस्तार.) शक्तीच्या कर्ण कुहरी=पार्वतीच्या कानांत. (कुहर=कंठ, गुहा, छिद्र, बिळ.) के-कै. श्रीत्रिपुरारी=श्रीशंकरानीं (१७५२) मकरोदरी=माशाच्या पोटांत (मकर=एकनिधी, मकरराशी, मगर, मकरकेतन, मकरकेतू-मकरध्वज=मदन, समुद्र. मकरन्द=पुष्पमधु, पुष्परस. मकरालय=समुद्र मंकुरः, मकरः=आरसा.) तेयाच्या-तयाचा. पैठे=प्राप्त. (१७५३) मत्स्येन्द्र-मछंद्र. भग्नावयव (पाय पाङ्गुळ, अक्षहीन, दृष्टी आली करचरणादिकाही.)=चौरंगी नाथाला मत्स्येंद्रनाथाचें दर्शन झाल्याबरोबर त्याचें ते भग्न झालेले आवयव-तुटलेले ते हातपाय -पूर्णावयव झाले [(चौरंगी मासा हातपाय तुटलेला जो.) (चतुर=चार. चतुर=गजशाला, गिरदी, कुशल, शहाणा. चतुरंग=बुद्धिबळाचा खेळ. हत्ती घोडे रथ व पायदळ यांनी युक्त. सैन्य चतुरानन=ब्रह्मदेव. चतुरस्त्र=प्रमाणबद्ध, चौकोनी, चतुर्गुण=चौपट.)] (१७५४) अव्यया-अव्यत्यया-अव्युत्थानया=निरूपाधिक, निर्विघ्न, उपाधिरहित (निरूपाधि=परिशुद्ध अकपट) यया-या. श्रीगोरक्षराया-मुद्रा=आपल्या संप्रदायाचें संपूर्ण ऐश्वर्य. (१७५५) विषय विध्वंसैक वीरू-विषयविध्वंसिक वीर=विषयाचा नाश करण्याविषयीं शूर. तिये-ते, अभिषेकिले-अभिषेकिला=स्नान घातले, अधिकार रोहणाचे वेळी केलेले सिंचन (१७५६) शांभव अद्वयानंद वैभव। सप्रभव संपादिले। श्रीगैणीना=त्यांनीं श्रीशंकरापासून मिळालेले ते अद्वयानंद सुख नुळापासून संपूर्ण गहिनीनाथाला (श्रीगयणीनाथांना-श्रीगहिनीनाथांना-श्रीगैणीनाथांना) दिले. (सप्रभव=उत्पत्ति स्थान, कारण, पराक्रमासहित.) (१७५७) श्रीगहिनी नाथांनीं (गौ=गाणे)-गैणी, गयनी, गहिनी (श्रावन) भूता कळि कळित आला निरूता देखोनि आज्ञा ते ऐसी श्रानिवृत्तीनाथा दिधली-सर्व प्राणिमात्रांना भूतांना, कळि तो ग्रासीत, कवळित आला; तेथें श्रीवन आला आहे, असं पाहून श्रानिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली कीं-(१७५८) हा बोधाचा संसारा=ज्ञानाचे ऐश्वर्य. (१७५९) हा तू-हा हातु (ज्ञानाचे ऐश्वर्य संसार) गिळितेया-गिळितया, कळि कळितया. धांवा करि=धावून येऊन रक्षण कर. वेगी=वेगे. (१७६०) ऐसा वर्षा वारिषये काळु-जैसा वर्षाकाळु, वरिषाकाळु (१७६१) ग्रंथन-ग्रंथ. कलि पीडिताच्या कळवळयानें गीतार्थाच्या मिषाने श्रीनिवृत्तिनाथांनीं जो शांतरसाचा वर्षाव केला तो हा ग्रंथ. (१७६२) बापिया-चातक. मांडिला-मांडला. का-की. जया-यशा, येशा. (१७६३) गुरुक्रम-गुरुपरंपरा. ग्रंथे बांधौनि=ग्रंथ बांधौनि. गोसावी=श्रीगुरू निवृत्तिनाथांनीं. (१७६४) वाचनि-वांचूनि. हो जाणे-ही नेणें. ऐशिया-असया. (१७६५) गुणे=नात्याने. पुरोहित=केवळ एक पुरोहित म्हणून. उपसाहिजो=क्षमावे. (१७६७) प्रमेयी-प्रमेइ कैसे चढिजे=तत्त्वास कसें झोंबावें? काइ-काय. (१७६८) सायिखेडियाचे-कळसूत्री बाहुल्यांचे चांलविता-चालविला. दावित-दावितु=अंतरी प्रकाशित. (१७६९) क्षमावीना=क्षमा करा कीं अहो. क्षमा करा असें म्हणत नाहीं. कारण माझे करणें ते गुणदोषाविषयीं सहन करून असावे, कारण मी विशेषत्वे समर्थ होणे नाहीं तेथें अहो जे मी संजात ग्रंथलो देख आचार्ये की (संजातु मी ग्रंथले.) =श्रीगुरूनीं माझें मजला प्रेरिल्या प्रमाणें-संजात-ग्रंथ रूपानें मी बोललो आहे. (१७७०) अवदशे=हीनतेला. आयसे=लोखंडाने. (१७७२) जै-जे. मगही गंगा नोहावे=मग गंगाचि नव्हे, जरी काइ-काय. (१७७३) भाव्य योगे बहुवे-भाग्ययोगे बौहे-पाहे. पातलो-पातला. लाहे-आहे. (१७७४) तेणे-ते. (१७७५) तुम्हां

सांगडे-जोडीने भक्ती सांगडे. तुम्हांसी गडे=तुम्हांसारखें सुरवाडे=सुखानें. नेले-गेले. आळियाडे=छंद, हट्ट, आळी, हेतू. (१७७६) भूतळ-भूमंडळ=पृथ्वी. कुळाचळ=पर्वत. (१७७७) दुवाड=कठिण. नोहे-नव्हे. (१७७८) विषम=कठिण. (१७७९) डोळेवरी-डोळेवारी=प्रत्यक्ष डोळयांनीं. भाषा-भारवा. ऐसे-जैसे. (१७८०) उतरोनि-उतरौनि. (१७८१) कळशेसी-कळसेसी. (१७८२) मायपूता=मायलेकराचे. तैं-ते. (१७८३) तुम्हां सज्जनांच्या कृपेनें आलेले ते बोलणें निघाले जे, ते मी बोलत आहे. ज्ञानदेवच, एकटा, (हा थेकुले, म्हणजे, कमी असे) कांहीं तरी बोलत आहे असें बोलिलेले नाहीं. जो-जी. ज्ञानदेव-ज्ञानदेवो. नोहे-ते नव्हे. (१७८४) काइ-काय. (१७८५) जैसा जैसिया-जैस जैसिया. पुरवुनि- पुरौनि (१७८६) जे हे केली तुम्ही-केली हे तुम्ही. (१७८७) असौनि-असोनि. त्रिशंकुदोषे-त्रिशंकुउद्देशे धातेयाही-धात्रयाही=ते नाशते कीं, जे कीं ऐसे-तैं नासते जे कीजे की जै ऐसे=ब्रह्मदेवाला उणेपणा आणण्यासाठीं विश्वामित्रानें त्रिशंकुराजाच्या उद्देशानें नाशिवंत सृष्टी निर्माण केली. तसा प्रकार ह्या ग्रंथरूप सृष्टीचा नाहीं. सर्व लोकांच्या कल्याणार्थ ही ग्रंथ सृष्टी, हिने तर ब्रह्मदेवालाही संतोष होईल अशी ही झाली आहे. (१७८८) उपमान्याचेनि-उपमन्यूचेनि. नोहे-नव्हे. विषगर्भ=क्षीरसागराच्या पोटातून हलाहल विष निघाले. (१७८९) सूर्य-सूर्ये. ताऊनि=चराचराच्याठायींचे जीवमात्र त्यांना प्रखर तेजानें त्रास देऊन. (१७९०) तांतलेया-तापलिया-तांतलिया=तप्त झालेल्या चंद्रे-चंद्रेही. तेया-तया. सदोषा-सकलंका. (१७९१) उपेगु-उपयोग=कामास येणे. निरूपम=तुलना रहित. (१७९२) नेले-गेले=शुभ झाले. पाईकपण=उपासना, उपभोग, चाकरी करणें ते. सेवकपण. (१७९३) वागयज्ञे=वाणीच्या पूजनाने पूजायज्ञानेः तोषोनि-तोषौनि. द्यावे-देयावे. पसायदान=प्रसाद पान=प्रसादाचें दान-पसाय, (पद=जवळ जाणे स्थितीला पावणे.) (१७९४) व्यंकटी-वेंकटै=वांकडेपणा. (व्यंकटेश-वांकडे कां वक्र जे त्याचा शास्ता) तेया-तया. सत्कर्मी-सत्कर्माची. रती=क्रीडा, आनंद, आवड आसक्ति. परस्पर-परस्परे=उभयता, अन्योन्य. पडो-जडो. (१७९५) दुरितांचें तिमिर=स्वधर्म शून्यतेनें उत्पन्न होणारे पाप-पातक संकटः स्वधर्म सूर्य-सूर्ये पाहो=स्वधर्म सूर्यानें प्रकाशो. (१७९६) मांदियाळी=समुदाय. अनवरत=सतत. भेटतु-भेटोतया. (१७९७) चळा=चालत्या. (चला=विद्युल्लता, लक्ष्मी. चल्=खेळणें, हलणें) आराव-अरव=अंकूर (अर्व=शंभर कोटी, कोव्यावधि.) आराव-आरव=शब्द, ओरड, अ-रव=शब्द. चेतना-सचेतन. (१७९८) ग्रंथोपजीविये (जीवित=जगणे प्राण जिवंतपणा सजीव प्राणी जीवाल्या दूध धंदा आयुष्य, जीवित)=ह्या ग्रंथावरच उपजीविका करणाऱ्यांना. उपजीविन्-ग्रंथाचे सेवक, आश्रित, ग्रंथाचा आश्रयदाता, ग्रंथाचे आश्रयदाते. दृष्टादृष्ट विजयो-दृष्टादृष्टी विजयो=इहपर सौख्य यशस्कर होवो. (१८०१) येथ-येथे-तेथ. विश्वेशुरावो-श्रीविश्वेशरावो. हे-हा, दान पसाव-(प्रसव=फळ, अपत्य, उत्पत्ति)=दानाचा प्रसाद. जाला-झाला. (१८०२) ऐसे युगी परिकली कलियुगांत. महाराष्ट्र भूमंडळी-आणि महाराष्ट्र मंडळी=महाराष्ट्र देशांत, दक्षिणली-दक्षिणीली (दक्षिणलिंग, दक्षिणलिंगी) कुळी=दक्षिण तीरावर. (१८०३) पंचकोशक्षेत्र=पंच-कोशीत क्षेत्र नाम नेवासे. श्रीमहालया=श्रीमोहिनीराज (१८०४) जदु=जाधव यदु=यादव यदु-इंदु-येदु वंश विलास=माधव घराण्याला भूषणभूत असणारा ययाती व देवयानी याचा ज्येष्ट पुत्र यादवाचा पूर्वज श्रीरामचंद्र-रामदेवराव. (१८०५) तेथ-तैं. महेशान्वय संभूते=आदिनाथ (महेश अन्वयात) परंपरा संभूत (म्हणजे शिष्य परंपरेत झालेला)=शिव संप्रदाय श्रीनिवृत्तिनाथ सुते=श्रीनिवृत्तिनाथांच्या शिष्यानें. देशीकार लेणे (देशिक=गुरू मार्गदर्शक.) [देश=भाग, ठिकाण, प्रांत, देशना=उपदेशः देशिक=गुरूमार्गदर्शक, प्रवासी, वाटाड्या, देशातील लोक. देशिनी=तर्जनी, अनुक्रमणिका. देशिन्=देशचा मार्ग दाखविणारा.]=मराठी भाषेचा अलंकार गीता देवीच्या अंगावर चढविला. (१८०६) गोठी=प्रश्नोत्तर संवाद. (१८०७) ज्ञानेश्वरीपाठी=पाठांत.

पराशराम, सत्यवती पासून झालेले श्रीव्यास (ह्यांना द्वैपायन, कृष्ण द्वैपायन, अशी ही नांवे आहेत.) आदीकरून जे त्रिकालज्ञानी महामुनी विशेष मानलेले (व्यास पूजा आषाढ शु॥ १५ची गुरुपूजा) असे व्यास वसिष्ठ आदिंचे, ज्ञानाचें उद्गार (उल्लेख) जेथें साशंकतेने राहाटणारे अनिर्धारित संदिग्ध [(न्या.) हरकत, आक्षेप,] अशींच ज्यांची अनुभव राहाणी आहे, तेथें मी ही पण रंकच ((रंकु=चितळ, हरिण) मंद का गरीबच) कीं एक, कृपण असा, वाचाळी बोलकेपण-बडबड करीत आहे. [चावळणें करीत आहे. स्वप्नातले जसे म्हणावे कां (देखा धवळारि चिंतामणीचा। जरि पहुडला होय दैवाचा। तरी वोसणताहि बोल तयाचा। सोप न वचे ॥ अध्याय ८वा ओवी ६ ॥ जसें म्हणावे कां ? (१७१०)

मुख बोलके असें करून जरी मी बोलत आहे तरीपण अहो श्रीगीता हा तर भोळा असा ईश्वरच ! व्यासाच्या उक्ती रूपी कुसुमांच्या माळा कीं तो परिधान करून आहे, जरी, तरी पण माझ्या ह्या दुर्वादळास (जे श्रीगणपतीचें अति प्रिय रम्य असें पुष्पच कीं दर्भटं=एकांताची जागा) ना असें केव्हांहीं म्हणणार नाहीं की ! (१७११)

अहो ! क्षीरसिंधू-क्षीरसमुद्र जो त्याच्या तीरी गजसमुदाय पाणी पिण्यास येतात तेथें काय एकाद्या चिलटाला पाणी पिण्यास आले म्हणून निवारणें होते ? [मुरें=वेष्टणे, मोरमांसी (वनस्पति) कुट (टं)= लतागृह, वृक्ष, मद्य, झोंपडी, घागर, किल्ला हातोडा. कुकुटजः=(१) कुडा वनस्पति (२) अगस्त ऋषि (३) द्रोणाचार्य] (१७१२)

नुकतेंच पंख फुटले आहेत असें पांखरू उडून दमल्यामुळे उडता आले नाहीं तरी पण ते नभी म्हणजे आकाशींच स्थिर राहाते. तेथेंच कीं, अहो अति वेगानें आकाशाचे आक्रमण करणारा गरूडही पण असतोच नां ? (१७१३)

अहो ! राजहंसाचें चालणे विकास पावणे ह्या पृथ्वीतलावर ह्या भूमंडळाच्याठायी सुंदर असें एक (लोखंडाचा गज, नाकातील मळ, सिंहाणकं) सिंहाणेच ते एक, तेथे काय आणीक दुसऱ्या कोणी चालावे नच असें कां आहे ? (१७१४)

जी अहो आपल्याच कीं अवकाशानें-(मापाने, पोकळीने)-अगाध जळ ते घागरीनें कां कलशानें घेणे होते ना ! चूळच कीं एक (पसाच कीं एक का चूळ) भरण्यानेंच कीं, ते भरून घेता येत नाहीं-कां ? (१७१५)

अहो ! दिवटी (बुधली) जी (तिच्या आंगी पदवी तोंडी वाजणारे शाब्दिक प्रमाण तरी) ती तर अतिशय असें तेज आवरून असते. अहो वात दिव्याची ती ही आपल्या परीनेच कीं प्रकाशते का ? (१७१६)

अहो समुद्राच्या अफाटपणावरच (पैसपणानेंच कीं समुद्रामध्यें) आकाश ते आभासते (प्रकाशते तेथें आकाश ते तर समुद्रासारखे अफाट)-व थिल्लरी म्हणजे डबक्यामध्येंही डबक्या एवढेंच कीं ते त्याचे आभासणे असणार केव्हांही. (१७१७)

त्याप्रमाणें महामती व्यासादिक जेथे या ग्रंथामध्यें वावरतात तेथें आम्ही हात टेकावेत कां चालू नये असें म्हणणें हे युक्तीला जुळत नाही. (१७१८)

ज्या सागरामध्यें जलचरे मंदराकारानें सारखे मोठे (मंदर=मंद, स्थूल, स्वर्ग, आरसा, मोत्याचा हार, मंदार वृक्ष. आकार=आकृति, चिन्ह, तोंडाचें भाव.) संचरतात. तेथें [सहरी (सहरी×सहचरी- सहचर-सहचारिन्=सोबती, मदतनीस, मित्र, नवरा, सेवक, प्रतिबिंब, पत्नी, सखी. सहचारः=समानाधि-करण्यं. राका=न्हाण आलेली मुलगी, पूर्ण चंद्रयुक्त पूर्णिमा. राकापत्नी-राका+ईश=पूर्णिमेचा पूर्णचंद्र.)] माशानें कां दुसऱ्या लहान माशांनीं तर पोहोणे ते लाभाचे केले होतेच नां ? (त्या एका लहान माशासही पोहोणे मिळतेच कीं.) (१७१९)

अरुण हा सूर्याच्या अगदी जवळ ( पुरुष अंगाजवळचा राहाणारा सारथि ) आणि म्हणूनच कीं सूर्यास देखू शकतो, देखू लाहातो, असें म्हणावें तर अहो त्या पृथ्वीतळावरील मुंगी ही एक जरी तरीही ती सूर्यास पाहातेंच कीं, पाहात नाहीं काय ? (१७२०)

या कारणास्तव आम्हां प्राकृताना [ मूळच्यांना पूर्वीच्यांना-(सकाळचे केलेल्यांना) देशभाषेनें स्थानिक प्रांतिक भाषेने रचिली जात आहे ] गीता ही उपदेशकर्ती, आचार्यांनी (सं.) स्वामिनी अशी बंधें ( कारणावरच कीं टेकविते-कारण का वध पाहायास लाविते देह करार, ठेव ) बंधनाने बांधण्याचें करतें असें म्हणणे तर हे अनुचितास [ म्हणजे अयोग्यपणच एक फाजिल म्हणजे अधिकपण अधिक=(१) अष्ट अधिक शत=१०८. ( अधिकचवारिंशा:=४० हून अधिक) (२) अतिशय (३) भरलेले, युक्त इ. (४) जोराचें, बळकट (५) श्रेष्ठ वरचढ, (६) नंतरचें असाधारण वाजवीहून जास्त (७) अधिक घातलेला महिना, जसा, (८) गौण, उरलेले, नफा, विपुलता (स.) अतिशयोक्ति कां जास्तपणच एक अपरिचितपणच एक तेथें ] आहे. (१७२१)

अहो ! बाप पुढें जात आहे त्या पाऊलाची सोय घेऊन (पायवाय ती चालून) बाळ मागून येतो आहे जो तो ती पाउले लाभत नाहीं काय ? तो नेमक्या ठिकाणी पोहोंचत नाही काय ? (१७२२)

त्याप्रमाणें श्रीव्यांचा माग घेत घेत, गीता भाष्यकार श्रीमत् आद्य शंकराचार्य त्यांना वाट पुसत, चाललो आहे जो मी तो अयोग्य असाही पण ती पाउले न पावता कोणीकडे जाईन ? कुठेही नच जाता तेथेच पावेन, ब्रह्मच होऊन असेन !!! [तर शब्द करणें जे तेंच होऊन असेंन कीं, मी शब्द करीत जाईन, बोलत असेन, शब्द, ध्वनि, भाषणातील पदें वाक्यें इत्यादी करीत असेन कीं.] (१७२३)

अहो पृथ्वी ज्या ब्रह्मवस्तूचा राग शांत करते तिच्या त्या सहनशीलपणामुळें, का तिच्या पोटी स्वाभाविकच सहनशीलपणा असल्यामुळें, ज्या ब्रह्मवस्तूच्या योग्यतेवरच की पृथ्वी ती स्थावर जंगमाची रचना आकृती मोडीत नाहीं, स्थावर जंगमास कंटाळत नाही त्रासत नाही तसेंच ज्या ब्रह्मवस्तूंवरच कीं (चंद्राचा) स्वभाव अमरत्व देणारे अमृत प्रसवण्याचा असा तो चंद्रमा अमृत प्रसवून जगास अमरपद देऊन जगास निववितो कीं, (अहो ! सागरामधून अमृत निघाले तसा चंद्रहीपण सागरामधून कीं निघाला आहे, पण सागराच्या पोटी ब्रह्म जे त्याचें ठायीं (कालकूटही पण की काय ते रत्न म्हणावे) रत्नच एक उत्पन्न करण्याची (का प्रसवण्याची का देण्याची ती) सामर्थ्यशक्ति असल्यानें सागरानेंच-कीं देव दैत्यांच्या मंथना मुळे-त्याने ती अमृतप्रसवण्याची शक्ति अमरत्वाची कळा चंद्रम्यास दिलेली होय असें कां म्हणू नयें तें.) (१७२४)

त्या ब्रह्मवस्तूच्या आंगचे सर्व तेज सूर्याने घेऊन तो सर्व मायिक परिणाम ते दूर करतो. (१७२५)

संतप्त लोहावर तोयाचे नांवही उरत नाहीं ब्रह्म जे त्याच्याच अंगच्या तेजानें समुद्रास (त्याचे ते पाण्यानें परिपूर्ण असें) समुद्रपण का पाणी ते-ब्रह्म तेजानेच कीं तोय ते समुद्र असें का समुद्र तो तोय असें होय-अहो तोयधर, तोयद, असें मेघ जे त्यांनीं समुद्राचें पाणी घेऊन मेघ रूपाने वर्षणें केले असें ज्या ब्रह्मतेजानें सत्तेनें शक्तीने होते ( म्हणून असेंच म्हटलें कीं, समुद्रासहीपण ज्याचे मेघा वर्षणे समुद्र करते ) तेथें सत्ताच कीं एक ब्रह्माची ती-म्हणून समुद्रास ज्या मेघाचे आंगचे तेज पाणी-आंगच्या तेजरूपी पाण्यास ज्याचें वसंताची पुष्परस गोडी माधुर्य व माधुर्यास मधुर मनोहारी मनोरम असे सौंदर्य आलेले ज्या ब्रह्मसत्तेमुळें ब्रह्म प्रतिष्ठेवरच की समुद्रास ते पाणी (प्रतिष्ठेचे असे) त्या पाण्यास तर ब्रह्मतेवरच की माधुरपण आलेले व त्या माधुर्यास तर त्या ब्रह्मप्रतिष्ठेवरच की सौंदर्य देऊन आहे !

समुद्रास अगाधतेचे समुद्रपण तोयामुळें, ज्याच्या सत्तेनें तोयास तोयपण, ज्याच्या माधूर्यानें, माधुर्यास सौंदर्य, ज्याच्या सुंदरपणामुळें असें स्वयंप्रकाश, ब्रह्म, वर्णण्याचें केले, तेथें समुद्रास त्या ब्रह्मवस्तूच्या आंगचे तेज तेंच की समुद्रपण आलेले जे, तेंच तोय म्हटले, त्या तोयास त्या वस्तूंचें माधूर्य, व त्या वस्तूंच्या-मुळेंच कीं, माधूर्यास सौंदर्य आलेले की ज्याच्यायोगेकरून. (१७२६)

पवन वायूस त्या ब्रह्मतेजाचे ते बळ–आकाशाचें ठायीं आकाशपण ते व्यापकत्व वस्तूचे ते पैसपण अघळ पघळ असें तें, ज्याचें सत्तेनें–ज्ञान, (ज्ञान असे जाणीव बुद्धि, बोध ज्ञान) ज्याचें सत्तकरून उज्वल स्वच्छ तेजस्वी असें चक्रवर्तीच कीं सर्व ज्ञानामध्यें श्रेष्ट असें सार्वभौम कीं. (१७२७)

देव अथवा वेद ज्याचें ठायीचें झाले असतां सुनास [(सुनास–सुनाकीर=इंद्र, सु × शु नारः= चिमणी, कुत्रीची कांस, सर्पाचें अंडे. सु=सुंदर पूर्णपणे, अति (सु+अच्छ, सु+अल्प) पूज्य. नासा, नास=नाक, तोंड, उदरावरचा भाग नासिका, नासा, नास (नासिक्य=अनुनासिक नासत्यौ (नाक) नासायदस्रौ नासत्य=अश्विनी कुमार. अदस्=परलोक अर्थी, हा तो प्रसिद्ध तेथें, त्यावेळीं तसें)] होतात–वेद ज्याचें सत्तेनें सुभाषित (सुंदर बोलणें करतात) असे सुभासाचे म्हणणे ज्ञान देणारा प्रकाशच एक कीं, जे सुख ज्याचे असण्यावरच मुळीं आनंद असे प्रकाशाचें (हसित विकसित–मदन धनुष्यच एक जसे–) असें हें असो पण अहो सर्व विश्वच ज्याचेयोगेकरून, ज्याच्या सत्तेने, ज्याच्या असण्यानेंच कीं, मुळीं सडोळस रूपाचें असे नांवारूपास आलेले असें सर्व विश्वच होते. (१७२८)

जो सर्व उपकारच कीं एक मूर्तिमंत असा समर्थ सद्गुरू श्रीनिवृत्तीनाथ तेंच मजमध्येंहीपण रिघाव करून राहटत आहेत कीं. (१७२९)

आतां अहो! असें झाले कीं, ही गीता ह्या जगी आइतीच कीं एक आधीनतेची अशी (विस्तृत अशा मिलाफाची ती विस्तीर्णतेची) ती मराठीच्या भंगी म्हणजे रचनेनें प्रकाराने पायरीनें रीतीने सागेन, अहो! येथें विस्मय तो कसचा! येथें विस्मयच एक करावा असा कांहीं तो ठावच एक विस्मयाचा तो कसचा! (१७३०)

अहो! श्रीगुरुच्या (नद-नाद, निनद निनाद=शब्द नाद–नाव नावे (नाविन्–नाविक=नावाडी–सुकाणुवाला खलाशी–नाव्य (नौ) स्तुत्य, नवीनपणा, नव असा–निनयन=ओतणें, आचरणे, करणें) नांवे करून (मातीची माया, कांचेची काया) माती जी, ज्या कोळयापासी डोंगरी होती ती त्या कोळ्याने येकवद् म्हणजे ज्याचे कोळ्याचे कौशल्य पाहाण्या करितां त्रैलोक्य गोळा झालेले अशी ती येकवट अशीच त्रिजगतामध्यें केली. (१७३१)

चंदनानें वेधलेली सुगंधित केलेली झाडे, चंदनाच्या बरोबरीस आली ती चंदनच कीं झाली. श्रीवसिष्टांनीं मानिलेली कां मांडलेली ती शाटी–काठी शरीरयष्ठी ती आपल्या तेजानें सूर्याबरोबर भांडू लागली. (१७३२)

अहो मा आश्चर्यच एक की मी तर सचेतन चित्त असलेला वर श्रीगुरूसारखा स्वामी कीं जो आपल्या दृष्टीमात्रे करून कृपाकटाक्षानेंच कीं, मी आपल्या पदी बसविला होत आहे. (१७३३)

सौरी=शनि, असणा (व); सौरष्ट्री=मृत्तिका भेद. सौराष्ट्र=कासे, सौराष्ट्रिक कांसे=विषभेद.

## सौरी अभंग —

कर्मास्तव जालो सौरा। गेलो पंढरपुरा। मा मी गेलो पंढरपुरा। संतसनकादिका मेळी डौर वाईला पुरा ॥ १ ॥ चाल रामा घरा। करूं प्रपंचेसी वैरा ॥ ध्रु० ॥ द्वैतभाव कल्पना खोडी सांडी याची आशा। विठ्ठल नाम हेचि सार जिव्हे प्रेम ठसा ॥ २ ॥ अद्वैत भरी न मन भावीन। तोडीन भवपाशा। क्षमा

दया धरीन चित्ती । सर्व भूती महेशा ॥ ३ ॥ ज्ञान ज्ञेय हाचि विचार सर्वमय हरि । मा मी सर्व मय हरि । दुजेपण न पडे दृष्टि एकपण घरोघरी ॥ ४ ॥ वासना खोडी वेगी टाहो करीन रामनामे । मा मी टाहो करीन रामनामें । पुंडलीक पेठ संतांचें माहेर तेथें नाचेन मनोधर्मे ॥ ५ ॥ विज्ञान हरि आपणचि क्षरला । दुजेपणेंछंदु थोरू । मामी छंद थोरू । निष्काम स्वरूप सूत्रधारी खरा एकरूपें हरिहरू ॥ ६ ॥ त्रिकाळध्यान त्रिकाळ मन हारपले जेथ पुरली मन कामना । मा मी पुरली मन कामना । वैकुंट प्रगट आपणचि नाथ ॥ ७ ॥ देहुडा पाउली वेणु वाहे विटेवरी नीट । वोळली कामधेनु युगे अठ्ठाविस वाट ॥ ८ ॥ एक वृक्ष क्षरला आपणचि जग सर्वघटी आत्मारामु । ज्ञानदेव म्हणे आम्हा पंढरपुरी जाला विश्रामु ॥ ९ ॥ ( ९१४ ज्ञा. गा. आळंदी देवाची)

(लौकिक लज्जा परित्याग करून स्वच्छंदाने वागणाऱ्या स्त्रीस सौरी आणि पुरुषास सौरा असे म्हणतात सौऱ्याच्या रूपकाने ब्रह्मज्ञान प्राप्तीचा उपदेश महाराज ज्ञानदेव या अभंगा करतात.)

( मानसिक दुःखाची अशीं गहाणच पडलेली कीं अशीं ही आधीची मुळीं दृष्टि आहे ) अगोदरच मुळी दृष्टी देखणी अशी याहीवर रवि सूर्यग्रह सूर्य तर पाठच पुरवीत आहे. तेथें मग देखणे असें दिसणें पण कां पाहाणें ते पाहाणारे नाहीं अशीं गोष्टी ती कोणती ती असणार ? (१७३४)

असें आहे म्हणून माझें नित्य नवे नवे असें जे श्वासोच्छ्वास-(शिवस्वरूप जे श्रीगुरू त्यांचेच ते श्वसणें असल्यानें ) तेहीपण कीं रचना ग्रंथ पूर्वापार संगतीचे असें प्रबोधन प्रबंध काव्य ग्रंथ कीं होऊन यावेत येथे श्रीज्ञानदेव म्हणतात कीं, अहो श्रीगुरूची कृपादृष्टि सर्व नवलाची अशी ती ( नवलच एक नवीन असें नाविन्यच पाहाविते कीं निजानंद नवीन असाच कीं ब्रह्मच ते एक असें ते वर्म योगीजन जाणतात की ), काय करणारी नव्हे ! सर्व कांही करणारी ! (१७३५)

या कारणास्तव, मी श्रीगीतेचा अर्थ ह्या मराठी लोकांना त्यांच्या दृष्टीचा ( अवलोकन शक्तीचा, नेत्राचा, बुद्धीचा, तसेंच मत अभिप्रायाचा ) विषय ( देश, आश्रय, व्यवहार, लक्ष्य, इंद्रियग्राह्य पदार्थ) केला आहे. (१७३६)

पण मराठी बोलभाषा जी, तेथीलच्या रंगानें ( आखाडा, प्रेक्षकगण, खेळ, क्रीडा, नृत्य, समज, रंगिन् प्रीतियुक्त नटणारा, प्रीतियुक्त होऊन रंगविणारा ) प्रीती क्रीडेनें जर जेव्हां का ह्या गीतेची आंगें आकलन करावीत-(कवळावीत) तरच तेव्हा बरें ! पण गाता गवई गाणारा नसला व नुसत्या ओव्या वाचल्या तरी पूर्ण लाभच होईल. ( येथें गातयाच्या आधीनपणानें सर्वस्वी गात्यावरच अवलंबून राहिले तर ओव्या त्या एकदेशी अशा सर्वथैव गातयाच्या झाल्या असें होत नाहीं. हा भाव ) ओव्या गातयाच्या झाल्या असले ते हेकाडपण तेथें नाहीं. [ गातया तेवढाच श्रीमंत, पूर्ण का युक्त मिश्रित का विपूल (आढ्यवात:=मांडयातील वातरोग.) एका गातयाचा तेवढाच जन्माचा पांग फिटला, जन्माचे सार्थक झाले असें हेकाडपण तेथें नव्हे.] (१७३७)

या करितां गीता गावी, गाण्यांनीं, असें म्हटले तर गाणिवे म्हणजे गाणाऱ्याच्या भाषणाला, ओव्या त्या अलंकार होतात. (अलंकार लेणी लेईली, अंगावर पेहनलीं असें होते.) अथवा मोकळे असें जरी गाणें त्या ओव्याचें केले तरी गीता कांहीहीं तेथे अर्थ कां रस संबंधी उणीव (का उणें पुरें) आणीत नाहीं कीं. (१७३८)

[सुंदरा जी सुंदर स्त्री तिच्या अंगानें जरी अंगरूपी अलंकारानें अलंकार प्रसवणें केलें नाहीं सौंदर्य उठावदार केले नाहीं, शरीराला शोभा आणिली नाहीं ( लेणे अलंकार अंगाला केले नाहींत शरीरावर धारण केले नाहींत ) तरी मग तो जसा का मोकार असा सर्वथैव (कातळ्यासच केलेला असा सुंदर ] सौंदर्य शृंगार

स्रीचा सौंदर्य हाच की मोकळाच एक शृंगार (अंगावर अलंकार घातले नाहींत तरी) की असें म्हणणें होतें नां! अहो! म्हणून त्येणे अलंकार लेईले, अंगावर घातले आहेतच जेथें, तेथें आणीक करूले ते उचितपण पाहिजे बरें! येथें तर ते उचितपणच योग्य असेंच ते सर्व उपमा ओलांडून जाते आहे योग्यच की सर्वथैव असें होत आहे. (१७३९)

अहो! मोती हें जातीने आंगचेच सुंदर, तरी ते, सोन्यासही–, सुवर्णासहीपण, आपल्या सुंदरपणावरच की (पाहाणाऱ्या मानसास रम्य असेच होतात अहो मान डोलवावी ज्यानें त्यानें असें) होऊन मानवणे करतात. (१७४०)

अथवा मोतिये म्हणजे मोत्यानी मोतये गुंफिलेली ती मनांत भरणारी होतात परिमळाने–(सुगंधाने) केव्हाहि उणीपुरी नाहीत (का नसतात. असें म्हटले तर तेथें उपमा ती, अहो नाचत हांसत वसंतऋतूच्या येण्यानें का रागभेदानें हसित) अशी मोगऱ्याची फुले जशीं वाटोळी मोकळी सुटसुटित सुगंधी सुवासाची ती मनांत भरणारी अशी सौंदर्यच एक! (१७४१)

तसें गाणिवेस मिरवून आहे गीत गाता शिवाय रागरंग दावीत आहे; असा तो एक लोभाचा–लाभाचा पूर्वांगार (संगती, ग्रंथ–रचना, बंध–करार) शृंगार, मी ह्या ओव्यांना केला आहे. (१७४२)

तेथें आबालवृद्धास (सुगम, जाणीव, ज्ञान, बोध,) जागृतीचें करणारे ओवीचे प्रबंध ते (शृंगार, करार रचनेनें) म्हणजे ब्रह्मरसाच्या (ब्रह्मच की जसें शब्द करीत आहे. अशा) सुस्वादानें तेथीलची की अक्षरें ही गुंथिली (कणकीमध्यें मोहन घालून जशी कणीक मळली होते. तेथें कणकीची ती दशमी अति स्वादाची अशीं रूचकर जशी.) ती गोड रूचकर सुंदर मनोहर अशींच) गुंफिली आहेत की. (१७४३)

श्रेष्ठ असा जो चंदनतरू जो तेथीलच्या फुलाचा सुगंध तो अहो अप्रतीम असाच असला पाहिजे केव्हांही तेथें त्या वृक्षाला फुले येईपर्यंत वाट पाहाणेच एक करीत असावें असें नाहीं, की! (१७४४)

तसा प्रबंध हा ऐकतांक्षणीच, ऐकल्याबरोबर का कानाच्या वाटेस व्याख्यान रूपाने लागल्याबरोबर की अहो समाधीस आणणारा असा (व्रत मौन, शंकेचा परिहार फेडणें अशा चित्ताच्या एकाग्रतेचा ध्यानस्थ जसा का) होऊन असतो अथवा श्रवण केल्यास तर अर्थाची परिस्फुटता–विवरणा करावी असें व्यसनच (तल्लीनता आसंगच) एक लावतो की. (१७४५)

अथवा पाठ करण्याच्या निमित्तानें (पाठ केला असतां) पांडित्ये ती (विद्वता ती नैपुण्य का चातुर्य चतुराईची, कमालच कीं एक अशीं ती) स्पष्टतेस येतात. तेथे चतुरपण भेटल्यास फावल्यास तर अहो अमृत ते कोणत्या गांवीचे कोण जाणें असेंच एक नेणणे होते! हेची ते नैपुण्य अमृत होय की, व आतां त्याच्याहून अमृतास त्या दुसऱ्या एकाद्या गांवचे होणें होत असेल असें वाटतें असेंच मानणें होते. (१७४६)

तसें आइते हे अमृतच (अशा विस्तृततेने) कवित्वास ह्या येणें झाले असल्यानें आतां विश्रांतिस्थानच की एक ह्या अमृताच्या श्रवणानें आयते मानसास निदिध्यासासच की आपलेपणाच्या एकाग्रतेने अविश्रांत केलेला आपला स्वाभाविक विचार जो त्यास की जिंतिले होय; आपणच आपणास सांपडला होय. (१७४७)

असा हा स्वानंद भोग, आपल्या स्वाभाविक आनंदाचा जो, अनुभव, (शरीर द्रव्य,) जो त्याचा शेलका असा उत्तम वाटा असून ही गीता तर भलत्या कोणासही वाटेल त्यासही की तो वाट देण्याचे करील; तसेंच श्रवणामुळें, श्रवणाकडूनच की सर्व इंद्रियांना पोषवील. (१७४८)

आपल्या आंगच्या शक्तीने चंद्रास भोगून उपभोगून चकोर ते शहाणें म्हणजे सुंदर असें; पण ह्या श्रवणानें तर भलत्यासही कीं तसले ते चंद्राचे चांदणें प्राप्त होते, भोगण्यास येते, कीं ! (१७४९)

तसें ह्या (आपल्या स्वतःसंबंधीच्या स्वाभाविक अशा ह्या) अध्यात्म शास्त्राचें अंतरंग पुरुषच ते अधिकारी, सत्तेनें (हक्कानें) येथीलच्या अंतरंगांचे जरी तरी पण लोक (अवलोकन, जग, जन) हा केव्हांहीं वाक् चातुर्यानें (बोलण्याची ती शैली, कुशलता, चतुराईनें कीं,) आनंदित होईल, (आनंदी असा पुण्यवानच कीं एक होईल.) (१७५०)

(श्रीज्ञानेश्वर म्हणतात की) असे हे श्रीनिवृत्तीनाथाचें कीं खरें असें गौरव, सत्कार, श्रेष्ठत्व, गुरूत्वा, आदर, अर्थ गांभिर्य वजन, महत्व जाण अहो ! ज्ञानेश्वरी ही कांहीं नुसता एक साधा ग्रंथ नव्हे तर (कृपेचे दयाळुपण का) कृपाळुपणाचें सर्वस्व असें श्रीगुरूचे वैभव ऐश्वर्याची थोरवीच ती एक ह्या गीतेची ज्ञानेश्वरी रूपाने कीं. (१७५१)

क्षीरसमुद्राच्या–नदी पर्वताजवळची भूमि प्रदेश, विस्तारामध्यें, पार्वतीच्या कानामध्यें, शक्तीच्या कर्णरूपी कुहर म्हणजे कंठामध्यें, का गुहेमध्यें, जें कांहीं एक श्रीत्रिपुरारींनी–श्रीशंकरांनीं सांगितलें (ते कोण जाणे) तेच हे कांहीं एक जाण ! असे— (१७५२)

ते क्षीर कल्लोळामध्यें मकरोदरी [मकर=मगर, सुसर, मकररास, मकराकारव्यूह, कुबेर निधि वि. मकरांकः=मदन, समुद्रः मकराश्व=वरूणः मकरालय, मकरावास=समुद्रः मकरकुंडल=मकराकार कुंडलः मकरकेतु, मकरकेतन, मकरध्वजाः=मदनः मकर लंघन = नृत्य विशेष] माशाच्या पोटामध्यें गूढ गुप्त असें होते ते ज्याच्या हातास आले, (हातु पै म्हणजे) ज्यास प्राप्त झाले.— (१७५३)

—असा तो मत्स्येंद्रनाथ मछेंद्र, सप्तशृंगीचा भग्न अवयव हातपाय तुटलेल्या चौरंगी माशाला म्हणजे जे चौरंगीनाथ त्यास भेटल्यानें (भग्नावयव भग्न=पराजित, जर्जर, अति थकलेला, तिरस्कृत भग्नात्मा=चंद्र. अवयव=शरीर, घटक, भाग, साधन, व्यक्ति, असामि, शरीराचा भाग अन्वय अवयव=व्यक्ति, असामी.) तो तर आतां सर्व अंगांनीं परीपूर्ण असा झाला. मत्स्येंद्रनाथाचें दर्शन झाल्याबरोबर चौरंगीनाथाचे जे भग्न अवयव तुटलेले हातपाय ते पूर्ण अवयव झाले. तो पूर्णावयव झाला ! [(मत्स्य=(मासा) विराट राजा, विष्णूच्या दशावतारांतील पहिलाः महामत्स्य=कूर्मावतार) गोरक्ष=ऋषभक (ऋषभ=विष्णूचा अवतार विशेष) (१७५४)

मग (अव्यय अशीं अव्यत्ययत्वे करून कां अव्युत्थानया म्हणजे) निरूपाधिक अशीं समाधि ती (निर्विघ्न, उपाधि रहित, परिशुद्ध, अकपट, समाधी) भोगावी अशा इच्छेनें त्या मीनानाथानी, मत्स्येंद्रनाथानी ती मुद्रा (म्हणजे आपल्या संप्रदायाचें संपूर्ण ऐश्वर्य समृद्धि ती) श्रीगोरक्षरायास दिधली. (१७५५)

त्यांनीं योगरूपी कमळिणीचें सरोवरच एक असें जे विषय त्यांचा नाश करण्याविषयीं शूर अशा त्या श्रीसर्वेश्वरास स्नान घातले, अधिकार रोहणाचे वेळीं (सिंचन ते केले) अभिषेक केला. (१७५६)

त्यानी श्रीशंकरापासून मिळालेले ते शांभवनील दुर्वेचे अद्वयानंद सुख मुळापासून संपूर्ण (गै=शब्द, गाणे) (गैणी × गयनी) श्रीगहिनीनाथाना दिले. (१७५७)

त्यांनीं सर्व प्राणिमात्रांना, सर्वभूतांना, कळि तो ग्रासित असल्यानें, तेथें श्रीवन आला आहे असें पाहून, श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली कीं. (१७५८)

अहो ! आदि गुरू श्रीशंकरापासून जीं कांहीं शिष्य परंपरा, तोच हे ज्ञानाचें ऐश्वर्य, हा बोधाचा संसरा विस्तार कीं आम्हांस जाला आहे–आम्हांस मिळाला आहे. (१७५९)

तो हा ताबा, ते हे ईश्वरशक्तीचे, प्रभुत्व वैभव, सर्वच्या सर्व ज्ञानाचें ऐश्वर्य तुम्हीं आपल्या हातीं घेऊन, हातचें करून, कळिने गिळिले जात आहेत प्राणिमात्र जे जीव त्यासाठीं अगदीं त्वरीत धांवून येऊन, त्याचे सर्व प्रकारें करून रक्षण करावे. (१७६०)

अगोदरचा मूळचाच कीं, तो अति कृपाळू दयावंत असा श्रीवन त्याहीवर श्रीगुरू आज्ञेचा तो संदेश बोल, झालेला असा एक वर्षाकाळीं मेघ जसा खवळून येतो त्याप्रमाणें ते श्रीनिवृत्तिनाथ आता होऊन आहेत. (१७६१)

वर काल पीडिताच्या कळवळयानें, व श्रीगीतार्थाच्या (गुंफण्याच्या गांठी बांधणें, (पदरी बांधणें) ग्रथरचनेच्या निमित्तानेंच कीं, जो श्रीनिवृत्तिनाथांनीं शांतरसाचा वर्षाव केला तो हा ग्रथ होय. (१७६२)

तेथें माऊली म्हणते मी चातक पुढाच कीं, पुढेंच होऊन आहे, आपल्याच आतुरतेनें, दुखानें, पीडीत असा आर्तीनें–आतुरतेनें मांडलो गेलो–असल्यानें ह्या एवढ्या थोरल्या जयास–यशास–आणिलो गेलो मजला एवढे थोर यश प्राप्त झाले आहे कीं !! (१७६३)

याप्रमाणें गुरूक्रमानें–गुरूपरंपरेनें प्राप्त झालेले, (लाभलेले) जें श्रीगुरूरायांचे आपले समाधि–धन ते, ग्रंथरूपानें बांधून त्या माझ्या स्वामींनी मजला दिधले आहे कीं ! (१७६४)

तेथें जसें पढत नाहीं, वाचीत नाहीं. का स्वामीची सेवा ती म्हणजें काय ? (कसची ती) हेंहीं जाणत नाहीं, जो अशा मजला (केंकिन् कोकिल, केकावळी म्हणजे सरस्वती वाहन जो. त्या मोराची येणारी) सारस्वत वाङ्मय सरस्वती हृदय ग्रंथाची योग्यता कसची ! (१७६५)

तरीपण अहो खरोखरच कीं, श्रीगुरूनाथांनीं मजलाच एक कारण का प्रयोजनाचा धनी करून ग्रंथ निमित्ते (खोळंबा) करून कीं, अहो सर्व जगाचें कीं रक्षण केले आहे असें जाणा. (१७६६)

तरी आतां केवळ एका पुरोहित (–कुलाचार्य नात्यानें कारभारी, ) गुणावरच कीं मी जे कांहीं परस्वाधीन पणानें उणें पुरें बोलिलो असेन तें तुम्हीं संतानी माऊली पणानें की उपसाहावे–क्षमावे कीं. (१७६७)

शब्द कसा घडावा, जमवावा, प्रकाशावा, बोलावा, तत्वास तसें झोंबावे, भूषण, भाषण प्रकार, का चमत्कृति–जनक भाषण अलंकार का लेणे म्हणजें काय ते मला माहीत नाही. (१७६८)

अहो ! कळसूत्री बाहूले चालविणाऱ्याच्या सूत्रामुळेंच तें चालणारे होते–(चालते) त्याप्रमाणें मजला देखणें दाखवीत कीं तो स्वामी माझा बोलणें बोलत आहे कीं ! (१७६९)

या कारणास्तव गुणदोषाबद्दल विशेषेकरून माफी (सहीष्णुता) वाचून म्हणजे क्षमविना आहे; जे का मी–मजला प्रेरिल्याप्रमाणें, संजात उत्पन्न होऊन ग्रंथरूपानें मी बोलली जणू काय ग्रंथच मी झालो आहे ते तर अहो आचार्यांनीच कीं मजला बोलविलेले कीं ! (१७७०)

तसेंच तुम्हां संताच्या ह्या सभेमध्यें जें कांहीं अपुरें असें पुरे येते, उमे होते जे ते तर जर का पूर्ण नच झाले तर अहो सहज लोभानें तुम्हांसीच कीं अहो रागास येतो, (कोप करतो तुमच्याशीं कोप करतो, तुमचा राग राग करतो.) (१७७१)

*अहो परिसाने शिवंतल्यावरही जर का लोहाचे (लोहत्व जाऊन) सुवर्ण असें ते जर नच झाले तर (परिसाच्या समागमाने ते लोखंड आपल्या अवनीत स्थितीला मुकले जर नाहीं तर) मग तेथें कोण तो* बरें जबाबदार म्हणावा !! बोल का दोष तो कुणावर बरें येणारा तो मग ! (१७७२)

अहो ! ओढाळ असें ओहळ जे, त्यानें तर गंगेस मिळावेच मिळावे असेंच ! (कां हेंच एक करावे कीं गंगेच्या अंगचे व्हावे–गंगेचे आंगच कीं आपलेसे करावे–तेथेंच स्थिर असावे–तेथेंच उभें व्हावे–तेथें

पोहोचावें) व यावरही मग तो जर गंगेसारखा शुचिष्मंत झाला नाही तर (जे आंग ठावले ते गंगाच नव्हें असे तर) मग तो काय बरें करणार? (१७७३)

म्हणूनच कीं अहो बहु मोठे असें (दैवच माझें कीं येथें) भाग्यच एक मजला लाभले आहे-कीं, पहा पहा! मी तर तुम्हां संतांचे पायापासी पावलो आहे (पातला आहे-पातलो आहे, पोहोचलो आहे) अहो गीता भाष्य-[ईश्वरी गुण वर्णन करणारा जो ग्रंथ गाणे] त्याचे बोलणें-[मूळसूत्रांप्रमाणेंच कीं! जो ग्रंथ त्यावरील टीका] विवरण जे बहुत असें (अतिशयतेचे, पुष्कळ मोठे त्यावरच कीं, अथवा विपुलतेचे ते) झाल्यानेंच कीं, (बह्वर्च-बहुऋच = ऋग्वेद पढलेला, ऋग्वेद) तुम्हां संतांचें पाय मी पातलो-, (संताच्या योग्यतेस आलो, संताचे जोडीचा-संतच कीं एक माझी जोड ते असा पातलो आहे.) पायापाशीं पोहोचलो, झाल्यानें आतां ह्या जगीं उणें का अपुरें असें कांहींच नाहीं कीं! (१७७४)

अहो जी माझ्या स्वामी (तुम्हीं मजला संतच कीं असे जोडून घेतले) मजला तुमच्यामुळेंच कीं, संत मिळाले, संत भेटले, त्यायोगे करून (तर सर्वकामी सर्व कर्म करणारा असा) सर्व कामी योग्य-मी झालो आहे कीं, मी तृप्त झालो आहे कीं! (१७७५)

अहो! अहो! नवलच कीं, एक जे का मजला माहेरच्या तुमच्या अनुकूलतेनें (सुरवाडे) तुम्हीं सांगडच एक होऊन कीं माझा हा ग्रंथ रचण्याचा छंद (ग्रंथरचनेचा छंद का हट्ट) शेवटास नेला (सिद्धीस नेला कीं) हट्ट धरावा तो आईबापाजवळच नाहीं तर कुणाजवळ? असा तो हट्ट, केव्हांहीं पुरविला होतोच! असा तो ग्रंथ रचण्याचा माझा हट्ट तुम्हीं पुरविला!!! (१७७६)

अहो! निखळ भुतळ भूमंडळ सुवर्णाचें असें हे ओतिवेचे करता येईल! चिंतारत्नाचे (चिंतामणि = इच्छित देणारा कल्पित मणी, गणपती.) कुळाचळ-पर्वतही निर्माण करता येतील! (१७७७)

सातही सागरांना (सप्त समुद्र = (१) क्षार (२) क्षीर (३) दधि (४) घृत (५) इक्षूरस (६) मद्य (७) स्वादुजल.) अमृताने भरणें सोपे आहे! अहो! तारा ज्या त्यांना चंद्रच एक करणें, (सर्व ताराचा प्रकाश प्रकाश्य, प्रकाशला, जसा का चंद्रासारखा) तेथें चंद्र कीं एक निर्माण केला कां ह्या ताऱ्यांना चंद्राचें होणे केले, असे दुवाड जरी नाहीं) (तरीपण गीतार्थाचे वर्म निवडता येत नाही.) (१७७८)

अहो कल्पवृक्षाचें बागबगीचें लावणें काहीं विषमतेचे (कां कठिणतेचे) असें नाहीं, पण गीता अर्थाचे वर्म-(अर्थाची उपयुक्तता, सज्जता, उद्योगीपणा, व्यापकता गुंतलेपण, कारभारीपणा, धंदेवाईकपणा) ते काहीं निवडता येणार नाही (वर्म-मर्म मर्मावर प्रहर करणारा = दंदशूक = विषारी. दंदध्वन: = मोठ्या ध्वनीचें वाद्य. दर्दराम्र:-दर्दर: = पर्वत, भंगलेले, रसा. दर्दरिक: = मुरली इ. वाद्य, ढग, बेडुक, ) (१७७९)

अहो! जो मी एक मुका जो त्यास ऐकू येत नाहीं म्हणतात-सर्व मुकाच असा, तो मऱ्हाटि भाषा (भाखा, सरस्वति, प्रतिज्ञा, बोलणं, वेदभिन्न लौकिक संस्कृत.) बोलून लोकांना (चक्षुरिंद्रियाना, जनाना समुदायास, भुवनास.) हा ग्रंथ आपल्या प्रत्यक्ष डोळ्यानीं घेतां यावा असा केला असें आहे. (१७८०)

अशा येवढा ह्या ग्रंथसागरानें, संसार का भव समुद्र तरून जाऊन, परतीर गांठलें, कां मोक्षच एक कीं मिळविला आहे, असा जो कांहीं कीर्तीचा कां विजयाचा धेंडा, (रोम रोमी अंगा ब्रह्मांडे ऐसी धेंडे) नाचणें यश कृपा (तेजाचा जय मिरविणें जे (पार्वतीची सखी विजया) ते होऊन आहे असें तें कांहीं) होऊन आहे. (१७८१)

गीता अर्थरूपी देऊळावर (हेतु ध्येय, इच्छा, उद्देश निमित्त मूळ धर्मादि पुरुषार्थ सत्यपणारूपी, तट, भिंत, देऊळ, तेथील) कळस ते शिखर बांधून (करून, रचून) आंतमध्यें श्रीगुरुलिंग स्थापून ते मी पूजीत

आहे. [(वे.) सूक्ष्म देह जीवाचे स्वरूप (सां.) प्रकृति, विकृति, ब्रह्मचर्य, उपाधि शब्दाचें लिंग सांगणारे शास्त्र, लिंगानुशासन लिंगनाश=तिमिर (नेत्ररोग) शाळुंकेतील शिवलिंग. लिंगन=आलिंगणे, चाटणें, लिंगन् (न्या.) लिंगज्ञान ज्ञेय साध्य.) (१७८२)

अहो ही गीता माय निष्कपट अशी मायच की, येथें चुकून तान्हे जे वायांच हिंडते तेथें मायपूता (पवित्रता आत्म्याची ती) मातापुत्राची भेटी हा तुमचा धर्म कीं, तेथें धर्म ते पुण्यकर्म म्हटले संप्रदाय कां प्राविण्य म्हटले, शास्त्रोक्त कर्तव्य म्हटले, जीव कां सत्संग म्हटले उपनिषद् म्हटले की. (१७८३)

तुम्हां सज्जनांच्या कृपेनें आलेले ते बोलणें निघाले असे हे (आकलन करून आकळून घेऊन.) आकळिले करून जो मी बोलत आहे ते पुरते असे आहे-कमी का अपुरे असें नाहीं (का कमी असें कांहीं तरी बोलत आहे, असें बोललेले नाहीं की जी कमी म्हणावे कां अपुरे म्हणावे तसें नाहीं) असें ज्ञानदेव म्हणतात. (१७८४)

अहो! सकळा तुम्हांना यावर आणिक अधिक असें ते मी काय बोलूं बरें! पण मी अहो ह्या जन्माच्या साफल्यासच मिळविलो गेलो आहे-(जन्मल्याचे फळच कीं मजला मिळाले आहे येथें प्रत्यक्षतेनें मोक्षच एक फळास आला आहे-ह्या ग्रंथ सिद्धीचा सोहळा-प्रसंग, रमविणारा भावच कीं, तो तेथें प्रिय असा प्रियकर पति का मदनच एक कीं प्रियपणाचा कीं मजला आपण दाखविला देखणा केला, तोच झाला जो कांहीं हा! (१७८५)

तुमच्या भरंवशावर की ज्या ज्या आशा इच्छा केल्या त्या त्या आपण पुरवून मला सुखाचे केले! अहो तुम्हांस साक्षात् भरंवशाचें केल्याने आपण माझ्या आशा बहुवसतेने-पुष्कळपणानें पुरेपुर मी ह्या सुखास, मधुर-आनंद, आरोग्य, आरामास, येऊन आहे. (१७८६)

अहो स्वामी गोसावी जी आपण तर मजकरिताच कीं अहो ही ग्रंथाची जी एक नवीनच कीं सृष्टी केली आहे ती पाहून तर तिच्या शाश्वततेबाबत आम्हीं अगदीं निर्धास्त असें आहोत कीं! येथें तर ती पाहून आम्ही विश्वामित्र जो त्यासही पण हसूंच कीं! (१७८७)

का तर विश्वामित्रानी त्रिशंकु राजाच्या उद्देशाने, ब्रह्मदेवासहीपण हार यावी म्हणून नाशिवंत सृष्टीचे उत्पन्न करणे ते (निर्माण केलेले) ते तर नासतेच नाश पावणारे असे केव्हांहि कीं अहो! तसे कांहीं येथीचें जे निर्मिलेले ते नव्हे, कां नाहीं कीं! तशाप्रकारची ह्या ग्रंथसृष्टीची निर्मिती नाहीं) सर्व लोकांच्या कल्याणार्थ ही ग्रंथसृष्टी ह्रिनें तर ब्रह्मदेवासही आनंदच होईल कीं, अशीं झाली आहे. (१७८८)

श्रीशंभूनीही उपमान्याच्या मोहानें-(देहाला आत्मा मानणें-निद्रा, फाजिल आत्मविश्वास=मोह.) ललचावून जाऊन क्षीरसागरच कीं उत्पन्न केला आहे पण येथें तो सागरही उपमेस येत नाहीं. (उपमेची बरोबरी सरती करीत नाहीं) जे कां त्या सागरानें अहो मंथनास त्रासून जाऊन शेवटी हालाहल विषच कीं बाहेर टाकले-(क्षीरसागराच्या पोटांतून हालाहल विष, अंतर्भाग का अंतर्गृह विष विस्तव कीं)! (१७८९)

सूर्यानें अंधःकाररूप निशाचरास गिळिले त्यायोगे चराचरानें ताऊन जाऊन धांवा केला तेथें तर चराचराच्या ठायींचे जे जीवपात्र त्यांना तर प्रखर तेजाने त्रासच कीं दिला गेला अथवा आंधाररूपी निशाचरास सूर्यानें गिळिल्यामुळें चराचर ते तावविले गेले व धांवाच करू लागले कीं! (१७९०)

अहो अशा त्या तांतलेया (तांति=कोष्टी, दोरी, दावण, गाय, तंतिपाल=सहदेवाचे अज्ञातवासांतील नांव, गुराखी) म्हणजे तापलेल्या जगाकरितां चंद्रानें आपले चांदणें, खर्ची घातले ते जग निवविण्यासाठीं निर्हेतुकपणे तेथें त्यास सकलंक का सदोष का सहेतु असें कसें म्हणावें हो! (तातलः=संताप, पितृतुल्य नातलग, आजार, लोखंडी सोडगा स्वयंपाक.) (१७९१)

म्हणून तुम्हीं संतांनीं मजला-ग्रंथरूपानें-जे कांहीं ह्या त्रिजगतामध्येंही उपयोगी व्हावे जगताच्या कामी पडावे, कामास यावे असें-उपयोगाचे केले आहे ते पुन्हः पुन्हः निरूपम (तुलनारहित असे उपमा-रहित) असें आहे की जी अहो. (१७९२)

बहुत काय बोलूं पण अहो! तुमचें केलेले हे धर्मकीर्तन, (पुण्यकर्म, उच्चारणे, वाखाणणे) सिद्धिस गेले (दैवी शक्तीचे झाले, शुभ झाले) सत्य असे-येथें माझें तर आहो पाईकपणच एक (सेवकत्व-चाकरपणच कीं तें, उपासना उपभोगत्वे करून मी येथें एक सेवकपणच व्हावे, चाकरी करणें तेंच करावे. एवढेंच आतां उरले आहे. (१७९३)

आतां यावर विश्व आत्मदेवे स्वतःदेव (विश्व जिवंत स्वाधीन असें स्वतःचे संबंधीचें देवपणच अशा देवानें आता) ह्या वाक् संपत्तीरूप यज्ञाने (वाणीच्या पूजनानें, पूजेनें, पावित्र्यानें धार्मिकतेनें) संतुष्ट व्हावे व संतोषित होऊन मजला प्रसाद द्यावा (आपण पसायदान करावे, प्रसाददान मजला द्यावे,) वरदान जे ते हे कीं, जवळ करणें, स्थितीला जाणें, असे पद द्यावे ते जी कीं, (१७९४)

निर्दय त्यांनीं वांकडेपणा टाकिला होवो, वक्र ते सरळ होवोत, त्यांना सत्कर्माचें ठायीं रति-विलास-विहार-आवड वाढीची होवो. भूतांना परस्पर-एकमेक-उभयता-अन्योन्य जीवप्राणाचे मैत्र जडो, भेटो बिघडलेले जे त्यांचा दुष्टपणा, वक्रपणा नाहीसा होवो त्याच्या ठायी चांगल्या कर्माची महत्वाकांक्षा आनंद आवड वाढो सर्व प्राण्यांत परस्पर मैत्री विकास स्वभाव नांदो. (१७९५)

स्वधर्म शून्यतेने उत्पन्न होणारे प्राण-पातक-संकट जावो, टळो, जगांत आत्मा सजातीय स्वधर्मरूप सूर्य प्रकाशो विश्व हे स्वधर्म सूर्यानें प्रकाशो, प्राणिजात जो जे मर्जीचे खुषीचे असे जो वांछिल तें तें त्यास लाहो, पावो, मिळो! (१७९६)

सर्व कल्याणाचा मंगळाचा वर्षाव करणारे ईश्वरनिष्टांचें समुदाय अविरतपणें सतत ह्या पृथ्वीतलावर भूतांना भेटोत ईश्वर निष्टांच्या भेटी होवोत. (१७९७)

संत सज्जन हे चळा (विद्युल्लता लक्ष्मी खेळणें हालणें ते चालत्या कल्पवृक्षाचे अंकुर) शब्द-सचेतनता ती शंभु चैतन्य राणी चिंतामणी जे (सर्व दुःखें नाहीसा करणारा) त्यांच्या वस्तीचे गांव ते बोलते असे (पियूष)-अमृताचें सागरच कीं अहो अर्णवच ते सोयरे होवोत. (१७९८)

ते तर लाच्छनरहित असें चंद्रच! तापरहित असें सूर्यच! आहेत असें जें सदा-सज्जन, ते सर्वांना प्रिय व्हावेत सोयरे होवोत. (१७९९)

बहुत काय पण ह्या तिन्ही लोक सुखाने परिपूर्ण होऊन आदिपुरुष जो भगवान त्याचे ठायीं अखंडित भजू पूजूं लागावेत. (१८००)

वर ग्रंथावर निर्वाह करणारे ग्रंथाचे सेवक, ग्रंथाचें आश्रित असें जे त्यांना विशेषेकरून ह्या लोकी ईहपर सौख्य यशस्कर होवो सौख्य ते विजयाचे होवो. (विजय=दोरी नसलेले धनुष्य) (१८०१)

येथें श्रीविश्वेशुराव ते 'तथास्तु' म्हणत आहेत हे अहो (दान प्रसाद-) दानाचा प्रसाद असें होईलच कीं, येथें ह्या वरानें श्रीज्ञानदेव ते संतुष्ट झाले सुखी झाले ॥ प्रसाद-दाना! नमो! नमो!! (१८०२)

असें युगाचें ठायीं पण कलियुगामध्यें महाराष्ट्र भूमंडळी देशांत श्रीगोदावरीच्या दक्षिण कुळीं [दक्षिणली-दक्षिण लिंगीं-दक्षिणा घेण्यास पात्र उजवा हात प्रामाणिक, (सा.) अनेक स्त्रीयांवर समान प्रेम करणारा नायक, अनुकूल, विष्णू, शहाणा, हुशार, सभ्य वश. दक्षिणाग्नि=धर्मकृत्यात ब्राह्मणांस दिलेले द्रव्यदान, दक्षिण देश, योग्य, शहाणा, उजवा, विष्णू.] तीरावर (१८०३)

त्रिभुवनाची पवित्रताच एक ती असें अनादी पंचक्रोशीतील क्षेत्र, ते 'नेवासे' नाम जेथें जगाचे जीवन सूत्र श्रीमोहनीराज श्रीमहालया आहे. (१८०४)

जो यदुवंशाचे प्रेम, विलास, खेळ, क्रीडा सौंदर्यच कीं ज्याला सकल कला अवगत होत्या असा (सकळ कलांचेंठायीं वस्त्रच जसें का एक–सकल कलांना ज्यांनीं गृहाचे केले होते, आश्रय दिला होता. सकल कला स्थानीच्या–ठायींच्या केल्या होत्या) क्षितीपाल (क्षितीश न्यायानें चालणारा–न्यायास पोषणारा) न्यायाचा पोशिंदा असा राजा श्रीरामचंद्र जो का— (१८०५)

तेथें महेश महेशिवु–श्रीशंकर (आदिनाथ) अन्वय संभूत म्हणजे नित्यसाहचर्य संतानपणरूपी शिष्य परंपरेत (झालेल्या) जोडलेल्या अशा योग्य श्रीनिवृत्तिनाथांच्या (सच्छिष्यानें नृपानें पुत्रवंतानें) श्रीज्ञानदेवांनीं ज्ञानाबाईगे तू बाप माझा तू माय माझी तू ज्ञान बहिणी गे–गीतेस देशीकार लेणें केले, गीतेवर मराठी भाषेचा अलंकार चढविला गुरूमार्गदर्शक (देशिकराज = गुरूराज, उपदेशक. देशनां = उपदेश, कथन, सूचना. देशकः = उपदेश करणारा, शास्ता, वाटाड्या.) असा मराठी भाषेचा अलंकार गीता देवीच्या अंगावर चढविला (१८०६)

एवम् म्हणजें याप्रमाणें भारताच्या गांवीं ग्रंथरचना विशेष अशी जी ख्यातीची तिचे [म्हणजे आकाश, स्वर्ग, किरण, उदक, डोळा, सूर्यचंद्र अग्नि, (गो = वरूण पुत्राचा सेनापति, पृथ्वी, आई, वज्र)] जे कांहीं, भारतीच मिळून गेलेले असें व्हावे (भारती–सरस्वती) भीष्म–श्रीशंकर–नांवाच्या प्रसिद्ध अशा पर्वामध्यें (पर्व–पर्वणी = तत्त्व विचार पूर्णिमा, अमावास्या) श्रीकृष्णार्जुनांनीं जी कांहीं चांगली बरवी अशी गोष्ट केली आहे ! बोलिली आहे ! (१८०७)

—ती गोष्ट म्हणजे अहो ! सर्व उपनिषदाचे सारच एक काढलेले असें सर्व शास्त्रेंच जेथें मिळून आहेत. सर्व शास्त्रांनीं आपले माहेर घरच एक असें मानिले आहे (कन्येचे आईबाप ते तिचें माहेरचे) असें परम आश्रयाचे स्थान परम हंस [ज्ञानी संन्यासी, गुरू, विष्णू हंस = मत्सर, पर्वत, निर्लोभी राजा.] जे ते प्रेम सरोवर परमहंसानीही सेवावे का सेवन केले होत आहे अशी ती उत्कृष्ट गोष्ट, कां रम्य, संवाद. (१८०८)

अशा त्या गीतेचा कळसाचा असा, तुरा, शिखर, वृक्षाग्र, रोमांच, आणणारा (मोगरीचा कळा) देवळाचा कळस समुद्र, घुसळण्याची रवी, असा कलशच हा संपूर्ण अठरावा अध्याय आहे असें श्रीनिवृत्तिनाथांचें श्रीज्ञानदेव म्हणत आहेत. (१८०९)

पुन्हः पुन्हः वरचेवर वारंवार कीं ह्या ग्रंथरूपी–पुण्य संपत्ती–शास्त्र–रचना,–पुण्य, प्रिय, सुंदर, गंभीर, पवित्र, पुण्यवान् सुवासिक, सत्कृत्य, गंगा तुळस,–संपत्तीनें–योग्यस्थितीरूपी द्रव्यप्राप्ती उत्कर्ष सिद्धी–सर्व (सर्व = सगळे, पूर्ण, शिव, विष्णू) भूतांनीं भूतमात्रांनीं, (भूत = सत्य, योग्य, अनादि, नित्यसिद्ध, योगींद्र, कल्याण, वस्तूंपदार्थ, जीव, प्राणी,) सर्व भूतमात्रांच्या ठायींची सर्व सुखें, संपूर्णपणाची व्हावीत. (१८१०)

श्रीज्ञानेश्वरांनीं बाराशें बारोत्तरें शकामध्यें टीका केली, ती सच्चिदानंद बाबानीं अति आदराने लिहून घातली–लेखनाची केली, सच्चिदानंदबाबा तिचे लेखक झाले !! (१८११)

---

# गीतेचा अध्याय १८ वा

## सर्व गीताशास्त्राचा उपसंहार अर्थासह

मंगलचरण, अध्याय संगती—

### त्याग व संन्यास यथार्थ लक्षण जाणतो इच्छितो

श्लोक १ ला **अर्जुन म्हणाला**—हे महाबाहो! **'संन्यास'** ह्या शब्दाच्या अर्थाचे यथार्थ लक्षण मी जाणूं इच्छितो, तसेंच हे हृषीकेशा! **'त्याग'** शब्दाचे लक्षण रहस्य मी जाणूं इच्छितो, त्याग संन्यास ह्या दोन्ही शब्दाचे रहस्य वेगवेगळे समजून घेण्याची माझी इच्छा आहे. करितां हे केषि निषूदना ते निरनिराळेपणानें सांगावे.

### संन्यास व त्याग

श्लोक २ रा—**श्रीभगवान म्हणाले**—काम्य (सहेतुक ऐच्छिक) कर्माचा न्यास (ठेव त्यागी, त्यागावर सोपविणें,) करणें त्यास कवि **'संन्यास'** (काम्य कर्म त्याग, चतुर्थाश्रम) म्हणतात. सर्व कर्म फलाचा त्याग करणें, त्यास विचक्षण (म्हणजे दूरदर्शी) ते **'त्याग'** म्हणतात.

श्लोक ३ रा—(**नित्यकर्म** ब्राह्मणानें केव्हांही टाकू नये-गायत्री जप केल्यावांचून एक दिवस, संध्येवांचून तीन दिवस, गृह्याग्नि होम केल्यावांचून ब्राह्मण राहिल तर तो शूद्र समजावा-) **कोणी** मनीषी चतुर कर्म **दोषावत् समजून त्यागावे म्हणतात.** दुसरे **कोणी यज्ञ, ज्ञान, तप हे त्याज्य नव्हेत असें म्हणतात.**

श्लोक ४ था—भरतकुलोत्तम पार्था! माझा ह्यासंबंधीं निश्चय ऐक पुरूष श्रेष्टा! त्याग हा त्रिविध आहे.

श्लोक ५ वा—निष्काम कर्म करणाऱ्या **पुरूषांना पवित्र करणारी** तीन प्रकारची **कर्मे**—

'यज्ञ दान तप' त्याज्य नव्हत ती केलीच पाहिजेत.

—'यज्ञदान तप' कर्म मनीषींना म्हणजे चतुर मनुष्याला पावन करणारे आहे.

श्लोक ६ वा—**हे** पार्था! ही यज्ञ ज्ञान तप कर्मे, आसक्ति, देहसंग व फल आशा सोडून करावीत, असें माझें निश्चित मत आहे.

श्लोक ७ वा—[कर्माधिकारीनी (संध्या, उपासना, अग्नि होम, पंच महायज्ञ इत्यादि) नित्य ब्रह्म इत्यादि) नित्य ब्रह्म कर्माचा त्याग (करू नयें), तोच अनर्थ मूलक आहे.] नियत म्हणजे **नियमन केलेल्या कर्माचा संन्यास,** त्याग करणें शोभत नाहीं, पण मोहाने देहाला (आत्मा मानून का प्रेमाच्या वेडाने) कोणी त्याग केला तर तो **तामस त्याग** म्हटला होतो.

श्लोक ८ वा—देहास कष्ट होतात म्हणून कर्म सोडले तर (मोक्षरूप) फळ मिळत नाहीं.—

जे कर्म दुःख म्हणजे शरीराला क्लेश होतील म्हणून भीतीनें सोडले (टाकले जाते) तेथें तो **राजस त्याग** केला, असें झाल्यानें त्यास त्यागाचे फळ मिळत नाहीं.

श्लोक ९ वा—जे कर्म करण्यांस योग्य व करावेंच असें आहे व ते नियत म्हणजे नियमन करून एकाग्र चित्तानें ते धारण करून करावे असें जें संग (आसक्ति, देहसंग) तसेंच फल सोडून केलेले, तेथें **त्याग तो सात्त्विक त्याग** (तपाचरण, विरक्तता, दान.) म्हटला.

श्लोक १० वा—अकुशल म्हणजे क्लेशकारक वाटणाऱ्या कर्माचा द्वेष निंदा करीत नाहीं, कुशल म्हणजे सुखकर वाटणाऱ्या कर्माची आसक्ती धरीत नाहीं, असा जो तोंच **त्यागी** (विरक्त) **पुरूष** होय— तो सत्वगुणयुक्त, सत्व तुल्य संचरलेला, सत्व, बलपूर्ण (मेधा) बुद्धि, ज्ञानवान् संशयरहित असा जाणावा.

श्लोक ११ वा—देहभृत–देहधारी जो त्यास सर्व कर्मे पूर्णपणें सोडणे शक्य नाहीं. **जो कर्मफल-त्यागी तोंच खरा त्यागी** म्हटला होतो.

## क्षुद्रतेमुळें नाश पावणारे त्याला फळ म्हणावे

श्लोक १२ वा—अनिष्ट–अप्रिय, इष्ट–हितावह, व मिश्र (पापपुण्य मेसळ पूज्य) असें **कर्माचें फल त्रिविध** तीन तऱ्हांचें आहे जे कर्मफल **अत्यागी आहेत त्यांना ते प्रेत्य म्हणजे मरणानंतर (परलोकी) भोगावे लागतेच** लागते, असे असते, पण **संन्याशाला** (कर्तृत्वाभिमान व कर्मफल सोडून कर्म करणारे जे त्यांना) त्या **कर्माचे फळ मरणानंतर भोगावे लागत नाहीं.**

श्लोक १३ वा—माझें कळविणे ह्या पांच कारणाचे ते–कर्मफलासंबंधीं सिद्धांत ज्यांत–सांख्य दर्शना-मध्यें प्रसिद्धतेनें, सर्व कर्माची पूर्णता सिद्धि व्हावी म्हणून बोलिले आहे.

श्लोक १४ वा—अधिष्टान, कर्म, सुखदुःख इत्यादींचें आश्रयस्थान, क्रियेला आधारभूत (१) **शरीर कर्ता**–(२) **जीवात्मा,** उपाधियुक्त असा.

(३) **करण**–पृथक्‌विध–भिन्न भिन्न इंद्रिये (५ ज्ञानेंद्रिये व ५ कर्मेंद्रियें, मन व बुद्धि)

पृथक्‌विविध चेष्टा–(४) **प्राणादिकांचे भिन्न भिन्न व्यापार** (५) **दैव**–अदृष्ट किंवा ईश्वरी इच्छा (इंद्रियावर अनुग्रह करणाऱ्या आदित्यादि देवता) हे पांचवे कारण.

श्लोक १५ वा—शरीरानें वाणीनें मनानें मनुष्य जे कांहीं शास्त्रविहित किंवा निषिद्ध (न्याय्य का पुण्य का अन्याय्य पाप किंवा विरूद्ध) कर्म आचरतो, आरंभाचे करतो, त्याची हीं पांच कारणें असतात.

श्लोक १६ वा—कर्माविषयीं **अशीं वस्तुस्थिति असतां** जो कोणी असंस्कृत बुद्धिमुळे, बुद्धि सुसंकृत न झाल्यामुळें शुद्ध चैतन्यरूप व असंग अशा **आत्म्याला** (आपल्यालाच) **कर्ता समजतो.** (शरीर इत्यादीकापासून कर्मे घडतात. हे पाहात नाही.) **त्या** दुर्बुद्धिमान **पुरुषाला कांहींच समजत नाहीं** (न स पश्यति)—

श्लोक १७ वा—**भाव घडविणारे विकाराचे चिन्ह ते**—ज्याला अहंभाव नाहीं. अहंकाराची भावना नाहीं मी कर्ता असा भाव उभा होत नाहीं ज्याची बुद्धि, विषय, संसार वासनामध्यें लिप्त (लेप दिली) होत नाहीं. चेतवली होत नाहीं. दूषित होत नाहीं (अभिप्राय मनोविकार घडणारी गोष्ट,) का मलीन होत नाहीं तो ह्या विश्वातील लोकांना मारूनही मारीत नाहीं. न मारल्या प्रमाणेंच निर्दोष असतो व त्या कर्माच्या (फलानें) पापानें बद्ध होत नाहीं.

श्लोक १८ वा—**ज्ञानी** (हा अर्भकाप्रमाणें निर्हेतुक व निर्विकार)–**ज्ञान** (जाणीव किंवा एकाद्या वस्तुंविषयीं मनावर होणारा संस्कार) **ज्ञेय** (जाणण्याचा जो विषय) **परिज्ञाता** (विषयांना जाणणारा जो कर्ता, भोक्ता,) अशी ही तीन प्रकारची कर्मप्रेरक सामग्री आहे. तसेंच **करण** (इंद्रियें) **कर्म** (इंद्रियांच्या सहाय्यानें होणारा उद्योग) **कर्ता** (क्रिया करणारा) **भोक्ता जीव** असें तीन प्रकार (कर्म या शब्दांत अंतर्भूत होतात. पहिली त्रयी **कर्मोत्पादक सामग्री** व दुसरी त्रयी **कर्मसंग्रह** म्हणजे कर्माचे संक्षिप्त स्वरूप आहे.

श्लोक १९ वा—**ज्ञान कर्म** व **कर्ता** हे भिन्न गुणभेदामुळें तीन प्रकारचें आहेत असें गुणसंख्यान म्हणजे सांख्य शास्त्रांत सांगितले आहे–त्याचें **शास्त्रोक्त स्वरूप ऐक.**

श्लोक २० वा—विभक्त अशा सर्व भूतांमध्यें ज्यायोगे एकच अविभक्त ज्ञान व अविनाशी तत्त्व भाव दिसतो, सांपडतो, समजतो ते **ज्ञान सात्त्विक** ज्ञान होय (भिन्न भिन्न जड देहामध्यें आत्मवस्तु एकच आहे असें समजणें जे.)

श्लोक २१ वा—सर्व प्राण्यामध्यें (सर्व भूतांमध्यें) निरनिराळे शारीरिक भेद आकार असल्यामुळें त्यामध्यें भावही पण भिन्न भिन्न आहेत असा पृथक्‌भाव–ज्या ज्ञानानें होतो ते राजस ज्ञान जाण. सर्व भूतांमध्ये अनेकपणें असलेल्या भिन्न भिन्न भावांना (शरीर आकाररूप) निरनिराळेपणानें भिन्नभिन्नपणानें, जाणते जे **ज्ञान राजस** ते होय.

श्लोक २२ वा—यत् कृत्स्नवत् अतत्वार्थवत् एकस्मिन् कार्ये अहेतुकम् सक्तम् तत्तामसमुदाहृतम्–जे ज्ञान सर्वस्वे तत्वार्थरहित ह्या एका कार्यरूप शरीरांतच सर्वस्वे, हेतू शिवाय, सांठविले आहे असें मानून तेथेंच आसक्त असते तसेंच जे युक्तिरहित तत्वरहित तुच्छ असें असते ते **ज्ञान तामस** ज्ञान होय.

श्लोक २३ वा—एकाग्रतेने मन आवरून, नित्य अवश्यक कर्म देहसंगरहित ( आसक्तिरहित अहंकार विवर्जित प्रीति का द्वेष विकार विरहित असें केले जाते कर्मफलाचा अभिलाष नसलेल्या पुरूषाकडून केले जाते ते **कर्म सात्विक** होय.

श्लोक २४ वा—(अफलप्रेप्सुना कामेप्सुना क्रियते यत् कर्म)—पुरुषाने विषय वासना अभिलाष धरून केलेले सकाम फलेच्छेने केलेले, स्वार्थ दृष्टीनें बहुसायासानें तसेंच अहंकारानें केलेले **कर्म राजस** जाण.

श्लोक २५ वा—जे कर्म परिणाम नाश परपीडा व आपले सामर्थ्य. याचा विचार न करितां केवळ मोहानें केले जाते त्यास **तामस कर्म** म्हणतात.

श्लोक २६ वा—फलाविषयीं आसक्ति रहित, निरहंकारी ( अनहंवादी मीपणाचे बोलणें बोलत नाही जो ) कर्तव्यामध्येंच धैर्य व उत्साह यांनीं युक्त, सिद्धि व असिद्धि या विषयीं काय साधले न साधले तरी निर्विकार राहाणारा असा जो तो **कर्ता सात्त्विक** कर्ता म्हणतात.

श्लोक २७ वा—रागी विषयासक्त कर्म फलप्रेप्सु कर्मफलाची इच्छा करणारा लुब्ध, लोभी, हिंसात्मक –घातकी, अशुचिः अपवित्र हर्ष व शोक यांनीं युक्त असा **कर्ता, राजस** कर्ता म्हटला आहे.

श्लोक २८ वा—अयुक्तः मनोनिग्रह शून्य व्यग्र व चंचल मनाचा प्राकृतः वंचक स्वच्छंदी, अविचारी, स्तब्धः अहंमन्य उद्धट ताठ्यानें वागणारा, नैष्कृतिकः ठकविणारा, लबाड, दुसऱ्याचा अपमान करणारा अलसः आळशीं, विषादी खिन्न, दुर्मुखलेला, दीर्घसूत्री अशा कर्त्यास अज्ञानी **कर्ता म्हणजे तामस** कर्ता म्हटले आहे.

श्लोक २९ वा—धनंजया ! बुद्धीचे ज्ञानभक्तीचे–भेद, तसेंच धृतीचेही (क्रियाशक्तिचे,) गुणामुळें तीन तीन होणारे जे ते ऐकः (प्रोच्यमानमशेषेण–) ते आतां मी पृथक्करणपूर्वक फोड करून सांगणार आहे.

श्लोक ३० वा—हे पार्था ! ती **बुद्धि, सात्त्विक** बुद्धि होय जी, हे पार्था–सद्‌सद्विवेक शक्ति, प्रवृत्ति (कर्म मार्गाला) व निवृत्ति (म्हणजे मोक्ष मार्गाला) कर्तव्य कोणते अकर्तव्य (निषिद्ध) कोणतें भय कशांत आहे ? अभय कशानें येतें तसेंच बंध व मोक्ष म्हणजें काय हे, यथार्थ जाणते.

श्लोक ३१ वा—हे पार्था ती **बुद्धि, राजस** बुद्धि होय जी धर्माला, अधर्म शास्त्रविहिताला शास्त्रनिषिद्ध समजते, जी कार्याला अकार्य समजते व कर्तव्याला अकर्तव्य, समजते अथवा जी ह्या विषयीं यथार्थ निर्णय जाणत नाहीं निश्चयाची होत नाही जी कीं.

श्लोक ३२ वा—हे पार्था ! जी अविवेकाने अधर्माला धर्म समजते सर्व वस्तूंमध्यें विपरीत भावना करते त्याचप्रमाणें सर्व गोष्टी विपरीत म्हणजे उलट समजते, ती **बुद्धि तामस** ( तमोगुणानें व्याप्त ) बुद्धि होय.

श्लोक ३३ वा—**सात्त्विक** धृति ती जाण की जी हे पार्था ! साधकास अनन्ययोग आचरण्यास लावून अव्यभिचारी धारणाशक्तीनें ध्यानयोग तत्पर होऊन (१) मन प्राण व इंद्रिये यांच्या क्रिया धारण करू देते, (२) पार्था एकाग्र वृत्तीच्या योगानें चंचल न होणाऱ्या अशा धृतीनें मन, प्राण व इंद्रियें यांची कर्मे धारण का नियंत्रित करतां येतात.

श्लोक ३४ वा—हे पार्था ती **धृति राजस धृति** जी, धारणाशक्तीच्या का अत्यंत आसक्तीनें धर्म धर्म, धर्म काम, धर्म अर्थ हे पुरूषार्थ साधण्यासाठीं धारणाशक्तीच्या द्वारें, धृतिनें धारणाशक्ति धारण केली जाते, प्रसंगानेच कीं फल आकांक्षी अशी ती.

श्लोक ३५—दुर्मेधस्–दुष्ट अविवेकी पुरूष अविवेक दुष्टपणा दुर्मेधा ती सोडीत नाहीं निद्रा स्वप्न अवास्तव भय, शोक, निष्कारण, विषाद मनःखिन्नता व मद उन्मत्तपणा, यांना सोडीत नाहीं त्यांनाच चिकटून राहाते ती **धृति** (धारणाशक्ति) **तामस** होय.

श्लोक ३६—नरश्रेष्ठ अर्जुना ! आतां **सुखाचे तीन प्रकार** मी सांगतो ते माझ्यापासून ऐक—

ज्या सुखाच्या अभ्यासामुळें म्हणजे संवयीमुळें प्राणी तो रमतो, प्राण्यांना आवड उत्पन्न होते सुखाच्या संवयीमुळें प्राणी जेथें रमतो, प्राण्यास रतीची आवड उत्पन्न होते व दुःखाचा शेवट अगदी (दुःखांतं निगच्छति) निश्चयानें होतो.

श्लोक ३७—**सात्विकसुख**—जे आरंभी विषाप्रमाणें दुःसह परिणामे शेवटी अमृताप्रमाणें आल्हाद देणारे (आत्मबुद्धि प्रसादजं) व आपल्याच निर्मळ बुद्धीच्या प्रसादानें मिळणारे असते जे ते सुख सात्विक म्हटले आहे.

श्लोक ३८ वा—**राजस सुख** जे विषय व इंद्रियें याच्या संयोगापासून उत्पन्न होते. जे आरंभी उपभोगकाळी अमृत सेवनाप्रमाणें आनंददायक पण शेवटीं विषासारखे मारक ते दुःखपर्यवसायी सुख राजस कोटीतील समजावे.

श्लोक ३९ वा—**तामस सुख** जे आरंभी व परिणामीही जीवाला मोहात पाडते विवेक शून्य करते. आणि निद्रा आळस व असावधपणा ज्यापासून उत्पन्न होते ते तामस सुख होय.

श्लोक ४० वा—**सर्व काही प्रकृतीच्या आधीन आहे** प्रकृतीपासून झालेल्या तीन गुणानी मुक्त असे कांहींही सत्त्व ह्या पृथ्वीवर, स्वर्गामध्यें का देवलोकामध्येंही नाहीं.

श्लोक ४१ सावा—हे पार्था ! **पूर्वजन्म संस्काराच्या गुणाप्रमाणें** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र याची शास्त्रविहित नित्यकर्म ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें–पृथक **वाटून दिली आहेत.**

श्लोक ४२ वा—**ब्राह्मणाची स्वाभाविक कर्मे** अध्याय १७ श्लोक १४ ते १९ पाहा—शम, (अंतःकरण निग्रह मनोनिग्रह) दम (बाह्य) इंद्रियाचा निग्रह, तप, त्रिविध तप–कायिक वाचिक मानसिकः शौच अंतर्बाह्य पवित्रता, क्षांति–क्षमा, आर्जव–मनाचा सरळपणा. तसेंच ज्ञान–आत्मज्ञान, विज्ञान–प्रत्यक्ष अनुभवाचे ज्ञान आस्तिक्य–श्रद्धाळुपण.

श्लोक ४३ वा—**क्षत्रियाची जन्मसिद्ध कर्मे**—शौर्य = शूरपणा तेज–मानहानी सहन न करणें परपीडा सहन न होणे धृति = महाप्रसंगी न खचणारे धैर्य, दाढ्र्य = कुशलपणें कोणतेही कृत्य करण्याची

दक्षता. अपलायनं युद्धे अपि=युद्धातून कधींहीं नच पळणें. दान-योग्य याचकाना सढळ हातानें वस्तु देऊन संतोषविणें ईश्वरभाव=सर्वत्र सत्ता चालविण्याचा यथार्थ पराक्रम-सत्तासामर्थ्य.

श्लोक ४४ वा—**वैश्याचें कर्म**—शेती-कृषि, गोरक्ष्ये, वाणिज्य-गुरेढोरे बाळगणें, क्रय-विक्रय, देण्याघेण्याबाबत व्यापार करणें. **शूद्राचे स्वाभाविक कर्म**-तिन्ही वर्णांची सेवा करणें.

श्लोक ४५—आपआपल्या **वर्णाश्रमधर्मानुसार**, कर्मामध्यें अनुष्ठान करणारा स्वकर्मनिष्ट पुरूष चित्तशुद्धि ज्ञानशक्ति व मोक्षसिद्धि मिळवितो. आतां **स्वकर्मनिष्ट पुरुषाला मोक्ष ज्यायोगानें मिळतो ते साधन ऐक—**

श्लोक ४६—**मनुष्यमोक्ष कसा मिळवितो—**

ज्यापासून प्रवृत्ति (प्राण्याची व पदार्थाची उत्पत्ति) होते, व ज्यानें हे सर्व (ततं) व्यापले आहे त्या ईश्वराचे, स्वकर्माच्या-वर्णधर्माच्या नियमानुसार पूजन करून मनुष्य मोक्ष मिळवितो.

श्लोक ४७—**स्वभावधर्म सोडल्यानें घात होतो—**

चांगल्या प्रकारे आचरण केलेल्या परधर्माहून जन्मप्राप्त कर्माचे विगुण म्हणजे दोष युक्त केलेले अनुष्ठान देखील अधिक कल्याणप्रद आहे. जन्म स्वभावाला मानवणारे कर्म केले असतां पाप लागत नाहीं.

श्लोक ४८ वा—अग्नि हा धुरानें आच्छादिलेला असतो त्याप्रमाणे **स्वभावसिद्धकर्म सदोष जरी दिसेल तरी ते टाकू नये.** कारण सर्व कर्मे दोषानें व्यापलेली असतातच.

श्लोक ४९ वा—**नैष्कर्म्यसिद्धि कशी प्राप्त होते ?**—सर्वत्र ममत्वरहित, जितेंद्रिय, पूर्ण निरीच्छ, पुरूष ज्यानें मनाला जिंकिले व तो निस्पृह म्हणजे निरीच्छ-आसक्तिरहित झाला, त्याला संन्यासाने कर्मफल त्यागानें, सांख्ययोगाचे परमश्रेष्ठ अशी नैष्कर्म्य सिद्धि प्राप्त होते.

श्लोक ५० वा—**नैष्कर्म्यरूप ज्ञानावस्थेला प्राप्त झालेला योगी ज्या मार्गानें ब्रह्मरूप होतो तो मार्ग** समासेन म्हणजे माझ्या भेटीनें, संग्रहानें, संक्षेपाने, मजपासून समजून घे, हीच ब्रह्मज्ञान प्राप्तीची उत्कृष्ठ युक्ती (१८३ ओवी पहा) आहे. नैष्कर्म्य सिद्धि प्राप्त झाल्यावर **ज्ञानाची परमगती** सीमा निष्टा स्थिति जे **ब्रह्म ते कसें प्राप्त होते ते संक्षिप्तपणें सांगतो ऐक—**

श्लोक ५१ वा—विशुद्ध निष्कपट बुद्धिचे युक्त होऊन शरीर व इंद्रियाना धैर्याने नियमित करून व आत्मसंयमन करून शब्दस्पर्शादि विषय वासनांचा त्याग करून आणि निर्विकार होऊन म्हणजे राग द्वेष-प्रीति आणि द्वेष समूळ विसरून—

श्लोक ५२-५३ वा—पवित्र अशा एकांत जागी रहाणारा-मिताहारी-कायेचा वाचेचा व मनाचा निग्रह करणारा नित्य ध्यानयुक्त व विरक्त तसेंच अहंकार बल गर्व, काम, क्रोध, परिग्रह सोडून ममत्वरहित असा शांत झालेला **पुरूष ब्रह्मभूत ( जीवन्मुक्त ) होण्यास योग्य होतो.**

श्लोक ५४ वा—**ब्रह्म स्थितीस पोहोचलेला जीवन्मुक्त**—ज्याचें अंतःकरण निरतिशयानंदानें अखंड प्रसन्न असते. जो सदा शोकरहित व इच्छाशून्य असतो, सर्व प्राण्याच्या ठिकाणीं त्याची धृति सारखी दयायुक्त असते अशा **ज्ञानी भक्तालाच माझी ' परा ' नामक भक्ति प्राप्त होते.**

माझी **ज्ञानोत्तर भक्ति परमभक्ति** प्राप्त करून घेतो, तो **ब्रह्मभूत, प्रसन्नचित्त**, कशाचाहि शोक करीत नाहीं, कशाचीही इच्छा करीत नाहीं, व तो सर्वाभूती सम झाला कीं.

श्लोक ५५—**या परा भक्तीनें** मला तो भक्त जाणतो. मी परमात्मा केवढा आहे ? कोण आहे ?

असें मला यथार्थ स्वरूपानें जाणतो–माझें यथार्थ स्वरूप जाणतो हे भक्तीच्या बळानें–**परमेश्वरी स्वरूपाचे तात्विक दृष्टीनें सामर्थ्य जाणून माझ्या स्वरूपांत तो तादात्म्य पावतो.**

श्लोक ५६—सर्वात्म भावानें माझा आश्रय केला (व्यपाश्रयः) असा **एकनिष्ठ ज्ञानीं भक्त** सर्व प्रकारची कर्मे निरंतर करीत असला तरी देखील **माझ्या** ईश्वराच्या **प्रसादानें शाश्वत–अक्षय्य पदाला 'मुक्तीला' प्राप्त होतो.**

श्लोक ५७—चित्तानें मज ईश्वराला सर्व कर्मे अर्पण करून मत्परायण म्हणजे ईश्वरपरायण होऊन बुद्धियोगाचा आश्रय करून (उपाश्रित्य) तूं आपले चित्त मज ईश्वराकडे लाव.

श्लोक ५८ वा—मच्चितः माझ्या ठायीं चित्त असलेला असा तूं सर्व संकटे माझ्या कृपा प्रसादानें नाहीशी होतील. त्या मधून तूं तरून जाशील पण अहंकारानें, दुरभिमानानें माझें न ऐकशील तर मात्र नाश पावशील; परमार्थापासून च्युत होशील.

श्लोक ५९ वा—दुरभिमानांत स्थिर होऊन–दुरभिमानाचा आश्रय करून मी न योत्स्य युद्ध करणार नाहीं असे जे कांहीं तूं म्हणत आहेस त्या तुझा उद्योग, करामत, व्यवसाय मिथ्या आहे. खोटा आहे भ्रमात्मक निश्चय तुझा तो भ्रामक आहे, कारण तुझी क्षात्रधर्म प्रकृतीच तुला युद्ध करायला लावील (कारण तुझें वैराग्य क्षणिक आहे ते ज्ञानयुक्त नाही ते विकार प्रेरित आहे.)

श्लोक ६० वा—कौंतेया तूं आपल्या स्वभावसिद्ध कर्माने बांधला गेल्यामुळें स्वतःच्या कर्तव्यानें असणारी प्रकृतीच तुला युद्ध करायला लावील. मोहामुळें जे युद्धकर्म करूं नयें असें वाटते तेंच तुला क्षात्र प्रकृतीच्या स्वाधीन होऊन करावे लागेल. स्वेन स्वभावानेन कर्मणा निबध्य–यत् मोहात् कर्तुनेच्छसिवत् अवशः अपि करीष्यसि'

श्लोक ६१—हे अर्जुना! (देह कां) शरीर रूप यंत्रावर आरूढ झालेल्या सर्व प्राण्यांना अतर्यामी असलेला परमेश्वर आपल्या मायेनें त्याच्या, त्याच्या आपल्या कर्माप्रमाणें जन्ममरणरूपी संसारामध्यें फिरवीत सर्व भूतांच्या हृदयांत स्थित आहे–

श्लोक ६२—त्याच ईश्वराला काया वाचा मनें करून शरण जा. म्हणजे त्या ईश्वराच्या प्रसादानें त्याची आज्ञा वंदन केली असतां—उत्तम शांतीला–अढळ पदाला प्राप्त होशील (स्थूळ देह हे देवळाचे आवार अंतःकरण हे देऊळ, आत्मा–देव, इंद्रिये ही पूजेची उपकरणें, या सामग्रीनें ईश्वराला शरण जावें असें म्हटले आहे.)

श्लोक ६३—गुह्य गोष्टीपेक्षांही विशेष गूढ परमार्थ ज्ञान माझ्याच्याने सर्वज्ञ तुला पूर्वापार संबंधीचा विचार करून सांगितले तुला आतां योग्य वाटेल ते कर ('कर्म उपासना ज्ञान' यापैकी कोणताही मार्ग स्वीकारून मोक्ष पात्र हो मोक्ष प्राप्त करून घे.)

श्लोक ६४ वा—आणखी एकदा गुह्यातलेही उत्कृष्ट गुह्य असें परम वचन ऐक. माझा तूं प्रिय मित्र म्हणून तुला तुझ्या हिताचे रहस्य सांगतो—

श्लोक ६५ वा—'मन्मना भव।', 'मद्‌भक्तः भव।', 'मद्याजी भव।' नमस्कुरू मां। सत्य। प्रिय। असि मे त्वं। ते प्रतिजानेमाम् एव एष्यसि।

मजवर मन ठेव, माझी उपासना कर, मज ईश्वरालाच नमस्कार कर, म्हणजे आश्रयाचा कर–, शरण जा–, म्हणजे मलाच येऊन पोहोचशील हे सत्य तुला प्रतिज्ञेवर सांगतो कारण तूं मला अत्यंत प्रिय (मित्रं) आहेस.

श्लोक ६६—सर्व धर्म म्हणजे इतर तुझें **सर्व मनोधर्म किंवा खटाटोप सोडून मज ईश्वराला शरण ये;** माझा आश्रय कर–ज्याची तुला भीती वाटते त्या सर्व पातकापासून मी तुला मुक्त करीन; शोक करूं नकोस, शोक दु:ख भय ही अज्ञान जन्य आहेत म्हणून भगवंतांनी गीताशास्त्राचा उपदेश "शोक करू नकोस" शोक संविग्न मानसः अ. १/४० असा अर्जुनाला करून ग्रंथाचा उपसंहार केला.

श्लोक ६७—**गीता शास्त्र हे तुझ्या कल्याणार्थ सांगितलेले** कोणतीही तपश्चर्या किंवा जप न करणाऱ्याला तसेंच श्रद्धामय चित्तानें जो ईश्वरभक्ती करणारा नसेल त्याला, तसेंच ज्याला ही गीता श्रवण करण्याची इच्छा नसेल, किंवा देव गुरु यांची शुश्रुषा न करणाऱ्याला (सांगू नये) आणि जो मज परमात्याचा द्वेष व मत्सर करतो त्या निंदकालाही हे पवित्र गीताशास्त्र सांगू नये.

श्लोक ६८ वा—जो मनुष्य हे परम गुह्य माझ्या भक्तांना माझ्याठायीं अत्यंत प्रेम करून सांगेल प्रगट करील तो नि:संशय मलाच येऊन मिळेल.

श्लोक ६९ वा—मजठायीं आत्यंत प्रेम ठेवून सांगणाऱ्या मनुष्यापेक्षां मला अधिकाहूनहि अधिक प्रिय असें कांहींही नाहीं आणि त्याच्याहून अधिक आवडता होणारा ह्या पृथ्वीवर दुसरा कोणीही नाहीं.

श्लोक ७० वा—जो हा आपला दोघांचा धर्म्य धर्ममय संवाद, अध्ययनानें अभ्यासाचा करील त्यानें ज्ञानदानाने माझें पूजन केले असें मी म्हणतो, समजतो.

श्लोक ७१ वा—श्रद्धावान होऊन, दोष दृष्टिरहित होऊन, जो कोणी नुसतें हे गीताशास्त्र श्रवण करील तो ही मुक्त होऊन पुण्यवानाच्या उत्तम लोकाप्रत जाईल.

श्लोक ७२ वा—हे पार्था! तूं हे एकाग्र चित्तानें ऐकलेस नां! तुझा अज्ञान (संमोह) जनित मोह सर्वथैव नाहींसा झाला नां!

श्लोक ७३ वा—अर्जुन म्हणाला! हे अच्युता! तुमच्या कृपा प्रसादानें माझा मोह नाहींसा झाला; मला कर्तव्य आठवण,–स्मृति उत्पन्न झाली आहे, माझा संशय नाहींसा होऊन मी सावध झालो आहे, आतां मी तुमचें वचन ऐकेन; तुमच्या म्हणण्याप्रमाणें करीन.

श्लोक ७४–७५—संजय म्हणाला–महात्मा वासुदेव व महात्मा अर्जुन यांचा हा अद्भुत संवाद, रहस्य–कारक हर्षयुक्त–रोमांचकारक असा मी ऐकला. श्रीव्यासांच्या कृपेने मला दिव्य दृष्टि प्राप्त होऊन हे परम गुह्य प्रत्यक्ष योगज्ञान कां योग संवाद योगेश्वर श्रीकृष्ण सांगत असतां मला ऐकावयास मिळाला:

श्लोक ७६ वा— हे राजन्! पुन्हः पुन्हः मी स्मरण करीत आहे, ह्या श्रीकृष्णार्जुनाच्यां संवादाची अद्भुत व पुण्यकारक संवादाचे पुन्हः पुन्हः स्मरण आठवण होऊन मी वारंवार हर्षित होत आहे.

श्लोक ७७—हे राजा श्रीकृष्णाच्या त्या अद्भुत विश्वरूपाचे पुन्हः पुन्हः स्मरण करून मला मोठा विस्मय होत आहे, वारंवार हर्ष, आनंद होत आहे.

श्लोक ७८—जेथें योगेश्वर श्रीकृष्ण जेथें धनुर्धारी पार्थ, तेथेच अचल लक्ष्मी विजय ऐश्वर्य आणि न्याय ही ठेविलेलीच आहेत असें माझे मत आहे.

याप्रमाणें भगवद्गीता उपनिषदरूपी ब्रह्मविद्यांतर्गत योगशास्त्रामधील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादा-संबंधी हा 'मोक्षसंन्यास' (अर्जुनोत्थान) योग नांवाचा अठरावा अध्याय होय.

— ॐतत्सत् श्रीकृष्णार्पणमस्तु —

